# तुकाराममहाराजांच्या
## अभंगांची
# सांप्रदायिक ओळीची गाथा

[ अभंग संख्या ४१५२ ]

( ह. भ. प. देहूकर महाराज, बेलापुरकरबुवा, वासकरबुवा, इत्यादिकांच्या फडांवरील )

प्रकाशक

केमकर आणि मंडळी, मुंबई ४

शके १८७१ सन १९५०

मूल्य ७ रुपये ८ आणे

पुरस्कारः—

**अ. का. प्रियोळकर**

मराठी संशोधनमंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २

तुकाराममहाराजांचें संक्षिप्त चरित्रः—

**म. भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर**

चित्रकारः—

**दीनानाथ दलाल व रघुवीर मुळगांवकर**

प्रकाशकः—

**श्रीकृष्ण दामोदर कुलकर्णी,**

**माधव पुरुषोत्तम कुलकर्णी,** बी. ए.

प्रकाशक व ग्रंथविक्रेते, विठ्ठलभाई पटेल रोड, मुंबई ४

मुद्रकः—

पृष्ठें १ ते १३६ **मधुकर रघुनाथ कालेवार,**

प्रफुल्ल प्रिंटिंग प्रेस, ३८० ई, नानाशंकरशेट वाडी, गिरगांव रोड, मुंबई ४

पृष्ठें १३७ ते ३२० **कृष्णाजी नारायण सांपळे,**

रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस, त्रिभुवन रोड, मुंबई ४

पृष्ठें ३२१ ते पुढील सर्व व आरंभींचीं पृष्ठें ३२ **वि. पु. भागवत,**

मौज प्रिंटिंग ब्यूरो, खटाववाडी, मुंबई ४

# अल्प निवेदन

सुमारें दहा वर्षांपूर्वी तुकाराम महाराजांच्या पंढरपूर येथील वंशजांचा परिचय झाल्या-वेळीं त्यांच्या संग्रहीं असलेल्या महाराजांच्या अस्सल गाथ्याप्रमाणें छापलेल्या गाथ्याच्या प्रति दुर्मिळ झालेल्या असल्यामुळें सदर गाथ्याचें पुनर्मुद्रण करण्याचा विषय निघाला व मीं तें काम पत्करलें. महाराष्ट्रांत तुकाराम महाराजांविषयींचा आदर व भक्ति दृढमूल झालेली असल्यामुळें त्यांच्या अभंगांचे अनेक गाथे प्रसिद्ध झाले; तथापि पंढरपूर येथील त्यांच्या वंशजापाशीं असलेल्या अभंगवहीचें महत्त्व विशेष आहे हें सांगणें नलगे. वारकरी लोकांत 'ओळीचा गाथा' या नांवानें प्रसिद्ध असलेला सांप्रदायिक गाथा तो हाच होय.

वर सांगितल्याप्रमाणें सदर गाथ्याच्या प्रकाशनाचा विचार पक्का झाला खरा; पण विचारा-प्रमाणें कृति घडून येईपर्यंत मध्यंतरीं दहा वर्षांचा काळ लोटला. याचें कारण इतर अडचणीं-बरोबरच दुसऱ्या महायुद्धाची साऱ्या जगावर ओढवलेली आपत्ति व तज्जन्य कागदासारख्या आवश्यक वस्तूंचा तुटवडा हें मुख्य होय. ही अडचण अंशतः दूर होण्याचें लक्षण दिसूं लागतांच मीं या कार्याला पुन्हा हात घातला, तोंच मुंबई सरकारच्या प्रोत्साहनानें एका जुन्या गाथ्याचें प्रकाशन होणार आहे असें प्रसिद्ध झालें. तेव्हां आपण अंगिकारलेलें हें काम आर्थिक दृष्ट्या कितपत जमेल अशी शंका मनांत डोकावूं लागली. पण पुन्हा असा विचार मनांत आला कीं, तुकाराम महाराजांच्या पुण्याईच्या अल्पांशाच्या जोरावरही असलीं कार्यें सामान्य माणसें पार पाडूं शकतात असा जर जुना दाखला आहे तर आपणही पुढची चिंता कां करावी ? या विचारानें पुन्हा मनाला धीर आला आणि गेल्या सात आठ महिन्यांच्या अश्रांत परिश्रमानंतर तुकाराम महाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक पुण्यतिथ्युत्सवाच्या वेळींच हें काम पुरें झालें, याबद्दल माझ्या-प्रमाणेंच तुकाराम महाराजांच्या असंख्य भक्तांनाही संतोष वाटेल अशी माझी निश्चिति आहे.

हा गाथा वारकरी लोकांचा सांप्रदायिक गाथा आहे हें वर सांगितलेंच आहे. पंढरपूर येथील मूळ प्रतीशीं हा ताडून पाहिलेला असून जेथें अर्थविपर्यासाचा संशय उत्पन्न होईल असें वाटलें अशा अगदीं थोड्या दुरुस्त्यांशिवाय यांत बदल केलेला आढळणार नाहीं. शिवाय या दुरुस्त्याही सांप्रदायिक परंपरेनें म्हटल्या जाणाऱ्या अभंगांशीं विरोधी नाहींत व त्या तुका-राम महाराजांचे पंढरपूर येथील विद्यमान वंशज ह. भ. प. सोपानकाका देहूकर यांच्या संम-तीनेंच केलेल्या आहेत. कांहीं मुद्रणदोष राहिले आहेत त्यासाठीं शेवटीं शुद्धिपत्र जोडलें आहे.

शेवटीं "फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तों हमाल भारवाही ।" हें वचन माझ्या बाबतींत अगदीं अक्षरशः खरें आहे एवढें सांगून हें अल्प निवेदन संपवितों.

फाल्गुन व. २ शके १८७१<br>दिनांक ६ मार्च सन १९५०

**पुरुषोत्तम दामोदर कुलकर्णी**

# प्रकाशकाचे दोन शब्द

आमच्या मंडळीनें हा गाथा प्रसिद्ध करण्याचें ठरविल्यावर अनेक लोकांनीं हस्तें पर-हस्तें या कामीं मदत केली आहे. त्या सर्वांचे आम्ही येथें जाहीर रीतीनें आभार मानतों. महाराजांचें चरित्र लिहून देणारे म. भा. भू. आजगांवकर, पुरस्कार करणारे श्री. प्रियोळकर, मुद्रणप्रत तयार करण्यापासून मुद्रितें तपासण्यापर्यंतचें परिश्रमाचें काम करणारे श्री. पु. दा. कुलकर्णी, चित्रें वेळीं तयार करून देणारे श्री. दलाल व मुळगांवकर त्याचप्रमाणें तिन्ही छाप-खान्यांचे मुद्रक श्री. कालेवार, सापळे व भागवत या सर्वांचे तर आम्हीं विशेषच आभारी आहों.

शेवटीं आमची ही सेवा जनताजनार्दन गोड करून घेईल अशा निश्चितीनें आम्ही हा ग्रंथ श्रीपांडुरंगचरणीं सादर करतों.

—प्रकाशक

# पुरस्कार

एखाद्या वाङ्मयसेवकाच्या स्मारकाचा उत्कृष्ट प्रकार म्हटला म्हणजे त्याच्या ग्रंथांची सुंदर आवृत्ति काढणें हें होय, ( " The best monument that can be erected to a man of literary talents, is a good edition of his works. " ) अशा प्रकारचें मत सुप्रसिद्ध संस्कृत पंडित सर विल्यम जोन्स याचें होतें असें सांगतात[1]. या मताला अनुसरून श्रीतुकाराम बुवांच्या निर्याणाच्या सध्यांच्या त्रिशतसांवत्सरिक उत्सवाच्या प्रसंगीं त्यांच्या स्मृतीचा गौरव करण्याचा सर्वोत्तम मार्ग म्हटला म्हणजे त्यांच्या गाथ्याची एक सर्वांगसुंदर पद्धतशीर आवृत्ति तयार करणें हाच आहे, यांत शंका नाहीं. महाराष्ट्रांत ग्रंथमुद्रणाची सुरुवात एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पादाच्या शेवटास झाली; परतु एखादा ग्रंथ छापणें म्हणजे तो विटाळणें अशाप्रकारची सोवळी समजूत त्या काळीं सर्वत्र रूढ असल्यामुळें आरंभीं कांहीं वर्षें तरी धार्मिक ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचें धाडस कोणत्याहि प्रकाशकाला झालें नाहीं. अशा प्रकारचा पहिला प्रयत्न म्हणजे एकनाथाचें 'रुक्मिणी-स्वयंवर' हा असावा असें वाटतें. हा प्रयत्न बापू जोशी पांवसकर यांनीं केला. " रुक्मिणी-स्वयंवराच्या देशोदेशींच्या जुनाट प्रती ३१ मिळवून यथामती शुद्ध करून रखमाजी देवजी शिंपी मुळे यांचे हातून लिहवून मुंबईत गणपत कृष्णाजी थळे भंडारी यांणीं आपले शिळा-छापखान्यांत हा ग्रंथ छापिला. शके १७५८ दुर्मुखनाम संवत्सरे श्रावण कृष्ण ८ कृष्णजयंती शुक्रवारीं संपविला. " ( इ. स. १८३६ ) हा खटपटी गृहस्थ इतक्यानेंच थांबला नाहीं; तर त्यानें **ज्ञानचंद्रोदय** नावाचें एक मासिकहि केवळ जुनें वाङ्मय छापून काढण्याकरितांच म्हणून श० १७६२ (इ० १८४० ) पासून सुरू केलें. या मासिकांत ( ग्रंथ ५, कागद ३६, ३७ ) श. १७६६ मध्यें " अभंग पत्रिकेचे तुकोबाचे " ( संख्या ६६ ) प्रसिद्ध झाले. तुकारामबोवांच्या अभंगांवर मुद्रणाचा झालेला हाच पहिला ज्ञात संस्कार होय. याच्याही पूर्वीं तुकारामांच्या नांवावर असलेली अभंगात्मक टीका गीतार्थ-बोधिनी नामक ग्रंथांत १८४२ सालीं प्रसिद्ध झाली होती, परंतु हे अभंग

1. The Works of Sir William Jones, Vol. I, London, 1799. ( Preface ).

तुकारामांचेच कीं काय हें नक्की सांगवत नाहीं. पुढें आणखीही कांहीं अभंग मधून मधून या मासिकांत प्रसिद्ध झालेले दिसतात, पण त्यांचा तपशील या ठिकाणीं देण्याचें कारण नाहीं. पावसकरांचा हा 'ज्ञानचंद्रोदया' चा उद्योग लवकरच स्मृतिनष्ट झालेला पाहून नवल वाटतें. न्या. मू. रानडे यांनीं मराठी प्रकाशनावरील आपल्या सुप्रसिद्ध टांचणांत त्याचा नामनिर्देशही केलेला नाहीं. अशा प्रकारचा दुसरा महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे माधव चंद्रोबा डुकले यांच्या '**सर्वसंग्रहा**' चा होय. जुन्या वाङ्मयाच्या प्रकाशनाला वाहिलेलें हें मासिक इ० स० १८६० सालीं सुरू झालें. यांत तुकारामांचा समग्र गाथा क्रमशः प्रसिद्ध करण्याचा उपक्रम झाला. या गाथ्याचा पहिला भाग १८६२ सालीं, दुसरा १८६४ सालीं, तिसरा १८६६ सालीं व पांचही भाग मिळून एकत्र १८६८ सालीं प्रकाशित झालेले दिसतात. या गाथ्यांत एकंदर अभंगसंख्या ३३२९ आहे.

माधवचंद्रोबांचा गाथा मुद्रित होत असतांना गाथा छापण्याचा दुसरा प्रयत्न झाला. या खटपटीच्या मुळाशीं रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक होते. तो गाथा छापण्यापूर्वी पंढरपुराकडे त्याचा कसा काय खप होईल याची चवकशी आपल्या स्नेह्याकडे त्यांनीं केली होती. तिचें उत्तर रावजी सखाराम लिमये यांजकडून आलें तें असें— "तुकारामाच्या गाथ्यांच्या प्रती पुष्कळ खपतील. परंतु छापील प्रती घेण्यास लोकांचा अंदेशा आहे. कारण शाईत कांहीं वर्ज्य पदार्थ आहेत असें त्यांच्या मनानें घेतलें आहे. अक्षर मोठें, सुवाच्य व शिळाछाप असावें व शाईची खात्री द्यावी." (२७–३–६७ चें पत्र)

हा गाथा १८६८ सालीं प्रसिद्ध झाला. अभंगसंख्या ४५०० होती. गणपत कृष्णाजी गाथा म्हणून तो प्रसिद्ध आहे. याचें अक्षर "मोठें सुवाच्य" आहे; पण तो शिळाछाप नसून खिळाछाप आहे. या गाथ्याच्या आरंभीं पुढील प्रास्ताविक लेख आढळतो :—

"शके १७८६।८७ मध्यें क्षेत्र पंढरपूर एथें एका स्नेह्यानें उद्योग करून तुकारामबावांच्या गाथ्याची एक प्रत तयार करून पाठविली, व ती सुवाच्य अक्षरानें व चांगल्या शाईनें छापली असतां पुष्कळ वारकरी आदिकरून भाविक लोकांस तिचा उपयोग होईल असें कळविलें. नंतर दुसऱ्या प्रती मिळवून

२. रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें चरित्र, भा. २ रा. ले. ग. रा. हवालदार, १९२७, पृ. ९५९.

त्यांच्या आधारानें ग्रंथ साद्यंत पाहून, जेथें लेखकानें चुका केल्या होत्या असें दिसलें, त्या नीट करून सांप्रत हा ग्रंथ अत्यादरें सादर केला आहे."

लिमये यांच्या वरील पत्रांत "शाईची खात्री द्यावी" असें म्हटलें असून वरील प्रस्तावनेंत "चांगल्या शाईनें छापिली" असल्याची खात्री दिली आहे. तरी शाईची ही काय भानगड आहे, तें या ठिकाणीं सांगणें अप्रासंगिक होणार नाहीं. ज्या गणपत कृष्णाजीच्या छापखान्यांत तुकारामांची प्रस्तुत गाथा छापण्यांत आली त्याच छापखान्यांत **दिग्दर्शन** नांवाचें शास्त्रीय विषयाला वाहिलेलें एक मासिक १८४० सालापासून निघत असे. त्यांत या शाईच्या कृतीसंबंधीं माहिती सांपडते—

"या कागदावर लिहिण्याची शाई कशी करावी तो प्रकार.

| | | | |
|---|---|---|---|
| लाख चपट्या वड्या | तोळे ४, | साबू विलायती | तोळे ४, |
| रुमा मसतकी | तोळे ५, | मेण पिवळे | तोळे ३, |
| | | तूप अथवा चर्बी | तोळे ४. |

अथवा

| | | | |
|---|---|---|---|
| चर्बी अथवा तूप | तोळे ४, | लाख | तोळे ४, |
| मेण | तोळे ४, | साबण | तोळे ४. |

"या छापाच्या शाईत चर्बी पडत असती, यामुळें छापलेलें पुस्तक अपवित्र अशी लोकांची समजूत आहे, म्हणोन याविषयीं कांहीं लिहिलें पाहिजे. वर जिनसाच्या यादी लिहिल्या आहेत त्यांत तूप अथवा चर्बी असें आहे, परंतु हें दिग्दर्शन ज्या छापखान्यांत छापतात, तेथें चर्बीच्या ठिकाणीं तुपाचा उपयोग करतात.[३]"

तुकारामांच्या गाथ्याचा तिसरा महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे सरकारच्या आश्रयाखालीं प्रसिद्ध झालेला व शंकर पांडुरंग पंडितांच्या नेतृत्वाखालीं विष्णु परशुराम शास्त्री पंडित यांनीं शुद्ध केलेला तुकारामांचा गाथा होय. या गाथ्याकरितां सरकारला चोवीस हजार रुपये खर्चावे लागल्याचें सांगतात. हा गाथा देहू, पंढरपूर, तळेगांव व कडूस अशा ठिकाणच्या चार हस्तलिखितांवर आधारला होता.

वरील तीनही गाथे मूळ हस्तलिखितांच्या साहाय्यानें तयार झाले. यानंतर

३. **दिग्दर्शन**—पुस्तक १, अं. ८, पृ. २१२.

१९१३ पर्यंत गाथा छापण्याचे निरनिराळे नवे बारा प्रयत्न झाले. परंतु हे सर्व गाथे या ना त्या एक किंवा अनेक छापील गाथ्यांवर आधारले होते. आपलें वैशिष्ट्य सिद्ध करण्याकरितां प्रत्येक प्रकाशकाकडून विषयवारी किंवा वह्यांवरून शुद्धीकरण वगैरे गोष्टी पुढें करण्यांत आल्या, तरी ते आयत्या पिठावर रेघा ओढण्यासारखे प्रयत्न होत असें म्हणावयास हरकत नाहीं. १९१३ सालीं मूळ हस्तलिखितांवरून गाथा छापण्याचे दोन नवे प्रयत्न झाले. प्रस्तुत "ओळीचा गाथा" व आर्यभूषणचा गाथा हे ते प्रयत्न होत. "ओळीचा गाथा" म्हणजे विशिष्ट ओळीनें किंवा सांप्रदायिक क्रमानें ज्यांत अभंग आहेत असा गाथा. १९३९ सालीं प्रसिद्ध झालेल्या या गाथ्याच्या द्वितीयावृत्तीमध्यें या संज्ञेचें स्पष्टीकरण केलें आहे. तें असें :—"तुकाराम महाराजांना ज्या ज्या वेळेस जशी जशी स्फूर्ति झाली त्या त्या वेळीं त्या त्या प्रसंगावर त्यांनीं अभंग केले त्या अस्सल वह्यांत हल्लींप्रमाणें विषयवर्गीकरण वगैरे नव्हतें, त्या हस्तलिखित प्रतींत जो क्रम आहे त्या क्रमाचें नांव ओळीचा गाथा व तोच सांप्रदायिकांत सर्वमान्य आहे." या गाथ्याचें मूळ हस्तलिखित तुकारामबोवांचे पंढरपूर येथें असलेल्या वारसांपैकीं ह. भ. प. सोपानकाका देहूकर यांचेकडे आहे. १९३६ च्या आवृत्तीचे वेळीं हा गाथा देहूकर महाराज व बेलापूरकर भागवतबुवा यांच्याकडील हस्तलिखितांवरून दुरुस्त केल्याचें त्यावर नमूद आहे. याची जुनी आवृत्ति "१९०७ सालापूर्वीं" आपल्या वडिलांनीं प्रसिद्ध केल्याचें प्रकाशकांनीं १९३६ सालच्या आवृत्तींत लिहिलें आहे, ती हीच १९१३ सालची प्रत असावी.

१९१३ सालीं प्रसिद्ध झालेला (आर्यभूषण) दुसरा गाथा असें वर ज्यास म्हटलें तो गंगूकाका शिरवळकर यांच्यापाशीं असलेल्या हस्तलिखित गाथ्यावरून तयार केल्याचें त्यावर नमूद आहे.

तुकारामबुवांचा गाथा छापण्याचा एक महत्त्वाचा नवा प्रयत्न १९१९–२० सालीं झाला. तो म्हणजे ठाण्याचे विनायक लक्ष्मण भावे यांनीं तुकारामबोवांचे एक टाळकरी संताजी जगनाडे यांच्या वह्यांवरून छापिलेला गाथा होय. हा सर्वांत जुना निर्दिष्टकाल (dated) गाथा आहे. शके १५६८ व शके १६१० असे कालनिर्देश त्यांत सांपडतात.

यानंतर १९२९ सालीं चित्रशाळा प्रेसनें माधव कृष्ण देशमुख व शंकर वामन दांडेकर यांच्याकडून शुद्ध करून छापलेला गाथा गंगुकाका यांच्या व माळ्याच्या वहीवरून तयार केल्याचें त्यांत नमूद आहे.

निरनिराळ्या आवृत्त्या सोडल्या तर आतांपर्यंत तुकारामाचे गाथे छापण्याचे निरनिराळ्या प्रकाशकांकडून एकंदर बावीस प्रयत्न झाले. त्यांपैकीं वर सांगितलेले (१) माधव चंद्रोबा, (२) गणपत कृष्णाजी, (३) पंडित, (४) ओळीचा, (५) आर्यभूषण, (६) भावे व (७) चित्रशाळा असे सात प्रयत्न मौलिक स्वरूपाचे म्हणजे मूळ हस्तलिखितांवर आधारलेले दिसतात. त्यांचा परस्परसंबंध पाठांवरून पुढीलप्रमाणें असावा, असें वाटतें.




वरीलपैकीं 'तळेगांव' सोडून इतर बहुतेक सर्व हस्तलिखितें सध्यां उपलब्ध असल्याचें कळतें. यांपैकीं जगनाड्यांची एक मूळ वही तर आम्हांस अनायासें पाहाण्यासही मिळाली.

याखेरीज पंढरपुरास भागवतबुवा बेलापूरकर, सध्या हरि व तुका विप्र यांकडे, आळंदीस हैबतबुवांकडे, तसेंच जयरामस्वामी वडगांवकर यांच्या चार वह्या, असे अनेक गाथे अद्याप उपलब्ध आहेत. शिवाय निरनिराळ्या हस्तलिखित बाडांत तुकारामांचे शेंकडों किरकोळ अभंग विखुरलेले आढळतात. धुळ्याच्या श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत अशीं बाडें सुमारें तीनशें आहेत. तंजावरच्या सरस्वतीमहालांत जवळजवळ चाळीस आहेत. राजवाड्यांच्या हस्तलिखित

संग्रहांत अशीं दहा बाडें असून २१३ नंबरच्या बाडांत तर एक सबंध गाथाच आहे.[४] हा संग्रह धुळ्याच्या राजवाडेसंशोधनमंडळांत असून तुकारामाचे अभंग ज्यांत आहेत, अशीं आणखीही तिकडे बाडें असल्याचें तिकडील संशोधक रा. भा. रं. कुळकर्णी कळवितात. औंधचे श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनीं माझ्या विनंतीवरून आपल्या संग्रहांतील मराठी हस्तलिखितांची यादी पाठविली त्यांत सुमारें पंचवीस हस्तलिखितें तुकारामांच्या अभंगांचीं असल्याचें निदर्शनास आलें. ब्रिटिश म्युझियमांतील मराठी हस्तलिखितांच्या कॅटलागावरून ३३ व ९२ ह्या बाडांत बहुतेक तुकारामांचेच अभंग आहेत असें दिसतें. पुण्याच्या भारत इतिहाससंशोधकमंडळांतील हस्तलिखितांची एकत्र यादी अद्याप तयार झालेली नाहीं; परंतु तेथील निरनिराळ्या दात्यांकडून आलेल्या त्यांच्या संग्रहाच्या याद्या पाहिल्या त्यांत तुकारामांचे बरेच अभंग असावेत असें आठवतें. फर्ग्युसन कॉलेज लायब्ररीमध्येंही तुकारामांच्या अभंगाचें एक जुनें बाड पाहिलें. हीं सगळीं बाडें तपासल्यास तुकारामांचे पुष्कळ अप्रसिद्ध अभंगहि उपलब्ध होण्याचा संभव आहे. निदान उपलब्ध अभंग शुद्ध करून त्यांची दुर्बोधता घालविण्यास या सर्व साहित्याचा पुष्कळच उपयोग होईल.

पंडितांनीं आपल्या प्रतीकरितां जीं चार निरनिराळीं हस्तलिखितें वापरलीं त्या सर्वांत अभंगसंख्या सारखीच होती, असें वाटत नाहीं. तरीपण अमुक अभंग अमक्या हस्तलिखितांत नाहीं किंवा अमुक हस्तलिखितांत अमुक अभंग जास्त आहेत, अशा अर्थाची टीप कुठेंही त्यांनीं दिलेली दिसत नाहीं. शिवाय अभंगांच्या अनुक्रमाला देखील वारकरी पंथांत महत्त्व आहे हें विसरतां येत नाहीं. ओळीच्या गाथ्याला सांप्रदायिक अनुक्रमामुळेंच महत्त्व आहे. म्हणून निरनिराळ्या अभंगांच्या अनुक्रमांकाचें कोष्टक जर गाथ्याला जोडलेलें असेल तर त्या हस्तलिखितांचा परस्पर संबंध कळण्यास फार मदत होईल.

अभंगांचे पाठ, व्याकरणविषयक रूपें, अनुक्रमांक वगैरे सर्व गोष्टी लक्षांत घेऊन तयार केलेली तुकारामांच्या अभंगांच्या गाथ्याची जर एक चिकित्सक प्रत तुकारामांच्या निर्याणाच्या चालू त्रिशतसांवत्सरिक उत्सवानिमित्त प्रसिद्ध झाली असती, तर या पुरस्काराच्या आरंभीं दिलेल्या सर विल्यम जोन्सच्या मताप्रमाणें तें तुकारामांचें उत्कृष्ट स्मारक ठरलें असतें, यांत शंका नाहीं. निदान या पवित्र

---

४. ब्राह्मण मासिक पत्रिका, वर्ष ५, अ. १२, ( फाल्गुन शके १८४९ ).

उत्सवाच्या मुहूर्तानें अशी एक संपादणी ( edition ) तयार करण्याचा संकल्प सोडला गेला व ह्या दिशेनें प्रत्यक्ष काम सुरू झालें तरी पुष्कळ आहे, असें मी समजतों.

वर सांगितल्याप्रमाणें नवीन गाथा जरी आज तयार होऊं शकला नाहीं, तरीपण जुन्या उत्कृष्ट गाथ्यांचें पुनर्मुद्रण होत आहे, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. इंग्रजी सरकारच्या आश्रयाखालीं प्रसिद्ध झालेल्या पंडितांच्या गाथ्याची नवी आवृत्ति सध्यांच्या प्रसंगाच्या निमित्तानें लोकांना स्वल्प मूल्यांत उपलब्ध करून देण्याचें आपल्या सरकारनें मनावर घेतलें आहे, याबद्दल पंतप्रधान बाळासाहेब खेर व हा संपादनाचा प्रपंच स्वखुषीनें ज्यांनीं पत्करला आहे त्या श्रीयुत पुरुषोत्तम मंगेश लाड यांना धन्यवाद द्यावे तेवढे थोडे होतील; परंतु या गाथ्याला अपेक्षेपेक्षां जास्त मागण्या असल्यामुळें तो खपून गेल्यांत जमा असल्याचें कळतें. अशा वेळीं येथील केमकर आणि मंडळी या संस्थेचे मालक रा. कुळकर्णी ओळीचा गाथा म्हणून प्रख्यात असलेला गाथा प्रसिद्ध करीत आहेत, ही आनंदाची गोष्ट आहे. पंडितांच्या गाथ्यामध्यें पंढरपूर प्रत म्हणून ज्या हस्तलिखिताचा उल्लेख आहे त्याचे व याचे पाठ एकच दिसतात. वारकरी लोकांमध्यें सांप्रदायिक गाथा म्हणून या गाथ्याला फारच महत्त्व आहे. हा मूळ हस्तलिखित गाथा सांप्रत पंढरपुरांत सोपानकाका देहूकर यांच्याकडे आहे, हें वर लिहिलेंच आहे.

तुकारामांच्या मुलांना शिवाजीमहाराजांनीं चार गांवें इनाम दिलीं होतीं. असें कळतें कीं, पुढें त्यांच्या वारसांमध्यें या वतनासंबंधीं कांहीं वाद उत्पन्न झाला व हें प्रकरण न्यायमंदिरांत गेलें. शिवाजीमहाराजांनीं दिलेला नजराणा ज्यानें परत केला त्या निःस्पृह पुरुषाच्या वंशजांनीं वतनाकरितां आपसांत भांडावें, हें लाजिरवाणें आहे, अशा प्रकारचे उद्गार त्यावेळीं न्यायाधिशानें किंवा नाना फडणविसांनीं काढले. ते ऐकून त्यांपैकीं एक वारस वतनाचा त्याग करून विरक्त होऊन पंढरपुरास येऊन राहिला. तो या सोपानकाकांचा पूर्वज, व त्यानें बरोबर आणलेला जो गाथा, तो हा **ओळीचा गाथा.** पंढरपुराहून तें हस्तलिखित न हलविण्याचा त्याच्या मालकाचा निर्धार असल्याचें कळतें. त्यामुळें हें हस्तलिखित मला इच्छा असूनही पाहावयास मिळालें नाहीं.

तुकारामांचें व्यक्तिमत्व व कार्य यासंबंधी पुष्कळच लिहितां येण्यासारखें आहे. परंतु महाराष्ट्रकविचरित्रकार श्रीयुत आजगांवकर यांनीं लिहिलेलें

# तुकाराम महाराजांची वंशावळ

- विश्वंभरबावा (पत्नी अमाबाई)
  - हरि
    - विठोबा
      - पदाजी
        - शंकर
          - कान्हया
            - बोल्होबा (पत्नी कनकाई)
              - सावजी
              - **तुकाराममहाराज** (पत्नी रखमाबाई व जिजाबाई ऊर्फ आवळी)
                - महादेव
                  - आबाजी
                    - महादेव
                      - § वासुदेव
                        - दासबुवा
                          - विठ्ठल
                        - हरि
                        - मनोहर
                        - नारायण
                          - बाबूराव
                            - बाळोबा
                        - गोपाळ
                          - ‡ रामचंद्र ऊर्फ भाऊसाहेब
                            - ¶ नामदेवबुवा
                              - **सोपानकाका.** (पंढरपूर)
                    - मुकुंद
                - विठोबा
                  - जयराम.
                - नारायणबावा (यांनीं उधोबास जवळ केलें होतें.)
                  - रामजी
                  - उधोबा
                    - खंडोबा
                    - विठोबा
                    - नारायण
                      - विष्णु
                        - **नारायण** (देहू)
                        - **बाळकृष्ण.** (देहू)
                  - गणेश
                    - त्र्यंबक
                      - राघोबा.
                  - गोविंद
                    - गोपाळबावा
                      - कान्होजी
                        - एकनाथ
                          - रामकृष्ण
                            - जयराम *
                              - **भागवतबुवा.** (पंढरपूर)
              - कान्होबा
                - गंगाधर
                  - खंडोबा
                    - गंगाधर
  - मुकुंद.

( वंशावळ पहा )

§ वासुदेवबुवा—हल्लीं श्रीक्षेत्र पंढरपूर येथें यांचा भाद्रपद शु० १३ ते आश्विन शु० ८ पुण्यतिथीपर्यंत एक महिनाभर श्री तुकारम महाराज यांच्या गाथ्यांतील अभंगांचें पारायण प्रतिवर्षी उत्सवांत होत असतें. उत्सवास दर वर्षी हजारों भक्त जमतात. सुमारें १६० वर्षांपूर्वीपासून हा उत्सव चालू आहे. भाऊबंदकीचा वाद उत्पन्न होऊन त्यांत देहू येथील सर्व वतनवृत्तीचा त्याग करून यांचे वडील महादेवबुवा श्रीक्षेत्र पंढरपूर येथें आले व तेथेंच त्यांनीं आपलें वास्तव्य केलें. त्यांनींच श्री तुकाराम महाराजांच्या अभंगांची मूळ वही आपल्या बरोबर आणली.

वासुदेवबुवांच्या वेळीं मल्लापाबुवा वास्कर यांनीं आपला फड निराळा केला.

‡ रामचंद्रबुवा ऊर्फ भाऊसाहेब--समाधिकाल शके १८३५ श्रावण व. २ सोमवार. श्रावण शु० १३ पासून श्रावण व० २ पर्यंत यांचा उत्सव होत असतो. या उत्सवांत श्री तुकाराम महाराजांच्या गाथ्याचें पारायण होत असतें.

असेंच पारायण जयरामबुवांचे पुतणे विठ्ठलबुवा यांच्या उत्सवांत श्रावण शु० १३ पर्यंत ज्ञानोबारायाचे मंदिरांत होत असतें.

¶ नामदेवबुवा—देहावसान शके १८३८ फाल्गुन शु० १. यांच्या वेळीं चालू फडांतून
* जयरामबुवांचा फड वेगळा झाला. शके १८३८ आश्विन शु० १० (दसरा.)

---

# तुकाराम महाराजांचें संक्षिप्त चरित्र

लेखक : **म. भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर**

आपल्या महाराष्ट्रांत गेल्या सातशें वर्षांत पुष्कळ ल्हानमोठे साधु होऊन गेले, परंतु त्यांपैकीं कोणासही तुकारामबुवांइतकी प्रसिद्धि मिळाली नाहीं. साधु म्हणजे तुकाराम असें एक समीकरणच होऊन बसलें आहे. सामान्य संसारी मनुष्याच्या कोटींतून साधुकोटीस जाऊन पोंचेपर्यंत तुकोबांनीं या भवसागरांत जितक्या गटंगळ्या खाल्ल्या तितक्या इतर संतांस खाव्या लागल्या नाहींत आणि म्हणूनच तुकोबांचें चरित्र सर्व मुमुक्षु जनांस आदर्शवत् होऊन राहिलें आहे. दुसरे थोर साधु पुरुष ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ आणि रामदास यांचीं चरित्रें पाहिलीं असतां असें दिसून येतें कीं ते चारी पुरुष पूर्वजन्मींचे योगभ्रष्ट पुरुष असल्यामुळें अगदीं अल्पवयांतच त्यांचें चित्त परमार्थाकडे लागलें व भरतारुण्यांतच त्यांच्या साधुत्वाचा प्रकाश महाराष्ट्रभर फांकला. यामुळें त्या पुरुषांची गणना अलौकिक पुरुषांच्या कोटींत करावी लागते. परंतु तुकारामबुवांचा प्रकार मात्र अगदीं निराळा आहे. अगदीं आरंभीं तरी निदान त्यांची प्रवृत्ति परमार्थाकडे होती असें वाटत नाहीं, तत्कालीन इतर लोकांप्रमाणेंच आरंभीं ते पूर्ण संसारी होते. पण पुढें दुष्काळ, दारिद्र्य, प्रियजनांचे मृत्यु वगैरे उपाधींमुळे ते अगदीं रंजीस आले आणि ‘ पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर ’ असें त्यांस वाटून, सर्व सुखाचें आदिस्थान जो परमात्मा त्याची आराधना करून, चिरकालीन मनःशांति प्राप्त करून घेण्याचें त्यांनीं ठरविलें, आणि परमार्थसोपानाची एकेक पायरी चढतां चढतां आपल्या प्रखर वैराग्यशीलतेच्या जोरावर जीवन्मुक्तीचें उच्च शिखर गांठलें. म्हणून तुकोबांच्या चरित्राचें सामान्य जनांच्या बुद्धीस जसें सहज आकलन होतें तसें ज्ञानदेव—एकनाथादिकांच्या चरित्रांचें होत नाहीं. आपण जर प्रयत्न करूं तर तुकारामबुवा होऊं अशी महत्त्वाकांक्षा जर एखाद्यानें धारण केली तर ती पूर्ण होण्याचा कांहीं तरी संभव आहे, परंतु आपण याच जन्मीं ज्ञानदेव होऊं अशी महत्त्वाकांक्षा मात्र कोणास धारण करितां येणार नाहीं.

तुकारामबुवांचा एक तरी अभंग, निदान त्यांच्या एखाद्या अभंगाचा एकही चरण ज्याला पाठ नाहीं असा एकही साक्षर मनुष्य महाराष्ट्रांत सांपडणार नाहीं, इतकी त्यांची व त्यांच्या कवितेची छाप महाराष्ट्रावर कायमची बसली आहे. ‘ हेंचि दान दे गा देवा ’ हा त्यांचा सुंदर अभंग म्हटल्याशिवाय कोणत्याही हरिदासाचें कीर्तन पुरें होणार नाहीं आणि ‘ सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ’ हा अभंग म्हटला गेल्याशिवाय भजन पुरें होणार नाहीं. बहुतेक हरिदास कीर्तनारंभीं तुकोबांचाच एखादा अभंग निरूपणासाठीं घेत असतात. तात्पर्य, तुकारामबुवा हेच महाराष्ट्राचे ‘ राष्ट्रकवि ’ होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून, त्यांच्याच एका वंशजाच्या संग्रहीं असलेला त्यांचा हा जुना गाथा मुद्रित करितांना त्या गाथ्याच्या आरंभीं त्यांचें संक्षिप्त

चरित्र द्यावें असें, संग्राहक आणि प्रकाशक यांनीं ठरवून तें लिहिण्याची कामगिरी त्यांनीं माझ्याकडे सोंपविली व ती यथामति यथाशक्ति पार पाडण्याचा प्रयत्न मी येथें करीत आहें.

## तुकोबांचें वास्तव्यस्थान–देहू

**"धन्य देहू गांव पुण्यभूमी ठाव ।**
**तेथें नांदे देव पांडुरंग ॥"**

पुण्यानजीक इंद्रायणी नदीच्या कांठीं देहू गांव असून तुकोबांचे वंशज हल्लीं तेथें राहतात. देहू येथें सांप्रत जें विठ्ठलमंदिर आहे तें पुरातन असून त्याचा जीर्णोद्धार तुकोबांनीं केला. मंदिर उत्तराभिमुख असून त्यांतील विठ्ठलरखुमाई शेजारीं शेजारीं उभे आहेत. समोर गरुडपार आहे. गरुडहनुमंत देवासमोर हात जोडून उभे आहेत. पूर्वेकडील दरवाजाजवळ दक्षिणाभिमुख गजाननमूर्ति असून बाहेर भैरवाचें लहानसें मंदिर आहे. विठ्ठलमंदिराच्या पश्चिमेस हरेश्वर-मंदिर आहे व शेजारींच तुकोबांच्या वंशजांचा राहता वाडा आहे. त्याच्यापलीकडेच तुकोबा ज्या घरांत जन्म पावले व राहिले तें घर असून मागाहून त्यांत विठ्ठलमूर्तीची स्थापना केली आहे. वाड्याच्या व या घराच्या पश्चिमेस इंद्रायणीच्या बाजूला एक बखळ आहे. तेथें मंबाजीचें घर व बाग होती असें म्हणतात. विठ्ठलमंदिराला प्रदक्षिणा घालतांना ही बखळ वाटेंत लागते. पश्चिमेस बल्लाळाचें वन असून त्यांत सिद्धेश्वराचें मंदिर आहे व जरा पूर्वेस लक्ष्मीनारायणाचें मंदिर आहे. हीं मंदिरें तुकोबांच्यापूर्वींची आहेत. इंद्रायणी नदी देहू गांवाला लागून उत्तराभिमुख वाहत आहे. मंदिराच्या बाहेर व नदीकांठाजवळ पुंडलिकाचें देऊळ आहे. नदीकांठानें उत्तरेस जातांना मैल दीडमैल लांबीचा प्रचंड डोह आहे. या डोहाच्या कांठीं गोपाळपुर असून तेथें जुनाट पिंपरीचा वृक्ष आहे. या वृक्षाजवळ तुकोबांचें निर्याण झालें. याच्याहीखालीं अर्ध्या मैलावर करंजाईचें स्थान आहे. हा डोहाचा मध्य होय. येथें मुरलीधराचें मंदिर आहे. महाराज डोहावर एकांतांत बसत ते याच ठिकाणीं. याच डोहांत बुवांच्या वह्या बुडविण्यांत आल्या होत्या व त्या वेळीं ज्या शिळेवर बुवांनीं तेरा दिवस निद्रा केली ती शिळाही याच ठिकाणीं होती. पुढें ती तेथून विठ्ठलमंदिरांत आणली व मंदिरालगत तुकोबांची पहिली स्त्री रखमाई हिचें वृंदावन आहे त्याला टकून उभी करून ठेविली. इंद्रायणीच्या कांठावर उभें राहून पश्चिमेकडे पाहिलें म्हणजे डाव्या बाजूस ६ मैलांवर गोराड्याचा ऊर्फ घोरवडीचा डोंगर दिसतो व उजव्या बाजूस डोहाच्या पलीकडे देहूहून ८ मैलांवर भामनाथ, भामगिरी ऊर्फ भामचंद्र हा डोंगर दिसतो व देहूच्या थेट पश्चिमेस २ मैलांवर भंडाऱ्याचा डोंगर दिसतो. देहू गांव फारसा मोठा नाहीं; तरी फार जुनाट आहे. भोंवतालचा प्रदेश डोंगराळ आहे. गांवाभोंवतीं जुन्या तटाच्या पडक्या भिंती असून पूर्व व उत्तर या दोन दिशांस मोठमोठे वेशींचे दरवाजे आहेत.

## तुकोबांचे पूर्वज

असो। या देहू गांवांत तुकारामबुवांचे पूर्वज रहात असत. या पूर्वजांपैकीं विश्वंभर या नांवाच्या पुरुषापासून पुढील सर्व पिढ्यांचा वृत्तांत संतचरित्रकार महीपति यांनीं आपल्या

' भक्तलीलामृत ' ग्रंथांत दिला आहे. विश्वंभर हा मोटा हरिभक्त होता. तो वाण्याचा धंदा करीत असे. आईच्या आज्ञेवरून तो एकदां पंढरपुरास गेला होता. तेथें तो इतका रमला कीं त्याला पंढरी आणि पांडुरंग यांचा ध्यास लागून राहिला. त्यानें पंढरीच्या सोळा वाऱ्या केल्यावर पांडुरंगानें त्याला स्वप्नांत दृष्टांत दिला कीं, " यापुढें पंढरीस येण्याचा त्रास तुला पडूं नये म्हणून तुझ्या या देहू गांवांतच मूर्तिरूपानें वास्तव्य करण्याचें मी टरविलें आहे. " देहू येथील ' आंब्रियाचे वनांत ' पांडुरंगाचें आगमन झाल्याचेंही विश्वंभरानें स्वप्नांत पाहिलें. सकाळीं उठल्यावर हा वृत्तांत त्यानें गांवांतील लोकांस सांगितला, त्यावरून, लोकांनीं त्या ठिकाणची थोडीशी जमीन उकरतांच पांडुरंग व रुक्मिणी यांच्या सुंदर मूर्ति त्या ठिकाणीं सांपडल्या. मूर्ति घेऊन सर्व लोक भजन करीत गांवांत आले व इंद्रायणीच्या तीरीं त्यांनीं मूर्तीची स्थापना केली. पुढें विश्वंभरानें आपलें शेष आयुष्य याच मूर्तीच्या सेवेंत घालविलें.

विश्वंभराला हरि आणि मुकुंद असे दोन मुलगे होते. त्यांनीं आईच्या उपदेशाकडे लक्ष न देतां त्या वेळच्या एका राजाच्या सैन्यांत नोकरी धरली, व कांहीं दिवसांनीं, परचक्राचा प्रतिकार करीत असतां, पहिल्याच चकमकींत ते टार झाले. पुत्रशोकानें व वार्धक्यामुळें त्यांची आई अमाई ही मृत्यु पावली. त्या वेळीं तिची एक सून बाळंतपणासाटीं माहेरीं गेली होती ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्याचें नांव विटोबा. तो अंमळ मोटा झाल्यावर त्याची आई त्याला घेऊन देहूस आली व तेथें त्यांनीं आपलें सर्व आयुष्य पांडुरंगाच्या सेवेंत घालविलें. तीं पंढरीची वारी नियमानें करीत असत. पुढें विटोबाचा पुत्र पदाजी, पदाजीचा पुत्र शंकर, शंकराचा पुत्र कान्होबा व कान्होबाचा पुत्र बोल्होबा यांनींही ती परंपरा अविच्छिन्नपणें चालविली.

हा शेवटचा पुरुष बोल्होबाच संतशिरोमणि तुकाराममहाराजांचा पिता होय. तुकोबांच्या आईचें नांव कनकाई. ही पुण्याजवळील लोहगांवच्या मोझे ह्या आडनांवाच्या घराण्यांतील मुलगी. तुकोबांचें आडनांव आंबिले. कुळीचें नांव मोरे. तुकोबांचे वडील बोल्होबा यांस तीन पुत्र झाले. मोटा मुलगा सावजी. हा लहानपणापासूनच विरक्त होता. संसाराची यातायात यानें केली नाहीं. मधला भाऊ **तुकाराम**, यानेंच आपल्या लोकोत्तर हरिभक्तीनें आपल्या कुलाचा उद्धार करून स्वतःचें नांव अजरामर केलें. धाकटा भाऊ कान्होबा हा पुढें वेगळा होऊन संसारधंदा करीत असे व तुकोबांच्या कीर्तनांत ध्रुपदही धरीत असे.

तुकोबांचा जन्मकाल उपलब्ध नाहीं व त्या बाबतींत फार मतभेद आहे. तरी पण, एकंदर पुराव्याचा विचार करितां, तुकारामबुवा शके १५१० आणि १५२० च्या दरम्यान कोणत्या तरी वर्षी जन्मले असें धरून चालण्यास हरकत नाहीं. तुकोबांच्या जन्मकालीं पैटण येथें एकनाथमहाराज विद्यमान होते. समर्थ रामदासस्वामी व शिवाजीमहाराज हे अद्याप जन्म पावले नव्हते. आपला महाराष्ट्र देश मुसलमानी राजसत्तेनें व्यापला होता. शिवाजी महाराजांचे वडील शहाजी राजे हे विजापुरकरांचे आश्रित होते व त्यांना सुपें व पुणें हे परगणे जहागीर होते. धार्मिक बाबतींत तत्कालीन मुसलमान राज्यकर्त्यांकडून हिंदु लोकांचा जरी फारसा छळ होत नव्हता तरी एकंदरींत हिंदु लोकांची स्थिति शोचनीयच होती. पुष्कळ हिंदु लोक यवनांच्या नोकऱ्या करीत व त्यांच्या पिरास भजत. शास्त्री, पंडित, भट-

भिक्षुक यांची हिंदु समाजावर बरीच छाप होती व सामाजिक आणि धार्मिक अन्यायाबद्दल बहिष्कारादि शिक्षा दिल्या जात असत

## तुकोबांचा संसार

देहू येथील ' महाजनपणाचा ' मान तुकारामबुवांच्या घराण्याकडे प्राचीन काला-पासून होता व कांहीं इनाम जमिनीही त्या घराण्याकडे चालत होत्या. शिवाय थोडीशी शेती व व्यापारधंदाही होता. एकंदरींत तुकोबांच्या जन्मकाळीं हें घराणें खाऊनपिऊन चांगलें सुखी होतें.

सावजी, तुकाराम व कान्होबा हे बोल्होबांचे तीन्ही पुत्र हळूहळू मोठे झाले, तेव्हां त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें त्यांना लिहिणें, वाचणें व हिशोब ठेवणें वगैरेचें शिक्षण देण्यांत आलें. बोल्होबा वृद्ध झाले तेव्हां एके दिवशीं त्यांनीं सावजीस जवळ बोलाविलें आणि सांगितलें कीं, "वार्धक्यामुळें माझ्या हातून आतां फारसा कामधंदा होणार नाहीं. तरी वडील मुलगा या नात्यानें देण्यावेण्याचा व्यवहार यापुढें तू पहा." सावजी म्हणाला, "बाबा, प्रपंचांत मन घालावें असें मला वाटत नाहीं. मी यापूर्वीच तीर्थाटणास निघून गेलों असतों, परंतु तुम्हांस व आईस वृद्धपणीं जर मी सोडून गेलों तर लोक नांवें ठेवतील म्हणूनच अद्याप राहिलों आहें." सावजीची ही संसाराविषयींची उदासीनता पाहून "याच्या नशिबीं काय आहे कोण जाणे!" असें म्हणून बोल्होबांनीं तुकारामास हांक मारली व त्यास संसार सांभाळण्यास सांगितलें. वडिलांची आज्ञा तुकोबांनीं शिरसामान्य केली व तेव्हांपासून ते आपला व्यापार-उदीम मोठ्या दक्षतेनें चालवूं लागले. त्यांची कार्यक्षमता आणि व्यवहारदक्षता पाहून "बोल्हो-जीचा मुलगा तुक्या पहा कसा हुषार आहे तो. बाप हयात असतांनाच संसाराचा सगळा भार आपल्या शिरावर घेऊन बापाचें ओझें पहा त्यानें कसें हलकें केलें आहे!" असें गांवांतले लोक त्यांच्याविषयीं बोलूं लागले.

तुकोबांच्या लहाणपणींच त्यांचें पहिलें लग्न झालें होतें, परंतु त्या मुलीस दम्याचा विकार असल्यामुळें, पुणें येथील अप्पाजी गुळवे नामक गृहस्थांच्या मुलीशीं त्यांचें दुसरें लग्न आई-बापांनीं करून दिलें. पुढें सृष्टिनियमाप्रमाणें तुकोबांचे आईबाप वार्धक्यानें मरण पावले. त्यामुळें त्यांना मोठें दुःख झालें. कांहीं दिवसांनीं वडील बंधु सावजी याची पत्नीही मरण पावली. सावजी अगोदरच उदासीन होता, त्यांत स्त्रीचा पाश होता तोही तुटला, त्यामुळें त्याला उपरति होऊन तो तीर्थाटणास निघून गेला. आईबापांचा मृत्यु, भावजईचा मृत्यु व सावजीचा गृहत्याग इत्यादि गोष्टी लागोपाठ घडल्यामुळें तुकोबांच्या संसारसुखाचा विरस झाला. आईबाप वृद्धच होते, तेव्हां ते केव्हां ना केव्हां तरी जाणारच होते, परंतु वडील बंधु सावजी हा भरतारुण्यांत आपणास सोडून देशांतरास गेला या विचारानें तुकोबांचें मन फार अस्वस्थ झालें. वडिलांचे वेळीं बरेंच द्रव्य संग्रहीं होतें तेंही हळुहळू संपुष्टांत येत चाललें. घरीं कुटुं-बाचा खर्च मोठा. अतिशय धडपड करूनही खर्च भागविण्यापुरता पैसा हातीं येईना. तुकोबांनीं नाना प्रकारचे व्यवसाय करून पाहिले, परंतु कशांतही यश येईना. त्यामुळें उदासीन

होऊन ते हरिभजनाकडे वळले. शेवटीं तर एके दिवशीं त्यांचें दिवाळें निघालें व त्यांचे सावकार त्यांच्या घरीं धरणें धरून बसले ! बुवांच्या दुःखास पारावार राहिला नाहीं. ते ओक्साबोक्शीं रडूं लागले. शेवटीं त्यांच्या नातेवाईकांनीं त्यांच्या देण्याचा हवाला घेऊन त्यांना सावकारांच्या कचाटींतून सोडविलें. " तूं नेहमीं पांडुरंगांचें नांव घेतोस त्याचा हा परिणाम," असें म्हणून गांवांतले कांहीं लोक तुकोबांचा उपहास करूं लागले. " जो विष्णुभक्ति करील त्याला भिकेचे डोहाळे लागले म्हणून समजावें. आतां यापुढें तरी सावध हो आणि हें हरिभजन सोडून संसाराकडे लक्ष दे. " असा पोक्त उपदेश तुकोबांस करून सावकार आपापल्या घरीं गेले. इकडे बुवांच्या घरीं त्यांच्या बायकाही कुरकुर करूं लागल्या. त्या म्हणूं लागल्या, " आमच्या घरधन्यास जेव्हांपासून विठोबाचें वेड लागलें तेव्हांपासून आम्ही माणसांतून उठलों. पोटभर अन्नदेखील मिळेना ! " घरांत बायकांची ही अशी बडबड आणि गांवांतील लोकांकडून आणि आप्तेष्टांकडून होणारा तो तसा उपहास, यांमुळें बुवांचें वैराग्य अधिकच वाढलें. परंतु चरितार्थासाठीं कांहीं तरी उद्योग करणें जरूरच होतें म्हणून ते पुनः थोडासा व्यापारउदीम करूं लागले. पुढें, घरीं चार गुरें होतीं त्यांतलीं तीन रोगानें एकाएकीं मेलीं ! भगवंत जणूं काय तुकोबांची कसोटीच पहात होता; आणि त्या कसोटीस तुकोबाही अगदीं पूर्णपणें उतरले. केव्हांही संकटें आलीं तरी त्यांनीं पांडुरंगाची उपासना सोडली नाहीं.

पुढें शके १५५१–५२ सालीं देशावर भयंकर दुष्काळ पडला. देशांतील हजारों माणसें अन्नाविणें तडफडून मेलीं. अबदूल हमीद लाहोरी नामक एका मुसलमान इतिहासकारानें या दुष्काळाचें वर्णन केलें आहे तें वाचून अंगावर कांटा उभा राहतो. अबदूल हमीद लिहितो, ' एकाच भाकरीच्या तुकड्यासाठीं जनावरें व मुलेंही लोक विकूं लागले ! मृतांचीं हाडें कुटून पिठांत लोक घालूं लागले ! दुष्काळ शेवटीं इतक्या शिगेला पोंचला कीं माणसें माणसांना खाऊं लागलीं ! अपत्यप्रेम विसरून लोक आपल्या मुलांना खाऊं लागले ! ! जिकडे तिकडे प्रेतांच्या राशी पडल्या. ' श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं देखील या दुष्काळाच्या भयानक स्वरूपाचें वर्णन केलें आहे. तुकोबांच्या घरीं अगोदरच अठरा विश्वे दारिद्र्य, मग या दुष्काळांत त्यांची काय स्थिति झाली असेल याची कल्पना करणें कठीण नाहीं. धान्य मिळेना म्हणून चारदोन दिवसांनीं कसला तरी पाला आणून तो शिजवून खावा असा प्रसंग बुवांच्या कुटुंबावर आला. शेवटीं या दुष्काळांत बुवांची पहिली बायको रुक्माई ही अन्न अन्न करून मेली ! आपल्या बायकोस घांसभर अन्न घालून तिचा जीव आपणास वाचवितां आला नाहीं याबद्दल बुवांस मोठें दुःख झालें. अशा प्रसंगीं त्यांस मदत तर कोणी केली नाहींच, पण उलट लोक त्यांच्या हरिभक्तीचा आणि परोपकारबुद्धीचा उपहास करूं लागले. परंतु अनंत दुःखें सहन करून बुवा आतां इतके शांत आणि सहनशील झाले होते कीं लोकांकडून होणाऱ्या अवहेलनेबद्दल त्यांस बिलकुल वाईट वाटलें नाहीं. उलट त्यांचें वैराग्य तीव्रतर होत चाललें. अन्न–आच्छादन प्रारब्धाधीन असून, प्रारब्ध जर अनुकूल नसेल तर मनुष्याचे सर्व प्रयत्न निष्फलच व्हावयाचे; म्हणून हरिनामस्मरणानें संचित, क्रियमाण आणि प्रारब्ध यांचा नाश करणें हा एकच उपाय शेवटीं शिल्लक राहतो, असें ठरवून ' निर्वाणीचा

सखा जो पांडुरंग ' त्याच्याच भजनपूजनांत उर्वरित आयुष्य व्यतीत करावयाचें असा त्यांनीं निश्चय केला आणि तो शेवटपर्यंत मोठ्या कसोशीनें पाळला. तुकारामबुवांच्या या निश्चयाप्रमाणेंच, त्यांच्या दैवानेंही त्यांची शेवटपर्यंत पाठ पुरविण्याचा निश्चय केला होता असें दिसतें. कारण त्यांची पहिली पत्नी वारल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांचा थोरला मुलगा संतोबा हा मरण पावला. ह्या मुलावर बुवांचें फार प्रेम होतें. अशा रीतीनें अनेक दुःखें भोगण्यांतच बुवांच्या आयुष्याचा पूर्वार्ध संपला.

## परमार्थसाधन

तुकारामबुवांस वैराग्य उत्पन्न होण्यास ज्या गोष्टी कारणीभूत झाल्या त्यांचा निर्देश पूर्वी येऊन गेलाच आहे. प्रारब्ध, संचित आणि क्रियमाण यांपासून सुखदुःखाचा उगम होतो, तेव्हां, हरिनामाग्नीनें त्यांचें भस्म करून टाकलें म्हणजे सहजच आपण सुखदुःखातीत होऊं, असा विचार करून बुवांनीं त्या मार्गाचें अवलंबन केलें. ज्या गोष्टींमुळें दुसऱ्या एखाद्या मनुष्यास वेड लागलें असतें किंवा त्यानें कदाचित् आत्महत्याही केली असती त्याच गोष्टी बुवांच्या साधुत्वास साधनीभूत झाल्या. संसाराचा पूर्ण वीट आल्यावर, योगक्षेमासाठीं मुद्दाम प्रयत्न करण्याच्या भानगडींत अतःपर पडावयाचें नाहीं, यदृच्छेनें जें काय व्हावयाचें असेल तें होईल, असा निर्धार करून तुकोबा आतां सर्वस्वी परमार्थमार्गास लागले. कोणी कीर्तनकार गांवीं आले म्हणजे त्यांच्यामागें उभें राहून ध्रुपद धरावयाचें, जुन्या साधुसंतांची कविता पाठ करावयाची, व इतर काल नामस्मरणांत घालवावयाचा असा क्रम त्यांनीं सुरू केला. गीता, भागवत, ज्ञानेश्वरी ह्या ग्रंथांतील ज्ञान त्यांनीं संपादन केलें. या व्यासंगामुळें त्यांचा बहुश्रुतपणा वाढत चालला. पुढें देहूपासून कांहीं अंतरावर भांबनाथ या नांवाचा डोंगर आहे, त्या डोंगरावर जाऊन ते ध्यानस्थ बसूं लागले. तुकोबा कोठें जाऊन बसतात हें आरंभीं त्यांच्या घरांतील माणसांस ठाऊक नव्हतें. एकदां तुकोबा जे भांबनाथावर गेले ते सात दिवस परत आले नाहींत, म्हणून त्यांचे बंधु कान्होबा हे त्यांच्या शोधास निघाले व मोठ्या प्रयासानें त्यांनीं त्यांचा पत्ता लावला. मग ते दोन्ही बंधु इंद्रायणीवर आले व बुवा स्नान करून तेथेंच बसले. सात दिवसांच्या उपोषणाचें पारणें फेडावयाचें होतें, तें फेडण्यापूर्वीं, वडिलांनीं लोकांस कांहीं कर्ज दिलें होतें त्यासंबंधाचीं जीं कर्जखतें घरांत होतीं तीं घेऊन येण्यास बुवांनीं कान्होबांस सांगितलें. ते म्हणाले, " वडिलांचे वेळीं जें आपलें येणें लोकांकडे होतें त्याचीं कर्जखतें आपल्यापाशीं आहेत, त्यामुळें, हें कर्ज वसूल होईल कीं नाहीं अशी मनाला विनाकारण विवंचना लागून राहते व त्यामुळें मनाचें स्थैर्य बिघडतें, म्हणून ते सगळे कागदपत्र आज इंद्रायणींत बुडविण्याचें मी ठरविलें आहे." त्यावर कान्होबा म्हणाले, " तुम्ही विरक्त झालां आहांत, तुमची गोष्ट निराळी; पण मी संसारी मनुष्य. आपण जर घरांतले कर्जरोखे इंद्रायणींत बुडविले तर पुढें माझ्या मुलांबाळांनीं काय करावें ? " कान्होबांचें मनोगत जाणून तुकोबांनीं कर्जखतांचे दोन सारखे भाग केले व त्यांतला एक भाग कान्होबास देऊन आपल्या वांट्याचे कागद इंद्रायणींत बुडविले. अशा रीतीनें आपल्या मनांतली रुखरुख त्यांनीं काढून टाकली !

तुकोबांची हरिभक्ति आणि वैराग्य हीं जशीं प्रखर होतीं तशी त्यांची परोपकारशीलताही त्यांच्या साधुत्वास शोभेल अशीच होती. कोणी साधुसंत, हरिदास गांवांत आले म्हणजे त्यांच्या पायांचें तीर्थ घ्यावें, कीर्तनांत त्यांच्यामागें उभें राहून ध्रुपद धरावें, केव्हां दिवटी भरून उभें रहावें, शक्य तेव्हां संतांस आपल्या घरीं नेऊन भोजन घालावें, अशी नाना प्रकारांनीं साधुसंतांची त्यांनीं सेवा केली. रस्त्यांत कोणा पांथस्थाची गांठ पडली तर त्याला विसांवा देण्यासाठीं त्याचें ओझें बुवांनीं आपल्या पाठीवर वाहावें. गांवांत आलेले कोणी वाटसरू पावसांत सांपडले तर त्यांना चावडीवर नेऊन पोंचवावें किंवा आपल्या घरीं न्यावें. कोणा यात्रेकरूचे प्रवासामुळें पाय सुजले तर त्यांना तेल लावून ऊन पाण्यानें ते शेकावे. कोणी निर्दय लोकांनीं निकामी झालेले गाईबैल सोडून दिले तर बुवांनीं त्यांना चारापाणी घालून कुरवाळावें. सर्व भूतें एकाच भगवंताचीं स्वरूपें आहेत ही त्यांची भावना इतकी दृढ झाली होती कीं "कोण्याही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें" हें साधुत्वाचें मुख्य साधनच त्यांनीं ठरविलें होतें. "अवघीं भूतें साम्या आलीं । पाहिलीं म्यां कैं होती ?" अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. उन्हाळ्यांत कीर्तनाचे वेळीं उष्मा होऊं लागला तर हातांत पंखा घेऊन ते लोकांस वारा घालीत.

## तुकोबांचें कीर्तन

तुकारामबुवांचें कीर्तन म्हणजे प्रत्यक्ष अमृतवृष्टि होती. सगळी लाजलज्जा गुंडाळून ठेवून आणि निःसंग होऊन ते थै थै नाचत भजन करूं लागले म्हणजे श्रोत्यांची वृत्ति तदाकार होऊन, आपण स्वर्गसुखाचा अनुभव घेत आहोंत असें त्यांना वाटे. आपल्या कीर्तनशैलीच्या परिणामकारकतेविषयीं त्यांना किती आत्मविश्वास वाटत असे हें त्यांच्या पुढील अभंगावरून लक्ष्यांत येईल:—

**" घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं । मुक्ता आत्मस्थिति सांडवीन ॥**
**ब्रह्मीभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥**
**तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडू स्वर्गवास करीन भोग ॥**
**सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥**
**भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निज ठेवा ॥**
**धन्य म्हणवीन येहलोकीं लोकां । भाग्य आम्हीं तुका देखियेला ॥ "**

"आम्ही तुकारामबुवांस प्रत्यक्ष पाहिलें, केवढें आमचें भाग्य !" हे शेवटच्या चरणांतले बुवांचे उद्गार त्यांच्या आत्मविश्वासाचे द्योतक आहेत, घमेंडीचे नव्हत. "ब्रह्मज्ञान्यालाही लाळ घोंटावयास लावणारें" हें तुकोबांचें कीर्तन श्रवण करण्याची संधि ज्यांना मिळाली असेल ते खरोखरच धन्य होत. खुद्द छत्रपति शिवाजीमहाराजांसारखा महान् पुरुष बुवांच्या कीर्तनासाठीं कित्येक कोसांची मजल मारून येत असे तो उगाच नव्हे. आपल्या कीर्तनाचें वर्णन आणखी एका अभंगांत बुवांनीं केलें आहे तें असें:—

**" अहो कोटी संतर्पण । पुरे एकचि कीर्तन ॥
नगरद्वारीं लाविला टिळा । दिलें अवदान सकळां ॥
श्रवणद्वारें घेती ग्रास । सदा सोंवळे हरिचे दास ॥
न लगे खरकटें हात धुणें । अभेद हरीचें कीर्तन ॥
आपण जेवुनि जेवविं लोकां । संतर्पण करितो तुका ॥ "**

पांडुरंगाच्या टायीं बुवांची वृत्ति इतकी तदाकार झाली होती कीं पांडुरंग नेहमीं आपल्या सन्निध असतो आणि आपले सगळे व्यवहार तोच चालवीत असतो अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. बुवा हे धंदेवाईक हरिदास नव्हते. त्यांच्याकडे बिदागीचा प्रश्न नव्हता. कीर्तन करून पैसा मिळविणें हें महापातक आहे अशी त्यांची समजूत होती. या बाबतींत त्यांचा असा दंडक आहे:—

**" जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥
बुका लाऊं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥
तट्टा वृषभासी दाणा । तृण मागों नये कोणा ॥
तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥ "**

दुसऱ्या एका अभंगांत, कन्या, गाय आणि हरिकथा यांची विक्री करणारास त्यांनीं ' चांडाळ ' म्हटलें आहे. या बाबतींत त्यांचा येवढा कटाक्ष असण्याचें कारण हें कीं वक्ता ' आशाबद्ध ' असला म्हणजे हा आतां काय मागेल कोण जाणे ही विवंचना श्रोत्यांस लागून हरिकथेकडे त्यांचें दुर्लक्ष होतें.

## गुरूपदेश आणि कवित्वस्फूर्ति

उत्तरवयांत तुकारामबुवा आषाढी आणि कार्तिकी एकादशीस पंढरीची वारी नियमानें करीत असत आणि तीहि अनवाणी चालून. शिवाय परोपकारार्थ आपला देह ते कसा झिजवीत हें पूर्वी सांगितलेंच आहे. अशा रीतीनें बुवांना मोठें कायिक तप घडलें. सत्य भाषण आणि नामस्मरण यांमुळें वाचिक तप घडलें. आणि मनाच्या समतेमुळें मानसिक तप घडलें. अशा रीतीनें त्यांची मनोभूमिका पूर्णपणें अनुग्रहक्षम झाल्यावर एके रात्रीं स्वप्नांत बाबाजी नामक सत्पुरुषानें त्यांच्यावर अनुग्रह करून 'राम कृष्ण हरि' हा मंत्र सांगितला. या बाबाजीचा उल्लेख बुवांनीं एकदोन अभंगांत केला आहे. हे बाबाजी चैतन्यसांप्रदायी असून त्या संप्रदायांतील राघवचैतन्य, केशवचैतन्य वगैरे सत्पुरुषांचा वृत्तांत निरंजन नामक एका पुरुषानें 'चैतन्यकथाकल्पतरु' ग्रंथांत दिला आहे. सदर ग्रंथांत तुकोबांची गुरुपरंपरा, श्रीविष्णु—ब्रह्मदेव—नारद—व्यास—राघवचैतन्य—केशवचैतन्य ऊर्फ बाबाजी—तुकाराम अशी दिली आहे. उपरिनिर्दिष्ट केशवचैतन्य यांचेंच दुसरें नांव बाबाजी होतें व तेच तुकोबांचे गुरु असें वरील ग्रंथांत म्हटलें आहे. त्यांनीं पुणें जिल्ह्यांतील ओतूर येथें शके १४९३, प्रजापति संवत्सर, वैशाख शुद्ध १२ या दिवशीं समाधि घेतली. तुकोबांच्या घराण्यांतील पुरुषांनीं लिहून

ठेवलेल्या बाडांत केशवचैतन्य आणि बाबाजी चैतन्य हे दोन निरनिराळे पुरुष असून, बाबाजी चैतन्य हे केशवचैतन्याचे शिष्य असें म्हटलें आहे. खरा प्रकार काय असावा हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. बाबाजी चैतन्य यांनीं तुकोबांस उपदेश दिला त्या वेळीं तुकोबांचें वय ३०।३५ वर्षांचें असावें असें वाटतें. "मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश" असें बुवांनीं म्हटलें आहे, यावरून, आतां आणखी दुसरा गुरु करण्याची आपणास आवश्यकता नाहीं असेंच सूचित करण्याचा त्यांचा विचार दिसतो. बाबाजी चैतन्य यांनीं तुकोबांस स्वप्नांत अनुग्रह दिला त्या वेळीं बाबाजी चैतन्य हे हयात नव्हते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

तुकोबांस गुरूपदेश झाला त्याच सुमारास त्यांना काव्यस्फूर्तीही झाली. 'बाल-क्रीडेचे अभंग' ही त्यांची पहिली काव्यरचना होय असें महीपतिबुवा सांगतात. बुवांस काव्यस्फूर्ति झाली तेव्हांपासून त्यांच्या समाधिकालापर्यंत त्यांची अभंगरचना सारखी चालू होती व तेवढ्या कालांत त्यांनीं सुमारें १०,००० अभंग रचिले असावेत.

## तुकोबा आणि जिजाई

संसारांस तिलांजलि वाहून तुकोबांनीं केवळ परमार्थसाधनाकडेच लक्ष लाविल्यामुळें घरांत बायकामुलांची आबाळ होऊं लागली. त्यांची दुःस्थिति पाहून, या सत्पुरुषाच्या प्रपंचास आपण थोडासा हातभार लावावा या सदुद्देशानें कोणी कांहीं धान्य वगैरे पाठविलें तर बुवा त्याचा स्वीकार करीत नसत. त्यामुळें त्यांची पत्नी जिजाई ही अगदीं वैतागल्या सारखी झाली. बुवांच्या निरपेक्षतेचा अतिरेक झाला म्हणजे जिजाईच्या संतापाचाही अतिरेक होत असे आणि त्याच्या भरांत ती स्वतःला, नवऱ्याला आणि पोरांना कशा प्रकारचीं दुरुत्तरें बोलत असे त्याचा नमुना खालील अभंगांत सांपडेल:—

"मजचि भोंवता केला येणें जोग। काय याचा भोग अंतरला॥
चालोनियां घरा सर्व सुखें येती। माझी तों फजिती चुकेचिना॥
कोणाची बाईल होऊनियां वोढूं। संवसारीं काढूं आपदा किती॥
काय तरी देऊं तोडितील पोरें। मरतीं तरी बरें होतें आतां॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर। सारवाया ढोर शेण नाहीं॥
तुका म्हणे रांड न करितां विचार। वाहूनियां भार कुंथे माथां॥
न करवे धंदा। आइता तोंडीं पडे लोंदा॥
उठिलें तें कुटिलें टाळ। अवघा मांडिला कोल्हाळ॥
जिवंतचि मेले। लाजा वाटोनियां प्याले॥
संवसाराकडे। न पाहती ओस पडे॥
तळमळती यांच्या रांडा। घालिति जीवा नांवें धोंडा॥
तुका म्हणे बरें जालें। घे गे बाइले लिहिलें॥

जिजाई तर बोलून चालून एक कुणबाऊ स्त्री, तिच्या तोंडून याहून सुंदर भाषा कोठून येणार? परंतु तुकोबांसारख्या साधुपुरुषानेंही तिला शिव्या दिल्या आहेत हें लक्षांत घेतलें

पाहिजे. नवरा–बायकोचे जरी असे मधून मधून खटके उडत असत तरी तुकोबांवर जिजाईचें निःसीम प्रेम होतें व तुकोबांनाही ती फार प्रिय होती. तुकोबांचें जेवण झाल्याशिवाय जिजाई अन्नग्रहण करीत नसे. एखादे वेळीं जिजाई फारच त्रागा करूं लागली म्हणजे सौम्य शब्दांनीं तुकोबा तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत. ते तिला सांगतः—

**कोण घरा येतें आमुच्या कशाला । ज्याचा काय त्याला धंदा थोडा॥**
**देवासाठीं जालें ब्रह्मांड सोइरें । कोमळ्या उत्तरें काय वेंचे ॥**
**मानें पाचारितां नव्हे आराणूक । ऐसे येती लोक प्रीतीसाठीं ॥**
**तुका म्हणे रांडे नावडे भूषण । कांतेलेंसें श्वान लागे पाठीं ॥**

**भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥**
**म्हणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें जालीं मज ॥**
**आस निरसूनि कठिण हें मन । करीं वो समान वज्र जैसें ॥**
**किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनी । पावशील धणी परमानंद ॥**

अशा रीतीनें बुवा जिजाईला परमार्थाचा उपदेश मधूनमधून करीत असत; मात्र या उपदेशाचा जिजाईच्या मनावर कितपत परिणाम झाला होता हा प्रश्न अलाहिदा !

## तुकोबा आणि मंबाजी

देहू येथील पांडुरंगाच्या देवालयांत तुकोबांचें नित्य कीर्तन होत असे व शेंकडों भाविक लोक कीर्तनास येत असत. त्या वेळीं मंबाजी या नांवाचा एक ब्राह्मण चिंचवड येथें कांहीं दिवस रहात होता तो पुढें गोसावी होऊन देहूस येऊन मठ बांधून राहिला. त्याची शिष्यमंडळीही बरीच होती व त्यांच्याकडून मिळणाऱ्या द्रव्यावर त्याचा योगक्षेम चालत असे. ‘ महापुरुष मंबाजी गोसावी ’ या नांवानें तो प्रसिद्ध होता. तुकारामबुवांची प्रतिष्ठा वाढत चाललेली पाहून मंबाजी त्यांचा द्वेष करूं लागला. एकाच गांवांत, आपण महंत आणि तुकाराम संत, अशी जोडी असणें म्हणजे एका म्यानांत दोन तलवारी घुसडण्यासारखें आहे असें त्याला वाटलें. तो तुकोबांचा द्वेष्टा असूनही, लौकिकार्थ त्यांच्या कीर्तनाला जात असे. देवाल्याच्यामागें दक्षिणेच्या बाजूस थोडी जागा होती तेथें मंबाजीनें कांहीं फुलझाडें लाविलीं होतीं व त्यांच्या जोपासनेंत त्याचा बराच वेळ जात असे. तुकोबांची पत्नी जिजाई हिला तिच्या वडिलांनीं एक म्हैस दिली होती ती एके दिवशीं मंबाजीच्या बागेचें कुंपण मोडून बागेंत शिरली आणि तिनें कांहीं फुलझाडें खाऊन फस्त केलीं. मंबाजीनें जेव्हां हें पाहिलें तेव्हां त्यानें शिव्यांची लाखोली वाहिली. पुढें एकादशी आली तेव्हां पुष्कळ लोक देवदर्शनास येऊं लागले. तेव्हां त्यांना अडथळा व्हावा म्हणून मंबाजीनें मुद्दाम प्रदक्षिणेच्या वाटेवर कांटे पसरून ठेवले! ही गोष्ट तुकोबांस समजतांच त्यांनीं ते कांटे उचलून टाकले आणि वाट मोकळी केली. तुकोबांची कुरापत काढून त्यांच्याशीं भांडण करावें अशी मंबाजीची फार दिवस इच्छा होती, ती पूर्ण करून घेण्यास ही संधि बरी आहे असें पाहून तो तुकोबांच्या अंगावर धावून गेला आणि

एक काठी घेऊन त्यांना झोडपीत सुटला. तोंडानें अपशब्दांचा वर्षाव सुरूच होता. एक काठी मोडली कीं दुसरी घ्यावी, असें करून तुकोबांच्या पाठीचें त्यानें धिरडें केलें. परंतु तुकोबांनीं तो मार निमूटपणें सोसला, बिलकुल प्रतिकार केला नाहीं. दहावीस काठ्या मोडल्या तरी तुकोबा तेथून हालले नाहींत. शेवटीं जेव्हां मंबाजीचेच हात दुखून आले तेव्हां मारणें बंद करून तो आपल्या मठांत निघून केला.

मंबाजीच्या मारामुळें बुवांच्या अंगात कांटे मोडून सगळें शरीर रक्तबंबाळ झालें, व त्यामुळें त्यांना फार दुःख होऊं लागलें. त्यांची ही करुणास्पद स्थिति पाहून सज्जनांस त्यांची दया आली आणि ते हळहळूं लागले. शेवटीं जिजाईनें तुकोबांस घरीं नेऊन त्यांच्या अंगांतले कांटे काढले व त्यांस औषधोपचार केला. रात्रौ एकादशीचें कीर्तन होतें. बुवा मंदिरांत जाऊन कीर्तनास उभे राहिले. नेहमींप्रमाणें मंबाजी कीर्तनास आला आहे कीं नाहीं याची त्यांनीं चौकशी केली, तेव्हां तो आलेला नाहीं असें समजलें. तेव्हां तुकोबा म्हणाले, "मंबाजी गोसावी रोज कीर्तनास येतात, मग आजच कां बरें आले नाहींत?" इतकें बोलून, त्यांनीं एक मनुष्य मंबाजीस बोलावण्यास पाठविला. मंबाजीनें सांगितलें कीं, "माझें अंग फार दुखत आहे." हें ऐकतांच बुवा त्याच्या मठांत धांवत गेले आणि त्याला साष्टांग दंडवत घालून त्याचें अंग रगडीत बसले. ते म्हणाले, "मला मारतांना तुम्हांला फार श्रम झाले व त्यामुळें तुमचें अंग दुखूं लागलें, याबद्दल मला फार वाईट वाटतें. मीच जर ते कांटे उचलून टाकले नसते तर तुम्हांला येवढी तसदी कां पडली असती? म्हणून हा माझाच अपराध आहे व याबद्दल आपण मला क्षमा करून नेहमींप्रमाणें कीर्तनास आलें पाहिजे." बुवांचें हें भाषण ऐकून मंबाजीस लाज वाटली व तो बुवांबरोबर कीर्तनास गेला. पण एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं हा मंबाजी शेवटपर्यंत तुकोबांचा द्वेष्टाच राहिला! खापरास परीस लावला तरी त्याचें सोनें होणें जसें शक्य नाहीं तद्वत् तुकोबांसारख्या महासाधूच्या सान्निध्याचा व शिकवणीचा लवलेशही परिणाम मंबाजीच्या मनावर झाला नाहीं.

## तुकोबा आणि छत्रपति शिवाजीमहाराज

तुकोबांच्या साधुत्वाची कीर्ति श्रवण करून दूरदूरचे लोक त्यांच्या दर्शनास व त्यांचें कीर्तन ऐकण्यास मुद्दाम देहूस येऊं लागले. याच सुमारास पुण्याच्या आसपासच्या भागांत शिवाजीमहाराजांचें वास्तव्य असे व त्यांच्याही कानावर तुकोबांच्या साधुत्वाच्या गोष्टी जात असत. अनेक कार्यव्यासंगत्वामुळें तुकोबांच्या दर्शनाचा लाभ महाराजांस अद्याप घडला नव्हता, परंतु लवकरच देहूस जाऊन तुकोबांचें एकदां दर्शन घ्यावें व त्यांचें एखादें कीर्तन ऐकावें अशी उत्कट इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली होती. दर्शनास जाण्यापूर्वी, तुकोबांस साहाय्य करण्याच्या हेतूनें म्हणा किंवा त्यांच्या वैराग्याची कसोटी पाहण्याच्या उद्देशानें म्हणा, महाराजांनीं आपल्या एका कारकुनाबरोबर, छत्रचामरें, घोडा, पोषाक, द्रव्य वगैरे देऊन त्याला तुकारामबुवांस बोलावण्यास पाठविलें. बुवा त्या वेळीं लोहगांवीं होते, तेथें जाऊन त्या कारकुनानें त्यांना महाराजांचा निरोप कळविला व महाराजांनीं पाठविलेल्या वस्तु त्यांजपुढें ठेविल्या.

तेव्हां बुवांनीं तेथल्या तेथें चार अभंग रचून ते कारकुनाच्या हातीं देऊन महाराजांस नेऊन देण्यास व आणलेल्या वस्तु परत घेऊन जाण्यास सांगितलें. या चार अभंगांतला एक अभंग असा आहे:—

" दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥
आतां येथें पंढरिराया । मज गोंविसी कासया ॥
मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्टा ॥
तुका म्हणे देवा । माझे सोडवणें धांवा ॥ "

या चार अभंगांत तुकारामबुवांची ऐहिक वैभवाविषयीं जी पूर्ण उदासीनता, किंबहुना तुच्छता, दिसून येते तीच त्यांच्या साधुत्वाचा आणि वैराग्यवृत्तीचा मोठा पुरावा आहे. राजानें बहुमानानें घरीं पाठविलेलें द्रव्य मृत्तिकेसमान मानून तें परत करणें ही निरपेक्षता जगाच्या इतिहासांत अत्यंत दुर्मिळ आहे. अठरा विश्वे दारिद्र्य घरांत कायमचें वास्तव्य करीत असतां, घरीं चालून आलेल्या द्रव्याचा मोह आवरणें ही गोष्ट सोपी नाहीं. बुवांच्या या निरपेक्षतेचा छत्रपति शिवाजीमहाराजांच्या मनावर काय परिणाम झाला असेल हें कल्पनेनेंही ताडवां येण्यासारखें आहे.

शिवाजीमहाराज एकदां लोहगांवीं तुकोबांच्या कीर्तनास गेले असतां यवन सेनापतीनें त्यांच्यावर पाळत ठेवून त्यांना गिरफदार करण्याचा प्रयत्न केला होता, परंतु, पांडुरंगानें शिवाजीमहाराजांचीं अनेक रूपें धारण करून त्यांचें रक्षण केलें अशी कथा महीपतींनीं आपल्या ग्रंथांत वर्णिली आहे.

## कवित्व बुडविलें तो प्रसंग

वाघोली गांवीं रामेश्वर भट्ट या नांवाचे एक षड्शास्त्रसंपन्न ब्राह्मण रहात होते, त्यांच्या कर्णपथावर जेव्हां तुकारामबुवांच्या साधुत्वाची कीर्ति जाऊन आदळली तेव्हां त्यांचें मन फार अस्वस्थ होऊन, त्यांना अगदीं चैन पडेनासें झालें. तुक्याचें हें बंड मोडलेंच पाहिजे, नाहीं तर महाराष्ट्राचा तरणोपाय नाहीं असें त्यांना वाटलें. मग स्वतः देहूस जाऊन स्वतःच्या विद्वत्तेच्या जोरावर बुवांचा तेजोभंग करावा असें त्यांनीं ठरविलें. परंतु तसें करण्यापूर्वी ते अगोदर ग्रामाधिकाऱ्याकडे गेले आणि त्याजपाशीं त्यांनीं अशी तक्रार केली कीं, " तुका जातीचा शूद्र असून आपल्या कवितेंत श्रुतीचा अर्थ सांगतो. हरिकीर्तन करून भाविक लोकांस तो मोहिनी घालतो. ' वर्णानाम् ब्राह्मणो गुरुः ' हें वचन धाब्यावर बसवून, त्यानें ब्राह्मणाचेंही गुरुत्व आपल्याकडे घेतलें आहे. ब्राह्मणदेखील त्याच्या पायांवर डोकीं ठेवतात. ब्राह्मणांनीं शूद्रास नमस्कार करावा ही गोष्ट आमच्या वर्णश्रेष्ठत्वास लांच्छनास्पद आहे. स्नानसंध्या, यज्ञयाग, वगैरे वेदोक्त कर्मांचें महत्त्व कमी करून नुसत्या भक्तिमार्गाचें आणि नामस्मरणाचें स्तोम त्यानें माजविलें आहे. तरी याचा कांहीं तरी बंदोबस्त जर लवकर केला नाहीं तर मोठा अनवस्था प्रसंग येईल. " हें ऐकून ग्रामाधिकाऱ्यास तुकोबांच्या वर्तनाचा

मोठा संताप आला आणि त्यानें तत्काळ देहूच्या पाटलास चिठ्ठी पाठविली कीं 'तुकयास गांवाबाहेर काढून लावावें.' देहूंतील लोकांनीं ती चिठ्ठी वाचून पाहिली आणि तुकोबांस नेऊन दाखविली. चिठ्ठींतील मजकूर वाचून तुकोबांस फार वाईट वाटलें व त्यांना मोठी काळजी उत्पन्न झाली. तेव्हां त्यांनीं असा विचार केला कीं स्वतः वाघोलीस जाऊन हे रामेश्वर भट्ट कोण आहेत तें एकदां पहावें. मग लगेच ते देहूहून निघून वाघोलीस गेले. भट्टजी संध्या करीत बसले होते. त्यांस बुवांनीं साष्टांग नमस्कार घातला व तेथेंच कीर्तन सुरू केलें. कीर्तन ऐकून रामेश्वर भट्ट म्हणाले, "तूं जातीचा शूद्र, आणि कीर्तनांत अभंग म्हणतोस त्यांत श्रुतीचा अर्थ उमटतो. वेदाचा अर्थ सांगण्याचा तुला अधिकार नाहीं. हें तुझें वर्तन शास्त्रबाह्य आहे. यामुळें तुला आणि तुझ्या श्रोत्यांना—दोघांनाही रौरवयातना प्राप्त होतील. म्हणून माझी तुला अशी आज्ञा आहे कीं यापुढें कविता करण्याचें सोडून दे." हें ऐकून बुवा मनांत म्हणाले "पांडुरंगानें मला कवित्व करण्याची आज्ञा केली म्हणून मी आजपर्यंत अभंगरचना करीत आलों. पण, ही सगळी वल्गना मी अगदीं विनाकारण केली असें यांच्या बोलण्यावरून दिसतें." मग त्यांनीं रामेश्वर भट्टांस विचारलें, "महाराज, आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे, मी यापुढें कवित्व करणार नाहीं. पण मी येवढेंच नम्रपणें विचारतों कीं आतांपर्यंत जी कविता मी केली आहे तिचें काय करूं?" भट्ट म्हणाले, "तें सगळें कवित्व तूं आपल्या हातांनीं इंद्रायणींत नेऊन बुडव." 'अवश्य' म्हणून बुवा देहूस परत आले व सरळ विठ्ठलमंदिरांत गेले. पांडुरंगमूर्ति दृष्टीस पडतांच बुवांचे डोळे पाण्यानें भरून आले. भगवंतास त्यांनीं सप्रेम साष्टांग नमस्कार घातला व हात जोडून ते म्हणाले, "विठाबाई, तुझ्या आज्ञेनें कांहीं वेडीवांकडी कविता मी रचली, पण ती आतां इंद्रायणींत नेऊन बुडविण्याची आज्ञा मला झाली आहे. असो, तुझी इच्छा!" इतके निर्वाणीचे शब्द बोलून ते आपल्या घरीं गेले आणि अभंगांच्या वह्या घेऊन इंद्रायणीवर आले. मग सर्व वह्या एका वस्त्रांत बांधून व त्यांत दगड घालून 'पुंडलीकवरदा हरि विठ्ठल!' या नामाचा गजर करून त्यांनीं त्या इंद्रायणीच्या डोहांत बुडविल्या. हे पाहून प्रेमळ भाविक लोक फार हळहळूं लागले, परंतु तुकोबांचा द्वेष करणाऱ्या दुष्टांस मात्र आनंद झाला. पण खुद्द तुकोबांच्या चित्ताचा मात्र फारसा विक्षोभ झाला नाहीं. ते आपले स्वस्थ भजन करीत बसले. अशा रीतीनें पांच दिवस गेले. गांवांतल्या कुटाळांनीं त्यांच्यासभोंवतीं जमून आणि नाना प्रकारचीं दुरुत्तरें बोलून, त्यांचें डोकें उठविण्याचा उद्योग सुरू ठेवलाच होता. ते म्हणूं लागले, "तुक्या, मागें घरांतले कागदपत्र इंद्रायणींत बुडवून तूं प्रपंचाचें वाटोळें केलेंस आणि आतां हें कवित्व बुडवून परमार्थाचाही सत्यनाश केलास. अशा रीतीनें, प्रपंच आणि परमार्थ, दोन्ही बुडविलेस!" दुष्ट लोकांचे हे तीक्ष्ण शब्दशर मात्र तुकोबांच्या वर्मी लागून त्यांना अगदीं मरणप्राय दुःख झालें. आत्महत्या करावी असाही विचार क्षणभर त्यांच्या मनांत येऊन गेला, परंतु आत्महत्या करणें हें मोठें पाप आहे हें लक्षांत येतांच तो विचार त्यांनीं सोडून दिला. मग, आतां काय होईल तें होवो, अन्नोदक वर्ज्य करून, डोहाकांठच्या शिळेवर पडून रहावयाचें असा त्यांनीं निश्चय केला आणि तो तेरा दिवस पाळला.

तिकडे रामेश्वरभट्ट पुण्यास गेले असतां, कांहीं कारणानें त्यांच्या अंगाचा फार दाह होऊं लागला व तो कांहीं केल्या कमी होईना. आपण आतां वांचत नाहीं असें भट्टजींस वाटलें व सर्व उपाय थकल्यावर आळंदीस जाऊन ज्ञानोबांच्या समाधीजवळील अजानवृक्षाखालीं ते धरणें धरून बसले.

इकडे देहू येथें, तुकोबांच्या प्रायोपवेशनाच्या तेराव्या दिवशीं श्रीकृष्णाची बालमूर्ति आपल्या सन्निध येऊन, 'तुझे अभंग उदकांत सुरक्षित आहेत, तूं कांहीं काळजी करूं नकोस' असें आपणास सांगत आहे, असा दृष्टांत तुकोबांस झाला. गांवांतील कांहीं लोकांसही त्या रात्रीं स्वप्नांत "तुकोबांच्या अभंगांच्या वह्या मी पाण्यावर कोरड्या ठेवल्या असून त्या आतां पाण्यावर तरंगत आहेत, तरी तुम्ही त्या काढून घ्या," असा दृष्टांत देवानें दिला. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळींच गांवांतील लोक मोठ्या उत्सुकतेनें नदीवर गेले आणि पाहतात तों बुवांच्या अभंगांच्या वह्या खरोखरच पाण्यावर तरंगत आहेत! "आमच्या तुकोबांस विठोबा पावला!" असें म्हणून हरिनामाचा त्यांनीं मोठा गजर केला. त्यांत कांहीं पोहणारे होते त्यांनीं नराभर डोहांत उड्या टाकून वह्या बाहेर काढल्या. मग ते धांवतच तुकोबांपाशीं गेले, आणि त्यांना जागृत करून, वह्या सुरक्षित असल्याचें कळविलें. प्रभूची ही कृपा पाहून बुवांचा कंठ दाटून आला. मग सात अभंग रचून भगवंताची त्यांनीं स्तुति केली.

## रामेश्वरभट्टांचा पश्चात्ताप

इकडे, रामेश्वर भट्ट आळंदी येथें आपल्या अंगाचा दाह शांत व्हावा म्हणून ज्ञानोबांच्या समाधीपुढें धरणें धरून बसले असतां त्यांस दृष्टांत झाला कीं, "भक्तश्रेष्ठ तुकाराम याचा तुजकडून अधिक्षेप घडल्यामुळें तुझी पुण्याई नष्ट झाली व त्यामुळें हें दुःख तुला भोगावें लागत आहे. तरी तूं आतां सद्भाव धारण करून तुकोबांस शरण जा म्हणजे ही तुझी व्यथा दूर होईल." खुद्द ज्ञानदेवमहाराजांनींच असा दृष्टांत दिल्यावर, तुकारामबुवांची खरी योग्यता काय आहे हें रामेश्वरभट्टांच्या लक्ष्यांत आलें आणि अशा थोर सत्पुरुषाचा आपण अपमान केला या विचारानें त्यांना मोठा पश्चात्ताप झाला. परंतु देहूस जाऊन तुकोबांची भेट घेण्याच्या स्थितींत ते नव्हते. म्हणून त्यांनीं तुकोबांस एक पत्र लिहून तें आपल्या एका शिष्याबरोबर देहून पाठविलें. शिष्यानें तुकोबांस पत्र देऊन सविस्तर वृत्तांत त्यांस सांगितला. तो ऐकून तुकोबांस रामेश्वरांची दया आली. मग त्यांनीं एक अभंग रचून तो त्याच शिष्या-बरोबर भट्टजींकडे पाठविला. हा अभंग येणेंप्रमाणें:—

**" चित्त शुद्ध तरी शत्रू मित्र होती । व्याघ्र ते न खाती सर्प तया ॥**
**विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥**
**दुःख तें देईल सर्व सुखफळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥**
**आवडेल जीवां जीवाचियेपरी । सकळां अन्तरीं एक भाव ॥**
**तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणिजेते येणें अनुभवें ॥ "**

हा अभंग रामेश्वरांच्या हातांत पडतांच ते तो वाचूं लागले. वाचतां वाचतां "होतील शीतळ अग्निज्वाळा" हे शब्द उच्चारल्याबरोबर त्यांचा दाह शांत झाला! साधूंच्या शब्दांत हें असें दिव्य सामर्थ्य असतें. दाह शांत होतांच रामेश्वरभट्ट तत्काल देहूस गेले आणि तुकोबांस साष्टांग नमस्कार घालून म्हणाले, "तुमची योग्यता न जाणतां म्यां पामरानें तुम्हांस आपलें कवित्व बुडविण्यास सांगितलें, तरी माझ्या या घोर अपराधाबद्दल तुम्ही मला क्षमा करावी." तुकोबा म्हणाले, "महाराज, हें काय बोलतां? मी आपल्या पायांचा रजरेणु आहें. आपलीच कृपा मजवर निरंतर असावी अशी माझी विनंति आहे." रामेश्वरभट्ट म्हणाले, "तुम्ही जो अभंग लिहून पाठविला तोच तुमचा अनुग्रह असें समजून मी आतां तुमचा शिष्य झालों आहें. आतां यापुढें आपल्या समागमांतच मी राहणार; पुनः वाघोलीस जाण्याचा माझा विचार नाहीं." असा निश्चय करून रामेश्वरभट्ट पुढें देहूसच कायमचे राहिले आणि त्यांनीं आपलें उर्वरित आयुष्य बुवांच्या सहवासांत घालविलें.

पांडुरंगानं इंद्रायणीच्या डोहांत बुवांच्या अभंगांच्या वह्या कोरड्या राखल्या आणि तुकोबांच्या कृपेनें रामेश्वर भट्टांचा दाह शांत झाला या दोन्ही चमत्काराविषयीं खुद्द रामेश्वर भट्टांचीच साक्ष अशी आहे. ते म्हणतात—

**"माझी मज आली रोकडी प्रचीत। होऊनि फजित दुःख पावें॥**
**कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं। व्यथा या शरीरीं बहुत जाली॥**

* * * *

**म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें। जालें हें आराम देह माझें॥**

**तुकाराम तुकाराम। नाम घेतां कांपे यम॥**
**धन्य तुकोबा समर्थ। जेणें केला पुरुषार्थ॥**
**जळीं दगडासहित वह्या। तारियेल्या जैशा लाह्या॥"**

तुकोबांची कविता, त्यांच्या आक्षेपकांच्या इच्छेप्रमाणें जर खरोखरच नष्ट झाली असती तर महाराष्ट्र-वाङ्मयाची केवढी हानि झाली असती याची नुसती कल्पनादेखील अंगावर रोमांच उभे करते. जुन्या मराठी वाङ्मयांतील अगदीं स्वतंत्र सुंदर कवितेचा नमुना म्हणजे तुकोबांची कविता होय. तीच नष्ट झाली असती तर तिची जागा भरून काढण्याचें सामर्थ्य कोणत्या कवीच्या अंगीं होतें?

## अलौकिक चमत्कारांच्या कथा

जगांतील बहुतेक सर्व धर्मसंस्थापक आणि साधुसंत यांच्या चरित्रांत अलौकिक चमत्कारांच्या कथा वर्णिलेल्या आढळतात; आणि मुळांत कांहींच नसतांना हा येवढा मोठा अलौकिक चमत्कारांचा डोलारा उगाचच उभारला गेला असेल असें म्हणणें धाष्टर्याचें होईल. पुष्कळ वैज्ञानिकांनींदेखील, कांहीं चमत्कारांच्या कथा विश्वसनीय मानल्या असून अलौकिक

पुरुषांना अलौकिक चमत्कार करून दाखविणें अगदींच अशक्य नाहीं असें त्यांचें मत आहे. आमचे चरित्रनायक तुकोबा यांच्याही चरित्रांत अलौकिक चमत्कारांच्या अनेक कथा येऊन गेल्या आहेत आणि त्यांपैकीं कांहींचा तरी येथें उल्लेख केला नाहीं तर प्रस्तुत चरित्रलेख अपूर्ण राहील. चमत्कारांवर साधुत्व अवलंबून नाहीं हें मलाही मान्य आहे, परंतु कर्तुमकर्तु-मन्यथाकर्तुम् परमात्म्याशीं तादात्म्य पावलेल्या मुक्त पुरुषांच्या अंगीं, लोह-चुंबक न्यायानें, त्या परमात्म्याच्या सामर्थ्याचा थोडा तरी अंश उत्पन्न होत असावा, अशी याची उपपत्ति मी लावीत असतों.

तुकोबांच्या अभंगांच्या वह्या तेरा दिवस पाण्यांत कोरड्या राहिल्या आणि आपोआप पाण्यावर तरंगूं लागल्या ही कथा रामेश्वरभट्टांच्या साक्षीपुराव्यासह पूर्वीं दिलीच आहे. त्याच-प्रमाणें, अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या डोहांत बुडविण्याची आज्ञा रामेश्वर भट्टांनीं तुकोबांस केल्यावर त्यांच्या अंगाचा भयंकर दाह झाला हीही हकीकत येऊन गेलीच आहे. तुकोबांच्या कीर्तनास आलेल्या शिवाजीमहाराजांचें रक्षण, अनेक शिवाजी निर्माण करून, देवानें कसें केलें त्याचाही उल्लेख तुकोबा आणि शिवाजीमहाराज या प्रकरणांत येऊन गेला आहे. याशिवाय, एका बाईनें आपलें मृत बालक तुकोबांच्या कीर्तनांत आणून टाकलें असतां तुकोबांनीं तें जिवंत केलें, तुकोबांची म्हैस चोरांनीं लांबविली तेव्हां देवानें अक्राळविक्राळ रूप धारण करून त्यांची गाळण उडविली, जिजाई घरांत नग्नावस्थेंत असतां बाहेर पाहुणे आले त्या वेळीं तिच्या अंगावर अकस्मात् एक वस्त्र येऊन पडलें, मंबाजीनें बहिणाबाईच्या म्हशीला दिलेल्या माराचे वळ तुकोबांच्या अंगावर उठले, तुकोबांच्या मुलाचें मूत्र कोंडून तो मरणोन्मुख झाला असतां जिजाई त्याला देवाच्या पायांवर नेऊन आपटण्यास गेली तेव्हां देवघरांतून आलेले " तुझा मुलगा बरा झाला आहे, त्याला घरीं घेऊन जा ' असे शब्द तिच्या कानीं पडले, तुकोबा चिंचवडास गेले असतां चिन्तामणि देवांच्या विनंतीवरून त्यांनीं गणपतीचें आवाहन करून त्याला पाटावर आणून बसविलें, इत्यादि अनेक चमत्कार बुवांच्या जुन्या चरित्रकारांनीं विस्तारेंकरून वर्णिले आहेत आणि त्यांची अगदींच उपेक्षा करणें योग्य नव्हे म्हणून त्यांपैकीं कांहींचा येथें नुसता उल्लेख केला आहे.

## तुकोबांची मुक्तावस्था

भरतारुण्यांत, अनेक आपत्तींनीं गांजून गेल्यामुळें तुकारामबुवा जे एकदां परमार्थास लागले ते शेवटीं शेवटीं साधुत्वाच्या अगदीं पराकोटीस जाऊन पोंचले. पक्षीदेखील निर्भयपणें त्यांच्या अंगावर येऊन बसूं लागले. तथापि, लोकसंग्रहार्थ भजनकीर्तन करणें आणि कविता रचणें हें त्यांचें कार्य शेवटपर्यंत चालूच होतें. " तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता " असें एके ठिकाणीं त्यांनीं म्हटलें आहे, त्याचा अर्थ हा कीं, " माझ्यासाठीं मला आतां कांहीं करावयाचें राहिलें नाहीं, केवळ परोपकारासाठींच हा कर्मयोग मी आचरीत आहें." " तुकोबा, तुम्ही जन्मभर जो हा परमार्थसंपादनाचा खटाटोप केला त्याचें फळ तुम्हांस काय मिळालें ? " असा प्रश्न लोकांनीं एकदां त्यांस विचारला असतां ते म्हणाले, " भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें; " देव आपल्या भक्ताची उपेक्षा करीत नाहीं, तो कृपावंत आहे,

अशी अनुभवानें माझी खात्री होऊन चुकली आहे." "असों द्यावा धीर सदा समाधान। आहे नारायण जवळीच" असा मुमुक्षूंस त्यांचा उपदेश आहे. प्रत्यक्ष अनुभवाशिवाय अशी आत्मविश्वासपूर्ण वाणी कोणाच्याही मुखांतून येणें शक्य नाहीं.

पुढें पुढें तुकोबा बालोन्मत्त पिशाचवृत्तीनें वागूं लागले. ते अकस्मात् उठत आणि कोणासही न सांगतां एखाद्या गांवास चालते होत. मागाहून शिष्यांना धांवाधांव करावी लागे. 'तुकोबा, कोठें चाललां?' असें जर कोणी विचारलें तर "वैकुंठास चाललों" असें ते उत्तर देत.

## तुकोबांचें निर्याण

मृत्यूपूर्वी कांहीं दिवस तुकोबांनीं रचलेल्या अभंगांत कांहीं अभंग असे आहेत कीं त्यांत त्यांनीं स्वतःचा मृत्युकाल समीप आल्याचें व्यक्त केलें आहे.

**जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी। मृत्याचिये भेटी जवळी आली॥**

* * *

**आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां। तो जाला सोहळा अनुपम्य॥**

* * *

**बोळविला देह आपुलिये हातें। हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसी॥**

* * *

**जाला प्रेतरूप शरीराचा भाव। लक्षियेला ठाव स्मशानींचा॥**

* * *

**पिंडदान पिंडें ठेविलें करून। तिळीं तिळवण मूळत्रयीं॥**

या अभंगांत सगळी निरवानिरव दिसते. शेवटीं फाल्गुन वद्य द्वितीया सोमवार (शके १५७३) खर संवत्सर हा दिवस येऊन ठेपला. त्या दिवशीं इंद्रायणीचे काटीं कीर्तन करीत असतां तुकोबा अकस्मात् अदृश्य झाले. त्या वेळीं तेथें दुसरें कोणी नसल्यामुळें, त्यांचें काय झालें हें कोणासच कळलें नाहीं. त्यांचें कलेवरही सांपडलें नाहीं. त्यामुळें, त्यांचा मृत्यु हें एक मोठें गूढ होऊन बसलें व अद्यापही तें गूढच आहे. प्रेत सांपडलें असतें तर हें गूढ निर्माण झालें नसतें, प्रेत सांपडलें नाहीं त्यामुळें त्यांच्या मृत्यूविषयीं अनेकांनीं अनेक तर्क लढविले. तुकारामबुवा शेवटीं काशीयात्रेस गेले व तिकडे मृत्यु पावले, तुकोबांनीं जलसमाधि घेतली, आणि तुकोबा विमानांत बसून सदेह वैकुंठास गेले, अशीं तीन प्रकारचीं तीन मतें प्रचलित आहेत. तुकोबांचे कनिष्ठ चिरंजीव नारायण हे म्हणतात, "कीर्तन करितां अदृश्य झाले." रामेश्वर भट्टांचें म्हणणें, "गेला तो विमानीं बैसोनियां." आणि निळोबा, महीपति, कचेश्वर, नामा शिंपी, राजाराम प्रासादी इत्यादिकांचें म्हणणेंही तुकोबा विमानांत बसून सदेह वैकुंठास गेले असेंच आहे. परंतु या सर्वांत तुकोबांचे पुत्र नारायण यांचेंच म्हणणें विशेष ग्राह्य दिसतें. कविवर्य मोरोपंत यांनीं एका आर्येत, यासंबंधाचें स्वतःचें मत नमूद केलें आहे तें मोठें मार्मिक आणि चिंतनीय आहे. ते म्हणतात "कीं सतनु मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं;" तुकोबा योगबलानें सतनु मुक्त (अदृश्य) झाले." आणि हेंच मत अधिक सयुक्तिक दिसतें. योगबलानें मनुष्य अदृश्य होऊं शकतो ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. कांहीं योगी कांहीं काल अदृश्य होऊन पुनः प्रकट होतात; तुकोबा कायमचेच अदृश्य झाले, येवढाच फरक. दुसऱ्याही एका सत्पुरुषाच्या बाबतींत असा प्रकार घडलेला आहे. कोंकण प्रांतांत सुमारें

दोनशें वर्षांपूर्वी होऊन गेलेले प्रसिद्ध योगी व कवि सोहिरोबानाथ आंबिये हेही उज्जनी येथें आपल्या मठांत असेच गुप्त झाले, त्यांचेंही प्रेत सांपडलें नाहीं, अशी कथा आहे. गुप्त होण्यापूर्वी त्यांनीं एक पद्य लिहून ठेवलें होतें त्यांत "गैबिप्रसादें गैबचि झालों" म्हणजे गैबनाथांच्या कृपेनें मी गुप्त झालों असें त्यांनीं अगदीं स्पष्ट सांगितलें आहे. एकंदरीत, सोहिरोबांप्रमाणें व पंतांनीं सांगितल्याप्रमाणें, तुकोबा योगसिद्धीनें अदृश्य झाले असें माझें स्वतःचें अगदीं ठाम मत आहे.

तुकोबा अदृश्य झाल्यावर देहू गांवांत मोटा हल्कल्लोळ उडाला. तुकोबांची पत्नी जिजाई हिला तें वर्तमान समजतांच ती मूर्च्छित पडली. ती त्या वेळीं गर्भवती होती. बुवा शेवटीं शेवटीं घरांतून बाहेर पडतांना "आम्ही वैकुंठास चाल्लों" असें म्हणत असत, त्यामुळें, त्या दिवशीं बाहेर पडतांना बुवांनीं जरी हेच शब्द उच्चारले असले, तरी आज हे खरोखरच वैकुंठास जाणार आहेत असें तिला वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. अर्थात्, प्रिय पतीच्या आकस्मिक निर्याणाचें वृत्त कानीं पडतांच तिला मरणप्राय दुःख व्हावें यांत आश्चर्य नाहीं.

तुकोबांचा जन्मकाल उपलब्ध नसल्यामुळें, निर्याणकालीं त्यांचें वय काय होतें हें निश्चयात्मक रीतीनें सांगतां येणें शक्य नाहीं. तरी तें ५० आणि ६० यांच्या दरम्यान असावें असें वाटतें. गुप्त झाल्यानंतरही बुवांनीं कांहीं लोकांस प्रत्यक्ष व कांहीं लोकांस स्वप्नांत दर्शन दिल्याचें ग्रंथांतरीं लिहिलें आहे. बुवांची एक कन्या गंगाबाई ही बुवांच्या निर्याणकालीं आपल्या सासरीं होती, तिला बुवांच्या निर्याणाची बातमी समजतांच ती फार शोकाकुल झाली व "तुमची भेट झाल्याशिवाय मी अन्नग्रहण करणार नाहीं" अशी प्रतिज्ञा करून बसली. तेव्हां, 'बेटामध्यें' बुवांनीं तिला भेटून तिचें समाधान केलें. वाराणसींत एका संन्याश्यालाही त्यांनीं असेंच दर्शन दिलें. बहिणाबाई, निळोबा, कचेश्वर, व महीपति यांना त्यांनीं स्वप्नांत दर्शन दिलें. सुदुंबरें गांवांत गवरशेट वाणी या नांवाचे एक गृहस्थ होते त्यांनाही बुवांनीं त्यांच्या मृत्युकाळीं दर्शन दिल्याचा उल्लेख आढळतो. फाल्गुन वद्य द्वितीयेस बुवा अदृश्य झाल्यावर तीन दिवस मंडळीनें त्यांची वाट पाहिली. तिसरे दिवशीं म्हणजे फाल्गुन वद्य पंचमीस बुवांची गोधडी आणि टाळ हीं सांपडलीं, तेव्हां रामेश्वरभट्टांनीं शास्त्रार्थ पाहून तोच त्यांच्या पुण्यतिथीचा दिवस ठरविला. हिला 'कण्याची पंचमी' असें म्हणतात.

तुकोबांचे कनिष्ठ बंधु कान्होबा यांनीं तुकोबांच्या मृत्यूनंतर जो शोक केला त्याचे ३६ अभंग असून ते अत्यंत हृदयद्रावक आहेत.

तुकोबांस महादेव आणि विठोबा हे दोन पुत्र पूर्वींच झालेले होते. तुकोबांचे मृत्युकालीं जिजाई गर्भवती होती. ती यथाकाल प्रसूत होऊन तिला तिसरा पुत्र झाला त्याचें नांव नारायण. हे नारायणबुवा वडिलांसारखेच विरक्त आणि भगवद्भक्त होते. छत्रपति शिवाजीमहाराजांनीं त्यांची भेट घेऊन त्यांना चार गांव इनाम दिले व नंतर त्यांनीं देहू येथील विठोबाच्या देवालयाचें शिखर बांधलें असें महीपति सांगतात. पुढें नारायणबोवांनीं आपलें घर ब्राह्मणांकडून लुटविलें व स्वतः तीर्थयात्रेस निघून गेले. महादेव व विठोबा हे दोघेही वडील बंधु त्यांच्या आज्ञेंत असत.

## तुकोबांचे टाळकारी व शिष्य

१ रामेश्वरभट्ट वाघोलीकर
२ गंगाधर मवाळ
३ कोंडभट लोहकरे
४ संताजी जगनाडे
५ नावजी माळी
६ शिवजी कासार
७ आबाजी जोशी लोहगांवकर
८ कोंड पाटील लोहगांवकर
९ महादाजीपंत कुळकर्णी, देहू
१० गवरशेट वाणी, सुदुंब्रेकर
११ कान्होबा ( तुकोबांचे बंधु )
१२ मालजी गोडे येलवाडीकर ( जामात )
१३ मल्हारपंत कुळकर्णी चिखलीकर
१४ व्या टाळकऱ्याचें नांव सांपडत नाहीं.

याशिवाय बहिणाबाई नामक ब्राह्मण स्त्री तुकोबांची शिष्या होती. निळोबा, महीपति व कचेश्वर हेही स्वतःला तुकोबांचे शिष्य म्हणवितात व स्वप्नांत त्यांचा आपणास अनुग्रह झाला असें सांगतात.

## तुकोबांची कविता

तुकोबांस कवित्वस्फूर्ति झाल्यापासून त्यांच्या निर्याणापर्यंत त्यांनीं एकंदर किती कविता रचिली हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. त्यांची सर्व कविता त्यांच्या वंशजांच्या संग्रहीं असती तर त्यांच्या कवितेची नक्की संख्या समजली असती, परंतु त्यांच्या वंशजांच्या संग्रहीं त्यांची फारच थोडी कविता आहे. सांप्रदायी गाथ्यांत त्यांचे सुमारें ४५०० अभंग छापलेले आढळतात व कै. तुकाराम तात्या यांनीं प्रसिद्ध केलेल्या गाथ्यांत सुमारें ८५०० अभंग आहेत. तुकोबांची कविता म्हणजे दासबोधासारखा एखादा सलग ग्रंथ नसल्यामुळें ती सगळी एकत्र सांपडणें शक्य नाहीं. तुकोबांनीं आपल्या हयातींत कमींत कमी १०,००० तरी अभंग लिहिले असले पाहिजेत; परंतु ते रानोमाळ विखुरलेले असल्यामुळें, ते एकत्रित करण्याचें काम कठिण आहे. वरील दोन्ही गाथ्यांत ज्यांचा समावेश झालेला नाहीं असे कांहीं अभंग अद्याप जुन्या बाडांत सांपडतात. शिवाय त्यांच्या नांवावर इतरांनीं लिहिलेल्या बनावट अभंगांचा भरणाही बराच मोठा आहे. तुकाराम तात्यांनीं प्रसिद्ध केलेल्या गाथ्यांत असे बनावट अभंग बरेच आहेत व ते तावडतोब ओळखतां येतात. सांप्रदायिक गाथ्यांतही थोडेसे बनावट अभंग आहेत. शिवाय तुका ब्रह्मानंद नामक दुसऱ्या एका कवीचे एकदोन अभंग त्या गाथ्यांत तुकोबांचे म्हणून छापले आहेत. तुकोबांच्या कवितेस मुद्रणाचा पहिला संस्कार कै. माधव चंद्रोबा डुकले यांच्या 'सर्वसंग्रह' मासिकांत झाला. हे अभंग शिळाछापावर छापलेले आहेत. त्यानंतर मुंबई सरकारनें २४,००० रु. खर्च करून, कै. शंकर पांडुरंग पंडित या विद्वान् गृहस्थांकरवीं तुकोबांचा ४५०० अभंगांचा गाथा प्रसिद्ध केला. 'इंदुप्रकाश प्रत' या नांवानें हा गाथा प्रसिद्ध आहे. हल्लीं पुनः मुंबई सरकार या गाथ्याची पुनरावृत्ति प्रसिद्ध करीत आहे. 'तुकारामबुवांची कविता' या नांवाचें विस्तृत प्रकरण मी माझ्या 'तुकारामचरित्र' या मोठ्या ग्रंथांत दिलें असून त्यांत या प्रश्नाचा बारकाईनें विचार केला आहे; त्याचा हवाला देऊन व तुकाराममहाराजांच्या अमर आत्म्यास भक्तिपूर्वक वंदन करून हें त्यांचें संक्षिप्त चरित्र मी येथें संपवितों.

---

# श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगांची गाथा

॥ श्रीविठ्ठल ॥



श्रीविठ्ठलायनमः श्रीपांडुरंगायनमः श्रीरामकृष्णायनमः श्रीतुकारामायनमः श्रीगुरुपरंपरा श्रीराघवचैतन्य श्रीकेशवचैतन्य श्रीबाबाजीचैतन्य श्रीगुरुमंत्र रामकृष्णहरि ॥

१. समचरण दृष्टि विटेवरि साजिरि। तेथें माझी हरि वृत्ति राहो ॥१॥ आणिक नलगे मायिक पदार्थ। तेथें माझें आर्त नको देवा ॥२॥ ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी। तेथें दुश्चित्त झणीं जडो दोशी ॥३॥ तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म। जें जें कर्म धर्म नाशिवंत ॥४॥

२. सुंदर तें ध्यान उभें विटेवरी। कर कटावरी ठेवूनियां ॥१॥ तुळसीहार गळां कासे पीतांबर। आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥२॥ मकर कुंडलें तळपति श्रवणीं। कंठीं कौस्तुभ मणि विराजित ॥३॥ तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख। पाहीन श्रीमुख आवडीनें ॥४॥

॥ बाळक्रीडा प्रारंभः ॥

३. देवा आदि देवा जगत्रया जीवा। पयेंशी केशवा विनंती माझी ॥१॥ माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम। ऐसे देईं प्रेम कांहीं कळा ॥२॥ कळा तुजपाशीं आमुचें जीवन। उचित करोन देईं आम्हां ॥३॥ आम्हां शरणागतां तुम्हाची आधार। तूं तव सागर कृपासिंधु ॥४॥ सिंधु पायवाट होय तुझें नाम। जळतील कर्में दुस्तरें तीं ॥५॥ तें फळ उत्तम तुझा निजध्यास। नाहीं गर्भवास सेवीलीया ॥६॥ सेवीलीया रामकृष्ण नारायण। नाहीं त्या बंधन संसाराचें ॥७॥ संसार तो काय तृणवत माय। अग्नि त्यासी खाये क्षणमात्रें ॥८॥ क्षणमात्रें जाळीं दोषांचीया राशी। निंद्य उत्तमाशी वंद्य करी ॥९॥ करी ब्रीदें साच आपुली आपण। पतितपावन दीनानाथ ॥१०॥ नाथ अनाथांचा पति गोपिकांचा। पुरवी चित्तींचा मनोरथ ॥११॥ चित्तीं जें धरावें तुका म्हणे दासीं। पुरविता होसी मनोरथ ॥१२॥

४. मनोरथ जैसे गोकुळींच्या जना । पुरवावी वासना तयापरी ॥१॥ ऋण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी ॥२॥ शिण झाला वसुदेव-देवकीस । वधी बाळें कंस दुराचारी ॥३॥ दुराचारीयासी नाहीं भूतदया। आपपर तया पाप पुण्य ॥४॥ पुण्यकाळ त्याचा राहीलासे उभा । देवकीच्या गर्भी देव आले ॥५॥ गर्भासी तयाच्या आला नारायण । तुटलें बंधन आपेंआप ॥६॥ आपेंआप बेड्या तूटल्या शृंखला । बंधाच्या अर्गळा कुल्पेंकोडें ॥७॥ कोंडमार केला होता बहू दीस । सोडवी निमिष न लागतां ॥८॥ न कळे तो तया सांगीतला भावो । आपणासी ठावो नंदा घरीं ॥९॥ नंदा घरीं जातां येतां वसुदेवा । नाहीं झाला गोवा सर्वे देव ॥१०॥ सर्वे देव तया आड नये कांहीं। तुका म्हणे नाहीं भय चिंता ॥११॥

५. चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरीं केला देवें ॥१॥ देव आला घरा नंदाचीया गांवा । धन्य त्यांच्या दैवा देव आले ॥२॥ आले अविनाश धरोनी आकार । दैत्यांचा संहार करावया ॥३॥ करावया भक्तजनांचें पाळण । आलें रामकृष्ण गोकुळासी ॥४॥ गोकुळीं आनंद प्रगटलें सूख । निर्भय ते लोक घरोघरीं ॥५॥ घरोघरीं झाला लक्ष्मीचा वास । दैन्यदारिद्रास त्रास आला ॥६॥ आला नारायण तयांच्या अंतरा । दया क्षमा नरनारीलोकां ॥७॥ लोकां गोकुळींच्या झालें ब्रह्मज्ञान । केलीयावांचून जपतप ॥८॥ जपतप काय करावीं साधनें । जेव्हां नारायणें कृपा केली ॥९॥ केलीं नारायणें आपुलीं अंकित । तोचि त्यांचे हित सर्व जाणे ॥१०॥ सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणिक दुसरा नाहीं नाहीं ॥११॥ नाहीं भक्ता दूजें तिहीं त्रिभुवनीं । एका चक्रपाणी वांचूनीयां ॥१२॥ त्यांच्या सुखा सर्वे घेतो गर्भवास । तुका म्हणे आस त्यजोनीयां ॥१३॥

६. त्यांच्या पूर्व पुण्या कोण लखा करा । जिहीं तो मुरारी खेळविला ॥१॥ खेळविला जिहीं अंतर्बाह्यसुखें । मिळवूनि मुखें चुंबवूनी ॥२॥ चुंबवूनी सुख अंतरींचें देवें । जिहीं एका भावें जाणीतला ॥३॥ जाणीतला तिहीं कामातुरा नारी । कृष्ण भोगावरी चित्त ज्यांचें ॥४॥ ज्यांचें कृष्णीं तन मन झालें रत । गृह पति सुत विसरल्या ॥५॥ विष तयां झालें धन मान जन । वसविति वन एकांत त्या ॥६॥ एकांतीं त्या जाती हरीसी घेऊनी। भोगइच्छा धणी फेडावया ॥७॥

वयाच्या संपन्न तैसें त्यां कारणें। अंतरींचा देणें इच्छा भोग ॥८॥ भोग त्याग दोन्ही नाहीं जयापाशीं। तुका म्हणे जैसी स्फटिकशीळा ॥९॥

७. शीळा स्फटिकाची न पालटे भेदें। दावूनीया छंदें जैसी तैसी ॥१॥ जैसा केला तैसा होय क्षणक्षणा। फेडावी वासना भक्तीभावें ॥२॥ फेडावया आला अवघियांचा धणी। गोपाळ गौळणी मायबाप ॥३॥ मायबाप सोडविले बंदीहुनी। चाणूर मर्दूनी कंसादिक ॥४॥ दिक नाहीं देणें अरिमित्रा एक। पूतना कंटक मुक्त केली ॥५॥ मुक्त केला मामा कंस महादोषी। बालहत्या रासी पातकांच्या ॥६॥ पाप कोठें राहे हरि आठवीतां। भक्ति द्वेष चिंता जैशा तैशा ॥७॥ साक्षी तयापाशीं पूर्वील कर्माचा। बांधला सेवेचा ऋणी देव ॥८॥ देव भोळा धावे भक्ता पाठोपाठीं। उच्चारितां कंठीं मागेंमागें ॥९॥ मानाचा कंटाळा तुका म्हणे त्यासी। धांवतो घरासी भावीकांच्या ॥१०॥

८. चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणीती। बांधवी तो हातीं गौळणीच्या ॥१॥ गौळणी त्या गळां बांधिती धारणीं। पायां चक्रपाणी लागे तयां ॥२॥ तयां घरीं रिघे चोरावया लोणी। रितें पाळतूनी शिरे माजी ॥३॥ माजि शिरोनियां नवनीत खाये। कवाड तें आहे जैसे तैसें ॥४॥ जैसा तैसा आहे अंतर्बाह्यात्कारीं। म्हणऊनी चोरीं न सांपडे ॥५॥ न सांपडे तया करिती खटपट। वाउगे बोभाट वर्माविणें ॥६॥ वर्म जाणती त्या एकला एकटा। बैसतील वाटा निरोधोनी ॥७॥ निवांत राहिल्या निःसंग होऊनि। निश्चळ त्या मनीं कृष्णध्यानें ॥८॥ न ये क्षणभरी योगियांचें ध्यानीं। धरिती गौळणी भाविका त्या ॥९॥ भाविका तयांसी येतो काकुळती। शाहाण्या म्हणती न सांपडे ॥१०॥ नलगे वेचावे टोली धनानांवें। तुका म्हणे भावे चाड एका ॥११॥

९. चाड अनन्याची धरी नारायण। आपणा समान करी रंक ॥१॥ रंक होती राजे यमाचिया घरीं। आचरणें बरें नाहीं म्हण ॥२॥ न सांपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां। अभिमान एका तिळमात्रें ॥३॥ तिळमात्र जरी होय अभिमान। मेरू तो समान भार देवा ॥४॥ भार पृथिवीचा वाहीला सकळ। जड होती खळ दुष्ट लोक ॥५॥ दुष्ट अभक्त जे निष्ठूर मानसीं। केली हे तयांसीं यमपूरी ॥६॥ यमदूत त्यांसी करीती यातनां। नाहीं नारायणा भजिले जे ॥७॥ जे नाहीं भजीलें एक्या भावें हरी। तयां दंड करी यमधर्म ॥८॥ यमधर्म म्हणे तया दोषियांसी। कां रे केशवासी

चूकलेती ।।९।। चूकलेती कथा पुराणश्रवण। होते तुम्हां कान डोळे मुख ।।१०।। कान डोळे मुख संतांची संगती। न धराचि चित्तीं सांगीतलें ।।११।। सांगितलें तुम्हां संती उघडूनी। गर्भासी येवोनी यमदंड ।।१२।। दंडों आम्ही रागें म्हणे यमधर्म। देवा होवा श्रम दुर्जनांचा ।।१३।। दुर्जनांचा येणें करोनि संहार। पूर्ण अवतार रामकृष्ण ।।१४।। रामकृष्ण नामीं रंगले जे नर। तुका म्हणे घर वैकुंठीं त्या ।।१५।।

१०. वैकुंठींच्या लोकां दुर्लभ हरिजन। तया नारायण समागमे ।।१।। समागम त्यांचा धरिला अनंतें। जीहीं चित्तवित्त समर्पिलें ।।२।। समर्थ ते गाती हरीचे पवाडे। येर ते बापुडे रावराणे ।।३।। रामकृष्णें केलें कौतुक गोकुळीं। गोपाळांचे मेळीं गाई चारी ।।४।। गाई चारी हरि पावा वाजे पाठीं। धन्य झाली काठी कांबळी ते ।।५।। काय गौळियांच्या होत्या पुण्यराशी। आणिक त्या म्हैशी गाई पशू ।।६।। सुख तें आमूप लुटीलें सकळीं। गोपिका गोपाळीं धनीवरि ।।७।। धनीवरि त्यांनीं सांगीतली मात। ज्याचें जैसें आर्त तयापरी ।।८।। परी त्याचें तुम्ही आईका नवल। दुर्गम जो खोल साधनासी ।।९।। शिक लाऊनीयां घालिती बाहेरी। पाहाती भितरीं सर्वेचि तो ।।१०।। तोंडाकडे पाहे त्यांच्या कवतुकें। शिव्या देतां सुखें हांसतसे ।।११।। हांसतसे शिव्या देतां त्या गौळणी। मरतां जपध्यानीं न बोले तो ।।१२।। तो जें जें करील तें दिसे उत्तम। तुका म्हणे वर्म दावी सोपें ।।१३।।

११. वर्म दावी सोपें भाविकां गोपाळां। वाहे त्यांच्या गळां पाले माळा ।।१।। मान देती आधीं मागतील डाव। देवा तें गौरव मानी सूख ।।२।। मानीताति मंत्र हमामा हुंबरी। सिंतोडिति वरी स्नान तेणें ।।३।। वस्त्रें घोंगडिया घालोनियां तळीं ।। वरि वनमाळी बैसवीती ।।४।। तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना। तो धांवे गोधना वळवाया ।।५।। त्यांच्या वचनांचीं पुष्पें वाहे शिरीं। नैवेद्य त्या करीं कवळ मागे ।।६।। त्याचिया मुखींचें हिरोनिया घ्यावें। उच्छिष्ट तें खावें धणीवरी ।।७।। वरि माथा गुंफे मोरपिसां वेष्टी। नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ।।८।। छंदें नाचतील जया सवें हरि। देह भावावरी विसरल्या ।।९।। विसरल्या वरि देहाची भावना। हेचि नारायणा सर्व पूजा ।।१०।। पूजा भाविकाची न कळतां घ्यावी। न मागतां द्यावी निज ठाव ।।११।। ठाव पहावया हिंडे मागेंमागें। तुका म्हणे संगें भक्तांचीया ।।१२।।

१२. भक्तजना दिल्हे निजसुख देवें। गोपिका त्या भावें आळंगिल्या ॥१॥ आळंगिल्या गोपी गुणवंता नारी। त्यांच्या जन्मांतरी हरि ऋणी ॥२॥ रुसलीया त्यांचें करी समाधान। करविता आपण क्रिया करी ॥३॥ क्रिया करी तुम्हा न वजे प्राद्धन। अवघिया जणी गोपिकांसी ॥४॥ गोपिकांसि म्हणे वैकुंठींचा पति। तुम्ही माझे चित्तीं सर्वभावें ॥५॥ भाव जैसा तुम्ही माझे ठाईं धरा। तैसाचि मी खरा तुम्हां लागीं ॥६॥ तुम्हांसि कळो द्या माझा साच भाव। तुमचाचि जीव तुम्हा गोही ॥७॥ गोही तुम्हा आम्हा असे नारायण। आपुलीच आण वाहतसे ॥८॥ सत्य बोले देव भक्तिभाव जैसा। अनुभव सरिसा आणूनीया ॥९॥ आणि बुझावीतो वेगळाले भावें। एकींचें हें ठावें नाहीं एकी ॥१०॥ येक क्रिया नाहीं अवघियांचा भाव। पृथक हा देव देतो तैसा ॥११॥ तैसा कळों नेदी जो मी कोठें नाहीं। अवघियांचे ठाईं जैसा तैसा ॥१२॥ जैसा मनोरथ जया चित्तीं काम। तैसा मेघश्याम पुरवीतो ॥१३॥ पुरविले मनोरथ गोपिकांचे। आणिक लोकांचे गोकुळींच्या ॥१४॥ गोकुळींच्या लोकां लावियेले छंद। बैसला गोविंद त्यांचे चित्तीं ॥१५॥ चित्तें चोरोनियां घेतलीं सकळ। आवडी गोपाळावरि तया ॥१६॥ तयांसि आवडे वैकुंठनायक। गेली सकळीक विसरोनि ॥१७॥ निंदा स्तुति कोणी न करी कोणाची। नाहीं या देहाची शुद्धि कोणा ॥१८॥ कोणासि नाठवे कन्या पुत्र माया। देव म्हणोनिया चुंबन देती ॥१९॥ देती त्या टाकोनी भ्रतारासि घरीं। लाज ते अंतरीं आसेचना ॥२०॥ नाहीं धाक कोणा कोणासी कोणाचा। तुका म्हणे वाचा काया मनें ॥२१॥

१३. मनें हरिरूपीं गुंतल्या वासना। उदास त्या सुना गौळीयांच्या ॥१॥ त्यांचे भ्रतारांची धरोनियां रूपें। त्यांचे घरीं त्यांपें भोग करीं ॥२॥ करी कवतूक त्यांचें तयापरी। एका दीसें हरि येका लेक ॥३॥ एक नाहीं भाव सकळांचे चित्तीं। म्हणऊनि प्रीति तैसें रूप ॥४॥ रूप याचें आहे अवघेंचि एक। परि कवतुक दाखविलें ॥५॥ लेंकरूं न कळे स्थूळ कीं लहान। खेळे नारायण कवतुकें ॥६॥ कवतुकें केलें सोंग बहुरूप। तुका म्हणे बाप जगाचा हा ॥७॥

१४. जगाचा हा बाप दाखविलें माये। माती खातां जाये मारावया ॥१॥ मारावया तीनें उगारीली काठी। भुवनें त्या पोटीं चवदा देखे ॥२॥ देखे भयानक झांकीयेले डोळे। मागुता तो खेळे तीयेपुढें ॥३॥ पुढें रिघोनियां गळां घाली कव। वळो

नेदी भाव मायावंत ॥४॥ मायावंत हरिरूप काय जाणे। माझें माझें म्हणे देवा बाळ ॥५॥ बाळपणीं रीठा रगडीला दाढे। मारीयेले गाढे काग बग ॥६॥ गळा बांधोनिया उखळासि दावें। उन्मळी त्याभावें विमळार्जुन ॥७॥ न कळे जुनाट जगाचें जीवन। घातलें मोहन गौळीयांसी ॥८॥ शिंकीं उतरोनी खाये नवनीत। न कळे बहुत होय तरी ॥९॥ दहीं दूध डेरे भरीले रांजण। खाय ते भरून दावी दुणी ॥१०॥ दुणी झालियाचा मानीती संतोष। दुभत्याची आस धरोनीयां ॥११॥ आशाबद्धा देव असोनी जवळीं। नेणती त्या काळीं स्वार्थामुळें ॥१२॥ मूळ यांचा देव न कळे तयांसी। चित्त आशापाशीं गोवीयेले ॥१३॥ लेंकरूं आमूचें म्हणे दसवंती। नंदाचिया चित्तीं तोची भाव ॥१४॥ भाव दावाव्या चारित्र दाखवी। घुसळीतां रवी डेरीयांत ॥१५॥ डेरीयांत लोणी खादले रिघोनी। पाहे तों जननी हातीं लागे ॥१६॥ हातीं धरोनियां काढिला बाहेरी। देखोनियां करी चोज त्यासी ॥१७॥ शिकवी विचार नेणे त्याची गति। होता कोणे रीति डेरियांत ॥१८॥ यांसी पुत्रलोभे न कळे हा भाव। कळों नेदी माव देव त्यांसी ॥१९॥ त्यांसी मायामोहजाळ घाली फांसा। देव आपणसा कळों नेदीं ॥२०॥ नेदी भाव राहो लोभिकांचे चित्तीं। जाणतांचि होती आंधळे ते ॥२१॥ आंधळे ते तुका म्हणे संवसारी। जिहीं नाहीं हरी ओळखिला ॥२२॥

१५. वोळखि तयाची होय एक्या भावें। दुसरीया देवें न पविजे ॥१॥ न पविजे कदा उन्मत्त झालीया। दंभ तोचि वायां नागवण ॥२॥ वनवास देवा कारणें एकांत। करावीं हें व्रत तपें याग ॥३॥ व्रतें याग यांसीं फळलीं बहूतें। होतीं या संचितें गौळियांचीं ॥४॥ यांसी दैवें तारियेलें न कळतां। मागील अनंता ठावें होतें ॥५॥ होतें तें द्यावया आला नारायण। मायबापां ऋण गौळियांचे ॥६॥ गौळियांचें सुख दुर्लभ आणिकां। नाहीं ब्रम्हांदिकां तुका म्हणे ॥७॥

१६. नेणतीयासाठीं नेणता लहान। थिंकोनी भोजन मागे माये ॥१॥ माया दोन्ही यासी बाप नारायण। सारीखी भावना तयांवरी ॥२॥ तयांवरी त्यांचा समचित्त भाव। देवकीवसुदेव नंद दोघे ॥३॥ घेवोनियां येके ठाईं अवतार। येकीं केला थोर वाढवूनी ॥४॥ उणा पुरा यासी नाहीं कोणा ठाव। सारीखाचि देव अवघीयांसी ॥५॥ यासी दोनी ठाव सारिखे अनंता। आदील मागुता वाढला तो ॥६॥ वाढला तो सेवाभक्तीचीया गुणें। उपचारमिष्टान्नें करोनियां ॥७॥ करोनियां सायासें

मेळवीलें धन । तेंहि कृष्णार्पण केलें तींहीं ॥८॥ कृष्णाशी सकळ गाई घोडे म्हैशी । समर्पिल्या दासी जीवें भावें ॥९॥ जीवें भावें त्याची करितील सेवा । न विसंबति नांवा क्षणभरी ॥१०॥ क्षणभरी होतां वेगळा तयांसी । होती कासाविसी प्राण त्यांचे ॥११॥ त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरि । देह काम करी चित्त त्यापें ॥१२॥ त्याचेंचि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेवीला नाहीं कृष्ण ॥१३॥ कृष्ण आला घरा कृष्ण गेला दारा । कृष्ण हा सोयरा भेटे कृष्ण ॥१४॥ कृष्ण गाती ओव्या दळणीं कांडणीं । कृष्ण हा भोजनीं पाचारीती ॥१५॥ कृष्ण तया ध्यानीं आसनीं शयनीं । देखती त्या स्वप्नीं कृष्ण रूप ॥१६॥ कृष्ण त्यांसी दिसे आभास दुश्चित्ता । धन्य माता पिता तुका म्हणे ॥१७॥

१७. कृष्ण हा परिचारी कृष्ण हा वेव्हारी । कृष्ण घ्यावो नारी आणा म्हणे ॥१॥ म्हणे कृष्णावीण तुम्हा कैसें गमे । वेळ हा करमे वायांवीण ॥२॥ वायांविण तुम्ही पिटितां चावटी । घ्या गे जगजेठी क्षणभरी ॥३॥ क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा । पाहा येक वेळा घेऊनियां ॥४॥ याचें सुख तुम्हां कळलीयावरी । मग दारोदारीं न फिराल ॥५॥ लटिकें हें तुम्हां वाटेल खेळण । येका कृष्णाविण अवघेंची ॥६॥ अवघ्याच तुम्ही टाकाल सांगात । घेऊनि अनंत जाल राना ॥७॥ नावडे हें तुम्हां आणिक बोलिलें । मग हें लागलें कृष्णध्यान ॥८॥ न करा हा मग या जीवा वेगळा । टोकवाल बाळा आणिक ही ॥९॥ आणिक ही तुम्हां येती काकुलती । जवळी इच्छिती क्षण बैसो ॥१०॥ बैसों चला पाहों गोपाळाचें मूख येकि येक सूख सांगतील ॥११॥ सांगे जंव ऐसी माता दसवंती । तंव त्या धरीती चित्तीं बाळा ॥१२॥ बाळा येती घरा घेऊनियां जाती । नाहीं त्या परती तुका म्हणे ॥१३॥

१८. तुका म्हणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासीं खेळतां दिवस गमे ॥१॥ दिवस राती कांहीं नाठवे तयासी । पाहतां मुखासी कृष्णाचिया ॥२॥ याच्या मुखें नये डोळियांसी वीट । राहिलेंहि नीट तटस्थची ॥३॥ तटस्थ राहिले सकळ शरीर । इंद्रियें व्यापार विसरलीं ४ विसरलीं तान भूक घरदार । नाहीं हा विचार असों कोठें ॥५॥ कोठें असों कोण झाला काळ वेळ । नाठवे सकळ विसरल्या ॥६॥ विसरल्या आम्ही कोणीहि जातिच्या । चहूंही वर्णांच्या एक झाल्या ॥७॥ एकी झाल्या तेव्हां कृष्णाचिया सूखें । निःशंक भातुकें खेळतील ॥८॥ खेळती

भातुकें कृष्णाच्या सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ॥९॥ चित्तीं तो गोविंद लटिकें दळण । करिती हें जन करिती तैसें ॥१०॥ जन करिती तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करोनियां ॥११॥ करोनी आपुला अवघा गोविंद । जनासीच छंद लटिका तो ॥१२॥ त्यांनीं केला हरि सासुर माहेर । बंधु हे कुमर दीर भावें ॥१३॥ भावना राहिली एकाचिया ठाईं । तुका म्हणे पायीं गोविंदाच्या ॥१४॥

१९. गोविंद भ्रतार गोविंद मुऱ्हारी । नामभेद परी एकची तो ॥१॥ एकाचींच नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावें जावें ॥२॥ जावें यावें तीहीं घरींचिया घरीं । तेथेंची शीदोरी तेथें न्यावी ॥३॥ विचारीतां दीसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोकां ऐसें ॥४॥ लोक करोनियां साच वर्तताती । तैशा या खेळती लटिक्याची ॥५॥ लटिकीं करीती मंगळदायकें । लटिकेंचि येक येका व्याही ॥६॥ व्याही भाई हरि सोयरा जावई । अवघियांचा ठाईं केला येक ॥७॥ येकासिच पावे जें कांहीं करिती । उपचार संपत्ति नाना भोग ॥८॥ भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ॥९॥ लटिकाची त्यांनीं केला संवसार । जाणति साचार वेगळा त्या ॥१०॥ त्यांणीं मृत्तिकेचें करोनी अवघे । खेळतील दोघे पुरुषनारी ॥११॥ पुरुषनारी त्यांनीं ठेवियेलीं नांवें । कवतुक भावें वीचरती ॥१२॥ विचरति जैसें साच भावें लोक । तैसे नाहीं सुख खेळती त्या ॥१३॥ त्यांनीं जाणीतलें आपआपणीयां । लटिकें हें वायां खेळतों ते ॥१४॥ खेळतों ते आम्ही नव्हों नारीनर । म्हणोनी विकार नाहीं तया ॥१५॥ तया ठावें आहे आम्ही अवघे येक । म्हणोनी निःशंक खेळ-तील ॥१६॥ तया ठावें नाहीं हरिचिया गुणें । आम्ही कोण कोण काय खेळों ॥१७॥ काय खातों आम्ही कासया सांगातें । कैसें हें लागतें नेणों मुखीं ॥१८॥ मुखीं चवी नाहीं तंवरीं अंगीं लाज । वर्णयाती काज न धरीती ॥१९॥ न धरीती कांहीं संकोच त्या मना । हांसता या जना नायीकती ॥२०॥ नायिकती बोल आणिकांचे कानीं । हरि ध्यानीं मनीं बैसलासे ॥२१॥ बैसलासे हरि जयांचिये चित्तीं । तयां नावडती मायबापें ॥२२॥ मायबापें त्यांचि नेति पाचारूनी । बळें परि मनीं हरि वसे ॥२३॥ वसतिल बाळा आपुलाल्या घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ॥२४॥ गोविंदाचें ध्यान निजलिया जाग्या । आणिक वावुग्या न बोलति ॥२५॥ न बोलति नीजलिया हरिविण । जागृति स्वपन एक झालें ॥२६॥

एकविध सुख घेतील त्या बाळा । भ्रमर परिमळालागीं जैसा ॥२७॥ तैसा त्यांचा भाव घेतला त्यापरी । तुका म्हणे हरि बाळलीला ॥२८॥

२०. लीळाविग्रही तो लेववी खावावी । यशोदा बैसवी मांडीवरी ॥१॥ मांडिवरि भार पुष्पाचीया परी । बैसोनियां करी स्तनपान ॥२॥ नभाचाहि साक्षी पाताळापरता । कुर्वाळित माता हातें त्यासीं ॥ ३॥ हातें कुर्वाळोनी मुखीं घाली ग्रास । पुरे म्हणे तीस पोट धालें ॥४॥ पोट धालें मग देतसे ढेंकर । भक्तीचें तें फार तुळसीदळ ॥५॥ तुळसीदळ भावें सहित देवा पाणी । फार तें त्याहूनी क्षीरसिंधु ॥६॥ क्षीराचा कंटाळा असे येक वेळा । भक्तीचें तें जळ गोड देवा ॥७॥ देवा भक्त जीवाहूनी आवडती । सकळहि प्रीति त्यांचे ठाईं ॥८॥ त्यांचा हा अंकित सर्व भावें हरी । तुका म्हणे करी सर्व काज ॥९॥

२१. जियेवेळीं नेलीं चोरोनियां वत्सें । तयांलागीं तैसें होणें लागे ॥१॥ लागे दोहीं ठाईं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ॥२॥ माय झाला हरी अवघ्या वत्सांची । घरीं वत्सें जींचीं तैसा झाला ॥३॥ झाला जैसा तैसा घरींचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पांवे ॥४॥ मोहरी पांवे सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहळा ब्रह्मादीकीं ॥५॥ ब्रह्मादिकां सुख स्वप्नीं तेंहि नाहीं । तैसें दोहीं ठाईं वोसंडलें ॥६॥ वोसंडल्या क्षीर अमूप त्या गाई । जैसी ज्याची आई तैसा झाला ॥७॥ लाघव कळलें ब्रह्मादिकां याचें । परब्रह्म साचें अवतरलें ॥८॥ तरले हे जन सकळहि आतां । ऐसा तो विधाता बोलियेला ॥९॥ लागला हे स्तुति करूं अनंताची । चतुर्मुखें वाची भक्तीस्तोत्रें ॥१०॥ भक्तकाजा देवें केला अवतार । पृथिवीचा भार फेडावया ॥११॥ पृथिवी दाटली होती या असुरीं । न साहवे वरी भार तये ॥१२॥ तया काकुळती आपुल्या दासांची । तयालागीं वेंची सर्वस्वही ॥१३॥ स्वहित दासांचें करावयालागीं । अव्यक्त हें जगीं व्यक्त आलें ॥१४॥ लेखा कोण करी त्यांचिया पुण्याचा । जयां सवें वाचा बोले हरि ॥१५॥ हरी नाममात्रें पातकांची राशी । तो आला घरासी गौळियांच्या ॥१६॥ गौळियें अवघीं झालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ॥१७॥ तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहूत ज्यांपासीं होईल पाप ॥१८॥ पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तोचि पाहे कृष्णमूख ॥१९॥ मुख माझें काय जो

मी वर्णू पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ॥२०॥ ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासी हाची देव ॥२१॥ देवाचि अवघा झालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्स तेथें ॥२२॥ तेथें जें पाहणें आणिक दूसरें । मूर्ख त्या नंतरें दुजें नाहीं ॥२३॥ दुजाभाव तुका म्हणे जया चित्तीं । रवरव भोगति कुंभपाक ॥२४॥

२२. कुंभपाक लागे तयासि भोगणें । अवघाचि नेणें देव एसा ॥१॥ देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासि यातना यम करी ॥२॥ कळला हा देव तयासिच खरा। गाइ वत्सें घरां धाडी ब्रह्मा ॥३॥ ब्रह्मांदिकां देव ऐसा अगोचर। कैसा त्याचा पार जाणवेल ॥४॥ जाणवेल देव गौळीयांच्या भावें । तुका म्हणे व्हावें संचित हें ॥५॥

२३. संचित उत्तम भूमी कसुनियां । जाऊं नेदी वायां परी त्यांचें ॥१॥ त्यांचिया पिकासी आलिया घुमरी । आल्या गाईवरी आणिक गाई ॥२॥ गाई दवडूनियां घालिती बाहेरी । तंव म्हणे हरि बांधा त्याही ॥३॥ त्याहि तुम्ही बांधा तुमच्या सारिख्या । भोवंडा पारिख्या वाड्यांतूनी ॥४॥ पारिख्या न येती कोणाचिया घरा । सूत्रधारी खरा नारायण ॥५॥ नारायण नांदे जयाचिये ठाईं । सहज तेथें नाहीं घालमेली ॥६॥ मेलीं हीं शाहाणीं करितां सायास । नाहीं सुख लेश तुका म्हणे ॥७॥

२४. तुका म्हणे सुख घेतलें गोपाळीं । नाचति कांबळी करुनि ध्वजा ॥१॥ करोनियां टीरी आपुले मांदळ । वाजविती टाळ दगडांचे ॥२॥ दगडांचे टाळ कोण त्यांचा नाद । गीतीं गातां छंद ताल नाहीं ॥३॥ ताल नाहीं गातां नाचतां गोपाळां । घननीळ सांवळा तयांमध्यें ॥४॥ जयांमध्यें हरि तें सुख आगळें । देहभाव काळ नाहीं तयां ॥५॥ तयांसि आळंगी आपुलिया करीं । जाती भूमीवरी लोटांगणीं ॥६॥ निजभाव देखे जयांचिये अंगीं । तुका म्हणे संगीं क्रीडे तया ॥७॥

२५. तयांसवें करी काला दहींभात। शिदोऱ्या अनंत मेळवूनि ॥१॥ मेळवूनि अवघियांचे येके ठाई । मागें पुढें कांहीं उरों नेदी ॥२॥ नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें आपुलेंहि साचें द्यावें तेथें ॥३॥ द्यावा दहींभात आपुल्या

प्रकारें । तयाचा वेव्हार सांडवावा ॥४॥ वांटी सकळांसी हातें आपुलीया । जैसें मागे तया तैसें द्यावें ॥५॥ द्यावें सांभाळोनी सम तुकभावें । आपणहि खावें त्यांचे तुकें ॥६॥ तुकें सकळांचीं गोविंदाचे हातीं । कोण कोण गति भलाबुरा ॥७॥ राखे त्यास तैसा आपुलाल्या भावें । विचारोनि द्यावें जैसें तैसें ॥८॥ तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिल्हें भाविकां गोपाळांसी ॥९॥ गोपाळांच्या मुखीं देवूनी कवळा । घास माखे लाळ खाये त्यांची ॥१०॥ त्यांचीया मुखींचा हिरोनियां घास । झोंबतां हातास खाये बळें ॥११॥ बळें जयाचींया ठेंगणें सकळ । तयातें गोपाळ पाडीताती ॥१२॥ पाठीं उचलोनी वाहातील खांदीं । नाचतील मांदी मेळवूनि ॥१३॥ मांदी मेळवूनि धणी दिली आम्हां । तुका म्हणे जमा केल्या गाई ॥१४॥

२६. केला पुढें हरी अस्तमान दिसे । मागें त्यासरिसे थाट चाले ॥१॥ थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्ण राम तयां सोई ॥२॥ सोई लागलीया देवाची आवृत्ती । बोलावितां येती मागें तया ॥३॥ तयांचिये चित्तीं बैसला अनंत । घेती नित्यानित्य तेंचि सुख ॥४॥ सुख नाहीं कोणा हरीच्या वियोगें । तुका म्हणे जुगें घडी जाय ॥५॥

२७. जाय फाकोनीयां दवडोनि गाई । आपुलाले सोई घराचिये ॥१॥ घराचीये सोई अंतरला देव । गोपाळाचा जीव गोविंदापें ॥२॥ गोविंदें वेधीलें तुका म्हणे मन । वियोगहि ध्यान संयोगाचें ॥३॥

२८. संयोग सकळा असे सर्व काळ । दुश्चित गोपाळ आला दिसे ॥१॥ गोपाळ गुणाचा म्हणे गुणमये । निंबलोण माये उतरीलें ॥२॥ उतरोनि हातीं धरिला हनुवटी । ओवाळोनि दिठी सांडीयेली ॥३॥ दिठी घाली माता विश्वाच्या जनका । भक्तिचीया सुखा गोडावला ॥४॥ लहान हा थोर जीवजंतुभूतें आपण दैवतें झाला देवी ॥५॥ देवी म्हैसासुर मुंजिया खेचर । लहान हा थोर देव हरि ॥६॥ हरी तुका म्हणे अवघा येकला । परि हा धाकला भक्तिसाठीं ॥७॥

२९. भक्तिसाठीं करी येशोदेसि आळी । थिंकोनियां चोळी डोळे देव ॥१॥ देवें गिळूनीयां धरिलें मोहन । माय म्हणे कोण येथें दुजा ॥२॥ दुजें येथें कोणी

नाहीं कृष्णाविण । निरुतें जाणोन पुसे देवा ॥३॥ देवापासीं पुसे देव काय झाला । हांसें आलें बोला याचे हरि ॥४॥ याचे मी जवळी देव तो नेणती । लटिकें मानिती साच खरें ॥५॥ लटिकें तें साच साच तें लटिकें । नेणति लोभिके आशाबद्ध ॥६॥ सांग म्हणे माये येरु वासी तोंड । तव तें ब्रम्हांड देखे माजि ॥७॥ जयामाजी चंद्र सूर्य तारांगणें । तो भक्तांकारणें बाळ-लीळा ॥८॥ लीळा कोण जाणे याचें महिमान । जगाचें जीवन देवा देव ॥९॥ देवें कवतुक दाखविलें तयां । लागतील पायां मायबाप ॥१०॥ मायबाप म्हणे हाचि देव खरा । आणिक पसारा लटिका तो ॥११॥ तोहि त्याचा देव दिला नारायणें । माझें हे करणें तोहि मीच ॥१२॥ मीच म्हणोनियां जेथें जें जें ध्याती । तेथें मी श्रीपति भोगिता तें ॥१३॥ तें मज वेगळें मी तया निराळा । नाहीं या सकळा ब्रह्मांडांत ॥१४॥ तद्भावना इच्छा जैसा भाव त्याचें । फळ देता साचें मीचि येक ॥१५॥ मीचि येक खग बोले नारायण । दावीलें निर्वाण निजदासां ॥१६॥ निजदासां खूण दाविली नीरुति । तुका म्हणे भूतीं नारायण ॥१७॥

३०. नारायण भूतीं न कळे जयासी । तया गर्भवासीं येणें जाणें ॥१॥ येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें । न कळतां खरें देव ऐसा ॥२॥ देव ऐसा जया कळला सकळ । गेली तळमळ देहबुद्धि ॥३॥ बुद्धीचा पालट नव्हे कदा काळीं । हरि जळीं स्थळीं जया चित्तीं ॥४॥ चित्त तें निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजी ॥५॥ तयामाजी हरि जाणिजे त्या भावें । आपुलें परावें सारिखेंचि ॥६॥ चिंतनें जयाच्या तरती आणिक । जो हें सकळीक देव देखे ॥७॥ देव देखे तोहि देव कैसा नव्हे । उरला संदेह काय त्यासी ॥८॥ काया वाचा मनें पुजावे वैष्णव । मनीं शुद्ध भाव धरोनियां ॥९॥ तयांसि कवतूक दाखविलें रानीं । वोणवा गिळोनी गोपाळांसी ॥१०॥ गोपाळांचे डोळे झांक-विले हातें । धरिलें अनंतें विश्वरूप ॥११॥ पसरोनि मुख गिळियेली ज्वाळ । पाहती गोपाळ बोटां सांदी ॥१२॥ सांदी सारोनीयां पाहिलें अनंता । म्हणति ते आतां कळलासी ॥१३॥ कळला हा तुझा देह नव्हे देवा । गिळिला वोणवा आणिक तो ॥१४॥ तो तयां कळला आरुष गोपाळां । दुर्गम सकळां साध-

नांसी ॥१५॥ तुका म्हणे शिण उरे साधनाचा । भाविकासि साचा भाव दावी ॥१६॥

३१. भाव दावी शुद्ध देखोनियां चित्ता । आपुल्या अंकिता निजदासा ॥१॥ सांगे गोपाळांसि काय पुण्य होतें । वांचलों जळतां अग्निहातीं ॥२॥ आजी आम्हां येथें वांचविलें देवें । नाहींतरि जीवें न वांचतों ॥३॥ न वांचत्या गाई जळतों सकळें । पूर्वपुण्यबळें वांचविलें ॥४॥ पूर्वपुण्य होतें तुमचीया गांठीं । बोले जगजेठी गोपाळांसी ॥५॥ गोपाळांसि म्हणे वैकुंठनायक । भले तुम्ही एक पुण्यवंत ॥६॥ करि तुका म्हणे करवी आपण । द्यावें थोरपण सेवकांसी ॥७॥

३२. काय आम्हां चाळविसि वायांवीण । म्हणति दुरून देखिलासि ॥१॥ लावोनियां डोळे नव्हतों दुश्चित्त । तुज परिचित्त भाव होती ॥२॥ होती दृष्टि आंत उघडि आमुची । बाहेरी ते वाची कुंची झांकू ॥३॥ झालासी थोरला थोरल्या तोंडाचा । गिळियेली वाचा धूर आगीं ॥४॥ अग्नि खातो ऐसा आमुचा सांगाती । आनंदें नाचती भोंवतालीं ॥५॥ भोंवतीं आपणा मेळविलें देवें । तुका म्हणे ठावें नाहीं ज्ञान ॥६॥

३३. नाहीं त्याची शंका वैकुंठनायका । नेणती ते येकावीण दुजे ॥१॥ जाणतीयां सवें येवों नेदी हरि । तर्कवादी दूरी दुराविले ॥२॥ वादी-यांसी भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दूराविले ॥३॥ दुराविले दूर आशाबद्ध देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥४॥ चित्तीं द्रव्य दारा पुत्रादि संपत्ती । समान ते होती पशु नर ॥५॥ नरक साधिला विसरोनि देवा । बुडाले ते भवनदीमाजी ॥६॥ जिहीं हरीसंग केला संवसारीं । तुका म्हणे खरी त्यांची खेप ॥७॥

३४. खेळिमेळि आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ॥१॥ मातेपाशीं एक नवल सांगती । झाली तैसि ख्याती वोणव्याची ॥२॥ वोवाळीलें तीणें करोनी आरती । पुसे दसवंती गोपाळांसी ॥३॥ पुसे पडताळुनी मागुती मागुती । गोपाळ सांगती कवतुक ॥४॥ कवतुक कानीं आइकतां त्यांचें ।

बोलतां ये वाचे वीट नये ।।५।। नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ।।६।। तेव्हां कवतुक कळों आलें कांहीं। हळहळ दोहीं मायबापां ।।७।। हळहळ त्यांचें पुण्य झालें वाड । वारलें हें झाड तिमिराचें ।।८।। तिमिर हें तेथें राहों शके कैसें। झालीया प्रकाशें गोविंदाच्या ।।९।। दावी तुका म्हणे देव ज्या आपणा । पालट त्या क्षणामाजी येका ।।१०।।

३५. काय आतां यासी म्हणावें लेंकरूं । जगाचा हा गुरू मायबाप ।।१।। माया याची यासी राहिली लपोन। कळों नये क्षण एक होतां ।।२।। क्षण येक होतां विसरली त्यासी। माझें माझें ऐसें करी बाळा ।।३।। करोनी कवतुक कळों नेदी कोणा । योजोनी कारणा तोचि खेळे ।।४।। तें सुख लुटीलें घरींचीया घरीं । तुका म्हणे परी आपुल्याला ।।५।।

३६. आपुलालेपरी करीतील सेवा । गीत गाती देवा खेळवूनी ।।१।। खेळ मांडियेला यमुनेपाबळीं । यारे चेंडूफळी खेळूं आतां ।।२।। आणविल्या डांगा चौगुणा काठी । बैसूनिया वांटी गडिया गडी ।।३।। गडी जंव पाहे आपणा समान । नाहीं नारायण म्हणे दुजा ।।४।। जाणोनी गोविंदें सकळांचा भाव । तयासी उपाव तोचि सांगे ।।५।। सांगे सकळांसी व्हा रे एके ठाई । चेंडू राखा भाई तुम्ही माझा ।।६।। मज हा नलगे आणिक सांगाती । राखावी बहुतीं हाक माझी ।।७।। माझे हाके हाक मेळवा सकळ । न वजा बरळ येकायेक ।।८।। येका समतुके अवघेचि राहा । जाईल तो पाहा धरा चेंडू ।।९।। चेंडू धरा ऐसें सांगतो सकळां ! आपण निराळा येकलाची ।।१०।। चिंतूनियां चेंडू हाणी ऊर्ध्वमूखें । ठेलीं सकळिक पाहातची ।।११ । पाहातचि ठेले न चलतां कांहीं । मेरु लवलाहीं म्हणे धरा ।।१२।। धरावा तयानें त्याचें बळ त्यासी । येरा आणिकासी लाग नव्हे ।।१३।। नव्हे बळ बुद्धि काम नव्हे त्यांचें । न धरवे नीचे उंचावीण ।।१४।। विचारी पडीले देखोनि गोपाळ । या म्हणे सकळ माझे मागें ।।१५।। मार्ग देवावीण न दिसे आणिका । चतुर होत कां बहुत जन ।।१६।। चतुर चिंतीती बहुत मारग । हरि जाय माग पाहोनियां ।।१७।। त्या मागें आले गोविंद गोपाळ। ते नेले सीतळ पंथ ठाया ।।१८।। पंथ ते चूकले आपुले मतीचे । तयांमागें त्यांचे तेचि हाल ।।१९।। हाल दोघां येका मोहरे

मागीलां । चालतां चुकला वाट पंथ ॥२०॥ पंथ पुढल्यासी चालतां न कळे । मागील्यांनीं डोळे उघडावे ॥२१॥ वयाच्या प्रबोधें विचार ज्या नाहीं । समान तो देहीं बाळकासी ॥२२॥ सिकविलें हित नायीके जो कानीं । त्यामागें भल्यांनीं जाऊं नये ॥२३॥ नये तेंचि करी श्रेष्ठाचीया मना । मूर्ख येक जाणा तोची खरा ॥२४॥ रानभरी झाले न कळे मारग । मग तो श्रीरंग आठवीला ॥२५॥ लाज सांडोनियां मारितील हांका । कळलें नायका वैकुंठीच्या ॥ ॥२६॥ चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणीति । तया अति प्रीति गोपाळांची ॥ ॥२७॥ गोपाळांचा धांवा आयकीला कानीं । सोयी चक्रपाणी पाववीलें ॥२८॥ सोय धरोनीयां आले हरीपाशीं । लहान थोरांसी सांभाळीलें ॥२९॥ सांभाळिलें तुका म्हणे सकळहि । सुखे झाले तेही हरीमुखें ॥३०॥

३७. मुखें सांगे त्यांसी पैल चेंडू पहा । उदकांत डोहाचिया माथां ॥१॥ माथां कळंबाचे अवघडा ठाईं । दावियेला डोहीं जळामाजी ॥२॥ जळांत पाहाती हडतिये दृष्टी । म्हणे जगजेठी ऐसें नव्हे ॥३॥ नव्हे साच चेंडू छाया दिसे आंत । खरें तेथें चित्त लावा वरी ॥४॥ वरि अवघियांनीं देखियेला डोळां । म्हणति गोपाळा आतां कैसें ॥५॥ कैसें करोनीयां उतरावा खालीं । देखोनियां भ्यालीं अवघीं डोहो ॥६॥ डोहो बहु खोल काळीया भीतरी । सरलीं माघारीं अवघीं जणें ॥७॥ जयासी कारण तयासीच ठावें । पुसे त्याच्या भावें त्यास हरि ॥८॥ त्यासि नारायण म्हणे राहा तळीं । चढे वनमाळी झाडावरी ॥९॥ वरि जातां हरि पाहाती सकळ । म्हणती गोपाळ आम्ही नेणों ॥१०॥ नेणों म्हणती हे करितोसि काई । आम्हां तुझी आई देईल शीव्या ॥११॥ आपुलिया कानां ठेवूनीयां हात । सकळीं निमित्त टाळीयेलें ॥१२॥ निमित्ताकारणें रचिलें कारण । गेला नारायण खांदीवरी ॥१३॥ खांदीवरी पाय ठेवियेला देवें । पाडावा त्या भावें चेंडू तळीं ॥१४॥ तळील नेणती तुका म्हणे भाव । अंतरींचें देव कळों नेदी ॥१५॥

३८. नेदी कळों केल्याविण तें कारण । दाखवी आणून अनुभवा ॥१॥ न पूरेसा हात घाली चेंडूकडे । म्हणतील गडे सांभाळावें ॥२॥ सांभाळ करीता

सकळ जीवांचा । गोपाळांसी वाचा म्हणे बरें ॥३॥ बरें विचारोनी करावें कारण । म्हणे नारायण बऱ्या बरें ॥४॥ बरें म्हणोनीयां तयाकडे पाहे । सोडवीला जाये चेंडू तळा ॥५॥ तयासवें उडी घातली अनंतें । गोपाळ रडत येती घरा ॥६॥ येतां त्यांचा लोकीं देखिला कोल्हाळ । सामोरीं सकळ आलीं पुढें॥ ॥७॥ पुसति ते मात तयां गोपाळांसी । हरिदुःखें त्यांसी न बोलवे ॥८॥ न बोलवे हरि बुडालासे मुखें । कुटतील दुःखें ऊर माथे ॥९॥ मायबाप तुका म्हणे न देखती । ऐसें दुःख चित्तीं गोपाळांच्या ॥१०॥

३९. गोपाळां उभडू नावरे दुःखाचा। कुंठित हे वाचा झाली त्यांची ॥१॥ झालें काय ऐसें नकळे कोणासी । म्हणति तुम्हांपासी देव होता ॥२॥ देवासवें दुःख न पावति ऐसें । कांहीं अनारिसें दीसे आजी ॥३॥ आजि दिसे हरि फाकला यापाशीं । म्हणऊनी ऐसी परी झाली ॥ ४ ॥ जाणवील्यावीण कैसें कळे यांसी। शाहणे तयांसी कळों आलें ॥५॥ कळों आलें तीहीं स्फुंद शांत केला। ठाईंचाचि त्याला थोडा होता ॥६॥ होता तो विचार सांगितला जना। गोपाळ शाहाणा होता त्याणे॥७॥ सांगे आतां हरि तुम्हां आम्हां नाहीं। बुडालासे डोहीं यमुनेच्या ॥८॥ यासि अवकाश नव्होचि पुसतां। झालीया अनंता कोण परि ॥९॥ परि त्या दुःखाची काय सांगों आतां। तुका म्हणे माता लोकपाळा ॥१०॥

४०. पाषाण फुटति तें दुःख देखोनी । करितां गौळणी शोक लोकां॥ ॥१॥ काय ऐसें पाप होतें आम्हांपाशीं । बोलति येकासी येक येकां ॥२॥ येकाचीया डोळां अश्रु बाह्यात्कारीं । नाहीं तीं अंतरीं जळतिल ॥३॥ जळतिल येके अंतर्बाह्यात्कारीं । टाकीलीं लेंकूरें कडियेहूनी ॥४॥ निवांताचि येके राहाति निश्चिंत । बाहेर ना आंत जीव त्यांचे ॥५॥ त्यांचे जीवावरी आले त्या सकळां । एका त्या गोपाळावांचूनियां ॥६॥ वांचणें तें खोटें आतां या संसारीं । नव्हे भेटी जरी हरीसवें ॥७॥ सवें घेऊनीयां चालिले गोपाळ। अवघींच बाळ नरनारी ॥८॥ नरनारी नाहीं मनुष्याचें नांव । गोकुळ हें गांव सांडीयेलें॥९॥ सांडीयेलीं अन्नें संपदा सकळ । चित्तीं तो गोपाळ भरूनी जाती॥ ॥१०॥ तीरीं माना घालोनियां उभ्या गाई । तटस्थ त्या डोहीं यमुनेच्या ॥११॥

यमुनेच्या तीरीं झाडें वृक्षवल्ली । दुःखें कोमाइलीं कृष्णाचीया ॥१२॥ यांचें त्यांचें दुःख येक झालें तीरीं । मग शोक करी मायबाप ॥१३॥ मायबाप तुका म्हणे सहोदर । तोंवरीच तीर न पावती ॥१४॥

४१. तीर देखोनियां यमुनेचें जळ । कांठींच कोल्हाळ करीताती ॥१॥ कईवाड नव्हे घालावया उडी । आपणासि ओढी भय मागें ॥२॥ मागें सरे माय पाउलापाऊलीं । आपुलेंचि घाली धाकें आंग ॥३॥ आंग राखोनियां माय खेद करी । अंतरीं हें हरि जाणवलें ॥४॥ जाणवलें मग देवें दिल्ही बूड़ी । तुका म्हणे कुडी भावना हे ॥५॥

४२. भावनेच्या मुळें अंतरला देव । शीरला संदेह भय पोटीं ॥१॥ पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलील्या सरिसें न करवे ॥२॥ न करवे त्याग जीवाचा या नाश । नारायण त्यास अंतरला ॥३॥ अंतरला बहु बोलतां वाउगें । अंतरींच्या त्यागेंवीण गोष्टी ॥४॥ गोष्टी सकळांच्या आयिकील्या देवें । कोण कोणा भावें रडताती ॥५॥ तीं गेलीं घरासी आपुल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक माय ॥६॥ मायबापांची तो ऐसी झाली गति । तुका म्हणे अंतीं कळो आलें ॥७॥

४३. आला त्यांचा भाव देवाचीया मना । अंतरीं कारणांसाठीं होता ॥ ॥१॥ होता भाव त्यांचा पाहोनी निराळा । नव्हता पाताळा गेला आधीं ॥ ॥२॥ आधीं पाठीमोरीं झालीं तीं सकळें । मग या गोपाळें बुडी दिली ॥३॥ दिली हाक त्यानें जाऊनी पाताळा । जागविलें काळा भुजंगासी ॥४॥ भुजंग हा होता निजेला मंदिरीं । निर्भय अंतरीं गर्वनिधी ॥५॥ गर्व हरावया आला नारायण । मीस या करोन चेंडूवाचें ॥६॥ चेंडूवाचे मीसें काळिया नाथावा । तुका म्हणे देवा कारण हें ॥७॥

४४. काळयाचे मागें चेंडू पत्नीपाशीं । तेजपुंजराशी देखियेला ॥१॥ लावण्यपुतळा मुखप्रभाराशी । कोटी रवि शशी उगवला ॥२॥ उगवला खांब कर्दळीचा गाभा । श्रीदें वांकी नभा देखे पायीं ॥३॥ पाहिला सकळ तिणें न्याहाळोनी । कोण या जननी विसरली ॥४॥ विसरू हा तीसी कैसा याचा झाला । जिवाहुनि वाहिला दिसतसे ॥५॥ दिसतसे रूप गोजिरें लहान ।

पाहतां लोचन सुखावले ॥६॥ पाहिलें परतोनी काळा दुष्टाकडे। मग म्हणे कुडें झालें आतां ॥७॥ आतां उठोनीयां खाईल या बाळा। देईल वेल्हाळा माय जीव ॥८॥ जीव याचा कैसा वांचे म्हणे नारी। मोहिली अंतरीं हरिरूपें ॥९॥ रूपें अनंताचीं अनंत अपार। नकळे साचार तुका म्हणे ॥१०॥

४५. म्हणे चेंडू कोणें आणिला या ठायां। आलों पुरवावया कोड त्याचें॥ ॥१॥ त्याचें आयिकोनी निष्ठुर वचन। भयाभीत मन झालें तीचें ॥२॥ तिची चित्तवृत्ती होती देवावरी। आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥३॥ वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयीं। विघ्न आलें कांहीं अम्हांवरी ॥४॥ वरि उदकासी नाहीं अंतपार। अक्षय सागर भरलासे ॥५॥ संचार करोनी कोण्या वाटें आला। ठाईंच देखीला अवचिता ॥६॥ अवचिता नेणों येथें ऊगवला। दिसतो धाकुला बोल मोठे ॥७॥ मोठयानें बोलतो भय नाहीं मनीं। केला ऊठवूनी काळ जागा ॥८॥ जागविलें काळासर्पा तये वेळीं। उठल्या कल्लोळी विषाचीया॥ ॥९॥ यमुनेच्या डोहावरी आला ऊत। काळीया कृतांत घुघुःकारें ॥१०॥ कारणें ज्या येथें आला नारायण। झालें दरुशन दोघांमध्यें ॥११॥ दोघांमध्यें झालें बोल परस्परें। प्रसंग उत्तरें युद्धाचीया ॥१२॥ चिंतावली चित्तीं तोंडें बोले काळ। करीन सकळ ग्रास तुझा ॥१३॥ झाला सावकाश झेप घाली वरी। तंव हाणी हरि मुष्टिघातें ॥१४॥ तेणें काळेयासी दिसे काळ तैसा। हरावया जैसा जीव आला ॥१५॥ आठवलें काळा हाकारिलें गोत। मिळालीं बहूत नागकुळें॥१६॥ कल्हरीं संधानीं वेष्टियेला हरि। अवघा विखारीं व्यापियेला ॥१७॥ यासी तुका म्हणे नाहीं भक्तावीण। गरुडाचे चिंतन केलें मनीं ॥१८॥

४६. निजदास उभा तत्काळ पायापें। स्वामी देखे सर्पें वेष्टियेला ॥१॥ लहानथोर होतीं मिळालीं अपार। त्याच्या धुधुःकारें निवारिलीं ॥२॥ निघतां आपटी धरुनि धायां मधीं। येकातेची वधी माथां पाये ॥३॥ येकीं जीव दिला येतांची त्या धाकें। येतील ती येकें काकुळती ॥४॥ यथेष्ट भक्षिलें पोट धायवरी। तंव म्हणे हरि पुरे आतां ॥५॥ आतां करूं काम आलों जयासाठीं। हरि घाली मीठी काळीयासी॥६॥ त्यासी नाथुनीयां नाकीं दिली दोरी। चेंडू भार शीरीं कळंबाचा ॥७॥ चालविला वरी बैसे नारायण। गरुडा आलिंगून बहूडवीलें॥ ॥८॥ विसरून पडे संवगडे गाई। यमुनेच्या डोहीं लक्ष त्यांचें ॥९॥ त्याच्या

गोष्टि कांठीं बैसानी सांगती । बुडाला दावीती येथें हरि ॥ १० ॥ हरीचें चिंतन करितां आठव । तुका म्हणे देव आला वरी ॥११॥

४७. अवचित त्यांनीं देखीला भुजंग । पळतील मग हाऊं आला ॥१॥ आला घेऊनीयां यमुने बाहेरी । पालवितो हरि गडीयांसी ॥२॥ गडियांसी म्हणे वैकुंठनायक । या रे सकळीक मजपासीं ॥३॥ मजपासीं तुम्हां भय काय करी । जवळीया दुरी जाऊं नका ॥४॥ कानीं आयिकीले गोविंदाचे बोल । म्हणती नवल चला पाहूं ॥५॥ पाहूं आले हरीजवळी सकळ । गोधन गोपाळ आलिंगीले ॥६॥ आल्या गाई वरी घालीतील मान । वोरसिलें स्तन क्षीर लोटे ॥७॥ लोटती सकळ येकावरी येक । होऊनी पृथक कुरवाळीली ॥८॥ कुर्वाळी आनंदें घेतां चारापाणी । तींहीं चक्रपाणी देखीयेला ॥९॥ त्याचपाशीं होता परी केली माव । न कळे संदेह पडालिया ॥१०॥ याति वृक्ष वल्ली होत्या कोमाइल्या । त्यांसि कृष्णें काया दीव्य दीली ॥११॥ दिलें गोविंदें त्या पदा नाहीं नाश । तुका म्हणे आस निरसली ॥१२॥

४८. आस निरसली गोविंदाचे भेटी । संसारा तुटी पुढीलीया ॥१॥ पुढें पाठविले गोविंद गोपाळ । देऊनी चपळ हातीं गुढी ॥२॥ हाका आरोळीया देऊनि नाचती । येकास दाविती हरी आला ॥३॥ अरंधीं पडली होती जया घरीं । संकीर्ण त्या नारी नरलोक ॥४॥ लोकां भूक तान नाहीं निद्रा डोळां । रूप वेळोवेळां आठवीती ॥५॥ अहाकटा मग करीत गेलिया । आधीं ठावा तयां नाहीं कोणी ॥६॥ अधीं चुकी मग घडे आठवण । तुका म्हणे जन परिचयें ॥७॥

४९. जननी ये म्हणे आहा काय झालें । शरीर रक्षिलें काय काज ॥१॥ काय काज आतां हरीवीण जीणें । नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥२॥ हें दुःख न सरे हरि न भेटे तों । त्या मार्गेचि जातो येक वेळे ॥३॥ येक वेळां जरी देखतें मी आतां । तरी जीवा परता न करीतें ॥४॥ करितां हे माता हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका म्हणे ॥५॥

५०. शुभ मात तीही आणीली गोपाळीं । चेंडू वनमाळी घेउनिया आला ॥१॥ आली दारा देखे हारुषाची गुढी । सांगीतली पुढी हारुष मात ॥२॥ हारुषली माता केलें निंबलोण । गोपाळा वरून कूरवंडी ॥३॥ गोपाळा

भोवतें मिळालें गोकुळ । अवघीं सकळ लहान थोर ॥ ४ ॥ थोर सुख झालें ते काळीं आनंद । सांगती गोविंद वरी आले ॥ ५ ॥ आले वरी बैसोनियां नारायण । काळीया नाथून वहन केलें ॥ ६ ॥ नगराबाहेरी निघाले आनंदें । लावोनीयां वाद्यें नाना घोषे ॥ ७ ॥ नारायणापुढें गोपाळ चालती । आनंदें नाचती गाती गीत ॥ ८ ॥ तंव देखियेला वैकुंठींचा पती । लोटांगणें घेती सकळही ॥ ९ ॥ सकळहि येका भावें आलिंगीले । अवघियां झाले अवघे हरी ॥ १० ॥ हरि आलिंगूनी हरीरूप झालीं । आप विसरलीं आपणासी ॥ ११ ॥ सकळांसि सुख येक दिलें देवें । मायबाप भावें लोकपाळा ॥ १२ ॥ मायबाप देवा नाहीं लोकपाळ । सारिखीं सकळ तुका म्हणे ॥ १३ ॥

५१. नेणें वर्ण धर्म जीं आलीं सामोरीं । अवघींच हरी आलिंगीलीं ॥ १ ॥ हरि लोकपाळ आले नगरांत । सकळांसहित मायबाप ॥ २ ॥ पारणें तयांचें झालें येक वेळे । देखीलें सांवळें परब्रह्म ॥ ३ ॥ ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढीया उभविती घरोघरीं ॥ ४ ॥ घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंग माळा चौकद्वारीं ॥ ५ ॥ दारीं वृंदावनें तुळसीचीं बनें । रामकृष्ण गाणें नारायण ॥ ६ ॥ नारायण तींहीं पुजीला बहूतीं । नाना पुष्पयाती करोनीयां ॥ ७ ॥ यांचें रीण नाहीं फिटलें मागील । पुढें भांडवल जोडीती हीं ॥ ८ ॥ हीं नव्हतीं कधीं या देवा वेगळीं । केला वनमाळी सेवारूणी ॥ ९ ॥ सेवारुणी तुका म्हणे रूप धरीं । भक्तांचा कैवारी नारायण ॥ १० ॥

५२. नारायण आले निज मंदिरासी । जावें या लोकांसीं बहूडवी ॥ १ ॥ बहूडवी बहू केलें समाधान । विसरूं हा क्षण नको माझा ॥ २ ॥ मात सांगितली सकळ वृत्तांत । केलें दंडवत सकळांनीं ॥ ३ ॥ सकळा भातूकें वांटिल्या साखरा । आपुलाल्या घरा गेले लोक ॥ ४ ॥ लोक गेले कामा गाईपें गोपाळ । वारीले सकळ लोभासाठीं ॥ ५ ॥ लोभ दाऊनियां आपुला विसर । पाडितो कुमर धन आशा ॥ ६ ॥ आशेचे बांधीले तुका म्हणे जन । काय नारायण ऐसें जाणे ॥ ७ ॥

५३. झाला कवतुक करिता रोकडें । आणिकहि पुढें नारायण ॥ १ ॥ येऊनियां पुढें धरिला मारग । हरावया भाग इंद्रयाजीं ॥ २ ॥ इंद्रा दहीं दूध नेतां तूप लोणी । घेतलें हिरोनी वाटे त्याचें ॥ ३ ॥ हिरोनी घेतल्या कावडी सकळ । म्हणती गोपाळ बरें नव्हे ॥ ४ ॥ नव्हे तेंचि करी न भीं काळिकाळा । तुका म्हणे लीळा खेळे देव ॥ ५ ॥

५४. खेळ नव्हे बरा इंद्र कोपलीया । देव म्हणे तयां भीऊं नका ॥१॥ नका धरूं भय धाक कांहीं मनीं । बोले चक्रपाणी गौळीयांसी ॥२॥ गौळीयांसी धीर नाहीं या वचनें । आशंकित मनें वेडावलीं ॥३॥ वेडावलीं त्यांस न कळतां भाव । देवा आधिदेव नोळखती ॥४॥ नोळखतां दुःख वाहतील शिरीं । तुका म्हणे वरी भारवाही ॥५॥

५५. भारवाही नोळखती या अनंता । जवळीच असतां अंगसंगें ॥१॥ अंगसंगें तया न कळे हा देव । कळोनि संदेह मागुताला ॥२॥ मागुति पडति चिंतेचीया डोहीं । जयाचीये नाहीं बुद्धि स्थीर ॥३॥ बुद्धिस्थिर राहों नेदी नारायण । आशाबद्ध जन लोभीकाची ॥४॥ लोभीकां न साहे देवाचें करणें । तुका म्हणे तेणें दुःखि होती ॥५॥

५६. दुःखी होती लोभी करावें ते काई । उडतील गाई म्हैसी आतां॥१॥ आणिकहि कांहीं होईल अरिष्ट । नायके हा धीट सांगीतलें ॥२॥ सांगों चला याच्या मायबापापाशीं । निघाली घरासि देवा रागें॥३॥ रागें काला देतां न घेती कवळ । टोकवी गोपाळ क्रोधियांसी ॥४॥ क्रोधें देवावरी धरियला राग । तुका म्हणे भाग न लभती ॥५॥

५७. भाग त्या सुखाचे वांकड्या बोबड्या । आपुलिया गड्या भाविकांसी ॥ ॥१॥ भारवाही गेले टाकोनी कावडी । नवनीत गोडी भाविकांसी ॥२॥ काला करोनियां वांटिती सकळा । आनंदें गोपाळांमाजि खेळे ॥३॥ खेळींमेळीं दहीं-दुधलोणी खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥४॥ कवणाचें चाले तुका म्हणे बळ । जयासी गोपाळ साह्य झाला ॥५॥

५८. जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वांकुल्या गोपाळ दावीताती ॥१॥ तांतडीया मेघा आज्ञा करी रावो । गोकुळींचा ठावो उरों नेदीं ॥२॥ नेदा-वया गाई म्हैशी वांचूं लोक । पुरावे सकळिक शिळाधारी ॥३॥ धाक नाहीं माझा गौळीयांच्या पोरां । सकळींकां मारा म्हणे मेघा ॥४॥ म्हणविती देव आपणा तंवरी । नाहीं जंववरी कोपलों मी ॥५॥ मीपणें हा देव नकळेचि त्यासी । अभिमान रासी गर्वाचिया ॥६॥ अभिमान रासी जयाचीया ठायीं । तुका म्हणे तई देव दूरी ॥७॥

५९. देव त्या फावला भाविकां गोपाळां। नाहीं तेथें कळा अभिमान ॥१॥ नाडीली आपल्या आपणांचि येकें । संदेह दायकें बहू फार ॥२॥ फार चाळवीलीं कळों नेदी भाव । देवा आधिदेव विश्वंभर ॥३॥ विश्वासावांचोनी कळों नये खरा । अभक्ता अधीरा जैसातैसा ॥४॥ जैसा भाव तैसा जवळी त्या दूरी । तुका म्हण हरि देतो घेतो ॥५॥

६०. ता या साच भाव न कळेचि इंद्रा। म्हणवोनी धारा घाली मेघा ॥१॥ घाली मेघ धारा कडाडीला माथा । वरि अवाचिता देखीयला ॥२॥ देखती पाऊस वोळला गोपाळा । भ्यालेहि सकळ विचारीती ॥३॥ विचारीं पडीले विसरले खेळ । अन्याय गोपाळ म्हणती केला ॥४॥ लागलेंसे गोड न कळे त्या काळीं । भेणें वनमाळी आठविती ॥५॥ आतां काय कैसा करावा विचार । गोधनासी थार आपणिया ॥६॥ याचीया विचारें होणार तें कायी । तुका म्हणे ठायीं वेडावलीं ॥७॥

६१. वेडावलीं काय करावें या काळीं । म्हणे वनमाळी गोपाळांसी ॥१॥ शिरीं गोवर्धन धरूं उचलोनी । म्हणे तुम्ही कोण्ही भेऊं नका ॥२॥ नका सांडों कोण्ही आपला आवांका । मारिती या हाका आरोळीया ॥३॥ आशंकीत चित्तें न वाटे त्या खरें । धाकें चित्तें बरें म्हणती चला ॥४॥ चित्तीं धाक परी जवळी अनंत । तुका म्हणे घात होऊं नेदी ॥५॥

६२. नेदी दुःख देखों दासा नारायण । ठेवी निवारून आल्या आधीं ॥१॥ आधीं पुढें शुद्ध करावा मारग । दासा मागें मागें सुखरूप ॥२॥ पर्वतासी हात लावीला अनंतें । तो जाये वरुतें आपेआप ॥३॥ आपुल्या आपण उचलीला गिरी । गोपाळ हें करी निमित्यासी ॥४॥ निमित्य करोनी करावें कारण । करितां आपण कळों नेदी ॥५॥ दीनाचा कृपाळ पतितपावन । हें करी वचन साच खरें ॥६॥ सांगणें नलगे सुखदुःख दासा । तुका म्हणे ऐसा कृपावंत ॥७॥

६३. कृपावंतें हाक दिली सकळिकां । माजिया रे नका राहों कोण्ही ॥१॥ निघालिया भेणें पाउसाच्या जन । देखे गोवर्धन उचलीला ॥२॥ लाविले गोपाळ फेरी चहूंकडे । हांसे फुंदे रडे कोण्ही धाकें ॥३॥ धाकेंहि सकळ निघाले भीतरीं । उचलीला गिरी तयाखालीं ॥४॥ तयाखालीं आले वत्सें

गाई लोक । पक्षी सकळिक जीवजाती ॥५॥ जिहीं म्हणविले हरिचे अंकित । जातीचे ते होत कोणीतरी ॥६॥ जाति कुळ नाहीं तयांसी प्रमाण । अनन्या अनन्य तुका म्हणे ॥७॥

६४. म्हणविती भक्त हरीचे अंकित । करितो अनंत हित त्यांचे ॥१॥ त्यांसी राखें बळें आपुले जे दास । कळिकाळा वास पाहों नेदी ॥२॥ पाऊस न येतां केली यांची थार । लागला तूसार येऊं मग ॥३॥ येऊनी दगड बैसतील गिरी । वरुषला धारी शिळाचिया ॥४॥ शिळाचिया धारी वरुषला आकांत । होतां दिसे सात येकसरें ॥५॥ येकसरें गीरि धरिला गोपाळीं । होता भाव बळी आम्हा ऐसें ॥६॥ ऐसें कळों आलें देवाचीया चित्ता । म्हणे तुम्ही आतां हात सोडा ॥७॥ हांसती गोपाळ करोनी नवल । ऐकोनीया बोल गोविंदाचे ॥७॥ दावितील डोया गुढघे कोंपर । फूटले तों भार ऊचलितां ॥८॥ भार आम्हावरी घालोनी निराळा । राहिलासी डोळा चुकऊनी ॥९॥ निमित्या आंगोळी लावियेली वरी । पाहों कैसा गीरि धरितोसि ॥१०॥ शिणलेहि होते ठाईच्या त्या भारें । लटिकेंचि खरें मानुनीयां ॥११॥ यांनीं अंत पाहों आदरीला याचा । तुका म्हणे वाचा वाचाळते ॥१२॥

६५. वाचाळ लटिके अभक्त जे खळ । आपुलें तें बळ वाखाणावें ॥१॥ बळें हुंबरती सत्य त्यां न कळे । नुघडती डोळे आंधळ्यांचे ॥२॥ आसुडल्या माना हात पाय नेटें । तंव भार बोटें ऊचलीला ॥३॥ लटिकाची आम्हीं शीण केला देवा । कळों आलें तेव्हां सकळांशी ॥४॥ आलें कळों तुका म्हणे अनु-भवें । मग अहंभावें सांडवले ॥५॥

६६. सांडवले सकळांचे अभिमान । आणिले शरण लोटांगणीं ॥१॥ लोटांगणीं आले होउनियां दीन । मग नारायण म्हणे भले ॥२॥ भला आजि तुम्हीं केला साच पण । गिरी गोवर्धन ऊचलीला ॥३॥ लागती चरणा सकळ ते काळीं । आम्हां मध्यें बळी तूंचि येक ॥४॥ येका तुजवीण न यों आम्ही कामा । कळों कृष्णरामा आलें आजी ॥५॥ आजिवरी आम्हां होतां अभिमान । नेणतां चरण महिमा तूझा ॥६॥ तुझा पार आम्ही नेणों नारायणा । नखें गोवर्धना राखियेलें ॥७॥ राखीलें गोकूळ आम्हां सकळांसी । दगडाच्या रासी वरूषतां ॥८॥ वर्णावें तें काइ तुझें महिमान । धरिती चरण सकळहि ॥९॥

सकळहि ताहान विसरलें भूक । सकळहि सुख दिलें त्यांसी ॥१०॥ त्यांसि कळों आला वैकुंठ नायक । तुका म्हणे लोक निर्भय तें ॥११॥

६७. लोकां कळों आलें देव आम्हामधीं। टाकीली उपाधि तेहि शंका॥ ॥१॥ शका नाहीं थोर लहाना जीवासी । कळला हृषीकेशी तेव्हां मग ॥२॥ मग मनीं झाले निर्भय सकळ । संगे लोकपाळ कृष्णाचीया ॥३॥ कृष्णाचीया वोव्या गाणें गाती गीत । कृष्णमय चित्त झालें त्यांचें ॥४॥ त्यांसी ठाव नाहीं बाहीरील भाव। अंतरींच वाव झालें सुख॥५॥ सुख तयां दीसे न कळे हे राता । अखंड या ज्योती गोविंदाची ॥६॥ चिंतनेंचि धालीं नलगे अन्नपाणी। तुका म्हणे मनीं समाधान ॥७॥

६८. समाधान त्याचीं इंद्रियें सकळ । जया तें गोपाळ समागमें ॥१॥ गोविंदाचा झाला प्रकाश भीतरीं। मग त्या बाहेरी काय काम ॥२॥ कामकाज त्यांचें सरले व्यापार । नाहीं आपपर माझें तुझें ॥३॥ माया सकळाची सकळाहि वरि । विषम तें हरी दिसों नेदि ॥४॥ दिसे तया आपपरावें सारिखें । तुका म्हणे सुखें कृष्णाचिया ॥५॥

६९. कृष्णाचीया सुखें भूक नाहीं ताहन । सदा समाधान सकळांचें ॥१॥ कळ्लेंचि नाहीं झाले किती दीस । बाहेरील वास विसरलीं ॥२॥ विसरु कामाचा तुका म्हणे झाला । उद्योग राहिला यावें जावें ॥३॥

७०. जावें बाहेरी हा नाठवे विचार । नाहीं समाचार ठावा कांहीं ॥१॥ कांहीं न कळे तें कळों आलें देवा । मांडीला रिघावा कवतुक ॥२॥ कवतुकासाठीं भक्त देहावरी । आणिता हे हरि बोलावया ॥३॥ यासी नांव रूप नाहीं हा आकार । कळला साचार भक्तामुखें ॥४॥ मुखें भक्तांचीया बोलतो आपण। अंगसंग भिन्न नाहीं दोघां ॥५॥ दोघे वेगळाले देखील जो कोण्ही । तयाचा मेदीनी वहू भार ॥६॥ तयासी घडलीं सकळहि पापें। भक्ताचिये कोपें निंदा द्वेषें ॥७॥ द्वेषीयाचा संग न घडावा कोण्हा । विष जेंवि प्राणा नाश करी ॥८॥ करितां जो ऐके निंदा या संतांची । तया होतीं तेचि अधःपात ॥९॥ पतन उद्धारा संगाचा महिमा त्यजावें अधमा संतसेवीं ॥१०॥ तया संत जोडे महा लाभ रासी । तुका म्हणे यासी नाश नाहीं ॥११॥

७१. नाहीं नाश हरि आठवितां मुखें । जोडतील सुखें सकळहि ॥१॥ सकळहि सुखें वोळलीं अंतरीं । मग त्या बाहेरी काय काज ॥२॥ येऊं विसरले बाहीर गोपाळ । तल्लीन सकळ कृष्णसुखें ॥३॥ सुख तें योगियां नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशु जीवा ॥४॥ वारला पाऊस कोण्हा नाहीं ठावा । तुका म्हणे देवावांचूनिया ॥५॥

७२. यांसि समाचार सांगतों सकळां । चलावें गोपाळा म्हणे देवा ॥१॥ देव राखे तयां आडलिया काळे । देव सुख फळ देतो दासां ॥२॥ दासां दुःख देखों नेदी आपुलीया । निवारी आलीया न कळतां ॥३॥ नाहीं मेघ येतां जातां देखियेला । धारीं वरुषला शिळाचीया ॥४॥ येव्हढें सांकडे भक्तांचें अनंता । होय निवारीता तुका म्हणे ॥५॥

७३. काकुळती येक पाहाति बाहेरी । तया म्हणे हरि ओसरला ॥१॥ ओसरला मेघ आला होता काळ । बाहेरील सकळ आले लोक ॥२॥ कवतुक झालें ते काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ॥३॥ भावें तयापुढें नाचती सकळे । गातील मंगळ वोव्या गीत ॥४॥ गीत गाती वोव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहरी वाती पांवे ॥५॥ वत्सें गाई पशु नाचती आनंदें । वेधलींया छंदें गोविंदाच्या ॥६॥ चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोण तें दैवाचें तयांहूनी ॥७॥ तयांहून कोण नाहीं भाग्यवंत । अखंड सांगातें गोविंदाच्या ॥८॥ गोविंदाचा संग तुका म्हणे ध्यान । गोविंद तेज गोकुळींचें ॥९॥

७४. गोकुळींची गति कोण झाली परी । पाहों आला वरी इंद्रराव ॥१॥ इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करूनी आलों ॥२॥ आतां जीव नाहीं सांगावया रानीं । पुरलें पाषाणीं शिळाधारीं ॥३॥ रिता कोठें नाहीं उरों दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ॥४॥ न कळतां देव बळें हुंबरती । साच ते पावती अपमान ॥५॥ भाव न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टी पाहावया ॥६॥ पाहातां ते आहे जैसें होतें तैसें । नाचती विशेषें तुका म्हणे ॥७॥

७५. नाचतां देखीले गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ॥१॥ लागला पाऊस शीळाचीया धारी । वांचली हे परी कैसी येथें ॥२॥ येथें

आहे नारायण संदेह नाहीं। विघ्न केलें ठाईं निर्विघ्न तें ॥३॥ विचारितां ऊचलिला गोवर्धन। अवतार पूर्ण कळों आला ॥४॥ आला गौळीयांच्या घरा नारायण। करीतो स्तवन इंद्र त्याचें ॥५॥ त्याच्या पुण्या पार कोण करी लेखा। नव्हे चतुर्मुखा ब्रह्मयासी ॥६॥ शिणतो या ध्याना नये येक वेळा। तो तया गोपाळा समागमें ॥७॥ समागमें गाई वत्सें पुण्यवंता। देह कुर्वाळितां अंग संग ॥८॥ संग झाला मायबाप लोकपाळा। आलींगिती गळा कंठाकंठ ॥९॥ करितील वृष्टि पुष्प वरुषाव। देवा आधिदेव पुजियेला ॥१०॥ करित हे झाले स्तुति सकळिक। देव इंद्रादिक गोविंदाची ॥११॥ पुष्पांजुळी मंत्रघोष जयजयकार। दुमदुमी अंबर तेणें नादें ॥१२॥ नामाचा गजर गंधर्वांचीं गाणीं। आनंद त्रिभुवनीं न समायें ॥१३॥ तो सुखसोहळा अनुपम्य राशी। गोकुळीं देवासी दोहीं ठाईं ॥१४॥ दोहीं ठाई सुख दिलें नारायणें। गेला दरुशनें वैरभाव ॥१५॥ भावना भेदाची जाय उठाउठी। तुका म्हणे भेटी गोविंदाचे ॥१६॥

७६. गोविंदाचें नाम गोड घेतां वाचे। तेथें राहे कैंचा देह भाव ॥१॥ भावें नमस्कार घातला सकळीं। लोटांगण तळीं महीवरी ॥२॥ वरि हात बाहे उभारिला देवें। कळलिया भावें सकळांच्या ॥३॥ सकळहि वरी बहुडवि स्थळा। चलावें गोपाळा म्हणे घरा ॥४॥ राहिलीं हीं नाचो गोविंदाच्या बोलें। पडलिया डोलें छंदें हो तीं ॥५॥ छंद तो नावरे आपला आपणा। आनंदाचा आला होता त्यांसी ॥६॥ त्यांसि तुका म्हणे आनंद सकळां। ठेंगणें गोपाळा समागमें ॥७॥

७७. समागमें हरि असे नेणतीया। नेदी जावो वायां अंकितासि ॥१॥ अंकिता सावध केलें नारायणें। गोपाळ गोधनें सकळहि ॥१॥ सकळ हे जन आले गोकुळासी। आनंद मानसीं सकळांच्या ॥३॥ सकळांचा केला अंगिकार देवें। न कळतां भावें वांचवि त्यां ॥४॥ त्यां झाला निर्धार हरि आम्हांपाशीं। निवांत मानसीं निर्भय ते ॥५॥ निर्भय हे जन गोकुळींचे लोक। केले सकळिक नारायणें ॥६॥ नारायण भयें येवो नेदी गांवा। तुका म्हणे नांवा अनुसरे त्या ॥७॥

७८. अनुसरे तया फिरों नेदी मागें। राहे समागमें अंगसंगें ॥१॥ अंग-

संगें असे कर्मसाक्षी देव । जैसा ज्याचा भाव तैसें फळ ॥२॥ फळपाका भोग देतील प्राणीये । तुका म्हणे नये सवें कांहीं ॥३॥

७९. या दशे चरित्र केलें नारायणें । रांगतां गोधनें राखिताहे ॥१॥ हें सोंग सारिलें या रुपें अनंतें । पुढेंहि बहु तें करणें आहे ॥२॥ आहे तुका म्हणे धर्मसंस्थापन । केला नारायणें अवतार ॥३॥

८०. अवतार केला संव्हाराचे दुष्ट । करिती ते नष्ट परपीडा ॥१॥ परपीडा करि दैत्य कंसराव । पुढें तोही भाव आरंभिला ॥२॥ लाविलें लाघव पाहोनिया संधि । सकळहि वधी दुष्ट जन ॥३॥ दुष्टजन परपीडक जे कोण्ही । तया चक्रपाणी न साहती ॥४॥ न साहात दुःख भक्तांचें या देवा । अवतार घ्यावा लागे रूप ॥५॥ रूप हें चांगलें रामकृष्णनाम । हरे भव श्रम उच्चा-रितां ॥६॥ उच्चारितां नाम कंस वैरभावें । हरोनियां जीवें कृष्ण केला ॥७॥ कृष्णरूपें त्यासी दिसे अवघे जन । पाहे तों आपण कृष्ण झाला ॥८॥ पाहिलें दर्पणीं आधिल्या मुखासी । चतुर्भुज त्यासी तोचि झाला ॥९॥ झाली कृष्णरूप कन्या पुत्र भाज । तुका म्हणे राज्य सैन्य जन ॥१०॥

८१. सैन्य जन हांसे राया झालें काई । वासपे तो ठाईं आपणासि ॥१॥ आपणा अपण जाय सती जैसी । वैरभाव ज्यांसी भक्ति नाहीं ॥२॥ नाहीं याचा त्याचा भाव एकविध । म्हणऊनि छंद वेगळाले ॥३॥ वेगळाल्या भावें ते तया हांसती । तयासी दीसती अवघीं हरि ॥४॥ हरीला कंसाचा जीवभाव देवें । द्वेषाचीया भावें तुका म्हणे ॥५॥

८२. द्वेषाचीया भावें हरिरूप झाले । भाव हरपले देहादिक ॥१॥ देहा-दिक कर्मं अभिमान वाढे । तया कैसा जोडे नारायण ॥२॥ नारायण जोडे येकविध भावें । तुका म्हणे जिवें जाणें लागे ॥३॥

८३. जीव भाव त्याचा गेला अभिमान । म्हणऊनी जन हांसे कंसा ॥१॥ सावध करितां नये देहावरी । देखोनियां दूरी पळे जनां ॥२॥ जन वन हरि झालासे आपण । मग हे लोचन झाकीयेले ॥३॥ झांकोनी लोचन मौन्यची राहिला । नाहीं आतां बोलायाचें काम ॥४॥ बोलायासी दूजें नाहीं हें राहिलें । जन कृष्ण झालें स्वयें रूप ॥५॥ रूप पालटलें गुण नाम याती । तुका म्हणे भूतीं देव झाला ॥६॥

८४. झाला स्वयें कृष्ण आठव हा चित्तीं । भेद भय वृत्ति उरली आहे ।।१।। उरलें हें रूप नांव दिसे भिन्न । मी आणि कृष्ण आठवतो ।।२।। तोंवरि हा देव नाहीं तयापासीं । आला दिसे त्यासी तोचि देव ।।३।। देवरूप त्यासी दिसे वरि काया । अंतरा तो भयाभीत भेदें ।।४।। भेदें तुका म्हणे अंतरे गोविंद । साचेंवीण छंद वायां जाये ।।५।।

८५. वायां वैसे बोल हरीसी अंतर । केले होते चार भयभेदें । भेदभय गेलें नोळखे आपणा । भेटी नारायणा कंसा झाली ।।२।। झाली भेटी कंसा हरिसीं निकट । सन्मुखचि नीट येरयेरा ।।३।। येरयेरां भेटी युद्धाच्या प्रसंगा । त्याचे शस्त्रें अंगा हाणीतलें ।।४।। त्याचें वर्म होतें ठावें या अनंता । तुका म्हणे सत्तानायक हा ।।५।।

८६. नारायणें कंसचाणूर मर्दीले । राज्यीं स्थापियेलें उग्रसेना ।।१।। उग्रसेन स्थापीयेला शरणांगत । पुरवीला अंत अभक्तांचा ।।२।। अवघेंचि केलें कारण अनंतें । आपुलीया हातें सकळहि ।।३।। सकळहि केलीं आपुलीं अंकित । राहे गोपीनाथ मथुरेसी ।।४।। मथुरेसि आला वैकुंठनायक । झाले सकळीक एक राज्य ।।५।। राज्य दिलें उग्रसेना शरणांगता । सोडवीलीं मातापिता दोन्हीं ।।६।। सोडवणें धांवे भक्तांच्या कैवारें । तुका म्हणे करें शस्त्र धरी ।।७।।

८७. धरीं दोहीं ठाईं सारिखाचि भाव । देवकि वसुदेव नंद दोघे ।।१।। दोन्ही येके ठाईं केलीं नारायणें । वाढविला तीणें आणि व्याली ।।२।। व्याला वाढला हा आपणा आपण । निमित्ता कारण मायबाप ।।३।। माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासी ।।४।। कोण जाणे याचे अंतरींचा भाव । तुका म्हणे माव कळों नेदी ।।५।।

८८. दिनाचा कृपाळू दुष्ट जना काळ । येकला सकळ व्यापक हा ।।१।। हासे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये तो प्राकृत म्हणों यासि ।।२।। यासि कळावया येक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव धांडोळितां ।।३।। धांडोळितां श्रुति राहिल्या निश्चित । तो करि संकेत गोपीसवें ।।४।। गोपीकांची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखतां ।।५।। न देखतां त्यासी उठी बैसे पाहे । वडावला राहे वेळोवेळां ।।६।। वेळोवेळां पाहे पंथ गोपिकांचा । तुका म्हणे वाचा नातूडे तो ।।७।।

८९. तो बोले कोमळ निष्ठुर साहूनी । कोपतां गौळणी हास्य करी ॥१॥ करावया दास्य भक्तांचें निर्लज्ज । कवतुकें रज माथा वंदी ॥२॥ दिल्हें उग्रसेना मथुरेचें राज्य । सांगीतलें काज करी त्याचें ॥३॥ त्यांसि कांहीं होतां अरिष्ट निर्माण । निवारी आपण शरणागता ॥४॥ शरणागता राखे सर्व भावें हरी । अवतार धरी तयांसाठीं ॥५॥ तयांसाठीं वाहे सुदर्शन गदा । उभा असे सदा सांभाळित ॥ ॥६॥ तळमळ नाहीं तुका म्हणे चित्ता । भक्ताचा अनंता भार माथां ॥७॥

९०. मारिले असुर वाढल्या मेदिनी । होते कोण्हा कोणी पीडीत ते ॥१॥ तयां नारायण पाठवी अघोरा । संताच्या मत्सरा घाताकरी ॥२॥ वारीले ते दूतीं यमाचिये दंडीं । उच्चारितां तोंडीं नारायण ॥३॥ नारायण नाम नावडे जयांसी । ते झाले मिरासी कुंभपाकीं ॥४॥ कुंभपाकीं शेल मान तो तयांचा । तुका म्हणे वाचा संतनिंदा ॥५॥

९१. वास नारायणें केला मथुरेसि । वधूनि दुष्टांसि तये ठाईं ॥१॥ ठाईं पितेयाचे मानी उग्रसेना । प्रतिपाळि जनांसहित लोकां ॥२॥ लोकां दुःख नाहीं मागील आठव । देखियेला देव दृष्टि त्यानीं ॥३॥ देखोनियां देवा विसरलीं कंसा । ठाव नाहीं ऐसा होता येथें ॥४॥ येथें दुजा कोणी नाहीं कृष्णावीण । ऐसें वाटे मनें काया वाचा ॥५॥ कायावाचामनें कृष्णीं रत झाले । सकळां लागलें कृष्णध्यान ॥६॥ ध्यान गोविंदाचें लागलेंसें लोकां । निर्भर हे तुका म्हणे चित्तीं ॥७॥

९२. चिंतीले पावले जया कृष्ण भेटी । येऱ्हवीं ते आटि वायांविण ॥१॥ वासना धरीती कृष्णावीण कांहीं । शिण केला तीहीं साधनांचा ॥२॥ चालवीलीं दंभें भयें अहंकारें । भोग जन्मांतरें न चुकती ॥३॥ न चुकती भोग तपें दानें व्रतें । येका त्या अनंतेवांचुनियां ॥४॥ चुकउनि जन्म दाखवी आपणा । भजा नारायणा तुका म्हणे ॥५॥

९३. भाजिल्या गोपीका सर्वभावें देवा । नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं ॥१॥ दुजा छंद नाहीं तयांचीये मनीं । जागृती स्वप्नीं कृष्णध्यान ॥२॥ ध्यान ज्या हरीचें हरिस तयाचें । चित्त गोहि ज्याचें तैशा भावें ॥३॥ भाग्य पूर्वपुण्य आठविती लोक । अवघे सकाळिक मथुरेचे ॥४॥ मथुरेचे लोक सुखी केले जन । तेथें नारायण राज्य करी ॥५॥ राज्य करि गोपी यादवांसहित । कर्मिले बहुत काळ तेथें ॥६॥ तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका म्हणे ॥७॥

९४. रचियेला गांव सागराच्या पोटीं । जडोनि गोमटीं नानारत्नें ॥१॥ रत्नें खणोंखणी सोनियाच्या भिंती । लागलीया ज्योति नाना कळा ॥२॥ कळा सकळहि गोविंदाचे हातीं । मंदिरें निगुति उभारीलीं ॥३॥ उभारिलीं दुर्गे दारवंटे फांजी । कोटी चर्या माजि शोभलीया ॥४॥ शोभले उत्तम गांव सागरांत । सकळांसाहित आले हरि ॥५॥ आला नारायण द्वारकानगरा । उदार या शूरा मुगुटमणि ॥६॥ निवडिना याति समानाचि केली । टणक धाकुलीं नारायणें ॥७॥ नारायणें दिल्हीं अक्षय मंदिरें । अभंग साचारें सकळांसी ॥८॥ सकळहि धर्मशीळ पुण्यवंत । पवित्र विरक्त नारीनर ॥९॥ रचिलें तें देवें न मोडे कवणा । बळियांचा राणा नारायण ॥१०॥ बळ बुद्धि नीति देवाची सारखी । तुका म्हणे मुखीं गाती वोव्या ॥११॥

९५. गाती वोव्या कामें करितां सकळें । हालवित बाळ देवावरि ॥१॥ रिद्धीसिद्धि दासी दारीं वोळंगति । सकळ संपत्ति सर्वां घरीं ॥२॥ घरीं बैसलीया जोडलें निधान । करिति कीर्तन नारी नर ॥३॥ नारी नर लोक धन्य त्यांची याति । जयांसी संगति गोविंदाची ॥४॥ गोविंदें गोविंद केले लोकपाळ । चिंतनें सकळ तुका म्हणे ॥५॥

९६. कांहीं चिंता कोणा नाहीं कोणे विशीं । करी द्वारकेसी राज्य देव ॥१॥ द्वारकेसी राज्य करी नारायण । दुष्ट संहारून धर्म पाळी ॥२॥ पाळीं वेद आज्ञा ब्राह्मणाचा मान । अतीत पुजन वैष्णवांचें ॥३॥ अतीत अलिप्त अवघिया वेगळा । नाहीं या गोपाळा अभिमान ॥४॥ अभिमान तुका म्हणे नाहीं त्यासी । नेदि आणिकासी धरूं देव ॥५॥

९७. धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथि । परब्रह्मक्षिती उतरलें ॥१॥ उत्तम हें नाम रामकृष्ण जगीं । तारावयालागीं भवनदी ॥२॥ दीनानाथ ब्रीद रूळतें चरणीं । वंदितील मुनि देव ऋषि ॥३॥ ऋषि मुनि भेटि दिल्ही नारायणें । आणिक कारणें बहु केलीं ॥४॥ बहु कासाविस झाला भक्तांसाठीं । तुका म्हणे आटी सोशियेली ॥५॥

९८. सोशियेली आटि गर्भवास फेरे । आयुधांचे भारे वागवितां ॥१॥ वाहोनि सकळ आपुलिया माथां । भार दासां चिंता वाहों नेदी ॥२॥ नेदि काळाचिये हातीं सेवकासी । तुका म्हणे ऐसी ब्रिदावळी ॥३॥

९९. ब्रिदावळी ज्याचे रूळति चरणीं । पाऊलें मेदिनी सुखावे त्या ॥१॥ सुखावे मेदिनी कृष्णाचिया चाली । कुंकुमें शोभिली होय रेखा ॥२॥ होऊनि भ्रमर पाऊलाचें सुख । घेति भक्त मुख लाऊनियां ॥६॥ याचे साठीं धरियेला अवतार । सुख दिल्हें फार निज दासा ॥४॥ निजसुख तुका म्हणे भक्तां ठावें। तिहींच जाणावें भोगूं त्यासि ॥५॥

१००. भोगिल्या गोपीकां यादवां सकळां । गवळी गोपाळां गाई वत्सां ॥१॥ गाती धणीवरि केला अंगसंग । पाहिला श्रीरंग डोळे भरी ॥२॥ भक्ति नवविधा तयांसि घडली । अवघींच केलीं कृष्णरूप ॥३॥ रूप दाखविलें होतां भिन्न भाव । भक्त आणि देव भिन्न नाहीं ॥४॥ नाहीं राहों दिल्हें जातां निजधामा । तुका म्हणे आम्हांसहित गेला ॥५॥

१०१. गेला होता कोठें कोठोनियां आला । सहज व्यापीला आहे नाहीं ॥१॥ आहे साच भावें सकळा व्यापक । नाहीं अभाविकां लोकां कोठें ॥२॥ कोठें नाहीं ऐसा नाहीं रीता ठाव । अनुभवें देव स्वयें झाले ॥३॥ जातों येतों आम्हीं देवाच्या संगात । तुका म्हणे गात देवनाम ॥४॥

१०२. मना वाटे तैसीं बोलिलों वचनें । केली धीटपणें सलगी देवा ॥१॥ वाणी नाहीं शुद्ध याति येक ठाव । भक्ति नेणे भाव नाहीं मनीं ॥२॥ नाहीं झालें ज्ञान पाहिलें अक्षर । मानी जैसें थोर थोरी नाहीं ॥३॥ नाहीं मनीं लाज धरिली आशंका । नाहीं भ्यालों लोकां चतुरांसि ॥४॥ चतुरांच्या राया मी तुझा अंकित । झालों शरणांगत देव देवा ॥५॥ देवा आतां करीं सरतीं वचनें। तुझ्या कृपादानें बोलिलों तीं ॥६॥ तुझें देणें समर्पुनि पायीं । झालों उतराई पांडुरंगा ॥७॥ रंकाहूनि रंक दास मी दासाचे । सामर्थ्य मज कैचें बोलावया ॥८॥ बोलावया पुरे माझी वाचा कायी । तुका म्हणे पायीं ठाव द्यावा ॥९॥

१०३. पांडुरंगा करूं प्रथम नमन । दुसरें चरण संतांचीया ॥१॥ त्यांच्या कृपा-कथेचा विस्तार । बाबाजी सद्गुरु दास तुका ॥२॥ काय माझी वाणी मानले संतांसी । रंजऊं चित्तासी आपुलीया ॥३॥ या मनासि लागो हरिनामीं छंद । आवडी गोविंद गावयासी ॥४॥ शीण झाला मज संसार संभ्रमें । शितळ या नामें झाली काया ॥५॥ या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आला आकारासी

निर्विकार ॥६॥ नित्य धांवे तेथें नामाचा गजर । घोष जयजयकार आईकतां ॥ ॥७॥ तांतडी ते काय हरि गुण गाय । आणिक उपाय दुःखमूळ ॥८॥ मूळ नरकाचें राज्यमदें माते । आंतरे बहुत देव दूरि ॥९॥ दुरी आंतरला नाम निंदकांसि । जैसें गोचिडासि क्षिर राहे ॥१०॥ हे वाट गोमटी वैकुंठाशी जातां । रामकृष्णकथा दिंडिध्वजा ॥११॥ जाणते तयांसि सांगितलें करा । अहंतेसी वारा आडुनियां ॥१२॥ यांसी आहे ठावें परि अंध होती । विषयाची खंती वाटे जना ॥१३॥ नाहीं त्यां सुटली द्रव्यलोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची ॥१४॥ चित्त ज्याचें पुत्र पत्नीबंधुवरी । सुटेल हा परि कैसा जाण ॥ ॥१५॥ जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥१६॥ माझी मज असे घडली प्रचित । नसेल पतीत ऐसा कोण्ही ॥१७॥ कोण्ही तरी कांहीं केलीं आचरणें । मज या किर्तनेंविण नाहीं ॥१८॥ नाहीं भक्ता भय तराया पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥१९॥ लागे पाठोपाठी पाहे पायांकडे । पीतांबर खडे वाट झाडी ॥२०॥ डिकोनियां काय राहिलेहि लोक । हेंची कवतुक वाटे मज ॥२१॥ जयानें तारिले पाषाण सागरीं । तो घ्यारे अंतरीं स्वामी माझा ॥२२॥ माझिया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळु हा ॥२३॥ हाचि माझा नेम हाचि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें ॥२४॥ चेतवला अग्नी तापत्रय जाळ । तो करी सीतळ रामनामें ॥२५॥ मना येक करी चित्तीं दृढ धरी । तारील श्रीहरी मायबाप ॥२६॥ बाप हा कृपाळु भक्त भाविकांसी । घरीं होय दासी कामारि त्या ॥२७॥ त्याचा भार माथा चालवी आपुला । जिहीं त्या दीधला सर्व भावें ॥२८॥ भावें विण नाहीं तयाची हे प्राप्ती । पुराणें बोलती ऐसी मात ॥२९॥ मात त्याची सदा आवडे जयासी । तया गर्भवासीं नाहीं येणें ॥३०॥ यावें विष्णुदासीं तरी गर्भवासीं । उद्धार लोकांसी पूज्य होती ॥३१॥ होती आवडते जिवाचे ताईत । त्या घडी अच्युत न विसंबे ॥३२॥ भेदाभेद कांहीं चिंता दुःख नाहीं । वैकुंठ त्या ठाईं सदा वसे ॥३३॥ वसे तेथें देव सदा सर्वकाळ करिती निर्मळ नाम घोष ॥३४॥ संपदा तयाची नसरे कल्पांती । मेळविला भाक्ति देव लाभ ॥३५॥ लाभ तया झाला संसारा येवोनि । भगवंत ऋणी भक्ती

केला ॥३६॥ लागलेंसे पिसें काय मूढजनां । कां रे नारायणा विसरलीं ॥३७॥ विसरलीं तयां थोर झाली हाणी । पचतील खाणी चौऱ्यासींच्या ॥३८॥ शिकवितां तरी नाहीं कोणा लाज । लागलिसे भाज धन गोड ॥३९॥ गोड येक आहे अवीट गोविंद । आणिक ते छंद नासीवंत ॥४०॥ तळमळ त्याची कांहीं तरी करा । कां रे निदसुरा बुडावया ॥४१॥ या जनासी भय यमाचें कां नाहीं । सांडियेलें तिहीं येकीं राज्य ॥४२॥ जेणें अग्नीमाजी घातलासे पाव । नेणता तो राव जनक होता ॥४३॥ तान्हभूक जेहीं साहिले आघात । तयां पाय हात काय नाहीं ॥४४॥ नाहीं ऐसा तीहीं केला संसार । दुःखाचे डोंगर तोडावया ॥४५॥ याचि जन्में घडे देवाचें भजन । आणिकहि ज्ञान नाहीं कोठें ॥४६॥ नाहीं पुढें कोठें घ्यावया विसांवा । फिरोनियां गांवा आल्यावीण ॥४७॥ विनवितां दीस बहुत लागती । म्हणोनियां चित्तीं देव धरा ॥४८॥ धरा पाय तुम्ही संतांचे जिवेंसी । वियोग देवासी तयां नाहीं ॥ ॥४९॥ नाहीं चाड देवा आणिक सुखाची । आवडी तयाची तैसी तया ॥५०॥ त्याचींच उच्छीष्टें बोलतों उत्तरें । सांगितलें खरें व्यासादीकीं ॥५१॥ व्यासें सांगितलें भक्ती हेंचि सार । तरावया पार भवसिंधु ॥५२॥ तरावया जना केलें भागवत । गोवळे गोपी भक्त मातापिता ॥५३॥ तारुनियां खरें नेलीं एकसरें । निमित्त उत्तरें ऋषींचीया ॥५४॥ यासि वर्म ठावें भक्त तरावया जननी बाळ माया राखे तान्हे ॥५५॥ तान्हेलें भूकेलें म्हणे वेळोवेळां । न मागतां कळा जाणोनियां ॥५६॥ जाणोनिया वर्म देठ लावियेला । द्रौपदीच्या बोलासवें धांवे ॥५७॥ धांवे सवें तान्ही धेनु जैसी वत्सा । भक्तांलागीं तैसा नारायण ॥५८॥ नारायण व्हावा ही हाव ज्या जीवा । धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ॥५९॥ पार नाहीं सुखातें दिलें हें तयासी । अखंड वाचेसी रामनाम ॥६०॥ रामनाम दोन्ही उत्तम अक्षरें । भवानीशंकरें उपदेशीलीं ॥६१॥ उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसि प्राणीमध्यें मरे ॥६२॥ मरणाचे अंतीं राम म्हणे जरी । नलगे यमपुरी जावें तया ॥६३॥ तयासि उत्तम ठाव पैं वैकुंठीं । वसे नाम कंठीं सर्वकाळ ॥६४॥ सर्वकाळ वसे वैष्णवाचे घरीं । नसे क्षणभरी स्थीर कोठें ॥६५॥ कोठें नका पाहों करा हरिकथा । तेथें अवचितां सांपडेल ॥

॥६६॥ सांपडे हा देव भाविकाचे हातीं । शाहाणे मरति तरी नाहीं ॥६७॥ नाहीं भक्ति भली केलियावांचूनि । अहंता पापीणी नागवण ॥६८॥ नागवला म्हणे देव मी आपण । लाभ दिला जना ठकला तो ॥६९॥ तोचि देव येर नव्हे ऐसे कांहीं । जनार्दन ठायीं चहूं खाणी ॥७०॥ खाणी भरोनीयां राहिलासें आंत । बोलावया मात ठाव नाहीं ॥७१॥ ठाव नाहीं रीता कोण्ही देवावीण । ऐसे ते सज्जन संतवाणि ॥७२॥ वाणी बोलोनियां येक गेले पुढें। तयासि वांकडे जातां ठके ॥७३॥ ठकला नाहीं अर्थ ठाऊका वेदाचा। होऊनि भेदाचा दास ठेला ॥७४॥ दास ठेला पोट अर्थ दंभासाठीं । म्हणऊनि तुटी देवासवें ॥७५॥ सर्वे देव द्विजातिहि दूरावला । आणिकाचा आला कोण पाड ॥७६॥ पाड करोनियां नागवले फार । पंडित वेव्हार खळवादी ॥७७॥ वादका निंदका देवाचें दरुषण । नव्हे झाला पूर्ण षट्कर्मी ॥७८॥ षट्कर्महीन रामनाम कंठीं । तयासवें भेटी सत्य देवा ॥७९॥ देवासी आवडे भाविक जो भोळा । शुद्ध त्या चांडाळा करूनी मानी ॥८०॥ मानियेला नाहीं उधार या बोला । नाम घेतां मला युक्ती थोडी ॥८१॥ थोडी युक्ती माझी दुर्बळाची वाचा। प्रताप नामाचा बोलावया ॥८२॥ बोलतां पांगल्या श्रुति नेतिनेति । खुंटलिया युक्ति पुढें त्यांची ॥८३॥ त्याचा पार पुढें न कळेचि जातां । पाउलें देखतां ब्रह्मादिकां ॥८४॥ काय भक्तिपिसें लागलें देवासी । इच्छा ज्याची जैसी तैसा होय ॥८५॥ होय हा सगुण निर्गुण आवडी । भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥८६॥ मायबापापाशीं बाळ बोले लाडें । करोनि वांकडें मुख तैसें ॥८७॥ तैसें याचकाचें समाधानदाता । होय हा राखता सत्त्वकाळीं ॥८८॥ सत्त्वकाळीं कामा न येती आयुधें । सोयरीं संबंधें सैन्य लोक ॥८९॥ सैन्य लोक तया दाखवी प्रताप । लोटला हा कोप कोपावरी ॥९०॥ कोपा मरण नाहीं शांति होय त्यासी । प्रमाण भल्यासी सत्त्वगुण ॥९१॥ सत्त्वरजतम आपण नासती । करितां या भक्ति विठोबाची ॥९२॥ चित्त रंगलीया चैतन्याचि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥९३॥ सुखाचा सागर आहे विटेवरी । कृपादान करी तोची एक ॥९४॥ येकाचित्त करूं विठोबाचे पायीं । तेथें उणें कायी एका

आम्हां ॥९५॥ आम्हांसि विश्वास त्याचिया नामाचा । म्हणऊनी वाचा घोष करूं ॥९६॥ करूं हरिकथा सुखाची समाधी । आणिकाची बुद्धि दुष्ट नासे ॥९७॥ नासे हा संसार लोभमोहमाया । शरण जातां या विठोबासी ॥ ॥९८॥ शिकविलें मज मूढा संतजनीं । दृढ या वचनीं राहिलोंसे ॥९९॥ राहिलोंसे दृढ विठोबाचे पायीं । तुका म्हणे कांहीं नलगे आतां ॥१००॥

१०४. गाईन ओंविया पंढरीच्या देवा । आमुचा तो जीव पांडुरंग ॥ ॥१॥ रंगलें हें चित्त माझें तया पायीं । म्हणोनियां घेई हाचि लाहो ॥ ॥२॥ लाहो करीन मी हाचि संवसारीं । राम कृष्ण हरी नारायण ॥३॥ नारायण नाम घालितां तुकासी । न येति या रासी तप तीर्थे ॥४॥ तीर्थे माथा रज वंदीती संतांचे । जे गाति हरीचे गुणवाद ॥५॥ गुणवाद ज्याचे गातां पूज्य झाले । बडिवार बोले कोण त्याचा ॥६॥ त्याचा पार नाहीं कळला वेदासी । आणिकहि ऋषि विचारीतां ॥७॥ विचारीतां तैसा होय त्याच्या भावें । निजरूप ठावें नाहीं कोण्हा ॥८॥ कोणा कवतुक न कळे ही माव । निजेलिया जीव करी धंदा ॥९॥ करी कवतुक खेळे हाचि लीळा । व्यापूनि वेगळा पाहातसे ॥१०॥ शेवटीं आपण वेगळाचि खरा । सोंग हा पसारा नट केला ॥११॥ लावियेलें चाळा मीपण हें जन । भोग तया कून भोगवितो ॥१२॥ विषयीं गुंतली विसरली तुज । कन्या पुत्र भाज धन लोभें ॥ ॥१३॥ लोभे गिळी फांसा आमीषाची आशा । सांपडोनि मासा तळमळी ॥ ॥१४॥ तळमळ त्याची तरच शमेल । जरी हा विठ्ठल आठविती ॥१५॥ आठवे तरी देव संताचे संगातें । किंवा हे संचित जन्मांतर ॥१६॥ जन्मांतरें तीं न भोगितां कळती । केलें ते पावती करितां पुढें ॥१७॥ पुढें जाणोनियां करावे संचित । पूजावे अतीत देवद्वीज ॥१८॥ जन्म तुटे ऐसे नव्हे तुम्हां जना । पुढील पावना धर्म करा ॥१९॥ करा जप तप अनुष्ठान याग । संतीं हे मारग स्थापियेले ॥२०॥ लावियेलीं कर्में शुध्द आचरणें । कोणा येका जन्में केलें पावे ॥२१॥ पावेल सत्वर निष्काम उदार । जिंकिली अपार वासना हे ॥२२॥ वासनेचें मूळ छेदिल्या वांचूनी । तरलोंसें कोणी न म्हणावें ॥ ॥२३॥ न म्हणावें झाले पंडित वाचक । करोनि मंत्रघोष अक्षरांचा ॥२४॥

चालविले येके तेचि आवडीनें । लोक दंभमानें देहसुखें ।।२५।। सुख तरी घडे भजनाचें सार । वाचे निरंतर रामनाम ।।२६।। राम हा उच्चार तरी बैसे वाचे । अनंता जन्मींचें होय पुण्य ।।२७।। पुण्य ऐसें कोण रामनामापुढें । काय ते बापुडे यागयज्ञ ।।२८।। यागयज्ञ तपें संसारदायकें । न सुटती येके नामेंवीण ।। ।।२९।। नामेंवीण भवसिंधु पावे पार । ऐसा हा विचार नाहीं दुजा ।।३०।। जाणती हे भक्तराज महामुनी । नाम सुखधणि अमृताची ।।३१।। अमृताचें सार निजतत्त्व बीज । गुह्यांचें तें गुज रामनाम ।।३२।। नामें असंख्यात तारिले अपार । पुराणीं हें सार प्रसिद्ध हें ।।३३।। हेंचि सुख आम्ही घेऊं सर्व काळ । करूं हे निर्मळ हरिकथा ।।३४।। कथाकाळीं लागे सकळां समाधी । तत्काळ ही वृद्धि दुष्ट नासे ।।३५।। नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया । गातां गुण तया विठो-बाचे ।।३६।। विठोबाचे गुण मज आवडती । आणिक हे चित्तीं नलगे कांहीं ।। ।।३७।। कांहीं कोणी नका सांगो हा उपाव । माझ्या मनीं भाव नाहीं दुजा ।। ।।३८।। जाणोनियां आम्ही दिला जीवभाव । दृढ याचे पाव धरियेले ।।३९।। धरियेले आतां न सोडी जींविसी । केला हा सेवेसी नीरधार ।।४०।। निरधारें आम्ही राहिलों या नेटीं। संवसारा तुटी करोनियां ।।४१।। येणें अंगिकार केला पांडुरंगें । रंगविले रंगें आपुलीया ।।४२।। आपुली पाखर घालोनियां वरी । आम्हांसि तो करी यत्न देव ।।४३।। देव राखे तया आणिकाचें काय । करितां उपाय चाले तेथें ।।४४।। तेथें रीघ नाहीं कळिकाळासी येतां । दास म्हणवितां विठोबाचे ।।४५।। विठोबाचे आम्ही लाडके डिंगर । कांपती असुर काळधाकें ।।४६।। धाक तीहीं लोकीं जयाचा दरारा । स्मरण हें करा त्याचें तुम्ही ।।४७।। तुम्ही निदसूर नका राहों कोणी । चुकवा जाचणी गर्भवास ।। ।।४८।। गर्भवासीं दुःख यमाचें दंडण। थोर होय शीण येतां जातां ।।४९।। तान भूक पीडा जितां हे आघात । मेल्या यमदूत जाच करी ।।५०।। जाच करीति हे म्हणसि कोणा ठावें । नरकीं कौरवें बूडी दिल्ही ।।५१।। बुडी दिल्ही कुंभपाकीं दुर्योधनें । दावीना लाजेनें मुख धर्मा ।।५२।। धर्म हा कृपाळु आलासे जवळी । बैसला पाताळीं वरी नये ।।५३।। नये वरि कांहीं करीतां उपाव । भोगवितो देव तेंचि त्यासी ।।५४।। त्याशी अभिमान गर्व या देहाचा । नुच्चारीती वाचा नारायण ।।५५।। नारायण जीवीं विसरे संसारीं । तेयासीं

आघोरीं वास सत्य ॥५६॥ सत्य मानूनीयां संतांच्या वचना। जा रे नारायणा शरण तुम्ही ॥५७॥ तुम्ही मानूं नका कोण्हाचा विश्वास। पुत्र पत्नी आस धन वित्त ॥५८॥ धन वित्त लोभ माया मोहो पाश। मांडियेले फांसे यमदूतीं ॥ ॥५९॥ दूतियांच्या मुखा केलेंसे कुडण। वाचे नारायण येवों नेदि ॥६०॥ नेदि शुद्धि बुद्धि अतळों चित्तासीं। नाना कर्में त्यासि दुऱ्हाविति ॥६१॥ दुराविलि येक जाणतिच फार। निंदा अहंकार वादभेद ॥६२॥ निंदा हे वादभेद फंद काळाचे। गोवितील वाचे रिकामीक ॥६३॥ रिकामिक देहा होय नव्हे मना। चिंताचिया घाणा जुंपियेले ॥६४॥ शेवटीं हे गळा लावोनियां दोरी। सांभाळये करीं वासनेच्या ॥६५॥ वासनेचा संग होय अंतकाळीं। तरी तपो बळी जन्म धरी ॥६६॥ धरोनियां देव राहतिल चित्तीं। अधीलिया गति आठवितो ॥६७॥ आठवावा देव मरणाचे काळीं। म्हणऊनि बळी जीव दिल्हा ॥६८॥ दिल्हा टाकोनीयां भोग ऋषेश्वरीं। खाति वनांतरीं कंदमूळें ॥ ॥६९॥ मूळें सुखाचीया देव अंतरला। अल्पासाठीं गेला अधोगति ॥७०॥ गति हे उत्तम व्हावया उपाव। आहे धरा पाव विठोबाचे ॥७१॥ विठोबाचे पायीं राहिलीया भावें। न लगे कोठें जावें वनांतरा॥७२॥ तरति दुर्बळी विठोबाचे नांवें। संचित ज्यासवें नाहीं शुद्ध ॥७३॥ शुद्ध तरायाचें काय तें नवल। म्हणतां विठ्ठल वेळोवेळां ॥७४॥ वेळकाळ नाहीं कवणाचे हातीं। न कळे हे गति भविष्याची ॥७५॥ भविष्य न सुटे भोगिल्यावांचूनि। संचित जाणोनि शुद्ध करा॥७६॥ करावे सायास आपुल्या हिताचें। येथें आलियाचें मनुष्यपण॥ ॥७७॥ मनुष्यपण तरी साधी नारायण। नाहीं तरी हीन पशुहूनि ॥७८॥ पशु पाप पुण्य काय हें जाणती। मनुष्य या रिती ठाऊकीया ॥७९॥ ठाऊक हें असे पाप पुण्य लोकां। देखतील येका भोगितिया ॥८०॥ भोगितील येक दुःख संवसारीं। काय सांगो परी वेगळाल्या ॥८१॥ ल्यावें खावें बरें असावें सदैव। हेंचि करि हावें संवसारी ॥८२॥ संवसारें जन गिळिले सकळ। भोगितील फळें गर्भवास ॥८३॥ वासनेचें मूळ छेदिल्या वांचूनी। नव्हे या खंडन गर्भवासा ॥८४॥ सायास केलियावांचूनि ते नाहीं। भविष्या वरी कांहीं॥ घालों नये॥८५॥ नये बळें धड घालूं कांट्यावरी। जाय जीवें धरी सर्प हातीं।

॥८६॥ हातीं आहे हित करील तयासी । म्हणऊनि ऋषीं सांगितलें ॥८७॥ सांगती या लोका फजीत करोनि । आपण जे कोणी तरलेजे ॥८८॥ जेणें वाळुवंटी उभारिला कर । कृपेचा सागर पांडुरंग ॥८९॥ गंगाचरणि करी पातकाची धुणी । पाऊलें तीं मनीं चिंतिलीया ॥९०॥ चिंतनें जयाच्या तरती पाषाण । उद्धरिले चरण लावूनियां ॥९१॥ लाऊनियां टाळी नलगे बैसावें । प्रेमसुख घ्यावें संतसंगें ॥९२॥ संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें साधन रामनाम ॥९३॥ मग कोठें देव जावों शके दूरी । बैसोनि भीतरि राहे कंठीं ॥ ॥९४॥ राहे व्यापूनीयां सकळ शरीर । आपुला विसर पडों नेदी ॥९५॥ नेदी दुःख देखो आपुलिया दासा । वारी गर्भवासा यमदूता ॥९६॥ ताहान भूक त्यासि वाहों नेदि चिंता । दुश्चित हें घेतां नाम होती ॥९७॥ होति जीवा त्यांचे सकळहि जंत । परि ते अंकित संचिताचे ॥९८॥ चेवलेजे कोण्ही देह अभिमानें । त्यासि नारायेणें कृपा केली ॥९९॥ कृपाळु हा देव अनाथा कोवसा । आम्ही त्याच्या आशा लागलोंसे ॥१००॥ लावियेलें आशें येणें पांडुरंगें । तुका म्हणे संगें भक्ताचीया ॥१०१॥

१०५. विचार करिती बैसोनि गवळणी । ज्या कृष्णकामिनी कामातुरा ॥ ॥१॥ येकांती येकल्या येकाच सुखाच्या । आवडती त्यांच्या गोष्टी त्याला ॥२॥ तर्कवितर्कीणि दुराविल्या दुरी । मौन त्या परिचारीं आरंभिलें ॥३॥ कुशळ कवित्या कथित्या लोभिका । त्याही येथें नका आम्हापासी ॥४॥ बोलकथा वाचाळा कृष्णरता नाहीं । त्या चोरोनि तीहीं खेट केली ॥५॥ भेऊनीया जना येकि सवा झाल्या । वाती विझाविल्या दाटों बळें ॥६॥ कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं । निंदीती त्या त्यांसि कृष्णरता ॥७॥ तो नये जवळि देखो नि कोल्हाळा म्हणऊनि समेळ मेळविला ॥८॥ अंतरीं कोमळा बाहेरि निर्मळा । तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं ॥९॥ हरिरूपीं दृष्टि कानीं त्याची गोष्टी । आलिंगिती कंठीं येकायेकीं ॥१०॥ न साहे वियोग करिती रोदना । आमिष्ठ भावना देहाचीया ॥ ॥११॥ विसरल्या मागें गृह सुत पती । अवस्था या चित्तीं गोविंदाची ॥१२॥ अवस्था लागोनि निवळचि ठेल्या । येकायेकी झाल्या कृष्णरूपा ॥१३॥ कृष्ण म्हणऊन देती आलिंगन । विरहताप तेणें निवारेना ॥१४॥ तापें कोण

वारी गोविंदावांचोनि । साच तो नयनीं न देखतां ॥१५॥ न देखतां त्यांचा प्राण रिघों पाहे । आजि कामा सये उशिर केला ॥१६॥ रित्या ज्ञान गोष्टी तयां नावडति । आलिंगन प्रीति कृष्णाचिया ॥१७॥ मागें कांहीं आम्ही चुकलों त्याची सेवा । असेल या देवा राग आला ॥१८॥ आठविती मागें पापपुण्य दोष । परिहार येकीस येक देती ॥१९॥ अनुतापें झाल्या संतप्त त्या बाळा । टाकिती विव्हाळा धरणीं अंग ॥२०॥ जाणोनि चरित्र जवळिच होता । आलि त्या अनंता कृपा मग ॥२१॥ होऊनि प्रगट दाखविलें रूप । तापत्रय ताप नीवविले ॥२२॥ निवालें देखोनि कृष्णाचें श्रीमुख । शोक मोहो दुःख दुरावला ॥२३॥ साच भाव त्यांचा आणोनियां मना । आलिंगितो राणा वैकुंठींचा ॥२४॥ हरिअंगसंगें हरिरूप झाल्या । बोलों विसरल्या तया सुखा ॥२५॥ व्यभिचारभावें भोगिलें अनंता। वर्तोनि असतां घराचारी ॥२६॥ सकळा चोरोनि हरि जयां चित्तीं । धन्य त्या नांदती तयामध्यें ॥२७॥ उणें पुरें त्यांचे पडो नेदि कांहीं । राखे सर्वां ठाईं देव तयां ॥२८॥ नकळे लाघव ब्रम्हादिकां भाव । भक्तिभावें देव केला तैसा ॥२९॥ तुका म्हणे त्यांचा धन्य व्यभिचार । साधीलें अपार निजसुख ॥३०॥

१०६. या रे हरिदासांनो जिंको कळिकाळा । आमुचीया बळापुढें किती बापुडें ॥१॥ रंग सुरंग घमंडी नाना छंदें । हास्यविनोदें नामाची आवडी ॥२॥ येणें तेणें प्रकारें बहूतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ॥३॥ वाकडी या माना बोल बोला आरुषा । येईल तो त्यास छंद पडिये गोविंदा ॥४॥ आपुल्या आनंदें येकापुढें येक नटा । नाहीं थोर मोठा लाहान प्रसंगीं ॥४॥ तुका म्हणे येथें प्रेम भंगूं नये कोण्ही । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ॥६॥

१०७. देव जाणता देव जाणता । आपुलीया सत्ता येकायेकी ॥१॥ देव चतुर देव चतुर । जाणोनी अंतर वर्ततसे ॥२॥ देव नीराळा देव नीराळा । अलिप्त विटाळ तुका म्हणे ॥३॥

१०८. शिंदळीचें चित्त पर पुरुषावरी । पति चुरमुरी रात्रंदिवस ॥१॥ ऐसी ती वोंगळ जाय हो नरका । तिच्या दोषें देखा पती जाय ॥२॥ आपण बूडती पति बूडविती । दोन्हीं कुळें नेती अधःपाता ॥३॥ तुका म्हणे तिची न करावी संगति । होयील फजीती मागें पुढें ॥४॥

१०९. सरे ऐसें ज्याचें दान । त्याचे कोण उपकार ॥१॥ नको वाटूं ऐसे काचें । देयी वो साचे विठ्ठले ॥२॥ रडत मार्गे सांडी पोर । ते काय थोर माऊली ॥३॥ तुका म्हणे कीर्ति वाढे । धर्म गाढे ते ऐसे ॥४॥

११०. लोभावरी ठेउनी हेत । करी असत्य न्याय नीत ॥१॥ त्याच्या पूर्वजा पतन । नरकीं कीडे होती जाण ॥२॥ कोटिगोहत्यापातक । त्यासि घडले निष्टंक ॥३॥ मासा श्रवे जे सुंदरा । पाजि विटाळ पितरा ॥४॥ तुका म्हणे ऐसीयासी । यम गांजील सायासी ॥५॥

१११. देह जाईल जाईल । यासि काळ बा खाईल ॥१॥ कां रे नुमजसी दगडा । कैंचे हत्ती घोडे वाडा ॥२॥ लोड बालिस्तें सुपति । जरा आलिया फजीति ॥३॥ शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडवीती सेतातें ॥४॥ अझुनी तरी होई जागा । तुका म्हणे पुढें दगा ॥५॥

११२. मार्गे बहुतां जना राखिलें आडणी । धावसि निर्वाणीं नामघेतां ॥ ॥१॥ ऐसें ठावें जालें मज बरव्या परि । म्हणउनि करी धांवा तुझा ॥२॥ माझेविशीं तुज पडिला विसरू । आतां काय करूं पांडुरंगा ॥३॥ आझुनि कां नये तुम्हासि करुणा । दूरी नारायणा धरिलें मज ॥४॥ तुका म्हणे जाऊं पाहे प्राण माझा । आतां केशवराजा घालीं उडी ॥५॥

११३. कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेऊं आतां ॥१॥ तूं काय करिसी माझिया संचिता । धिक् हे अनंता झालें जिणें ॥२॥ पतीत पावना राहिलों हें आशा । आयिकोनी ठसा कीर्ति तुझी ॥३॥ आतां कोण करी माझा अंगीकार । कळलें निष्ठुर जालासी तूं ॥४॥ तुका म्हणे माझी मांडिली निरास । करितों जीव नाश तूजसाठीं ॥५॥

११४. तरी कां मार्गे वायां कीर्ति वाढवीली । जनांत आपुली ब्रीदावळी ॥१॥ साच करितां आतां फिरसी माघारा । ठाईंचें दातारा नेणवेची ॥२॥ संतांसी श्रीमुख कसें दाखवीसी । पुढें मात त्यासी सांगइन ॥३॥ घेई डांगोरा तुझीया नामाचा । नव्हे अनाथाचा नाथ ऐसा ॥४॥ तुका म्हणे आम्ही राहिलों मरोनी । तूं कां होसी धणी निमित्याचा ॥५॥

११५. आम्ही तुझ्या दासीं । जरी जावें पतनासी ॥१॥ तरी हें दिसे

विपरीत । कोठें बोलली हे नीत ॥२॥ तुझें नाम कंठीं । आम्हां संवसारअटी ॥३॥ तुका म्हणे काळ । करी आम्हांसी विटाळ ॥४॥

११६. लाजति पुराणें । वेदां येऊं पाहे उणें ॥१॥ आम्ही नामाचे धारक । केविलवाणे दिसे रंक ॥२॥ बोलिले ते संतीं । बोल वायाविण जाति ॥३॥ तुका म्हणे देवा । रोकडे हे मोड सेवा ॥४॥

११७. आहार निद्रे नलगे आदर । आपण सादर तेची होय ॥१॥ परिमितिवीण बोलणें तें वायां । फार थोडें काया पिंड पिंडी ॥२॥ समाधान त्याचें तोचि येक जाणे । आपुलिये खुणे पावोनीयां ॥३॥ तुका म्हणे होय पीडा ते न करी । मग राहे परी भलतीये ॥४॥

११८. भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥१॥ तैसे वोसपले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥२॥ जीव आवघे देव । खोटा नागवी संदेह ॥३॥ तुका म्हणे शुद्ध । मग तुटलिया भेद ॥४॥

११९. सरतें माझें तुझें । तरि हें उतरतें वोझें ॥१॥ नलगे सांडावें मांडावें । आहे शुद्धचि स्वभावें ॥२॥ घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ॥३॥ सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो शिण ॥४॥ करितां नारायण । येवढें वेच्तिां वचन ॥५॥ लाभ हानि हे समान । तैसा मान अपमान ॥६॥ तुका म्हणे याचें । नांव सोहळें तें साचें ॥७॥

१२०. तुज करितां होती ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥१॥ परि वर्म नेणे कोण्ही। पीडाखाणि भोगतील ॥२॥ उलंघिती पांगुळ गिरी । मुके करि अनुवाद ॥३॥ पापी होती पुण्यवंत । न करि घात दुर्जन ॥४॥ अवघे हेळा मात्रें हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥५॥ तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापूनि ॥६॥

१२१. पिकवावें धन । ज्याचि आस करि जन ॥१॥ पुरोनि उरे खातां देतां । नव्हे खंडण मविता ॥२॥ खोलिं पडे वोली बिज । तरि हाता लागे निज ॥३॥ तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापूनि ॥४॥

१२२. करिसि लाघवें । तूं हें खेळसि आघवें ॥१॥ केला अहंकार आड । आम्हा जगासि हा नाड ॥२॥ इत्थंभूत यावे । दाऊं लपोहि जाणावे ॥३॥ तुका म्हणे हो श्रीपति । आतां चाळवाल किती ॥४॥

१२३. घालिती पव्हया । वाटे अनाथाची.दया ॥१॥ तैसें कां हो नये करूं । पांडुरंगा मज तारू ॥२॥ रोगिथासि काढा । दे निवारिता पीडा ॥३॥ बुडत्यासाठीं उडी । घालितात काय जोडी ॥४॥ झाडितातिं कांटे । पुढें मागिलाचे वाटे ॥५॥ तुका म्हणे भार । घेति भाग त्यांचा फार ॥६॥

१२४. नका दंतकथा येथें सांगो कोण्ही । कोरडे ते मानी बोल कोण ॥१॥ अनुभव येथें पाहिजे साचार । न चलति चार आम्हापुढें ॥२॥ वरि कोण मानी रसाळ बोलणें । नाहीं झालीं मनें वोळखितो ॥३॥ निवडे वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोनी वेगळालीं ॥४॥ तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येरा गबाळाचें काम नये ॥५॥

१२५. न करी त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥१॥ भवसिंधूचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥२॥ याचे सोई पाउल वेचे । मग कैंचे आडथळे ॥३॥ तुका म्हणे खरें खोटें । न म्हणे मोठें लहान ॥४॥

१२६. रिकामें तूं नको मना । राहों क्षणक्षणाही ॥१॥ वेळोवेळां पारायण । नारायण हें करी ॥२॥ भ्रमणाच्या मोडी वाटा । न भरे फाटा आडरानें ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवें । हेंचि घ्यावें धाणिवरि ॥४॥

१२७. पंचभूतांचिये सांपडलों संदीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥१॥ आपल्या आपण बांधविला गळा । नेणेंचि निराळा असतांही ॥२॥ कासया हा सत्य मानिला संवसार । कां हे केले चार माझें माझें ॥३॥ कां नाहीं शरण गेला नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥४॥ किंचित सुखाचा धरिला अभिलाष । तेणें बहु नाश केला पुढें ॥५॥ तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करोनि सांडों होळी संचिताची ॥६॥

१२८. देव झाले अवघे जन । दोष गुण हारपले ॥१॥ बरवें झालें बरवें झालें । चित्त धालें महालाभें ॥२॥ दर्पणीचें दुसरें भासे । परि तें असे येक तें ॥३॥ तुका म्हणे सिंधुभेटी । उदका तुटी वोहळेसि ॥४॥

१२९. बहू प्रकार गव्हांचे । जिव्हा नाचे आवडी ॥१॥ सरली परी आवडी नवी । सिंधु दावी तरंग ॥२॥ घेतलें घ्यावें वेळोवेळां । माय बाळां न विसंबे ॥३॥ तुका म्हणे रस वचनीं । पडताळोनि तोची सेवी ॥४॥

१३०. आम्हा सोयिरे हरिजन । जन भाग्य निःकंचन ॥१॥ ज्याच्या धैर्या नाहीं भंग । भाव येकविध रंग ॥२॥ तान भूक चित्तीं । सदा देव आठविती ॥३॥ तुका म्हणे धन । ज्याचें निज नारायण ॥४॥

१३१. म्हणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोटभरी ॥१॥ खोटें कोठें सेरे तुझ्या पायांपासी । अंतर जाणसी पांडुरंगा ॥२॥ आचरणें खोटें आपणासि ठावें । लटिकें बोलावें दूसरें तें ॥३॥ तुका म्हणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधि तुम्हां ठावा ॥४॥

१३२. जळो तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडिलिया ॥१॥ कारण तें अंतरलें । वाईट भलें म्हणवितां ॥२॥ तांतडीनें नाशी । तांतडीनेंची संतोषी ॥ ॥३॥ तुका म्हणे धीर । नाहीं येकी बुद्धी स्थिर ॥४॥

१३३. चित्ताचें बांधलें जवळि तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥१॥ अंतरीं वसावी उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न शकेची ॥२॥ ब्रह्मांड कवळे आठवणेसाठीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥३॥ तुका म्हणे लाभ घरिचीया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां ॥४॥

१३४. दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ॥१॥ कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठऊनि मनें पाय असें ॥२॥ आणिकांचि येती अंतरा अंतरें । सुख दुःख बरें वाईट तें ॥३॥ तुका म्हणे घडे येकांताचा वास । तरिच या नाश संबंधाचा ॥४॥

१३५. धनवंत येक बहिरट आंधळे । शुभ्र कुष्ठ काळे भोग अंगीं ॥१॥ प्रारब्धाची गति न कळे विचित्र । आहे हातीं सूत्र विठोबाचे ॥२॥ आणिक रोगाचीं नांवें सांगों किती । अखंड असती जडोनियां ॥३॥ तुका म्हणे नष्ट संचिताचें दान । पावे खातां पण सुख नेदी ॥४॥

१३६. भेदाभेद ताळा न घडे घालिता । आठवा रे आतां नारायण ॥१॥ येणें येक केलें अवघें होय सांग । अच्युताच्या योगें नाम छंदें ॥२॥ भोवरे खळाळ चोर वाटा घेती । पावलें मारिति सिवेपासीं ॥३॥ तुका म्हणे येथें भावेंवीण पार । न पविजे सार हेंची आहे ॥४॥

१३७. जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत । त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी ॥१॥ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम । ते माझे परम प्राणसखे ॥२॥ जयांसी विठ्ठल आवडे लोचनीं । त्यांचें पायवणी स्वीकारीन ॥३॥ विठ्ठलासी जीहीं दिला सर्व भाव । त्यांच्या पायीं जीव ठेवीन मी ॥४॥ तुका म्हणे रज होईन चरणींचा । म्हणविति त्यांच्या हरिचे दास ॥५॥

१३८. काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद येका भावें॥१॥ निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारी पां हित लवलाहीं ॥२॥ तुका म्हणे भावभक्ति हें कारण । नागवी भूषण दंभ तोची ॥३॥

१३९. देवकीनंदनें । केलें आपुल्या चिंतनें ॥१॥ मज आपुलिया ऐसें । मना लाऊनियां पिसें ॥२॥ गोंवळे गोपाळा । केले लावूनियां चाळा ॥३॥ तुका म्हणे संग । केला दूरि नव्हे मग ॥४॥

१४०. माझीया जीवासि हेचि पैं विश्रांती । तुझे पाय चित्तीं पांडुरंगा॥१॥ भांडवल गांठीं आलें सपुरतें । समाधान चित्तें मानियेलें ॥२॥ उदंड उच्चारीं घेतला पसारू । रूपावरी भारू आवडीच्या ॥३॥ तुका म्हणे मज भक्तीची आवडी । अभेदीं तांतडी नाहीं म्हणूं ॥४॥

१४१. येकविध आम्ही न धरूं पालट । न संडु हे वाट सांपडला ॥१॥ म्हणऊनि केला पाहिजे सांभाळ । माझें बुद्धिबळ पाय तुझे ॥२॥ बहुत न कळे बोलतां प्रकार । अंतरा अंतर साक्ष असे ॥३॥ तुका म्हणे अगा जीवींच्या जीवना । तूंची नारायणा साक्षी माझा ॥४॥

१४२. राहो येची ठाईं । माझा भाव तुझे पायीं ॥१॥ करीन नामाचें चिंतन । जाऊं नेदी कोठें मन ॥२॥ देईन येरसीं । आतां बुडी सर्वविशीं ॥३॥ तुका म्हणे देवा । साटी करोनियां जीवा ॥४॥

१४३. तैसे नहो आम्ही विठ्ठलांचे दास । यात्रें आणिकास काकूळती ॥१॥ स्वामिचीया सत्ता ठेंगूणें सकळ । आला कळिकाळ हाताखालीं ॥२॥ अंकिताचा असे अभीमान देवा । समर्पूनि हेवा असो पायीं ॥३॥ तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥४॥

१४४. मोक्ष देवापाशीं नाहीं । लटिक्या घाई विव्हळतो ॥१॥ काय

खरें न धरी शुद्धि । गेली बुद्धि भ्रमलें ॥२॥ अहंकारा उरलें कांहीं । पांचा ठाईं हें वाटे ॥३॥ तुका म्हणे कुंथे भारें । लटिकें खरें मानूनियां ॥४॥

१४५. आपुला तो येक देव करोनिया घ्यावा । तेणेंवीण जीवा सुख नव्हे ॥१॥ येर तीं माईकें दुःखाचीं जनीतीं । नाहीं आदि अंतीं अवसान ॥२॥ अविनाश करी आपुलिया ऐसें । लावी मना पिसें गोविंदाचे ॥३॥ तुका म्हणे येका मरणेंची सरे । उत्तमाचि उरे कीर्ती मागें ॥४॥

१४६. आजीचें हें मज तुम्ही कृपादान । दिल्हें संतजन मायबापें ॥१॥ आलीं मुखावाटे अमृतवचनें । उत्तीर्णता येणें नव्हे जन्में ॥२॥ तुका म्हणे तुम्ही उदार कृपाळ । शृंगारिले बाळ कवतुकें ॥३॥

१४७. स्तुति अथवा निंदा करावी देवाची । अधम तो वेंची व्यर्थ वाणी ॥१॥ ऐकोनिया होती बहीर हे बोल । वेंचोनी ते मोल नरका जाती ॥२॥ इहलोकीं थुंका पडे तोंडावरी । करणें अघोरी वास लागे ॥३॥ तुका म्हणे माप वाचे ऐसें निकें । भरलें नरकें निंदेसाठीं ॥४॥

१४८. लोह कफ गार सिद्ध हे सामुग्री । अग्नि टणत्कारि दिसों येतो ॥१॥ सांगावें तें काई सांगावें तें काई । चित्ता होय ठाईं अनुभव तो ॥२॥ अन्नें सांगों येतो· तृप्तीचा अनुभव । करोनी उपाव घेऊं हेवा ॥२॥ तुका म्हणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नांव ठेवी ॥४॥

१४९. बाळाचें जीवन । माता जाणे भूक तहान ॥१॥ काय करूं विनवणी । असो मस्तक चरणीं ॥२॥ ठेविलिये ठाईं । चित्त ठेउनि असे पायीं ॥ ॥३॥ करितो हे सेवा । चिंतन सर्वां ठाईं देवा ॥४॥ न्यून तेंचि पुरें । करोनि घ्यावें दातारें ॥५॥ तुका म्हणे बुद्धि । अल्प असे अपराधी ॥६॥

१५०. जाणतों समय । परिमित कामा नये ॥१॥ तुम्हीं सांगावें ते बरें । देवा सकळ विचारें ॥२॥ फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होती ऐसी ॥३॥ तुका म्हणे आहे । धर पाय मज साहे ॥४॥

१५१. द्वारपाळ विनंति करी । उभे द्वारिं राऊळा ॥१॥ आपुलीया शरणांगता । वाहों चिंता न द्यावी ॥२॥ वचना या चित्त द्यावें । आसे ठावें तुम्हांसी ॥३॥ तुका म्हणे कृपासिंधु । दीनबंधु केशवा ॥४॥

१५२. दोहीं बाहीं आम्हा वास । असों कास घालोनी ॥१॥ बोल बोलों उभयतां । स्वामिसत्ता सेवेची ॥२॥ येकसरें आज्ञा केली । असो चाली ते नीति ॥३॥ तुका म्हणे जोहरितों । आहे होतों ते ठाईं ॥४॥

१५३. आयिका जी देवा माझी वीनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥१॥ सान्निध पातलों सांडोनिया शंका । सन्मुखची येका येकीं पुढें ॥२॥ जाणविलें कोठें पावे पायापासीं । केली या जीवासी साठीं म्हूण ॥३॥ तुका म्हणे माझे हातीं हा उद्धार । करीं कीरकीर म्हणवूनी ॥४॥

१५४. बैसलों तों कडियेवरि । नव्हे दूरि वेगळा ॥१॥ घडलें हें बहुतां दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥२॥ बहु होता झाला शीण । नाहीं क्षण विसावा ॥३॥ दुःखें केलें मी तूं पणें । जवळि नेणें होतें तें ॥४॥ पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ॥५॥ तुका म्हणे मायबापा । झणि कोपा विठ्ठला ॥६॥

१५५. तुझे नाम मुखीं तयासि विपात्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥१॥ काय जाणों देवा होसिल निजेला । नेणों जी विठ्ठला मायबापा ॥२॥ भवबंधनाचे तुटतील फांसे । तें कां येथें ऐसे आव्हेरिले ॥३॥ तुका म्हणे माझें दचकलें मन । वाटे वायांवीण शीण केला ॥४॥

१५६. सेवकें करावें सांगितलें काम । शिक्याचा तो धर्म स्वामी राखे ॥ ॥१॥ काय देवा नेणों आलें गांढेपण । तुम्हीं शक्तिहीन झालां दिसे ॥२॥ विष्णुदास आम्ही निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥३॥ तुका म्हणे मूळ पाठवा लवकरी । किंवा करूं हरि काय सांगा ॥४॥

१५७. खेळतां निजभावें समर्थाचें बाळ । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥१॥ तरि लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ॥२॥ अवघीच दिशा असावी मोकाळि । मायबाप बळी म्हणऊनि ॥३॥ तुका म्हणे माझें आहे ऐसें देवा । म्हणऊनि सेवा समर्पीली ॥४॥

१५८, निरंजनी येकटवाणें । संग नेणें दुसरा ॥१॥ पाहा चाळविलें कैसें । लाउनि पिसें गोवळे ॥२॥ लपलें आंगें आंग । दिल्हा संग होता तो ॥३॥ तुका म्हणे नव्हतें ठावें । झालें भावें वाटोळें ॥४॥

१५९. नव्हति भेटि तेंचि बरें । होतां चोरें नाडिलें ॥१॥ अवघियांचा

केला झाडा । रितां वाडा खोंकर ॥२॥ चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हारोनि ॥३॥ तुका म्हणे मुळा आलें । होतें केलें तैसेंची ॥४॥

१६०. जया ठाईं आवडी ठेली । मज तें बोली न संडे ॥१॥ पुरवावें जिवींचें कोड । भेटी गोड तूज मज ॥२॥ आणिलें येथवरि । रूप दूरि न करावें ॥३॥ तुका म्हणे नारायणा । सेवाहीना धिकवृत्ति ॥४॥

१६१. सरलीयाचा सोस मनीं । लाजोनियां राहिलों ॥१॥ आवडीनें बोलावितों । येथें तें तों लपावें ॥२॥ माझें तेंचि मज द्यावें । होतें भावें जोडिलें ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरा । आळिकरा बूझावा ॥४॥

१६२. नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ॥१॥ चेष्टविलीं माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालती ॥२॥ नामरूपें रंगा आलीं । तेंचि झालीं स्वभावें ॥ ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगें । अंग संगें कवळिलें ॥४॥

१६३. खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें । नव्हती हे छंद नाशीवंते ॥१॥ माझा मायबाप उभा विटेवरी । कवतूकें करी कृपादान ॥२॥ प्रसादाची वाणी वदति उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥३॥ तुका म्हणे रस वाढातिया अंगें। छाया पांडुरंगें केली वरी ॥४॥

१६४. अखंड मुडतर । सासुरवास करकर ॥१॥ याची झाली बोळवण । आतां न देखो तो शिण ॥२॥ बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥३॥ तुका म्हणे मूळें । खंड झाला येक वेळें ॥४॥

१६५. अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥१॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥२॥ चुकलासा दिसे पंथ । गेले संत तो ऐसा ॥ ॥३॥ तुका म्हणे सोंग वायां । कारण या अनुभवें ॥४॥

१६६. आतां तुम्ही कृपावंत । साधुसंत जीवलग ॥१॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हांसी ॥२॥ वंचिलें तें पायांपासीं । नाहीं यासि वेगळें ॥ ॥३॥ तुका म्हणे सोडल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥४॥

१६७. सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ॥१॥ गायनाचें येवढें जाणें । विठ्ठल म्हणे निर्लज्ज ॥२॥ अवघें माझें हेंचि धन । साधनहि सकळ ॥३॥ तुका म्हणे पायां पडे । तुमच्या कोडें संताच्या ॥४॥

१६८. धरिलें होतें चित्तीं । डोळां तेंचि दिसती ॥१॥ आलें आवडिशी फळ । झालें कारण सकळ ॥२॥ घेईन भातुकें । मागोनिया कवतुकें ॥३॥ तुका म्हणे लाड । विठोबा पुरवील कोड ॥४॥

१६९. बहुतां दिसांची आजी झाली भेटी । झाली होती तुटी काळगती ॥१॥ येथें सावकाश घेईन ते धणी । गेली आडचणी उगवोनी ॥२॥ बहु दुःख दिल्हें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥३॥ बहु दीस होता सांडिला मारग । क्लेशाचा तो त्याग आजी झाला ॥४॥ बहु होतीं केली सोंगसंपादणी । लौकिकापासोनी निर्गमले ॥५॥ तुका म्हणे येथें झालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥६॥

१७०. पुत्र झाला चोर । मायबापां हर्ष थोर ॥१॥ आतां कशासाठीं । हाट धाटे गुडघे घडी ॥२॥ आइते अपहार । आणोनीयां भरी घर ॥३॥ मानिली निश्चिति । नरका जावया उभयतीं ॥४॥ झोडा झोडागिंचे पोटीं । फळें बीजें ती करंटीं ॥५॥ तुका म्हणे बेट्या । भांडवल नलगे खट्या ॥६॥

१७१. येवढी अपकीर्ती । ऐकोनियां ती फजीती ॥१॥ जरी दाखविल वदन । थुंका थुंका तो देखोन ॥२॥ काळिमेचें जीणें । जिऊनीया राहे सुणें ॥३॥ तुका म्हणे गुण । दरुषनें अपशकुन ॥४॥

१७२. समर्थासी नाहीं वर्णावर्ण भेद । सामुग्री ते सिद्ध सर्वा घरीं ॥१॥ आदराचि ठाईं बहुच आदर । मागितले फार तेथें वाढी ॥२॥ न म्हणे सुहृद सोईरा आवश्यक । राजा आणि रंक सारिखेची ॥३॥ भाव देखें तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंची ॥४॥ कोणा न विसंबे याचकाचा ठाव । विनवूनि देव शंका फेडी ॥५॥ तुका म्हणे पोट भरुनी उरवी । आलें ऐसें दावी अनुभवा ॥६॥

१७३. पुंडलीक भक्तराज । तेणें साधीयेलें काज । वैकुंठीचें नीज । परब्रह्म आणिलें ॥१॥ पांडुरंग बाळमूर्ती । गाईगोपाळ सांगाती । येऊनीयां प्रीती । उभे समचरणी राहिले ॥२॥ येका आगळें अक्षरें । भूवैकुंठ दुसरें । म्हणवीति येरें । परि तीं ऐशीं नव्हती ॥३॥ पाप पंचक्रोशीमधीं । येऊं न शकेचि कधीं । कैंची तेथें विधी । निषेधाची वसती ॥४॥ पुराणीं बोलति ऐसे ।

चतुभूज तीं माणसें । सुदर्शनावरि बसे । परि ते न बुडे कल्पांतीं ॥५॥ अनुपम्य इची थोरी । महाक्षेत्र हें पंढरी । धन्य धन्य वारकरी । तुका म्हणे तेथींचे ॥६॥

१७४. देह मृत्याचें भातुकें । कळों आलें कवतुकें ॥१॥ काय मानियलें सार । हेंचि वाटतें आश्चर्य ॥२॥ नाना भोगांचीं सांचितें । करोनि ठेवीलें आईतें ॥३॥ तुका म्हणे कोडीं । उगवूं न सकतीं बापुडीं ॥४॥

१७५. त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥१॥ आतां असो तुझे पायीं हें मोटळें । इंद्रियें सकळ काया मन ॥२॥ सांडी मांडी विधीनिषेधाचा ठाव । न कळतां भाव जाइल वायां ॥३॥ तुका म्हणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥४॥

१७६. दावूनीयां मांड । पुरे न करीति भांड ॥१॥ जळो जळो तैसें जीणें । फटमर लाजिरवाणें ॥२॥ घेतलें तैसें सोंग । बरवें संपादावें सांग ॥३॥ तुका म्हणे धीरें । देव नुपेक्षील खरें ॥४॥

१७७. न पालटे जाति जीवाचिये साठीं । बाह्य तेचि पोटीं दावी वरी॥ ॥१॥ अंतर सबाह्य सारिखाची रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥२॥ घणाचिये घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणें धीरा आपूलिया ॥३॥ तुका म्हणे कढे करावें सीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥४॥

१७८. देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥१॥ देह देवाचें सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥२॥ विश्वासी निर्धार । विस्तारले विश्वंभर ॥३॥ तुका म्हणे व्हावें । बळ येकची जाणावें ॥४॥

१७९. दिल्ही मान तरी न घ्यावी शत्रूची । शरण आलें त्यासी जतन जीवें ॥१॥ समर्थासी असे विचाराची आण । भलीं पाप पुण्य विचारावें ॥२॥ काकुलतीसाठीं सत्याचा विसर । पडिलें अंतर न पाहिजे ॥३॥ तुका म्हणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥४॥

१८०. विचारिलें आधीं आपुले मानसीं । वांचों येथें कैसी कोण्या द्वारें ॥१॥ तंव झाला साह्य हृदयनिवासी । बुद्धि दिल्ही ऐसी नाश नाहीं ॥२॥ उद्वेगाचे होतों पडिलों समुद्रीं । कोणे रीती तीरीं पाविजेल ॥३॥ तुका म्हणे दुःखें आला आयुर्भाव । झाला बहु जीव कासावीस ॥४॥

१८१. आपुलें वेंचोनी खोडा घाली पाव। ऐसा तो हा जीव हीन बुद्धि ॥१॥ विषयाच्या संगें आयुष्याचा नाश । पडियेलें वोस स्वहिताचें ॥२॥ भुलल्याचें अंग आपणा पारिखें । छंदाचे सारिखें वर्ततसे ॥३॥ तुका म्हणे दुःख उमटे परीणामीं । लंपटासी कामीं रतलीया ॥४॥

१८२. केलें शकूनें प्रयाण । आतां मागें फिरे कोण ॥१॥ होय तैसें होउं आतां । देह बळी काय चिंता ॥२॥ पाडिलें पालवीं । त्याचा धाक वाहे जीवीं ॥३॥ तुका म्हणे जीणें । देवा काय हीनपणें ॥४॥

१८४. आळणी ऐसें कळों आलें । त्यासि भलें मौनचि ॥१॥ न घे कांहीं वेंचूं वाणी । वेडे घाणीसंगातें ॥२॥ वेगळें तें देह भावा। भ्रम जीवा माझीरा ॥३॥ तुका म्हणे कवतुक केलें । किंवा भलें दवडितां ॥४॥

१८४. चित्ताचा चाळक। त्याचें उभय सूत्र एक ॥१॥ नाचवी तो नाचे छंदें । सुखें आपुल्या वीनोदें ॥२॥ चंद्र कमळणी। नाहीं धाडीत सांगोनी ॥३॥ तुका म्हणे उठी । लोह चुंबकाचे दृष्टि ॥४॥

१८५. करितां तडातोडी । वत्स माते सोई ओढी ॥१॥ करीत्याचा आग्रह उरे । येक येकासाठीं झुरे ॥२॥ भुके इच्छि अन्न । तेंही त्यासाठीं निर्माण ॥३॥ तुका म्हणे जाती । येक येकाचीये चित्तीं ॥४॥

१८६. निघालें दिवाळें । झालें देवाचें वाटोळें ॥१॥ आतां वेंचूं नये वाणी । विचारावें मनिंच्या मनीं ॥२॥ गुंडाळलीं पोतीं । भीतरीं लावियेली वाति ॥३॥ तुका म्हणे करा । ऐसा राहे माजी घरा ॥४॥

१८७. तीर्थाचिये पंथें चाले तो निदैव । पाविजेतो ठाव अंतराया ॥१॥ म्हणऊनी भले निश्चळची स्थळीं । मनाचीये मूळीं बैसोनीयां ॥२॥ संकल्पारूढ तें पराधीन जीणें । कार्यंची कारण वाढतसे ॥३॥ तुका म्हणे काम नाहीं येक मुख । जिरवितां सुख होतें पोटीं ॥४॥

१८८. क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥१॥ नासिवंत देह जाणा रे सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥२॥ संतसमागमीं धरोनी आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥३॥ तुका म्हैणे इहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरोनी राहों ॥४॥

१८९. कोणासी विचार करावा शेवटीं । येवढ्या लाभें तुटी झाल्या तरे ॥१॥ सांभाळीतो शूर आला घावडाव । पुढें दिल्हा पाव न करी मागें ॥२॥ घात तो या नांवें येथें अंतराये । अंतरल्या पाय गोविंदाचे ॥३॥ तुका म्हणे गडसंधीचा हा ठाव । केला तो ऊपाव कार्या येतो ॥४॥

१९०. असा जी सोवळें । आहा तैसेची नीराळें ॥१॥ आम्ही नयों तुमच्या वाटा । काय लटिकाची ताठा ॥२॥ चिंतनची पुरे । काय सलगी सवें धुरे ॥३॥ तुका म्हणे देवा । नका नावडे ते सेवा ॥४॥

१९१. अहंकार तो नासा भेद । जगीं निंद वोंवळा ॥१॥ नातळे तो धन्य त्यासि । जाला वंशीं दीपक ॥२॥ करवितो आत्महत्या । नेदी आतां आतळों ॥३॥ तुका म्हणे गुरुगुरी । माथां थोरी धरोनी ॥४॥

१९२. इच्छिलें तें शकुनवंती । होय देती तात्काळ ॥१॥ क्षीरा नीरा निवड करी । वरावरी विठ्ठल ॥२॥ भाग्यावीण कैचें फळ । अंतर मळमूत्राचें ॥३॥ तुका म्हणे सांचित कुडें । तें बापुडें करीतसे ॥४॥

१९३. कशासाठीं आम्ही जाळीला संसार । न करी विचार ऐसा देवा ॥१॥ कैसें नेणों आम्हा करवतें उदास । माझा प्रेमरस भंगावया ॥२॥ समर्पूनि ठेलों देह हा सकळ । धरीतां विटाळ न लजा माझा ॥३॥ तुका म्हणे अवघी मोकलोनि आस । फिरतो उदास कोणासाठीं ॥४॥

१९४. नाहीं तुम्हा कांहीं लाविलें मागणें । कांटाळ्याच्या भेणें त्रासलेती ॥१॥ येखादीया परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ॥२॥ पायांच्या वियोगें प्राणासर्वेसाठीं । नेघेवेसी तुटी झाली आतां ॥३॥ तुका म्हणे तुम्हा मागणें तें आतां । हेंची कृपावंता चरणीं वास ॥४॥

१९५. जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥१॥ धर्मे भूतांची ते दया । संत कारण ऐसीया ॥२॥ नव्हे माझें मत । साक्षी करूनी सांगे संत ॥३॥ तुका म्हणे जीवें । दावि उमटोनि अनुभवें ॥४॥

१९६. दंड अन्यायाच्या माथा । देखुनि करावा या सर्वथा ॥१॥ नये उगें बहुत घाडुं । सिसें सोनियांत आडुं ॥२॥ पापपुण्यासाठीं । नीत केली आतां खोटी ॥३॥ तुका म्हणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥४॥

१९७. आम्ही पतित तू पावन । होतों पूर्वापार जाण ॥१॥ नवें करो नये जूनें । सांभाळावें ज्याचें त्याणें ॥२॥ मिरासीचा ठाव । राखा करोनि ऊपाव ॥३॥ वादे मारी हाका । देवा आयिकवी तो तुका ॥४॥

१९८. पाडावी ते बरी गांठि धूरेसवें खरी ॥१॥ नये मरों लंडीपणें । काय बापुडें तें जिणें ॥२॥ लुटावें भांडार । तरी जया नाहीं पार ॥३॥ तुका म्हणे नांवें । किति आगळीनें जावें ॥४॥

१९९. भांडणेंची झालें । मग जीवाचें काय आलें ॥१॥ येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥२॥ करितां सरोभरी । कांहीं न ठेवावी उरी ॥३॥ तुका म्हणे शूर । व्हावें धूरेसींच धूर ॥४॥

२००. जन्मांतरीं शुद्ध नाहीं आचरण । यालागीं चरण अंतरले ॥१॥ वोढवलें संचित येणें जन्में पाहातां । आतां पंढरीनाथा कृपा करीं ॥२॥ पतितपावन ब्रिद साच करीं देवा । यालागीं कुडावा करीं माझा ॥३॥ अपराधी पातकी दुष्ट दुराचारी । आहाळलों भारी संवसारें ॥४॥ काम क्रोध आधीं कल्पनेच्या त्रासें । तुज पवे ऐसें झालें देवा ॥५॥ हा ना तो सा ठाव झाला पांडुरंगा । नयेची उपेगा काय करूं ॥६॥ आपुलीया नांवा धांवणीया धांवें । लवकरी यावें तुका म्हणे ॥७॥

२०१. प्रथमभेटी आलिंगन । मग चरण वंदावे ॥१॥ ऐसा माझा भोळा बाप । हरि ताप कवळोनी ॥२॥ न सांगतां शीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । द्यावें भातें न मागतां ॥४॥

२०२. वचनाचा अनुभव हातीं । बोलवीती देव मज ॥१॥ परि हें न कळे अभाविका । जडलोकां जीवांसी ॥२॥ अनुश्रुत हे प्रासादिक । कृपा भीक स्वामीची ॥३॥ तुका म्हणे वरावरी । जातों तरी सांगत ॥४॥

२०३. कां रे तुम्ही ठेवा बहुतां निमित्तें । माझीया संचितें वोढवलें ॥१॥ भक्तिप्रेम गोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥२॥ पुशीलें पटल तिमिर विठ्ठलें । जगाचि भरलें ब्रह्मानंदें ॥३॥ तुका म्हणे केला कामने वेगळा । आवडी गोपाळावरी असे ॥४॥

२०४. आसन शयन भोजन गोविंदें । भरलें आनंदें त्रिभुवन ॥१॥ अवघिया केली काळें तडातोडी । अवसर घडी पुरों नये ॥२॥ वाटणी घातलें

शरीराचे भाग । दुजीयाचा लाग खंडीयेला ॥३॥ आवडीच्या आलें आहारासी रूप । पृथक संकल्प मावळले ॥४॥ काम तरि क्रोध बुद्धि मन नासे । भ्रमाचे वोळसे गिळिले शांति ॥५॥ तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग येकविध ॥६॥

२०५. ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढा नारायण स्मरवीतो ॥१॥ भवव्याधि येणें तुटेल रोकडी । करोनिया झाडा निश्चयेंसी ॥२॥ आणिकां उपायां अनुपान कठिण । भोगे बरें शीण शिघ्रवत ॥३॥ तुका म्हणे केला उघडा पसारा । भाग्य आलें घरा दारावरी ॥४॥

२०६. जपाचें निमित्त झोंपेचा पसरू । देहाचा विसरूं पाडोनियां ॥१॥ ऐसें तें भजन अंमगळवाणी । सोंग संपादणी भोरप्याची ॥२॥ सेवेशी विकिलें लोभाचिये आशे । तया कोठें असे उरला देव ॥३॥ तुका म्हणे मान दंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आम्ही ॥४॥

२०७. परद्रव्य परकांता । नातळे जयाचीया चित्ता । आणिक कर्मी तो तत्त्वतां । बांधला नव जाये ॥१॥ ऐसा अनुभव रोकडा । विश्वास तो जीवा जोडा । येकांत त्या पुढा । अवघा करी उकला ॥२॥ सकट आंबलें अन्न । शोधि तेंचि मद्यपान । विषमानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥३॥ तुका म्हणे नीत । बरवीं अनुभवीं उचित । तरि काय हित । मोल घ्यावें लागतें ॥४॥

२०८. भूक पोटापूरती । तृष्णा भरवी वाखती । करवी फजीति । हावें भार वाढला ॥१॥ कुळिकेशि लांस फांस । डोई दाढि बोडवी दोष । अविहित नाश । करवि वचन चुकतां ॥२॥ विधिसेवनें विहितें । कार्यकारणापुरतें । न वाटे जो चित्तें । अधर्माच्या तो त्यागि ॥३॥ आज्ञा पाळण ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका म्हणे ठेवा । ठेविला तो जतन ॥४॥

२०९. कळे न कळे ते धर्म । ऐका सांगतों रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासें उच्चांरा ॥१॥ तो या दाखवील वाटा । जया पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोठा । पाहिजे तो कळवळा ॥२॥ पुसतां चुका होत वाटा । सवें बोळावा गोमटा । मोडो नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ॥३॥ तुका म्हणे मोल । नलगे द्यावे वेचा बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मानसीं ॥४॥

२१०. तरि कां वोळंगणें । राजद्वारीं होती सुणें ॥१॥ अंगीं दाऊनि निष्कामता । पोकळ पोकळि ते वृथा ॥२॥ कासया मोकळ । भोंवते शिष्याचे गाबाळ ॥३॥ तुका म्हणे ढाळे । बाह्यरंग तें निराळें ॥४॥

२११. हरिच्या दासा सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥१॥ कडिये देव वाहे खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥२॥ सरति येणें आटाआटी । नाहीं तुट लाभाची ॥३॥ तुका म्हणे समाधान । सदा मन आमुचें ॥४॥

२१२ भूतांचिये नांदे जीवीं । गोसावीच सकळां ॥१॥ क्षणक्षणा जागा ठाईं । दृढ पाईं विश्वास ॥२॥ दाऊनियां सोंग दुजें । अंतरीं बीजें वसतसे ॥३॥ तुका म्हणे जाणे धर्म । धरीं तें वर्म चिंतनें ॥४॥

२१३. संत आले घरा । तो मी अभागी दातारा ॥१॥ कासयानें पूजा करूं । चरण हृदयीं धरूं ॥२॥ काया कुरवंडी । करुनि वोवाळोनि सांडी ॥३॥ तुका म्हणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥४॥

२१४. भेद तुटलियावरी । आम्ही तुमचींच हरी ॥१॥ आतां पाळावें पाळावें । आम्हां लडिवाळांचे लळे ॥२॥ आणिकांची देवा । नाहीं जाणतची सेवा ॥३॥ तुका म्हणे हेवा । माझा हेत पायीं देवा ॥४॥

२१५. आमुची विश्रांति । तुझे चरण कमळापति ॥१॥ पुढति पूढति नमन । घालोनीयां लोटांगण ॥२॥ हेंची येक जाणें । काया वाचा आणि मनें ॥३॥ नीच जनालोकां । तळिले पायरीसी तुका ॥४॥

२१६. विनवितों शेवटीं । आहे तैसें माझे पोटीं ॥१॥ कंठीं राहावें राहावें । हेंचि मागतसें भावें ॥२॥ पुरली वासना । येणें होईल नारायणा ॥३॥ तुका म्हणे जो देहाडा । तोचि वर्णिन पवाडा ॥४॥

२१७. आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥१॥ ऐसीं उफराटीं वर्में । कळों भ्रमें न येति ॥२॥ नलगे समाधान मोल । रुचति बोल प्रीतीचे ॥३॥ तुका म्हणे येका जीवें । सूत्र व्हावें गुंतलें ॥४॥

२१८ बाळि मीति लातेवरि । मारि तेणें संतोषे ॥१॥ सुख वसे चित्ता आंगीं । हेही रंगीं मिळाले ॥२॥ भक्षी त्याचा जीवमाग । आला भाग तो बरा ॥३॥ तुका म्हणे ऋणानुबंधें । सांगे सुदे सकळा ॥४॥

२१९. शिवल्यावरी जाळ । वायां जायाचें तें मूळ ॥१॥ ऐसा वारावा तो श्रम । अतिशय नाहीं काम ॥२॥ सांभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥३॥ तुका म्हणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥४॥

२२०. उभा ऐल थडी । तेणें घालों नये उडी ॥१॥ पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥२॥ दिसतें आहारी । नये जाऊं ऐशावरी ॥३॥ आळसाची धाडी । तुका म्हणे बहू नाडी ॥४॥

२२१. शक्ति द्यावी देवा । नाहीं पार्थिवाची सेवा ॥१॥ मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥२॥ मना पोटीं देव । जाणे जैसा तैसा भाव ॥३॥ तुका म्हणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ॥४॥

२२२. कार्यच कारण । तृष्णा पाववी ते शिण ॥२॥ काय करोनि ऐसा संग । सोसेंचि तूं पांडुरंग ॥२॥ रूपीं नाहीं गोडी । हावे हावे ऊर फोडी ॥३॥ तुका म्हणे पडे भरी । ऐसा वरदळाचे थोरी ॥४॥

२२३. संसाराचे नांवें घालोनियां शून्य । वाढतां हा पुण्य केला धर्म ॥१॥ हरिभजनें हें वळविलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥२॥ कोण्हाही नलगे साधनाचा पांग । करणें केला त्याग देहबुद्धि ॥३॥ तुका म्हणे सुख समाधि हरि कथा । नेणें भवव्यथा गाईल तो ॥४॥

२२४. विश्वासिया नाहीं लागत सायास । अनायासें रस अंगा येतो ॥१॥ लेंकराचे हातें घास मागे माता । वोरसोनि चित्ता सुख पावे ॥२॥ गौरव तो मानी अरुषा वचनीं । भूषण ते वाणी मिरवावी ॥३॥ तुका म्हणे आहे सकळहि साक्षी । माझा तो कई पक्षी पांडुरंग ॥४॥

२२५. वैभवाचे धणी सकळ शरणांगत । सत्य भावें चित्त अर्पीलें तें ॥१॥ नेदीं उरों देव आपणा वेगळें । भावाचीया बळें ठायाठाव ॥२॥ जाणोनी नेणोनी अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणची ॥३॥ तुका म्हणे बरें धाकट्याचें जीणें । माता स्तनपानें वाढवीते ॥४॥ ८१०४४

२२६. कई ऐशी दशा येइल माझ्या आंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥ ॥१॥ नाठऊनि देह पायाचें चिंतन । अवसान ते क्षण नाहीं मधीं ॥२॥ कई

ऐसा पात्र होईन लाभाशी । नेणो ऋषीकेशी तुष्टतील ॥३॥ तुका म्हणे अन्य मानीन संचीत । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥४॥

२२७. नाहीं वागवीत जाणिवेचें वोझें । स्वामिसेवा काजें निर्द्धारु हा ॥१॥ आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार । येणें फिटे भार निश्चयेंसि ॥२॥ आळिकेरे आम्ही येकविध चित्तें । तैसें होऊं येतें मायबापें ॥३॥ तुका म्हणे माझी जातीची ये सेवा । घातलासे देवावरी भार ॥४॥

२२८. काय नाहीं माझें अंतरीं वसती । व्यापक हा भूतीं सकळां नांदे ॥ ॥१॥ चित्तासि प्रसाद होईल चळण । तेचि तें वळण मनासहि ॥२॥ सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंठीत । नाहीं केलें होत आपुलें तें ॥३॥ तुका म्हणे दोरी खांब सुत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥४॥

२२९. देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासी होते विकल्प तें ॥१॥ वाहिले देह देवा येकसरें । होईल तें बरें तेणें द्वारें ॥२॥ होता भार त्याची निवारीलि खंती । येथें आतां रीति सांठवण ॥३॥ तुका म्हणे इच्छे पावविले कष्ट । म्हणऊनि नष्ट दुरावीली ॥४॥

२३०. देव तीर्थी येर दिसे जया वोस । तोची तया दोष जाणतीया ॥ ॥१॥ तयां बरें फावे देवा चुकवीतां । संचिताची सत्ता आंतराये ॥२॥ शुद्धा-शुद्ध ठाव पापपुण्य बीजें । पाववीलें दुजे फळ भोग ॥३॥ तुका म्हणे विश्वं-भरा ऐसें वर्म । चुकालिया धर्म अवघे मिथ्या ॥४॥

२३१. काय करूं सांगतांही न कळे तें वर्म । उपास्थित भ्रम उपजवीतो ॥ ॥१॥ मन आधीं ज्याचें आलें होईल हाता । तयावरी सत्ता केली चाले ॥२॥ अभूकेचे आंगीं चवी ना संवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥३॥ तुका म्हणे आप राखावे आपणा । संकोचाचि कोणा नये आतां ॥४॥

२३२. अमृत आव्हेरे उचंबळें जातां । विष आर्तभूता आवश्यक ॥१॥ आदरासी मोल नये लाऊं केजें । धीर शुद्धबीज गोमटा तो ॥२॥ खऱ्या-चिये अंगीं आपणेची चाली । लावणी लागली काय लागे ॥३॥ तुका म्हणे चाड करा वेवसाव ॥ आम्हासि तो वाव धीर आहे ॥४॥

२३३. अनुभवाचे रस देऊं आर्तभूता । सोई चोजवितां पुढें पोतीं ॥१॥ देवाचा प्रसाद रत्नाच्या घोवणी । शोभतील गुणी आपुलीया ॥२॥ आधीं

भाव सार शुद्ध ते भूमीका । बीज आणि पीका चिंता नाहीं ॥३॥ तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥४॥

२३४. काय मज येवढा भार । हे वेव्हार चालावया ॥१॥ उकल तो जाणे धाणि । मज भोजनीं कारण ॥२॥ चिंता ज्याची तया शिरीं । लेंकरीं तें खेळावें ॥३॥ तुका म्हणे शेवट झाला । देव या बोला भोगिता ॥४॥

२३५. येकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तोहि मळ नाहीं येथें ॥ ॥१॥ घ्यावें द्यावें आम्ही आपुलिया सत्ता । न देखों पुसता दुजा कोणी ॥२॥ भांडाराची किल्ली माझ्या हातीं आहे । पाहिजे तो पाहे वाण येथें ॥३॥ तुका म्हणे आम्हा विश्वासाच्या बळें । ठेविलें मोकळें देवें येथें ॥४॥

२३६. स्मरणाचे वेळे । व्हावें सावध न कळे ॥१॥ पडिले विषयाचे वोढीं कोण्ही न दिसे काढी ॥२॥ भांडवल माझें । वेंच झाले भूमि ओझें ॥३॥ तुका म्हणे कळे । तूंचि धांवें ऐसे वेळे ॥४॥

२३७. पहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥१॥ येक नाहीं येका ऐसे । दाति कैसे शुद्ध हीन ॥२॥ पंचभूतें येका रासी । सूत्रें कैसीं वोळखावीं ॥३॥ तुका म्हणे जो जो जाति । त्याची स्थिति तैसी ते ॥४॥

२३८. कोणाचिया न पडो छंदा । गोविंदासि आळऊं ॥१॥ बहुतांचीं बहुत मतें । अवघ्या रिती पोकळ ॥२॥ घटापटा ढवळी मन । होय सीण न करूं ते ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । भरूं भागा आले ते ॥४॥

२३९. येक वेळ करीं या दुःखा वेगळें । दुरिताचें जाळे उगऊनि ॥१॥ आठवीन पाय हा माझा नवस । रात्रि वो दीवस पांडुरंगा ॥२॥ बहु दूरवरी भोगविले भोगा । आतां पांडुरंगा सोडवावें ॥३॥ तुका म्हणे काया करीन कुरवंडी । वोंवाळोनी सांडी मस्तक हें ॥४॥

२४०. आणिक म्यां कोण्हां यावें काकुलति । कोण कामा येती अंतकाळीं ॥१॥ तूं वो माझी सखी येसी पांडुरंगे । लवकरी ये गे वाट पाहें ॥२॥ काया वाचा मनें हेची आस करी । पाऊलें गोजीरीं चिंतीतसें ॥३॥ तुका म्हणे माझी पुरवीं हे आस । घालीं ब्रह्मरस भोजन हें ॥४॥

२४१. आम्हासी सकळ । तुझ्या नामाचेंची बळ ॥१॥ करूं अमृताचें

२५८. सोसें बहु गर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाहीं सखी ऐसि । तेथें कोण्ही भेटली ॥१॥ करिं करिं रे स्वहित । देह तंव हें अनित्य । नाहीं दिल्हें चित्त । सोडउं मोहापासुनि ॥२॥ पाळि तोडीचिया घासे । तेचि होय आनारिसें । ज्या नव्हे ऐसे । खेदे परि सोडविना ॥३॥ तुका म्हणे धनमानें । माझ्या बाटलों मीपणें । नाहीं दिल्हा मनें । देखों लाभ अलाभ ॥४॥

२५९. इच्छिती तयांसि व्हावें जी अरूप । आम्हांसि स्वरूप स्थिती चाड ॥१॥ आतां नव्हे माझा भाव आनारिसा । पाउलांनिं इच्छा गोंविियेली ॥२॥ लेंकरासि कोठें जाणत्याचि परि । करूं येतें दूरि धरावया ॥३॥ लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भंगूं नका ॥४॥ घेसी आढेवेढे मुक्तीच्या अभिलाषें । चाळवी ज्या पिसें ब्रह्मज्ञानी ॥५॥ तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस । पाडावया ओस चाळविसी ॥६॥

२६०. आम्हा भाविकाची जाती । येकविध जी श्रीपती । अलंकार युक्ति । सरो शकेचिना ॥१॥ जाणे माउली त्या खुणा । क्षोभ उपजों नेदी मना । शांतऊनि स्तना । लावि आहो कृपाळे ॥२॥ तुज अवघे होऊं येतें । मज वाटों नये चित्तें । उपासने परतें । नये कांहीं आवडों ॥३॥ करूं रूपाची कल्पना । मुखीं नाम नारायणा । तुका म्हणे जना । जळीं स्थळीं देखतां ॥४॥

२६१. ज्यावें हीनपणें । कामयाच्या प्रयोजनें ॥१॥ प्रारब्धी संसार । बरी हिमातीची थार ॥२॥ होणार तें कांहीं । येथें आवकळा नाहीं ॥३॥ तुका म्हणे देवें । कृपा केलीया बरवें ॥४॥

२६२. किती रांडवडे । घालोनि व्हाल रे बापुडे । संसाराच्या भिडे । कासाविस झालेती ॥१॥ माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठवी अंगसंगा । विश्वासिया जवळी ॥२॥ कांहीं न मागतां भलें । होईल तेंचि काम केलें । नसावें आथिलें । कांहीं येक संकल्पें ॥३॥ तुका म्हणे भाव । पावविला ठायाठाव । येकविध जीव । ठेविलिया सेवेसी ॥४॥

२६३. बाप करी जोडी लेंकराचे ओढी । आपुली कुरवंडी वाळउनि ॥१॥ येकायेकीं केला मीरासीचा धणी । कडिये वाहुनि भार खांदी ॥२॥

घालोयियां पाहे डोळा अळंकार । ठेवा दावी थोर करोनियां ॥३॥ तुका म्हणे नेदी गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥४॥

२६४. काय वृंदावन मोहियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥१॥ तैसी अधमाची जातीची अधम । उपदेश श्रम करावा तो ॥२॥ न कळे विंचाचें कुरवाळिलें अंग । आपुला तों रंग दावीतसे ॥३॥ तुका म्हणे नये पाकासी दगड । सूकरासि गोड जैसी विष्ठा ॥४॥

२६५. स्तऊनियां नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥१॥ नारायणाचिया लोपें । घडलीं आयवींच पापें ॥२॥ जीव ज्याचें दान । त्याचा खंडूं नये मान ॥३॥ तुका म्हणे वाणी । ऐकें त्यां दोष् कानीं ॥४॥

२६६. संता नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥१॥ ऐसे पोटाचे मारिले । देवें आशा विटंबिले ॥२॥ घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥३॥ तुका म्हणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥४॥

२६७. अहो कृपावंता । होय बुद्धिचा ये दाता ॥१॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पाईं थार ॥२॥ वदवी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥३॥ तुका म्हणे देवा माझे अंतरीं वसावा ॥४॥

२६८. नाहीं म्यां वंचीला मंत्र कोणापासीं । राहिलों जीवासी धरोनीयां ॥१॥ विटेवरी भावें ठेविलें मन । पाउलें समान चिंततसें ॥२॥ पावविलों पार धरिला विश्वास । घालोनियां कास बळकट ॥३॥ तुका म्हणे मागें पावलें उद्धार । तीहीं हा आधार ठेविलासे ॥४॥

२६९. चंचळें चंचळ निश्चळिं निश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥१॥ सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥२॥ रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेचि ते नका सारि धरूं ॥३॥ तुका म्हणे भय धरूं रज्जूसाठीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥४॥

२७०. आवडि येते गुणें । कळों चिन्हें उमटती ॥१॥ पोटिचे होटीं उभे राहे । चित्त साह्य मनासि ॥२॥ डोहाळियाची भूक गर्भा । ताठी प्रभा प्रतिबिंबें ॥३॥ तुका म्हणे मानोन घ्यावें । मना खावें वाटे तें ॥४॥

२७१. काय ऐसि वेळ । वोढवली अमंगळ ॥१॥ आजि दुखवलें मन ।

२८४. सुखाचि वसति झाली माझ्या जीवीं । तुमच्या गोसावी कृपादानें ॥१॥ रूप वेळोवळां आठवे अंतरीं । बैसोनि जिव्हारीं राहिलेंसें ॥२॥ विसावलें मन विटलें प्रपंचा । गोडावलि वाचा येणें रसें ॥३॥ तुका म्हणे कांहीं नाठवेसें झालें । दुसरें विठ्ठलें मज आतां ॥४॥

२८५. आम्हां कांहीं आम्हां कांहीं । आतां नाहीं या बोलें ॥१॥ मोल सांगा मोल सांगा । घेणें तीहीं गा पुसावें ॥२॥ कैसें घडे कैसें घडे । बडबड तूज मज ॥३॥ मुदलें साठीं मुदलें साठीं । लाभ पोटी त्या मधीं ॥४॥ तुका म्हणे साठऊं घरीं । आडल्या काळें पुसती तरी ॥५॥

२८६. ध्या रे भाई ध्या रे भाई । कोणि कांहीं थोडें बहु ॥१॥ येच हाटीं येच हाटीं । बांधा गांठी पारखून ॥२॥ वेंच आहे वेंच आहे । सरले पाहे मग कोठें ॥३॥ उघडें दूकान उघडें दुकान । रात्र झाली कोण सोडी मग ॥४॥ तुका म्हणे अंतकाळीं । जाती टाळी बैसोनी ॥५॥

२८७. मार्ग चुकले विदेशीं येकले । तयावरी झाले दिशाभूली ॥१॥ हातीं धरोनियां पाववीले घरा । त्याच्या उपकारा काय द्यावें ॥२॥ तैसा मी कुडकूडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा म्हणऊनि ॥३॥ सांडियेला गर्भ उबगोनी माउली । नाहीं सांभाळीली भूमी शुद्ध ॥४॥ उष्ण तहान भूक येवढी ये आकांती । वोसंगा लावीती काय म्हणिजे ॥५॥ खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे । अन्यायहि मोठे साच केले ॥६॥ हातींचे हिरोनी घातलें पाठिसी । तुका म्हणे ऐसी परी झाली ॥७॥

२८८. गुणाची आवडी वाचेचा पसरू । पडिला वीसरू सर्व रसा ॥१॥ आदि मध्य अंतीं नाहीं अवसान । जीवनीं जीवन मिळोनि गेलें ॥२॥ रामकृष्ण नाम माळा हे साजिरी । वोंविलीं गोजिरी कंठाजोगी ॥३॥ तुका म्हणे तनु झालिसे शीतळा । अवघी सकळ ब्रह्मानंदें ॥४॥

२८९. जैसी तैसी तरी वाणी । मना आणि माउली ॥१॥ लेंकरांचें स्नेह गोड । करि कोड त्या गुणें ॥१॥ मागें पुढें रिघें पोटीं । साहे खेटी करीतसे ॥३॥ तुका विनवी पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥४॥

२९०. देवाचीं भांडारीं । आदा विनीयोग करी ॥१॥ आतां न माखे

हात पाय । नेणों होतें ऐसें काय ॥२॥ देवें नेली चिंता । झाला सकळ कारिता ॥३॥ तुका म्हणे धनी । त्यासि अवघी पुरवणी ॥४॥

२९१. पेणावलें ढोर मार खाय पाठी । बैसलें तें नुठी तेथोनीयां ॥१॥ तैसी माझ्या मना परी झाली देवा । धांवे अहंभाव सांडवलों ॥२॥ कडां घाली उडी मागिलांच्या भेणें । पडणें मरणें न कळेची ॥३॥ तुका म्हणे झालों त्यापरी दुःखीत । असे बोलावित पांडुरंगा ॥४॥

२९२. झालिया दर्शन करीन मी सेवा । आणिक कांहीं देवा नलगे दुजें ॥१॥ प्रारब्धा आधीन अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवी पाई ॥२॥ येगा येगा येगा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरीं देऊनि भेटी ॥३॥ आशावलें मन जीवनाचे ओढी । नामीं रूपीं गोडी लावीयेली ॥४॥ काय तुम्हांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥५॥ काय लोखंडाचे पाहे गुण दोष । शिवोनि परिस सोनें करी ॥६॥ तुका म्हणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥७॥

२९३. येथें आड कांहीं न साहे आणीक । प्रमाण तें येक हेंची झालें ॥१॥ गाऊं नाचूं टाळी गीत गाऊं छंदें । डोलऊं विनोदें आंग तेणें ॥२॥ मंथोनिया सार काढिलें बाहेरी । उपाधि ते येरी निवडली ॥३॥ तुका म्हणे जगा लाविला शिराणी । सेवितां हें धणी होत नाहीं ॥४॥

२९४. शरणांगत झालों । तेणें मीपणा मुकलों ॥१॥ आतां दिल्याचीच वाट । पाहों नाहीं खटपट ॥२॥ नलगे उचित । कांहीं पाहावें संचित ॥३॥ तुका म्हणे सेवा । माने तैसी करूं देवा ॥४॥

२९५. वाचेचीया आळा कवळिलें ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ॥१॥ सुलभ तें झालें सुलभ तें झालें । जवळी तें आलें पंढरिये ॥२॥ नामरूपाचें बांधलें मोटळें । येक येका वेळे सारियेलें ॥३॥ तुका म्हणे वाटे चुकली वसती । उद्धार तो हातीं आणियेला ॥४॥

२९६. सवंग झालें सवंग झालें । घरा आलें बंदरींचें ॥१॥ आतां हेवा करा सोस । भक्तिरस बहु गोड ॥२॥ पाऊल वेंचे चिंता नाहीं । आड कांहीं मग नये ॥३॥ तुका म्हणे संचिताचे । नेणें काचें राहों तें ॥४॥

३१५. करोनियां शुद्ध मन। नारायण स्मरावा ॥१॥ तरिच हा तरिजे सिंधु। भवबंधु तोडोनियां ॥२॥ येथें सरे शुद्ध साचें। अंतरींचें बीज तें ॥३॥ तुका म्हणे लवणकळी। पडतां जळीं तें होय ॥४॥

३१६. जिकडे पाहे तिकडे देव। ऐसा भाव दे कांहीं ॥१॥ काय केलों येकदेशी। गुणदोषी संपन्न ॥२॥ पडे तेथें तुझ्या पायां। करीं वायां न वजेसें ॥३॥ तुका म्हणे विषमें सारीं। ठाणें धरी जीवासी ॥४॥

३१७. जिकडे जावें तिकडे सवें। आतां यावें यावरी ॥१॥ माझ्या अवघे भांडवला। तूंचि येकला झालासी ॥२॥ आतां दुजें धग झणीं। पायांहुनी वेगळें ॥३॥ तुका म्हणे देवा आतां। नका गोवों यावरी ॥४॥

३१८. स्मरतां कां घडे नास। विष्णुदासां यावरी ॥१॥ ऐसि सीमा झाली जगीं। तरि मी वेगीं अनुसरलों ॥२॥ धरिलें तें निवडीं आतां। न घडे चित्ता वेगळें ॥३॥ तुका म्हणे नाश नाहीं। पुराणेंही गर्जती ॥४॥

३१९. आधीं नाहीं कळों आला हा उपाय। नाहीं तरि काय चूकी होती ॥१॥ घालीतों पायांसी मिठी येकसरें। नेदी तो दुसरें आड येऊं ॥२॥ कासया पडतो लटिक्याचे भरी। नव्हता कां शिरीं भार घेतों ॥३॥ संसाराचा हाटक फिरतों दुकानें। भरोवरि धनें मेळवितों ॥४॥ तुका म्हणे कां हो घेतों गर्भावास। काय होतो दास कुटुंबाचा ॥५॥

३२०. आतां बरें झालें। माझें मज कळों आलें ॥१॥ खोटा ऐसा संसार। मज पायीं द्यावा थार ॥२॥ उघडले डोळे। भोग देतां कळी काळें ॥३॥ तुका म्हणे जीवा। होता तडातोडी देवा ॥४॥

३२१. बोलिलों तो धर्म अनुभवा अंगें। काय पांडुरंगें उणें केलें ॥१॥ सर्व सिद्धी पायीं वोळंगती दासी। इच्छा नाहीं ऐसी व्हावें कांहीं ॥२॥ संत समागमें अळंकारा वाणी। करूं हे पेरणी शुद्ध बीजा ॥३॥ तुका म्हणे रामकृष्णनामीं गोडी। आवडीच्या कोडी माळा वोऊं ॥४॥

३२२. करुनि उचित खेळे भोंवताले। चित्त येथें आलें पायापासीं ॥१॥ येथें नाहीं खोटा चालत परिहार। जाणसी अंतर पांडुरंगा ॥२॥ सुख दुःख तुज देउनि सकळ। नाहीं ऐसा काळ केला आम्हीं ॥३॥ तुका म्हणे जाला देहाचा विसर। आतां आपपर नाहीं दोन्ही ॥४॥

३२३. ज्याचे माथां जो जो भार । तोचि फार तयासी ॥१॥ मागें पुढें आवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥२॥ परिसा अंगीं अमुप सोनें । पोटिं हीन धातूचें ॥३॥ आपुला तो करी धर्म । जाणे वर्म तुका तें ॥४॥

३२४. पाहे तिकडे दीशा वोस । आववी आस पायां पें ॥१॥ मनिचें साच होईल कई । प्रेम देई भेटोनी ॥१॥ सर्वांपरी पांगुळ असें । न कळे कैसें तें तुम्हां ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । तूं तों दाता दीनाचा ॥४॥

३२५. चाळवणें काय । ऐसें आगे माझे माय ॥१॥ धांव पाव लवलाहें । कंठिं प्राण वाट पाहे ॥२॥ पसरोनी कर । तुज चालीलों समोर ॥४॥ देसिल वीसावा । तुका म्हणे ऐशा हावा ॥४॥

३२६. आवडीच्या ऐसें झालें । मुखा आलें हरिनाम ॥१॥ आतां घेऊं धणीवरी । मागें ऊरि नूरे तों ॥२॥ सांठवण मना ऐसी । पुढें रासी आमूप ॥३॥ तुका म्हणे कारण झालें । विठ्ठल या तीं अक्षरीं ॥४॥

३२७. त्यांचिया चरणा माझें दंडवत । ज्याचें धन चित्त पांडुरंग ॥१॥ येथें माझा जीव पावला विसावा । म्हणउनि हावा भरलासे ॥२॥ चरणींचे रज लाविन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥३॥ आणीक तें भाग्य येथें कुरवंडी । करोनिया सांडी इंद्रा ऐसी ॥४॥ वैष्णवाचे घरीं देवाची वसती । विश्वास हा चित्तीं सर्वभावें ॥५॥ तुका म्हणे सखे हरिचे ते दास । आतां पुढें आस नाहीं दूजी ॥६॥

३२८. उपजोनिया मरे । परि हेंची वाटे बरें ॥१॥ नाहीं आवडीसी पार न म्हणवें झालें फार ॥२॥ अमृताची खाणी । उघडली नव्हे धणी ॥३॥ तुका म्हणे पचे । विठ्ठल हें मूखा रुचे ॥४॥

३२९. लटिकेंची साच दावीलें अचळ । पीडीतसे काळ किती म्हणूं ॥१॥ सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला । कां गा हा दावीला जगदाकार ॥२॥ सांभाळीं सांभाळीं आपुली हे माया । आम्हांसी कां भयाभीत केलें ॥३॥ रूप नाहीं त्यासी ठेवीयलें नाम । लटीकाची भ्रम वाढवीला ॥३॥ तुका म्हणे कां गा झालासी चतुर । होतासी नीसुर निर्विकार ॥५॥

३३०. आमुच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धी योगा नये ॥१॥ काय या राहिलें विनोदावांचून । आपुलीया भिन्न केलें आम्हां ॥२॥

त्यास । नवजे जीवें नव्हे नाश ॥३॥ तुका म्हणे जो रुसला जिवा । तयासी केशवा काय चाले ॥४॥

३४६. अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हे हें करणें स्वहिताचें ॥१॥ तैसा नको भुलों बाहिरल्या रंगे । हित तेंचि वेगें करोनि घेई ॥२॥ बहुरूपीं रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥३॥ कनक झाड म्हणून वंदिलीया माथा । परि तेंहि अर्था न मिळे माजी ॥४॥ पाषाणांचें नांव ठेविलें तें देव । आणिकां तारी भाव परि तो तैसा ॥५॥ तुका म्हणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावी नाश तोची पावे ॥६॥

३४७. मज नष्टा माया मोहो नाहीं लोभ । अधिक तो क्षोभ आदराचा ॥१॥ धिग हें शरीर आनोपकार । न मनीं आभार उपकाराचा ॥२॥ मजहून नष्ट आहे ऐसा कोण । नावडे मिष्टान्न बहु बोल ॥३॥ न दिसेची मज आपुलेसे गुण । संचित तें कोण जाणें मागें ॥४॥ तुका म्हणे माझे देखोनियां काय । पांडुरंगा पायीं राखीयेलें ॥५॥

३४८. मतीविण काय वर्णू तुझें ध्यान । जेथें पडे मौन्य वेद श्रुती ॥१॥ करूनी गोजिरा आपुलिये मती । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥२॥ सुखाचे वोतीलें पाहो तें श्रीमुख । तेणें हारे भुकतान माझी ॥३॥ रसना गोडावली वोव्या गातां गीत । पावलेंसे चित्त समाधान ॥४॥ तुका म्हणे माझी दृष्टी चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥५॥

३४९. ओस जाल्या दिशा मजहि गव्हाणे । जिवलग तें नेणें मज कोणी ॥१॥ भय वाटे देखे श्वापदाचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥२॥ अंधःकारापुढें न कळेंचि वाट । लागतील खुंट काटे आंगीं ॥४॥ येकला निसंग फाकती मारग । भितो नव्हे लाग चालावया ॥४॥ तुका म्हणे वाट दाउनी सद्गुरु । राहिला हा दुरु पांडुरंग ॥५॥

३५०. जे केली आळी ते आवघी गेली वांया । उरला पंढरीराया श्रम माझा ॥१॥ काय समाधान केलें कोण वेळे । कोण माझे लळे पाळियेले ॥२॥ आभासहि नाहीं स्वपनीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां काय चिंता ॥३॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी जाले ॥४॥ तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा । मोकलिसी ऐसा वाटतोसी ॥५॥

३५१. वाघाचा कलभूत दिसे वाघा ऐसा । परी नाहीं दशा साच अंगीं ॥१॥ बाहेरील रंग निवडी कसोटी । संघठणें भेटी आपोआप ॥२॥ शिकविलें तैसें नाचावें माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥३॥ तुका म्हणे करी लटिक्याचा सांठा । फजित ते खोटा शीघ्र होय ॥४॥

३५२. शिंदळीचे सोयरे चोराचीया दया । तोहि जाणा तया संवसर्गीं ॥१॥ फुकासाठीं भोग दुःखाचा तो वांटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥२॥ सर्पे पोसोनियां दुधाचाही नाश । केलें पीतां वीष अमृताचें ॥३॥ तुका म्हणे यासी न करितां दंडण । पुढिल्या खडण नव्हे दोष ॥४॥

३५३. तेणें सुखें माझें निवालें हें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥१॥ कवतुक करुणा भाकितसे लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥२॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची समुळ गेली ॥३॥ तुका म्हणे सुख झालें माझ्या जीवा । रंगलों केशवा तुझ्या संगें ॥४॥

३५४. विठ्ठल सोयरा सज्जन विसावा । जाइन त्याच्या गांवा भेटावया ॥१॥ शीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणें ॥२॥ माय माऊलीया बंधुवर्गा जाण । भाकीन करुणा सकळांसी ॥ ३ ॥ संत महंत सिद्ध महानुभाव मुनि । जिवभावें जाऊनी सांगेन त्यां । माझीया माहेरीं सुखा काय ऊणें । नलगे येणें जाणें तुका म्हणे ॥४॥

३५५. ध्याईन तुझें रूप गाईन तुझें नाम । आन न करीं काम जिव्हा मूखें ॥१॥ पाहिन तुझे पाय ठेवीन मी डोई । पृथक तो काय न करीं आन ॥२॥ तुझेची गुणवाद आईके कानीं । आणिकाची वाणी पूरे आतां ॥३॥ करिन सेवा करें चालेन मी पायीं । आणिक न वजे ठायीं तूजवीण ॥४॥ तुका म्हणे जीव ठेवीन मी पायीं । आणिक तो ठाई देऊं कवणा ॥५॥

३५६. देवाचें भजन कां रे न करीसी । तैसे अखंड हव्यासो पीडीतोसी ॥१॥ देवासी शरण कां रे न जासी तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥२॥ देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥३॥ कां रे नाहीं तैसी देवाची ते गोडी । नागवूनी सोडी पत्नी जैसी ॥४॥ कां रे नाहीं तैसे देवाचे ‹पका› । माया मिथ्या भार पितृपूजन ॥५॥ कां रे भय

थाहासी लोकांचा तूं धाक । विसरोनीयां येक नारायण ॥६॥ तुका म्हणे कां रे घातलेंसें वाया । सर्व आयुष्य जाया भक्तीवीण ॥७॥

३५७. माझें चित्त तुझें पायीं । राहे ऐसें करी कांहीं ॥१॥ धरोनियां बाहीं । भव हा तारीं दातारा ॥२॥ चतुरा तूं शिरोमणी । गुण लावण्याची खाणी ॥३॥ मुगूट सकळा मणी । धन्य तोची विठोबा ॥३॥ करी तिमिराचा नाश । उदय होऊनि प्रकाश ॥४॥ तोडी आशापाश । वास करीं हृदयीं ॥५॥ पाहे गुंतलों नेणतां । तूज असो माझी चिंता ॥६॥ तुका ठेवी माथा । पायीं आतां राखावें ॥७॥

३५८. आमुचें उचीत हेचि उपकार । आपुलाचि भार घालूं तूज ॥१॥ भूक लागलीया भोजनाची आळी । पांघुरणें काळीं शीताचीया ॥२॥ जेणें काळें उठे मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडते ॥३॥ दुःख येऊं नेदी आमुचीया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥४॥ तुका म्हणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि आम्हा गोड जन्म घेतां ॥५॥

३५९. मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुखदुःख दोहीं विरहीत जो ॥१॥ राहिलासे ऊभा भिवरेच्या तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥२॥ नवल काय तरी पाचारितां पावे । नश्वरित धांवे भक्तिकाजा ॥३॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहीताचा ॥४॥ तुका म्हणे त्यास गाईन मी गीतीं । आणिक ते चित्तीं न धरीं कांहीं ॥५॥

३६०. यासी कोण म्हणे निंदेचें उत्तर । नागवला खरें तोची एक ॥१॥ आडवाटे जातां लावी निट सोयी । धर्म नीत तेही ऐसी आहे ॥२॥ नायीकतां सुखें करावें ताडण । पाप नाहीं पुण्य असे फार ॥३॥ जन्म व्याधि फार चुकतील दुःखें । खंडावा हा मान त्याचा ॥४॥ तुका म्हणे निंब दिधल्यावांचून । अंतरींचा शीण केवीं जाय ॥५॥

३६१. निवडे जेवण सेवटीच्या घांसे । होय त्याच्या ऐसें सकळहि ॥१॥ न पाहिजे झाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वायां ॥२॥ संपादीलें व्हावें धरीलें तें सोंग । विटंबना व्यंग पडलीया ॥३॥ तुका म्हणे वर्म नेणतां जो रांधी । पाववी ते बूद्धी अवकळा ॥४॥

३६२. नलगे मरावें । ऐसा ठाव दिल्हा देवें ॥१॥ माझ्या उपकारासाठीं । वागवीला म्हणे कंठीं ॥२॥ घरीं दिल्हा ठाव । अवघा सकळहि

वाव ॥३॥ तुका म्हणे एके ठायीं । केलें माझें तुझें नाहीं ॥४॥

३६३. नाहीं लाग माग । न देखे हें केलें जग ॥१॥ आतां बैसोनियां खावें । दिल्हें आयीतें या देवें ॥२॥ निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥३॥ तुका म्हणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥४॥

३६४. दिल्ही हाक मनें न्हे ती जतन । वेगळाले गुण धांव घेती ॥१॥ काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा हिंसा फार माया तृष्णा ॥२॥ इंद्रि-यांचे भार फिरतील चोर । खाणं घ्याया घर फोडूं पाहे ॥३॥ माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥४॥ तुका म्हणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडति ॥५॥

३६५. तुझा दास मज म्हणती अंकीत । अवघे सकळिक लहान थोर ॥१॥ हेंचि आतां लागे करावें जतन । तुझें थोरपण तूज देवा देवा ॥२॥ होऊनि निर्भर राहिलों निश्चित । पावन पतीत नाम तुझें ॥३॥ करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्यापातें ॥४॥ तुका म्हणे तूज काय तें अशक्य । तारिता मश्यका मज दीना ॥५॥

३६६. काय मागावें कवणासी । ज्यासीं मागतों तो मजपासी ॥१॥ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥२॥ जरी मागों ध्रुव पद । तरी त्यासी येथिल छंद ॥३॥ स्वर्ग भोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें ॥४॥ मागों जरी पद वैकुंठ । तें तों येकदेशी करंट ॥५॥ आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥६॥ तुका म्हणे येक माग । येकपणा नाहीं भंग ॥७॥

३६७. आम्ही ज्याचे दास । त्याचा पंढरीये वास ॥१ ता हा देवाचा-ही देव । काय कळिकाळा हा भेव ॥२॥ वेद जया गाती । श्रुति म्हणती नेति नेति ॥३ तुका म्हणे निज । रूपडें हें तत्त्व बीज ॥४॥

३६८. भक्तवत्सला दीनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ॥१॥ तो हा पुंडलीकासाठीं । आला उभा वाळवंटीं ॥२॥ गर्भवास धरी । अंबऋषीचा कैवारी ॥३॥ सकळ देवां अधिष्ठान । येक मंत्रासी कारण ॥४॥ तुका म्हणे ध्यानीं । ज्यासी ध्याती शूळपाणी ॥५॥

३६९. फटकाळ देव्हारा फटकाळ अंगारा । फटकाळ विचारा चाल-

विलें ॥१॥ फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त । करवितो घात आणिका जीवा ॥२॥ तुका म्हणे अवघे फटकाळ हे जन । अनुभवें खूण जाणतील ॥३॥

३७०. नेत्राची वासना । तुज पहावें नारायणा ॥१॥ करी त्याचे समाधान । काय पाहासी अनुमान ॥२॥ भेटावें पंढरीराया । हेंचि इच्छीताती बाह्या ॥३॥ जावें पंढरीसी । हेंचि ध्यान या मनासी ॥४॥ चित्त म्हणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥५॥ म्हणे बंधु तुकयाचा । देवा भाव पुरवीं याचा ॥३॥

३७१. जेणें तुज झालें रूप आणि नांव । पतीत हें दैव तुझें आम्ही ॥१॥ नाहीं तरी तुज कोण हें पुसतें । निराकारी तेथें येकायेकी ॥२॥ अंधारीं ते दीपा आणियेली शोभा । माणीकासी प्रभा कोंदणाची ॥३॥ धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावे ते ॥४॥ अमृतासी मोल विषाचीये गुणें । पितळ तरी सोनें उंच नीच ॥५॥ तुका म्हणे आम्ही असोनीयां जाण । तुज देवपण आणियेलें ॥६॥

३७२. सुख वाटे येची ठाईं । बहु पायीं संतांचे ॥१॥ म्हणऊनी केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥२॥ न करवे हालीचाली । निवारीली चिंता हे ॥३॥ तुका म्हणे निवे तनु । रजकणू लागतां ॥४॥

३७३. देऊनि कपाट । कोण काळ राखो वाट ॥१॥ काय येईल तें शिरीं । आज्ञा धरोनीयां करीं ॥२॥ करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा येकांत ॥६॥ तुका म्हणे जागो । किंवा कोणा नेदी वागो ॥४॥

·३७४. मायबापापुढें लेंकुराची आळी । आणिक हे पाळी कोण लळे ॥१॥ सांभाळा जी माझी विषमे अनंता । जवळी असतां अव्हेरु कां ॥२॥ आणिकांची चाले सत्ता आम्हांवरी । तुमची ते थोरी काय मग ॥३॥ तुका म्हणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ॥४॥

३७५. माझ्या मुखें मज बोलवीतो हरी । सकळां अंतरीं नारायण ॥१॥ न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों अम्ही ॥२॥ तुका म्हणे दोष नाहीं या विचारें । हिताचीं उत्तरें शिकवितां ॥३॥

३७६. मास खातां होस करी । जोडोनि वैरी ठेविला ॥१॥ कोण त्याची करी कींव । जीवें जीव नेणती ॥२॥ पुढिलासाठीं पाजवी सुरी । आपुली चोरी अंगोळी ॥३॥ तुका म्हणे कुटती हाडें । आपुल्या नाडें रडतील ॥४॥

३७७. तुज जाणें तान्हें नाहीं पांडुरंगा। कां जी मज सांगा उपेक्षीलें ॥१॥ तुज ठावें होतें पातकी मी खरा। आधींच कां थारा दिल्हा पायीं ॥२॥ आंख तो पडिला हरीचा मी दास। भेद पंगतीस करूं नये ॥३॥ तुका म्हणे आम्हीं जिंतिलें तें खरें। आतां उणें पुरे तुम्हां अंगीं ॥४॥

३७८. आम्हा घरीं धन शद्बांचींच रत्नें। शद्बांचींच शास्त्रें यत्नें करूं ॥१॥ शब्दची आमूच्या जीवाचें जीवन। शद्बें वाटूं धन जनलोकां ॥२॥ तुका म्हणे पहा शद्बची हा देव। शब्दची गौरव पुजा करूं ॥३॥

३७९. ब्रह्मज्ञान दारीं येतें काकूलती। आऽहेरिले संतीं विष्णुदासीं ॥१॥ रिघो पाहे माजी बळें त्याचें घर। दवडीति दूर म्हणोनियां ॥२॥ तुका म्हणे येथें न चले सायास। पडिले उदास त्याच्या गळां ॥३॥

३८० कासया लागला यासि चौघाचार। मुक्तीचा वेव्हार निवडीला ॥१॥ गोहि ते भक्ताची घालोनियां वरी। महजर करीं आहे माझ्या ॥२॥ तुम्हां वेगळे आपुली त्या ठाइं। होते करूं तेहि माझें माझें ॥३॥ भांडणा शेवटीं झालें एकवट। आतां कटकट करूं नये ॥४॥ ठेवीला ठेवा तो आला माझ्या हाता। आतां नसे सत्ता तूज देवा ॥५॥ तुका म्हणे वायावीण खटपट। राहिलों मी वाट घेऊनीयां ॥६॥

३८१ देहबुद्धी वसे जयाचीये अंगीं। पूज्यता ते जगीं सुखमानी ॥१॥ थोर असे दगा झाला त्यासी हाटीं। सोडोनियां गाठीं चोरें नेली ॥२॥ गाठीचें जाऊनि नव्हे तो मोकळा। बांधवीला गळा दंभलोभें ॥३॥ पुढील्या उदीमा झालेंसें खंडण। दिसे नागवण पडे गाठीं ॥४॥ तुका म्हणे ऐसें बोलतील संत। जाणोनियां घात कोण करी ॥५॥

३८२. निंबाचीये झाडा साकरेचें आळें। आपूली तीं फळें न संडीच ॥१॥ तैसे अधमाचें अमंगळ चित्त। वमन तें हीत करुनि सांडी ॥२॥ परिसाचें अंगीं लाविल खापर। पालट अंतर नेघे त्याचें ॥३॥ तुका म्हणे वेळू चंदना संगती। काय ते असती जवळीक ॥४॥

३८३. दुबळे सदैवा। म्हणे नागवेल केव्हां ॥१॥ आपणा ऐसें करूं पाहे। स्वभावासी करिल काय ॥२॥ मूढ सभे आंत। इच्छि पंडीताचा घात ॥३॥ गांढ्य देखोनीया शूर। उगाची करी बुरबुर ॥४॥ आणिकाचा हेवा। न करी

शरण जाईं देवा ॥५॥ तुका म्हणे किती । करूं दुष्टांची फजिती ॥३॥

३८४. माझी आतां लोक सुखें निंदा करूं । म्हणती विचारु सांडियेला ॥१॥ कारण होय तो करीन विचार । काय भीड भार करूं देवा ॥२॥ तुका म्हणे काय करूं लापणीक । जनाचार सूख नाशीवंत ॥३॥

३८५. ढेंकणाच्या संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला तैसा साधु ॥१॥ वोढाळाचे संगें सात्विक नासली । क्षण येक नाडलीं समागमें ॥२॥ डाकाचे संगती सोनें हीन झालें । मोल तें तूटलें लक्ष कोडी ॥३॥ विषानें पक्वान्नें गोड कडू झालीं । कुसंगानें केली तैसी परि ॥४॥ भावें तुका म्हणे सत्संग हा बरा । कुसंगा हा फेरा चौऱ्यांयशीचा ॥५॥

३८६. भलते जन्मीं मज घालसील तरी । न सोडीं मी हरि नाम तुझें ॥१॥ सुख दुःख तुज देईन भोगीतां । मग मज चिंता कायसाची ॥२॥ तुझा दास म्हणविन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ॥३॥ कासया मी तुज भाकितों करुणा । तारीं नारायणा म्हणऊनी ॥४॥ तुका म्हणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आम्हां तया ॥५॥

३८७. गातों नाचतों आनंदें । टाळ घागरीयाच्या छंदें ॥१॥ तुझी तुजपुढें देवा । नेणों भाव कैसी सेवा ॥२॥ नेणों ताल घात मात । भलते सवा पाय हात ॥३॥ लाज नाहीं शंका । प्रेमें घालों म्हणे तुका ॥४॥

३८८. रूसलों या आम्ही आपुल्या संसारा । तेथें जनाचारा कोण पाड ॥१॥ आम्हा इष्टमित्र सज्जन सोयिरे । नाहीं या दुसरे देवाविण ॥२॥ दूरावले बंधु सखे सहोदर । आणिक विचार काय तेथें ॥३॥ उपाधी वचना नायीकती कान । त्रासलें हें मन बहु माझें ॥४॥ तुका म्हणे करा ठाकेल ते दया । सुखदुःख वाया न धरावें ॥५॥

३८९. सांडोनी सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ॥२॥ कां रे न घ्यावे हे जन्म । काय वैकुंठा जाऊन ॥२॥ येथें मिळतो दहींभात । नाहीं वैकुंठीं ते मात ॥३॥ तुका म्हणे मुक्ति नलगे । राहेन संतांचीया संगें ॥४॥

३९०. पदोपदीं पायां पडणें । करुणा जाण भाकावी ॥१॥ ये गा ये गा विसाविया । करुणा दयासागरा ॥२॥ जोडोनियां करकमळ । नेत्र जळ भरोनी ॥३॥ तुका उभा दानपात्र । पुरवीं आर्त विठोबा ॥४॥

३९१. आतां हे शेवटीं असो पायांवरी । वदनीं वैखरी वागपुष्पें ॥१॥ तुपेक्षावें आम्हा दीना पांडुरंगा । कृपादानी जगामाजी तुम्ही ॥२॥ बोळऊनि देह सांडियेली शुद्ध । तोडियेले भेद जीवशीव ॥३॥ तुका म्हणे मन तुमचे चरणीं । येवढी आयणी पुरवावी ॥४॥

३९२. तरिच शोभे वेडी । नग्न होय धड फाडी ॥१॥ काय बोलाचें गौरव । आंत वरी दोन भाव ॥२॥ मृगजळ न्याहाळितां । तान नवजे सेवीतां ॥३॥ न पाहे आणिकाची आस । शूर बोलीजे तयास ॥४॥ तुका म्हणे या लक्षणें । संतीं अळंकार लेणें ॥५॥

३९३. आग्रहा नांवें पाप । योगीं सारावें संकल्प ॥१॥ सहजा ऐसें भांडवल । असोनि कां सारा बोल ॥२॥ तैं न भेटे तें काय । मना अंगींचे उपाय ॥३॥ तुका म्हणे धरी सोय । वासनेची फोडा डोय ॥४॥

३९४. न करी पठण घोष अक्षराचा । बीजमंत्र आमुचा पांडुरंग ॥१॥ सर्व काळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासी समाधी हें ॥२॥ न करी भ्रमण न रीघे कपाटीं । जाइन तेथें दाटी वैष्णवांची ॥३॥ आन नेणें कांहीं नवजे तपाशी । नाचे दिंडीपाशीं जागरणीं ॥४॥ उपवास व्रत करीं पारणें । रामकृष्ण म्हणे नारायण ॥५॥ आणिकाची सेवा स्तुति नेणें वानूं । तुका म्हणे आनूं दुजें कांहीं ॥६॥

३९५. वाळो जन मज म्हणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥१॥ सांडोनी लौकीक झालीया उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥२॥ नायीके वचन बोलतां या लोकां । म्हणे झालों तुका हरिरत ॥३॥

३९६. अधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । म्हणोनी व्यभिचारा टेकली ये ॥१॥ रात्रांदिवस मज पाहिजे जवळीं । क्षण त्या नीराळी न गमे घडी ॥२॥ नाम गोष्ट माझी सोय सांडा आतां । रतले अनंता तुका म्हणे ॥३॥

३९७. हाचि नेम आतां न फिरे माघारीं । बैसले शेजारीं गोविंदाचे ॥१॥ घररीघीं झालें पट्टराणी बळें । वरिलें सावळें परब्रह्म ॥२॥ बळियाचा अंगसंग झाला आतां । नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥३॥

३९८. नाहीं काम माझें काज तुम्हासवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥१॥ व्यभीचार माझा पडीला ठाऊका । न सरती लोकामाजी जालें ॥२॥ न धरावा लोभ कांहीं माझेविशीं । झालें देवपिशी तुका म्हणे ॥३॥

३९९. विसरलें कुळ आपुला आचार । पति भावे दीर घरा सोयी ॥१॥ सांडीला लौकिक भय लाज चिंता । रतलें अनंता चित्त माझें ॥२॥ मज आतां कोण्ही आळवाल झणी । तुका म्हणे कानीं बहिर झाल ॥३॥

४००. न देखें न बोलें नायिकें आणिक । बैसला हा येक हरि चित्तीं॥१॥ सासुरे माहेर मज नाहीं कोण्ही । येक केलें दोनी मिळोनियां ॥२॥ आळ आला होता आम्ही भांडखोरी । तुका म्हणे खरी केली मात ॥३॥

४०१. दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंता पासोनियां ॥१॥ बळियाच्या आम्ही झालों बळिवंता । करूं सर्वसत्ता सर्वांवरी ॥२॥ तुका म्हणे आम्ही जीवाच्या उदारा । झालों प्रीतीकरा गोविंदासी ॥३॥

४०२. क्षणभरी आम्हीं सोसिलें वाईट । साधीलें अवीट नीजसूख ॥१॥ सांडीमांडी केली अवघ्या भरोवरी । अधिकची परी दुःखाचिया ॥२॥ तुका म्हणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचीये पायीं ॥३॥

४०३. आम्हां आम्ही आतां वडील धाकटी । नाहीं पाठींपोटीं कोणी दुजें ॥१॥ पावला येकांत येकविध भावें । हरि आम्हासवें सर्व भोगी ॥२॥ तुका म्हणे अंगसंग येके ठायीं । असो जेथें नाहीं दुजें कोण्ही ॥३॥

४०४. सर्वसुख आम्ही भोगूं सर्वकाळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥१॥ यांजसाठीं सांडियेला भरतार । रतलों या परपुरुषाशीं ॥२॥ तुका म्हणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥३॥

४०५.. येका जीवें आतां जीणें झालें दोहीं । वेगळें तें कांहीं नव्हे आतां ॥३॥ नारायणा आम्हां झाली वेगळिक । पुरविले हे भाक सांभाळीली ॥२॥ तुका म्हणे झालें सायासाचें फळ । सरली तें वेळ काळ दोन्ही ॥३॥

४०६. हांसो रुसो आतां वाढऊं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥१॥ सेवा सुखें करुनी विनोदवचन । आम्ही नारायण येकायेकी ॥२॥ तुका म्हणे आम्ही झालों उदासीन । आपुल्या आधीन केला पती ॥३॥

४०७. मजसवें आतां येऊं नका कोण्ही । सासुरवासीणी बायांनो हो ॥१॥ न सावावे तुम्हां या जनाची कूट । बोलती वाईट वोखट ते ॥२॥ तुका म्हणे झालों उदास मोकळ्या । विचरों गोवळयासवें आम्ही ॥३॥

४०८. शिकविलें तुम्ही तें राहे तोंवरी । मज आणि हरि वियोग तो॥१॥

प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानीं ॥२॥ तुका म्हणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदीं नित्य अनित्य तें ॥३॥

४०९. सांगतों तें तुम्हीं आयिकावें कानीं । आमुचे नाचणी नाचूं नका ॥१॥ जोंवरी या तुम्हां मागीलाची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥२॥ तुका म्हणे काय वायावीण धींद । पती ना गोविंद दोन्ही नाहीं ॥३॥

४१०. आजवरी तुम्हा आम्हा नेणपणें । कवतुकें खेळणें संग होता ॥१॥ आतां अनावर झालों अगुणाची । करूं नये तेची करी सुखें ॥२॥ तुका म्हणे आतां बुडवीलीं दोन्हीं । कुळें येक मनीं नारायण ॥३॥

४११. सासुरीया वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावेंची ॥१॥ चांडवर कोण्ही न धरीती हातीं । प्रारब्धाची गती भोगूं आतां ॥२॥ न व्हावी ती झाली आमुची भंडाई । तुका म्हणे काई लाजों आतां ॥३॥

४१२. मरणाहि आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥१॥ आतां तुम्ही पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वायाविण ॥२॥ तुका म्हणे तुम्ही भयाभीता नारी । कैसी संग सरी तुम्हा आम्हा ॥३॥

४१३. परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥१॥ संवसारा अंगीं आपुलेंनि हातें । लाऊनी मागुती पाहों नये ॥२॥ तुका म्हणे व्हावें तया परि धीट । पतंग हा नीट दीपा सोयी ॥३॥

४१४. आईकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडावी सोई भ्रताराची ॥१॥ नव्हे आराणुक लौकिका पासोन । आपुल्या आपण गोवीलें तें ॥२॥ तुका म्हणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥३॥

४१५. आहाच काहाच आंत वरी दोन्ही । नलगा गडिणी आम्हा तैशा ॥१॥ भेऊं नये येथें भेडसावें कोण्हा । आवरोनि मना बंद द्यावा ॥२॥ तुका म्हणे कांहीं अभ्यासावाचूनी । नव्हे हे करणी भलतीच ॥३॥

४१६. बहुतांच्या आम्ही न मिळों मताशीं । कोण्ही कैसी कैसी भावनेच्या ॥१॥ विचार करितां वायां जाय काळ । लटिकें तें मूळ फजीतीचें तुका म्हणे तुम्ही करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥३॥

४१७. न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिल्ही बूडी माझ्या मनें ॥१॥ मानेल त्या तुम्ही आयीका स्वभावें । मी तों माझ्या भावें अनुसरलों

॥२॥ तुका म्हणे तुम्ही फिरावें बहुतीं । माझी तो हे गती झाली आतां ॥३॥

४१८. त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठीण हे जीवा तोचि वरी ॥१॥ मागीलाचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हें संगा नेदी पुढें ॥२॥ तुका म्हणे सर्वांविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥३॥

४१९. न बोलतां तुम्हां कळों नये गुज । म्हणऊनि लाज सांडीयेली ॥१॥ आतां तुम्हां पुढें जोडितसे हात । नका कोणी अंत पाहूं माझा ॥२॥ तुका म्हणे आम्ही बैसलों शेजारीं । करील तें हरि पाहों आतां ॥३॥

४२०. नये जरी तुज मधुर उत्तर । दिधली सुस्वर नाहीं देवें ॥१॥ नाहीं तयावीण भुकेला विठ्ठल । येईल तैसा बोल रामकृष्ण ॥२॥ देवापाशीं मागे आवडीची भक्ति । विश्वासेशीं प्रीति भावबळें ॥३॥ तुका म्हणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिसा ॥४॥

४२१. सावध झालों सावध झालों । हरिच्या आलों जागरणा ॥१॥ जेथें वैष्णवांचे भार । जयजयकार गर्जतसे ॥ २ ॥ पळोनियां गेली झोंप । होतें पाप आवडतें ॥३॥ तुका म्हणे तया ठायां । वोळे छाया कृपेची ॥४॥

४२२. आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥१॥ कुळीं कन्या पुत्र होती जे सात्विक । तयाचा हरीख वाटे देवा ॥२॥ गीता भागवत करितां श्रवण । अखंड चिंतन विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥४॥

४२३. अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥१॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥२॥ आपूल्याची वैभवें । शृंगारावें निर्मळा ॥३॥ तुका म्हणे जेवीं सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥४॥

४२४. पावलें पावलें तुझें आम्हां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥१॥ जेथें तेथें देखें तुझींच पाऊलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥२॥ भेदाभेद मतें भ्रमाचें संवादें । आम्हां नको वाद त्याशीं देऊं ॥३॥ तुका म्हणे आन तुजवीण नाहीं । नभाऊनी पाहीं वाड आहे ॥४॥

४२५. सुखे वोळंगा दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ॥१॥ आवडीचा मारिला वेडा । होय होय म्हणे कैसा भिडा ॥२॥ मज अखंड पोटीची व्यथा । दूधभात साखर तुप पथ्या ॥३॥ दो प्रहरा मज लहरी येती । शुद्धी

नाहीं पडे सुपती ॥४॥ निज नये खालीं फुलें । जवळीं न साहति मुलें ॥५॥ अंगीं चंदन लाविंत भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥६॥ निपट मज न चले अन्न । पायलि गहूं सांजा तीन ॥७॥ गेले वारीं आणिली साकर । सात दिवस गेली साडेदाहा शेर ॥८॥ हाड गळोनि आलें मास । माझें दुःख तुम्हा नेणवे कैसें ॥९॥ तुका म्हणे जिता गाढव केला । मेल्यावरी नरका नेला ॥१०॥

४२६. पुढें गेले त्यांचे शोधित मारग । चला जाऊं माग घेत आम्ही ॥१॥ वंदूं चरणरज सेउं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करुनी सोडूं ॥२॥ अमुप हे गांठीं बांधू भांडवला । अनाथा विठ्ठल आम्हां जोगा ॥३॥ अवघे होती लाभ येका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥४॥ जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ । तुका म्हणे घालूं जीवपणा चीरा । जाऊं त्या माहेरा नीजाचीया ॥६॥

४२७. जेविले ते संत मागें उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करुनि झाडा ॥१॥ सोंवळ्या ओंवळ्या राहीलों निराळा । पासूनी सकळा अवघ्या दूरी ॥२॥ परे परतें मज नलगे सांगावें । हें तों बरवें देवें शीकविलें ॥३॥ दुसऱ्यातें आम्ही नाहीं आतळत । जाणोनी संकेत उभा असे ॥४॥ येथें कोणीं कांहीं न धरावी शंका । मज चाड येका भोजनाची ॥५॥ लांचावला तुका मारितसे झड । पुरविलें कोड नारायणें ॥६॥

४२८. देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥१॥ ब्रम्हादिकांसीं हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥२॥ अवघिया पुरतें ओसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥३॥ इच्छादानी येथें वोळला समर्थ । आवघेची आर्त पुरवीतो ॥४॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढति वाटे कवळ घ्यावे ऐसें ॥५॥ तुका म्हणे पाक लक्ष्मीच्या हातें । कामारी संगातें निरुपम ॥६॥

४२९. अवगुणाचे हातीं । आहे अवघी फजीती ॥१॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥२॥ विष तांब्या वाटी । भरलि लाऊं नये होटी ॥३॥ तुका म्हणे भाव । शुद्ध बरा सोंगवाव ॥४॥

४३०. हरिच्या जागरणा जातां कां रे नये मना ॥१॥ कोठें पाहासिल तुटी । आयुष्य वेंचे फुकासाठीं ॥२॥ ज्याची तुज गुंती । ते तों मोकलीती अंतीं ॥३॥ तुका म्हणे बरा । लाभ कोण तो विचारा ॥४॥

४३१. धर्मांची तूं मूर्ती । पाप पुण्य तुझे हातीं ॥१॥ मज सोडवी दातारा । कर्मापासोनि दुस्तरा ॥२॥ करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥३॥ जीवींच्या जीवना । तुका म्हणे नारायणा ॥४॥

४३२. सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पति सोयरीया ॥१॥ गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥२॥ विठो माऊलीये हाचि वर देईं । संचरोनी राही हृदयामाजी ॥३॥ तुका म्हणे कांहीं न मागें आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४॥

४३३. राजस सकुमार मदनाचा पुतळा । रविशाशिकळा लोपलीया ॥१॥ कस्तुरिमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥२॥ मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतिलें सकळही ॥३॥ कांसे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाईयांनो ॥४॥ सकळहि तुम्ही व्हा गे येकसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥५॥

४३४. कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावी हरी ॥१॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावीं डोळां ॥२॥ कटी पीतांबर कासे मिळविली । दाखवी वहिली ऐसी मूर्ति ॥३॥ गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ॥४॥ झुरोनियां जरा होऊं पाहे आतां । येई पंढरीनाथा भेटावया ॥५॥ तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनंति उदास करूं नये ॥६॥

४३५. गरुडाचे वारीकें कासे पीतांबर । सांवळें मनोहर कैं देखेन ॥१॥ बरव्या बरवंटा घनमेघ सावळां । वैजयंतीमाळा गळां शोभे ॥२॥ मुकुट माथां कोटि सूर्यांचा झळाझळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥३॥ वोतीव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रुक्मादेवी ॥४॥ उद्धव अक्रूर उभे दोन्हीकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ॥५॥ तुका म्हणे नव्हे आणिकां सारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ॥६॥

४३६. ब्रम्हादिक जया लाभासीं ठेंगणें । बळिये आम्ही भले शरणागत ॥१॥ कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । झाला पद्मनाभ सेवाऋणी ॥२॥ कामधेनुचीया क्षीरा पार नाहीं । इच्छेचीया वाहे वरुषाव ॥३॥ बैसलीये ठाईं लागलें भरतें । त्रिपुटी वरुतें भेदी ऐसें ॥४॥ हारि नाहीं आम्हां विष्णुदासा

जगीं । नारायण अंगीं वीसावला ।।५।। तुका म्हणे बहु लाठे हें भोजन । नाहीं रीता कोण राहता राहो ।।६।।

४३७. दुजे खंडे तरी । उरला तो अवघा हरी । आपणा बाहेरी । न लगे ठाव धुंडावा ।।१।। इतुले जाणावया जाण । कोंडे तरी मनें मना । पारधीच्या खुणा । जाण तेणेंचि साधाव्या ।।२।। देह आधि काय खरा । देहसंबंध पसारा । बुजगावणें चोरा । रक्षणसें भासते ।।३।। तुका करि जागा । नको वासपूं वाउगा । आहेसी तूं अंगीं । अंगें डोळे उघडी ।।४।।

४३८. विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ।।१।। ऐकाजी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ।।२।। कोण्याहि जीवाचा न घडावा मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ।।३।। तुका म्हणे येका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ।।४।।

४३९. आम्ही तरी आस । झालों टाकोनि उदास।।१।।आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ।।२।। भलते ठाईं पडो । देह तुरंगी हा चढो ।।३।। तुमचे तुम्हापाशीं । आम्ही आहों जैशी तैशीं ।।४।। गेले मानामान । सुखदुःखाचें खंडण ।।५।। तुका म्हणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ।।६।।

४४०. निंदी कोणी मारी । वंदि कोणी पूजा करी ।।१।। मज हेंही नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहींपासूनी ।।२।। देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें तें बरें ।।३।। अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुकयाचें ।।४।।

४४१. जन विजन झाले आम्हां । विठ्ठलनामा प्रमाण ।।१।। पाहे तिकडे बापमाय । विठ्ठल आहे रखुमाई ।।२।। वन पट्टण येकभाव । अवघा ठाव सरता झाला ।।३।। आठवेना सुखःदुखा । नाचे तुका कवतूकें ।।४।।

४४२. हिरा ठेवतां ऐरणी । वांचे मारीतां जो घणीं ।।१।। तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ।।२।। मोहरा तोची अंगें । सूत न जळे ज्याच्या संगें ।।३।। तुका म्हण तोचि संत । सोसी जगाचे आघात ।।४।।

४४३. अलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ।।१।। ऐसा संतांचा महिमा । झाली बोलायाची सीमा ।।२।। तीर्थं पर्वकाळ । अवघीं पायांपें सकळ ।।३।। तुका म्हणे देवा । त्याची केली पावे सेवा ।।४।।

४४४. माझीया मीपणा । झाला यावरि उगाणा ।।१।। भोगी त्यागी

पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ।२॥ टाळीलें निमित्य । फार थोडें घात हित ॥३॥ यावें कामावरी । तुका म्हणे नाहीं उरी ॥४॥

४४५. सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार समूळ आशा । निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥१॥ मोक्षाचें तीर्थ नलगे वाराणशी । येति तयापाशीं अवघे जन । तीर्थासी तीर्थ झाला तोची येक । मोक्ष तेणें दर्शनें ॥२॥ मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळा भूषणासी ॥३॥ हरीच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥४॥ तन मन धन दिल्हें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची । तुका म्हणे तो परिसाहुनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥५॥

४४६. आहे तें सकळ कृष्णासी अर्पण । न कळतां मन दुजे भावीं ॥१॥ म्हणऊनि पाठी लागतील भूतें । येती गवसीत पांचजणें ॥२॥ ज्याचे त्या वंचलें आठव न होतां । दंड या निमित्ताकारण हा ॥३॥ तुका म्हणे काळें चेपियेला गळा । मी मी वेळोवेळां करीतसे ॥४॥

४४७. महारासी शिवे । कोंपे ब्राह्मण तो नव्हे ॥१॥ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥२॥ नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥३॥ ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो ते याती ॥४॥

४४८. तेलणीशी रुसला वेडा । रागें कोरडे खातो भिडा ॥१॥ आपुलें हित आपण पाहीं । संकोच तो न धरी कांहीं ॥२॥ नाडिलें लोकां टाकिला गोहो । बोडिलें डोकें सांडिला मोहो ॥३॥ सेजारिणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ॥४॥ पिसांच्या रागें भाजिलें घर । नागवली तेणें फार ॥५॥ तुका म्हणे वाचा रागें । फेंडिलें सावलें दाखिलें जगें ॥६॥

४४९ मज दास करी त्याचा । संत दासाच्या दासाचा ॥१॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥२॥ नीच वृत्ति काम । परि मुखें तुझें नाम ॥ ॥३॥ तुका म्हणे सेवे । माझे संकल्प वेंचावे ॥४॥

४५०. सदा तळमळ । चित्ताची ये हळहळ ॥१॥ त्याचें दर्शन व्हावें । शव असतां तो जीवें ॥२॥ कुशब्दाची घाणी । अमंगळ व्याली वाणी ॥३॥ नेणे शब्द पर । तुका म्हणे परउपकार ॥४॥

४५१. जयासी नाहीं एकादशी व्रत । जाणावें तें प्रेत सर्वलोकीं ॥१॥

त्याचे दिवस नित्य काळ लेखीताहे । रागें दांत खाये करकरां ॥२॥ जयाचीये द्वारीं तुळसीवृंदावन । नाहीं तें स्मशान गृह जाण ॥३॥ जये कुळीं नाहीं येकहि वैष्णव । त्याचा बुडे भवनदीताफा ॥४॥ विठोबाचें नाम नुच्यारी जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥५॥ तुका म्हणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव-जाय हरीचिया ॥६॥

४५२. आम्ही सदैव सुडके । जवळि येतां चोरधाके । जाऊं पुढी भिके । कुतरीं घर राखिती ॥१॥ नांदणूक ऐसी सांगा । नाहीं तरी वाया भागा । थोरपण अंगा । तरी ऐसें आणावें ॥२॥ अक्षयी साचार । केलें सायासांनीं घर । येरंड शिवार । दुजा भार न साहाती ॥ ३॥ धनकण घरोघरीं । पोट भरी भीकेवरी । जतन तें करी । कोण गुरें वासरें ॥४॥ झाली सकळ निश्चिती । भांडवल शेण माती । झळझळिता भिंती । वृंदावनें तुळसीसी ॥५॥ तुका म्हणे देवा । अवघा मिरविला हेवा । कुटुंबाची सेवा । तोचि करी आमुच्या ॥६॥

४५३. पराविया नारी माऊली समान । मानलीया धन काय वेंचे ॥१॥ न करितां परनिंदा द्रव्य अभिलाष । काय तुमचें यास वेंचे सांगा ॥२॥ बैसलीया ठाईं म्हणतां राम राम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥३॥ संताचे वचनीं मानिती विश्वास । काय तुमचें यास वेंचे सांगा ॥४॥ खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेंचे यास ऐसें सांगा ॥५॥ तुका म्हणे देव जोडे याजसाठीं । आणिक ते अटी नलगे कांहीं ॥६॥

४५४. शुद्ध बीजा पोटीं ॥ फळें रसाळ गोमटीं ॥१॥ मुखीं अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ॥२॥ सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥३॥ तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥४॥

४५५. चित्त समाधानें । तरी विष वाटे सोनें ॥१॥ बहु खोटा अतिशय । जाणा भले सांगों काय ॥२॥ मनाचे तळमळे । चंदनेंही अंग पोळे ॥३॥ तुका म्हणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥४॥

४५६. परिमळ म्हणून चोळों नये फूल । खाऊं नये मूल आवडतें ॥१॥ काय येक नव्हे धरितां अंतरीं । कासवीचे परी वेळोवेळा ॥२॥ मोतियांचे पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदूनि नाद पाहूं नये ॥३॥ कर्मफळ म्हणुनि इच्छुं नये काम । तुका म्हणे वर्म दाऊं नका ॥४॥

४५७ माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंची माया । अंग आणि छाया तया परी ॥ ॥१॥ तोडीतां न तुटे सारितां निराळी । लोटांगणा तळीं हारपती ॥२॥ दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणिक ते अटी विचाराची ॥३॥ तुका म्हणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणी लवणें जैसी तैसी ॥४॥

४५८ दुर्जनासि करी साह्य । तोही लाहे दंड हे ॥१॥ शिंदळीचा कुंटणि वाटा । संग खोटा खोट्याचा ॥२॥ येर येरा काचणी भेटे । अंगी उठे तेथुनी ॥३॥ तुका म्हणे कापूं नाकें । पुढें आणिके शिकवीति ॥४॥

४५९. वृत्ति भूमि राज्य द्रव्य ऊपार्जीती । जाणा त्या निश्चितीं देव नाहीं ॥१॥ भाडेकरी वाहे पाठीवरि भार । अंतरीचें सार लाभ नाहीं ॥२॥ देवपूजेवरी ठेऊनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥३॥ तुका म्हणे फळ चिंतीती आदरें । लाघव हें चार शिंदळीचे ॥४॥

४६०. पवित्र सोंवळीं । येक तींच भूमंडळीं ॥१॥ ज्यांचा आवडता देव अखंडित प्रेमभाव ॥२॥ तींच भाग्यवंतें । सरिति पुरती धनवित्तें ॥३॥ तुका म्हणे देवा । त्यांची केली पायसेवा ॥४॥

४६१. आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥१॥ करी इंद्रियाची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥२॥ भ्रमले चावळे । तैसे उचित न कळे ॥३॥ तुका म्हणे विषें । अन्न नाशीयेलें जैसें ॥४॥

४६२. ढेकरें जेवण दिसे साचें । नाहींतरी काचे कुंथाकुंथी ॥१॥ हेहि बोल तेहि बोल । कोरडे फोल रुचीवीण ॥२॥ गव्हाचिया होती परी । फकेवरी खाऊं नये ॥३॥ तुका म्हणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥४॥

४६३. करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥१॥ कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा आंगीं ॥२॥ अतिशय अंतीं लाभ किंवा घात । देतें चित्त बीज ऐसें ॥३॥ तुका म्हणे जन राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥४॥

४६४. नव्हे आराणुक संसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाचि धंदा ॥१॥ देव धर्म सांदी पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥२॥ रात्रंदिस न पुरे कुटुंबिं समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥३॥ तुका म्हणे आत्महत्या रे घातकी । कैसी होते चुकी नारायणीं ॥४॥

४६५. स्मशान ते भूमी प्रेतरूपी जन । सेवा भक्तिहीन ग्रामवासी ॥१॥ भरतील पोटें श्वानाचीया परि । वास्ति दिली घरीं यमदूतां ॥२॥ अपुज्य लिंग तेथें अति नेघे थारा । ऐशी वस्ती चोरां कंटकांची ॥३॥ तुका म्हणे नाहीं ठावी तीथ मती । यमाचि निश्चिती कूळवाडी ॥४॥

४६६. एकादशी व्रत सोमवार न करीती । कोण त्याची गती होई नेणों ॥१॥ काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥२॥ हरीहरा नाहीं बोटभरि वाती । कोण त्याची गती होईल नेणों ॥३॥ तुका म्हणे नाहीं नारायणीं प्रीती । कोण त्यांची गती होई नेणों ॥४॥

४६७. आहकटा त्याचे करिती पितर । वंशी दुराचार पुत्र झाला ॥१॥ गळेचि ना गर्भ नव्हेचि कां वांझ । माता त्याची लाज लावा पापी ॥२॥ परपीडा परद्वारीं सावधान । सादरची मन अभाग्याचें ॥३॥ न मिळतां निंदा चाहाडी उपवास । संग्रहावे दोष सकळही ॥४॥ परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचे ते कीडे दुग्धीं मरे ॥५॥ तुका म्हणे विटाळाचीच तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ॥६॥

४६८. श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी ॥१॥ नाहीं भीड आणि धीर । उपदेश न जिरे क्षीर ॥२॥ माणसासी भुंके । विजातीनें द्यावें थुंके ॥३॥ तुका म्हणे चित्त । मळिन करा तें फजित ॥४॥

४६९. देखोनि हरिखेली अंड । पुत्र झाला म्हणे रांड । तंव तो झाला भांड । चाहाड चोरटा सिंदळ ॥१॥ जाये तिकडे पिडी लोकां । जोडि भांडवल थुंका । थोर जाला चुका । वर कां नाहीं घातली ॥२॥ भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें । निष्ठुर उत्तरें । पापदृष्टि मळिन चित्त ॥३॥ दुराचारी तो चांडाळ । पापा संगातें विटाळ । तुका म्हणे खळ म्हणोनियां निषिद्ध तो ॥४॥

४७०. नेणों गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥१॥ नेणों राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥२॥ तुका म्हणे मज चाड नाहीं जना । तुज नारायणावांचूनियां ॥३॥

४७१. माझी पाठ करा कवी । दारोदार उठ लावी ॥१॥ तव तया पारखि सिव । लाजे ठाव सांडितो ॥२॥ उष्टावळी करुनी जमा । कुंथोनि प्रेमा आणितसे ॥३॥ तुका म्हणे बाहेर मुदी । आहाच गोविंदी न सरती ॥४॥

४७२. उपाधीच्या नांवें घेतला सिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों तें ॥१॥ काशासाठीं हात भरोनि धुवावे । चालतीया गोवे मारगासी ॥२॥ काय नाहीं देवें करोनि ठेविलें । असें तें आपुलें तें तें ठाईं ॥३॥ तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर वोळविले ॥४॥

४७३. योगाचें तें भाग्य क्षमा । अर्थी दमा इंद्रियें ॥१॥ अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा झालीया ॥२॥ मिरासीचें म्हणूं सेत । नाहीं देत पीक उगें ॥३॥ तुका म्हणे उचित जाणा । उगिच शीण काशाला ॥४॥

४७४. नये नेत्रीं जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥१॥ तो हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥२॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जो सादर ॥३॥ तुका म्हणे भेटी । जंव नाहीं झाली दृष्टादृष्टी ॥४॥

४७५. बाइल सुवासिण आई । आपण पीतराचें ठाईं ॥१॥ थोर वेच झाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥२॥ विषयाचे चरवणी । केली आयुष्याची गाळगी ॥३॥ तुका म्हणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥४॥

४७६. दानें कांपे हात । नावडे तेविषीं मात ॥१॥ कथी चावटीचे बोल । हिंग क्षीर मिथ्या फोल ॥२॥ नवजाती पाय । तीर्था म्हणे वेचूं काय ॥३॥ तुका म्हणे मनीं नाहीं । न ये आकारातें कांहीं ॥४॥

४७७. वाळिते जें गाई । त्यासि फार लागे काई ॥१॥ निवे भावाच्या उत्तरीं । भलते येके धणीवरी ॥२॥ न लगती प्रकार । कांहीं मनाचा आदर ॥३॥ सांडि थोरपणा । तुका म्हणे सर्वे दिना ॥४॥

४७८. मैत्र केला महाबळी । कामा नये अंतकाळीं ॥१॥ अर्थी घे रे रामनाम । सामा भरी हा उत्तम ॥२॥ नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥३॥ धन मेळविलें कोडी । तुज घेतल्या न सोडी ॥४॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥५॥ तंववरी तूं मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥६॥ तुका म्हणे बापा । जाच चुकवी या खेपा ॥७॥

४७९. सुख पाहातां जवा पाडें । दुःख पर्वतायेवढें । धरि धरि आठवण । मानी संताचें वचन ॥२॥ नेलें रात्रिनें तें अर्धे । बाळपण जरा व्याधे ॥३॥ तुका म्हणे पुढा । घाणा जुंपिजेशी मूढा ॥४॥

४८०. कानडीनें केला म्ऱ्हाटा भ्रतार । येकाचें उत्तर येका नये ॥१॥ तैसें मज नको करूं कमलापती । देईं या संगती सज्जनाची ॥२॥ तिनें पाचारिलें इत्त बा म्हणोन । येरू पळे आन झाली आतां ॥३॥ तुका म्हणे येर येरा जे विच्छिन्न । तेथें वाढे शीण सुखा पोटीं ॥४॥

४८१. बोलायाचा त्यासी । नको संबंध मानसीं ॥१॥ जया घडली संतनिंदा । तुज विसरोनी गोविंदा ॥२॥ जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भांड ॥३॥ तुका म्हणे देवा । तया दूरी मज ठेवा ॥४॥

४८२. तिळ जाळीले तांदूळ । काम क्रोध तैसेची खळ ॥१॥ कां रे शिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥२॥ मान दंभ पोटासाठीं । केली अक्षराची अटी ॥३॥ तप करूनीयां तीर्थाटणें । वाढवीला अभिमान ॥४॥ वांटिलें तें धन । केली अहंता जतन । तुका म्हणे वर्म । चुकलीया तो अधर्म ॥५॥

४८३. संसारातापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥१॥ म्हणऊनि तुझे आठविले पाय । येईं वो माझे माये पांडुरंगे ॥२॥ बहुतां जन्मींचा झालों भारवाही । सुटीजे हें नाहीं वर्म ठावें ॥३॥ वेढियेलें चोरीं अंतर्बाह्यात्कारी । कणव न करी कोण माझी ॥४॥ बहू पांगवीलों बहू नागवीलों । बहु दिवस झालों कासावीस ॥५॥ तुका म्हणे आतां धांव घाली वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीननाथा ॥६॥

४८४. भक्तऋणी देव बोलतीं पुराणें । निर्धार वचनें साच खरीं ॥१॥ मागें काय जाणा आयकीली वार्ता । कबीर जातां साते घडिया वांटी ॥२॥ माघारीया धनें आणिलें घरासी । ने घे केला त्यासी त्याग तेणें ॥३॥ नामदेवाचिया घरासीं आणियेलें । तेणें लुटवीलें द्वीजा हातीं ॥४॥ प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण । येकोबाचें ऋण फेडीयेलें ॥५॥ बीज दळोनीयां केली आराधना । लागे नारायणा पेरणा ते ॥६॥ तुका म्हणे नाहीं जयासी निर्धार । नाडीला साचार तोची येक ॥७॥

४८५. भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान करी मच्छा जैसा ॥१॥ टिळामाळा मैंद मुद्रा लावी आंगीं । देखो नेदि जगीं फांस जैसे ॥२॥ ढिवरया मत्स्या चारा घाली जैसा । भितरील फांसा कळों नेदी ॥३॥ खाटिक

हा स्नेहवादे पशु पाळी । कापावया नळी तयासाठीं ॥४॥ तुका म्हणे तैसा भला मी लोकांत । परि तूं कृपावंत पांडुरंगा ॥५॥

४८६. भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥१॥ ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगींच अधर्म ॥२॥ देव अंतरे तें पाप । खोटें उगवा संकल्प ॥३॥ तुका म्हणे भीड खोटी । लाभ विचाराच्या पोटीं ॥४॥

४८७. गेली वीरसरी । मग त्यासी रांड मारी ॥१ मग न ये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥२॥ भंगलिया चित्ता । न ये कशानें सांदितां ॥३॥ तुका म्हणे धीर । भंगलीया पाठीं कीर ॥४॥

४८८. युक्ताहार नलगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥१॥ कलीयुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देइल भेटी ॥२॥ नलगे लौकीक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्मदंड ॥३॥ तुका म्हणे मज आणिक उपाय । दिसती ते वाव नामावीण ॥४॥

४८९. कंठी कृष्णमणी । नाहीं अशुभ तें वाणी ॥१॥ हो का पुरुष अथवा नारी । रांड तयां नांवें खरी ॥२॥ नाहीं हातीं दान । शूरपणाचें कांकण ॥३॥ वाळियेले संतीं । केली त्रोडोनि फजिती ॥४॥ तुका म्हणे ताळा । नाहीं त्याची अवकळा ॥५॥

४९०. माया ब्रह्म ऐसें म्हणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागवीले ॥१॥ विषयाचा लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नांद्या होउनि फीरे ॥२॥ करुनी खातां पांक जिरे सुरण रायी । कर्गितां आतताई दुःख पावे ॥३॥ औषध द्यावया चाळवीलें बाळा । दाऊनीयां गूळा दृष्टीपुढें ॥४॥ तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांझट बोलणीं वारा त्यांचीं ॥५॥ तुका म्हणे जया पिंडाचें पाळण । न घडे नारायण भेटे तया ॥६॥

४९१. मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटीयाचें पीसें ऊर फोडी ॥१॥ जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥२॥ संचित सांगाती बोळवण सर्वे । आचरलें घ्यावें फळ तेणें ॥३॥ तुका म्हणे शेखीं स्मशान तोंवरी । संबंध गोवरी अंगीं सर्वे ॥४॥

४९२. गौळियांचीं ताकेंपिरें । कोण पोरें चांगलीं ॥१॥ येवढा त्याचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥२॥ काय उपास पडिले होते । कण्या भोंवते विदुराच्या ॥३॥ तुका म्हणे कुब्जा दासी । रूप राशी हीन कळा ॥४॥

४९३. आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥१॥ सकळांच्या पायीं माझे दंडवत । आपुलालें चित्तशुद्ध करा ॥२॥ हित तें करावें देवाचें चिंतन । करुनियां मन शुद्ध भावें ॥३॥ तुका म्हणे हित होय तो व्यापार । करा काय फार शीकवावें ॥४॥

४९४. भक्ताविण देवा । कैचें रूप घडे सेवा ॥१॥ शोभविलें यरयरा । सोनें येक ठाईं हिरा ॥२॥ देवावीण भक्ता । कोण देतो निष्कामता ॥३॥ तुका म्हणे बाळ । जैसे माता स्नेहजाळ ॥४॥

४९५. विश्वाचा जानिता । म्हणे यशोदेसी माता ॥१॥ ऐसा भक्ताचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥२॥ निष्काम नीराळा । गोपीं लावीयेला चाळा ॥३॥ तुका म्हणे आलें । रूप अव्यक्त चांगलें ॥४॥

४९६. काय दिनकरा । कोंबड्यानें केला खरा ॥१॥ कां हो ऐसा संत ठेवा । भार माझे माथा देवा ॥२॥ आडवीलें दासीं । तरी कां मरती उपासी ॥३॥ तुका म्हणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥४॥

४९७. जेवितांहि धरी । नाक हागतीयापरी ॥१॥ ऐसीयाचा करितां चाळा । आपुलीच अवकळा ॥२॥ सांडावें मांडावें । काय ऐसें नाहीं ठावें ॥३॥ तुका म्हणे करी । ताक दूधा येकसरी ॥४॥

४९८. हो का पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ॥१॥ कळों आलें खव्याळ ऐसे । शिवों नये लिंपों दोषें ॥२॥ फोडावें मडकें । मेले लेखीं घायें येकें ॥३॥ तुका म्हणे त्यागें । वीण चुकीजेना भोगें ॥४॥

४९९. व्याल्यावीण करी शोभनतांतडी । चार ते गधडी करीतसे ॥१॥ कासया पाल्हाळ आणिकाचे देखीं । सांगतां नव्हे सुकी साकरेसी ॥२॥ कुंथाच्या ढेकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टि मळिन वरी ॥३॥ तुका म्हणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंवीण नका वाव घेऊं ॥४॥

५००. जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥१॥ येर प्रिया पुत्र धना कोण लेखा । करीती ते दुःखा पात्र शत्रु ॥२॥ प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदू भरतें केली ॥३॥ तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय । सांगणें तें काय लागे येथें ॥४॥

५०१. माना अपमान गोवे । अवघे गुंडोनी ठेवावे ॥१॥ हेंचि देवाचें

दर्शन । सदा राहे समाधान ॥२॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥३॥ आली उर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ॥४॥

५०२. थोडें आहे थोडें आहे । चित्त साह्य झालिया ॥१॥ हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरले ते ॥१॥ अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥३॥ तुका म्हणे लटिकें पाहे । सांडीं देह अभीमान ॥४॥

५०३. आतां उघडीं डोळे । जरि अद्यापी न कळे । तरी मातेचीये खोळे । दगड आला पोटासी ॥१॥ मनुष्यदेह ऐसा निध । साधिलें तें साधें सिद्ध । करुनी प्रबोध । संत पार उतरले ॥२॥ नाव चंद्रभागे तीरीं । उभि पुंडलिकाचे द्वारीं । कट धरोनीयां करीं । उभाउभी पालवी ॥३॥ तुका म्हणे फुकासाठीं । पाई घातलीया मिठी । होतो उठाउठी । लवकरीच उतार ॥४॥

५०४. न करीं रे संग राहें रे निश्चळ । लागों नेदीं मळ ममतेचा ॥१॥ या नांवें अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥२॥ इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाहि वरी न ये मन ॥३॥ तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या थारा आनंदाचा ॥४॥

५०५. पंढरीचा महिमा । देतां आणीका उपमा ॥१॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभीं भेटे ॥२॥ आहेति सकळ । तीर्थ काळें देती फळ ॥३॥ तुका म्हणे पेठ । भूमिवरी हें वैकुंठ ॥४॥

५०६. घेऊनीयां चक्र गदा । हाचि धंदा करितो ॥१॥ भक्त राखे पायांपासी । दुर्जनासी संव्हारी ॥२॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥३॥ तुका म्हणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥४॥

५०७. तीर्थीं धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥१॥ मिळालीया संतसंग । समर्पीतां भलें अंग ॥२॥ तीर्थीं भाव फळें । तेथें आनाड तें वळे ॥३॥ तुका म्हणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥४॥

५०८. देखोनि पुराणिकाची दाढी । रडे फुंदे नाक वोढी ॥१॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥२॥ आवरितां नावरे । खूर आठवी नेवरे ॥३॥ बोलों नये मुखा वाटा । म्हणे होता ब्याचा तोटा ॥४॥ दोनि शिंगें च्यारी पाय । खुणा दावी म्हणे होय ॥५॥ मना आणितां बोकडें । मेला

त्याची चरफड ॥६॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥७॥ तुका म्हणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥८॥

५०९. दुर्जनाची गांधि विष्ठेचिये परी । देखोनियां दुरी व्हावें तया ॥१॥ आइका वो तुम्ही मात हे सज्जन । करूं संघट्टण नये बोलों ॥२॥ दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्रवे जैसी ॥३॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळले वरी धांवे श्वान ॥४॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देश त्याचा ॥५॥ तुका म्हणे किती सांगावें पृथक । आंग कुंभपाक दुर्जनाचें ॥६॥

५१०. अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । वोळखा जातीचा अधम तो ॥१॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मानी तो ॥२॥ तुका म्हणे मद्यपानाचें मिष्ठान्न । तैसा तो दुर्जन शीवों नये ॥३॥

५११. शब्दा नाहीं धीर । ज्याचि बुद्धि नाहीं स्थिर ॥१॥ त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगति भोजन ॥२॥ संतास जो निंदी । अधम लोभासाठीं वंदी ॥३॥ तुका म्हणे पोटीं । भाव आणिक जया होटीं ॥४॥

५१२. चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥१॥ शिंदळीच्या अंगणीं वेंचतां पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥२॥ तुका म्हणे भीतो पुढिलीया दत्ता । म्हणऊनि चिंता उपजली ॥३॥

५१३. मांडवाच्या दारा । पुढें आणिला म्हातारा ॥१॥ म्हणे नवरी आणा रांड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥२॥ समय न कळे । काय उपयोगीं ये वेळे ॥३॥ तुका म्हणे खरा । येथोनीयां दूर करा ॥४॥

५१४. कांहीं नित्यनेमेविण । अन्न खाय तोचि श्वान । वायां मनुष्यपण । भार वाहे वृषभ ॥१॥ त्याचा होय भूमी भार । नेणे याती आचार । झाला दावेदार । भोगवा अघोर पितरांसी ॥२॥ अखंड अशुभ वाणी । खरें न बोले स्वप्नीं । पापी तयाहुनी । आणिक नाहीं दूसरा ॥३॥ पोट पोशी येकला भूतीं दया नाहीं ज्याला । पाठीं लागे आल्या । अतिताचे दारेसी ॥४॥ कांहीं संतांचें पूजन । न घडे तीर्थांचें भ्रमण । येमाचा आंदण । शीण थोर पावेल ॥५॥ तुका म्हणे त्याणीं । मनुष्यपणा केली हाणी । देवा विसरोनी । गेलीं म्हणतां मी माझें ॥६॥

५१५. कन्या गौ करी कथेचा वीकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥१॥ गुण अवगुणे हे दोन्ही प्रमाण । यातीसीं कारण नाहीं देवा ॥२॥ आशाबद्ध नये करू ते करीती । तुका म्हणे जाती नरकामधीं ॥३॥

५१६. हरिहरा भेद । नाहीं करूं नये वाद ॥१॥ येकयेकाचे हृदयीं । गोडि साकरेच्या ठाईं ॥२॥ भेदकासी नाड । येक वेलांटीच आड ॥३॥ उजवें वाम अंग । तुका म्हणे येक अंग ॥४॥

५१७. वक्तया आधीं मान । गंधअक्षता पूजन । श्रोता यती झाला जाण । तरी त्या नाहीं उचित ॥१॥ शिर सवांगा प्रमाण । यथाविधी कर चरण । धर्माचें पाळण । सकळहि सत्य करावें ॥२॥ पट्ट पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी । प्रमाण सकळी । ते मर्यादा करावी ॥३॥ वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य । येर उपकरण । सोनियाचें परी नीच ॥४॥ सोनियाचा पैंजण । मुगुटमणी केला हीण । जयाचे कारण । तया ठाईं अलंकार ॥५॥ सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन । तुका म्हणे जाण । तुम्ही संत तदर्थी ॥६॥

५१८. घरीं रांडापोरें मरती उपवासी । सांगे लोकापासी थोरपण ॥१॥ नेऊनियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चूकाऊनी ॥२॥ तुका म्हणे आम्ही जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसें नव्हे ॥३॥

५१९. मायबाप जोहार जी जोहार । सारा साधावया आलों वेसकर ॥१॥ मागिल पुढिल करा झाडा । नाहीं तरि खोडा घालिती जी ॥२॥ फाको नका रुजु झालियावांचून । सांगा जी हे कोण धरिति धण्या ॥३॥ आजि मायबाप करा तडामोडी । उद्यां कोण घडि राहेना हो ॥४॥ तुका म्हणे कांहीं न चले ते बोली । आखेर ते साली झाडा घेती ॥५॥

५२०. येऊं द्या जी कांहीं वेसकरास । आंतून बाहेर वोजेचा घास ॥१॥ जों यावें तों हाताचि रिता नाहीं । करीतारे कांहीं द्यावें घ्यावें ॥२॥ तुका म्हणे उद्यां लावीन मनेरा । जे हे दारोदारीं भोंवति फिरा ॥३॥

५२१. देति घेति परज गेली । घर खालीं करूनियां ॥१॥ धावणियाचे न पडे हातीं । खादलि राती काळोखी ॥२॥ आवघियाचें आवर्व नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥३॥ सोंग संपादुनि दाविला तो भाव । गेला अधीं माव

वरी होती ॥४॥ घराकडे पांहू नयेसें जाहालें । आमानत केलें दिवाणेची ॥५॥
आतां तुका कोणा न लागेची हातीं । झाली ते निश्चिती बोलों नये ॥६॥

५२२. शुकसनकादिकिं उभारिला बाहो। परिक्षिती लाहो दिसा सातां ॥१॥
उठाउठीं करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥२॥ त्वरा झाली
गरुडा टाकियेला मागें । द्रौपदीच्या लागें नारायणें ॥३॥ तुका म्हणे करी
बहुत तातडी । प्रेमाची आवडी लोभा पर ॥४॥

५२३. बोलिलों तें कांहीं तुमचीया हीता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥१॥
वाट दावी तया नलगे शिणावें। अतीन्याइ जीवे नाश पावे ॥२॥ निंब दिला रोग
तुटाया अंतरीं । पोभाळितां वरी आंत चरे ॥३॥ तुका म्हणे हित देखण्यासी
कळे । पडती आंधळे कूपामाजीं ॥४॥

५२४. माकड मुठीसी धरिले फुटाणे । गुंतले ते नेणें हात तेथें ॥१॥
काय तो तयाचा लेखावा अन्याय । हित नेणे काय आपूलें तें ॥२॥ शुकें
नळिकेसी गोवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥३॥ तुका म्हणे ऐसे
येक पशु जीव । न चले उपाय काय तेथें ॥४॥

५२५. हरि तू निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण । नव्हे तें कां
करिसी आन । कवणें नाहीं केले तें ॥१॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य
घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबा घरीं वोपिलीं ॥२॥ नळदमयंतिचा
वियोग । विघडीला त्यांचा संग । ऐसें जाणे जग । पुराणींहि बोलती ॥३॥
राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाळु भूतीं । तुळविले अंतीं । तुळे मांस
तयाचें ॥४॥ कर्ण भीडतां समरंगणीं । बाणीं व्यापीयेला रणीं । मागसी
पाडोनि । तेथें दांत तयाचे ॥५॥ बळी सर्वस्वें उदार । जेणें ऊभारिला कर ।
करोनि काहार । तो पाताळीं घातला ॥६॥ श्रीयाळाच्या घरीं। धरणें मांडीलें
मुरारी । मारविलें करीं । त्याचें बाळ त्या हातीं ॥७॥ तुज भावें जे भजती ।
त्यांच्या संसारा हे गती । ठाव नाहीं रे पुढती । तुका म्हणे करिसी तें ॥८॥

५२६. बाळ बापा म्हणे काका । तरि कां निपराध पारिखा ॥१॥
जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ॥२॥ साकरेसि म्हणतां धोंडा । तरि
कां तोंडा न रुचे ॥३॥ तुका म्हणे अरुष बोल । नव्हे फोल आहाच ॥४॥

५२७. चाल केलासि मोकळा। बोल विठ्ठल वेळो वेळां ॥१॥ तुज पापचि नाहीं ऐसें। नाम घेतां जवळी वसे ॥२॥ पंच पातकांच्या कोडी नामें जळती अर्धघडी ॥३॥ केली मार्ग नको राहों। तुज जमान आम्ही आहों ॥४॥ करि तुज जों करविति। आणिक नांवें घेऊं किती ॥५॥ तुका म्हणे काळा। रिघ नाहीं निघती ज्वाळा ॥६॥

५२८. चित्तीं नाहिं ते जवळी असोनी काय। वत्स सांडि माय तेणें न्यायें ॥१॥ प्रीतिचा तो वायो गोड लागे मात। जरी जाय चित्त मिळो-नियां ॥२॥ तुका म्हणे अवघें फिकें भावावीण। मीठ नाहीं अन्न तेणें न्याय ॥३॥

५२९. काय काशि करिती गंगा। भितरी चांगा नाहीं तो ॥१॥ आधर्णी कुचर बाहेर तैसा। नये रसा पाकासी ॥२॥ काय टिळे करिती माळा। भाव खळा नाहीं त्या ॥३॥ तुका म्हणे प्रेमेंवीण। बोले मुंके अवघा सीण ॥४॥

५३०. सिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास। बाईल तो त्यास न वीसंबे ॥१॥ दुष्ट बुद्धी चोरी करी निरंतर। तो म्हणे इतर लोक तैसे ॥२॥ तुका म्हणे जया चित्तीं जे वासना। तयाची भावना तयापरी ॥३॥

---

काला चेंडूफळी अभंग

५३१. झेला रे झेला रे वरचेवरी झेला। हातींचे गमावी तो पाठीं साहे टोला ॥१॥ त्रिगुणांचा चेंडु। हातीं झुगारी निराळा। वरीलिया मुखें मन। लावीं तेथें डोळा ॥२॥ आगळा होउनि। धरी वरीचियावरी। चपळ तो जिंके। गांढया ठके येरझारी ॥३॥ हातींचे सांपडले। उभे बैसों नेदी कोण्ही। सोरिमागें सोरि। घेती वोणवे करोनी ॥४॥ डाईं पडिलिया। सोसि दुःखाचें डोंगर। पाठीवरि भार। उभा भोंवतांहि फेर ॥५॥ तुका म्हणे सुख। पाहे तयाचें आगळें। जिंकितो हरिसी। कोणि येका तरी काळें ॥६॥

५३२. अझुणि कां थीर पोरा न म्हणासि किर। धरोनियां धीर लाजे बूर निघाला ॥१॥ मोकळा होतासि कां रे। पडिलासि डाईं। वरिलांचा भार। आतां उतरेसा नाहीं ॥२॥ मेळऊनि मेळा। येकयेकि दिल्हि मिठी। कवळिले

येक बहु । बैसविली पाठीं ॥३॥ तळिल ते वरी । वरिल येते तळा । न सुटे तोंवरी । येथ गुंतलीया खेळा ॥४॥ सांडिता ठाव पुढें । सइल धरी हात । चढेल तो पडेल । ऐसि ऐका रे मात ॥५॥ तुका म्हणे कीति । आवरावे हात पाय । न खेळावें तोंची । बरें वरी नये डाय ॥६॥

५३३. पुसतसे सांगा मी । हे माझे ऐसे काई । रुसूं नका नुगवे । तो झवे आपुली आई ॥१॥ कोडें ऐका रे कोडें । उगउनि फार राहे गुंफोनियां थोडें ॥२॥ सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । ज्यालें जिवो मेलें मरो प्रारब्धा हातीं ॥३॥ तुका म्हणे अभिमान सांडावा सकळीं । नको अंगावरि वाया येऊं देऊं कळी ॥४॥

५३४. नुगवे तें ऊगऊनि सांगितलें भार्यी । घालोनियां ताळा । आतां शुद्ध राखा घाई ॥१॥ आतां कांहीं नाहीं राहिलें । म्यां आपणां आपण पाहिलें ॥२॥ कमाइस मोल नका येथें रीस मानूं । निवडों नये मज कोणा येथें वाणूं ॥३॥ तुका म्हणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयेजत मग सेवटीला येक वेळीं ॥४॥

५३५. हा रस आनंदाचा । घोष करा हरिनामाचा । कोण हा दैवाचा । भाग पात्रे येथील ॥१॥ पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरीचें संचित । होईल करित । आला अधिकारी तो ॥२॥ काय पाहातां हे भाई । हर्षें नाचा धरा घाई । पोटभरी कांहीं । घेतां उरीं न ठेवा ॥३॥ जें सुख दृष्टि आहे । तेंच अंतरीं जो लाहे । तुका म्हणे काय । कळिकाळ तें बापुडें ॥४॥

५३६. अवघे गोपाळ म्हणती या रे करूं काला । काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला ॥१॥ नका कांहीं मागें पुढें ठेऊं रे तुम्ही खरेंच बोला । वंची वंचला तोचि रे येथें भोवंडा त्याला ॥२॥ घेतल्यावांचून झाडा रे नेदी आपुलें कांहीं । येकायेक ग्वाही बहूत देती मोकळे नाहीं । ताक सांडि येर येर रे काला भात भाकरी दहीं । आलें घेतो मध्यें बैसला नाहीं आणवित तें ही ॥३॥ येक नाहीं धीर तातडी दिल्हा सोडोनियां मोटा । येक सोडितील गांठि रे येक चालती वाटा । येक उभा भार वाहोनि पाहे उगाचि खोटा । येक ते करोनि आराले आतां ऐसीच घाटा ॥४॥ येकि स्थिरावील्या गाई येक वळत्या देती । येकाच्या फांकल्या वोढाळा फेरे भोवते घेती । येक चारावोरा गुंतली

न्याहीं जीवन चित्तीं । येकायेका चला म्हणति येक हुंबरी घेती ॥५॥ येकि-येकेच वाटा लाविली भोळीं नेणतीं मुलें । आपण घरींच गुंतले माळा नासिलीं फूलें । गाठीचें तें सोडुं नावडे खाय अयितें दिल्हें । सांपडले वेठी वोढीं रे भार वाहतां मेलें ॥६॥ येक ते माया गुंतले घरीं बहुत कामें । वार्तोहि नांहीं तयांची तया कांहींच ठावें । जैसें होतें शिळें संचित तैसें लागलें खावें । हातो-हातीं गेलें वेंचुनि मग पडिलें ठावें ॥७॥ येकी हातीं पायीं पट्टे रे अंगीं लाविल्या राखा । येक ते सोलिव बोडके केली सपाठ शिखा । येक आळसी तांळि रे वरि वाढिल्या खाका । सिदोरिवांचुनि बूद्धि रे केल्या अवघ्या वाखा ॥८॥ तुका म्हणे आतां कान्होबा आम्हा वांटुनि द्यावें । आहे नाहीं आम्हांपाशीं तें तुज आवघें ठावें । मोकलितां तुम्ही शरण आम्ही कवणाशी जावें । कृपा-वंतें कृपा केली रे पोटें भरति खावें ॥९॥

५३७. बैसवोनि फेरी । गडियां मध्येंभागी हारि । अवघेंयाचें करी । समाधान सारिखें ॥१॥ पाहे तो देखे समोर । भोगि अवघे प्रकार । हरुषें झेली कर । कवळ मुखीं देती ते ॥२॥ बोले बोलतीयां सवें । देतिल ते त्यांचे घ्यावें । येकयेका ठावें । येरयेरा अदृश्य ॥३॥ तुका म्हणे देवा । बहु आवडीचा हेवा । कोणाचिया जीवा । वाटों नेदि विषम ॥४॥

५३८. आम्ही निकट वासें । कळों आलें जैसें तैसें । नाहीं अनारीसें कान्होबाचें अंतरीं ॥१॥ पीडित आपुल्या भावना । जैसी जयाची वासना । कर्माचा देखणा । पाहे लीला कवतुक ॥२॥ खेळ खेळे न पडे ठाई ॥ ज्याचा भार त्याच्या ठाई । कोण्ही पडतिल डाई । कोणी कोडीं उगविती ॥३॥ तुका म्हणे कवळ । हातीं घेऊनि गोपाळ । देतां ज्याचें बळ । त्यासि तैसा विभाग ॥४॥

५३९. काम सारोनि सकळ । आले अवघे गोपाळ । झालिया आतां वेळ । म्हणति आणा सिदोऱ्या ॥१॥ देति आपुलाला झाडा । गाई बैसविल्या वाडा । दोंदिल बोबडा । वाकड्याचा हरि मेळीं ॥२॥ आपुलालिये आवडी । मुदा बांधल्या परवडी । निवडोनि गोडी । हरि मेळवी त्यांत तें ॥३॥ भार वागवीला खांदी । नव्हती मिळाली तों मांदी । सकळांचे संधी । वोझी अव्धीं उतरलीं ॥४॥ मागे जो तातडी । त्यासि रागा येती गडी । तुझी कां रे कुडी । येथें मिथ्या

भावना ॥५॥ येकयेकाच्या संवादें । कैसे धाले ब्रह्मानंदें । तुका म्हणे पदें । या रे वंदूं हरीचीं ॥६॥

५४०. यमुने पावळी । गडियां बोले वनमाळी । आणा सिदोऱ्या सकळी । काला करूं आजी ॥१॥ अवघे येके ठाईं । करूं स्वाद त्याचा पाहीं । मजपासीं आहे तेंही । तुम्हामाजी देतों ॥२॥ म्हणतीं बरवें गोपाळ । म्हणती बरवें गोपाळ । वाहाती सकळ । मोहरी पांवे आनंदें ॥३॥ खडकि सोडियेल्या मोटा । अवघा केला येकवटा । काला करोनियां वांटा । गडियां देतो हरि ॥४॥ येकांपुढें येक । घाली हात पसरी मुख । गोळा पावे तया सुख । अधिकचि वाटे ॥५॥ म्हणती गोड झालें । म्हणती गोड झालें । आणिक देईं धालें । नाहीं पोट आमुचें ॥६॥ हात नेतो मुखापाशीं । येर आशा तोंड वासी । खाये आपण तयासी । दावी वाकुलिया ॥७॥ देऊनियां मिठी । पळे लागतील पाठी । धरोनि काढितील बोटीं । मुखामाजी खातो ॥८॥ म्हणती ठकडा रे कान्हा । लावी घांस भरी राना । दुम करि तो शाहणा । पाठोवाठी तयाच्या ॥९॥ अवघियांचे खाये । कवळ कृष्णा माझी माये । सुरवर म्हणती हायहाय । सुखा अंतरलों ॥१०॥ येकयेका मारी । ढुंगा पाठी तोंडावरी । गोळा न साहवे हरि । म्हणे पुरे आतां ॥११॥ येतो काकुलती । गोळा न साहवे श्रीपति । म्हणे खेळों आतां नीति । सांगो आदरिलें ॥१२॥ आनंदाचे फेरी । माजि घालोनियां हरि । येक घालीति हुंबरी । वाजवीति शींगें पावे ॥१३॥ वांकडे बोबडे । खुडे मुडे येक लुडे । कृष्णा आवडली पुढें । बहु भाविक ते ॥१४॥ करी कवतुक । त्यांचें देखोनियां मुख । हरिसी वाटतें सुख । खदखदां हासे ॥१५॥ येकयेकाचे उच्छिष्ट । खातां न मानीति वीट । केली लाजतांही धीट । आपुलीया संगें ॥१६॥ नाहीं गेली ज्याची भुक । त्याचें तो पसरवी मुख । अवघीयांतें देतो सुख । सारिखेंची हरी ॥१७॥ म्हणती भला भला हरी । तुझी संगती रे बरी । आतां चाळवी तरी । न वजों आणिका सवें ॥१८॥ गाई विसरल्या चार । पक्षि स्वापदांचे भार । झालें यमुनेचें स्थिर । जळ वाहों ठेलें ॥१९॥ देव पाहाती सकळ । मुखें घोटोनियां लाळ । धन्य म्हणती गोपाळ । धिग झालों आम्ही ॥२०॥ म्हणती कैसें करावें । म्हणती कैसें करावें । यमुनाजळीं न्हावें । मत्स्य शेष

ध्यावया ॥२१॥ सुरवरांचे थाट । भरलें यमुनेचे तट । तंव आधिकचि होट । मटमटा वाजती ॥२२॥ आनंदें गोपांसहित । क्रीडा करी गोपीनाथ । म्हणे यमुनेंत हात । नका धोऊं कोण्ही ॥२३॥ म्हणती जाणें जीविचें । लाजे त्यास येथें कैचें । शेष कृष्णाचें । लाभे थोरिवे ॥२४॥ धन्य दिवस काळ । आजि फावला गोपाळ । म्हणती धालों रे सकळ । तुझियानि हातें ॥२५॥ मानवले गडी । येकयेकाचे आवडी । दहीं खादलें परवडी । धणींवरी आजी ॥२६॥ तुझा संग बरवा । नित्य आम्हा द्यावा । ऐसें करोनियां जीवा । नित्य देवा चालावें ॥२७॥ तंव म्हणे वनमाळी । घ्या रे काठी या कांबळी । आतां जाऊं खेळीमेळी । गाई चारावया ॥२८॥ आजि झाला आनन्दु । न वर्णवे ब्रह्मानंदु । चाले परमानन्दु । सवें आम्हांसहित ॥२९॥ तुका म्हणे प्रेमें धाली । कोणा न साहवे चाली । गाई गोपाळां केली । आपणयांसरी ॥३०॥

५४१. या वो या चला जाऊंया सकळा । पाहों हा सोहळा आजी वृंदावनींचा ॥१॥ वाइला गोपाळें वेणुनाद पडे कानीं । धीर नव्हे मनीं चित्त झालें चंचळ ॥२॥ उरले ते सांडा काम नका करूं गोवी । हीच वेळ ठावि मज कृष्णा भेटीची ॥३॥ निवतील डोळे याचें श्रीमुख पाहतां । बोलती ते आतां घरचें सोसूं वाईट ॥४॥ कृष्णभेटीआड कांहीं नावडे आणिक । लाज तरि लोक मन झालें उदास ॥५॥ येकायेकी चालीयेल्या सादावित सर्व । तुका म्हणे देवें रूपें केल्या तन्मयें ॥६॥

---

फुगडी

५४२. फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे । लाज सांडोनि येकयेकी पाहे ॥१॥ फुगडी गे अवघे मोडि गे । तरिच गोडी गे संसार तोडी गे ॥२॥ मागे जें सीकेलीस होती पोटीं । तें विचारोनि आतां उच्चारी होटीं ॥३॥ त्रिगुणाची वेणी तुझे उडते पाठीं । सावरोनि धरीं घाली मूळबंदी गांठी ॥४॥ आगळें पाउल जिंकी येकायेक । पावसी मान हे मानवती तिन्ही लोक ॥५॥ तुका म्हणे तुजमजमध्यें एक भाव । समतुकें बार घेऊं च ठाव ॥६॥

५४३. फुगडी फु सक्वी माझे तूं । हगून भरलं धु । तुझ्या ढुंगा तोंडावरी थू ॥१॥ फुगडी घेतां आली हारी । ऊठ जावो जगनोवरी ॥२॥ हात पाय येवळ जाती । ढुंगण घोळितां लागे माती ॥३॥ सात पांच आणिल्या हारी । वाचोनि काय तगसी पोरी ॥४॥ सरला दम पांगले पाय । अझुनि तरी घोळिसी काय ॥५॥ तुका म्हणे अझुनी तरी । सांगितलें तें गवडी करी ॥६॥

हुबरी, हमामा

५४४. तुझी कोण घाली हुंबरी । साहि पांगल्या अठरा चारी ॥१॥ सहस्रमुखावरी । हरि शेष शिणविले ॥२॥ चेंडूवासवें घेतली उडी । नाथीला काळ्या देऊनि बुडी ॥३॥ अशुद्ध पितां करुणा नाहीं । तुवा मावसी पाही मारियेली ॥४॥ रावणाचे घर बूडविलें सारें । त्याची रांडा पोरें मारियेलीं ॥५॥ जाणो तो ठावा आहेसि आम्हां । तुवा आपुला मामा मारियेला ॥६॥ यासि खेळतां नास थोरु । तुकया स्वामी सारंगधरु ॥७॥

५४५. मासिं पोरा घेर वार । तुझें बूजाविन खालील द्वार ॥१॥ पोरा हामामा रे पोरा हामामा रे ॥२॥ मसिं हामामा तूं घालीं । पोरा वरि सांभाळि खालीं ॥३॥ तरींच मसी बोल पोरा । जिव्हाळ्याचि उचे ॥४॥ मसिं घेता भास । जीवा मीतूपणा नास ॥५॥ मजसवें खरा । पण जाऊं नेदी घरा ॥६॥ आमुच्यि रंगी । दुजे तगेना ये संगीं ॥७। तुक्यासवें भास । हरि जीवा करी नास ॥८॥

५४६. हमामा रे पोरा हामामा रे । हमामा घालितां ठकलीं पोरें करी येरझारा चौऱ्याएंसिची ॥१॥ पहिले पहारा रंगासि आलें । सोहं सोहंसे वार घेतलें । देखोनि गडी तें विसरलें । डोई पडिले आपणची ॥२॥ दुसऱ्या पाहारा महाआनंदें । हमामा घाली छंदेंछंदें । दिसें वाढे तों गोड वाटे । परि पुढें नेणें पोरा काय होतें तें ॥३॥ तिसरा पाहारा घेतला वार । अहंपणें पाय न राहे स्थिर । सोसे सोस करितां डोई । पडसि सत्य जाण हा निर्धार ॥४॥ चौथ्या पाहारा हामामा । घालिसी कांपविसी हातपाय । सूर्यापाटलाचा पोर येमा । त्याचे पडशील डाईरे ॥५॥ हमामा घालितां भ्याला तुका । त्याणें सांडिली गड्याची सेयी रे । यादवाचा मूल येक विठोबा । त्यासवें चारीतो गाई रे ॥६॥

**कांडण, दळण**

५४७. सिद्ध करुनियां ठेविलें कांडण । मज सांगातीण शुद्ध बुद्धि गे ॥१॥ आठव हा धरी मज जागें करी । मागिल पाहारीं सेवटीच्या गे ॥२॥ समतुके घाय घाली वो साजणी । मी तुज मिळणी जीवें मिळे ॥३॥ येक कांसि पाखडी दुसरि नीवडी । निःशेष तिसरी वोज करी । सरलें कांडण पाकसिद्धि करी । मेळवण क्षीरीं साकरेचें ॥५॥ उद्धव अक्रूर बंधू दोघे जण । बाप नारायण जेवणार ॥६॥ तुका म्हणे मज माहेरी आवडी । म्हणोनि तातडी मुळ केलें ॥७॥

५४८. सावडी कांडण वोवि नारायण । निवडे आपण भूस सार ॥१॥ मुसळ आधारी आवरोनि धरी । सांवरोनि थोरी घाव घाली ॥२॥ वाजती कांकणें अनुहात गजरे । छंदें माहिरे गाऊं गीती ॥३॥ कांडितां कांडण नव्हे भाग शीण । तुज मजपण निवडे तो ॥४॥ तुका म्हणे रूप उमटे आरिसा । पाक त्या सारिसा सिद्ध झाला ॥५॥

---

५४९. उपजोनीयां पुढति येवो । काला खाऊं दहीं भात ॥१॥ वैकुंठीं तो ऐसें नाहीं । कवळ कांहीं काल्याचे ॥२॥ येकमेका देऊं मुखीं । सुखीं खालुं हुंबरी । तुका म्हणे वाळुवंटीं । बरवे नीट उत्तम ॥४॥

५५०. याल तरि या रे लागे । अवघे माझ्या मागें मागें ॥१॥ अजि देतों पोटभरी । पुरे म्हणाल तोंवरी ॥२॥ हळू हळु चला । कोणि कोणासी न बोला ॥३॥ तुका म्हणे सांडा घाटे । तेणें नका भरूं पोटें ॥४॥

५५१. सिंकें लावियेलें दुरी । होतों तिघांचे मी वरी ॥१॥ तुम्हीं व्हारे दोहींकडे । मुख पसरोनि गडे ॥२॥ वाहती त्या धारा । घ्या दोहींच्या कोंपरा ॥३॥ तुका म्हणे हातीं टोका । अधिक उणें नेदी येका ॥४॥

५५२. पळाले ते भ्याड । त्यासी येथें झाला नाड ॥१॥ धीट घेती धणीवरी । सिंकीं उतरीतो हरी ॥२॥ आपुलीया मति । पडिली विचाराची रिती ॥३॥ तुका लागे घ्या रे पाया । कैं पावाल या ठाया ॥४॥

५५३. धालें मग पोट । केला गड्यांनीं बोभाट ॥१॥ येरे येरे नारायणा । बोलो आबोलण्या खुणा ॥२॥ खांद्यावरी भार । तीं गिणती बहू फार ॥३॥ तुकयाच्या दातारें । नेलीं सुखी केलीं पोरें ॥४॥

५५४. पाहती गवळणी। तंव ती पालथी दुधाणी ॥१॥ म्हणती नंदा-चीया पोरें। आजि चोरी केली खरें ॥२॥ त्याविण हे नाशी। नव्हे दूसरीया ऐसी ॥३॥ सवें तुका मेला। तेणें अगुणा आणिला ॥४॥

५५५. आतां ऐसें करूं। दोघां धरोनियां मारूं ॥१॥ मग टाकिति हे खोडी। तोंडी लागलि ते गोडी ॥२॥ कोंडूं घरामधीं। न बोलोनी जागो बुद्धी ॥३॥ बोलविती देवा। तुका गड्याचा मेळावा ॥४॥

लखोटा.

५५६. लय लय लखोटा। मूळबंदि कासोटा। भावा केलें साहे। आतां माझें पाहे ॥१॥ हातोहातीं गुंतली। जीवपणा मुकली। धीर माझा निका। सांडि बोल फिका ॥२॥ अंगिकारी हरि। नको पडूं फेरी। लाज धरि भांड। जग सोडि रांडे ॥३॥ बैस भावापाठीं। ऐक माझ्या गोष्टी। केला सांडि गोहो। धरि येथें मोहो ॥४॥ पाठमोरा डोल। आवरिते बोल। पांगलीसी बाळा। पुढें आवकळा ॥५॥ आतां उभी ठाईं। उभा उभी पाहीं। नको होऊं डुकरी। पुढें गाढव कुतरी ॥६॥ नाम केलें खरें। आपुलें म्यां बरें। तुका म्हणे येरी। पांगविल्या पोरी ॥७॥

५५७. गडि गेले रडी। कान्हो नंदीच तूं चढी ॥१॥ आम्ही न खेळों न खेळों। आला भाव तुझा कळों ॥२॥ न साहावे भार। बहु लागतो उशीर ॥३॥ तुका आला रागें। येऊं नंदि मागें मागें ॥४॥

५५८. यमुनेचे तटीं मांडियेला खेळ। म्हणतो गोपाळ गडीयांसी ॥१॥ हाल मांडा हाल मांडा। वाउगि सांडा मोकळि ॥२॥ नांवें ठेउनि वांटा गडी। न वजे रडी मग कोन्ही ॥३॥ तुका म्हणे कान्हो तिळा तांदळ्या। जिंकितो करीं आपुला खेळया ॥४॥

५५९. बळें डाईं नं पडे हरि। बुद्धि करी शाहाणा तो ॥१॥ मोकळे देवा खेळों द्यावें। समभावें सांपडावया ॥२॥ येतो जातो वेळोवेळां। न कळे कळा सांपडति ॥३॥ तुका म्हणे धरा ठाईंच्या ठाईं। मिठी जिवी पाईं घालोनीयां ॥४॥

५६०. कवळाचीया सुखें। परब्रह्म झालें गोरखें। हात गोवोनि खाय

मुखें । वांटासंदी लोणचीं ॥१॥ कोण जाणे तेथें कोण लाभ। कां ते ब्रह्मादिकां दुर्लभ ॥२॥ घाली हमामा हुंबरी । पांवा वाजवी मोहरी । गोपाळाचे फेरी । हरि छंदें नाचतसे ॥३॥ काय नव्हे त्या घरीं खावया। रिघे लोणी चोरावया। तुका म्हणे सवें तया । आम्हीहि सोंकलों ॥४॥

५६१. कान्होबा आतां तुम्ही आम्हीच गडे । कोणाकडे जाऊं नेदूं ॥१॥ वाहेन तुझा भार शिदोरी । वळतिवरी येऊं नेदी ॥२॥ ढवळे गाईचें दूध काढुं। येकल्या येक ठोंबे मारूं ॥३॥ तुका म्हणे ठोकऊं त्याला । जे तुझ्या बोला मानितना ॥४॥

५६२. बहु काळीं बहु काळीं । आम्ही देवाचे गोवळी ॥१॥ नाहिं विटं दंत भाता । जेऊं बैसती सांगातें ॥२॥ बहु काळें बहु काळें । माझे पांवरे कांबळें ॥ ॥३॥ तुका म्हणे नाहीं नाहीं । त्याचें आमुचेसें काई ॥४॥

५६३. बहु बरा बहु बरा । या सांगातें मिळे चारा ॥१॥ म्हणोनिगां जीवेंसाठीं । घतालें कान्होबाची पाठी ॥२॥ बरवा बरवा दिसे । ममागम याचा निमित्यें ॥३॥ पुढति पुढतां तुका । सोकला सोकविता लोका ॥४॥

५६४. घाति पाण्यामी हुंबरी । त्यांचें समाधान करी ॥१॥ ऐसि गोपाळाची मंत्र । जाति तिकडे मागें धांवे ॥२॥ स्थिरावली गंगा । पांगविलों म्हणे उगा ॥३॥ मोहरी पांवा काठी । तुका म्हणे याजसाठीं ॥४॥

५६५. वळल्या गाई धांवे घरा । आमुच्या करी वेरझारा ॥१॥ नांव घतां तो जवळी । बहु भला कान्हो बळी ॥२॥ नेदि पडो उणें पुरें । म्हणे अवघेंचि बरें ॥३॥ तुका म्हणे चित्ता । वांट न व्हावा परता ॥४॥

५६६. म्हणति धालों धणीवरी । आतां न लागे सीदोरी । नये क्षणभंगी आतां यासि वीसंबों ॥१॥ चाल चाल रे कान्होबा । खेळ मांडुं रानीं । बैसऊं गोठणी । गाई जमा करोनी ॥२॥ नलगे जावें घरा । चुकालिया वेरझारा । सज्जन सोयरा । मायबाप तूं आम्हां ॥३॥ तुका म्हणे धालें पोट । आतां काशाचा बोभाट । पाहातां ते वाट । मागें पुढें राहिली ॥४॥

५६७. तुझिय संगति । झाली आमुचि निश्चिंती ॥१॥ नाहीं देखिलें तें मिळे । भोग सुखाचे सोहळे ॥२॥ घरीं ताकाचें सरोवर । तेथें नवनीताचे पुर ॥३॥ तुका म्हणे आतां । आम्ही न वजों दवडितां ॥४॥

५६८. कामें पीडिलों माया । बहु मारी नाहीं दया ॥१॥ तुझ्या राहीलों आधारें । झालें अवघेंची बरें ॥२॥ तुझें लागलों संगती । आतां येतों काकूळती ॥३॥ तुका म्हणे तुझ्या भिडा । कान्होबा हे गेली पीडा ॥४॥

टिपरी.

५६९. खेळ मांडिला वाळवंटीं घाई । नाचति वैष्णव भाई रे । क्रोध अभिमान केला पावटणी । येक येक लागती पाई रे ॥१॥ नाचत आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी रे । कळिकाळावरि घातली कास । येक येकाहूनि बळी रे ॥२॥ गोपिचंदनउटी तुळसीच्या माळा । हार मिरवति गळां रे । टाळ मृदंग घाई पुष्पांचा वरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥३॥ लुब्धल्या नादीं लागलि समाधी । मूढ जन नर नारी लोकां रे । पंडित ज्ञानी योगी महानुभाव । येकचि सिद्धसाधका रे ॥४॥ वर्णाभिमान विसरली यांति । येक येका लोटांगणीं जाती रे । निर्मळ चित्तें झालीं नवनीतें । पाषाणा पाझर सुटती रे ॥५॥ होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले हे वैष्णव वीर रे । तुका म्हणे सोपी केली पायवाट । तरावया भवसागर रे ॥६॥

५७०. येके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकसील भाई रे । त्रिगुणाचे फेरीं थोर कष्टि होसी । या चौघींची तरि धरि सोयी रे ॥ ॥१॥ खेळ खेळोनियां निराळाचि राहीं । मांडीं या त्रिपयाचि घाई रे । येणेंचि खेळिया बसवंत होसी । ऐसें सत्य जाण माझ्या भाई रे ॥२॥ शिंपियाचा पोर येक खेळिया नामा । तेणें विठ्ठल बसवंत केला रे । आपुल्या संवगड्यासि सिकउनि घाई । तेणें संतत फड जागवीला रे ॥३॥ येके घाई खेळतां न चुकेचि कोठें । तया संतजन मानवले रे । ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे । कान्हो गोवारी त्यांनींच बसवंत केला । आपण भोंवती नाचती रे ॥४॥ सकळिका मिळोनि येकाचि घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ॥४॥ राम बसवंत कबीर खेळिया । जोडा बरवा मेळविला रे ॥ पांचा संवगड्यां येकाचि घाई । तेथें नाद बरवा उमटला रे । ब्रम्हादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं । तोहि खेळियो निवडीला रे ॥५॥ ब्राह्मणाचा पोर खेळिया

एक भला । तेणें जन खेळकर केला रे । जनार्दन बसवंत करोनियां तेणें । वैष्णवांचा मेळा मेळविला रे ॥६॥ येकाचि घाई खेळतां खेळतो । आपणाचि बसवंत झाला रे । आणिक खेळिये होऊनि गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे । तुका म्हणे गडे होशारूनि खेळा । पुढिलीयाचि धरोनि सोयी रे । येकेचि घाई खेळतां जो चुकला तो पडेल संसारडाई रे ॥८॥

५७१. बाराहि सोळाहि गडियांचा मेळा । सतरावा बसवंत खेळिया रे । जतिस्पद राखो जेणें टिपरिया घाई । अनुहात वाये मांदळा रे ॥१॥ नाचत पंढरिये जाउं रे खेळिया । विठ्ठल रखुमाई पाहुं रे ॥२॥ सा चहुं वेगळा अठरा निराळा । गाऊं वाजउनि येक चाळा रे । विसरती पक्षी चारा नेम पाणी । तारुण्य देहभाव बाळा रे ॥३॥ आनंद तेथींचा मुकियास वाचा । बहिरे ऐकति कानीं रे । आंधळ्यासि डोळे पांगळ्यासि पाय । तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे ॥४॥

५७२. दोनि टिपरी येकची नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे । कुसरि अंगें मोडतिल परि । मेळविति येकयेका छंदें रे ॥१॥ कांहींच न वजे वायां रे खेळिया । येकचि बसवंत अवघिया रे । सम विषम तेथें होउंच नेदि । जाणउनि आगळीया रे ॥२॥ संत महंत सिद्ध खेळतिल घाई । तेचि सांभाळी माझ्या भाई रे । हात राखून हाणति टिपरिया टिपरि । मिळोनि जाये त्याच्या सोयी रे ॥३॥ विताळाचे आवघे जाईल वांया । काय ते शृंगारोनि काया रे । निवडोनि बाहेरी काढिती निराळा । जो न मिळे संताचिया घाई रे ॥४॥ प्रकाराचें काज नाहीं सोडीं लाज । निशंक होऊनी खेळे रे । नेणति नेणतिच येकें पावली मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥५॥ रोमांच गुढिया डोलविति आंगें । भावबळें खेळविति सोंगें रे । तुका म्हणे कंठ सद्गदित दाटे । या विठोबाचे अंगसंगें रे ॥६॥

५७३. या रे गडे हो धरूं घाई जाणतांही नेणतां । नाम गाऊं टाळी वाहूं । आपुल्या हिता ॥१॥ फावलें तें घ्या रे आत्तां । प्रेमदाता पांडुरंग । अजि दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥२॥ हिंडती रानोरान भुजंग ते कांद्यावन सुख तयाहून आम्हा । गातां नाचतां रे ॥३॥ म्हणे तुका ब्रह्मादिका सावळें दुर्लभ सुखा । अजि येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं ॥४॥

५७४. भीमातिरिं ऐक वसविलें नगर । त्याचें नांव पंढरपुर रे । तेथील मोकासी च्यार भुजा त्यासी । बाईला सोळा हजार रे ॥१॥ नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । देव देईल विसावा रे । पुढें गेले ते निधाय झाले । वानितिल त्यांची सीमा रे ॥२॥ बळिया आगळ पाळि लोकपाळा । रिघ नाहीं कळिकाळा रे । पुंडलिक पाटिल केलि कुलवाडी । तो झाला भव-दुःख वेगळा रे ॥३॥ संतसज्जनीं मांडलीं दुकानें । जें जया पाहिजे तें आहे रे । भुक्ति मुक्ति फुकाचि साठीं । तयाकडे कोण्ही न पाहे रे ॥४॥ दोनीच हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरि रे । न वजो म्हणति आम्ही वैकुंठा । जिहीं देखीली पंढरी रे ॥५॥ बहुत दिस होती मज आस । आजि घडलें सायासीं रे । तुका म्हणे होय तुमचेनि पुण्यें । भेटि तया पायांसी रे ॥६॥

५७५. ब्रम्हादिकां न कळे खोळ । ते हे आकळ धरियेली ॥१॥ मोहरि पावा वाहे काठी । धांवे पाठीं गाईच्या ॥२॥ उच्छिष्ट जें न लभे देवां । तें हें सदैवां गोवळयां ॥३॥ तुका म्हणे जोड झाली । ते हे माउली आमुची ॥४॥

५७६. शुद्ध दळणाचें सुख सांगों काई । मानवितसे सईबाई ॥१॥ शुद्ध ते वळण लवकरी पावे । डोलवितां निवे अष्टांग तें ॥२॥ शुद्ध हें जेवितां तन निवे मन । अल्प त्या इंधन बुडा लागे ॥३॥ शुद्ध त्याचा पाक सुचित चांगला । आविट तयाला नाश नाहीं ॥४॥ तुका म्हणे शुद्ध आवडे सकळा । भ्रतार वेगळा न करी जिवे ॥५॥

५७७. कान्होबा तूं आलगट । नाहीं लाज बहु धीट । पाहिलें वाईट । बोलोनियां वोखटें ॥१॥ परि तूं न संडीसी खोडी । करिसी केली घडीघडी । पाडिसि रोकडी । तुटि माये आम्हांसी ॥२॥ तूं ठाईंचा गोवळ । अविचारी आनगळ । चोरटा सिंदळ । ऐसा पिटुं डांगोरा ॥३॥ जरी तुझी आई । आम्ही घालूं सर्वां ठाई । तुका म्हणे तेंहि । तुज वाटे भूषण ॥४॥

५७८. भोजनाच्या काळीं । कान्हो मांडियेली आळी । काला करी वनमाळी । अन्नें एकवटा ॥१॥ देई निवडोनी । माते म्हणे तो जननी । हात निपटोनि मेदिनी । वरि आंग घाली ॥२॥ कैसा अळि घेसी । नव्हे तेंचि करिसी । घेई दुसरे तयेसी । वारी म्हणे नको ॥३॥ आतां काय करूं ।

नये यासी हाणूं मारूं । नव्हे बुझाविता स्थिरू । कांहीं करितां ॥४॥ हातेंचि केलें येके ठाईं । आतां निवडोनी खाईं । आम्हा जाचीतोसि काईं । हरिसि म्हणे माता ॥५॥ त्याचे तया कुन । करवितां तुटे भान । तंव झालें समाधान । उठोनियां बैसे ॥६॥ माते बरें जाणवलें । आंग चोरोनि आपुलें । तोंडीयेलें येका बोलें । कैसें सुखदुःख ॥७॥ ताट पालवें झांकिलें । होतें तैसें तेथें केलें । भिन्नाभिन्न निवडिलें । अन्नें वेगळालीं ॥८॥ विस्मित जननी । भाव देखोनियां मनीं । म्हणे नाहीं ऐसा कोणी । तुजसारिखा रे ॥९॥ हारुषली माये । सुख अंगीं न समाये । कवळोनियां बाहीं । देति आलिंगन ॥१०॥ आनंद भोजनीं । तेथें फिटलिसे धणी । तुका म्हणे कोण्ही । सांडा शेष मज ॥११॥

५७९. चला वळूं गाई । बैसो जेऊं येके ठाईं ॥१॥ बहु केली वणवण । पायपिटी झाला शिण ॥२॥ खांदीं भार पोटीं भूक । काय खेळायाचें सुख ॥३॥ तुका म्हणे धांवे । मग अवघें बरवें ॥४॥

५८०. नेणो वेळ काळ । धालों तुझ्यानें सकळ ॥१॥ नाहीं नाहीं रे कान्होबा । भय आम्हापाशीं ॥२॥ वळूनि पुरविशी । गाई पोटा खावयाशी ॥३॥ तुजपाशीं भय । हें तों बोलूं परी नये ॥४॥ तुका म्हणे बोल । आम्हा अनुभवें फोल ॥५॥

५८१. सारा विटीदांडू । आणिक कांहीं खेळ मांडूं ॥१॥ बहु आंगा आले डाव । स्थिर नाहीं कोठें पाव ॥२॥ कोली हाणे टोला । झेली तेणें तो गोविला ॥३॥ येकमेका हांका मारी । सेल जाळी येक धरी ॥४॥ राजी आलें नांव । फेरा न चुकेची धांव ॥५॥ पुढें एक पाठी । येक येके दोघां आटी ॥६॥ येका सोस पोटीं । येक धांवे हात पिटी ॥७॥ तुका म्हणे आतां । खेळ मोडा त्या परता ॥८॥

५८२. कोंडिला गे माज । निरोधोनि द्वार । राखणें तें त्रंर । येथें करा कारण ॥१॥ हागे हागे हरी । करितां सांपडला चोरी । घाला गांठी धरी । जीवें माया त्रासाया ॥२॥ तोंचि पुढें आड । तिचें लोभ तिला नाड । लाऊनि चरफड । हात गोऊनि पळावें ॥३॥ संशयाचें बिरडें । याचे

निरसिलें भेटी । घेतलिसे तुटि । आतां देतां घेतां पावेल ॥४॥ तुका येतो काकुलति वाउगीया सोड । यासिच निवाड । आम्ही भारवाहिका ॥५॥

काला.

५८३. अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदाघरीं ॥१॥ नवल कवढें कवढें । न कळे कान्होबाचें कोडें ॥२॥ पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासी यशोदा भोजन घाली ॥३॥ विश्वव्यापक कमळापती । त्यासी गौळणी कडिये घेती ॥४॥ तुका म्हणे नटधारी । भोग भोगुनि ब्रह्मचारी ॥५॥

५८४. कृष्ण गोकुळीं जन्मला । दुष्टां चळकांप सुटला ॥१॥ होता कृष्णाचा अवतार । आनंद करिती घरोघर ॥२॥ सदा नाम वाचे गाती । प्रेमें आनंदें नाचती ॥३॥ तुका म्हणे हरती दोष । आनंदानें करिती घोष ॥४॥

५८५. मेळवुनि सकळ गोपाळ । कांहीं करिती विचार ॥१॥ जाऊं चोरूं लोणी । आजी घेऊं चंद्रधणी ॥२॥ चला वेळु लाविला अझुनि । काय करितां गडे हो ॥३॥ वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळांची मांदी ॥४॥ आवघाचि वावर । कळों नेदी कोणा खरें ॥५॥ घर पाहुनी येकांताचें । नव-विधा नवनीताचें ॥६॥ रिघे आपण भीतरी । पुरवि माथुळीच्या हरी ॥७॥ बोलूं नेदी म्हणे स्थीर । खूण दावी खा रे क्षीर ॥८॥ जोगवल्यावरी । तुका करितो चाकरी ॥९॥

५८६. कां रे गमविल्या गाई । आलि वळतीं तुझी जाई । मागें झालें काई । एका ते कां नेणसी ॥१॥ केलासे फजीत । मागें पुढेंहि बहुत । लाज नाहीं नित्य नित्य । दंड पावतां ॥२॥ बोला खोडा खिळ गाढी । ऐसा कोण तया काढी । धांवले कापडि । तुझी आधीं ओढाळा ॥३॥ चालें चाल धांवें । मीहि येतों तुझ्यासवें । तुका म्हणे जंव । तेथें नाहीं पावलि ॥४॥

५८७. कंठी धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥१॥ काला वाढूं येकमेकां । वैष्णव नीका संभ्रम ॥२॥ वाकुलिया ब्रम्हादिकां । उत्तम लोकां दाखवूं ॥३॥ तुका म्हणे भूमंडळीं । आम्ही बळी वीर गाढे ॥४॥

५८८. पाहातां गोवळी । खाय त्याची उष्टावळी ॥१॥ करितीं नामाचें चिंतन । गाई कान्होबाचें ध्यान ॥२॥ आलि धावी डायी । धांवे वळल्या मागें गाई ॥३॥ येके ठाई काला । तुका म्हणे भाविकांला ॥४॥

५८९. पैल आली आगी कान्हो काय रे करावें। न कळे तें कैसें आजि वांचों आम्ही जीवें ॥१॥ धांव रे हरी सांपडलों संधी। वोणव्याचे मधीं बुद्धि काय करावी ॥२॥ आवचितां ज्वाळा येतां देखिल्या वरी। परतों पाहतां आधीं होतों पाठीमोरी ॥३॥ सभोंवतां फेर रिघ नव्हे पळतां। तुका म्हणे जाणसि तें करावें आतां ॥४॥

५९०. भेऊं नका बोले झाकोनियां राहा डोळे। वांचवील देव धाक नाहीं येणें वेळे ॥१॥ बापरे हा देवांचाहि देव। कळों नेदि भाव काय करी करवित ॥२॥ पसरोनि मुख विश्वरूप खाये ज्वाळा। सारोनियां संधी आवघे पाहाती गोपाळ ॥३॥ तुका म्हणे आम्ही मागें भ्यालों वायांविण। कळों आलें आतां या सागातें नाहीं शिण ॥४॥

५९१. नेणति तयांसी साच भाव दावी हरी। लाज नाहीं नाचे पावा वाजवी मोहरी ॥१॥ चला रे याच्या पाया लागों आतां। राखिलें जळतां महा आगीपासुनी ॥२॥ कैसीरे कान्होबा येवढि गीळीयेली आगी। न देखों पोळला तुज तोंडीं कोठें अंगीं ॥३॥ तुका म्हणे कां रे तुम्ही करीतां नवल। आमची सिदोरी खातो आलें त्याचें बळ ॥४॥

५९२. त्याणि धणिवरि संग केला हरिसवें। देउनि आपुलें तोचि देईल तें खावें ॥१॥ न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला। बहू दिस संग हाचि निर्धार त्याला ॥२॥ कान्होबा तूं जेविं घासोघासी आळविती। आरुष गोपाळ त्यांचि बहू देवाप्रीती ॥३॥ तुका म्हणे आतां जाऊं आपुलीया घरा। तेथे वांचवीलें ऐसें सांगों रे दातारा ॥४॥

५९३ घ्या रे भोंकरें भाकरी। दहींभाताची शिदोरी। ताक सांडी दुरी। असेल तें तयापें ॥१॥ येथें द्यावें तैसें घ्यावें। थोडें परी निरें व्हावें। सांगतों रे ठावें। असों द्या रे सकळ ॥२॥ माझें आहे तैसें पाहे। नाहीं तरी घरा जाये। चोरोनियां माये। नवनीत आणावें ॥३॥ तुका म्हणे घरीं। माझें कोण्हि नाहीं हरि। नका करूं दुरि। मज पायां वेगळें ॥४॥

५९४. काल्याचिये आशे। देव जळीं झाले मासे। पुसोनीयां हासे। टिरीसांगातें हात ॥१॥ लाजे त्यासि वाटा नाहीं। जाणे अंतरींचें तेंहीं। दीन होतां कांहीं। होऊं नेदी वेगळें ॥२॥ उपाय अपाय यापुढें। खोटें

निवडितां कुडें। जोडोनियां पुढें। हात उभे नुपेक्षी ॥३॥ तें घ्या रे सावकाशें। जया फावेल तो तैसें। तुका म्हणे रसें। प्रेमाचिया आनंदें ॥४॥

५९५. गोपाळ म्हणति कान्होबा या रे कांहीं मागों। आपुलाले आम्ही जिविंचि तया आवडी सांगों ॥१॥ येक म्हणति उगे रे उगे मागेंची लागों। निजों नका कोण्हि घरीं रे आजि अवघेचि जागों ॥२॥ जाणोनि नेणतां हरि रे मध्यें उगेचि बैसे। नाइकोनी बोल ऐके कोण कोणाचे कैसे। येक येकाच्या संवादें जाणे न मिळेचि ऐसें। पोटांतील होता आणवी देतो तयासि तैसें ॥३॥ येक म्हणती बहु रे आम्ही पीडिलों माया। नेदी दहीभात शिदोरी ताक घालीती पिया। तापलों वळितां गोधनें नाहिं जीवन छाया। आतां मागों पोटभरी रे याच्या लागुनियां पायां ॥४॥ येक म्हणति तुमचें अरे पोट तें किती। मागों गाई म्हैशी घोडे रे धन संपत्ति। हातीं देव गडि कान्होबा आमुचा आम्हां काय विपत्ती। कन्याकुमार दासी रे बाजावरि सुपात्ति ॥५॥ येक म्हणति बेटे हो कोण करी जतन। गाढव तैसेंच घोडें रे कोण तयाचा मान। लागे भवरोग वाहातां खांदी चौघेजण। हातीं काठ्या डोया बोडक्या हिंडों मोकळ्या रानें ॥६॥ येक म्हणती रानी रे बहुसावजें फार। फाडफाडों खाति डोळे रे पाय नेतिल कर। राखोनि राखे आपणा ऐसा कैचा शूर। बैसोनि राहे घरिं रे कोण करि हे चार ॥७॥ घरिं बैसलिया बहूतें बहू सांगति कामें। रिकामें कोणासि नावडे ऐसें आम्हांसी ठावें। चवघांमध्यें बरें दिसे तेथें नेमक व्हावें। लपोनि खेळतां सहज भलें गडियासवें ॥८॥ येक म्हणति गडि ते भले मिळति मता। केलि तयावरि चाले रे बरी आपुली सत्ता। नसावे ते तेथें तैसे रे खेळ हाणिती लाता। रडि येकायेकी गोलिया गोंधळ उडती लाथा ॥९॥ येक म्हणती खेळतां उगि राहाति पोरें। ऐसें काय घडो शके रे कोणी लहान थोरें। अवघे येती राग्रा रे येका म्हणतां बरें। संगें वाढे कलह करावा येकायेकिच बरें ॥१०॥ येक म्हणति येकला रे तूं जासिल कोठें। सांडि मांडि हें वाउगें

तुझे बोलचि खोटे । ठाईं राहा उगे ठाईंच कां रे शिणसी वाटे । आवघियांची सिदोरी तुझी भरियेली मोटे ॥११॥ तुका म्हणे अरे कान्हया काय सांगाल गोष्टी । चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं । जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ ताटीं । धाले गडी तुका ढेंकर देती विठ्ठल कंठीं ॥१२॥

५९६. आजि वोस अमरावती । काला पाहावया येती । देव विसरति । देहभाव आपुला ॥१॥ आनंद न समाये मेदिनी । चारा विसरल्या पाणी । तटस्थ त्या ध्यानीं । गाई झाल्या श्वापदें ॥२॥ जें देवाचें दैवत । उभें आसे या रंगांत । गोपाळांसहित । क्रीडा करी कान्होबा ॥३॥ तया सुखाची शिराणी । तिचें पाऊल मेदिनी । तुका म्हणे मुनी । धुंडितां न लाभती ॥४॥

५९७. चला बाई पांडुरंग पाहुं वाळवंटी । मांडियेला काला भोंवतीं गोपाळांचो दाटी ॥१॥ आनंदें कवळ देती येका मुखीं येक । न म्हणती साना थोर अवघे सकळिक ॥२॥ हमामा हुंबरी पावा वाजवी मोहरी । घेत-लासे फेरा मध्यें घेउनियां हरी ॥३॥ लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती । विसरलीं देहभाव शंका नाहीं चित्तीं ॥४॥ पुष्पांचा वरुषाव झाली आरती-यांची दाटी । तुळसी गुंफोनियां माळा घालिताती कंठीं ॥५॥ यादवांचा राणा गोपी मनोहर कान्हा । तुका म्हणे सुख वाटे देखोनियां मना ॥६॥

५९८. माझे गडि कोण कोण । निवडा भिन्न यांतूनी ॥१॥ आपआपणां-मध्यें मिळो । येक खेळों येकासी ॥२॥ घाबरियांच्या मोडा काड्या । धाडा भ्याडा वळतीया ॥३॥ तुका म्हणे देवापाशीं । विटाळसी नसावी ॥४॥

५९९. होचि अनुवाद सदा सर्वकाळ । करोनियां गोपाळ काला सेउं ॥१॥ वोरसलें कामधेनुचें दुभतें । संपूर्ण अयितें गगनभरी ॥२॥ संत सनकादिक गोमट्या परवडी । विभाग आवडि इच्छेचिया ॥३॥ तुका म्हणे मधीं घालूं नारायण । मग नव्हे शीण कवण्या खेळें ॥४॥

६००. आधिकांचा मज कंटाळा । तुम्हा गोपाळां संगाती ॥१॥ काय नाहीं तुम्हापासी । सकळांविशीं संपन्न ॥२॥ उद्वेगाचा नेघे भार । भागल्या सार पुरतें ॥३॥ तुका म्हणे अधिर जिणें । नारायणें न करावें ॥४॥

६०१. झालों आतां येके ठायीं । न वंचुं कांहीं येकमेकां ॥१॥ सरलों हें गे देउनि मोट । कटकट काशाची ॥२॥ सोडोनियां गांठी पाहे । कांहीं आहे त्यांस तें ॥३॥ तुका म्हणे झालों निराळा । आतां गोपाळा देऊं बोभा ॥४॥

६०२. वोळलीचा दोहुं पान्हा । मज कान्हा सांगितलें ॥१॥ घ्या जी गे गोक्षीर हातीं । निगुतिनें वाढावें ॥२॥ सांगितलें केलें काम । नव्हे धर्म सत्तेचा ॥३॥ तुका म्हणे नव्हे जुने । ऐसें कोणें सोसावें ॥४॥

६०३. या रे करूं गायी । जमा निजलेती कायी । बोभाट्यानें आयी । घरा गेल्या मारिल ॥१॥ घाला घाला रे कुकारे । ज्याची तेणेंचि मोहरे । येवढेंचि पुरें । केलियानें सावध ॥२॥ नेणोनियां खेळा । समय समयाच्या वेळा । दुश्चिताजवळा । मिळालेती दुश्चीत ॥३॥ तुका म्हणे शिक । न धरितां लागे भीक । धरा सकळिक । मनेरि धांवा वोळतिया ॥४॥

६०४. येईल तें घेईन भागा । नव्हे जोगा दुसरिया ॥१॥ आवडि ते तुम्ही जाणा । बहु गुणांसारिखी ॥२॥ मज घेती डांगेवरी । सवें हरि नसलिया ॥३॥ तुका म्हणे राबवां देवा । करिन सेवा सांगितली ॥४॥

६०५. अंतरलीं खुटी मिठी । भय धरोनियां पोटीं । म्हणतां जगजेठी । धांवें करुणा उत्तरीं ॥१॥ बाप बळीया शिरोमणि । उतावीळ या वचनीं । पडिलिया कानीं । धांवा न करी आळस ॥२॥ बळ दुणी शरणागता । स्वामी वाहों नेदी चिंता । आइतेंचि दाता । पंगतीस बैसवी ॥३॥ वाहे खांदी पाववी घरा । त्याच्या करी येरझारा । बोबड्या उत्तरा । स्वामी तुकया मानावे ॥४॥

६०६. शुद्धीचें सारुनी भरियेली पाळी । भरडुनि वोंगळी नास केला ॥१॥ आडसुनी शुद्ध करी वो साजणी । सिद्ध का पापिणी नासियेलें ॥२॥ सुपीं तोंची पाहें धड उगटिलें । नव्हता नाशिलें जग झोडी ॥३॥ सुपीं तोंची आहे तुज तें आधिन । दळिल्या जेवण जैसें तैसें ॥४॥ सुपीं तोंची संग घेई धडफुडी । येकसा गधडी नास केला ॥५॥ दळितां आदळे तुज कां न कळे । काय गेले डोळे कान तुझे ॥६॥ सुपी तोंची वोज न करीतां सायास । पडती सांदीस तुका म्हणे ॥७॥

६०७. धन्य तें गोधनें कांबळी काठिका। मोहरि पांवा निका ब्रीद वांकी ॥१॥ धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ। नर नारि सकळ धन्य झाल्या ॥२॥ धन्य त्या गोपिका सोळा सहस्र बाळा। यादवां सकळां धन्य झालें ॥३॥ धन्य ते देवकी जसवंती दोहींचें। वसुदेवनंदाचें भाग्य झालें ॥४॥ धन्य म्हणे तुका जन्मा तीचि आली। हरिरंगीं रंगलीं सर्व भावें ॥५॥

६०८. गवळणी बांधिती धारणासी गळा। खेळे त्या गोपाळामाजी ब्रह्म ॥१॥ धांवोनियां मागें यशोदे भोजन। हिंडे रानोरान गाईपाठीं ॥२॥ तुका म्हणे सर्व कळा ज्याचे अंगीं। भोळेपणा लागीं भीक मागे ॥३॥

६०९. देखिलासी माती खातां। दावियानें बांधी माता ॥१॥ जाळि घेउनी कांबळी काठी। गाई वळि वेणु पाठीं ॥२॥ मोठें भावार्थाचें बळ। देव झाला त्याचें बाळ ॥३॥ तुका म्हणे भक्तासाठीं। देव धांवे पाठोवाटीं ॥४॥

६१०. हा गे माझें हातीं। पाहा कवळ सांगाती ॥१॥ देवें दिल्हा खातों भाग। कराल तरी करा लाग ॥२॥ धालें ऐसें पोटा। वरि करूनीयां बोट ॥३॥ तुका म्हणे घरोघरीं। मग कैंच्या या परी ॥४॥

६११. अवघें अवघीकडे। दिल्हें पाहे मजकडे। आशा संवगडे। साहित थोरी लागली ॥१॥ कां रे धरीला अबोला। माझा वाटा देई मला। सिदोरीचा झाडा केला। आतां निवडेना ॥२॥ भूक लागली अनंता। कां रे नेणसी जाणतां। भागलों वळीतां। गाई सैरा वोढाळा ॥३॥ तुका करुणा भाकी। हरि पाही गोळा टाकी। घेतां झाला सुखी। भीतरी वांटी आणिकां ॥४॥

६१२. अवघिया दिल्हा गोर। मजकरे पाहेना ॥१॥ फुंदे गोपा‿ डोंडे चोळी। ढुंगा थापली हाणी तोंडा ॥२॥ आवडति थोर मोठे। मी रे पोरटें दैन्यवाणें ॥३॥ तुका म्हणे जाणो भाव। जीविंचा देव बुझावूं ॥४॥

६१३. मागें पुढें पाहे। सांभाळोनि दोनी ठाये। चुकाऊनी जाये। गडी राखे गाडियासी ॥१॥ मुरडे दंडा दोहीं तोंडा। गडिया सावध करी। भेडतीया संगें। तया हाल तुजवरी ॥२॥ गाडिया गडी वांटुनि देई। ज्याच्या खोडी तेची ठाई ॥३॥ आगळ्या बळ करील काय। तुज देणें लोभे डाय ॥

॥४॥ नवा घरीं पाउला करी । सांपडे तो तेथें घरीं ॥५॥ जिंकुनि डाव करी। ठावो सत्ता आणिकावरी ॥६॥ सांपडोनि डाई बहु काळ गुंतलासि । बळिया गडी फळी फोडोनि धरितां त्यासि ॥७॥ चुकांडि जो खायें मिळोनियां अंगीं जाये । गुंतलासी काय तुका म्हणे आझुनि ॥८॥

६१४. आम्ही गवळी रानटें । नव्हों जनांतील धीटें ॥१॥ सिदोरीचा करूं काला । येक वांटितों येकाला ॥२॥ खेळों आपआपणासीं । आमुची तो आम्हापासीं ॥३॥ म्हणे मिळाले नेणते । तुका कान्होबा भोंवतें ॥४॥

३१५. पाहा रे तमासा तुमचा नव्हे येथें लाग । देईन तो भाग आलियाचा बाहेरी ॥१॥ जागा रे गोपाळांनो ठाईं ठाईं जागा । चावुलिनें भागा दूर मजपासोनी ॥२॥ न रिघतां ठाव आम्हां ठावा पाळतियां । भयाभीत वायां येथें काय चांचपाल ॥३॥ तुका म्हणे हातां चढे जीवाचिया साठीं । मिटक्या देतां गोड मग लागतें शेवटीं ॥४॥

६१६. डाई घालोनियां पोरें । त्यांचीं गुरें चुकविलीं ॥१॥ खेळ खेळतां फोडिल्या डोया । आपण होय निराळा ॥२॥ मारिती माया घेती जीव । नाहीं कींव अन्यायें ॥३॥ तुका कान्होबा मागें । तया अंगें कळों आलें ॥४॥

६१७. आतां हेंचि जेऊं हेंचि जेऊं । सवें घेऊं शिदोरी ॥१॥ हरिनामाचा खिचडी काला प्रेमें मोहीला साधनें ॥२॥ चवीं चवीं घेऊं घांस । ब्रह्मरस आवडी ॥३॥ तुका म्हणे गोड लागे । तों तों मागें रसना ॥४॥

६१८. अवघेंचि गोड झालें । मागिलये भरी आलें ॥१॥ साह्य झाला पांडुरंग । दिला अभ्यंतरीं संग ॥२॥ थडिये पावतां तो वाव । मागें पाहातां तो ठाव ॥३॥ तुका म्हणे गेलें । स्वप्नींचें जागें झालें ॥४॥

६१९. तुज सवें येतो हरी । आम्हां लाज नाहीं तरी । उचलिला गिरी । चांग तई वांचलों ॥२॥ मोडा आतां खेळ । गाई गेल्या झाली वेळ । फांकल्या वोढाळा । नाहीं तोंचि आवरा ॥२॥ चांग दैवें यमुनेसी । वांचलों बुडतां । निलाजिरी आम्ही नाहीं । भय धाक या अनंता ॥३॥ खातो आगी माती ।

आतां पुरे हा सांगती । भोंवता भोंवेल । आम्हां वाटतें हें चिर्त्ती ॥४॥ तुका म्हणे उरी । नाहीं तुजसवें । शाहाणिया दुरी । छंद भोळिया भावें ॥५॥

६२०. नको आम्हांसवें गोपाळा । येऊं बोढाळा गाई तुझ्या ॥१॥ कोण धांवे त्यांच्या लागें । मागें मागें येरझारी ॥२॥ न बैसती येके ठाई । धांवती दाही दहा वाटां ॥३॥ तुका म्हणे तूं राख मनेरी । मग त्या भेरी आम्ही जाणों ॥४॥

६२१. मागावया गेलों सिदोरी। तुझ्या मायाघरीं गांजीयेलों ॥१॥ तुजविण ते नेदी कोणा । सांगतां खुणा जिवें गेलों ॥२॥ वायांविण केली वेरझार । आतां पूरे घर तुझी माया ॥३॥ तुका म्हणे तूं आम्हां वेगळा । राहे गोपाळा म्हणऊनी ॥४॥

६२२. काकुलती येतो हरि। क्षणभरी निवाडितां ॥१॥ तुमची मज लागली सवे । ठाईंचि नव्हे नवे गडी ॥२॥ आणिक बोलविती फार । बहु थोर ते नावडती ॥३॥ भाविके त्यांची आवडी मोठी । तुका म्हणे मिठीं घाली जिवीं ॥४॥

६२३. वरतां वेंघोनि घातली उडी । कळंबा बुडीं यमुनेसी ॥१॥ हरि बूडाला बोंब घाला । घरचि त्याला ठावें नाहीं ॥२॥ भवनदीचा न कळे पार । काळिया माजी थोर विखार ॥३॥ तुका म्हणे काय वाऊग्या हाका । हातींचा गमवूनि थिका ॥४॥

६२४. अवघी मिळोनी कोल्हाळ केला । आतां होता म्हणती गेला ॥१॥ आपुलिया रडती भावें । जयासवें जयापरी ॥२॥ चुकलों आम्ही खेळतां खेळ । गेला गोपाळ हातींचा ॥३॥ तुका म्हणे धांवती थडी । न घाली उडीं आतां कोण्ही ॥४॥

६२५. भ्यालीं जीवा चुकलीं देवा । नाहीं ठावा जवळी तो ॥१॥ आहाकटा करि हाय । हात डोकें पिटिती पाय ॥२॥ जवळी होतां न कळे आम्हां । गेली सीमा नाहीं दुःखा ॥३॥ तुका म्हणे हा लाघवी मोठा । पाहे खोटा खरा भाव ॥४॥

६२६. काळिया नाथुनी आला वरी। पैल हरी दाखवीती ॥१॥ दुसरीया भावें न कळे कोण्हा। होय नव्हेसा संदेह मना ॥२॥ रूपा भिन्न पालट झाला। गोरा सांवळासा पैं देखिला ॥३॥ आश्वासित आला करें। तुका म्हणे खरें देवा ॥४॥

६२७. हरि गोपाळासवें सकळां। भेटे गळ्यां गळा मेळउनी ॥१॥ भाविकें त्यांची आवडी मोठी। संग गोष्टी जीवींचिया ॥२॥ योगीयाच्या ध्याना नये। भाकरी त्यांच्या चोरुनि खाये ॥३॥ तुका म्हणे असे शाहाणिया दुरि। बोबाडिया दासा हाका मारी ॥४॥

६२८. धांव कान्होबा गेल्या गाई। न म्हणें मी कोणे कांहीं ॥१॥ आपुलियाचें वचन देवा। गोड सेवा करीतसे ॥२॥ मागतां आधीं द्यावा डाव। बळिया मी तो नाहीं भाव ॥३॥ तुका म्हणे ऐशा सवें। अनुसरावें जीवेंभावें ॥४॥

६२९. आणिकें काय थोडी। परि ते फार खोडी कुडी ॥१॥ सदा मोकळींच गुरें। होतीं फजित तीं पोरें ॥२॥ सदा घालीती हुंबरी। येक येकाचे न करी ॥३॥ तुका म्हणे घरीं। माय वेळोवेळां मारी ॥४॥

६३०. बहूतांचे संगती बहू पावलों फजीती ॥१॥ बरें केलें नंदबाळें। मागिल्याचें तोंड काळें ॥२॥ माझा करीतील तंटा। लपति आलीया बोभाटा ॥३॥ तुका म्हणे कायी। किती म्हणूं बाप आई ॥४॥

६३१. गाईन ते लीला चरित्र पवाडे। राखीले संवगडे सहित गाई ॥१॥ चोरिलें नवनीत बांधविला गळा। जे तुम्ही गोपाळा छंद केले ॥२॥ मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें। केली ते गोविंदें क्रीडा गावो ॥३॥ मायबापा लाडें दाविलें कवतूक। तें या अणुं सुख अंतराससी ॥४॥ निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी। ऐसा म्हणों बळी अमुचा स्वामी ॥५॥ तुका म्हणे सरसि असो येणें बोधें। जाणोनि संबंध सर्वकाळ ॥६॥

६३२. स्वर्गे सुखाचें झाले अनुभव। येक येकीपासीं सांगतील भाव। अवघ्यां अर्थांचा कैसा नवलाव। सर्वसाक्षी तेथेंचि त्याचा जीव वो ॥१॥

आपआपणांसी करिती नवल । परी वादावाद न संडिती बोल । येका मेघःशामे जलधर वोल । रसिं उतावेळ ऱ्हद्य सखोल वो । ॥२॥ येक विषय तो सकळांचा हरी । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं । अंध बधीर हे प्रेतलोका-च्यारी । त्याची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥३॥ स्तुति परावीया मुखें रुचिकर । प्रीतिपात्राचा गौरवी आदर । परस्परें हे सादरासादर । योग सज्ज-नाच्या सुखा नाहीं पार वो ॥४॥ भक्तिवालभ न तुटे चराचरीं । आप्त आनाप्त हो । ऐसी नाहीं उरी । दुरि जवळी संचिता ऐसें धरी । रंगा रंगा ऐसें होणें लागे हरि वो ॥५॥ तुका लाधला हे उच्छिष्ट भोजन । आला बाहेर प्रेमें वोसंडोन । कानीं पडले त्या जीवाचें जतन । धरियेले येका भावें हृदयीं चरण वो ॥६॥

६३३. आजि कां तूं दिससी दुश्चीती । म्हणीये काम न लागे तुझ्या चित्तीं वो । दिल्हे ठेऊं तें विसरसी हातीं । नेणों काय बैसला हरि चित्तीं ॥१॥ सर परति झालीस आतां भांड । कैसें दाखविसी या जगासी तोंड । व्यालीं माय ते लाजविली रांड । नाहीं थार दों ठाईं झाला खंड वो ॥२॥ होतें तैसें तें उमटलें वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी । नाहीं मर्यादा निःसंग बावरी । मन हें गोविंदीं देहे काम करि वो ॥३॥ नाहीं करित उत्तर कोण्हा-सवें । पराधीन भोजन दिल्हें खावें । नाहीं अचळ सावरावा ठाव । देखों उदासीन तुज देह गे भाव वो ॥४॥ कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलीकिली भोंवतीं बहुत । दोघे येकवत बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥५॥ करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भांडवी सासूसुना । परा भक्ति हे शुद्ध तुम्ही जाणा । तुका म्हणे ऐसें कळों यावें जना वो ॥६॥

६३४. भरला उलंडोनि रिता करी घट । मिस पाणियाचें गोविंदाची चट । चाले झडझडा उसंतूनि वाट । पाहे पाळतोनि उभा तोंचि नीट वो ॥१॥ चाळा लावियेला गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें । दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीत खेळ मांडियेला येथें वो ॥२॥ मनीं आवडे

तें करावें उत्तर । कांहीं निमित्याचा पाहोनी आधार । उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढवीसी उत्तरा उत्तर वो ॥३॥ धरिली खोडि दे टाकोनियां मागें । न ये विनोद हा कामा ऐसीं संगें । मिठी घालीन या जिवा- चीया त्यागें । नाहीं ठाऊकीं तुझीं पडलीं सोंगें वो । ॥४॥ सुख अंतरींचें बाह्य ठसटसी । म्हणे विनोद हा काय सोंग यासी । तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदनंदन या थोरपणें जासि रे ॥५॥ करी कारण तें वळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जना । मन मिनलें रे तुका म्हणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥६॥

६३५. आजि नवल मी आलें येणें रानें । भेटी अवचिता नंदाचिया कानें । गोवी सांगती ओ सकळहि जन । होतें संचित आणियेलें तेणें ओ ॥१॥ गेलें होउनि न चले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं । अंगीं जडला मग उरलें तें काई । आतां राखतां भलें गुमान बाई ओ ॥२॥ बहुत कामें मज नाहीं आराणुक । येक सारितां तों पुढें उभें येक ॥ आजि मी टाकोनी आलें सकळीक । तंव राचियेलें आणिक कवतुक वो ॥३॥ चिंता करितां हरिली नारायणें । अंगसंगें मिनतां दोघिजणं । सुखें निर्भर झालिये त्याच्या गुणें । तुका म्हणे खुंटलें येणें जाणें वो ॥४॥

६३६. मै भुलि घरज्यानी बाट । गोरस बेचने अये हाट ॥१॥ कान्हा रे मनमोहन लाल । सबहि बिसरु देखे गोपाल ॥२॥ काहा पगडारू देखे आनेरा । देखे तो सब वोहिने घेरा ॥३॥ हुं तों थकित बहिर तुका । भागा रे सब मनका धोका ॥४॥

६३७. हरिबिन रहिया न जाय जिहिरा । कबकि थाडि देखें राहा ॥१॥ क्या मेरे लाल कवन चुकि भई । क्या मोहिपासेति बेर लगायि ॥२॥ कोइ हरि जावे बूलावन । बारहि डारु उसपर तन ॥३॥ तुका प्रभु कब देखे पाउ । पासि आऊं फेर न जाऊं ॥४॥

६३८. भलो नंदाजीको डिकरो । लाज राखिलीन हमारो ॥१॥ आगळ आवे देवाच्छि कान्हा । मैं घर छोडी आहे म्हाना ॥२॥ उन्हसु कलना नव्हे

तो भला । खसम अहंकार दादुला ॥३॥ तुका प्रभु परबालि हरि । छपि आहे हुं जगाथि न्यारी ॥४॥

६३९. नका कांहीं उपचार माझे शरीरा । करूं न साहावे मज बहु होतो उबारा । मनोजन्य वेथा वेध झाला अंतरा । लवकरि आणा नंदाचिया कुमरा वो ॥१॥ सखया वेशिया तुम्ही प्राणवल्लभा । निवेदिला भाव आर्तभूत या लोभा । उमटली अंगीं वो सांवळी प्रभा । साचही अवस्था कळे मज माझ्या क्षोभा ॥२॥ कळों नेदावी हे दुजयासी मात । घडवा तयासी उत्कंठा येकांत । येकायेकीं साक्षी येथें आपुलें चित्त । कोण्या काळें नेणों होईल भाग्य उदीत वो ॥३॥ स्वाद शीण देहभान निद्रे खंडन । पाहिलें तटस्थ उन्मलित लोचन । अवघें वोसावून उरले ते चरण । तुका म्हणे दरुशनापें आले जीवन वो ॥४॥

६४०. पडली भुलि धांवति सैराट । छंदें गोविंदाची चोजविती वाट । मागें सारोनि सकळ बोभाट । वंदी पदांबुज ठेवून लल्लाट वो ॥१॥ कोणी सांगा या गोविंदाची शुद्धि । होतें वाहिलें लपला आतां खांदीं । कोठें आड आलि हें देहबुद्धी । धांवा आळवा करूणा कृपानिधी वो ॥२॥ मागें बहुतांचा अंतरला संग । मुळें जयाच्चिया तेणें केला त्याग । पाहिलें पाहातां हें हारपलें आंग । खुंटली वाट नाहींसें झालें जग वो ॥३॥ शोक वियोग घडला सकळांचा । गेल्या शरण हा अन्याय आमुचा । केला उच्चार घडल्या दोषांचा । झाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥४॥

६४१. काय उणें कां करितोसि चोरी । किति सांगूं तूं नाइकसी हरी । परेपरता तूं पळोन जासी दुरी । अनावर या लौकिका बाहेरी वो ॥१॥ माया करुणा हे करिते बहुत । किती सोसूं या जनाचे आघात । न पुरे आवसरु हेंचि नित्यानित्य । तूंचि सोडवीं करोनि स्थीर चित्त वो ॥२॥ बहुत कामें मी गुंतलीये घरीं । जासि डोळा तूं चुकवुनी हरी । करितां लाग न येसी चपळ भारी । नाहीं सायासाची उरों दिली उरी वो ॥३॥ तुज म्हुणितयें मी

न संगे अनंता । नको जाऊं या डोळियां परता । न लगे जोडी हे तुजविण आतां । तुकया स्वामी कान्होबा गुणभरिता वो ॥४॥

६४२. आलिये धांवती धांवती भेटी होईल म्हूण । तंव ती टळली वेळ वो माझा उरला शीण ॥१॥ आतां काय करूं सांगा वो मज भेटेल कैसा। हरीलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥२॥ लाविती उशीर बहु वोढिती वोढा । सांभाळिता मांग असांग दुःख पावेल पीडा ॥३॥ जळो आतां संवसार वो कैं मेवट पुरे । तुकयाच्या स्वामी गोपाळा लागीं जीव झुरे ॥४॥

६४३. याली क्वाड टळली वाड गती । कांहे व्यापिली कां पडिली दुश्चिती । कोणे लागला गे मदेवेच्या हातीं । आजि शून्य सेजे नाहीं न दिसे पती वो ॥१॥ बोले दूती रूक्मी राधा हें वचन । मर्मी लावव दाखवी नारायण । म्हणे कोमळ परि बहु गे निर्गुण । यासीं न बोले कळला मज पूर्ण वो ॥२॥ धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । तें पाचारिले होउनि ये वो सीता । लाजिन्नली रूप न ये पालटितां । झाला भीमकी आपण राम सीता वो ॥३॥ सत्यभामा दान करी नारदासी । तें कळला वो मज हृषीकेशी । तुळे वालितां न ये कनक वो रासी । समतुके येक पान हो तुळशी ॥४॥ मज सुली पडली केशापरी । आम्हां भोगूनि म्हणावी ब्रह्मचारी । दिल्ही वाट यमुने माये खरी । तुम्हां आम्हां न कळे अद्यापिवरी वो ॥५॥ जाणे जिवांचे सकळ नारायण । असे व्यापुनि तो न दिसे लपोन । राधा संबोखीली प्रिति आलिंगून । तुका म्हणे येथें भावाचें कारण वो ॥६॥

६४४. मिळोनि गोळणी । देती यशोदे गाऱ्हाणीं । दहीं दुध तूप लोणी । सिंका नुरेचि कांहीं ॥१॥ मेळउनि पोरें । तेथें रिघे येकसरें । वेगीं आणोनि सामोरें । तेथें लोणी खाये ॥२॥ हरि मोकला वो हरी मोकला वो । मोकला तो वारी तुज लाज नाहीं तरी । आम्हां सांपडतां उरी । तुज मज नाहीं ॥३॥ तुज वाटतसे कोड । यासि लागतसे गोड । काय हांसतोसि वेड । तुज लागलें वो ॥४॥ आम्ही जाऊं तुजवरी । पोरें चाळविल्या पोरी । काय सांगों

भांडखोरी । लाज वाटे आम्हां ॥५॥ मुख मळीन वदन । उभा हाडतिये घोणें । तंव दसवंती म्हणे । आणा सिक लाऊं ॥६॥ थोर आणीला कांटाळा । वरीं दारीं लोकपाळा । डेरा रिघोनि घुसळा । तेथें लोणी खाय ॥७॥ मिळोनि सकळा । दावें लावोनियां गळा । कशा बांधिती उखळा । येथें राहे उगा ॥८॥ बरा सांपडलासी हरी । आजीच्यानें करीसील चोरी । डोळे घालोनियां येरी । येरीकडे हांसे ॥९॥ फांकल्या सकळा । उपडोनियां उखळा । मोडी वृक्ष त्रिमळा । --र्जुन दोन्ही ॥१०॥ उठिला गजर । दसवंती नव्हे धीर । धांवे तुकयाचा दातार । आलंगिला वेगीं ॥११॥

६४५. आंत हरि बाहेर हरि । हरीनें घर कोंडिलें ॥१॥ हरीनें कामा घातिला चिरा । वित्तवरा मुकविलें ॥२॥ हरीनें केली जिवें साटीं । पडिली तुटी सकळांसी ॥३॥ तुका म्हणे वेगळा नव्हे । हरि हा भोंवे भोंवताला ॥४॥

६४६. हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥१॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥२॥ पारख्यासी सांगतां गोष्टी । घरची कुटी खातील ॥३॥ तुका म्हणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं परतोनी ॥४॥

६४७. बाळपणीं हरि । खेळे मथुरेमाझारीं । पायीं घागरिया सरी । कटदोरा वांकी । मुख पाहे माता । सुख न समाये चित्ता । धन्य मानवे मंचिता । वोडवलें आजि ॥१॥ बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो । म्हणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें । जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥२॥ मिळोनियां याती । येती नारी कुमारी बहुती । नाहीं आठवण त्यां चित्तीं । देह भाव कांहीं । विसरल्या घरें । तान्हीं पारठी लेंकुरें । धाक सांडोनियां येरें । ताहान भूक नाहीं ॥३॥ येकी असतील घरीं । चित्त तयापांसीं परि । वेगीं करून वोसारी । तेथें जाऊं पाहे । लाज सांडियेली वोज । नाहीं फजितीचें काज । सुख सांडोनियां शेज । तेथें धांव घाली ॥४॥ वेधीयेल्या बाळा । नर नारी या सकळा । बाळा खेळती अबळा । त्याहि विसरल्या । कुमर कुमरी ।

नाहीं भाव हा शरीरीं । दृष्टि न फिरे माघारी । तया देखतां हे ॥५॥ वेरभाव नाहीं । आपपर कोण्ही कांहीं । शोक मोहो दुःख ठाईं । तये निरसलीं । तुका म्हणे सुखी । केली आपणासारखी । स्वामी माझा कवतुकी । बाळवेषें खेळे ॥६॥

६४८. होतें बहुत हें दिवस मानसीं । आजि नवस हे फळले नवसीं । व्हावी भेटी ते झाली गोविंदासी । आतां सेवा करीन निश्चयेसी वो ॥१॥ स्थीर स्थीर मजसी साह्य करा । बहु कष्ट सोशिल्या वेरझारा । येथें आड मज न साहवे वारा । देऊन कपाट आलें तें दुसरें वारा वो ॥२॥ मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळे होऊं येकी घडी । नाहीं लौकिक स्मरीला आवडी । आतां येणें काळें या लोभें वेडी वो ॥३॥ उदयीं उदयो साधिला अवकाश । निश्चितीनं निश्चिती सावकाश । धरीये गोडी बहुत आला रस । तुका म्हणे हा मागुता न ये दिवस वो ॥४॥

६४९. येकली राना गोविंदा सवें । गेलें ठावें तें झालें ॥१॥ मज न म्हणा न म्हणा सिंदळी । नाहीं विषम जवळी आतळलें ॥२॥ नव्हती देखिली म्यां वाट म्हणोनि हा धीट संग केला ॥३॥ सलगी धरी पयोधर । साहाती करमुर सवें ॥४॥ भेणें मिठी दिधली गळां । सेजजवळा दडाले ॥५॥ आहेव मी गर्भीणपणं । हें सांगणें कां लागे ॥६॥ तुका म्हणे सेवटा नेलें । संपादिलें उभयतां ॥७॥

६५०. गोरस घेऊनि । सातें निघाल्या गवळणी । तंव ते कृष्णाचि करणी । काय करी येथें । झाला पानसरा । मिठी घातली पदरा । आधीं दान माझें सारा । मग चला पंथें ॥१॥ सर जाऊं दे रे सर जाऊं दे रे । सर जाऊं दे परता । मुळीं भेटलासी आतां । नाट लागलें संचिता । खेपा खुंटलीया ॥२॥ आसुडी पदरा । धरी आणिक दुसरा । येरी झोंबतील करा । काय वेडा होसी । आलों गेलों बहु वेळां । नेणों गोरा कीं सावळा । सर परता गोंवळा । काय बोलतोसी ॥३॥ आम्ही येथें अधिकारी । मागें केली तुम्ही चोरी । आतां कळलियावरी । मागें केले तयाचे । बोलिल्या हांसोनी ।

आम्ही सासुरवासिनी । कां रे झोंबसी दुरोनि । करी मात कांहीं ॥४॥ वायां परनारी । कैशा धरिसी पदरीं । तयां कळलियावरी । तुज मज नाहीं । जडला जिव्हारी । फांको नेदी तया नारी । जेथें वर्म तेथें धरी । जाऊं पाहे तियेचें ॥५॥ तया हातीं सांपडल्या । हाटिं पाटीं चुकविल्या । कृष्णमिळणीं मिळाल्या । त्याहि न फिरती । तुका म्हणे खंती । वायां न धरावी चित्तीं । होते तुमच्या संचितीं । वोढवलें आजी ॥६॥

६५१. हरि तुझी कांति रे सांवळी । मी रे गोरी चांपेकळी । तुझ्या दर्शनें होइन काळी । मग हे वाळी जन मज ॥१॥ उगला राहें न करीं चाळा । तुज किती सांगूं रे गोंवळा । तुझा खडबड कांवळा । अरे नंदबाळा अलगटा ॥२॥ तुझिये अंगीं घुरट घाणी । वहू खासी दूध तूप लोणी । घरचें बाहेरील आणोनि । मी रे चांदणी सुकुमार ॥३॥ मज ते हांसतील जन । धिक्कारिती मज देखुन । अंगींचें तुझे देखून लक्षण । मग विटंबना होईल रे ॥४॥ तुज तंव लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पीसुन व्याही । आणिक मात बोलूं कांहीं । कशी भीड नाहीं तुज माझी ॥५॥ वचन मोडी नेदी हात । कळलें न साहेचि मात । तुकया स्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करोनि भोगी ॥६॥

६५२. सात पांच गोळणी आलिया मिळोनी । यशोदे गाऱ्हाणीं देती कैसी । काय व्यालीस पोर । चोरटें शिरजोर । जना वेगळेंचि कैसें । दहीं दुध तूप लोणी शिंका नुरेचि कांहीं । कवाड जैसेंची तैसें । चाळऊनि नाशिलीं कन्याकुमरें । आमुच्या सुनासि लावीलें पिसें गे बाईये ॥१॥ आझुनि तरी यास सांग बरव्या परी । नाहीं तरी नाहीं उरी जिवेंसाठीं । मिळोनि सकळै जन करूं वाखा । सेखीं तुज मज होई तुटी गे बाई ॥२॥ नेणें आपपर लौकिक वेव्हार । भलत्या ठाईं भलते करी । पाळतूनी घरीं आम्ही नसतां । तेथें आपण संचार करी । सोगया चुंबन देतो आलिंगन । लोळे आमुच्या

सजबाजावरी । शिंके कडाडा फोडी । गोरसाचे डेरे । धरितां न सापडे करीं गे बाईये ॥३॥ आतां याची चाड नाहीं । आम्हा भीड सांपडतां । कोड पुरवूं मनींचें । सोसिलें बहु दीस नव्हता केला नीस । म्हणोनि येकुलतें तुमचें । चरण खांबी जिये बांधेन सरसा जंव न चले कांहीं याचें । अर्थ प्राण देतां न सोडी सर्वथा । भलत्यें हो या जिवाचे गे बाईये ॥४॥ घेउनी जननी हातीं चक्रपाणी । देतसे गवळणी वेळोवेळां । निष्ठुर वाद् झणीं बोलाल सकळा । क्षोभ जाईल माझ्या बाळा । जेथें लागे हात वाढतें नवनीत । अमृताच्या कल्लोळा । देखोनि तुकयास्वामी देश देहभाव विसरल्या सकळा गे बाईये ॥५॥

६५३. विरहतापें फुंदे छंदे करिती-जाती । हा गे तो गे सावधान सर्वेचि दुश्चिती । न सांभाळोनि अंग लोटी पाहे भोंवतीं । वेगळीच पडो पाहे कुळाहुनि याति हो ॥१॥ खुंटलीसी झाली येथें अवघियांची गति । आपुली परावी कोण नवलाव हा नेणें भोंवतीं । त्याचे नांवें बोंभे बोंभे आहो श्रीपति । येरा वाटोनियां हासतीं ॥२॥ बाहेरीच धांवे राना न धरीच घर । न कळे बंधना झाला तेणें संचार । विसरून गेली सासुरें कीं माहेर । येका अवलोकी येका पडिला विसर ॥३॥ तुका म्हणे तुम्ही अवघ्या राहा निश्चळा । नये आतां येऊं येथें सर्वथा बळा । त्याचा त्याचिया मुखें अवघियांचा निर्वाळा । बहुतां मतें येथें तर्कवादे निराळा वो ॥४॥

६५४. ये रे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें । मिळालिया बाळा येके ठायीं कवतुकें । कळों नेदी माया त्यासीच तें ठाउकें । खेळतोसे दावी लक्ष लक्षापें मुकें ॥१॥ अखंडित चढे त्यांनीं लावियेला कान्हा । आवडे तयां संकल्प वाहाती मना । काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना । येकांताचें सुख जाती घेउनियां राना ॥२॥ अवघीयांचा जाणे झाला मेळासा हरी । मिळोनियां जावें तेथें तया भीतरीं । कळों नेदी घरिंच्या करी गोऊनि चोरी । हातोहातीं नेती परपरत्या दूरी ॥३॥ आनंदें निर्भर आपणांसि आपण । क्रीडतील बाळा त्यजिलें पारिखें जन । येकायेकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न तुका म्हणे येका नारायणावांचून ॥४॥

६५५. खेळतां मुरारी । जाये सरोवरा तीरीं । तंव नग्नचि नारी । तेथें देखियेल्या । मांडिलें विंदान । ख्याल सुखाचें संधान । अंग लपऊन मान । पिलंगत चाले ॥१॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे । पायां पडतां न सोडी नेटीं सावळा रे ॥२॥ साच्या सावुलीं पातळा । गोंडे कसणिया चोळ्या । बुंथी घेऊनि सकळा । कळंबावरी पळे । खांदी घालोनियां करीं । दृष्टि घालोनि सामोरी । बैसे पाला ओढी वरी । खदखदां हांसे ॥३॥ आनंदें कल्लोळा । बाळा खेळती सकळा । देती उलटिया चपळा । येकि येकिहुनी । म्हैस वेल सुरकाडी । येकी नागविती कोडी । नाना परीच्या विकडी । खेळ मांडियेला ॥४॥ येकी आलिया बाहेरी । पाहे लुगडें तंव नारी । म्हणे नाहीं नेलीं चोरीं । काय जाणों केव्हां । केला सकळीं हाकारा । तंव आलिया बाहेरा । आतां म्हणतील घरा । जावें कैशापरी ॥५॥ तंव हांसे वनमाळी । वरी पाहुनि सकळी । लाजा रीघालीयां जळीं । मागें पुढें हात । लाज राखावी गोपाळा । आम्हां जणींची सकळां । काय मागसी ये वेळा । देऊं गुळ-वाटी ॥६॥ जोडोनियां कर । या गे सकळा समोर । वायां न बोलावें फार । बडबड कांहीं । भातुकें भूषण । नाहीं चाड नेणे धन । करा येक चित्त मन । या गे मजपाशीं ॥७॥ येक येकीकडे पाहे । लाज सांडोनियां राहे । म्हणे चला आतां सये । जाऊं तयापाशीं । जोडोनियां हात । कैशा राहिल्या निवांत । तुका म्हणे केली मात । लाज राखिली तयांची ॥८॥

६५६. धरिला पालव न सोडी माझा येगें । कांहीं करितां या नंदाचिया कान्हें । येकली न ये मी ऐसें काय जाणें । कांटे भरले अवघड्या रानें रे ॥१॥ सोडी पालव जाऊं दे मज हरी वेळ लागलिया कोपतील घरीं । सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥२॥ सख्या विषया त्या होत्या मजपाशीं । तुज फावलें रे फांकता तयासी । होतें अंतर । तर सांपडते कैसी । येकायेकीं अंगीं जडलासी रे ॥३॥ कैसी भागली हे करितां उत्तर । शक्ति मावळल्या आसुडितां कर । स्वामी तुकयाचा भोगिया चतुर । भोग भोगी त्याचा राखी लोकाचार वो ॥४॥

६५७. गाई गोपाळ यमुनेच्या तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेटी । चेंडू चौगुणा खेळती वाळुवंटीं । चला चला म्हणती पाहूं दृष्टी वो ॥१॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विव्हळतें देखावया हरी । मिस पाणियाचें करतील घरीं । बारा सोळा मिळोनि परस्परीं वो ॥२॥ चिरें चोळिया त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ति । कोणा नाठवे कोण कुळ याती । झालीं तटस्थ सकळां नेत्रपातीं वो ॥३॥ दंतधावनाचा मुखामाजि हात । वाद्यें वाजती नायके जनमात । करी श्रवण हे श्रीकृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवी मनोरथ वो ॥४॥

६५८. कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लावियेलें जग माझ्या पाठीं ॥१॥ सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥२॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ती । न देखें भवतीं मी ते माझे ॥३॥ तुकयाचा स्वामी माझ्या जीवींच बैसला । बोलींच अबोला करोनियां ॥४॥

६५९. गोड लागे परि सांगतांचि नये । बैसे मिठी सये आवडीची ॥१॥ वेधलें वो येणें श्रीरंगरंगें । मीं हे माझीं अंगें हारपलीं ॥२॥ परतेचि ना दृष्टि बैसली ते ठाईं । विसावोनि पाठीं ठेलें मन ॥३॥ तुकयाच्या स्वामीसवें झाली भेटी । तेव्हां झाली तुटी मागीलाची ॥४॥

६६०. पहावया माजी नभा । दिसे शोभा चांगली ॥१॥ बैसला तो माझे मनीं । नका कोणी लाजवूं ॥२॥ जीवीं आवडे जीवाहून । नव्हे क्षण वेगळा ॥३॥ झाली विश्वंभरा ऐसी । तुकया दासी स्वामीची ॥४॥

६६१. कोणी येकी भुलली नारी । विकितां गोरस म्हणे घ्या हरी ॥१॥ देखिला डोळां बैसला मनीं । तोचि वदनीं उच्चारीं ॥२॥ आपल्याचा विसरभोळा । गोविंद कळा कवतुकें ॥३॥ तुका म्हणे हांसे जन । नाहीं कान ते ठाईं ॥४॥

६६२. करूनि आइती सत्यभामा मंदिरीं । वाट पाहे टळोनि गेली रात्री ॥१॥ न येचि देव येती कामलहरी । पडली दुश्चिती तंव तो कवाड टिमकारी ॥२॥ सर गा परता कळला तुझा भाव । कार्यापुरतें हें दाविसी लाघव । बोलतोसी तें अवघी तुझी माव । जाणोनि आलासी उजडता समयो ॥३॥ मीच वेडी तुजलागीं बोल नाहीं । दानावेळे विटंबना झाली कायी । मागुति रुद्रासि भेटी दिल्ही तयीं । विश्वास तें तुझ्या बोला अजुनी तरी ॥४॥ भ्रम होता तो अवघा कळों आला । मानवत होतें मी भला भला । नष्ट क्रिया नाहीं मा तुझ्या बोला । तुकया बंधु स्वामी कानड्या कंसाल्या ॥५॥

६६३ तंव तो हरि म्हणे वो निजांगने वो । लाइ निच कां देशील डोहणे वो । मजपें दुजें आलें तें देव जाणे वो । शब्द काइ बोलसी तूं उणे वो ॥१॥ पाहा मनीं विचारोनी आधीं वो । सांडोनि देहभ्रांति करीं स्थीर वो । तंट केले माझे तुझे उपाधी वो । उघडीं डोळे अजुनी तरी धरी शुद्धी वो ॥२॥ कोठें तरी दुनियांत वर्तलें वो । स्त्रियांनीं भ्रताग दाना दिलें वो ॥२॥ कसा मी भला नव्हे तें सोसिलें वो ॥३॥ काय सांगम्यां दैन्य केली कैसी वो। तुझ्या गंवे आणिलें हनुमंतासी वो । कष्टी केलें मज गरुडा भीमकीसी वो तुकया बंधु म्हणे खरें खोटें नव्हे यासी वो ॥४॥

६६४. तवं ती म्हणे ऐका हृषीकेशी वो । नाचाजिलें तुम्हीं म्हणा आपणासी वो । तरी कां वंचणूक सुमनासी वो । नट नाट्य बरें संपादूं जाणसी वो ॥१॥ सर परता आतां वो हरि । म्हणे सत्राजिताचि कुमरी । जाणत्यें मी या शब्दाची कुसरी । ऐसेंचि करोनि ठकविलें आजिवरि वो ॥२॥ भावें गेलें म्हणोनि व्हावा वियोग । मनींचें आर्त जन्मांतरीं व्हावा संग । तों त्वां केलें हें पाठमोरें जग । ऐसें काय जाणें तुझे हे रंग ॥३॥ काय करूं या नागविलें कामें । लागलें तयास्तव इतुकें सोसावें । नाहीं तरी कां नव्हतीं ठावीं वर्में । परद्वारीं ऐसा हाकलिती प्रसिद्ध नांवें ॥४॥ काय किती सांगावें तुझे गुण । न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण । आपपर न म्हणसी माय बहीण । सासुसुनाशीं लाउनि

पाहासी भांडण ॥५॥ इतुकियावरी म्हणे वैकुंठींचा राणा । होउनि गेलें तें नये आनु मना । आतां न करीं तैसें करी क्रिया आणा । भक्तवत्सल म्हणे तुकयाबंधु कान्हा ॥६॥

६६५. कान्हो येकली रे कान्हो येकली रे । तुज सवें चुकली रे । भय वाटे जनीं मज । अबळा धाकुली रे ॥१॥ निघतां घरीं आई बा वारी । तुजसवें कां आलिये हरि । लोक वाटा सांगती खोटा । परि मी चटा लागलिये ॥२॥ पिकल्या बोरी झालें सामोरी । काय जाणों कोठें राहिला हरि ॥३॥ आडे खुंट झालिया जाळी । काय जाणों कान्हो मांडिली रळी ॥४॥ तुका म्हणे जाऊं आलिया वाटा । पाहे हरि पायीं न मोडे कांटा ॥५॥

६६६. क्याला मज आयो वारितोसी घरा । खेळतो सोकरा नंदाचा मी ॥१॥ बहु दिसीं झाली यासी मज भेटी । आतां वाटे तुटी न पडावी ॥२॥ कोवळें बोलतों मना आवडतें । डोळियाचें पातें ढांपवेना ॥३॥ आजि सकळासि आले चोळुनियां । कां गो पाठी वाया पुलविली ॥४॥ तुमचें तें काय खोळंबलें काज । बल्या कां गो मज कोंडा घरीं ॥५॥ तुकयाचा धनी वैकुंठनायक । सरा कांहीं येक बोलतों मी ॥६॥

६६७. आतां नये मागें । मी आलें याच्या रागें । काय माझें जगें । कोपुनियां करावें ॥१॥ कां गो कलीत्या कोल्हाळा । तुम्ही भलत्याच सकळ । वेचाल ते बोल । झुटे होती बोलिले ॥२॥ याचे भेटी माझें मन । स्वरूपीं ठाकले लोचन । वेगळे ते क्षण । आतां होऊं नावरे ॥३॥ काम काज नको झालें । विज नावरे बोलिलें । याचिया भेदिलें । कामबाणीं अंतर ॥४॥ या वेगळें होणें । आतां जळो तैसें जीणें । घेतलें तें मनें । आतां मागें न फिरे ॥५॥ आतां मोटी वार । माझी नका धरूं चार । तुकयाचा दातार । सेजे तो मी सुतलों ॥६॥

६६८. हरिरता चपळ नारी । लागवरी न रिघती ॥१॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम । भोगी काम भोगता ॥२॥ वाचा वाच्यत्वासी न ये । कोठें काय करावें ॥३॥ तुका म्हणे देवा ऐशा । देवपिशा उदारा ॥४॥

६६९. गवळणी आल्या वाजे । म्हणती या रे राखो आज । सांपडउनी माजघरांत धरूं कोंडोनी । उभे कवाड उभ्या काळोशाचे आड । सांता पांचा एक भीड मौन्यची ठेल्या ॥१॥ नित्य सोकवला नेदी सांगो चित्त बोला । आतां सांपडतां याला कोण मोडीं जिवें ॥२॥ जाणोनीयां हरी त्याच घरा आला चोरी । गाडिया ठेउनी बाहेरी । पूर्वद्वारें शिरे त्यांच्या भयाभित । चाले पिलंगत भोवतालें । पाहे तंव देखियेले नवनीत पुढें ॥३॥ उतरोनी शिंके पाहे चाखोनियां निकें । गोड तेंचि एका एकें हातीं लांववीतो । जाणे राखती तयांसी तेथें आधिकची नासी । माग लावी हात पुसी चोरी जाणावया ॥४॥ जाणोनियां नारी मूळ वर्म द्वार धरी । माज कोंडुनी भितरीं घरांत धरियेला । कां रे नागविसी माझे मुळीं लागलासी । आणविन तुजपासी मागें खादलें तें ॥५॥ दोहीं संधी बाहे धरुनी नेती मातें पाहें । काय नाशि केली आहे घगमाजी येणें । तुका म्हणे मुख त्याचे वाटों नेदी दुःख । दसवंती कवतुक करुनी रंजविल्या ॥६॥

६७०. चौक भरियेला आसनीं । पाचारिलि कुळस्वामीणी । वैकुंठ-निवासीनी । ये धावोनि झडकरी ॥१॥ रंगा येई वो विठाई । सांवळिये डोळसे । तुझें श्रीमुख माजिरें । तें मी केधवां देखेन ॥२॥ रजतम धुपारती पंचप्राणांची आरती । अवघी सारोनि आयिती । ये धांवती झडकरी ॥३॥ मन मारोनि मेंढा मुठी । आशा मनसा तृष्णा सुटी । भक्तिभाव नैवेद्य ताटीं । भरोनि केला हाकारा ॥४॥ डांका अनहात गजरें । येउनि अंगासि संचरे । आपुला घेउनि पुरस्कार । आरोग्य करी तुकयासी ॥५॥

६७१. साच माझा देव्हारा । भाक ठेवा भाव खरा । त्रिगुणाचा फुलवरा आणा विनंती सांगतों ॥१॥ माझें दैवत हें रंगीं । नाचे वैष्णवाचे संगीं भरलें मग अंगीं । निवाड करी दोहींचा ॥२॥ तुझें आहे तुजपाशीं । परी तूं जागा चुकलाशी । चिवडोनीयां नाशी । तुझ्या घरच्यांनीं केली ॥३॥ आतां न पडे ठावें । वांचुनियां माझ्या देवें । अंधःकार व्हावें । नासु ठाव शोधावा ॥४॥ आंधळ्यासी डोळे । देतो पांगुळ्यासि पाय । वांझा पुत्र फळे । नवस

पुरविते विठाई ॥५॥ उगविली कोडीं । मागें कितीकांचीं बापुडीं । तुका म्हणे वडी न लगे नवस द्या अधीं ॥६॥

६७२. विनंती घातलीं अवधारीं । मज देई वो अभय करीं । पडिलों खेचरीं । आणिके वारी नांवांची ॥१॥ रंगा येई वो येकला । रंग वोढवला । हरिनामें उठिला । गजर केला हाकार ॥२॥ देवांचे दैवतें । तुज नमिलें आदिनाथें । येवो कृपावंते । भोगा माझ्या धांवती ॥३॥ न लावी आतां वेळ । अयिते सारिलीं सकळ । तुका कुळ । आमुच्यि दैवतें ॥४॥

६७३. माझा देव्हारा साचा । नाहीं आणिक कोणाचा । त्रिभुवनीं याचा । ठसा नलगे पुसावें ॥१॥ या रे लोटांगणी । कांहीं करा विनवणी । करील झाडणी । भूत काढी संसारा ॥२॥ पडिलों विषयाचें गोंधळीं । ते त्रिगुण आकळी । हरिनाम आरोळी । कानीं पडतां ते उठी ॥३॥ घेतला अहंकारें । काम क्रोध या मत्सरें । पळती प्रेमभरें । अवघी ठाव सांडोनी ॥४॥ घेतलासे पुरा । माया ममता आसरा । अवघ्या येक सरा । पळती रंग देखोनि ॥५॥ तुका म्हणे द्यावा भाव । फिटेल मनींचा संदेह । आणिक नलगे ठाव । कांहीं कोठें हिंडावें ॥६॥

६७४. पुढें येती देवी । तिची जती चालों द्यावी । मागील झाडावी । झाडा मान आसडी ॥१॥ येकविरा आली अंगा । आतां निवारिलें रोगा । माझ्या भक्तापासीं सांगा । पूजा भावें करावी ॥२॥ मेंढा मारावा लोवाळ । पूजा पावली सकळ । तुम्हीं केलें बळ । मग मी ठाई न पडे ॥३॥ तुका म्हणे मुळीं । लागली ते आली कुळीं । वदूनि सकळीं । जीवें भावें वोवाळा ॥४॥

६७५. अवघ्या जेष्ठा देवी । कोण पूजाचा ठाव । धरितोचि भाव । कोठें नाहींसें झालें ॥१॥ दिसे सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें । तळीं गेले देखे । वरि टोले न साहती ॥२॥ पट येका शिरीं । यथाविधीनें त्या येरी । बसकोल्या घागरीं । डेरे रांजण गाडगीं ॥३॥ तुका म्हणे माना । येथें कोणी रुसावें ना । आपुलाल्या स्थाना । जेथें त्याचि शोभल्या ॥४॥

६७६. खेचर खडतर । काळ कांपती असुर । नांदे भीमातीर । पंढरपुर पाटणीं ॥१॥ आतां करी का रे हाकारा । सहस्रनाम येकसरा । दवडिते खेचरा । अंगसंगें धरोनि ॥२॥ सिते झाली झडपणी । राहणें वासुगीच्या वनीं । पावली जननी । झोटी मोकळिया केशी ॥३॥ लाविलें काविरे । प्रल्हादा म्हैसासुरें । आली एकसरें । दांत खात रंगासी ॥४॥ वासुदेवाचीं बाळें । सात खादलीं ज्या काळें । आली भोगवेळे । तया कारणें तेथें ॥५॥ पांडवें बापुडीं । वींज केली फिरती वेगी । धांवोनियां काढी । अंगसंगें त्राहाटविलीं ॥६॥ नामाचें चिंतन । तेथें धांवतो आपण । न विचारितां हिन । भाव देखे जयाचा ॥७॥ कुळिंची कुळदेवता । तुका म्हणे आम्हा माता । काय भय भूता । काळ यमदूताचें ॥८॥

६७७. देवि देव झाले । भोग सरले यावरी । सांगा दुसरीं । ऐसि नाहीं उरली ॥१॥ हरिनाम देवनाम । तुम्ही गाउनियां जागा । पेंठवनीं मागा । नका ठेऊं लीगाड ॥२॥ शेवटीं सुताळि । बरवी वाजवावी डांक । ताळा वाली येक । सरलियाचे सेवटीं ॥३॥ गुंडाळा देव्हारा । मान नेति मानकरी । तुका म्हणे घरीं । आजि कोर्डी उगविलीं ॥४॥

# पांगुळ.

६७८. पांगुळ झालों देवा । नाहीं हातपाय । बैसलों जयावरी । सैराट तें जाय । खेटतां कुप कांटी । खुंट दरडी न पाहे । आधार नाहीं कोणी मज बाप ना माये ॥१॥ दाते हो दान करा । जातों पंढरपुरा । न्या मज तेथवरी । आखमाचा सोयरा ॥२॥ हिंडतां गव्हाणे गा । सिणलों वेरझारी । न मिळेचि दाता कोणी । जन्मदुःख निवारी । कीर्ति हे संतामुखीं । तोचि दाखवा हरि । पांगळ्या पाय देतो । नांदे पंढरपुरीं ॥३॥ या पोटाकारणें गा । झालों पांगिला जना । न सरेचि बापमाये । नाहीं भीके खंडना । पुडाग म्हणती येक । तया नाहीं करूणा । श्वान हें लागे पाठीं । आशा बहु दारुणा ॥४॥ काय मी चुकलों गा । मागें नेणेंचि कांहीं । न कळेचि पापपुण्य । तेथें आठव नाहीं । मी माझें भुललों गा । दीप पतंगासोयी । द्या मज जीवदान । संत महानुभाव कांहीं ॥५॥ दुरोनि आलों मी गा । दुःख झालें दारूण । यावया येथवरी । होतें हेंचि कारण । दुर्लभ भेटी तुम्हां । पायीं झालें दरुशण । विनवितो तुका संतां । दोन्ही कर जोडोन ॥६॥

६७९. देखत होतों आधिं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टि गेली वरी आलें पडळ । तिमिर कोंदलेंसें वाटे वाढत प्रबळ । भीत मी झालों देवा काय झाल्याचें फळ ॥१॥ आतां मज दृष्टि देईं पांडुरंगा मायबापा । शरण आलों आतां निवारोनियां पापा । अंजन लेववुनी करी मारग सोपा । जाइन सिद्धपंथें अवघ्या चुकतील खेपा ॥२॥ होतसे खेद चित्ता कांहीं नाठवे विचार । जात होतों जनामागें तोंहि सांडिला आधार । हा ना तो ठाव झाला । अवघा पडिला अंधार । फिरलीं माझीं मज कोणी न देति आधार ॥३॥ जंववरि चळण गा तंववरि म्हणती माझा । मानिति लहान थोर देहसुखाच्या काजा । इंद्रियें मावळलीं आला वागूल आजा । कैसा विपरीत झाला तोचि देह नव्हे दुजा ॥४॥ गुंतलों या संवसारें कैसा झालोंसें आंध । मी माझें वाढवोनि

मायातृष्णेचा बांध । स्वहित न दिसेचि केला आपुला वध । लागलें काळा पाठीं सर्वे काम हें क्रोध ॥५॥ लागती चालतां गा गुणदोषाच्या ठेंसा सांडिली वाट मग झालों निराळा कैसा । पाहातो वास तुझी थोर करोनि आशा । तुका म्हणे वैद्यराजा पंढरिच्या निवासा ॥६॥

---

## आंधळापांगुळा.

६८०. आंधळ्या पांगळ्याचा येक विठोबा दाता । प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता । घडीं मोडीं हेळामात्रें पापपुण्यसंचित । भवदुःख कोण वारी तुजवांचुन चिंता ॥१॥ धर्म जागो तुझा तुंचि कृपाळु राजा । जाणसि जिविंचें गा न सांगता सहजा ॥२॥ घातली लोळणी गा पुंडलिकें वाळुवंटीं । पंढरी पुण्य ठाव नीरे भीवरे तटीं । न देखे दुसरे गा जाली अदृष्यदृष्टी । बोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टी ॥३॥ आणिक उपमन्य येक बाळ धाकुटें न देखे न चलवे जन चालते वाटे । घातली लोळणी गा हरिनाम बोभाटें । पावला त्या कारणें धांव घातली नेटें ॥४॥ बैसुनि खोळी शुक राहे गर्भी आंधळा । शिणला वेरझारी दुःख आठवी वेळा । मागील सोसीलें तें ना मी म्हणे गोपाळा । पावला त्या कारणें लाज राखिली कळा ॥५॥ न देखे जो या जना तया दावी आपणा । वेगळा सुखदुःख मोहो नाठवे धना । आपपर तेहि नाहीं बंधुवर्ग सज्जना । तुकया तेचि परी झाली पावे नारायणा ॥६॥

---

६८० अ. परिसाचे अंगीं सोनें झाला विळा । वाकणें या कळा हीन नव्हे ॥१॥ अंतरीं पालट पडला कारण । मग समाधान तेंचि गोड ॥२॥ पिकालिया संद पूर्व कर्मा नये । अव्हेरू तो घडे काय मग ॥३॥ तुका म्हणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केले पाकें ॥४॥

---

टीप—६८० अ हा अभंग क्रमांक ३२२ चे पुढें वाचणें.

**आंधळा**

६८१. सहज मी आंधळा गा निजनिराकार पंथें। वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें। मी माझें हरपलें ठाईं जेथींच्या तेथें। अदृश्य तेंची झालें कांहीं दृश्य जें होतें ॥१॥ सुखें मी निजलों गा शून्य सारोनि तेथें। त्रिकूटशिखरीं गा दान मिळे आयीतें ॥२॥ टाकिली पात्र झोळी धर्म आधर्म आशा। कोल्हाळ चुकविला त्रिगुणाचा वोळसा। न मागें मीक आतां हाचि झाला भरवसा। वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥३॥ उर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद। अरुप जागविला दाता घेउनि छंद। घेउनि आला दान निजतत्व निजबोध। स्वरूपीं मेळविलें नांव ठेविलें भेद ॥४॥ शब्द हा बहुसार उपकारची राशी। म्हणोनि चालविला मागें येतील त्यांसी। मागोनि आलि वाट सिद्ध ओळीची तैशी। तरले तरती गा आणिकहि विश्वासी ॥५॥ वर्म तें येक आहे दृढ धरावा भाव। जाणिव नागवण लागो नेदी तो ठाव। म्हणउनि संग टाकीं सेवीं अद्वैत भाव। तुका म्हणे हाचि संतीं मागें केला उपाव ॥६॥

६८२. भगवंता तुजकारणें मेलोंजितचि कैशी। निष्काम बुद्धी ठेली चळण नाहीं तयासी। न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी। जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ॥१॥ विठोबा दान दे गा तुझ्या सारिखें नामा। कीर्ति हे वाखाणिली थोर वाढली सीमा ॥२॥ भुक्ति मुक्ती तूंचि येक होसि सिद्धीचा दाता। म्हणोनि सांडवली शोक लज्जा भय चिंता। सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां। कृपादान देईं देवा येउनि सामोरा आतां ॥३॥ संसारुसागरु गा भवदुःखाचें मूळ। जनवाद आंथरुण माजी केले विंगळ। इंद्रियें वज्रघातें तपें उष्ण वरि ज्वाळ। सोशिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ॥४॥ तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा। वेंघलों वरि खोडा भाव धरोनि टेका। जाणवी नरनारी जागो धरम लोकां। पावती पुण्यवंत सोई आमुच्या हाका ॥५॥ नाटवे आपपर आतां काय वा करूं। सारिखा दोहीसवा हारपला विचारू। घातला योगक्षेम तुज आपुला भारू। तुकया शरणागता देईं अभय करूं ॥६॥

६८३. देश वेष नव्हे माझा सहज फिरत आलों । करूं सत्ता कवणावरि कोठें स्थिर राहिलों । पाय डोळे म्हणतां माझें तीहि कैसा मोकलिलों । परदेशी नाहीं कोणी अंध पांगुळ झालों ॥१॥ आतां माझी करीं चिंता दान देईं भगवंता । पाठीं पोटीं नाहीं कोणी निरवीं सज्जन संता ॥२॥ चालतां वाट पुढें भय वाटतें चित्तीं । बहु जन गेले नाहीं आले मागुती । न देखों काय झालें कान तरी ऐकती । बैसलों संदिभागीं तुज धरोनि चित्तीं ॥३॥ भाकितों करुणा गा जैसा सांडिला ठाव । न भरेचि पोट कधीं नाहीं निश्चळ पाव । हिंडतां भागलों गा लक्ष चौऱ्याशीं गांव । धरोनि राहिलों गा हाचि वसता ठाव ॥४॥ भरवसा काय आतां कोण आणि अवचीता । तैसीच झाली कीर्ति तया मज बहुता । म्हणउनि मारी हाका सोई पावे पुण्यवंता । लागली भूक थोरी तूंचि कृपाळू दाता ॥५॥ संचित सांडवलें कांहीं होतें तें जवळी । वित्त गोत पूत माया तुटली हे लागावळी । निष्काम झालों देवा होतें माझें कपाळीं । तुका म्हणे तूंचि आतां माझा सर्वस्वें बळी ॥६॥

वासुदेव.

६८४. मनु राजा येक देहपुरी । असे नांदतु त्यासि दोघी नारी । पुत्रपौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आम्हावरी गा ॥१॥ म्हणउनि आलों या देशा । होतों नाहीं तर भुललों दिशा । दाता तोचि मज भेटला इच्छा । येऊनि मारग दाविला सरसा गा ॥२॥ सर्वे घेऊनि चवघे जण । आला कुमर सुलक्षण । कडे चुकउनि कांटवण । ऐका आणिलीं तीं कोण कोण गा ॥३॥ पुढें भक्तिनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती । स्थिर केलीं जें आचपळ होतीं । सिद्ध आणोनि लाविली पंथीं गा ॥४॥ केले उपकार सांगूं काय । बाप न करी ऐसि माये । धर्मे त्याच्या देखियेले पाय । दिल्हें अभय दान अखय गा ॥५॥ होतों पीडत हिंडतां गांव । पोट न भरे न राहावया ठाव । तो येणें अवघा संदेह । म्हणे फेडियला तुकयाचा बांधव गा ॥६॥

६८५. गातों वासुदेव मी ऐका । चित्त ठाईं ठेउनि भाव येका । डोळे

झांकोनि रात्र करूं नका । काळ करित बैसलासे लेखा गा ॥१॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मुळबंदीं । सांडा वाउग्या उपाधी । लक्ष लाऊनियां राहा गोविंदीं गा ॥२॥ अल्प आयुष्य मानव देह । शत गणिलें तें अर्ध रात्रं खाये । पुढें बाळत्व पीडा रोगक्षय । काय भजनातें उरलें तें पाहे गा ॥३॥ क्षणभंगुर नाहीं भरवसा । व्हा रे सावध तोडा माया आशा । कांहीं न चले मग गळा पडेल फासा । पुढें हुषार थोर आहे वोळसा गा ॥ ४ ॥ कांहीं थोडे बहुत लागपाठ । करा भक्तिभाव धरा बळकट । तन मन ध्यान द्या लाउनियां नीट । जरि करणें असेल गोड शेवट गा ॥५॥ विनवीतों सकळ जना । कर जोडोनि थोर लहाना । दान इतुलें रे द्या मज दीना । म्हणे तुकया बंधु राम म्हणा गा ॥६॥

६८६. गेले टळले पाहार तीन । काय निद्सुरा आझून । जागे होउनि कांहिं करा दान । नको ऐकून झांकूनि लोचन गा ॥१॥ हरि राम कृष्ण वासुदेवा । जाणवितसे जना । चिपळ्या टाळ हातीं । मुखीं घोष नारायणा गा ॥२॥ जे ठाकेल कोणा कांहीं । फळ पुष्प अथवा तोय । द्या परि मिस घेउं नका माई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥३॥ देवाकारणें भाव तस्मात् । द्यावें न लगें फारसें वित्त । झालें येक चित्त तरि बहूत । येवढ्यासाठीं नका करूं वाताहत गा ॥४॥ आलों येथवरि बहु सायासें । करितां दान हेंची मागावयास । नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥५॥ आतां मागुता येईल फेरा । हें तों न घडे या नगरा । म्हणे तुकयाबंधु भाव धरा । वोळखि नाहीं तरी जाल आघोरा गा ॥६॥

६८७. राम राम दोनि अक्षरें । सुलभ आणि सोपीं रे । जागा मागिल पाहारे । सेवटिचें गोड तेंचि खरें गा ॥१॥ राम कृष्ण वासुदेवा । जाणवीतसे जनासी । वाजवि चिपळिया । टाळ घागऱ्या घोष गा ॥२॥ गाय वासुदेव वासुदेवा । भीन्न नाहिं आणिकां नांवा । दान जाणोनियां करीं यावा । न ठेवीं उरी कांहीं ठेवा गा ॥३॥ निज घेउनियां फिरती । एक वेळा जाणवती । धरुनियां राहा चित्तीं । नेघे भार सांडी कामा

हातीं गा ॥४॥ सुपात्रीं सर्वभाव मी तो सर्व वासुदेव। जाणती कृपाळु संत महानुभाव। जया भिन्न भेद नाहीं ठावा गा ॥५॥ शूर दान जिवें उदार। नाहीं वासुदेवीं विसर। कीर्ति वाढे चराचर। तुका म्हणे तया नमस्कार गा ॥ ६ ॥

६८८. बोल बोले अबोलणें। जागे बाहेर आंत निजले। कैसे घरांत घरकुल केलें। नेणें अंधार ना उजडलें गा ॥१॥ वासुदेव करितो फेरा। वाडियांत बाहिर द्वारा। कोण्हि कांहीं तरी दान पूण्य करा। जाव न द्याल तरि जातों माघारा गा ॥२॥ हातीं टाळ दिंडी मुखीं नाम गाणें। गजर होतो बहु मोठ्यानें। नाहिं निवडिलीं थोर लाहानें। नका नीजों मीकेच्या मेणें गा ॥३॥ मी वासुदेव तत्त्वतां। कळों येईल विचारितां। आहे ठाउका समाग्य संतां। नाहिं दुजा आणिक मागतां गा ॥४॥ काय जागाचि निजलासी। सुनें जागउनि दारापासीं। तुझ्या हितापाठिं करि वसवसी। भेटि न घेसि वासुदेवासि ॥५॥ ऐसे जागविले आवघे जन। होतें संचित तेंहि केलें दान। तुका म्हणे दुबळीं कोण कोण। गेलीं वासुदेवासि विसरुन गा ॥६॥

६८९. जग जोगी जग जोगी। जागे जागे बोलती ॥१॥ जागता जगदेव। राखा कांहीं भाव ॥२॥ अवघा क्षेत्रपाळ। पूजावा सकळ ॥३॥ पूजापत्र कांहीं। फळ पुष्प तोयि ॥ ४ ॥ बहुतां दिसा फेरा। आला या नगरा ॥५॥ नका घेऊं भार। धर्म तोचि सार ॥६॥ तुका मागे दान। द्यावें जी अनन्य ॥ ७ ॥

### सरोदा

६९०. ऐका गा ये माई। सरवदा सांगतो काई। येथें नाडेल मायि। दोघां पुत्रांची ॥१॥ ते करिती तिची विटंबना। अवघ्या प्रसिद्ध जना। येक न मारितां शाहाणा। तो जाणा सुख न पवे ॥ २ ॥ आणिक ऐका गा य। सरवदा सांगतो काय। खरें बोले तो जाय। नरकामध्यें अधोगती ॥३॥ हें चौघांच्या मुखें। मना आणावें सुखें। अवघीं चुकतीं दुःखें। खोटें बोला नरनारी ॥४॥ आणिक नाडेल एक जाण। सरवदा

बोलतो वचन । जागे माझें चित्त म्हणोन पडिलें खाण तयावरी ॥ ५ ॥ म्हणून न म्हणा माझें कांहीं । निर्जि निजा सुखे ठाईं । यत्न होइल तयिं । चोरा ठाईं विश्वास ॥६॥ आणिक येकि परी । सरवदा सांगतों थोरी । दुःख पावेल नारी । पतिव्रता यामधीं ॥ ७ ॥ पाचांनीं दिधली हातीं । म्हणोनि न म्हणावि निश्चिती । परपुरुषीं होय रती । सुखगति तें पावे ॥ ८ ॥ आणिक येकि परि । सरवदा सांगतों तें करी । दान देतां जो वारी । नव्हे भला मला तो ॥ ९ ॥ तुका म्हणे अयि । येथें नाव काईं । सांगसी ते ठाईं । मरो रांडेचें ॥१०॥

६९१. संबाल यारा उपर तले दोनो मारकि चोट । नजर करे सो हि राखे पश्वा जावे लुट ॥१॥ प्यार खुदाई प्यार खुदाई प्यार खुदाई । रे बाबा जीकीर खुदाई ॥२॥ उडे कुदे ढुंग नचावे आगल भुलन प्यार । लडबड खडबड कन्हे काख चलावत भार ॥३॥ कहे तुको सुनो येका हम जिन्होंके सात । मिलावे सो उसे देना तो ही चढावे हात ॥ ४ ॥

६९२. सब संबाल म्याने लौंडे खडा केउं गुंग । मदिरथी माता हुवा भुलि पाडि भंग ॥१॥ आपसक संबाल मुंडे खुब राखे ताल । मुर्थीवोहि बोल नहिं तो करुंगा हाल ॥ २॥ अव्लका तो पिछे नहीं मुदल बिसर जाय । फिरते नहीं लाज रंडी गद्धे गोते खाय ॥३॥ जिन्हो खातिर इतना होता सो नहि तुज बेकाम । उंचा जोरों लिया तुंबा तुंबा बूरा काम ॥४॥ निकल जावे चिकल जोरा मुंढे दिलदारी । जबानीकी छोड दे बात फिर येक तारी ॥ ५ ॥ कहे तुका फिसल रुका मेरेको तो दान देख । पकड धक्का गांडगुडघि मार चलाउं आलेख ॥ ६ ॥

६९३. नजर करे सो जिके बाबा दुरथी तमासा देख । लकडि फासा लेकर बैठा आगले ठकण भेख ॥१॥ काहे भुला येक देखत आंखो मार–तडांगो बाजार । दमरी चमरी जो नर भुला सोत आघो हिलत खाय ॥ २ ॥ नहि बूलावत किस बाबा आप हि मत जाय । कहे तुका उस आसाके संग फिरफिर गोते खाय ॥ ३ ॥

### दरवेस

६९४. अल्ला करे सो होय बाबा । करतारका सिरताज । गाउ बछरे तिस चलावे । यारि बाघो न सात ॥१॥ ख्याल मेरा साहेबका बाबा हुवा करतार । व्हाटे आघे चढे पीठ आप हुवा असवार ॥२॥ जिकिर करो अल्ला की बाबा सबल्या अंदर मेस । कहे तुका जो नर बुझे सोहि मया दरवेस ॥ ६ ॥

### वैद्यगोळी

६९५. अल्ला देवे अल्ला दिलावे । अल्ला दारु अल्ला खिलावे । अल्ला बीगर नही कोय । अल्ला करे सोहि होय ॥१॥ मर्द होय वो खडा फिर नामर्दकु नहि धीर । आपुले दिलकु करना खुसी तीन दाम क्या खुमासी ॥२॥ सब रसोका किया मार भजनगोलि येक हि सार । इमान तो सबहि सखा थोडि तो भी लेकर जा ॥३॥ जिनो पास नीत सोय वोहि बसकर तिरोवे । सातो पाचो मार लगावे उतार सो पिछे खावे ॥ ४ ॥ सबा ज्वानि निकल जावे पीछे गधडी मट्टी खावे । गावढाल सो क्या लेवे हगवनि मरि नहि धोवे ॥५॥ मेरी दारु जिन्हे खाया दिदार दरगा सोहि पाया । तलेह मुंढी घाल जावे बिगारि सोवे क्या लेवे ॥ ६ ॥ बजारका बुझे भावा वोहि पुसना अवे ठाव । फुकट बाटु कहे तुका लेवे सोहि लेवे सखा ॥ ७ ॥

### गोंधळ

६९६. राजस सुंदर बाळा पाहों अलिया सकळा वो । बिंबी बिंबोनि ठेली माझी परब्रह्म वेल्हाळा वो । कोटि रविशशि जिच्या अंगिचिया लिला वो ॥१॥ राजस विठाबाई माझें ध्यान तुझें पायीं वो । त्यजुनियां चौघांसि लावी आपुलिया सोई वो ॥२॥ सकुमार साजिरे कैसीं पाउलें गोजिरीं वो । कंठीं तुळसिमाळा उभी भीवरेच्या तीरीं वो ॥३॥ दंत हिरिया ज्योति शंखचक्र मिरवे करीं वो । निर्गुण निर्विकार वेदा न कळेचि आकार वो । शेषादि श्रमले श्रुति न कळे तुझा पार वो ॥४॥ उमा-रोनि बाहे भक्ता देत अभयकर वो । येऊनि पंढरपुर अवतरली सारंगधरा

वो ॥५॥ देखोनि भक्ति भाव वोरसलि अमृतधारा वो । देवूनि प्रेमपान्हा तुकया स्वामिनें किंकरा वो ॥ ६ ॥

६९७. सुदिन सुवेळ तुझा मांडिला गोंधळ वो । पंचप्राण दिवटे दोनी नेत्रांचे हिलाळ वो ॥१॥ पंढरपुरनिवासे तुझे रंगीं नाचत असे, वो । नवस पुरवीं माझा मनिंची जाणोनिया इच्छा वो ॥२॥ मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवनामाझारी वो । चौक साधियला नाभीकळस ठेवुनि वरी वो ॥३॥ बैसली दैवता पुढें वैष्णवाचें गाणें वो । उद्गारें गर्जेति कंठीं तुळसीचीं भूषणें वो ॥४॥ स्वानंदाचे ताटीं धूप दीप पंचारती वो । वोवाळिली माता विठाबाई पंचभूतीं वो ॥५॥ तुझें तुज पावलें माझा नवस पुरवीं आतां वो । तुका म्हणे राखें आपुलिया शरणागता वो ॥६॥

६९८. सुंदर मुख साजिरें कुंडलें मनोहर गोमटें वो । नागर नाग खोपा केशर कस्तुरी मळवट वो । विशाळ व्यंकट नेत्रीं वैजयंती तळपे कंठीं वो । कांसे पितांबराची चंदन सुगंध साजे उटी वो ॥१॥ अति बरवंटा बाळा आली सुलक्षणी गोंधळा वो । राजस तेजोराशी मिरवे शिरोमणी व्यल्हाळा वो । कोटि रविशशिप्रभा तेज लोपल्या सकळा वो । न कळे ब्रह्मादिकां अनुपम्य इची लीळा वो ॥ २ ॥ सावळी सकुमार गोरी भुजा शोभती चारी वो । सखोल वक्षस्थळ सुढाळ पदक झळके वरी वो । कंठीं क्षुद्र घंटिका शब्द करिताती मधुरी वो । गर्जति चरणीं वांकी अभिनव संगित नृत्य करी वो ॥३॥ अष्टांगीं मंडित काय वर्णावें रूपठेवणी वो । शोधिव शुद्ध रसाचि वोतीव लावण्याची खाणी वो । सर्वकळासंपन्न मंजुळ बोले हास्यवदनी वो । बहु रूपें नटली आदिशक्ती नारायणी वो ॥४॥ घटस्थापना केली पंढरपुरमहानगरीं वो । अस्मानी मंडप दिल्हा तिहीं तालांवरी वो । आरंभिला गोंधळ इनें चंद्रभागे तिरीं वो । आली भक्तिकाजा कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥ ५ ॥ तेतिस कोटी देव चामुंडा अष्टकोटि बहिरव वो । आरत्या कुरवंड्या करिती पुष्पांचा वरुषाव वो । नारद तुंबर गायन ब्रह्मानंदें करिती गंधर्व वो । वंदीं चरण रज तेथें तुकयाचा बांधव वो ॥ ६ ॥

६९९. ऐक बाई तुज वो काये सांगतो शकून । निजलिया भुर होसि जागे म्हणवुन ॥१॥ मान्य माझें केलें सांगतें येका बोलें । न येतां हें मलें कळों कोण्हा लोकासी ॥२॥ सांगतें गुण जिविची खुण ऐक माझी मात । बैस एकाभावें माझे हातीं दे वो हात ॥ ३ ॥ बरवा घरचार तुज सांपडला ठाव । फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥४॥ आहे तुझ्या हातीं येका नवसाचें फळ । भावा करि साह्य चहूं अठरांचें बळें ॥५॥ करिं लागपाठ चित्त वित्त नको पाहूं । अक्षइतो चुडा तुज भोगइल नाहो ॥ ६ ॥ कुळिंचीं हे मुळी तुज लागलिसे देवी । पाडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ॥७॥ तुका म्हणे नांद सुखें धरी आठवण । माझ्या येतिल कोणि त्यांचा राख बहु मान ॥ ८ ॥

७००. देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥१॥ मी तों सांगतसें भावें । आसो ठावें सकळां ॥२॥ निराकारि वोस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥३॥ तुका म्हणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाये ॥४॥

७०१. न कळे वो भाव मुनि मागे येकी आंतुरी । साठी संवत्सर जन्म तया उदरीं ॥१॥ कैसा आकळ वो माये चपळ वो । त्रिभुवनव्यापक हरी सकळ वो ॥२॥ हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा । गरुडा विटंबणा रूपा सत्यभामेच्या ॥३॥ द्रौपदीचा भेद पुरविला समई । ऋषि फळ वनीं देठी लावीं त्या ठाई ॥४॥ अर्जुनाच्या रथीं कपि स्तंभीं ठेविला । दोही पैजा तेथें गर्व हरि हा दादुला ॥५॥ भावभक्ति सत्वगुण झाला दुर्जना । तुका म्हणे सकळा छंदें खेळे आपणा ॥ ६ ॥

७०२. उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा । तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥१॥ कैसा जासी सांग आतां मजपासुनी । केले वाताहात दिल्हें संसारा पाणी ॥२॥ अवघें आवरोनि तुझे लाविले पाठीं । आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी ॥३॥ तुका म्हणे आतां चरणीं घातली मिठी । पडिली ती पडो तुम्हा आम्हासी तुटी ॥४॥

७०३. करोनि विनवणी पायीं ठेवितों माथा । परिसावी विनंती माझी पंढरीनाथा ॥१॥ अखंडित असावेंसें वाटतें पायीं । साहोनी संकोच ठाव

थोडासा देई ॥२॥ आसो नसो भाव आलों तुझिया ठावा । कृपादृष्टी पाहें मजवर पंढरीराया ॥३॥ तुका म्हणे आम्ही तुझीं वेडीं वांकुडीं । नामें भवपाश आपुल्या तोडीं ॥ ४ ॥

७०४. राम कृष्ण गीतीं गात । टाळ चिपळीया वाजत । छंदें आपुलीया नाचत । निज घेउनि फिरत गा ॥१॥ जनीं वनीं हा अवघा देव । वासनेचा पुसावा ठाव । मज वोळगा वासुदेव । ऐसा मनीं वसों द्या भाव ॥२॥ निज दानांची थोर आवडी । वासुदेवासी लागली गोडी । मुखीं नाम उच्चारी घडोघडीं । ऐसी करा हे वासुदेव जोडी गा ॥३॥ अवघा सरोनि सेवट झाला । प्रयत्न न चले कांहीं केला । जागा होई सांडोनि झोंपेला । दान देई वासुदेवाला गा ॥ ४ ॥ तुका म्हणे रे धन्य त्यांचें जिणें । जींही घातलें वासुदेवा दान । त्या नलगे येणें जाणें । झालें वासुदेवीं राहाणें गा ॥५॥

७०५ झाली होती काया । बहु मलिन देवराया ॥१॥ तुझ्या उजळलीं नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥२॥ अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा नितोडा ॥३॥ तुका म्हणे देह पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥४॥

७०६ आजि आनंदु रे कीं परमानंदु रे । जया श्रुती नेति नेति म्हणति गोविंदु रे ॥१॥ विठोबाची वेडी आम्हा आनंदु सदा । गाऊं नाचूं टाळी वाहूं रंजवूं गोविंदा ॥२॥ सदा सण सात आम्हा नित्य दिवाळी । आनंदे निर्भर आमुचा कैवारी बळी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक । संत सनकादिक ते आमुचें कवतुक ॥ ४ ॥

७०७. विठ्ठलकीर्तनाचे अंतीं । जय जय हरि जे म्हणती ॥ १ ॥ तेंचि सुकृताचें फळ । वाचा रामनामें निखळ ॥२॥ बैसोनि हरिकथेसी । होय सावध चित्तासी ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचा जन्म । सफळ झाला भवश्रम ॥ ४ ॥

७०८. प्राणिया एक बीज मंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हणे कां मुरारी ॥ १ ॥ हेंचि साधन रे तुझें सर्व सिद्धीचें । नाम उच्चारी रे गोपाळाचें वाचें ॥२॥ उपास पारणें नलगे वन सेवणें । नलगे धूम्रपान पंचाग्नी

तापणें ॥३॥ फुकाचें सुखाचें कांहीं न वेंचे भांडार । कोटि यज्ञापरिस तुका म्हणे हें सार ॥ ४ ॥

७०९. न चलवे पंथे वचन नसतां पालवी । शरीर विटंबिलें वाटे भीक मागावी ॥१॥ न करी रे तैसे आपआपणा । नित्य राम नाम तुम्ही सकळ म्हणा ॥२॥ राम म्हणवितां रांडा पोरें निरविशी । पडति यमा हातीं जाचविती चौऱ्याऐशीं ॥३॥ मुखीं नाहीं नाम तोहि आत्महत्यारा । तुका म्हणे लाज नाहीं तया गव्हारा ॥ ४ ॥

७१०. थडियेसी निघतां पाषाणाच्या सांगडी । बूडतां मध्यमागीं तेथें कोण घाली उडी ॥१॥ न करी रे तैसें आपआपणा । पतंग जाय वायां जीतें ज्योति घालूनियां ॥२॥ सावधपणें सोमल वाटी भरोनियां प्याला । मरणाअंतीं वैद्य बोलावितो वहिला ॥३॥ तुका म्हणे करी रे ठाईंचा विचार । जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥ ४ ॥

फाग

७११. शंख करिसी ज्याच्या नांवें । त्याचें तुज नाहीं ठावें । ऐक सांगतों एका भावें । सांपडे तें घरिं जिवउनि खावें रे विठ्ठल ॥१॥ टिळे माळा करंडी सोंग । धरोनि चालविलें जग । पसरी हात नाहीं त्याग । दावीते दगड पूजीते भगल रे विठ्ठल ॥२॥ राख लावुनी आंग मळी । वाहे ठोके मी एक बळी । वासने हातीं बांधवी नळी । त्यासि येउनि काळ गिळि उगळि रे विठ्ठल ॥३॥ कोण तें राहाडीचें सुख । वरते पाय हारतें मुख । करवी पीडा भोगवी दुःख । पडे नरकीं परि न पळेचि मूर्ख रे विठ्ठल ॥४॥ शिकला फाग मारितो हांका । रांडा पोरें मेळवी लोका । विटंबी शरीर मागे रुका । केलें तें गेलें आवघे फूका रे विठ्ठल ॥५॥ कळावें जना मी एक बळी । उभा राहोनि मांडी फळी । फोडुनि गुडघे कोपर चोळी । आपला घात करोनि आपणची तळमळी रे विठ्ठल ॥६॥ फुकट खेळे ठकलीं वायां । धरोनि सोंग बोडक्या डोया । शिवों नये ती आंतरीं माया । संपादणीवीण विटंबिली काया रे विठ्ठल ॥७॥ धुळी माती कांहीं खेळोचि नका । जवादि चंदन घ्यावा बुका । आपण परिमळ आणिका

लोका । मोलाची महिमा फजिती फूका रे विठ्ठल ॥८॥ बहु दुःखी झालीया खेळें । अंगीं बुद्धी नाहीं बळें । पाठीवरी तोबा तोंड काळें । रसना द्रव्य उपस्थाच्या मुळें रे विठ्ठल ॥९॥ काय सांगतो तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं आवंगोचि नका । चला जेऊं अधीं पोटीं लागल्या भुका । घाल्यावरी मग बरा टाकमटिका रे विठ्ठल ॥ १० ॥

कावडी

७१२. आहा आहा रे माई प्रथम नमुं तो विनायक । ठेवुनि गुरुचरण मस्तक । वदेल प्रासादिक । वाणी हरिहराचे पवाडे ॥१॥ माझी ऐसी ब्रिदावळी । दास दास्यत्वें आगळी । पान्हेरीनें मार्ग मळी । जीवन घ्या रे कापडी हो ॥२॥ जें शीतळाहुनी शीतळ । पातळाहुनि पातळ । प्रेमामृत रसाळ । तें सेवा आहो माग्याचेनु ॥३॥ जिंकाल तरि जिंका रे अभिमान । दवडाल तरी दवडा लज्जा आणि मान । धराल ते धरा शंभूचे चरण । दावाल पण ऐसा दावा तो ॥४॥ काळ घेऊं नेदी वाव । आला तो राखे घावडाव । शुद्ध सत्वीं राखोनि भाव । म्हणा महादेव हरिहर वाणी गर्जों द्या ॥५॥ पराविया नारी माउली समान । परधनीं बाटों नेदी मन । जीवित्व तें तृणासमान । स्वामिकार्जी जाण । शूर म्हणो तया आम्ही ॥६॥ शक्ति वेचाविया परउपकारा । खोटें खोट्याचा पसारा । सत्य तें भवनदीचा उतारा । आळस तो न करा तेथें आलें हो सांगतों ॥७॥ व्रत करा एकादशी सोमवार । कथा पूजन हरिजागर । पुण्य तें असे गातां नाचतां फार । पुन्हां बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥८॥ संग संतांचा करितां बरवा । उत्तमोत्तम कीर्तिचा ठेवा । पंथ तो सुपंथे चालावा । उगवा वासना लिगाड ॥९॥ तुका चालवितो कावडी । प्रवृत्ति निवृत्ति चोखडी । पुढत पुढती अधिक गोडी । भरोनि कलश भजन आवडी । केशवदास नटतसे ॥१०॥

७१३. आहा आहा रे माई हें अन्नदानाचें सत्र । पव्हे घातली सर्वत्र । पंथीं अवघे पंथ मात्र । इच्छा भोजनाचे आर्त पुरवाया ॥१॥ यावें तेणें घ्यावें । न सरेसें केलें सदाशिवें । पात्र शुद्ध पाहिजे बरवें । मंगळमावें

सकळ हर म्हणा रे ॥२॥ नव्हे हें कांहीं मोकळें। साक्षी चौघांचिया वेगळें। नेदी नाचों मताचिया बळें। अणु अणोरणीया आगळे। महदादि महदा साक्षीत्वें हर म्हणा रे ॥३॥ हे हरिनामाची अंबिली। जगा पोटमरी केली। विश्रांति कल्पतरूची साउली। सकळां वर्णा सेवितां भली। म्हणा हरहर महादेव ॥४॥ तुका हरिदास तराळ। अवघे हाकारी सकळ। या रे वंदूं शिखरातळ। चैत्रमास पर्वकाळ। महादेव दरुशनें ॥५॥

७१४. आहा आहा रे माई गंगा नव्हे जळ। वृक्ष नव्हे वडपिंपळ। तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ। श्रेष्ठ तनु देवाचिया ॥१॥ समुद्र नदी नव्हे पैं गा। पाषाण म्हणों नये लिंगा। संत नव्हती जगा। माणसा त्या सारिखे ॥२॥ काठी म्हणों नये वेतू। अन्न म्हणों नये सातू। राम राम हे मातू। नये म्हणों शब्द हे ॥३॥ चंद्र सूर्य नव्हती तारांगणें। मेरु तो नव्हे पर्वतासमान। शेष वासुकी नव्हे सर्प जाण। विखाराच्या सारिखे ॥४॥ गरुड नव्हे पाखरूं। ढोर नव्हे नंदिकेश्वरू। झाड नव्हे कल्पतरू। कामधेनु गाय न म्हणावी ॥५॥ कुर्म नव्हे कासव। डुकर नव्हे वराह। ब्रह्मा नव्हे जीव। स्त्री नव्हे लक्ष्मी ॥६॥ गवाक्ष नव्हे हाड। पाटाव नव्हे कापड। परिस नव्हे दगड। सगुण ते ईश्वरीचे ॥७॥ सोनें नव्हे धातु। मीठ नव्हे रेतु। नाहीं नाहीं चर्मातु। कृष्णाजिन व्याघ्रांबर ॥८॥ मुक्ताफळ नव्हेति गारा। खड्या ऐसा नव्हे हिरा। जीव नव्हे सोयिरा। बोळविजे स्वइच्छेनें ॥९॥ गांव नव्हे द्वारावती। रणछोड नव्हे मूर्ती। तीर्थ नव्हे गोमती। मोक्ष घडे दर्शनें ॥१०॥ कृष्ण नव्हे भोगी। शंकर नव्हे जोगी। तुका पांडुरंगीं। हा प्रसाद लाधला ॥११॥

७१५. आहा आहा रे माई। नमो उदासिन झाले देहभावा। आळविती देवा तयां नमो ॥१॥ नमो तीर्थपंथें चालती तयासी। येती बोळविती तयां नमो ॥२॥ नमो तया संतवचनीं विश्वास। नमो भावें दास्य गुरूचे त्यां ॥३॥ नमो त्या मातापित्याचें पाळण। नमो त्या वचन सत्य वदे ॥४॥ नमो तया जाणें आणिकाचें सुखदुःख। राखे-तान भूक

तयां नमो ॥५॥ परोपकारी नमो तया पुण्यवंता । नमो त्या दमित्या इंद्रियांसी ॥६॥ तुका म्हणे नमो हरिचिया दासा । तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥७॥

७१६. आहा आहा रे भाई तयावरी माझी ब्रिदावळी । भ्रष्ट ये कलीं क्रियाहीन ॥१॥ थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी । वाणिले ते थोरी दवडावया बाहेरी ॥२॥ बाइलेचा दास पित्रांस उदास । भीक भिकाऱ्यास नये दारा ॥३॥ विद्याबळें वाद करोनियां छळी । आणिकांसि फळी मांडोनिया ॥४॥ गांवींचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत घडेचिना ॥५॥ सदा सर्वकाळ करीतोही निंदा । स्वप्नींही गोविंदा आठवीना ॥६॥ खाचेमध्यें धन पोटासी बंधन । नेणें ऐसा दानधर्म कांहीं ॥७॥ तुका म्हणे नटे दाउनियां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥८॥

सौरी

७१७. वेसन गेलें निष्काम झाले नर नव्हे नारी । आपुल्या तुटी पारख्या भेटी सौरियांच्या फेरी ॥१॥ त्याचा वेध लागला छंद । हरि गोविंद वेळोवेळां । आपुले मागें हांसत रागें । सावले घाली गळां ॥२॥ जनवेशा भीते तोंडा आम्हुच्या मांडणा । कर कटीं भीमातटीं पंढरीचा राणा ॥३॥ वेगळ्या याती पडिलों खंती अवघ्या येका भावें । टाकियेलि चाड देह भाव जीतें शिवें ॥४॥ सकळांमध्यें आगळी बुद्धी करूं तिची सेवा । वाये तुवां मुंढासवें भक्ति नाचों भावा ॥५॥ म्हणे तुका टाक रुका नाचो निरलज्जा । बहु झालें सुख कामें चुकलिया काजा ॥६॥

७१८. आणिका उपदेशु नेणें नाचों आपण । मुंढा वाया मार गेला वाया हांसे जन ॥१॥ तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा । पुढिलाच्या कळा कवतुक जाणोनी ॥२॥ बाहिरल्या वेशें आंत जैसें तैसें । झांकलें तों बरे पोट भरे तेणें वेषें ॥३॥ तुका म्हणे केला तरी करीं शुद्ध भाव । नाहीं तरी जासी वाया हा ना तोसा ठाव ॥४॥

७१९. टाक रुका चाल रांडे कां गे केली गोवी । पुसोनियां आले ठाव म्हणोनि देतें शिवी ॥१॥ आतां येणें छंदें नाचों विनोदें । नाहीं या

गोविंदें माझें मजशीं केलें ॥२॥ कोरडे ते बोल कां गे वेंचितेसी वाया। चर्ते करोनि दावी तुझ्या मुळिंचिया ठाया ॥३ ॥ याजसाठीं डौर म्यां धरला हाता। तुका म्हणे तुम्ही गांठा सोडायाची खंती ॥४॥

७२०. मोकळी गुंते रिती कुंथें नाहीं मार दावें। घेडवाडा बैसलि खोडा घेतली आपुल्या भावें ॥१॥ ऐका बाई लाज नाहीं आणिका त्या गरतींची। समाधानीं उंचस्थानीं जाणे सेवा पतीची ॥२॥ न बोलतां करी चिंता न मारितां पळे। दादला शेजे नावडे निजे जग झोंडीचे चाळे ॥३॥ देखत अंध बहिर कानीं बोल बोलतां मुके। तुका म्हणे पतन सोयरीं ऐसीं झाली येके ॥४॥

७२१. सातें चला काजळ घाला तेल फणी करा। दिवाण दारीं बैसले पारिं नाचों फेर धरा ॥१॥ या साहेबाचें झालें देणें वेळोवेळां नलगे येणें। आतां हाटी कशासाठीं हिंडो पाटी दुकानें ॥२॥ अवघ्या जणी मुंढा धनी नाचों येके घाई। सरसावलें सुख कैसा चाळा येके ठायीं ॥३॥ म्हणे तुका बोळंगे येका तोड चिंता माया। देउनि उद्गार जाऊं मुळीं-चिया ठाया ॥४॥

७२२. सौरी सुर जालें दूर डौर घेतला हातीं। माया मोहो सांडवले तिहीं लोकीं झाले सरती ॥१॥ चाल विठाबाई अवघी पांच देही न धरीं गुज कांहीं। वाळवंटीं सांपडतां ॥२॥ हिंडोनि चौऱ्यायशीं घरें आलें तुझ्या दारां। येक्या रुक्यासाठीं आंचवले संसारा ॥३॥ लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं। भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां केंची उरी ॥४॥ झाले मांडी जगा सांडी नाहीं भीड चाड। घालिन चरणीं मिठी पुरविन जीवींचें तें कोड ॥५॥ तुका म्हणे रुका करी संसारतुटी। आतां तुम्हां आम्हां कैशी झाली जीवा साटी ॥६॥

७२३. सम सपाट वेसनकाट निःसंग झाले सौरी। कुडपियेला देश आतां येउं नेदी दुसरी ॥१॥ गाऊं रघुरामा हेचि उरलें आम्हा। नाहीं जीवतमा वित्तगोतासहित ॥२॥ ठावूं झाला रिता झांकोनि काय आतां। कोणासवें लाज कोण दुजे पाहातां ॥३॥ सौरियाचा संग आम्हा दुऱ्हावलें

जग । भिन्न झालें सुख भाव पालटला रंग ॥४॥ लाज भय झणीं नाहीं त्यजियेलीं दोन्हीं । फिरविला वेस नव्हे कोण्हाचिच कोण्ही ॥५॥ तुका म्हणे हा आम्हां वेश दिल्हा जेणें । जना प्रतित सर्वे असो येकपणें ॥६॥

७२४. नव्हे नरनारी संसारिं आंतरले । निर्लेज्ज निष्काम जना वेगळेचि ठेले ॥१॥ चाल रघुरामा ने आपुल्या गांवा । तुजविण आम्हा कोण सोयरा सांगाती ॥२॥ जनवाद लोकनिंद्य पिसुनाचे चेरे । साहूं तुजसाठीं अंतरलीं सहोदरें ॥३॥ बहुतां पाठीं निरोप हाटीं पाठविला तुज । तुका म्हणे आतां सांडुनि लौकिकाची लाज ॥४॥

शेज आरती

७२५. आजि दिवस झाला । धन्य सोनियाचा भला ॥१॥ झाले संताचे पंगती । बरवें भोजन निगुति ॥२॥ रामकृष्णनामें । बरविं मोहियेलीं प्रेमें ॥३॥ तुका म्हणे आला । चवि रसाळ हा काला ॥४॥

७२६. तुम्ही तरि वो सांगा कांहीं । आम्हाविशीं रखुमाबाई ॥१॥ शेष उरलें तें ठायीं । वेगीं पाठवूनी देई ॥२॥ टोकत बैसलों देखा । इच्छितसें ग्रासा येका ॥३॥ प्रेम देउनि बहुडा झाला । तुका म्हणे विठ्ठल बोला ॥४॥

७२७. वाट पाहे बाहे निढळीं ठेऊनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागलेंसें चित्त ॥१॥ कइ येतां देखे माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखि धरोनियां माप ॥२॥ डावा डोळा लवे उजवी स्फुरत बाहो । मन उतावीळ भाव सांडोनियां देहो ॥३॥ सुखसेजे गोड चित्तीं नलगे अणिक । नाठवे घर दार तान पळाली भूक ॥४॥ तुका म्हणे धन्य दिवस ऐसा तो कोण । पंढरीचे वाटे मुळ येतां देखेन ॥५॥

७२८. तुझें दास्य करूं आणिकां मागों खावया । धीग झालें जीणें माझें पंढरिराया ॥१॥ काय गा विठोबा तुज आतां म्हणावें । शुभाशुभ गोड तुम्हा थोराच्या दैवें ॥२॥ संसाराचा धाक निरंतर आम्हासी । मरणें भलें परि काय अवकळा ऐसी ॥३॥ तुझे रे शरणागत शरण जाऊं आणिकासी । तुका म्हणे कवणा लाज हे कां नेणसी ॥४॥

७२९. पुरवीली आळी । जे जे केली ते ते काळीं ॥१॥ माय तरी ऐसी सांगा । कृपाळुवा पांडुरंगा ॥२॥ घेतलें नुतरी । उचलोनी कडियेवरी ॥३॥ तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥४॥

७३०. पतित पतीत । परी मी त्रीवाचा पतीत ॥१॥ परि तूं आपुलीया सत्ता । मज करावें सरता ॥२॥ नाहिं चित्तशुद्धि । स्थिर पायांपासीं बुद्धी ॥३॥ अपराधाचा केलों । तुका म्हणे किती बोलों ॥४॥

७३१ कथेची सामोग्री । देह अवसानावरी ॥१॥ नको जाऊं देऊं मंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥२॥ आयुष्य करी उणें । परि मज आवडो कीर्तन ॥३॥ तुका म्हणे हाणी । या वेगळी मना नाणीं ॥४॥

७३२. गळित झाली काया । हेंचि लळित पंढरिराया ॥१॥ आले अवसानापाशीं । रूप राहिलें मानसीं ॥२॥ वाहिला कळस । तेथें स्थिरावला रस ॥३॥ तुका म्हणे गोड झालें । नारायणीं पोट धालें ॥४॥

७३३. रत्नजडित सिंहासन । वरि बैसले आपण ॥१॥ कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळि राही रखुमाबाई ॥ २ ॥ नाना उपचारी । सिद्धी वोळंगती कामारी ॥३॥ हातीं घेऊनी पादुका । उभा वंदीजन तुका ॥४॥

७३४. हिरा शोभला कोंदणीं । जडित माणीकांची खाणी ॥१॥ तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥२॥ कोटी चंद्रलीळा । पूर्णमेच्या पूर्णा कळा ॥३॥ तुका म्हणे दृष्टि धाये । परतोनी माघारी ते न ये ॥४॥

७३५. उभारिला हात । जगीं जाणविली मात ॥१॥ देव बैसले सिंहासनीं । आलीया याचकांची पुरे धणी ॥२॥ येकाचे कैवाडें । उगवे बहुताचें कोडें ॥३॥ दोहीं ठाईं तुका । नाहीं पडो देत चुका ॥४॥

७३६. जीवेंसाठीं यत्नभाव । त्याचि नाव बळकट ॥१॥ पैल तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं मत्रनदि ॥२॥ विश्वासाची धन्य जाती । येथें वस्ती देवाची ॥३॥ तुका म्हणे मोळियाचा । देव साचा अंकीत ॥४॥

७३७. आशिर्वाद तया जाती । आवडि चित्तीं देवाची ॥१॥ कल्याण तें असो क्षेम । वाढो प्रेम आगळें ॥२॥ भक्तिभाग्य गांठीं धन । त्या नमन जीवासी ॥३॥ तुका म्हणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥४॥

७३८. तयासाठीं वेचूं वाणी । ऐकों कानीं वारता ॥१॥ क्षेम माझे हरिजन । समाधान पुसतां त्या ॥२॥ परत्रींचे जे सांगाती । त्यांचि यातीं न विचारिती ॥३॥ तुका म्हणे धैर्यवंतें । निर्मळ चित्तें तीं येक ॥४॥

७३९. अभय उत्तर संतीं केलें दान । झालें समाधान चित्त तेणें ॥१॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । द्यावें कृपादान नारायणा ॥२॥ आलें जें उचित देहविभागाशीं । तेणें पायापाशीं उभीं असों ॥३॥ तुका म्हणे करी पूजन वैखरी । बोबड्या उत्तरीं गातों गीत ॥४॥

७४०. असो मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥१॥ सेवेमध्यें जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥२॥ विचारोनी ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥३॥ आतां तुकयापासिं हेवा । नाहीं देवा तातडी ॥४॥

७४१. ऐकें वचन कमळापति । मज रंकाची विनंती ॥१॥ कर जोडितों कथेकाळीं । आपण असावें जवळीं ॥२॥ घेई ऐशीं भाक । मागेन जरी कांहीं आणिक ॥३॥ तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुकाची राखावा ॥४॥

७४२. आलि लळीताची वेळ । असा सावध सकळ ॥१॥ लाहो करा वेगीं स्मरा । टाळि वाहोनि विश्वंभरा ॥२॥ झालिया अवसान । न सांपडती चरण ॥३॥ तुकयाबंधू म्हणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ॥४॥

७४३. नेणो गावूं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनसहित आलों शरण ॥१॥ करि अंगिकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रिदें करावीं खरीं ॥२॥ नेणें भक्तिभाव तुझा म्हणवीतों दास । जरी देसी अंतर तरि लज्जा कोणास ॥३॥ म्हणे तुकयाबंधू तुझे धरियेले पाय । आतां कोण दुजा ऐसा आम्हांसी आहे ॥४॥

७४४. तूंचि मायबाप बंधू सखा आमूचा । वित्त गोत जिवलग जीवाचा ॥१॥ आणिक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥२॥ तूंचि क्रियाकर्म धर्म देव तूं कूळ । तूंचि तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥३॥ म्हणे तुकयाबंधू करिता कार्यता देवा । तूंच भावभक्ति पूजा पुरस्कार अवघा ॥४॥

७४५. करोनि उचित । प्रेम घाली हृदयांत ॥१॥ आलों दान मागायास । थोर करोनी सायास ॥२॥ चिंतनसमयीं । सेवा आपुलीच देई ॥३॥ तुकयाबंधू म्हणे भावा । मज नीरवावें देवा ॥४॥

७४६. गाऊं वाहूं टाळी रंगी नाचों उदास । सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥१॥ बळियाचा बळी तो कैवारी आमुचा । भुक्तिमुक्तिदाता सकळहि सिद्धीचा ॥२॥ मारूं शब्दशस्त्र बाण निःशंक अनिवार । कंटकाचा चुर शिर फोडूं काळाचें ॥३॥ म्हणे तुकयाबंधु नाहीं जिवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकाची भीड ॥४॥

७४७. सांडोनि वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥१॥ आला आला रे जगजेठी । भक्त पुंडलिकाचे भेटी ॥२॥ पैल चंद्रभागेतीरीं । कट धरोनियां करीं ॥३॥ तुकयाबंधु म्हणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥ ४ ॥

७४८ कृपाळु भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥१॥ उभा न पाचारितां दारीं । न सांगतां कामें करी ॥२॥ भाव देखोनि निर्मळ । रजां वोढवी कपाळ ॥३॥ तुकयाबंधु म्हणे न भजा । का रे ऐसा भोळा राजा ॥४॥

७४९ केला अंगिकार पंढरीच्या देवें । आतां काय करितिल काळ भश्यक मानवें ॥१॥ घातलीं बाहिर तीं भय होतें ज्याच्यानें । बैसला आपण तेथें घालोनियां ठाणें ॥२॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आम्हांसी ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु नलगे करावी चिंता । कोणेविशीं आतां बैसलों हस्तिवरी माथा ॥४॥

७५० अगोचरी बोलिलों आज्ञेवीण आगळें । परि तें आतां न संडावें कृपाळु राउळें ॥१॥ जाईल रोकडा बोल न पुससी आम्हां । तुझा तुझें म्हणविलें पाहा पुरुषोत्तमा ॥२॥ न व्हावा न वजावा न कळतां अन्याय । न धरावें तें मनीं भलता करी उपाय ॥३॥ म्हणे तुकयाबंधु हीन मी म्हणोन लाजसी । वारा लागो पाहातोहे उंच्या झाडासी ॥४॥

७५१ झाली पाकसिद्धी वाट पाहे रखुमाई । उदक तापलें डेरा चिकसा मर्दू द्या पायीं ॥१॥ उठा पांडुरंगा उशीर झाला भोजनीं । उभ्या

आंचवणा गोपिका कळस घेउनी ॥२॥ अवघ्या सावचित सेवेलागीं सकळा । उद्धव अक्रूर आले पाचारूं मूळा॥३॥ सांवरिली शेज सुमनयाती सुगंधा । रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥४॥ तुका विनंति करी पाहें पंढरीराणा । असा सावचित सांगे सकळ जनां ॥५॥

७५२ उठा सकळ जन उठिले नारायण । आनंदले मुनि जन तिन्ही लोक ॥१॥ करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग अपार टाळ घोळ ॥ २ ॥ जोडोनियां कर मुख पाहा सादर । पायांवरि शीर ठेवूनियां ॥३॥ तुका म्हणे काये पढियंतें मागा । आपुलालें सांगा सुखदुःख ॥४॥

७५३ घडिया घालोनि तळीं चालती वनमाळी । उमटती कोमळि कुंकूमाची ॥१॥ वंदा चरणरज अवघे सकळ जन । तारियेले पाषाण उदकीं जेणें ॥२॥ पैस धरोनि चला ठाकत ठाईं ठाईं । मौन धरोनि कांहीं न बोलावें ॥३॥ तुका आवसरु जाणवितो पुढें । उघडिले महाल मंदिरें कवाडें ॥४॥

७५४ भीतरीं गेले हरी राहा क्षणभरी । होईल फळ धीर करावा ॥१॥ न करीं त्वरा ऐके मात । क्षण येक निवांत बैसावें ॥२॥ करोनियां मर्दन सारिलें पाणी । न्हाले देव अंग पुशीं भवानी ॥३॥ नेसला सोनसळा विनवी रखुमाई । वाढिलें आतां ठाईं चलावें जी ॥४॥ करोनियां भोजन घातलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥५॥ तुका मात जाणवी आतां । सकळां बहुतां होती चित्तीं ॥६॥

७५५ द्याजी आम्हा कांहीं सांगा जी रखुमाई । शेष उरलें तें ठायीं सनकादिकां ॥१॥ टोकत बाहेरि बैसलों आशा । पुराया ग्रासा येकमेकां ॥२॥ येथवरि आलों तुझिया नांवें । आस करोनि आम्ही दातारा ॥३॥ प्रेम देउनियां बहुडा दिला । तुका म्हणे आतां विठ्ठल बोला ॥४॥

७५६ बहुडविले जन मन झालें निश्चळ । चुकउनि कोल्हाळ आला तुका ॥१॥ पर्यंकीं निद्रा करावें शयन । रखुमाई आपण समवेत ॥२॥ घेउनियां हातीं आलों टाळ वीणा । सेवेसी चरणा स्वामीचिया ॥३॥ तुका म्हणे आतां परिसावीं सादरें । बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥४॥

७५७ नाच गाणें माझ्या जवळील ठाव । निरुपणें भाव होईल तो ॥१॥ तुम्हा निद्रा मज आज्ञा तें स्वभावें । उतरोनि जीवें जाईन लोण ॥२॥ येकायेकीं बहु करीन सुस्वरें । मधुर उत्तरें आवडीनें ॥३॥ तुका म्हणे तूं जगदानी उदार । फेडिशील मार येक वेळे ॥४॥

७५८ शिणलेति सेवकां देऊनि इच्छादान । केला अभिमानें अंगीकार ॥१॥ आहो जी दीनानाथा आनंदमूर्ती । तुम्हांसी शोभत ब्रीदें ऐसी ॥२॥ बहुतांनीं निरविलें बहुतां प्रकारीं । सकळां ठाईं हरि पुरलेती ॥२॥ तुका म्हणे अगा कुटुंबवत्सळा । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥४॥

७५९ उठा मागलेति उजगरा । चला स्वामी निद्रा करा ॥१॥ वाट पाहते रुक्मिणी । उभी मंचका सावरोनी ॥२॥ केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ॥३॥ लागतों चरणा । तुकयाबंधु नारायणा ॥४॥

७६० पावला प्रसाद आतां उठोनि जावें । आपुला तो श्रम कळों येतसे भावें ॥१॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा । पुरले मनोरथ जातों आपुल्या स्थळा ॥२॥ तुम्हांसि जागऊं आम्ही आपुल्या चाडा । शुभाशुभ कर्में दोष हराया पीडा ॥३॥ तुका म्हणे दिल्हे उच्छिष्टाचें भोजन । नाहीं निवडिलें आम्हां आपुलिया भिन्न ॥४॥

७६१ शब्दाचींया रत्नें करुनि अळंकार । तेणें विश्वंभर पुजियेला ॥१॥ भावाचे उपचारें करोनि भोजन । तेणें नारायण जेववीला ॥२॥ संसारा हातीं दिल्हें आंचवण । मुखशुद्धी मन समर्पिलें ॥३॥ रंगलीं इंद्रियें सुरंग तांबूलें । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥४॥ येकभाव दीप करोनि निरांजन । देऊनि आसन देहाचें या ॥५॥ न बोलोनि तुका करि चरण सेवा । निजविलें देवा माजघरीं ॥६॥

७६२ उठोनियां तुका गेला निजस्थळा । उरले राउळामाजीं देव ॥१॥ नेउल झालें सेवका स्वामीचें । आज्ञें करोनि चित्त समाधान ॥१॥ पहुडलिया हरी अनंतशयनावरी । तेथें नाहीं उरीं कांहीं काम ॥३॥ अवघि बाहेर घालूनि गेला तुका । सांगितलें लोकां निजले देव ॥४॥

---

### दसरा

७६३ पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा । सांपडला तो साधा आजी मुहूर्त बरा । गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा । आळस नका करूं सांगतों लहान थोरां ॥१॥ या हो या हो बायांनो निघाले हरी । सिलंगणा घेउनि वेगीं आरत्या करी । वोवाळुं श्रीमुख वंदुं पाउलें शिरीं । आम्हां देव आले येथें घरींचिया घरीं ॥ २ ॥ अक्षई मुहुर्त औटामध्यें साधतें । मग येरी गर्जे जैसें तैसें होत जातें । म्हणोनि मागें पुढें कोण्ही न पाहावें येथें । सांडा परतें काम जाऊं हरि सांगातें ॥३॥ बहुतां बहुतां रीती चित्तीं धरा हे मनीं । नका गई करूं आइकाल ज्या कानीं । मग हें सुख कधीं न देखील स्वप्नीं । उरले हाय हाय मागें होईल काहाणी ॥४॥ ऐशियासि वंचिती त्यांच्या अभाग्या पार । नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा हा निर्धार । मग हे वेळ घटिका नये अजरामर । कळलें असों द्या मग पडतील विचार ॥५॥ जयासाठीं ब्रह्मादिक झाले ते पिसे । उच्छिष्टा-कारणें देव जळीं झाले मासे । अर्धांगीं विश्वमाता लक्ष्मी वसे । तो हा तुकया बंधु म्हणे आले अनायासें ॥६॥

७६४ करोनि आरती । आतां वोवाळूं श्रीपती ॥१॥ आजि पुरले नवस । धन्य झाला हा दीवस ॥२॥ पाहा हो सकळा । पुण्यवंता तुम्ही बाळा ॥३॥ तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ॥४॥

७६५ द्याल माळ जरी पडेन मी पायां । दंडवत वायां कोण वेंची ॥१॥ आलें तीं हिशोबें अवघिया प्रमाण । द्याल जरी दान मान होतो ॥२॥ मोकळिया मनें घ्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥३॥ तुका म्हणे तुझी झालिया कृपण । नामाची जतन मग कैंची ॥४॥

७६६ तुम्ही जावें निज मंदिरा । आम्ही जातों आपुल्या घरा ॥१॥ विठोबा लोभ असों देई । आम्ही असों तुमचे पाईं । चित्त करी सेवा । आम्ही जातों आपुल्या गांवा ॥३॥ तुका म्हणे दिशा भूललों । फिरोनि पायापाशीं आलों ॥४॥

७६७, पाहे प्रसादाची वाट । द्यावें धुवोनियां ताट ॥१॥ शेष घेउनि

जाइन । तुमचें झालिया भोजन ॥२॥ झालों येकेसवा । तुम्हा आडोनियां देवा ॥३॥ तुका म्हणे चित्त । करोनि राहिलों निवांत ॥४॥

७६८ केली कटकट गाऊं नाचूं नेणतां । लाज नाहीं भय आम्हां पोटाची चिंता ॥१॥ बैसा शिणलेति पाय रगडूं दातारा । जाणवूं द्या वारा उब झाली शरीरा ॥२॥ उशिरा उशिर किती काय म्हणावा । जननिया बाळका कोप कांहीं न धरावा ॥३॥ तुझिये संगतीं आम्ही करूं कोल्हाळ । तुका म्हणे बाळ अवघे मिळुनी गोपाळ ॥४॥

७६९. आवल नाम आल्ला बडा लेते भुल न जाये । इलाम त्याकाल-जमुपरताही तुंब बजाये ॥१॥ अल्ला एक तुं नबी एक तुं । काटते सिर पावो हाते नहिं जिव डराये ॥२॥ आगले देखो पिछे बुझो । आपे हजुर आयें ॥ ३ ॥ सब सवरी नचाव म्याने खडा अपनी सात । हात पावो रखते जबाब नहीं आगली बात ॥४॥ सुनो माई बाजार नाहीं सबही नीर चलावे । नन्हा बडा नही कोय येक ठोर मिलावे ॥५॥ एक तरि नही प्यार जिवतनकी आस । कहे तुका सो हि मुंढा राखलिये पायेनपास ॥ ६ ॥

७७०. तम भजाये ते बुरा जिकीर तें करे । सिर काटे उर कुटे ताहां सडकरे ॥१॥ ताहां एक तु ही ताहां एक तु ही । ताहां एक तु ही रे बाबा हम तुम्ह नहीं ॥२॥ दिदार देखो भुले नहिं किसे पछाने कोय । सच्चा नहीं पकड सके झुटा झुटे रोये ॥३॥ कीसे कहे मेरा कीन्हो संति लिया मास । नहिं मेलों मिले जीवना झुटा किया नास ॥४॥ सुनो माई कैसा तोही होय तैसा होय । बाट खाना अल्ला कहना येकबारा तोही ॥५॥ भला लिया भेक मुंढे अपना नफा देख । कहे तुका सो ही सखा हाक अल्ला येक ॥६॥

७७१. कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करी ॥१॥ पिक पीकलें पीकलें । घन दाटोनियां आलें ॥२॥ शेवटींचें दान । मागा आला नारायण ॥३॥ तुका म्हणे पोट । भरलें वारला बोभाट ॥४॥

७७२. अरुष शब्द बोलों मनीं न धरावे काई । लडिवाळ बाळकें

तूंचि आमुची आई ॥१॥ देई गे विठाबाई प्रेम मातूकें । अवघीया कवतुकें लहान थोरां सकळां ॥२॥ सांडुनियां थोरी धीटपणातें वाणी । घेतलें पाहिजे केलें लेकुरें कानीं ॥३॥ तुका म्हणे थोड्यासाठीं कशाचि अटी । जाले आसे आतां धुरेसवसाटि ॥४॥

७७३. आड केलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥१॥ आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥२॥ देवा लागलीसे नीज । येथें उभ्या काय काज ॥३॥ राग येतो देवा । तुका म्हणे ने घे सेवा ॥४॥

---

नाट

७७४. विठ्ठल आमुचें जीवन । आगम निगमाचें स्थान । विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यान विसावा ॥१॥ विठ्ठल कुळीचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त । विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥२॥ विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तही पाताळें भरोनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनि मानसीं ॥३॥ विठ्ठल जिवांचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेला चाळा विठ्ठलें ॥४॥ विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता । विठ्ठलेविण चाड नाहीं गोता । तुका म्हणे आतां नाहीं दुसरें ॥५॥

७७५. बरवा झाला व्यवसाय । पावलों चिंतिलाचि ठाव । दृढ पाईं राहिला भाव । पावला जीव विश्रांति ॥१॥ बरवा फळला शकुन । अवघा निवारला शीण । तुमचें झालिया दरुशन । जन्ममरण नाहीं आतां ॥२॥ बरवें झालें आलों या ठाया । होतें संचित ठाईंच्या पाया । देहभाव पालटली काया । पडिली छाया ब्रह्मीची ॥३॥ जोडिलें हें न सरे धन । अविनाश आनंदघन । अमूर्तमूर्ति मधुसूदन । समचरण देखियेला ॥४॥ जुनाट जुगादीचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें । लोपलें होतें पारिखेपणें । ठाव चळणें चुकविला ॥५॥ आतां या जीवाचियेसाठीं । न सोडीं पडलीया मिठी । तुका म्हणे शिणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥६॥

७७६. मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंद बुद्धी । तुज म्यां आठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधी मायबापा ॥१॥ नाहीं ऐकिलें गाईलें गीत । धरिली लाज सांडिलें हित । नावडे पुराणा बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥२॥ केला करविला नाहीं परउपकार । नाहीं दया आली पीडितां पर । करों नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥३॥ नाहीं केलें तीर्थाचें भ्रमण । पाळिला पिंड कर चरण । नाहीं संत सेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तीचें ॥४॥ असंगसंगें घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय । न कळे हित करावें तें काय । नये बोलूं आठवूं तें ॥५॥ आप–आपण्या घातकर । शत्रु झालों मी दावेदार । तूं तव कृपेचा सागर । उतरीं पार तुका म्हणे ॥६॥

७७७. आतां पावेन सकळ सुखें । खादलें कदा तें न देखे । अवघे सरले पारखे । सकळ देखे माहियेर ॥१॥ जवळी विठ्ठल रखुमाई । बहिण बंधू बाप आई । सकळ गोतीच साई । पारिखें कांहीं ऐसें नेणिजे ॥२॥ जगदाकारी झाली सत्ता । वारोनि गेली पराधीनता । अवघें आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुऱ्हावली ॥३॥ वावरे इच्छा वसे घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं । करवी तैसे आपण करी । मीड न धरी चुकल्याची ॥४॥ सोशिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस । बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ॥५॥ करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें । मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडे पुढें तुका ॥६॥

७७८. सर्व सुखाचे आशे जन्म गेला । क्षण येक मुक्ति यत्न नाहीं केला । हिंडतां दिशा शिण पावला । मायें वेष्टिला जीव माझा ॥१॥ माझें स्वहित नेणती कोणी । कांहीं न करितां मजवाचुनी । सज्जन तव सुखाची मांडणी । नेणती कोणी आदि अंत ॥२॥ काय सांगों गर्भीची यातना । मज भोगितां नारायणा । मांस मळ मूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यातसे ॥३॥ मज चालतां प्रयाणकाळीं । असतां न दिसते जवळी । मृत्तिके मृत्तिका कवळी । येकले मेळी संचिताचे ॥४॥ आतां मज ऐसें करी गा देवा ।

कांहीं घडे तुझी चरणसेवा । तुका विनवीत केशवा । चालवी दावा संसारें ॥५॥

७७९. अगा ये सांवळ्या सगुणा । गुणनिधी नाम नारायणा । आमची परिसावी विज्ञापना । सांभाळी दीना आपुलिया ॥१॥ बहु या उदाराचे कष्ट । आम्हांसि केलें कर्मभ्रष्ट । तुमची चुकविली वाट । करी वटवट या निमित्यें ॥२॥ झालों पांगिला जनासी । संसाराची आंदणी दासी । न कळे कधीं बो सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥ ३ ॥ येथें तो नये आठव कांहीं । विसावा क्षण येक नाहीं । पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसेचि ना ॥४॥ जीवित्व वेचिलें वियोगें । हिंडतो प्रवास वाउगे । कांहीं व्याधी पीडा रोगें । केलिया भोगें तडातोडी ॥५॥ माझा मीच झालों शत्रु । कैचा पुत्र दारा कैचा मित्रु । कासया घातला पसारु । आहो जगद्‌रू तुका म्हणे ॥६॥

७८०. आतां मज धरवावी शुद्धी । येथुनि परतवावी बुद्धी । घ्यावे सोडउनि कृपानिधि । सांपडलों संधि काळचक्रीं ॥१॥ करिसील तरी नोव्हे कांहीं । राईचा डोंगर पर्वत रायी । आपुले करुणेची सोयी । करि वो आई मजवरी ॥२॥ मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभाव त्या गुणें । नेणें आयुष्य होतें उणें । पुढील पेणें अंतरलें ॥३॥ आतां मज वाटतसे भय । दिवसेंदिवस चालत जाय । येथें म्यां येउनि केलें काय । नाहीं तुझे पाय आठविले ॥ ४ ॥ करोनि अपराध क्षमा । होती केले पुरुषोत्तमा । आपुले नामीं द्यावा प्रेमा । सोडवीं भव भ्रमापासोनियां ॥५॥ हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव हा पायापें चरणीं । करूं हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका म्हणे ॥ ६ ॥

७८१. जेणें हा जीव दिल्हा दान । तयाचें करीन चिंतन । जगजीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥१॥ जो या भीवरेच्या तिरीं । कट धरोनियां करीं । पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनि राहीन ॥ २ ॥ जो या असुरांचा काळ । भक्तजन प्रतिपाळ । खेळे हा लाघव सकळ । तयाच्या माळ पायावरी ॥३॥ जो या गोपाळांच्या मेळी । खेळु खेळे वनमाळी । रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥४॥ जो हा लावण्य पुतळा ।

जयाच्या अंगीं सकळ कळा । जयाच्या गळां वैजयंति माळा । तया वेळो-वेळा दंडवत ॥५॥ जयाचें नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसि जयाचि दासी । तो हा तेजःपुंज राशी । सर्व भावें त्यासि तुका शरण ॥६॥

७८२. काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण । ऐसें तुम्ही सांगा संतजन । करा समाधान चित्त माझें ॥१॥ काय हें खंडईल कर्म । पारुषतील धर्माधर्म । कासयानें तें कळे वर्म । म्हणउनि श्रम वाटतसे ॥२॥ काय हें स्थिर राहील बुद्धी । कांहीं अरिष्ट न येल कीं मधीं । धरिलें जाईल सिद्धी । शेवट कधीं मज न कळे ॥३॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं । घालीन पाईं देवाचे मिठी । मज तो कुर्वाळील जगजेठी । दाटेन कंठी सद्गदित ॥४॥ काय हे निवतील डोळे । सुख तें देखूनि सोहळे । संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥ ५ ॥ ऐशी चिंता करी सदा सर्वकाळ । रात्रंदिवस हेंचि तळमळ । तुका म्हणे आपुलें बळ । जेणें फळ पावे निश्चयेसी ॥६॥

७८३. अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्य तारका । अगा जनार्दना जगव्यापका । अगा पाळका भक्तांचिया ॥१॥ अगा ये वसुदेव देवकीनंदना । अगा ये गोपिकारमणा । अगा बळिबंधा वामना । अगा निधाना गुणनिधी ॥२॥ अगा ये द्रौपदिबांधवा । अगा ये सखया पांडवा । अगा जीवाचीया जीवा । अगा माधवा मधुसूदना ॥३॥ अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरि गरुडध्वजा । अगा सुंदरा सहस्रभुजा । पार मी तुझा काय वर्णूं ॥४॥ अगा अंबऋषिपरंपरा । निरालंबा निर्विकारा । अगा गोवर्धन धरणीधरा । अगा माहेरा दीनाचिया ॥५॥ अगा धर्मराया धर्मशीळा । अगा कृपासिंधु कृपाळा । अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळा-प्रवीणा ॥६॥ अगा चतुरा सुजाणा । मधुरा गिरा सुलक्षणा । अगा उदारा असुरमर्दना । राखेशरणा तुकयाबंधु ॥७॥

७८४. तूंचि अनाथाचा दाता । दुःख मोहो नासावया चिंता । शरण आलों तुज आतां । तारि कृपावंता मायबापा ॥१॥ संतसंग देईं चरणसेवा । जेणें हा तुझा विसरू न पडावा । हाचि भाव माझिया जिवा । पुरवीं देवा

मनोरथ॥२॥सज भाव प्रेम देई प्रीति । गुण नाम वर्णावया स्तुति । विघ्नें सोडउनि हातीं । विनंति माझी परिसावी हे ॥ ३ ॥ आणिक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्यचाड धनें । सांकडें न पडे तुज जेणें । दुजें भक्तिवीण मायबाप॥ ४ ॥ जोडोनि कर पायीं ठेवितों माथा । तुका विनवी पंढरीनाथा । रंगि वोढवावीं रंगकथा । पुरवीं मनोरथा मायबापा ॥ ५ ॥

७८५. सेंदरीं हेंदरीं दैवतें । कोणतीं पूजी भूतें खेतें । आपुल्या पोटा जीं रडतें । मागतीं शितें अवदान ॥१॥ आपुल्या इच्छे आणिका पीडी । काय ते देईल बराडी । कळों ही आली तयाची जोडी । आल्प रोकडी बुद्धी अधिरा ॥२॥ दासीचा पाहुणेरु उखीतें । धणी देईल आपुले हातें । करुणा भाषण उचितें । हें तों रितें सतत शक्तिहीन ॥ ३ ॥ काय तें थिल्लरीचें पाणी । ओठ न भिजे न फिटे धणी । क्षीण तरि आर्दी अवसानीं । क्षोभें पुरश्चरणीं दिल्हें फळ ॥४॥ विलेंपनें बुझवितीं तोंड । भार खोळ वाहती उदंड । करिविती आपणया दंड । म्हणे त्याचें करा चिंतन । वंदूं चरण येती सकळ ॥६॥

७८६. विषयवोढी भुलले जीव । आतां याची कोण करील कीव । नुपजे नारायणीं भाव । पावोनि ठाव नरदेह ॥१॥ कोण सुख धरिलें संसारीं । पडोनि काळाचें आहारीं । माप या लागलें शरीरीं । झालियावरी सळे वोढिती ॥२ बापुडीं होतील शेवटीं । आयुष्यासवें झालिया तुटी । भोगिले मागें पुढेंहि कोटी । होईल भेटी जन्मासी ॥३॥ जुंतिली घाणा बांधोनि डोळे । मागें जोडी आर तेणही पोळे । चालिलों किती ते न कळे दुःखें आरंबळे भूकताहाने ॥४॥ येवढें जयाचे निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित । तें हें देह मानूनि अनित्य । न करिति नित्य नामस्मरण ॥५॥ तुका म्हणे न वेचतां मोल । तो हा यासि महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचे बोल । केव्हढे खोल अभागिया ॥६॥

७८७. आले हो संसारा तुम्ही येक करा । मुक्तिमार्ग हाळुचि धरा । काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा दचकेचिना ॥१॥ नाहीं त्या यमासी करुणा । बाहेरि काढितां कुडीं प्राणा । वोढाळ सांपडे जैसे धन्या ।

चोर यातना धरिजेती ॥२॥ नाहीं दिल्हें पाववील कैसा । चालतां पंथ तेणें वळसा । नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेति बंदी जैसा धरोनियां ॥३॥ क्षण येक नागिवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं । वोढितां काठवणा सोयी । अग्निस्तंभ बाहीं कवटाळविती ॥४॥ देखोन अंग कांपती । तये नदीमाजी चालविती । लागे ठाव ना न चले बुडविती । वरि मारिती यमदंड ॥५॥ तान्ह भूक न साहवे वेळ । तो राखती किती येक काळ । पिंड पाळोनि कैसा शीतळ । तो तप्तभूमि ज्वाळ लोळविती ॥६॥ म्हणवोनि करा कांहीं सायास । व्हावेल तरी व्हा रे उदास । करवेल तरी करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका म्हणे ॥७॥

७८८. न बोलसी तेंहि कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा । तुज मी नाहीं घालित गोवा । मीड केशवा कासयाची ॥१॥ उतरी आपुला हा भार । मजसी बोलोनि उत्तर । माझा तुज नव्हे अंगिकार । मग विचार करीन मी ॥२॥ दात्या आणि मागत्यासी । धर्मनीत तरी बोलिली ऐसी । यथानशक्ति ठाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ॥३॥ म्हणोनि करीतों मी आस । तुझिया वचनाची वास । धीर हा करोनि सायास । न टळे नेमास आपुलिया ॥४॥ तुझें म्यां घेतल्यावांचून । येथुनि न वजे वचन । हाचि माझा नेम सत्य जाण । आहे नाहीं म्हण तुका म्हणे ॥५॥

७८९. आतां मी न पडे सायासी । संसारदुःखाचिया पाशीं । शरण रिघेन संतासीं । ठाव पायांपासीं मागेन त्यां ॥१॥ न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधती पाय । आतां मज न विसंबे माय । मोकलोनि धाय विनवीतसें ॥२॥ बहुत जाचलों संसारें । मोहो माया जाळाच्या विखारें । त्रिगुण येतील लहरें । तेणें दुःखें थोर आक्रंदलों ॥३॥ आणिक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिती । न साहे पाषाण फुटती । भय कंप चित्तीं भरलासे ॥४॥ आतां मज न सहावे सर्वथा । संसारगंधीचिये वार्ता । झालों वेडा असोनि जाणता । पावे अनंता तुका म्हणे ॥५॥

७९०. आतां तुज कळेल तें करी । तारिसील तरि तारीं मारीं । जवळी अथवा दूरी धरी । घाली संसारीं अथवा नको ॥१॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणें । मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणे रंकाहूनी ॥२॥ मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरतीं । सकळ खुंटलिया युक्ती । शांति निवृत्ती जवळ नाहीं ॥३॥ सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव । आतां करी कळेल तो उपाव । तूंचि सर्व ठावो माझा देवा ॥४॥ राहिलों धरोनि विश्वास। आधार नेटीं तुझी कास । आणिक नेणें मी सायास । तुका म्हणे यास तुझें उचित ॥५॥

७९१. देवा तूं कृपाकरुणासिंधु । होसी मायबाप आमुचा बंधु । जीवनसिद्धी साधनसिंधु । तोडिसी भवबंधू काळपाश ॥१॥ शरणागता वज्रपंजर । अभयदाना तूं उदार । सकळ देवां तूं अगोचर । होसी अविकार अविनाश ॥२॥ भागली स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार । जाणावया तुझा विचार । नको अंतर देऊं आतां ॥३॥ नेणें भाव परि म्हणवीं तुझा । नेणें भक्ति करितों पुजा । आपुल्या नामाचिया काजा । तुज केशिराजा लागे धावणें ॥४॥ तुझिया बळें पंढरिनाथा । झालों निर्भय तुटली व्यथा । घातला भार तुझिया माथां । न भियें सर्वथा तुका म्हणे ॥५॥

७९२. कोण सुख धरोनि संसारी । राहों सांग मज वाहेरी । अवघ्या नाशिवंतापरी । थिता दुरी तूंहि अंतरसी ॥१॥ प्रथम केला गर्भी वास । काय तें सांगावे सायास । दुःख भोगिले नवहि मास । आलों जन्मास येथवरी ॥२॥ बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा । वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरे मागुता जन्मधरी ॥३॥ क्षण येक तो नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याऐसीं घेतल्या धावा । भोवंडिती पाठि लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझिया मीपणा ॥४॥ आतां पुरे ऐसी मरोवरी । रंक होउनी राहेन द्वारीं । तुझा दास मी दीन कामारी । तुका म्हणे करी कृपा आतां ॥५॥

७९३. सुख या संतसमागमें । नित्य दुणावें तुझिया नामें । दहन होतीं सकळ कर्मे । सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों ॥१॥ म्हणोनि नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमचा मातापिता । बहिणी बंधु आणि चुलता । आणिका गोता सर्वां ठाईं ॥२॥ ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर । असती देउनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळी ॥३॥ दुःख तें कैसें नये स्वप्नासीं । भुक्ति मुक्ति झाल्या कामारि दासी । त्यांचें वर्म तूं आम्हांपासी । सुखें राहिलासि प्रेमाचिया ॥४॥ जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आम्हा आनंदास । सेऊं ब्रह्मरस तुका म्हणे ॥५॥

७९४. न पवे संन्निध वाटते चिंता । वरि या बहुतांची सत्ता । जुगवे पडत जातो गुंता । कर्मा बळिवंता सांपडलों ॥१॥ बहु भार पाडिला शिरीं । मी हें माझें मजवरी । उवघ्या नागविलें चोरीं । घरिच्याघरीं जाणत जाणतां ॥२॥ तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां । झाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥३॥ अति हा निकट समय । मग म्यां करावें तें काय । दिवस गेलिया ठाकेल छाय । उरेल हाय रात्रकाळीं ॥४॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । बहु चिंता प्रवर्तली ॥५॥ ऐशिये संकटाचे संधी । धाव घालावी कृपानिधी । तुका म्हणे माझी बळबुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥ ६ ॥

७९५. देवा तूं आमुचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सल । माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळा चालविसी ॥१॥ तुज लागली सकळ चिंता । राखणे लागे वांकडें जातां । पुढति निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥२॥ आम्हा भय चिंता नाहीं धाक । जन्ममरण कांहीं येक । झाला इहलोकीं परलोक । आले सकळिक वैकुंठ ॥३॥ न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योती । आनंद लहरीची गती । वर्णू किती तया सुखा ॥४॥ तुझिया नामाचीं भूषणें । तींये मज लेवविलें लेणें । तुका म्हणे तुझिया गुणें । काय तें उणें आम्हां ॥५॥.

७९६. आतां धर्माधर्मी कांहीं उचित। माझें विचारावें हित। तुज मी ठाउका पतित। शरणांगत परि झालों ॥ १ ॥ येथें राया रंका येक सरी। नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं। पावलों पाय मलत्या परी। मग बाहेरी न घालावें ॥२॥ ऐसें हें चालत आलें मार्गें। नाहीं बोलत मी वाउगें। आपुलिया पडिल्या प्रसंगें। कीर्ति हे जगें वाखाणिजे ॥३॥ घालोनियां माथां बैसलों भार। सांडिला लौकिक वेव्हार। आधिं हे विचारिली थार। अविनाशपर पद ऐसें ॥४॥ येथें एक वर्म पाहिजे धीर। परि क्यां लेखिलें असार। देह हे नाशिवंत जाणार। धरिलें सार नाम तुझें ॥५॥ केली आराणूक सकळा हातीं। धरावें तें धरिलें चित्तीं। तुका म्हणे सांगितलें संतीं। देईं अंतीं ठाव मज देवा ॥६॥

७९७. बरवें झालें आलों या जन्मासी। जोड जोडली मनुष्यदेहा-ऐसी। महालाभची उत्तम राशी। जेणें सर्व सुखाशीं पात्र होईजे ॥१॥ दिल्हीं इंद्रियें हात पाय कान। डोळे मुख बोलावया वचन। जेणें तूं जोडशी नारायण। नासे जीवपण भवरोग ॥२॥ तिळेंतिळ पुण्य सांचा घडे। तरी हें बहुत जन्मीं जोडे। नाम तुझें वाचेसि आतुडे। समागम घडे संतांचा ॥ ३ ॥ ऐसिये पावविलों ठायीं। आतां मी काय होऊं उतराई। येवढा जीव ठेवीन पायीं। तूं वो माझे आई पांडुरंगे ॥४॥ फेडिला डोळियाचा कवळ। धूतला गुणदोषांचा मळ। लावूनि स्तनीं केलों शीतळ। निजविलें बाळ निजस्थानीं ॥ ५ ॥ नाहीं या आनंदासी जोडा। सांगतां गोष्टी लागती गोडा। आलासि आकारा आमुच्या चाडा। तुका म्हणे भिडा भक्तीचिया ॥६॥

७९८. अल्प भाव अल्प मति। अल्प आयुष्य नाहीं हातीं। अपराधाची वोळिलों मूर्ती। अहो वेदमूर्ति परियेसा ॥ १ ॥ किती दोषा देऊं परिहार। गुणदोषें माळिलें अंतर। आदि वर्तमान भविष्यकार। लागे अंतपार ऐसें वाहीं ॥ २ ॥ विविधकर्म चौऱ्यायशीं फेरा। त्रिविध भोग या शरीरा। कर्मकोठार पांजरा। जन्म जरा मरण सांठवण ॥३॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें। हे भिन्न भिन्न पंचभूतें। रचतें खचतें

संचतें । असार रितें फळकट ॥ ४ ॥ पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर । मिळतां काष्ठें लोटतां पुर । आदळीं दूर होतीं खळाळीं ॥ ५ ॥ म्हणोनि नासावें अज्ञान । इतुकें करी कृपादान । कृपाळू तूं जनार्दन । धरोनि चरण तुका विनवी ॥६॥

७९९. ऐशी हे गर्जेऊन वैखरी । केशवा मुकुंदा मुरारी । राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥१॥ जनार्दना जगज्जीवना । विराट-स्वरूपा वामना । महदादि मधूसूदना । भवबंधना तोडतिया ॥२॥ चक्रपाणी गदाधरा । असूरमर्दना वीर्यवरा । सकळ मुगुटमणी शूरा । अहो दातारा जगदानिया ॥३॥ मदनमूर्ती मनमोहना । गोपाळगोपिका-रमणा । नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥ ४ ॥ गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी सर्वजाणा । करोनि अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ॥५॥ कासयानें घडे याची सेवा । काय येक समर्पावें या देवा । वश्य तो नव्हे वांचूनि भावा । पाय वेगळे जीवा न करी तुका ॥६॥

८००. होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळलें नवसीं । जोडी ते नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥१॥ धरिलें जीवें न सोडी पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाविजेति ठाय । लाविली सोय संचितानें ॥२॥ मज तों पडली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली बरवें झालें ॥३॥ आतां हा सिद्धी पावो भाव । मध्यें चांचल्य न व्हावा जीव । ऐसी तुम्हा माकितसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥४॥ कळों येते आपुले बुद्धी । ऐसें तो न घडे कधीं । येवढे आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥५॥ कृपा या केली संतजनीं । माझी अलंकारिली वाणी । प्रीति हे लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥६॥

८०१. मज ते हासतील संत । जिहीं देखिलेती मूर्तीमंत । म्हणोनि उद्वेगलें चित्त । आहाच भक्त ऐसा दिसे ॥ १ ॥ ध्यानीं म्यां वर्णावेती कैसे । पुढें येकीं स्तुति केली असे । येथूनि जीव निघत नसे । ऐशीये

आशे लागलोंसे ॥ २ ॥ कासया पाडिला जी धडा । उगाचि वेडा आणि वांकडा । आम्हां लेंकरासी पीडा । एका मागें जोडा दुसऱ्याचा ॥३॥ सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरितों पाय । तूं तंव समचि सकळां माय । काय अन्याय येक माझा ॥४॥ नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेति नारायणा । वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावी ॥५॥ बहुत दिवस केला बोभाट । पाहतां श्रमलों वाट । तुका म्हणे विस्तारीलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥६॥

८०२. बरें झालें आजिवरी । नाहीं पडिलों मृत्यूचें आहारीं । वांचोनि आलों येथवरी । उरलें तें हरि तुम्हां समर्पण ॥१॥ दिल्हा या काळें अवकाश । नाहीं पावलों आयुष्या नाश । कार्या कारण उरलें शेष । गेलें तें भूस जाऊं परतें ॥२॥ बुडणें खोटें पावतां थंडी । स्वप्नीं झाली वोढा-ओढी । नासली जागृती घडी । साच जोडी शेवटीं गोड घास ॥३॥ तुम्हां पाचविली हाक । तेणें निरसला धाक । तुमचे मातें हें कवतुक । जे शरणागत लोक रक्षावे ॥४॥ रवीच्या नांवें निशीचा नाश । उदयो होतांचि प्रकाश । आतां कैचा आम्हां दोष । तूं जगदीश कैवारी ॥५॥ आतां जळो देह सुख दंभ मान । न करी तयाचें साधन । तूं जगदीश नारायण । आलों शरण तुका म्हणे ॥६॥

८०३. आतां माझा नेणों परतो भाव । विसावोनि ठाई ठेविला जीव । सकळ लाभाचा हा ठाव । ऐसा वाव झाला चित्ता ठायीं ॥१॥ मांडवल गांठीं तरी विश्वास । झालों तें झालों निश्चयें दास । न पाहें मागील ते वास । पुढती सोस सेवेचाचि ॥२॥ आहे तें निवेदिलें सर्व । माझा मोडियेला गर्व । अकाळीं काळ अवघें पर्व । झाला भरवसा कृपें लाभाचा ॥३॥ वेव्हारीं वेव्हार अनंत । नाहीं यावांचूनि जाणत । तरी हें समाधान चित्त । लाभहाणी नाहीं येत अंतरा ॥४॥ करोनि नातळों संसारा । अंगीं भिन्न राखिला पसारा । कळवळा तो जीवनीं खरा । बीजाचा थारा दूरि आघात ॥ ५ ॥ बहुमतापासोनि निराळा । होवोनि राहिलों सोंवळा । बैसला रूपाचा कळवळा । तुका म्हणे डोळा लेइलों तें ॥६॥

८०४. बरवें झालें लागलों कारणीं । तुमचे राहिलों चरणीं । फेडिन संतसंगती धणी । गर्जेईल गुणीं वैखरी ॥ १ ॥ न वंचे शरीर सेवेसी । काया वाचा आणि मनेंसी । झालों संताचि आंदणी दासी । केला येविशीं निर्धार ॥२॥ जीवनीं राखिला जिव्हाळा । झालों मी मजशीं निराळा । पंचभूतांचा पूतळा । सहज लीळा वर्ततसे ॥३॥ जयाचें जया होईल ठावें । लाहो या साधियेला भावें । ऐसें होतें राखियेलें जिवें । येथोनि देवें मोवंडोनी ॥४॥ आस निरसली ये खेपे । अवघे पंथ झाले सोपे । तुमचे दीनबंधु कृपे । दुसरे कांपे सत्ताधाकें ॥५॥ अकिलेपणें आनंदरूप । आतळों नये पुण्यपाप । सारोनि ठेविले संकल्प । तुका म्हणे आपेआप येकायेकीं ॥६॥

८०५. अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुण भक्ती । प्रगटे हृदयींची मूर्ती । भावशुद्धी जाणोनियां ॥१॥ बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळ कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळहि ॥२॥ जेथ कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास । सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥३॥ येती अंगा वसतील क्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें । आपणचि येती तयाचे गुणें । जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥४॥ नलगे सांडावा आश्रम । उपजलें कूळीचें धर्म । आणिक न करावा श्रम । येक पुरे नाम विठोबाचें ॥५॥ वेदपुरुष-नारायण । योगियांचें ब्रह्मशून्य । मुक्तात्मा परिपूर्ण । तुकया म्हणे सगुण भोळ्या आम्हां ॥६॥

८०६. श्रीअनंता मधुसूदना । पद्मनाभा नारायणा । जगव्यापका जनार्दना । आनंदघना अविनाशा ॥१॥ सकळदेवाधिदेवा । कृपाळु वा जी केशवा । महानंदा महानुभावा । सदाशिवा सहजरूपा ॥२॥ चक्रधरा विश्वंभरा । गरुडध्वजा करुणाकरा । सहस्रपादा सहस्रकरा । क्षीरसागरा शेषशयना ॥३॥ कमळनयना कमळापती । कामिनीमोहन मदनमूर्ती । भवतारका धरित्या क्षिती । वामनमूर्ती त्रिविक्रमा ॥४॥ अगा ये सगु-णाचे निर्गुणा । जगज्जनित्या जगजीवना । वसुदेवदेवकीनंदना । बाळ-

रांगणा बाळकृष्णा ॥५॥ तुका आला लोटांगणीं । मज ठाव द्यावा जी चरणीं । हेचि करितसें विनवणी भवबंधनीं सोडवावें ॥६॥

८०७. हेचि व्हावी माझी आस । जन्मोजन्मीं तुझा दास ॥१॥ पंढरिचा वारकरी । वारी चुकों नेदी हरि ॥२॥ संतसंग सर्वकाळ । अखंड प्रेमाचा सुकाळ ॥ ३ ॥ चंद्रभागे स्नान । तुका मागे हेंचि दान ॥ ४ ॥

८०८. माझा तव खुंटला उपाव । जेणें तुझे आतुडती पाव । करूं भक्ति तरी नाहीं भाव । नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥१॥ धर्म करूं तरी नाहीं चित्त । दान देऊं तरी नाहीं वित्त । नेणों पूजों ब्राम्हण अतीत । नाहीं भूतदया पोटा हातीं ॥२॥ नेणें गुरुदास्य संतसेवन । जप तप अनुष्ठान । नव्हे वैराग्य वनसेवन । नव्हे दमन इंद्रियांसीं ॥३॥ तीर्थें करूं तरी मन नये सवें । व्रत करूं तरी विधी नेणें स्वभावें । देव जरी आहे म्हणों मजसवें । तरी आपपरावें न वचे ॥४॥ म्हणोनि झालों शरणागत । तुझा दास मी अंकित । यासि नलगे संचित । झालों निश्चित तुका म्हणे ॥५॥

८०९. तरि म्यां आळवावें कोणा । कोण हे पुरवील वासना । तुजवांचूनी नारायणा । लावीं स्तना कृपावंते ॥१॥ आपुला न विचारी शिण । न धरी अंगसंगें भिन्न । अंगिकारिलें राखें दीन । देई जीवन आवडीचें ॥२॥ माझिया मनाची हे आस । नित्य सेवावा ब्रह्मरस । अखंड चरणींचा वास । पुरवी आस याचकाची ॥३॥ माझिया संचिताचा ठेवा । तेणें हे वाट दाविली देवा । येवढ्या आदराचा हेवा । मागे सेवादान आवडीचें ॥४॥ आळवीन करुणावचनीं । आणिक गोड नलगे मनीं । निद्रा जागृति आणि स्वप्नीं । धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥५॥ आतां भेट न भेटतां आहे । किंवा नाहीं ऐसें विचारोनि पाहे । लागला झरा अखंड आहे । तुका म्हणे साह्य केलें अंतरीं ॥६॥

८१०. हेंचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध । आणीक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥१॥ सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा गोळा । पदर लागों नेदी खळा । नाममंत्रमाळ विष्णुसहस्र

॥२॥ भोजना न द्यावें अन्न । जेणें चुके अनुपान । तरिच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्य भाव ॥३॥ नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नेदि वारा । बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥४॥ पासी तें येक द्यावें वरी । नवनीताची होईल परी । होईल घुसळिलें तें निवारी । सार भितरीं नाहीं तया ॥५॥ न्हाये अनुतापें पांघरे दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा । होशील अर्धी होतासी तैसा । तुका म्हणे दशा भोगी वैराग्य ॥६॥

८११. मागुता हाचि जन्म पावसी । भोगिलें सुखदुःख जाणसी । हें तों न घडे रे सायासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥१॥ लक्ष चौऱ्याशी न चुके फेरा । गर्भवास यातना थोरा । येऊनि पडसी संदेह पुरा । बोळसा थोर मायाजाळीं ॥२॥ पशु काय पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगिती । काय येके उपजतां मरती । बहिरीं अंध होती पांगुळ मुके ॥३॥ नरदेह निधान लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गती । देवची होईन म्हणती ते होती । तरि कां चित्तीं न धरावें ॥४॥ क्षण येक मन स्थिर करोनी । सावध होई डोळे उघडोनी । पाहे वेद बोलिले पुराणीं । तुका बिनवणी करितसे ॥५॥

८१२. उभा देखिला भीमातिरीं । कर मिरविले कटावरी । पाउलें तरी समचि साजरीं । नाम तरी अनंत अति गोड ॥१॥ शंखचक्रांकित भूषणें । जडितमेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपलें तेणें रवितेज ॥२॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ । दंत ओळि हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखराशी ॥३॥ कटी कटदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळां । मृगनाभी रेखिला टिळा । लवती डोळां विद्युलता ॥४॥ सुंदरपणाची साम्यता । काय वर्णू ते पावे आतां । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । धन्य ते माता प्रसवली ॥५॥

८१३. दास्य करी दासांचें । उणे न साहे तयांचें । वाढिलें ठाईंचें । माणें टाकोनि धांवे ॥१॥ ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीकर । सर्वस्वें उदार । भक्तालागीं प्रगटे ॥२॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी

भक्तांचे भूषण । नाहीं त्याचा शीण । सुख धरिलें लातेचें ॥३॥ सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगिकारी । सेवकाच्या शिरीं । धरोनि चाले पादुका ॥४॥ राखे दारवंटा बळीचा । सारथी झाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥५॥ भीडा न बोले पुंडलिकासी । उभा मर्यादा पाठीसी । तुका म्हणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥६॥

८१४. हरि तैसे हरिचे दास । नाहीं तया भय मोहो चिंता आस । होउनि राहती उदास । बळकट कास भक्तीची ॥१॥ धरूनि पाय त्यजिले जन । नलगे मान मृत्तिका धन । कंठीं नामामृत पान । नलगे अन्न ऐसें झालें ॥२॥ वात तरी उदंडचि पोटीं । धीर सिंधू ऐसे जगजेठी । कामक्रोधा न सुटे मिठी । गिऱ्हे तरी वेठीं राबविती ॥३॥ बळी तरी नागविती काळा । लीन तरी सकळांच्या तळा । उदार तरी देहासि सकळा । जाणोनि कळा सर्व नेणते ॥४॥ संसार तो तयांचा दास । मोक्ष तो पाहातसे वास । रिद्धीसिद्धी देशवटा त्रास । न सेविती यांस वैष्णवजन ॥ ५ ॥ जन्ममृत्युस्वप्नासारिखे । आप त्यां न दिसे पारिखें । तुका म्हणे अखंडित सुखें । वाणी वदे मुखें प्रेमामृताची ॥६॥

८१५. बहुत जाचलों संसारीं । वसे गर्भी मातेच्या उदरीं । लक्ष चौऱ्यायशी योनिद्वारीं । झालों भिकारी याचक ॥१॥ जिणें पराधीन आणिका हातें । दृढपाशीं बांधलों संचितें । प्रारब्ध क्रियमाण सांगातें । भोवंडी सत्तें आपुलीया ॥२॥ न भरे पोट नाहीं विसावा । नाहीं नेम येक ठाव गांवा । नाहीं सत्ता न फिरे ऐशी देवा । लाही जैंवा खापरी तडफडी ॥३॥ काळ बहुत गेले ऐशिया रितीं । आणिकही पुढें नेणों किती । खंडणा नाहीं पुनरावृत्ति । मज कल्पांतीं तरी वेगळे ॥४॥ ऐसें दुःख कोण हरील माझें । कोणा भार घालूं आपुलें ओझें । भवसिंधू तारक नाम तुझें । धांवसी काजें आडलिया ॥५॥ आतां धाव घाली नारायणा । मजकारणें रंका दीना । गुण न विचारी अवगुणा । तुका करुणा भाकितसे ॥६॥

८१६. जंव हे सकळ सिद्ध आहे। हात चालावया पाय। तंव तूं आपुलें स्वहित पाहे। तीर्थयात्रे जाय चुकों नको ॥१॥ जंव काळ असे दुरी ठेला। तंव तूं हरिगुण गाय वहिला। मनीं भाव धरोनि मला। न वचे त्याला चुकों नको ॥२॥ जोडोनि धन न घालीं माती। ब्रह्मवृंदें पूजनें यती। सत्य आचरण दया भूतीं। करीं सांगाती चुकूं नको ॥३॥ दशा यौवन बाणली अंगीं। पांगिला नव्हे विषयसंगीं। काम क्रोध लोभ मोह त्यागीं। राहें सत्संगीं चुकूं नको ॥४॥ मग तेथें न चले कांहीं। सत्ता संपदा राहील ठाईंच्या ठायीं। पुढें संचित जाईल ग्वाही। तुका म्हणे तेही यम आज्ञा ॥५॥

८१७. चांगलें नाम गोमटें रूप। निवती डोळे हरती ताप। विठ्ठल विठ्ठल हा जप। प्रगट स्वल्प अति सार ॥१॥ शस्त्र हें निर्वाणींचा बाण। निकट समयो अवसान। कोठें योजेल दश दान। खंडी नारायण दुःख चिंतने ॥२॥ सकळ श्रेष्ठांचें मत। पावे सिद्धी पावती अनंत। म्हणोनि व्हावें शरणागत। आहे उचित येवढेंची ॥३॥ म्हणोनि रुसलों संसारा। सर्प हा विखार पांढरा। तुजसी अंतरें रे दातारा। याचि दावेदारानिमित्त ॥४॥ येणें मज भोगविल्या खाणी। नसता छंद लाविला मनीं। भाजलों मीं माझे भ्रमणीं। झाली बोडणी विटंबणा ॥५॥ पावलों केलियाचा दंड। खाणी भोगिल्या याती उदंड। आतां केला पाहिजे खंड। तुका दंडवत घाली देवा ॥६॥

८१८. तुझिया पार नाहीं गुणा। माझी अल्पमती नारायणा। भवतारका जी सुजाणा। येक विज्ञापना पायांपासीं ॥१॥ काय जाणावें म्या दीनें। तुझिये भक्तीचीं लक्षणें। धड तें तोंड धुऊं नेणें। परि चिंतनें काळ सारीं ॥२॥ न लवीं आणिक कांहीं पिसें। माझिया मना वायां जाय ऐसें। चालवीं आपुल्या प्रकाशें। हातीं सरिसें धरोनियां ॥३॥ तुज ही समर्पिली काया। जिवेंभावें पंढरिराया। सांभाळी समविषम डाया। करीं छाया कृपेची ॥४॥ चतुर तरी चतुरां राव। जाणता तरी जीवींचा जीव। न्यून तो कोण येक ठाव। आरुष भाव परी माझा ॥५॥

होतें तें माझें मांडवल । पायापें निवेदिले बोल । आदरा ऐसें पाविजे मोल । तुका म्हणे साच फोल तूं जाणसी ॥६॥

८१९. कां हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार । अनंत पावविलीं उद्धार । नव्हेचि थार मज शेवटीं ॥१॥ पाप बळिवंत गाढें । तुजहि राहों शकतें पुढें । मागिल कांहीं राहिले वोढे । नवल कोडे देखियेलें ॥२॥ काय मानिती संतजन । तुमचें हीनत्व वचन । कीं वृद्ध झाला नारायण । न चले पण आधील तो ॥३॥ आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरिच्या घरीं । धरिले दुरी तेव्हां धरिले ॥४॥ नको चाळऊं अनंता । कासया होतोसि नेणता । काय तूं धरित नाहीं सत्ता । तुका म्हणे आतां होई प्रगट ॥५॥

८२०. तुळशीमाळा घालोनि कंठीं । उभा विटेवरी जगजेठी । अवलोकोनि पुंडलिका दृष्टी । असे भीमातटीं पंढरिये ॥१॥ भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी । रिद्धि सिद्धी वोळंगती द्वारीं । सुदर्शन घरटी करीं । काळ कांपे दुरी धाकें तया ॥ २ ॥ जगज्जननी असे वाम भागीं । भीमकी शोभली अर्धांगी । जैसी विद्युल्लता झळके मेघीं । दरुशने भंगी महादोष ॥ ३ ॥ सुखसागर परमानंदु । गोपि गोपाळां गोधनां छंदु । पक्षीश्वापदां जयाचा वेधू । बाहे गोविंदु पांवा छंदें ॥ ४ ॥ मुखमंडित चतुर्भुजा । मनमोहन गरुडध्वजा । तुका म्हणे स्वामी माझा । पावे भक्तकाजा लवलाहीं ॥ ५ ॥

८२१. हातींचें न संडावें देवें । शरण आलों जिवेंभावें । आपुलें ऐसें म्हणावें । करितों जिवें निंबलोण ॥१॥ बैसतां संतांचे संगती । कळों आले कमळापती । आपुलीं कोण्हींच नव्हतीं । निश्चय चित्तीं दृढ झाला ॥२॥ येती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड । कनिष्ठ रुचि ठेऊनि गोड । देखत नाड कळतसे ॥३॥ मरती मेलीं नेणों किती । हाचि लाभ तयांचे संगती । म्हणोनि येतो काकूळती । धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥४॥ सुखें निंदोत हे जन । न करीं तयासीं वचन । आदि पिता तूं नारायण । जोडीं चरण तुमचे ते ॥५॥ आपुले आपण न करूं

हित । करूं हे प्रमाण संचित । तरि मी नष्टचि पतीत । तुका म्हणे संत मज हासती ॥६॥

८२२. आतां येणें बळें पंढरीनाथ । जवळी राहिला तिष्ठत । पाहतां न कळे जयाचा अंत । तोचि हृदयांत घालूं आतां ॥१॥ विसरोनि आपला देहपण मावो । नामेंचि भुलविला पंढरिरावो । न विचारी याति कुळ ठावो । लागावया पावो संताचें ॥२॥ बरें वर्म आले आमुच्या हाता । हिंडावें धुंडावें न लगतां । होय अविनाश साहाकारी दाता । चतुर्भुज संतां परि धाकें ॥३॥ होय आवडी सान थोर । रूप सुंदर मनोहर । भक्तिप्रिय लोभापर । करी आदर याचकपणें ॥४॥ तें वर्म आलें आमुच्या हाता । म्हणोनि शरण रिघालों संता । तुका म्हणे पंढरिनाथा । न सोडीं आतां जिवेंभावें ॥५॥

८२३. ऐक पांडुरंगा येक मात । कांहीं बोलणें आहे येकांत । आम्हां जरी तारील संचित । तरि उचित काय तुझें ॥१॥ उसणें फेडितां धर्म तो कोण । काय तया मानवेल जन । काय गा मिरऊनि भूपण । वायां थोरपण जनामध्यें ॥२॥ अन्न जरी न मिळे तयासि देणें । आगांतुका पात्र उचित दानें । उपकार तरी धनमंत्रिपणें । जरी घेणं देणें नाहीं आशा ॥३॥ शूर तो तयासि बोलिजे जाणा । पाठीसीं घालोनि राखिजे दीना । पार पुण्य नाहीं त्या भूपणा । ऐक नारायणा वचन हें ॥४॥ आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसी तरिच सही । वचन आपुलें सिद्धि नेई । तुका म्हणे तई मज कळसी ॥५॥

८२४. चांगला तरी पूर्ण काम । गोड तरी याचेंचि नाम । दयाळ तरी अवघा धर्म । मला तरी दासां श्रम होऊं नेदी ॥१॥ उदार तरी लक्ष्मी ऐशी । झुंजार तरी कळिकाळासी । चतुर तरी गुणाची राशी । जाणता तयाशी तोचि येक ॥२॥ जुनाट तरी बहु काळा । नकळे जयाची लीळा । नेणता गोवळीं गोवळा । लाघवी आवळा भुलवणा ॥३॥ गांढ्या तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत । वोंगळ तरी कुब्जेसी रत । भ्याड अनंत बहु पापा ॥४॥ खेळ तो येणेंचि खेळावा

नट तो येणेंचि अवगावा । लपोनि जीवीं न कळे जीवा । धरितां देवा नातुडसी ॥५॥ उंच तरी बहुतचि उंच । नीच तरी बहुचि नीच । तुका म्हणे बोलिलों साच । नाहीं आहाच पूजा केली ॥६॥

८२५. काय आम्ही भक्ति करणें कैसी । काय येक वाहावें तुम्हांसी । अवघा गरोनि उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ॥१॥ कैसें करूं इंद्रियां बंधन । पुण्यपापाचें खंडण । काय व्रत करूं आचरण । काय तुजविण उरलें तें ॥२॥ काय डोळे झांकोनिया पाहों । मंत्र जप काय ध्यावो । कवणे ठायीं धरोनियां भावो । काय तो वावो तुजविण ॥३॥ काय हिंडों कवण दिशा । कवणे ठाईं पाव ठेऊं कैसा । काय तूं नव्हेसि न कळे ऐसा । काय मी कैसा पाहूं आतां ॥४॥ तुझिया नामाची सकळ। पूजा अर्चन मंत्र माळ । धूप दीप नैवेद्य फळ तांबूल । देऊं पुष्पांजुळी तुका म्हणे ॥५॥

८२६. शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥१॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोसुलें । शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधिलें परब्रह्म ॥२॥ शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाश जाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥३॥ शरीर सकळहि शुद्ध । शरीर निधीचाहि निध । शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यमार्गीं देव शरीरा ॥४॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणाचा रांधा । शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुधा एक शरीरीं ॥५॥ शरीरदुःख नेदावा भोग । न द्यावें सुख न करी त्याग । शरीर वोखटे ना चांग । तुका म्हणे वेग करी हरिभजनीं ॥६॥

८२७. इतुलें करीं भलत्या परी । परद्रव्य परनारी । सांडोनि अभिलाष अंतरीं । वर्ते धेव्हारीं सुखरूप ॥ १ ॥ न करीं दंभाचा सायास । शांति राहे बहू वस । जिव्हे सेवी सुगंध रस । न करीं आळस रामनामीं ॥२॥ जनमित्र होईं सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा दुर्जनांचा । करीं संतांचा सायास ॥३॥ करिसी देवाविण आस । अवघि

होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखा न पावसी ॥४॥ भरोनि विश्वास करी धीर । करितां देव हाची निर्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका म्हणे ॥ ५ ॥

८२८. संसारसिंधु हा दुस्तर । नुलंघवे उल्लंघितां पार । बहुता वाहाविलें दूर । न लगेचि तीर पैलथडी ॥१॥ किती जन्म झाला फेरा । गणित नाहीं जी दातारा । पडिलों अवर्तीं भोंवरा । बहुता थोरा बोळसिया ॥२॥ वाढलों परि नेणती बुद्धी । नाहीं परतली धरिली शुद्धी । मग म्यां विचारावें कधीं । ऐसी संधी सांडोनियां ॥३॥ अनेक खाणी आहार निद्रा । भय मैथुनाचा थारा । बालत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ॥४॥ ऐशी उल्लंघोनि आलों स्थळें । बहु या भोंवंडिलों काळें । आतां हें उगवावें जाळें । उजेडावें बळें दिवसाच्या ॥५॥ सांडोनियां संसाराची वाट । बहु येणें भोगविले कष्ट । दावी सत्या ऐसे नष्ट । तुका म्हणे भ्रष्ट झालों देवद्रोही ॥६॥

८२९. विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठल पंढरिनिवासी । विठ्ठल पुंडलिकापासीं । कृपादानासी उदार ॥१॥ विठ्ठल स्मरणा कोंवळा । विठ्ठल गौरवी आगळा । आधार ब्रह्मांडा सकळा । विठ्ठल लीलाविग्रही ॥२॥ उभाचि परि न मनीं शीण । नाहीं उद्धरिता भिन्न । समर्थाचे घरीं येक अन्न । आर्तभूतां क्षणक्षणा सांभाळी ॥३॥ रुचीचे प्रकार आणिती आदर । कोठेंहि न पडे अंतर । थोरासहि थोर । धाकुट्या धाकुटा ॥ ४ ॥ करितां बळ धरितां नये । झोंबतां डोळे भरेंच होय । आपुल्या उद्देशाची सोय । जाणे हृदयनिवासी ॥५॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तो नाहीं भरिल्या रीतें । करितों सेवन आयितें । तुका चित्तें चित्त मेळउनी ॥६॥

८३०. ताप हें हरण श्रीमुख । हरि भवरोगा ऐसें दुःख । अवलोकितां उपजे सुख । उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥१॥ न पुरे डोळियांची धणी । सखोल कृपेचीच खाणी । स्तवितां न पुरे वेदवाणी । तो हा समचरणी कृपानिधी ॥२॥ रामकृष्ण ध्यान वामन नारसिंव्ही । उग्र आणि सौम्य कांहींची नाहीं । सांपडे भरलिये वाही । भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ॥३॥

गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण । व्यापक तरी त्रिभुवन । मनमोहन लावण्य हें ॥४॥ ठाण हें साजिरें सुंदर । अविनाश अविकार । अनंत आणि अपरंपार । तो हा कटिं कर धरताहे ॥५॥ जयाची वाणी सुमनमाळा । परमामृतजिव्हाळा । अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरणसेवक ॥६॥

८३१. एक मागणें हृषिकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करी ॥१॥ नको दुजी बुद्धी आणिक । रिद्धी सिद्धी परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसीं ॥२॥ मना येईल तो जन्म देई । मलते कुळीं भलते ठाईं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदईहुनी तुवां नवजावें ॥३॥ इतुलें करी भलत्या परी । भलत्या भावें तुझ्या द्वारीं । राहेन दास होउनि कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥४॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ॥५॥

८३२. कैं देखतां होईन डोळीं । सकळां भूतीं मूर्ती सांवळी । जीवा नांव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥१॥ ऐशी कृपा करिल नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडी देईन । होईल स्नान अनुतापीं ॥२॥ ऐसा कई येईन दैवास । दृश्य नासोन जाईल आस । सदा संतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष धरणीवरी ॥३॥ कैं नवसा येती अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वीतळ सागर । वाहतील पूर आनंदाचे ॥४॥ प्रसन्न दया क्षमा शांती । कैं नवविधा होईल भक्ती । भोगीन वैराग्य संपत्ती । मनोरथ कळती तैं पुरले ॥५॥ तुकयाबंधु म्हणे सांग । नव्हे तुजविण निरसेना पांग । म्हणोनि घातले साष्टांग । पांडुरंगावरी चरणा ॥६॥

८३३. तूं बळिया शिरोमणी । आहेसि माजिये त्रिभुवनीं । रिघालों पाठी तुझी म्हणोनी । आतां करी मनीं असेल तें ॥१॥ कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवाची बंदिशाळ । संव्हारोनि राक्षसदळ । शरणागत राज्यीं स्थापिला ॥२॥ उपक्रम करावा बहुत । तरि तूं जाणसी धर्मनीत ।

उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥३॥ तूं देवा प्रताप दिनकर । सुरा असुरांचा शूर । महावीरा वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ॥४॥ किती म्यां काय विनवावें । शरण आलों जिवें मावें । तुकयाबंधु म्हणे करावें । क्षेम आवघें येणें काळें ॥५॥

८३४. देवा मी चांडाळ चांडाळ । म्हणतां लागताहे वेळ । नसे पाहतां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥१॥ जन्मा उपजलिया पासुनी । असत्य कर्म तें आझुनि । सत्य आचरणा नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥२॥ भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहे वारता । अखंड विषयाची व्यथा । अधम पुरता अधमाहुनी ॥३॥ काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मदमत्सर । याचें तरी माहेरघर । परउपकार वैरी तैसा ॥४॥ निंदा द्वेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये ते केले संत उपहास । अभक्ष भक्ष तेंहि भक्षिलें ॥५॥ पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलों नये ऐसें घडलें अन्योन्यवीण । दासीगमन आदिकरोनि ॥६॥ कायामनें वाचा इंद्रियासी । सकळ पापांचीच राशी । तुकयाबंधु म्हणे ऐशियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ॥७॥

८३५. काय काय करितों या मना । परि नायके नारायणा । करूं नये त्याची करी विवंचना । नेऊं पतना आदरिलें ॥१॥ भलतिया सवें धावें सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारि कांहीं कुडें कपट । घात बळकट मांडियेला ॥२॥ न पुरति भ्रमणा दाही दिशा । सहाही पाताळें आकाशा । घाली उडी बळेंचि देखोनि फांसा । केलों या दोषा पाहुणा ॥३॥ चेतऊनि इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुरावली शुद्धी बुद्धी केली राळ । ऐसें करावें यासी ॥४॥ बहु जाचिलों केलों कासाविसी । तुकयाबंधु म्हणे ऋषिकेशी । धांव मजसी ऐसी परि झाली ॥५॥

---

आरत्या प्रारंभ

८३६. जगदीश जगदीश तुज म्हणती । परि या जनांमाजी असशील युक्ती । पुण्यपापविरहित सकळाधिपती । द्रष्टा परि नळिणी अलिप्तगती

॥१॥ जयदेव जयदेव पंढरिनाथा । श्रीपंढरीनाथा । तुरे पाप विठल म्हणतां सर्वथा ॥२॥ आगम निगम तूज नेणती कोणी । परि तूं भाव भक्ती जवळीच दोन्ही । नेणता विधियुक्त ईश्वरातें पूजनी । न माये ब्रह्मांडीं तो संपुष्टशयनीं ॥३॥ असुरां काळ भासे त्रिकाळ पुढें । पसरी मुख येक चावितो धुडें । भक्त शरणागता चालतो पूढें । दावी वाट जाऊं नेदी वांकुडे ॥४॥ येकायेकीं बहू विस्तरला सुखें । खेळे त्याची लीळा तोचि कवतुकें । तेथें नरनारी कवण बाळकें । काय पापपुण्य कवण सुख-दुःखें ॥५॥ सकळा वर्म तूंचि जाणसी येक । बंध मोक्ष प्राप्त आणिक सुखदुःख । जाणों म्हणतां तुज ठकलीं बहुतेक । तुका म्हणे शरण आलों मज राख ॥६॥

८३७. दैत्यभारें पिडिली पृथीवी बाळा । म्हणोनि तूज येणें जाले गोपाळा । भक्तप्रतिपाळक उत्सावो सोहळा । मंगळ तूज गाती अबला बाळा ॥१॥ जयदेव जयदेव जय गरुडध्वजा । आरती वोवाळूं तुज भक्ती-काजा ॥२॥ गूण रूप नाम नाहीं जयाशी । चिंतितांची तैसा होशी तयाशी । मच्छ कूर्म वराह नृसिंह झालासी । असुरां काळ मुनी ठाके ध्यानासी ॥३॥ सहस्र रूपें नाम सांवळा ना गोरा । श्रुती नेती म्हणती तुज विश्वंभरा । जिवना जीवन तूंचि होसी दातारा । न कळे पार ब्रह्मा-दिकां सुरवरा ॥४॥ संतां महंतां घरीं म्हणवी म्हणियारा । शंख चक्र गदा आयुधांचा मारा । सुदर्शन घरटी फिरे अवसरा । सुकुमार ना स्थूळ होसी गोजीरा ॥५॥ भावेंवीण तूझें न घडे पूजन । सकळहि गंगा झाल्या तूजपासून । उत्पत्ति प्रळय तुंचि करिसी पाळण । धरोनि राहिला तुका निश्चयीं चरण ॥६॥

८३८. काय तुझा महिमा वर्णूं मी किती । नाममात्रें भवपाश तूटती । पाहातां पाऊलें हीं विष्णुमूर्ती । कोटीकुळांसहित जडजीव उद्धरती ॥१॥ जयदेव जयदेव जय पंढरीराया श्रीपंढरीराया । करोनियां कुरवंडी सांडीन काया । जयदेवजयदेव ॥२॥ मंगळआरतीचा थोर महिमा । आणिक द्यावया नाहीं उपमा । श्रीमुखासहित देखे जो कर्मा–। पासुनि सुटे जसा

रवी नाशी तमा ॥३॥ धन्य व्रतकाळ हे येकादशी । जागरण उपवास घडे जयासी । विष्णूचें पूजन येका मावेंसी । नित्य मुक्त पूज्य तीहीं लोकांसीं ॥४॥ न वजे वाया काळ जे तूज ध्याती । अखंड तुझा वास तयांच्या चित्तीं । धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती । तीर्थें मळिण वास तयाचा पाहती ॥५॥ देव भक्त तूंचि झालासी दोन्ही । वाढावया सूख भक्ति हे जनीं । जडजीवा उद्धार व्हाया लागूनी । शरण तुका वंदी पाऊलें दोन्ही ॥६॥

८३९. कंसरायें गर्भ वधियेले सात । म्हणउनि गोकूळासी आले अनंत । घ्यावया अवतार हेंची निमित्य । असुर संव्हारोनि तारावे भक्त ॥१॥ जयदेव जयदेव जय विश्वरूपा । वोवाळिन तुज देहदीपें बापा । जयदेव जयदेव ॥२॥ स्थूळ रूपें होउनि धरितसे सानें । जैसा भाव तया तैसा कारणें । दैत्यासि मासला सिंव्ह गजानें । काळासी महाकाळ यशोदेसि तान्हे ॥३॥ अनंत वर्णीं कोण न कळेची पार । सगुण कीं निर्गुण हाहि निर्धार । पांगलीं साही अठरा करितां वेव्हार । तो वळितसे गवळीयांचें खिल्लार ॥४॥ तेतिसकोटी तीहीं देवासी श्रेष्ठ । पाउलें पाताळीं स्वर्गी मुगूट । गिळिलीं चवदा भुवनें तरि न भरे पोट । तो खाऊनी धाला गोपाळाचें उच्छिष्ट ॥५॥ महिमा वर्णूं तरि पांगलिया श्रुती । राखे शरण तुकयाबंधु करि विनंति ॥६॥

८४०. परमानंदा परमपुरुषोत्तम रामा । अच्युता अनंता हरि मेघशामा । अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळापति न कळे महिमा ॥१॥ जयदेव जयदेव जय जय श्रीपती । मंगळशुभदायका करिन आरती । जयदेव जयदेव ॥२॥ गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरिधर-कर भवसागर तारक दधिमथना । मधुसूदन मुनिजीवन धरणिश्रमहरणा । दीनवत्सल सकळा मुळ जय जय नीधाना ॥३॥ विश्वंभर सर्वेश्वर जग-दोद्धारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा । सुखसागर गुणआगर मुकुटमणि शूरा । कल्याण कैवल्यमूर्ति मनोहरा ॥४॥ गरुडासना शेष-शयना नरहरी । नारायण ध्यानीं सुरवरहरगौरी । नंदा नंदनवंदन त्रिभु-वन भीतरीं । अनंत नामीं ठसा अवतारांवरी ॥५॥ सगुण निर्गुण साक्ष

श्रीमंता संता । भगवान भगवंता काळ कृतांता । उत्पत्तिपाळणपासुनि संव्हारण सत्ता । शरण तुकयाबंधु तारीं रिती बहुतां ॥६॥

८४१. पंढरि पुण्यभूमि भिमा दक्षिण वाहिनी । तीर्थ हे चंद्रभागा महापातक धूणी । उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥ १ ॥ जयदेवा पांडुरंगा जय अनाथनाथा । आरती वोवाळिन तुम्हां लक्ष्मीकांता । जयदेव जयदेव ॥२॥ नित्य नवा सोहळा हो महावाद्यांचा गजर । सन्मुख गरुडपारीं उभा जोडोनि कर । मंडित चतुर्भूजा कटिं मिरविति कर ॥३॥ हरिनामकीर्तनें हो आनंद महाद्वारीं । नाचति प्रेमसुखें नर तेथिंच्या नारी । जीवन्मुक्त लोक नित पाहती हरी ॥४॥ आषाढी कार्तीकी हो गरुडटक्याचे भार । गर्जति नामघोषें महावैष्णववीर । पापासि रिग नाहीं । असुर कांपति शूर ॥५॥ हें सुख पुंडलिकें कैसें आणिलें बापें । निर्गुण साकारलें आम्हांलागि हें सोपें । म्हणोनि चरण धरोनि तुका राहिला सुखें ॥६॥

८४२. अवतार गोकुळीं हो । जन तारावयासी । लावण्यरूपडें हो । तेजःपुंजाळरासी । उगवतां कोटि बिंबें । रवि लोपले शशी । उत्साव सुरवरां । महि थोर मानसीं ॥१॥ जय देवा कृष्णनाथा । जय रखुमायिकांता । आरति वोवाळीन । तुम्हां देवकीसुता । ज० ॥१॥ वसुदेव देवकीची । बंद फोडिली शाळा । होउनि विश्वजनिता तया पोटींचा बाळ । दैत्य हे त्रासियेले । समूळ कंसासी काळ । राज्य या उग्रसेना । केला मथुरापाळ ॥३॥ राखतां गोधनें हो । इंद्र कोपला भारी । मेघ जो कडाडीला । शिळा वर्षतां धारी । राखिलें गोकुळ हें । नखिं धरिला गिरी । निर्भय लोकपाळ । अवतरले हरि ॥४॥ कवतुक पाहावया । माव ब्रह्मयानें केली । वत्सेंही चोरोनियां । सत्य लोकांसी नेलीं । गोपाळ गाई वत्सें । दोहिं ठायीं राखिलीं । सुखाचा प्रेमसिंधू । अनाथाची माऊली ॥५॥ तारिले भक्तजन । दैत्यां निर्दाळुनी । पांडवां साहाकारी । आडलिया निरवाणी । गुण मी काय वर्णूं । मति येवढी वाणी । विनवितो दास तुका । ठाव मागे चरणीं ॥६॥

८४३. सुंदर अंगकांती मुखं माळ सुरेख । बाणलि उटी अंगीं टिळा

साजिरा रेख । मस्तकिं मुगूट कानीं कुंडल तेज फाके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ॥१॥ जय देवा चतुर्भुजा जय लावण्य तेजा । आरती वोवाळिन भवतारी हा वोजा ॥जय० ॥२॥ उदार जुंझार हा जया वाणिती श्रुती । परतल्या नेति म्हणति तयां न कळे गती । भाट हे चतुर्मुखें अनुवाद करिती । पांगिलि साही अठरा रूप न कळे गती ॥३॥ ऐकोनि रूप ऐसें तुज लागिं धुंडिती । बोडके नग्न येके निरहार ती । साधनें योग नाना तपें दारुणें किती । सांडिलें सुख दिल्हें संसाराचि शांती ॥४॥ मरोनि माजि लोकां तिहि नांदसी येक । कामिनिमन-मोहना रूपनाम अनेक । नाशति नाममात्रें भवपातक शोक । पाउलें वंदिताति सिद्ध आणि साधक ॥५॥ उपमा द्यावयासि दुजें काय हें तूज । सत्त्वासी तत्त्वसार तूं मुळ झालासि बीज । खेळसि बाळलीळा अवतार सहज । विनवितों दास तुका कर जोडुनि तूज ॥६॥

८४४. सकुमार मुखकमल निजसार निर्मळ । सावळि सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ । झळकति दिव्य तेजें दंत माजि पातळ । मिरवलिं मयूर-पत्रें मुगुट कुंडलें माळ ॥१॥ जय देवा जगदीश्वरा धन्य रखुमाइवरा । आरती करीन काया वोवाळिन सुंदरा । जयदेवा० ॥२॥ गोजिरें ठाणमाण भुजा मंडित च्यारी । शोभति शंखचक्रगदापद्म मोहरी । हृदईं ब्रह्मपद बाणलें शृंगारीं । गर्जति चरणीं वांकीं कंठ कोकिळस्वरी ॥३॥ घवघवित उटी अंगीं बावन चंदनाची । ललाटीं कस्तुरिचा कास पीतां-बराची । कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोतियांची । सुंगित सकळ मुद्रा पाउलें कुंकूमाचीं ॥४॥ सौभाग्यसुखसागर गुणलावण्य खाणी । लाघवी दिनवत्सल विश्व लाविलें ध्यानीं । आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनी । धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥५॥ वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेती । रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती । उदार सुर गंभीर पूर्ण आनंदमूर्ती । तुकयाबंधु म्हणे स्तऊं मी काय किती ॥६॥

८४५. महा जी महादेवा महाकाळमर्दना । मांडिलें उग्र तप महादीप्त

दारुणा । परिधान व्याघ्रांबर चिताभस्मलेपना । स्मशान क्रीडास्थळ तुम्हां जी त्रिनयना ॥१॥ जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा । आरती ओवाळिन कैवल्यदातारा ॥धृ०॥२॥ रुद्र हें नाम तुम्हां उग्र संहारासी । शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं । उदक बेलपत्र टाळीं वाहिल्या देसी । आपुलें पद दासां ठाव देई कैलासीं ॥३॥ त्रैलोक्य व्यापका हो जन वन विजन । विराटस्वरूप हें तुझें साजिरें ध्यान । करितो वेद स्तुति कीर्ति मुखें आपण । जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥४॥ बोलतां नाम-महिमा असे आश्चर्य जगीं । उपदेश केल्यानंतरे पापें पळती वेगीं । हरहरवाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं । राहिली दृष्टि चरणीं रंग मीनला रंगीं ॥५॥ पुजिलें लिंग उमा तुका जोडोनि हात । करितो विज्ञापना परिसावी हे मात । अखंड राहूं द्यावें माझें चरणीं चित्त । घातलें साष्टांग माझे मस्तकीं हात ॥६॥

८४६. कनकाचे परियेळीं उजळोनि आरती । रत्नदीपप्रभा कैशा पाजळल्या ज्योती ॥१॥ वोवाळुं गे माये सबाह्य साजिरा । राहिरखु-माबाई सत्यभामेच्या वरा ॥२॥ मंडित चतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें । श्रीमुखाची शोभा प्रभा तेज फाकलें ॥३॥ वैजयंती माळा गळां शोभे श्रीमंत । शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत ॥४॥ सावळा सकुमार जैसा कर्दळीगाभा । चरणींचीं नेपुरें वाकी गर्जती नभा ॥५॥ वोवाळितां मन उभें ठाकलें ठायीं । समदृष्टी समाधी तुकया लागला पायीं ॥६॥

८४७. धन्य दिवस आजी दर्शन संतांचें । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥१॥ धन्य पुण्यरूप कैसा झाला सौंसारु । देव आणि भक्त दुजा नाहीं विचारु ॥२॥ धन्य पूर्वपुण्य वोढवलें निरुतें । संतांचें दर्शन झालें भाग्यें बहुतें ॥३॥ तुका म्हणे धन्य आम्हां जोडिली जोडी । संतांचे चरण आतां जीवें न सोडीं ॥४॥

८४८. मागणें तें येक तुजप्रति आहे । देसी तरी पाहे पांडुरंगा ॥१॥ या संतासी निरवीं हेंचि मज देयीं । आणिक दूजें कांहीं न मागें तुज ॥२॥ तुका म्हणे आतां उदार तूं होईं । मज ठेवीं पाईं संतांचिया ॥३॥

८४९. गाऊं नाचूं विठो तुझा करूं अनुवाद । जिकडे पाहे तिकडे सर्वमय गोविंद ॥१॥ आनंद रे विठोबा झाला माझें मनीं । देखिलीं लोचनीं विटेसहित पाउलें ॥२॥ न करि तपसाधनें मुक्तीचे सायास । हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस ॥३॥ तुका म्हणे आम्हां प्रेमा उणें तें कायी । पंढरीचा राणा सांठविला हृदयीं ॥४॥

८५०. धाकुट्याचे मुखीं घास घाली माता । वरी करी सत्ता शहाणिया ॥१॥ ऐसे जाणपणें पडिलें अंतर । वाढे तों तों थोर अंतराये ॥२॥ दोनी उभयतां आपणचि व्यालीं । आवडिची चाली भिन्नाभिन्न ॥३॥ तुका म्हणे अंगापासूनि निराळे । निवडिले बळें रडते स्तनीं ॥४॥

८५१. देवाचे म्हणोनि देवीं अनादर । हें मोठें आश्चिर्य वाटतसे ॥१॥ आतां येरां जनां म्हणावें तें कायी । जया भार डोईं संसाराचा ॥२॥ त्यजोनी संसार अभिमान सांठा । जुलूम हा मोठा दिसतसे ॥३॥ तुका म्हणे आळस करोनियां साह्ये । बळें कैसें पाहे वायां जाती ॥४॥

८५२. उपदेश तो भलत्या हातीं । झाला चित्तीं धरावा ॥१॥ नये जाऊं पात्रावरि । कवठिसार नारळि ॥२॥ स्त्री पुत्र बंदिजन । नारायण स्मरविति ॥३॥ तुका म्हणे रत्नसार । परि आधार चिंधीचा ॥४॥

८५३. संतांचे गुणदोष आणितां या मना । केलीया उगाणा सुकृताचा ॥१॥ पिळुनियां पाहे पुष्पाचा परिमळ । चिरोनि केळि केळ गाढव तो ॥२॥ तुका म्हणे गंगे अग्नीसी विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावे ॥३॥

८५४. चुंबळिचा करी चुंबळीसी संग । अंगीं वसे रंग क्रियाहिन ॥१॥ बीजा ऐसें फळ दावी परिपाकीं । परिमळ लौकिकीं जाती ऐसा ॥२॥ माकडाचे गळां रत्न कुळांगना । सांडोनियां सुना बिदी धुंडी ॥३॥ तुका म्हणे ऐसा व्याली ते गाढवी । फजिती ते व्हावी आहे पुढें ॥४॥

८५५. न देखोनि कांहीं । म्यां पाहिलें सकळही ॥१॥ झालों अवधियांपरी । मी हें माझें ठेलों दुरी ॥२॥ न घेतां घेतले । हाते पाये उसंतिले ॥३॥ खादले न खातां । रसना रस झाली घेतां ॥४॥ न

बोलोनि बोले । केले प्रगट झांकिलें ॥५॥ नायकिलें कानीं । तुका म्हणे आलें मनीं ॥६॥

८५६. सांपडला संदीं । मग बळिया पडे बंदीं ॥१॥ ऐसी कोण्ही वाहे वेळ । हातीं काळाच्या सकळ ॥२॥ दाता मागे दान । जाये याचका शरण ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणा । काय सांगों नारायणा ॥ ४ ॥

८५७. सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥१॥ आला डोळ्यासि कवळ । तेणें मळलें उजळ ॥२॥ आंगाचे मोवंडी । मोय झाड फिरे धोंडी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाड । पाप ठाके हिता आड ॥ ४ ॥

८५८. काखे कडासन आड पडे । खडबड खडबड हुसकलें ॥१॥ दाद करा दाद करा । फजितखोरा लाज नाहीं ॥२॥ अवघा झाला राम राम । कोण्ही कर्म आचरेना ॥३॥ हरिदासाच्या पडती पायां । म्हणती तया नागवावें ॥ ४ ॥ दोहीं ठायीं फजित झाले । पारणें केलें अवकळा ॥ ५ ॥ तुका म्हणे नाश केला । विटंबिला वेष जेणें ॥ ६ ॥

८५९. कुटुंबाचा केला त्याग । नाहीं राग जंव गेला ॥१॥ भजन तें वोंगळवाणें । नरका जाणें चुकेना ॥२॥ अक्षराचि केलि अटी । तरि पोटीं संतनिंदा ॥३॥ तुका म्हणे मागें पाय । तया जाय स्थळासी ॥४॥

८६०. तारतिम वरी तोंडाच पुरतें । अंतरा हें येतें अंतरींचें ॥१॥ ऐसि काय बरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकीं सत्य ऐसें ॥२॥ भोजनांत द्यावें विष कालउनी । मोह चाळवणीं मारावया ॥३॥ तुका म्हणे भैंद देखों नेदी कुडें । आदरेंचि पुढें सोंग दावी ॥ ४ ॥

८६१. ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवानांवें मोडी ॥ १ ॥ तया घडली गुरुहत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥२॥ सांगितलें कानीं । रूप आपुलेचि वाखाणी ॥३॥ भूताच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेलें चोरें ॥४॥ शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥५॥ निंदास्तुति स्तवनीं । तुका म्हणे वेंची वाणी ॥६॥

८६२. पुंडलिकाचे निकट सेवे । कैसा धांवे बराडी ॥१॥ आपुलें तें

थोरपण । नारायण विसरला ॥२॥ उभा कटीं ठेउनि कर । न म्हणे पर बैससें ॥ ३ ॥ तुका म्हणे जगदीशा । करणें आशा भक्तांची ॥ ४ ॥

८६३. इहलोकींचा हा देह । देव इच्छिताति पाहें ॥१॥ धन्य आम्ही जन्मा आलों । दास विठोबाचे झालों ॥ २ ॥ आयुष्याच्या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥३॥ तुका म्हणे पावठणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥ ४ ॥

८६४. पंडित वाचक जरि झाला पुरता । तरि कृष्णकथा ऐके भावें ॥१॥ क्षीर तुपा साकरे झालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥२॥ जाणोनियां लाभ घेई हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा ॥३॥ जाणिवेचें मूळ उपडोनी खोड । जरि तुज चाड आहे तुझी ॥४॥ नाना परिमळद्रव्य उपचार । अंगीं उटी सार चंदनाची ॥ ५ ॥ जेवियेल्यावीण शून्य ते श्रृंगारी । तैसी गोडी हरिकथेविण ॥६॥ ज्या कारणें वेदश्रुति हीं पुराणें । तेंचि विठ्ठलनाणें तिष्ठे कथे ॥७॥ तुका म्हणे येरे दगडाची पेवें । खळखळेचि आघवें मूळ तेथें ॥८॥

८६५ आणिकांच्या कापती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥१॥ करिती बेटे उसणवारी । यमपुरी भोगावया ॥२॥ सेंदुराचे दैवत केलें । नवस बोले तयासी ॥३॥ तुका म्हणे नाचती पोरें । खोडितां येरें आंग दुखे ॥४॥

८६६ गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोणें चराचरीं त्याग केला ॥१॥ गायित्री स्वमुखें भक्षीतसे मळ । मिळाल्या वोहळ गंगावोघ ॥२॥ कागाचिये विष्टे जन्म पिंपळासी । पांडव कुळासी पाहतां दोष ॥३॥ शकुंतळा सूत कर्ण श्रृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसी ॥४॥ गणिका अजामेळ कुब्जा तो विदूर । पाहेपां विचार पिंगलेचा ॥५॥ वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥६॥ न व्हावीं तीं कर्में झालीं नरनारी । अनुतापें हरि स्मरतां मुक्त ॥७॥ तुका म्हणे पूर्व नाठवी श्रीहरि । मूळ जो उच्चारी नरक त्यासी ॥ ८ ॥

८६७ सोनियाचें ताट क्षीरीनें भरीलें । भक्षावया दिल्हें श्वानालागीं ॥१॥ मुक्ताफळ हार खरासी घातला । कस्तुरी सूकराला चोजविली ॥२॥

वेदपारायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खुण काय जाणे ॥३॥ तुका म्हणे ज्याचें तोचि येक जाणे । भक्तिचें महिमान साधु जाणे ॥४॥

८६८ ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥१॥ संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥२॥ आचार करितां म्हणती हा पसारा । न करित्या नरा निंदिताती ॥३॥ संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येर अभाग्यासी । ज्ञान नाहीं ॥४॥ धन नाहीं त्यासी ठाईंचा करंटा । समर्थाशीं ताठा करिताती ॥५॥ बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥६॥ भेटिसी नवजातां म्हणति हा निष्ठुर । येतां जातां घर बुडवीलें ॥७॥ लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां झाला नपुंसक ॥८॥ निपुत्रिका म्हणति पाहा हो चांडाळ । पातकांचें मूळ पोरवडा ॥९॥ लोक जैसा वोक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संतसंग ॥१०॥ तुका म्हणे आतां आईका वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥११॥

८६९. धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी ॥१॥ वाचा बोलों वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥२॥ न वाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥३॥ तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥४॥

८७०. चवदा भुवनें जयाचिये पोटीं । तो हा आम्हीं कंठीं सांठविला ॥१॥ काय येक उणें आम्हुचिये घरीं । वोळंगती द्वारीं रिद्धिसिद्धी ॥२॥ असुर जयानें घातले तोडरीं । तो आम्हांसी जोडी कर दोन्ही ॥३॥ रूप रेखा नाहीं जयासी आकार । आम्हीं तो साकार भक्तीं केला ॥ ४ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आम्हांसाठीं ॥५॥ तुका म्हणे आम्ही देवाहुनि बळी । झालों हे निराळीं ठेवुनी आशा ॥ ६ ॥

८७१ बाळ काये जाणे जीवनउपाये । वाहे बापमाये सर्व चिंता । ॥१॥ आयितें भोजन खेळणें अंतरीं । अंकिताचा शिरीं भार नाहीं ॥२॥ आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळोनि लळे माय पाळी ॥३॥ तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता । आम्हुची ते सत्ता तयावरी ॥४॥

८७२. काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें ॥१॥ तृणीं हुताशन लागतां ते राशी । जळतील तैशीं क्षणमात्रें ॥२॥ विष्णुमूर्तिपाद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहों शके ॥३॥ तुका म्हणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥४॥

८७३. माकडा दिसती कवठी नारळे । भोक्ता तो निराळा वरिल सारी ॥१॥ येका रस येका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥२॥ सुनियासि क्षीर चारिल्या वोकवी । भोक्ता तोचि सेवी धणीवरी ॥३॥ तुका म्हणे मूर्ख वागविती भार । नेतील तें सार परीक्षक ॥४॥

८७४. भेटीची आवडी उतावीळ मन । लागलेंसे ध्यान जीवीं जीवा ॥१॥ आतां आवडीचा पुरवावा सोहळा । येउनि गोपाळा क्षेम देई ॥२॥ नेत्र उन्मळित राहिले तटस्थ । गंगा अश्रुपात वाहवली ॥३॥ तुका म्हणे तुम्ही करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ॥४॥

८७५. धवळलें जगदाकार । आंधार तो निरसला ॥१॥ लपों जातां ठाव नाहीं । प्रगट पाहीं पसारा ॥२॥ खरियाचा दिवस आला । वाढी बोल न पुरे ॥३॥ तुका म्हणे जिवे साठीं । पडिली मिठी धुरेसी ॥४।

८७६ मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥१॥ ऐसा परस्परें आहे हा विचार । भोपळ्याचा तार दगडासी ॥२॥ भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे पीर संग नव्हे तैसा ॥३॥ तुका म्हणे करि परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥४॥

८७७. लाउनि कोलित । माझा करितील घात ॥१॥ ऐसे बहुतांचे संधी । सांपडलों खोळेमधीं ॥२॥ पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ॥३॥ तुका म्हणे रिघ । पुढे नाहीं झालें धिंद ॥ ४ ॥

८७८. ऐसे येका अटी । रिति शिणती करंटी ॥१॥ साच आपुल्या पुरतें । करोनि न घेती कां हितें ॥२॥ कां हे वेचितिल वाणी । निरर्थकचि कारणीं ॥३॥ तुका म्हणे देवा । कांहीं समर्पुनी सेवा ॥४॥

८७९. चालिले सोबती । काय मानिली निश्चिंती ॥१॥ काय करिसी येकला । काळ सन्निध पातला ॥२॥ कांहीं सावध बरवा । करी आपुला

काढावा ॥३॥ चालिले आगळे । हळूच कान केश डोळे ॥४॥ वोसरले दांत । दाढा गडबडल्या आंत ॥५॥ येकली तळमळे । जिव्हा मलतेंचि चावळे ॥६॥ तुका म्हणे यांनीं । तुझी मांडिली घालणी ॥७॥

८८०. नका मजपासीं । वदों प्रपंचाचे विसीं ॥१॥ आतां नायिकावी कानीं । मज देवाविण वाणी ॥२॥ येउनियां रूपा । कोण पाहे पुण्यपापा ॥३॥ मागें आजीवरी । झालें माप नेलें चोरीं ॥४॥ सांडियेलीं पानें । पुढें पिका अवलोकनें ॥५॥ पडों नेदी तुका । आड गुंफा कांहीं चुका ॥६॥

८८१. जाले आतां सांटे । कासयाचे लहान मोठे ॥१॥ एक एका पडिलों हातीं । झाली तेव्हांची निश्चिंती ॥२॥ नाहीं फिरों येत मागें । झालें साक्षीचिया अंगें ॥३॥ तुका म्हणे देवा । आतां येथें कोठें हेवा ॥४॥

८८२ माझें मज द्यावें । नाहीं करवीत नवें ॥ १ ॥ सहस्र नामाचें रूपडें । भक्तकैवारी चोखडें ॥२॥ साक्षीवीण बोलें । तरि मज पाहिजे दंडिलें ॥३॥ तुका म्हणे माल । माझा खरा हा विठ्ठल ॥ ४ ॥

८८३ करूं स्तुति तरि ते निंदा । तुम्ही जाणा हे गोविंदा ॥१॥ आम्हा लडिवाळांचे बोल । करा कवतुकें नवल ॥२॥ बोबड्या उत्तरीं । तुम्हा रंजवितो हरि ॥३॥ मागतो भातुकें । तुका म्हणे कवतुकें ॥४॥

८८४. न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आम्हांसी हें सोपें गीत गातां ॥ १ ॥ न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरि ॥ २ ॥ जयासि नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उमा विटे ॥३॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं । तो आम्हां संपुटीं भक्तिभावें ॥४॥ तुका म्हणे धर्म जाणती लडिवाळें । ती होति निर्मळ अंतरबाह्य ॥५॥

८८५. झालों बळिवंत । होउनियां शरणागत ॥१॥ केला घरांत रीघावा । ठायीं पडियेला ठेवा ॥२॥ हातां चढे धन । ऐसें रचिलें कारण ॥३॥ तुका म्हणे मिठी । पायीं देउनि केली सुटी ॥४॥

८८६. लागपाठ केला । आतां वाटा नीट त्याला ॥१॥ करा जोडीचा हव्यास । आले दुरील घरास ॥ २ ॥ फोडिलीं भांडारें । मोहरलीं येकसरें ॥३॥ अवघियांपुरतें । तुका म्हणे घ्यावें हातें ॥४॥

८८७. येकि असे येक हेवा । येरे अनावडी जीवा ॥ १ ॥ देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥२॥ प्रीतीसाठीं भेद । कोण्ही पूज्य कोण्ही निंद्य ॥३॥ तुका म्हणे लळा । त्याचा जाणे हा कळवळा ॥४॥

८८८. स्वामीचें हें देणें । येथें पावलों दर्शनें ॥१॥ करूं आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद ॥२॥ कळावया वर्म । हा तो पायाचाचि धर्म ॥३॥ तुका म्हणे सिद्धी । हेचि पावविली बुद्धी ॥४॥

८८९. रुसलों संसारा । आम्ही आप आणि परा ॥१॥ म्हणउनि केली सांडी । देउनि पडिलों मुरकुंडी ॥२॥ परतेचिना मागें । मोह निष्ठुर झालों अंगें ॥ ३ ॥ सांपडला देव । तुका म्हणे गेला भेव ॥४॥

८९०. हें तों वाटलें आश्चर्य । तुम्हा धरवला धीर ॥१॥ माझा फुटतसे प्राण । धांवा धांवा म्हणऊन ॥ २ ॥ काय नेणों दिशा । झाल्या तुम्हावीण वोसा ॥३॥ तुका म्हणे कांगा । नायिकीजे पांडुरंगा ॥४॥

८९१ धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥१॥ वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसंगा लेंकरा ॥२॥ उशीर तो आतां । न करावा हेचि चिंता ॥३॥ तुका म्हणे त्वरें । वेग करीं विश्वंभरे ॥४॥

८९२. जोडिले अंजुळ । असे दाना उतावीळ ॥ १ ॥ पाहा पाहा कृपादृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥ २ ॥ तूं स्वामी मी सेवक । येक तो येका येक ॥ ३ ॥ करितो विनंती । तुका सन्सुख पुढती ॥ ४ ॥

८९३. काय तुज कैसें जाणावें गा देवा । आणावें अनुभवा कैशा परी ॥ १ ॥ सगुण कीं निर्गुण थोर कीं लहान । न कळे अनुमान मज तुझें ॥ २ ॥ कोणता निर्धार करूं हा विचार । भवसिंधू पार तरावया ॥३॥ तुका म्हणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपती वर्म ठावें ॥ ४ ॥

८९४. ऐका महिमा आवडीची । बोरें खाये भिल्लटीचीं ॥१॥ थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥२॥ पोहे सुदामदेवाचे । फके मारी कोरडेची ॥३॥ न म्हणे उच्छिष्ट अथवा थोडे । तुका म्हणे भक्तीपुढें ॥४॥

८९५. कोण पुण्य कोणा गांठीं । ज्यासी ऐसीयाची भेटी ॥१॥ जिहीं हरी धरिला मनीं । दिल्हें संसाराला पाणी ॥२॥ कोण हा माग्याचा ।

ऐसियासीं बोले वाचा ॥३॥ तुका म्हणे त्याची भेटी । होय संसारासी तुटी ॥४॥

८९६. केला मातीचा पशुपती । परि मातीसि काय म्हणती ॥१॥ शिव-पूजा शिवासि पावे । माती मातीमाजी सामावे ॥२॥ तैसे पूजिती आम्हां संत । पूजा घेतो भगवंत ॥३॥ आम्ही किंकर संतांचे दास । संत पदवी नको आम्हांस ॥४॥ केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु ॥५॥ विष्णुपूजा विष्णुसी अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥६॥ केली कांशाची जगदंबा । परी कांसें नव्हे अंबा ॥७॥ पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसें राहे कांसेपणें ॥८॥ ब्रह्मानंद पूर्णामाजी । तुका म्हणे हे केली कांजी ॥९॥ ज्याची पूजा तेणेंचि घेणें । आम्हां पाषाण रूप राहणें ॥१०॥

८९७. ते माझे सोयीरे सज्जन सांगाती । पाय आठवीती विठोबाचे ॥१॥ येरा मान विधि पाळणापुरते । देवाचीं तें भूतें म्हणोनियां ॥२॥ सर्वभावें झालों वैष्णवाचा दास । करिन त्याची आस उच्छिष्टाची ॥३॥ तुका म्हणे तैसे मानीती हरिदास । तैसी नाहीं आस आणिकांची ॥ ४ ॥

८९८. दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें ॥१॥ धर्म नीतीचा हा ऐकोनी वेव्हार । निवडिलें सार असार तें ॥२॥ पाप त्याचें नांव न विचारितां नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥३॥ तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें ॥ ४ ॥

८९९. करावें गोमटें । बाळा माते तें उमटे ॥ १ ॥ आपुलिया जीवाहुनी । असे वाल्हें तें जननी ॥ २ ॥ वियोग तें तीस । त्याच्या उपचारें तें विष ॥३॥ हरिणी चुकली पाडसा । धुंडाळी ती दाही दिशा ॥ ४ ॥ रानी हिंडों गेली गाय । घरीं वत्स वाट पाहे ॥ ५ ॥ तुका म्हणे पाये । डोळा सुखावे ज्या न्यायें ॥ ६ ॥

९००. कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनियां पाहे ॥ १ ॥ तैसें झालें माझ्या जीवा । केव्हां भेटसी केशवा ॥२॥ चुकलिया माये । बाळ हुरुहुरु पाहे ॥ ३ ॥ जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥४॥

९०१. हातीं होन दावी बेना । करिति लेंकीच्या धारणा ॥१॥ ऐसे

धर्म झाले कली । पुण्य रंक पाप बळी ॥२॥ सांडिले आचार । द्विज झाले चाहाड चोर ॥३॥ टिळे लपाविती पातडीं । लेति विजारा कातडीं ॥४॥ बैसोनियां तक्तां । अन्योविन्यो पिडिती लोकां ॥ ५ ॥ मुद्बक लिहिणें । तेल तुपावरी जिणें ॥६॥ नीच्याचे चाकर । चुकालिया खाती मार ॥७॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्रि दुश्चीतासी तोडी ॥ ८ ॥ वैश्य-शूद्रादिकें । हें तों सहज नीच लोकें ॥ ९ ॥ अवघे बाह्यरंग । आंत हिरवें बाह्य सोंग ॥१०॥ तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥११॥

९०२. साळंकृत कन्यादान । करितां पृथ्वी समान ॥१॥ परी तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढां ॥२॥ आचरतां कर्म । मरे पोट राहे धर्म ॥३॥ सत्या देव साह्य । ऐसें करोनियां पाहें ॥४॥ अन्न मान धन । हें तों प्रारब्धा आधिन ॥५॥ तुका म्हणे सोसे । दुःख आतां पुढें नाश ॥६॥

९०३. दिवल्या वाद्य लाउनि खाणें । करोनि मंडण दिल्हें हातीं ॥१॥ नवरा नेई नवरी घरा । पूजन वरा पाद्याचें ॥२॥ गौरविली विहिण व्याही । घडलें कांहीं ठेऊं नका ॥३॥ करूं द्यावें व्हावें बरें । ठाइचें कांरे न कळेची ॥४॥ वऱ्हाडियाचे लागे पाठीं । जैसी उटी कांतेली ॥ ५ ॥ तुका म्हणे जोडिला थुंका । पुढें नरका सामग्री ॥ ६ ॥

९०४. ब्रह्महत्या मारिल्या गायी । आणिक कांहीं पाप केलें ॥१॥ ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुण्याचे ॥२॥ नरमांस खादली माडी । हाका फोडी म्हणउनी ॥ ३ ॥ अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिलाषिलें ॥४॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांप सुटतसे ॥ ५ ॥ तुका म्हणे कोरान्न रांड । बेटा भांड मागेचिना ॥६॥

९०५. याचा कोणी करी पक्ष । तोहि त्या समतुल्य ॥१॥ फुकासाठीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजांसी लाग निरयदंडी ॥२॥ ऐके राजा न करी दंड । जरि या लंड दुष्टासी ॥३॥ तुका म्हणे त्याचें अन्न । मद्यपाना तें समान ॥ ४ ॥

९०६. कपट कांहीं येक । नेणें भुलवायाचे लोक ॥१॥ तुमचें करितों

कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥२॥ दाऊं नेणें जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥३॥ नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥४॥ नव्हे मठपती । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥५॥ नाहीं देवार्चन । असें मांडिलें दुकान ॥६॥ नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाणाखुणा ॥७॥ नव्हे पुराणिक । करणें सांगणें आणिक ॥ ८ ॥ नेणें वाद घट पट । करितां पंडित करंटा ॥ ९ ॥ नाहीं जाळीत मणदीं । उदो म्हणोनि आनंदी ॥ १० ॥ नाहीं हालवीत माळ । भोंवतें मेळऊनि गाबाळ ॥ ११ ॥ आगमींचें नेणें । कुडें स्तंभन उच्चाटणें ॥ १२ ॥ नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥

९०७. रडोनियां मान । कोण मागतां भूषण ॥१॥ देवें दिल्हें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥२॥ लावितां लावणी । विके मीकें केज्या दानी ॥ ३ ॥ तुका म्हणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ४ ॥

९०८. पूज्या येकासनीं आसनीं आसनें । बैसतां गमन मातेसीं तें ॥१॥ सांगतों ते धर्म नीतीचे संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥२॥ संतां ठाया ठाव पूजनाची इच्छा । जिवनींच वळसा सांपडला ॥३॥ तुका म्हणे येकायेकीं वरासने । दुजें तेथें भिन्न अशुभ तें ॥ ४ ॥

९०९ जेणें मुखें स्तवी । तेचि निंदेपाठीं लावी ॥१॥ ऐसी अधमाची याती । लोपी सोनें खाय माती ॥ २ ॥ गुदद्वारावाटे । मिष्टान्नाचा नरक लोटे ॥ ३ ॥ विंचु लामेवीण । तुका म्हणे वाहे सीण ॥ ४ ॥

९१० अधमाची यारी । रंग पतंगाचे परी ॥१॥ विटे न लगतां क्षण । मोलें जाय वायांविण ॥२॥ सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारीं ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । मज झणीं ऐसें दावा ॥ ४ ॥

९११. आणिकांचि स्तुती आम्हां ब्रह्महत्या । येकावांचूनि त्या पांडुरंगा ॥१॥ आम्हां विष्णुदासां येकविध भाव । न म्हणो यां देव आणीकांसी ॥२॥ शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेल ॥३॥ तुका म्हणे मज आणिकां संकल्पें । अवघींच पापें घडतील ॥ ४ ॥

९१२. तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥१॥ माझे मनोरथ सिद्धि । पाववावे कृपानीधी ॥ २ ॥ तूं तो उदारांचा राणा । माझी अल्पचि वासना ॥ ३ ॥ कृपादृष्टि पाहे । तुका म्हणे होई साह्य ॥ ४ ॥

९१३. संतांचा अतिक्रम । देव पूजा तो अधर्म ॥१॥ येति दगड ते वरी । मंत्रपुष्प देवाशिरीं ॥२॥ अतितासी गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥३॥ तुका म्हणे देवा । ताडण भेदकाची सेवा ॥ ४ ॥

९१४. करणें तें देवा । हेचि येक पावे सेवा ॥ १ ॥ औघें घडे येणें सांग । भक्त देवाचें तें अंग ॥२॥ हेंचि येक वर्म । काय बोलिला तो धर्म ॥ ३ ॥ तुका म्हणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ४ ॥

९१५. मागे नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करुनीयां ॥ १ ॥ परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरते ॥ २ ॥ उपदेशावरी मन नाहीं हातीं । तो आम्हां पुढती पाहों नये ॥ ३ ॥ तुका म्हणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥ ४ ॥

९१६. आणिकाच्या घातें । ज्यांचीं निवतील चित्तें ॥१॥ तेचि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥२॥ कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥३॥ तुका म्हणे मांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥४॥

९१७. केली सीताशुद्धी । मूळ रामायणा आधीं ॥१॥ ऐसा प्रतापी गहन । सुरां सकळ मोहन ॥२॥ जाउनी पाताळा । केली देवीची अवकळा ॥३॥ राम लक्षुमण । नेले आणिले चोरुन ॥४॥ जोडोनियां कर । उभा सन्मुख समोर ॥५॥ तुका म्हणे जपें । वायुसुता जातीं पापें ॥६॥

९१८. काम घातला बांदोडी । काळ केला देशोधडी ॥१॥ तया माझे दंडवंत । कपिकुळीं हनुमंत ॥२॥ शरीर वज्रा ऐसें । कवळीं ब्रह्मांड जो पुच्छें ॥३॥ रामाच्या सेवका । शरण आलों म्हणे तुका ॥४॥

९१९. हनुमंत महाबळी । रावणाची दाढी जाळी ॥१॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥२॥ करुनी उड्डाण । केलें लंकेचें शोधन ॥३॥ जाळियेली लंका । धन्य धन्य म्हणे तुका ॥४॥

९२० शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ।। १ ।। काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुमटा ।। २ ।। शूर आणि धीर । स्वामीकाजी तूं सादर ।।३।। तुका म्हणे रुद्रा । अंजनीचीया कुमरा ।।४।।

९२१. कुंभ औघां येक आवा । पाकीं येकी गु फेडावा ।।१।। ऐसे भिन्न भिन्न साटे । केले प्रारब्धानें वांटे ।। २ ।। हिरे दगड येके खाणी । कैंचें विजातीला पाणी ।।३।। तुका म्हणे शिरीं । येक येकाची पायरी ।।४।।

९२२. मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ।।१।। ऐसीयाच्या गोष्टी फिक्या मीठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ।।२।। बोलों जाणें अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ।। ३ ।। तुका म्हणे बहू तोंडें जे वाचाळ । तें गे तेंचि मूळ लटिक्याचें ।।४।।

९२३. नलगे चंदनाचा पुसावा परिमळ । वनस्पती मेळ हाकारोनी ।।१।। अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी । धरितांही परी आवरेना ।।२।। सूर्य नाहीं जागें करित या जना । प्रकाशकिरणा कर म्हूण ।। ३ ।। तुका म्हणे मेघ नाचती मयूर । लपवितां खरें येत नाहीं ।। ४ ।।

९२४. चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोण्ही अंग ।।१।। दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साखर अवघी गोड ।।२।। तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहतां अवगुण मिळेचिना ।। ३ ।।

९२५. मन करा रे प्रसन्न । सर्वसिद्धींचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ।।१।। मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ।।२।। मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य । प्रसन्न आपआपणास । गती अथवा अधोगती ।।३।। साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं अन्य दैवत । तुका म्हणे दुसरें ।।४।।

९२६. मायबाप जरी सर्पीण कीं बोका । त्याचे संगें सुखा नपवे बाळ ।।१।। चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुखा नेदी फोडी प्राण नाशी ।।२।। तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्वे ताठा ।।३।।

९२७. शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोण्हा ॥१॥ पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था नीजसुखा ॥२॥ तुका म्हणे जैसी लाचासाठीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥३॥

९२८. प्रारब्धक्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥१॥ अवघा देवचि झाला पाहीं । भरोनियां अंतरबाहीं ॥ २ ॥ सत्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तांसी कदा ॥३॥ देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ॥४॥

९२९. शास्त्रांचें जें सार वेदाची जो मूर्ती । तो माझा सांगाती प्राणसखा ॥१॥ म्हणवोनि नाहीं आणिकाचा पांग । सर्व झालें सांग नामें येका ॥२॥ सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥३॥ तुका म्हणे आम्ही विधीचे जनीते । स्वयंभ आइते केले नव्हों ॥४॥

९३०. कोणे तुझा सांग केला अंगिकार । निश्चिंती तुवां थोर मानियेली ॥१॥ कोणें ऐसा तूज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥२॥ तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घांसील भूमिसी वदन यम ॥३॥ कां रे नागविसी आयुष्य खातो काळ । दिवसेंदिवस बळ क्षीण होतें ॥४॥ तुका म्हणे यासी सांगा कोण्हीतरी । विसरला हरी मायबाप ॥५॥

९३१. साधुनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकां ते डोळां न पाहावे ॥१॥ साधुनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥२॥ असाध्य तें साधे करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥३॥

९३२. आम्हुची गोसावी अयाचित वृत्ती । करवी शिष्या हातीं उपदेश ॥१॥ दगडाची नाव आधींच ते जड । ते काये दगड तारूं जाणे ॥२॥ तुका म्हणे वेश विटंबला त्यांनीं । सोंग संपादणी करिती परी ॥३॥

९३३. मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैलथडी ॥१॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । काय त्या व्यापारें लाभ हानी ॥२॥ मंगळदायकें करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥३॥ स्वप्नींचें जें सुख दुःख जालें कांहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ४ ॥ सारीं झाली मेलीं लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥ ५ ॥

९३४. माझें म्हणतां याला कां रे नाहीं लाज । कन्या पुत्र भाज धन

वित्त ॥१॥ कोणी सोडवीना काळाचे हातींचें । येकाविण साचें नारायणा ॥२॥ तुका म्हणे किती सांगावें चांडाळा । नेणें जीवकाळ कोण्या जीतो ॥३॥

९३५. आंधळ्यासी जन अवघेचि आंधळे । आपणासी डोळे दृष्टी नाहीं ॥१॥ रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासी कारण चवी नाहीं ॥२॥ तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन सर्व खोटें ॥३॥

९३६. बोलविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरि देवा विटंबना ॥१॥ मिठेंवीण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥२॥ संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेविणे चांग रूप हीन ॥ ३ ॥ कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥४॥ तुका म्हणे तैसी होतें मज परी । न देखें अंतरीं प्रेमभाव ॥ ५ ॥

९३७. धिग जीणें तो बाइले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥१॥ धिग जीणें ज्याचें लोभावरी मन । अतीत पूजन घडेचि ना ॥२॥ धिग जिणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ ३ ॥ धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं साधुपणा ॥४॥ तुका म्हणे धिग ऐसे झाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥५॥

९३८. अरे देहे व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूत कर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ॥१॥ मग कैचें हरिचें नाम । निजलीया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥२॥ विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अती धीट । तया तेची वाट । अधोगती जावया ॥ ३ ॥ आणीक येक कोड । नरका जावयाची चाड । तरी संतनिंदा गोड । करी कौतुकें सदा ॥४॥ तुका म्हणे ऐसें । मना लावीं रामपिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जाशी ठकोनी ॥५॥

९३९. अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नोव्हे ॥१॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलीया मती पाखंडिया ॥२॥ जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दीकांसीं ॥३॥ तुका म्हणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दुषिला देव ॥ ४ ॥

९४०. येक तटस्थ मानसीं । येक सहजची आळसी ॥१॥ दोन्ही

दिसती सारखी । वर्म जाणे तो पारखी ॥२॥ येक ध्यानीं करिती जप । येक बैसुनि घेती झोंप ॥३॥ येका सर्वस्वाचा त्याग । येका पोटासाठीं जोग ॥४॥ येका भक्ती पोटासाठीं । येका देवासवें गांठी ॥५॥ वर्म पोटीं येका । फळें दोन म्हणे तुका ॥६॥

९४१. काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥१॥ आहे नाहीं हें न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥२॥ देखीलें तें दृष्टी । मागें घालूनियां मिठी ॥३॥ तुका म्हणे मावें । माझ्या मज समजावें ॥४॥

९४२. भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥१॥ धिक् त्याचें साधूपण । विटाळूनी वर्ते मन ॥२॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थ चाड जीवें आस ॥३॥ हें ना तैसें झालें । तुका म्हणे वायां गेलें ॥४॥

९४३. येकादशीस अन्न पान । जे नर करिती भोजन । श्वानइष्टे-समान । अधम जन ते येक ॥१॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूसी ॥२॥ अशुद्ध विटाळशीचें खळ । विडा भक्षी तांबूल । सांपडे सबळ । काळा हातीं न सुटे ॥३॥ सेज बाज विलास भोग । करी कामिनीसी संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥४॥ आपण न वजे हरिकीर्तना । आणिकां वारी जातां कोणा । त्याच्या पापें जाणा । ठेंगणा महा मेरू ॥ ५ ॥ तया दंडी यमदूत । झाले तयाचे अंकित । तुका म्हणे व्रत । येकादशी चुकल्या ॥६॥

९४४. करवितां व्रत अर्धे पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ॥१॥ शुद्धबुद्धी दोघां होय येक मान । चोरासवें कोण जीवें राखे ॥२॥ आपुलें देवोनी आपुला जीवघात । न करावा थीत जाणो-नायां ॥३॥ देवोनियां वेंचा धाडी वाराणसी । नेदावें चोरासीं चंद्रबळ ॥४॥ तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ती हे मारग मोडों नये ॥५॥

९४५. इनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥१॥ अवघेचि येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥२॥ अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याची ॥३॥ तुका म्हणे जोडी झाली । ते आपुली आपणा ॥ ४ ॥

९४६. वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरा ॥१॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारि येकसरें भवसिंधू ॥२॥ जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोकां ॥३॥ तुका म्हणे विधीनिषेध लोपला । उच्छेद या झाला मारगाचा ॥४॥

९४७. विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥१॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥२॥ बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥३॥ तुका म्हणे भावें । कृपा करीजेते देवें ॥४॥

९४८. येथींचीया अळंकारें । काय खरें पूजन ॥१॥ वैकुंठींच्या लाऊं वाटा । सर्व सांठा ते ठाईं ॥२॥ येथींचीया नासीवंतें । काय रीतें चाळऊं ॥३॥ तुका म्हणे वैष्णवजन । माझे गण समुदाय ॥४॥

९४९. उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाडा ॥१॥ बोलवीले बोलें बोल । धनी विठ्ठल सन्नीध ॥२॥ तरी मनीं नाहीं शंका । बळें येका स्वामीच्या ॥३॥ तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गाबाळ ॥४॥

९५० बोलावें तें धर्मा मीळे । बरे डोळे उघडूनी ॥१॥ कशासाठीं खावें शेण । जेणें जन जंव थुंकितें ॥२॥ दुजें ऐसें कोण बळी । जे या जाळी अग्नीसी ॥३॥ तुका म्हणे शूर रणीं । गांढे मना बुरबुरी ॥४॥

९५१. बरा देवा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥१॥ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥२॥ विद्या असती कांहीं । तरि पडतों अपाईं ॥३॥ सेवा चुकतों संताची । नागवण हे फुकाची ॥४॥ गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥५॥ तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥६॥

९५२. दाता नारायण । स्वयें भोगीतां आपण ॥ १ ॥ आतां काय उरले वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥२॥ देखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥३॥ तुका म्हणे नाद । झाला अवघा गोविंद ॥४॥

९५३. कृपा करुनी देवा । मज साच तें दाखवा ॥१॥ तुम्ही दयावंत कैसे । कीर्ति जगामाजीं असे ॥२॥ पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल काळा ॥३॥ तुका म्हणे देवा । माझा करावा कुडावा ॥४॥

९५४. ठाईंची ओळखी । येईल टाकूं ठाका सुखी ॥१॥ तुमचा जाईल ईमान । माझे कपाटीं पतन ॥२॥ ठेविला तो ठेवा । अभिलाषें बुडवावा ॥३॥ मनीं न विचारा । तुका म्हणे हे दातारा ॥४॥

९५५. तुझें वर्म ठावें । माझ्या पडियेलें मावें ॥१॥ रूप कासवाचे परी । धरुनी राहिलों अंतरीं ॥२॥ नेदि होऊं तुटी । मेळवण दृष्टादृष्टी ॥३॥ तुका म्हणे देवा । चिंतन तें तुझी सेवा ॥४॥

९५६. गहूं येक जाती । परी त्या पाधाणी नासिती ॥१॥ वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥२॥ कमाईच्या सार । जाति दाविती प्रकार ॥३॥ तुका म्हणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥४॥

९५७. पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनाचीं नांवें ॥१॥ नेघे माझी वाचा तुटी । महा लाभ फुकासाठीं ॥२॥ विश्रांतीचा ठाव । पाईं संतांचीया भाव ॥३॥ तुका म्हणे पापें । जाती संतांचिया जपें ॥४॥

९५८. देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥१॥ दोन्हीकडे दोन्ही वाहातील वाटा । कारितील सांठा आपुलाला ॥२॥ दाखविलें परी नाहीं वरजीता । आला तो तो चित्ता भाग भरा ॥३॥ तुका म्हणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळबीजमात्र ॥४॥

९५९. शोधितील मूळें । त्याचे करीसि वाटोळें ॥१॥ ऐसें संतांचें बोभाट । तुझे बहु झाले तंट ॥२॥ लौकिका बाहेरी । घाली रोखी जया धरीं ॥३॥ तुका म्हणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥४॥

९६०. वैद्य वांचविती जीवा । तरी कोण ध्याती देवा ॥ १ ॥ काय जाणो कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥२॥ अंगीं दैवत संचरे । मग तेथें काय उरे ॥३॥ नवसें कन्यापुत्र होती । तरी कां करणें लागे पती ॥४॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥५॥

९६१. मारगें बहुत । याचि गेले साधुसंत ॥१॥ ऐसीं गर्जती पुराणें । नका जाऊं आडरानें ॥२॥ चोखाळल्या वाटा । नलगे पुसाव्या धोपटा ॥३॥ झळकती पताका । गरुडटके म्हणे तुका ॥४॥

९६२. कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां । आलें वैकुंठ

जवळा । सन्नीध पंढरीये ॥१॥ पीक पीकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । अवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥२॥ चालती स्थीर स्थीर । गरुडटकियाचे मार । गर्जेती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥३॥ मिळालीया भद्रजाती । कैशा आनंदें डुल्लती । शूर उठावती । येका येकीं आगळे ॥४॥ नागामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें आलें वैष्णव दळ । कळिकाळ कांपती ॥५॥ आस करिती ब्रह्मादिक । देखोनि वाळवंटीचें सुख । धन्य धन्य मृत्युलोक । म्हणती भाग्याचे कैसे ॥६॥ मरण मुक्ती वाराणसी । पितृऋण गया नाशी । उद्धार नाहीं पंढरीसी । पायांपाशीं विठोबाच्या ॥७॥ तुका म्हणे आतां । काय करणें आम्हां चिंता । सकळ सिद्धीचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥८॥

९६३. जया दोषां परिहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपूर देखिलीया ॥१॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मतीर्थ विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणु नाद ॥२॥ सकळ तीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥३॥ नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य अणिका ठाया । धन्य भाग्य जया । जे पंढरपूर देखती ॥४॥ उपजोनियां संसारीं । येक वेळ पाहे पंढरी । महा दोषां कैंची उरी । देवभक्त देखिलीया ॥५॥ ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी । सुदर्शन घरटी करीं । रीघ न पुरे काळिकाळा ॥६॥ तें सुख वर्णावया गती । येवढी कैंची मज मती । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठा ॥७॥ तुका म्हणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । तो अधम जन्मांतरींचा । जया पंढरी नावडे ॥८॥

९६४. येक नेणता नाडली । येक जाणिवेची भुली ॥१॥ बोलों नेणें मुके । वेडे वाचाळ काय निकें ॥२॥ दोहीं सवानाड । विहिर येकीकडे आड ॥३॥ तुका म्हणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ॥४॥

९६५. म्हणवितों दास । मज येवढीच आस ॥१॥ परि तें अंगीं नाहीं वर्म । करी आपुला तूं धर्म ॥२॥ बडबडितो तोंडें । रिते मावेंवीण घेंडें ॥३॥ तुका म्हणे बरा । दाऊं जाणतो पसारा ॥४॥

९६६. पूजा समाधान । अतिशय वाटे शीण ॥१॥ हें तों जाणा तुम्ही संत । आहे बोलीलों ते नीत ॥२॥ पाहिलें पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥३॥ तुका म्हणे माथा । पाईं ठेवीं तुम्हां संतां ॥४॥

९६७. स्वप्नींचिया गोष्टी । मज धरिलें होतें वेठीं । झालिया शेवटीं । जागें लटिकें सकळ ॥१॥ वायां माकिली करुणा । मूळ पावावया शिणा । राव रंक राणा । कैंचा स्थानावरी आहे ॥२॥ सोशिलें तें अंगें । खरें होतां नव्हतां जागे । अनुभवही सांगे । दुःखें डोळे उघडिले ॥३॥ तुका म्हणे संतीं । सावचित्त केलें अंतीं । नाहीं तरि होती । टाळी बैसोनी राहिली ॥४॥

९६८. असुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥१॥ याती कूळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥२॥ काळेंकुट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंचि अंग साक्षी देती ॥३॥ तुका म्हणे बरी जातीसवें भेटी । नवनीत पोटीं सांठवीलें ॥४॥

९६९. वासुगीच्या वनीं सीता शोक करी । कांहो अंतरले रघुनाथ दुरी । येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी । कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥१॥ सांग वो त्रिजटे सखिये ऐशी मात । देईल कां नेदी भेटी रघुनाथ । मन उतावीळ झाला दुरी पंथ । राहों न शके प्राण माझा कुडी आंत ॥२॥ काय दुष्ट आचरण होतें म्यां गे केलें । तीर्थव्रत होतें कवणाचें भंगिलें । गाईवत्सा पत्नीपुरुषा विघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ॥ ३ ॥ नाडीयेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिलें रघुनाथा पाठिलागे तेणें । उल्लंघिली आज्ञा माव काय मी जाणें । देखोनी सुनाट घेऊनि आलें सुनें ॥४॥ नाहीं मूळ मारग लागे आणिका सोये । येकावीण नामें रघुनाथाच्या माये । ऊपटि पक्षीया येक देउनी पाये । उदकवेळ्यामध्यें तेथें चाले काये ॥५॥ जनकाचि नंदीनी दुःखें ग्लानी थोरी । चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी । संबोखी त्रिजटा स्थिर स्थिर वो करी । घेईल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥ ६ ॥

९७०. वीट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजेना ॥१॥ तरीच तें

गोड राहे । नीरें पाहे स्वयंभ ॥२॥ आणिकां गुणांपोटीं वाव । दावी भाव आपुला ॥३॥ तुका म्हणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥४॥

९७१. नव्हतों सावचित्त । तेणें अंतरलें हित ॥१॥ पडिला नामाचा विसर । वाढविला संवसार ॥२॥ लटिक्याचे महापुरीं । वाहावलों होतों दूरी ॥३॥ तुका म्हणे नाव । आम्हां सांपडला भाव ॥४॥

९७२. अन्नाच्या परिमळें जरि जाये भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥१॥ आपुलालें तुम्ही करा रे स्वहीत । वाचे स्मरा नित्य राम राम ॥२॥ देखोनि जीवन जरी जाय तान । तरी कां सांठवण घरोघरीं ॥३॥ देखोनीयां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तयां तळीं ॥४॥ सुख तरि होये गातां आईकतां । जरि राहे चित्ता दृढभाव ॥५॥ तुका म्हणे होसी भावेंचि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणीवेची ॥६॥

९७३. काय उणें आम्हां विठोबाचे पाईं । नाहीं ऐसें कांहीं येथें येक ॥१॥ नये मोंवतालें ठायीं वाटुं मन । वराडी करून दारोदारीं ॥२॥ कोण बळी माझ्या विठोबा वेगळा । आणीक आगळा दुजा सांगा ॥३॥ तुका म्हणे मोक्ष विठोबाचे गांवीं । फुकाची लुटावी भांडारें तीं ॥४॥

९७४. सेवितों तो रस वांटीतों आणिकां । घ्या रे होऊं नका रानभरी ॥१॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि येक दानशूर दाता ॥२॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी त्याचे पाईं ॥३॥ तुका म्हणे मज धाडीलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥४॥

९७५. ऐसें ऐसीयानें भेटती ते साधु । ज्यांच्या दर्शनें तुटे भवबंधु । जे कां सच्चिदानंदी नित्यानंदु । जे कां मोक्षसिद्धी तीर्थ वंदु रे ॥१॥ भाव सर्व कारण मूळ वंदु । सदा समबुद्धी नास्तिक्यभेदुं । भूतकृपा मोडी द्वेषकंदु । शत्रु मित्र पुत्र सम करीं बंधू रे ॥२॥ मन बुद्धि काया वाचा शुद्ध करी । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारी । लघुत्व सर्वभावें अंगीकारी । सांडीमांडी मीतूंपण ऐसी थोरी रे ॥ ३ ॥ अर्थकाम चाड नाहीं चित्ता । मानामान मोह माया मिथ्या । वर्ते समाधानी जाणोनि नेणता । साधु भेट देती तया अवचिता रे ॥४॥ मनीं दृढ धरीं विश्वास ।

नाहीं सांडीं मांडीचा सायास । साधुदर्शन नित्य काळ त्यास । तुका म्हणे जो विटला जाणिवेस रे ॥५॥

९७६. मवसागर तरतां । कां रे करीतसा चिंता । पैल उमा दाता । कटीं कर ठेउनी ॥१॥ त्याचे पाईं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी । मावा येकासाठीं । खांदां वाहे आपुल्या ॥२॥ सुखें करावा संसार । परी न संडावे दोन्ही वार । दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥३॥ भुक्तिमुक्तीची चिंता । नाहीं दैन्य दरिद्रता । तुका म्हणे दाता । पांडुरंग वोळगल्या ॥४॥

९७७. जे का रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुले ॥१॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥२॥ मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥३॥ ज्यासी आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥४॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥५॥ तुका म्हणे सांगों किती । तोचि मगवंताची मूर्ती ॥६॥

९७८. याजसाठीं मक्ती । जगीं वाढवावया ख्याति ॥१॥ नाहींतरी कोठें दुजें । आहे बोलावया सहजें ॥२॥ गौरवायासाठीं । स्वामिसेवेची कसोटी ॥३॥ तुका म्हणे अळंकारा । देवमक्त लोकीं खरा ॥४॥

९७९. अमंगळ वाणी । नये आईकों ते कानीं ॥१॥ जो हे दूषीं हरीची कथा । त्यास क्षयरोगव्यथा ॥२॥ याति वर्ण श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ट ॥३॥ तुका म्हणे पाप । माय नावडे ज्या बाप ॥४॥

९८०. कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्यासी वाचा ॥१॥ वाचे नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥२॥ कैसा नीरयेगांवा । जाऊं न पवे विसावा ॥३॥ तुका म्हणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥४॥

९८१. गर्माचें धारण । तिणें वागविला शीण ॥१॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घालीच तोंडा ॥२॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥३॥ तुका म्हणे जाय । नरका अमक्ताची माय ॥४॥

९८२. पतनासी जे नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥१॥ विधिपुरतें

कारण । बहु बारावें वचन ॥२॥ सर्वस्वासी नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥३॥ तुका म्हणे दूरी । राखतां हे तेंच बरी ॥४॥

९८३. आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वतां भाव ॥१॥ करवी आणिकांचे घात । खोडि काढोनी पंडित ॥२॥ श्वानाचिया परी । मिष्टान्नाशी विटाळ करी ॥३॥ तुका म्हणे ऐसा । सटवेचिना पांचा दिवसां ॥ ४ ॥

९८४. देव आड आला । तो भोगितो मी उगला । अवघा निवारिला । शीण शुभाशुभांचा ॥ १ ॥ जीवशिवाचें मातुकें । केलें होतें कवतुकें । कैंचि येथें लोकें । आभास अनित्यें ॥२॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णाधर्म हा खेळ ॥३॥ अवघी येकाचीच वीण । तेथें कैंचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥४॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस । पायांपाशीं वास । निकट नव्हे निरोपि ॥५॥

९८५. न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥१॥ मलतें जड पडो भारी । जीवावरी अगोज ॥ २ ॥ शतखंड देहे शस्त्रधारी । करितां परी न भीये ॥३॥ तुका म्हणे केली आधी । दृढ बुद्धी सावध ॥४॥

९८६. बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पाहोनियां अंत क्षमा आंगीं कांटीवरी मारविलें ॥१॥ शिव्यागाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥२॥ तुका म्हणे क्रोधा हातीं । सोडऊनी घेतलें रे ॥३॥

९८७. पावलों पावलों । देवा पावलों रे ॥१॥ बरवें संचित होतें तैसें झालें रे । आतां काय बोलों रे ॥ २ ॥ सोज्वळ कंटकवाटा । भावें करूं गेलों रे । तुका म्हणे करूनि वेगळा केलों रे ॥३॥

९८८. कां होती कां होती । देवा येवढी फजिती ॥१॥ मुळीं वर्म नसतों चुकलों । तो मी ऐसें चित्तीं ॥ २ ॥ होणार तें होवोनि गेलें । मिथ्या आतां खंतीं ॥३॥ तुका म्हणे पुरें आतां । दुर्जनाची संगती ॥४॥

९८९. सोडवा सोडवा सोडवा हो अनंता । तुजवीण ऐसा कोण दुजा प्राणदाता ॥ १ ॥ कोणा लाज नेणा ऐसी । आणिका शरण आम्ही जातां ॥२॥ तुका म्हणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥३॥

९९०. पुत्राची वारता । शुभ ऐके जेंवी माता ॥१॥ तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥२॥ नादें लुब्ध झाला मृग । देह विसरला अंग ॥३॥ तुका म्हणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥४॥

९९१. ध्यानीं योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोपाठीं तयांचीया ॥१॥ तान भूक त्यांचे राखे शीत उष्ण । झाले उदासीन देहभावे ॥२॥ कोण सखे तया आणिक सोयीरे । असे या दुसरे हरीवीण ॥३॥ कोण सुख त्यांच्या जीवाशी आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ॥४॥ तुका म्हणे वीष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ॥५॥

९९२. न व्हावें तें झालें देखीले ते पाय । आतां फिरों काय मागें देवा ॥१॥ बहु दीस होतों करीत हे आस । तें आलें सायासें फळ आजी ॥२॥ कोठवरी जीणे संसाराची आशा । उगवों हा फासा येथोनीयां ॥३॥ बूडाली तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सोडोनीयां ॥४॥ पुढें उल्लंघितां दुःखाचे डोंगर । नाहीं अंतपार गर्भवासा ॥५॥ तुका म्हणे कास धरिन पीतांबरीं । तूं भवसागरीं तारूं देवा ॥६॥

९९३. वैकुंठा जावया तपाचे सायास । करणें जीवा नाश नलगे कांहीं ॥१॥ तया पुंडलीकें केला उपकार । फेडावया भार पृथिवीचा ॥२॥ तुका म्हणे केली सोपी पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥३॥

९९४. शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥१॥ येथें केलें नव्हे कांहीं । लंडिपण खोटें माई ॥२॥ करितीं होया होय । परि नव्हे कोणी साह्य ॥३॥ तुका म्हणे घडी । साधिलिया एक थोडी ॥४॥

९९५. म्हणवोनि खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोण्ही दीशा वरजीयेली ॥१॥ माझीया गोतीं हें वसलें सकळ । न देखीजे मूळ विटाळाचें ॥२॥ करूनि वोळखी दिल्ही येकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥३॥ तुका म्हणे नाहीं काळापाशीं गोवा । स्थिति मति देवावांचूनीयां ॥४॥

९९६. वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥१॥ नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥२॥ पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥३॥ तुका म्हणे यातीं । हो कां तयाची भलती ॥४॥

९९७. करीत तपादि साधनें । कोण्ही साधोत गोरांजनें ॥१॥ आम्ही न वजों तया वाटा । नाचो पंढरीचोहटां ॥ २ ॥ पावोत आत्मस्थिती । कोण्ही म्हणोत उत्तम मुक्ती ॥३॥ तुका म्हणे छंद । आम्हां हरिच्या दासां निंद्य ॥४॥

स्वामीस सद्गुरूची कृपा झाली ते अभंग.

———:०:———

९९८. सद्गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥१॥ सांपडविले वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥२॥ भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥३॥ कांहीं कळे उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा झाली ॥४॥ राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥५॥ बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिल्हा राम कृष्ण हरी ॥ ६ ॥ माहो शुद्ध दशमी पाहोनी गुरुवार । केला अंगिकार तुका म्हणे ॥७॥

९९९. माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुरावो ॥ १ ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणे नव्हे गुंफा कांहीं कोठें ॥२॥ जाती पुढें येक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ ३ ॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटी ॥४॥ तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥५॥

१०००. घालोनियां भार राहिलों निश्चिंती । निरविलें संतीं विठोबासी ॥१॥ लावोनियां हात कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥२॥ कटीं कर सम चरण साजिरे । राहिला भीवरेतीरीं उभा ॥ ३ ॥ खुंटले सायास आणीकि या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥४॥ तुज वाटे आतां तें करीं अनंता । तुका म्हणे संता लाज माझी ॥५॥

१००१. माझिये मनींचा जाणा निर्धार । जीवासी उदार झालों आतां ॥१॥ तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥२॥ ठाईचा संबंधू तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं

॥३॥ जीवभाव तुझ्या ठेवियेला पाईं । हेचि आतां नाहीं लाज तुम्हां ॥४॥ तुका म्हणे संतीं घातला हवाला । न सोडीं विठ्ठला पाय तुझे ॥५॥

१००२. देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ १ ॥ ऐसा असोनि अनुभव । कासावीस होतो जीव ॥२॥ देवाची जतन । त्यासी बाधूं न शके अग्न ॥३॥ तुका म्हणे हरी । प्रल्हादासी यत्न करी ॥ ४ ॥

१००३. भले म्हणवितां संतांचे शेवक । आईत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥ ठसावितां बहु लागती सायास । चुकल्या घडे नाश अल्प वर्मे ॥२॥ पाकसिद्धी लागे संचित आईतें । घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ ३ ॥ तुका म्हणे बरें सांगताची गोष्टी । रणभूमि दृष्टि न पडे तों ॥ ४ ॥

१००४. संतसमागम येखादिये परी । रहावें त्यांचे द्वारीं श्वानयाती ॥ १ ॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ २ ॥ कामारी बटीक सेवेचे सेवक । दीन तेथें रंकपणें भले ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ४ ॥

१००५. कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥१॥ कृष्ण माझा गुरू कृष्ण माझा तारू । उतरि पैल पारू भवनदीचा ॥२॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोयरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा श्रीकृष्ण विसावा । वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥

१००६. जातो वाराणसी । निरवीं गाई घोडीं म्हैशी ॥१॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मानावा भरवसा ॥२॥ नका काढूं माझीं पेवें । तुम्ही वरळा भूस खावें ॥ ३ ॥ भिकारियाचे पाठीं । तुम्ही घेउनि लागा काठी ॥ ४ ॥ सांगाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥ ५ ॥ वोकलिया वोका । म्या खर्चीला नाहीं रुका ॥६॥ तुम्ही खावें ताक पाणी । जतन करा तूप लोणी ॥७॥ नाहीं माझे मनीं । पोरें रांडा नागवणी ॥८॥ तुका म्हणे नष्ट । होतें तैसें बोले स्पष्ट ॥९॥

१००७. कास घालोनि बळकट । झालों कळिकाळासी नीट । केली पायवाट । भवसिंधु वरूनी ॥१॥ या रे या रे लहान थोर । याति भलते नारी-

नर। करावा विचार। नलगे चिंता कोणासी ॥२॥ कामीं गुंतले रिकामे। जपी तपी येथें जमे। लाविले दमामे। मुक्त आणि मुमुक्षा ॥३॥ येकदर शिक्का। पाठविला इहलोका। आलों म्हणे तुका। मी नामाचा धारक ॥४॥

१००८. आम्ही वैकुंठवासी। आलों याचि कारणासी। बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया ॥१॥ झाडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग। उच्छिष्टाचा भाग। शेष उरलें तें सेवूं ॥२॥ अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें। विषयलोभी मनें। साधनें बुडविलीं ॥३॥ पिटूं भक्तीचा डांगोरा। कळिकाळासी दरारा। तुका म्हणे करा। जयजयकार आनंद ॥४॥

१००९. बळियाचे अंकित। आम्ही झालों बळिवंत ॥१॥ लाताळिला संसार। केला षडउर्मींचा मार ॥२॥ जन धन तन। केलें तृणाही समान ॥३॥ तुका म्हणे आतां। आम्ही मुक्तीचीया माथां ॥४॥

१०१०. मृत्युलोकीं आम्हां आवडती परी। नाहीं येका हरीनामें-वीण ॥१॥ विटलें हें चित्त प्रपंच्यापासूनी। वमन तें मनीं बैसलेंसें ॥२॥ सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान। माणिके पाषाण खडे तैसे ॥३॥ तुका म्हणे तैशा दिसतील नारी। रिसाचिया परी आम्हांपुढें ॥४॥

१०११. स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्ठा या पाषाणा मृत्ति-केचा ॥१॥ नाठवे हा देव न घडे भजन। लांचावलें मन आवरेना ॥२॥ दृष्टिमुखें मरण इंद्रीयांच्या द्वारें। लावण्य तें खरें दुःखमूळ ॥३॥ तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु। परी पावे बाधु संघटणें ॥४॥

१०१२. पराविया नारी माउली समान। रखुमाई जन पांडुरंग ॥१॥ जाई वो तूं माते नकरीं सायास। आम्ही विष्णुदास तैसे नोव्हे ॥२॥ न साहावे मज तुझें हें पतन। नको हें वचन दुष्ट वदों ॥३॥ तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार। तरी कां इतर लोक थोडे ॥४॥

१०१३. भक्तप्रतिपाळे दीन वो वत्सले। विठ्ठल कृपाळे होसी माये ॥१॥ पडिला विसर माझा काई गुणें। कपाळ हें उणें काय करूं ॥२॥ तुका म्हणे माझें जाळुनी संचित। करी वो उचित भेटी देयीं ॥३॥

१०१४. तुजवीण मज कोण वो सोयिरे। आणीक दुसरे पांडुरंगा

॥१॥ लागलीसे आस पाहातसे वास । रात्री वो दिवस लेखीं बोटें ॥२॥ काम गोड मज नलगे हा धंदा । तुका म्हणे सदा हेंचि ध्यान ॥३॥

१०१५. पढीयंते आम्ही तुजपासीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥१॥ पाळसील लळे दीन वो वत्सले । विठ्ठल कृपाळे जननीये ॥२॥ जीव भाव तुझ्या ठेवीयला पाईं । तूंचि सर्वा ठायीं येक आम्हां ॥३॥ दुजयाचा संग लागों नेदी वारा । नाहीं जात घरा आणीकांच्या ॥४॥ सर्वसत्ता येकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देशी मागेन तें ॥५॥ म्हणवोनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां चोळीं डोळे तुका ॥६॥

१०१६. कोण पर्वकाळ पाहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ॥१॥ पाठवी मातुकें प्रेमें झडकरी । नको राखों पांडुरंगा ॥२॥ न धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्याई म्हणोनियां ॥३॥ काय रडत्रीसी नेणतिया पोरा । जाणतिया थोराचिया परी ॥४॥ काय उभी कर ठेउनियां कटीं । बुझावी धाकुटीं लडिवाळें ॥५॥ तुका म्हणे आतां पदरासी पीळा । घालोनी निराळा नव्हे मग ॥६॥

१०१७. कां हो देवा कांहीं न बोलाची गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसा ॥१॥ कंठीं प्राण पाहे वचनाची आस । तो दिसे उदास धरिलें ऐसें ॥२॥ येणें काळें बुंथी घेतलीसे खोळ । कां नये विटाळ होऊं माझा ॥३॥ लाज वाटे मज म्हणवितां देवाचा । न पुससी फुकाचा तुका म्हणे ॥४॥

१०१८. उचित तें काय जाणावें दुर्बळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥१॥ देतो हाका कोण्ही नायकती द्वारीं । वोस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥२॥ आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेंचे ॥३॥ तुका म्हणे तुम्हां साजे हें श्रीहरी । आम्हां निलाजिरी नाहीं ऐसीं ॥४॥

१०१९. आम्ही मागूं ऐसें नाहीं तुजपासीं । जरी तूं भितोसी पांडुरंगा ॥१॥ पाहें विचारून आहे तुज ठावें । आम्हीं घालों नांवें तुझ्या एका ॥२॥ रिद्धिसिद्धि तुझें मुख्य मांडवल । हें तों आम्हां फोल भक्तीपुढें ॥३॥ तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत । बैसून निवांत सुख भोगूं ॥४॥

१०२०. नलगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरें ॥१॥

लागला उशीर पतीतपावना । विसरोनी वचना गेलासी या ॥ २ ॥
जाळोनी संसार बसलों अंगणीं । तुझें नाहीं मनीं मानसींही ॥ ३ ॥
तुका म्हणे नको रागें जो विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ॥४॥

१०२१. कुमुदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥१॥ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेम खुण जाणो ॥२॥ माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥३॥ तुका म्हणे मुक्ताफळ सिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोगातिये ॥४॥

१०२२. काय सांगों तुझ्या चरणींच्या सूखा । अनुभव ठाऊका नाहीं तुज ॥१॥ बोलतां हें कैसें वाटे खरेंपण । अमृताचे गुण अमृतासी ॥२॥ आम्ही येक येका ग्वाही मायपूतें । जाणों तें निरुतें सुख दोघे ॥३॥ तुका म्हणे आम्हां मोक्षाचा कांटाळा । कां तुम्ही गोपाळा नेणां ऐसें ॥३॥

१०२३. देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवोनियां ॥१॥ तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥२॥ मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥३॥ तुका म्हणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥४॥

१०२४. आतां येणेंवीण नाहीं आम्हां चाड । कोण बडबड करी वायां ॥१॥ सुख तेंचि दुःख पुण्य पाप खरें । हें तों आम्हां बरें कळों आलें ॥२॥ तुका म्हणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥३॥

१०२५. बोलों अबोलणें मरोनियां जीणें । असोनी नसणें जनीं आम्हां ॥१॥ भोगीं त्याग झाला संगींच असंग । तोडियेला लाग माग दोन्ही ॥२॥ तुका म्हणे नव्हे दिसतों मी तैसा । पुसणें तें पूसा पांडुरंगा ॥३॥

१०२६. अधिकार तैसा दाविला मारग । चालताहे मग कळों येतें ॥१॥ जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥२॥ तुका म्हणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥३॥

१०२७. संसार हा तींहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्य दारा जया चित्तीं ॥१॥ शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होउनि ठेला ॥२॥ तुका म्हणे देह दिल्हा येकसरें । जयांसी दुसरें नाहीं मग ॥३॥

१०२८. देहबुद्धी लोभ वसे जया चित्तीं । आपुलें जाणती परावें जे ॥१॥ तयांसी चालतां पाहिजे शिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥२॥ तुका म्हणे धर्म रक्षायाकारणें । छाया इच्छा उन्हें तापला तो ॥३॥

१०२९. काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्ति संहार घडामोडी ॥१॥ बीज तो अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता शेवटीं येकाचीया ॥२॥ तुका म्हणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें कैसें कळों नये ॥३॥

१०३०. आणीक या काळें न चले उपाय । धरावे ते पाय विठोबाचे ॥१॥ अवघेंचि पुण्य असे तया पोटीं । अवघींया तुटी होय पापा ॥२॥ अवघे मोकळें अवघीया काळे । उद्धरती कुळें नरनारी ॥३॥ काळ वेळ नाहीं गर्भवास दुःखें । उच्चारितां मुखें नाम येक ॥४॥ तुका म्हणे कांहीं नलगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥५॥

१०३१. कां रे माझा तुज नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥१॥ अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणा कंठस्फोट ॥२॥ कां हें चित्त नाहीं पावत विश्रांति । इंद्रियांची गती खुंटेचिना ॥३॥ तुका म्हणे कां रे धरीयेला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा ॥४॥

१०३२. दीनानाथ तुझीं ब्रीदें चराचर । घेशील कैवार शरणागता ॥१॥ पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आम्हां रोकडे कळों आले ॥२॥ आपुल्या दासाचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहीलासी ॥३॥ चक्र गदा हातीं आयुधें अपार । न्यून तेंचि पुरें करूं धांवे ॥४॥ तुका म्हणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥५॥

१०३३. वर्णूं महिमा ऐसीं नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥१॥ ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओवाळुनी काय सांडूं ॥२॥ नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ॥३॥ मज माझें कांहीं न दिसें पाहातां । जें तुज अनंता समर्पावें ॥४॥ तुका म्हणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥५॥

१०३४. नव्हे सुख मज नलगे हा मान । न राहे हे जन काय करूं ॥१॥ देह उपचारें पोळतसे अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न तें ॥२॥

नाईकवे स्तुति वाणितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥३॥ तुज पावे ऐशी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोऊं मज ॥४॥ तुका म्हणे आतां करी माझें हित । काढावें जळत आगींतुनी ॥५॥

१०३५. न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥१॥ ऐशी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगें ॥२॥ विटंबो शरीर होत कां विपत्ती । परी राहों चित्तीं नारायण ॥३॥ तुका म्हणे नाशीवंत हे सकळ । आठवे गोपाळ तेंची हित ॥४॥

१०३६. पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करोनियां ॥१॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयांचिया ॥२॥ क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥३॥ कवंतिला देह कापीयेलें मांसा । गेले वनवासा शुकादिक ॥४॥ तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी येक पाय जळे ॥५॥

१०३७. जरि माझी कोण्ही कापितील मान । तरि नको आण वदों जिव्हे ॥१॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥२॥ आणिकाची मात नाईकावी कानीं । आणीक नयनीं न पाहावें ॥३॥ चित्ता तुवां पाई राहावें अखंडीत । होऊनी निचिंत येकविध ॥४॥ चला हात पाय हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबासी ॥५॥ तुका म्हणे आम्हां भय काय करी । आमुचा कैवारी नारायण ॥६॥

१०३८. करिसी ते देवा करीं माझे सुखें । परी त्यासी मुखें न म्हणे संत ॥१॥ जया राज्य द्रव्य करणें उपार्जन । वसे दंभमान इच्छे झाले ॥२॥ जग देव परी निवडे निराळे । ज्ञानाचे आंधळे मार वाही ॥३॥ तुका म्हणे भय न धरीं मानसीं । ऐशियाची विशीं करितां दंड ॥४॥

१०३९. म्हणविती ऐसें आइकतो संत । न देखिजे होत डोळां कोण्ही ॥१॥ ऐसियाचा कोण मानितो विश्वास । निवडितो रस घाई डाई ॥२॥ पर्जन्याचे काळीं ओहळाचे नद । वोसरतां बुंद न थारेची ॥३॥ हिऱ्या ऐशा गारा दिसती दुरून । तुका म्हणे घन न भेटे तो ॥४॥

१०४०. अतिवादें लावी । येक बोट सोंग दावी ॥१॥ त्याचा

बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ २ ॥ प्रतिपादी वाळी । येक पूजी येका छळीं ॥३॥ तुका म्हणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥४॥

१०४१. पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयांचे भेद विषयरूप ॥१॥ अर्थी परमार्थ कैसा घडों शके । चित्त लोभी मीकें सोंग वायां ॥२॥ देवाचीं चरित्रें दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥३॥ तुका म्हणे चित्तीं राहे अभिलाष । दोघां नरकवास सारिखाची ॥४॥

१०४२. भुंकतीं ते द्यावीं भुंकों । आपण त्याचें नये शिकों ॥१॥ भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं नये कांहीं साचें ॥२॥ होईल तैसें बळ । फजित करावे ते खळ ॥३॥ तुका म्हणे त्याचें । पाप नाहीं ताडणाचे ॥४॥

१०४३. जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥ १ ॥ नको भोंवताले जगीं । पाहों जवळीं राख अंगीं ॥२॥ कुड्याची संगती । सदा भोजन पंगती ॥३॥ तुका म्हणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥४॥

१०४४. फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परी ते निराळे गुणा मोल ॥१॥ पायरी प्रतिमा येकचि पाषाण । परि तें महीमान वेगळालें ॥२॥ तुका म्हणे तैशा नव्हतील परी । संत जना सरी सारिखीया ॥३॥

१०४५. कांहींच मी नव्हे कोणिये गांवींचा । येकटा ठायींचा ठायीं येक ॥१॥ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वायांवीण बोले ॥२॥ नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोण्हाचा मी खरें कांहीं नोव्हे ॥३॥ नाहीं आम्हां जावें मरावें लागत । अहो अखंडीत जैसें तैसें ॥४॥ तुका म्हणे नांव रूप नाहीं आम्हां । वेगळा त्या कर्मा अकर्माशीं ॥५॥

---

### लोहोगांवास परराज्याचा वेढा पडला होता
### ते समयीं केले ते अभंग

१०४६. न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥१॥ काय तुम्ही येथें नसालसें झालें । आम्हीं न देखिलें पाहिजे हें ॥ २ ॥ परचक्र कोठें हरिदासांचे वासे । न देखिजेत देशें राहातीया ॥३॥ तुका म्हणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें झालें ॥४॥

१०४७. काय म्यां मानावें कथेचें हें फळ । तरिजे सकळ जन ऐसें ॥१॥ उच्छेद तो असे अंगें आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥२॥ पापावीण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडें साक्ष आलें ॥३॥ तुका म्हणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥४॥

१०४८. भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होते जनां न देखवे ॥१॥ आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुम्ही दातारा नेणां ऐसें ॥२॥ भजनीं विक्षेप तेंचि पैं मरण । न वजावा क्षण येक वायां ॥३॥ तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव मागें ॥४॥

१०४९. कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रती पावे ॥१॥ आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां ॥२॥ कुशळ चतुर येथें न सरते । करीतील रीते तर्क मतें ॥३॥ तुका म्हणे केणें झालें येके घरीं । मज आणि हरी तुम्हां गांठीं ॥४॥

१०५०. आमुचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीन देखोवेखीं ॥१॥ न कळे सतत हिताचा विचार । तेहि दारोदार खाती फेरे ॥२॥ वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । येक गेलें जावें त्याची वाटा ॥३॥ तुका म्हणे कोण्ही नाइके सांगतां । होती यमदूता वरपडे ॥४॥

१०५१. दीप घेवोनियां धुंडती अंधार । भेटे हा विचार अघटीत ॥१॥ विष्णुदास आम्ही न भ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥२॥ उधळतां माती रवीकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥३॥ तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगेंची ॥४॥

१०५२. नटनाट्य अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न पालटे ॥१॥ मांडियेला खेळ कौतुकें बहुरूप । आपुलें स्वरूप जाणतसों ॥२॥ स्फटिकाची शिळा उपाधी न भिळे । भाव दावि पिवळे लाल संगें ॥३॥ तुका म्हणे आम्ही या जना विरहीत । होऊनी निश्चिंत क्रीडा करूं ॥४॥

१०५३. तुजवीण वाणी आणिकाची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥१॥ तुजवीण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥२॥ नेत्रीं आणिकासी पाहीन आवडी । जावो तेच घडी चांडाळ

हे ॥३॥ कथामृत पान न करीती श्रवण। काय प्रयोजन मग यांचें ॥४॥ तुका म्हणे काय वांचोनी कारण। तुज येक क्षण विसंबतां ॥५॥

---

स्वामीचे स्त्रीनें स्वामीस कठीण उत्तरें केलीं ते अभंग.

१०५४. मजचि भोंवता केला येणें जोग। काय याचा भोग अंतरला ॥१॥ चालोनियां घरा सर्व सुखें येती। माझी तो फजिती चुकेचि ना ॥२॥ कोणाची बाईल होउनियां बोढ़ं। संवसारी काढ़ं अपदा किती ॥३॥ काय तरी देऊं तोडतील पोरें। मरतें तर बरें होतें आतां ॥४॥ कांहीं नेदि वांचों धोईयेलें घर। सारवाया ढोर शेण नाहीं ॥५॥ तुका म्हणे रांडे न करितां विचार। वाहुनीयां भार कुंथे माथां ॥६॥

१०५५. काय नेणों होता दावेदार मेला। वैर तो साधिला होवोनी गोहो ॥१॥ किती सर्व काळ सोसावें हें दुःख। किती लोकां मुख वासूं तरी ॥२॥ झवी आपुली आई काय माझें केलें। घड या विठ्ठलें संसाराचें ॥३॥ तुका म्हणे येती बाईले आसडे। फुंदोनियां रडे हासे कांहीं ॥४॥

१०५६. गोणी आली घरा। दाणे खाऊं नेदी पोरा ॥१॥ भरी लोकांची पाटोरी। मेला चोरटा खानोरी ॥२॥ खवळली पीशी। हातां झोंबे जैशी लाशी ॥३॥ तुका म्हणे खोटा। रांडे संचिताचा सांटा ॥४॥

१०५७. आतां पोरा काय खाशी। गोहो झाला देवलसी ॥१॥ डोचकें तिचीं घातल्या माळा। उदमाचा सांडि चाळा ॥२॥ आपुल्या पोटा थार। आमचा नाहीं येसपार ॥३॥ हातीं टाळ तोंड वाशी। गाय देउळीं देवापासीं ॥४॥ आतां आम्ही करूं काय। न वैसे घरीं राना जाया ॥५॥ तुका म्हणे आतां धीरी। अझुनि नाहीं झालें तरी ॥६॥

१०५८. बरवें झालें गेलें। आजि अवघें मिळालें ॥१॥ आतां खाईन पोटभरीं। ओल्या कोरड्या भाकरी ॥२॥ किती तरी तोंड। यासी वाजऊं मी रांड ॥३॥ तुका बाईले मानवला। छी थू करोनियां बोला ॥४॥

१०५९. निजों नेदी सकाळ वेळीं। राति काळीं चिनचिनीं ॥१॥ बोंगळानें घेतली पाठी। केली अटी जीवासी ॥२॥ मेळवोनी कथा

करणें । चिंता नेणें देउळींच ॥३॥ तुका म्हणे आलों घरा । तोंडा घोरा बाइलेच्या ॥४॥

१०६०. न करवे धंदा । अइता तोंडीं पडे लोंदा ॥१॥ उठितें तें कुटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥२॥ जीवंतचि मेले । लाजा वाटोनियां प्याले ॥३॥ संसाराकडे । न पाहाती वोस पडे ॥४॥ तळमळती यांच्या । जीवा नांवें धोंडा ॥५॥ तुका म्हणे बरें झालें । घेंगे बाइले लिहिलें ॥६॥

१०६१. कोण घरां येतें आमुच्या कशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥१॥ देवासाठीं झाले ब्रह्मांड सोयिरे । कोंवळ्या उत्तरें काय वेंचें ॥२॥ मानें पाचारितां नव्हें आगाणूक । ऐसे येती लोक प्रीतीसाठीं ॥३॥ तुका म्हणे रांडे नावडे भूषण । कांतलेसे श्वान पाठीलागे ॥४॥

१०६२. भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥१॥ करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुंस । खापरा परीस काय करी ॥२॥ निंबाचिया झाडा साखरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥३॥ तुका म्हणे वज्र भेदी येक वेळ । कठीण हे खळ तयाहुनी ॥४॥

१०६३. इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥१॥ नामीं रूपीं पडली गांठी । अवघ्या गोष्टी त्या सरल्या ॥२॥ मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥३॥ तुका म्हणे काय बोले । आतां भलें मौनेची ॥४॥

१०६४. साधनें तरी हीच दोन्हीं । जरी कोण्ही साधील ॥१॥ परद्रव्य परनारी । याचा धरी विटाळ ॥२॥ देव मार्गे घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥३॥ तुका म्हणे तें शरीर । गृहभांडार देवाचें ॥४॥

१०६५. आम्हांसाठीं अवतार । मच्छकूर्मादि शूकर ॥१॥ मोहें धांव घाली पान्हा । नाम घेतां पंढरिराणा ॥२॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥३॥ सुख ठेवी आम्हांसाठीं । दुःख आपणची घोटी ॥४॥ आम्हां घाली पाठीकडे । पुढें कळिकाळासी भिडे ॥५॥ तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरी नावेमधीं ॥६॥

१०६६. रवि रश्मि कळा । नये काढितां निराळा ॥१॥ तैसा आम्हां

झाला भाव । अंगीं जडोनि ठेला देव ॥२॥ गोडी साकरेपासुनी । कैसी निवडिती दोन्ही ॥३॥ तुका म्हणे नाद उठी । विसरूनि जाय नभा पोटीं ॥४॥

१०६७. थोडें परी निरे । अवीट तें घ्यावें खरें ॥१॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजापोटीं ॥२॥ चित्त ठेवी ग्वाही । आणिकासी चाड नाहीं ॥३॥ आपुलें तों हित फार । तुका म्हणें खरें सार ॥४॥

१०६८. अवघे देव साध । परी अवगुणाचे बाध ॥१॥ म्हणउनी नव्हे सरी । राहे येकायेकीं दुरी ॥२॥ ऊंस कांदा येक आळां । स्वाद पाहतां निराळा ॥३॥ तुका म्हणे नव्हे सरी । विष अमृताचे परी ॥४॥

१०६९. शांती परतें नाहीं सुख । येर अवघेंचि दुःख ॥१॥ म्हणउनी शांती धरा । उतराल पैल तीरा ॥२॥ खवळिलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधीव्याधी ॥३॥ तुका म्हणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप ॥४॥

१०७०. गोडीपणें जैसा गुळ । तैसा देव झाला सकळ ॥१॥ आतां मजों कोण्हे परी । देव सबाह्य अंतरीं ॥२॥ उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥३॥ हेम अलंकार नामीं । तुका म्हणे तैसे आम्ही ॥४॥

१०७१ परमेष्टीपदा । तुच्छ मानिती सर्वदा ॥१॥ हेंचि जयाचें धन । सदा हरीचें स्मरण ॥२॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥३॥ सार्वभौमराज्य । त्यासी कांहीं नाहीं काज ॥४॥ पाताळींचें आधिपत्य । तें तों मानिती विपत्य ॥५॥ योगसिद्धीसार । त्यासी वाटे तें असार ॥६॥ मोक्षा येवढें सुख । सुख नव्हे तेंचि दुःख ॥७॥ तुका म्हणे हरीवीण । त्यासी अवघा वाटे शीण ॥८॥

१०७२. मोहऱ्याचे संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥१॥ नाहींतरी त्याचें भक्ष । काये सांगणें तें साक्ष ॥२॥ स्वामीचिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥३॥ तुका म्हणे खोडी । देवमाणि न देति दडी ॥४॥

१०७३. मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥१॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करुनी मुख ॥२॥ येथें न सरे चार । हीन आणिक वेव्हार ॥३॥ तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥४॥

१०७४. भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥१॥ धन्य धन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥२॥ बहुत बराडी । देवावरी ती आवडी ॥३॥ तुका म्हणे हे रोकडे । लाभा अधिकारी चोखडे ॥४॥

१०७५. गौरव गौरवापुरतें । फळ सत्यचि संकल्पें ॥ १ ॥ कठिण योगाहुनी क्षेम । वोकलिया होतो श्रम ॥२॥ पावलें मरे शिवेपासीं । क्लेश उतरते क्लेशीं ॥३॥ तुका म्हणे बहु आणी । कठिण निघालीया रणीं ॥४॥

१०७६. न संडी अवगुण । वर्मे मानीतसे शीण ॥१॥ भोग देतां करिती काई । फुटतां यमदंडी डोयी ॥२॥ पापपुण्या झाडा । देतां तेथें मोठी पीडा ॥३॥ तुका म्हणे बोला । माझ्या शिणती विठ्ठला ॥४॥

१०७७ पावे ऐसा नाश । अवघिया दिल्हा त्रास ॥१॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥२॥ आइताचि पाक । संयोगाचा सकळिक ॥३॥ तुका म्हणे धनी । । सीमा राहिली होवोनी ॥४॥

१०७८. दुर्बळे हे अवघे जन । नारायणीं विनमुख ॥१॥ सांडोनियां हित जाती । पात्र होती दंडासी ॥२॥ सिदोरी तें पापपुण्य । संवे शीण भिकेचा ॥३॥ तुका म्हणे पडिला वाहो । कैसा पाहा हो लटिक्याचा ॥४॥

१०७९. वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥१॥ जिंकोनियां अहं-कार । पावठणी केलें शीर ॥ २ ॥ काळा नाहीं वाव । पराश्रमा कोठें ठाव ॥३॥ तुका म्हणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥४॥

१०८०. झाड कल्पतरू । न करी याचकी अव्हेरू ॥१॥ तुम्ही सर्व सर्वोत्तम । ऐसें विसरतां नाम ॥२॥ परिसा तुमचें देणें । तो त्या जाये अभिमानें ॥३॥ गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारोनियां हाका ॥४॥

१०८१. वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥१॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥२॥ संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥३॥ तुका म्हणे काळ । अवघा गोविंदें सुकाळ ॥४॥

१०८२. येथील हा ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥१॥ घरीं देवाचा अबोला । यासि तेचि सवे त्याला ॥२॥ नाहीं पाहावें लागतें । येका-येकिंच ते रितें ॥३॥ तुका म्हणे जन । तयांमध्यें येवढें भिन्न ॥४॥

१०८३. करितां देवार्चन । घरा आले संतजन ॥१॥ तरी तें सारावें परतें । संत पूजावे आरते ॥२॥ शालिग्राम विष्णुमूर्ती । संत हो का मलते याती ॥३॥ तुका म्हणे संधी । अधिक वैष्णवाची मांदी ॥४॥

१०८४. ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥१॥ करितां स्वामीसवें वाद । अधिकाअधिक आनंद ॥२॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥३॥ वदे वाग्देवी । तुका विठ्ठली गौरवीं ॥४॥

१०८५. देवें जीव धाला । संसार तो कडू झाला ॥१॥ तेचि येताती ढेंकर । आनंदाचें हरिहर ॥२॥ वेधि आणिकास । ऐसा जया अंगीं कस ॥३॥ तुका म्हणे भूक । येणें नलगे आणिक ॥४॥

१०८६. नाम साराचेंहि सार । शरणागत यमकिंकर ॥१॥ नाम उत्तमा उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ २ ॥ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हा कोळी ॥३॥ तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥४॥

१०८७. गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥१॥ परि तूं पतीतपावन । करी साच हें वचन ॥२॥ मुखें म्हणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥३॥ तुका म्हणे दावी वेष । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥४॥

१०८८. द्रव्य असतां धर्म न करी । नागविला राजद्वारीं ॥१॥ माय त्यासी व्याली जेव्हां । रांड सटवी नव्हती तेव्हां ॥२॥ कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥३॥ भोग स्त्रियेसी देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनी निजे ॥४॥ तुका म्हणे जाण । नर गाढवाहूनि हीन ॥५॥

१०८९. मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अभिमान ॥१॥ ऐसियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ॥२॥ पोटासाठीं संत । झाले कलीत बहुत ॥३॥ विरळा ऐसा कोण्ही । तुका त्यासी लोटांगणीं ॥४॥

१०९०. येक वेळे प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥१॥ अहंकार नांवें दोष । त्याचें वोस पाडिलें ॥२॥ अनुतापें स्नानविधि । यज्ञ सिद्धि देह होम ॥३॥ जीवा शीवा होतां चुका । तेथें तुका विनटला ॥४॥

१०९१. त्रैलोक्य पाळी उबगला नाहीं । आमुचे त्या काई असे वोझें ॥१॥ पाषाणाचे पोटीं बैसला दर्दूर । तया मुखीं चारा कोण घाली

॥२॥ पक्षी अजगर न करी संचित । तयासी अनंत प्रतिपाळी ॥३॥ तुका म्हणे तया भार घातलीया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥४॥

१०९२. दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें ॥१॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥२॥ तुम्ही पापा भीतां । आम्हां उपजावया चिंता ॥३॥ तुका म्हणे सेवा । कळीकाळा जिंकी देवा ॥४॥

१०९३. करा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥१॥ वृत्ति राखा पायांपासीं । वस्ति धरूनि मानसीं ॥२॥ पाळोनियां लळा । आतां पाववावें फळा ॥३॥ तुका म्हणे दीन । त्याचा हरतिया शीण ॥४॥

१०९४. मी तों दीनाहुनी दीन । माझा तुज अभिमान ॥१॥ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥२॥ दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥३॥ तुका म्हणे आतां । नव्हे भले मोकलितां ॥४॥

१०९५. नाहीं दुःकाळलों अन्ना । परी या मान जनार्दना ॥१॥ देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥२॥ भोगी भोगवितां । बाळासवें तोचि पिता ॥३॥ कर्म अकर्म जळालें । प्रौढ तुका तें उरलें ॥४॥

१०९६. काय खावें आतां कोणीकडे जावें । गांवांत राहावें कोण्या बळें ॥१॥ कोपला पाटील गांवचे हे लोक । आतां घाली भीक कोण मज ॥२॥ आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाड करिती दिवाणांत ॥३॥ भल्या लोकीं यास सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥४॥ तुका म्हणे याचा संग नव्हे भला । शोधित विठ्ठला जाऊं चला ॥५॥

१०९७. संत मागे पाणी नेदी येक चुळी । दासीस आंघोळी ठेवी पाणी ॥१॥ संतांसी देखोनी होय पाठीमोरा । दासीचिया पोरा चुंबन देतो ॥२॥ संतासी देखोनी करितो टवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीचिया ॥३॥ तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥४॥

१०९८. बरवा बरवा बरवा देवा तूं । जीवाहुनी आवडसी जीवा रे देवा तूं ॥१॥ पाहतां वदन संतुष्ट वचन । झालें ऐकतां गुण रे देवा ॥२॥ अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला शीण । वर्णितां लक्षण रे देवा ॥३॥ मन झालें उन्मन अनुपम्य गहन । तुकया बंधु म्हणे महिमा नेणें रे ॥४॥

१०९९. सोयीरीया करी पाहूणेर बरा । कांडितो ठोंबरा संतांलागीं ॥१॥ गाईसी देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥२॥ फुलें पानें वेश्येसी नेतसे उदंड । देवो नेदी खांड ब्राह्मणासी ॥३॥ बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितयांसी दवडितो ॥४॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥५॥

११००. सोलींव जें सुख अति सुखाहुनी । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या ॥१॥ वृंदावन सडे चौक रंगमाळा । नाचतो सोहळा देखोनियां ॥२॥ भूषण मंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥३॥ नाम बोध मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥४॥ तुका म्हणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हे वासना त्यांची करी ॥५॥

११०१. तीर्थें केली कोटिवरी । नाहीं देखिली पंढरी ॥१॥ जळो त्याचें ज्यालेपण । न देखेचि समचरण ॥२॥ योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥३॥ तुका म्हणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडलीं पाहीं ॥४॥

११०२. कोणते कारणें राहिली यामुळें । ते म्यां तुज बळें कष्टवावें ॥१॥ नाहीं जात जीव नाहीं होत हाणी । सहज तें मनीं आठवलें ॥२॥ नाहीं कांहीं चिंता मरतो उपासीं । अथवा त्या म्हशी गाई व्हाव्या ॥३॥ हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लापणीक वरी साच भाव ॥४॥ तुका म्हणे देवा नाशिवंतासाठीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥५॥

११०३. आमिषाचिये आशें गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥१॥ मरणाचिये वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळे ॥२॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका म्हणे सुखा पार नाहीं ॥३॥

११०४. तुजवरी ज्याचें मन । दरुशन दे त्याचें ॥१॥ कैसा जाती शुद्ध भाव । हात पाव ना वृत्ति ॥२॥ अवघियांचा करुनी मेळा । तुज डोळां रोखिलें ॥३॥ तुका म्हणे तुज आड । लपोनि कोड दावीं देवा ॥४॥

११०५. विश्वव्यापी माया । तिणें झांकुळिलें छाया ॥१॥ सत्य गेलें मोळ्यावारी । अविद्येची चाली थोरी ॥२॥ आपुलेंचि मन । करवी आपणा बंधन ॥३॥ तुका म्हणे देवा । तुम्ही कोडीं हीं उगवा ॥४॥

११०६. पोटीं जन्मती रोग । तरी कां म्हणावे आप्तवर्ग ॥१॥ रानीं वसती औषधी । तरी का म्हणाव्या निरपराधी ॥२॥ तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्वे आप्ते ॥३॥

११०७. नव्हे शब्द येक देशी । सांडि गिवसी कोणाला ॥१॥ झाली माझी वैखरी । विश्वंभरीं व्यापक ॥२॥ मोकलिलें जावें बाणें । माता जेणें वाईलें ॥३॥ आतां येथें कैचा तुका । बोले सिका स्वामीचा ॥४॥

११०८. गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥१॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडीत सेवा ॥२॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥३॥ तुका म्हणे वाणी । परम अमृताची खाणी ॥४॥

११०९. माप म्हणे मी मवितें । मरी धनी ठेवी रितें ॥१॥ देवा अभिमान नको । माझे ठाई देवों शकों ॥२॥ देशी चाले शिका । रीतें कोण लेखी रंका ॥३॥ हातीं सूत्रदोरी । तुका म्हणे त्याची थोरी ॥४॥

१११०. कोण सांगायास । गेले होते देशोदेश ॥१॥ नेलें वारिया हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥२॥ कोणाची हे सत्ता । झाली वाचा वदविता ॥३॥ तुका म्हणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥४॥

११११. सकळिकांच्या पाया माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥१॥ अहो श्रोते वक्ते सकळही जन । बरें पारखून बांधा गांठीं ॥२॥ फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तंव हमाल भार वाही ॥ ३ ॥ तुका म्हणे चाली झाली चहूं देशीं । उतरला कशीं खरा माल ॥४॥

१११२. कोण त्याचा पार पावला धुंडीता । पुढें विचारितां विश्वंभरा ॥१॥ अणु रेणु सूक्ष्म स्थूळा पार नाहीं । श्रुति नेती त्याही खुंटियेल्या ॥२॥ फळांत कीटक येवढें आकाश । ऐशीं तरुवरास अनेक किती ॥३॥ दाविलें अनंतें अर्जुनासीं पोटीं । आणिक त्या सृष्टीं कृष्ण लोक ॥४॥ तुका म्हणे लागा संताचिये कांसे । ठाव घेतां कैसें वांचा जीवें ॥५॥

१११३. जें जें कांहीं करितों देवा । तें तें सेवा समर्पे ॥१॥ भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥२॥ आम्ही दुजें नेणों कोणा । हेंचि मना मन साक्ष ॥३॥ तुका म्हणे जगन्नाथा । हें अन्यथा नव्हे कीं ॥४॥

१११४. स्तुती करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥१॥ परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छितसे ॥२॥ रूप वर्णाविया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥३॥ तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ॥४॥

१११५. तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोण्ही तिहीं त्रिभुवनीं ॥१॥ सहस्रमुखें शेष शीणला बापुडा । चिरिलिया धडा जिव्हा त्याच्या ॥२॥ अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा ॥३॥ रूपा नांव घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥४॥ तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरीच नारायणा कळों येसी ॥५॥

१११६. पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥१॥ बांधूं विट्ठलसांगडी । पोहोनि जाऊं पैलथडी ॥२॥ अवघेजणे गडी । घाला उडी भाईनो ॥३॥ हें तों नाहीं सर्व काळ । अमुप अमृताचें जळ ॥४॥ तुका म्हणे थोरा पुण्यें । वोघ आला पंथें येणें ॥५॥

१११७. आणिक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्ता पासूनियां ॥१॥ पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥२॥ पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥३॥ तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण । साजिरें तें ध्यान विटेवरी ॥४॥

१११८. मी तों सर्व भावें अनधिकारी । होईल कैसी परी नेणों देवा ॥१॥ पुराणींचा अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥२॥ इंद्रियांचीं आम्हीं पांगीलों अंकीत । त्याचे रंगीं चित्त रंगलेंसे ॥३॥ येकाचेंहि मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखूं ॥४॥ तुका म्हणे मज तारीं पंढरीराया । नाहीं तरी वायां गेलों दास ॥५॥

१११९. लक्षुनियां योगी पाहाती आभास । ते दिसे आम्हां दृष्टीपुढें ॥१॥ कर दोन्हीं कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥२॥ व्यापुनी वेगळे राहीलेंसे दुरी । सकळां अंतरीं निर्विकार ॥३॥ रूप नाहीं रेखा नामही जयासी । आपुले मानसीं शिव ध्याये ॥४॥ अंत नाहीं पार

वर्णा नाहीं थार । कुळ याति शीर हस्त पाद ॥५॥ अचेत चेतले भक्ती-
चिया सुखें आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥६॥

११२०. कसें करूं ध्यान कैसा पाहूं तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥१॥ कैसी भक्ती करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥२॥ कैसी कीर्ति वाणूं कैसा लक्षां आणूं । जाणुं हा कवणु कैसा तुज ॥३॥ कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावीं मज ॥४॥ तुका म्हणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥५॥

११२१. निगमाचें वन । नको शोधूं करूं शीण ॥१॥ तें या गवळि-
यांचे घरीं । बांधलेंसे दावे वरी ॥२॥ पडिलेती भ्रमें । वाटा न कळतां वर्में ॥३॥ तुका म्हणे मार । माथां टाका अहंकार ॥४॥

११२२. मन वोळी मना । बुद्धि बुद्धि क्षणक्षणां ॥१॥ मीच मज राखण झालों । ज्यानें तेथेंची धरिलों ॥२॥ जें जें जेथें उठी । तें तें तया हातें कुटी ॥३॥ भाजली खांजणीं । तुका साक्ष उरला दोन्ही ॥४॥

११२३. ब्रह्म न लिंपे त्या मेळे । कर्मा अकर्मावेगळें ॥१॥ तोचि येक तया जाणे । पावे अनुभविलें खुणें ॥२॥ शौच अशौचाचें संधीं । तन आळा तनामधीं ॥३॥ पापपुण्या नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ॥४॥

११२४. काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥१॥ तरी काय तेथें असती थोडीं । काय जोडी तयांसी ॥२॥ रिघतां धांवा पेंवामधीं । जोडे सिद्धी ते ठाईं ॥३॥ काय भस्म करिल राख । अंतर पाक नाहीं तों ॥४॥ वर्णाश्रमाचे धर्म । जाती श्रम झालीया ॥५॥ तुका म्हणे सोंग पाश । निरसे आस तें हित ॥६॥

११२५. तेंहि नव्हे जें करितां कांहीं । ध्यातां ध्याई तेंही नव्हे ॥१॥ तेंही नव्हे हें जाणवी जना । वाटे मना तेंही नव्हे ॥२॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तेंही नव्हे ॥३॥ तेंही नव्हें जें मोंवतें मोंवे । नागवें धांवें तेंही नव्हे ॥४॥ तुका म्हणे येकचि आहे । सहजीं पाहे सहज ॥५॥

११२६. बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥१॥ नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥२॥ वीष खावें ग्रासो-

आसी । धन्य तोची येक सोसी ॥३॥ तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥४॥

११२७. विठ्ठला रे तूं उदारांचा राव । विठ्ठला तूं जीव या जगाचा ॥१॥ विठ्ठला रे तूं उदाराची रासी । विठ्ठला तुजपासीं सकळ सिद्धी ॥२॥ विठ्ठला रे तुझें नाम बहु गोड । विठ्ठला रे तूं कोड पुरविसी ॥३॥ विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें । विठ्ठला लागलें ध्यान मनीं ॥४॥ विठ्ठला रे वाचे बोला बहु रस । विठ्ठला रे सोस घेतला जीवें ॥५॥ विठ्ठला रे शोक करीतसे तुका । विठ्ठला रे तूं ये का झडकरी ॥६॥

११२८. बाहीर पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासी जीवें वेटाळिलों ॥१॥ येकामधीं येक नाहीं मिळों येत । ताका नवनीत निवडीलें ॥२॥ झालीं दोन्ही नामें येकाचि मंथनीं । दुसरिया गुणें वेगळालीं ॥३॥ तुका म्हणे दाखविल्या मुक्ताफळीं । सिंपीलेंचि स्वस्थळीं खुंटलिया ॥४॥

११२९. होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥१॥ हाचि माझा नेम धर्म । मुखीं विठोबाचें नाम ॥२॥ हेचि माझी उपासना । लागे संतांच्या चरणा ॥३॥ तुका म्हणे देवा । करीत ते भोळी सेवा ॥४॥

११३०. सांठविला हरी । जीहीं हृदयमंदिरीं ॥१॥ त्यांची सरली वेरझार । झाला सफळ व्यापार ॥२॥ हरी आला हाता । मग कैंची भय चिंता ॥३॥ तुका म्हणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥४॥

११३१. मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥१॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥२॥ आपुल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥३॥ तुका म्हणे भेटी । पुरे येकची शेवटीं ॥४॥

११३२. नामपाठ मुक्ताफळांची वोवणी । हें सुख सगुणीं अभिनव ॥१॥ तरी आम्ही झालों उदास निर्गुणा । भक्ताचिया मना मोक्ष नये ॥२॥ द्यावें घ्यावें ऐसा येथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनीयां ॥३॥ तुका म्हणे आतां अभयदान करा । म्हणा विश्वंभरा दिल्हें ऐसे ॥४॥

११३३. भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥१॥ तारूं

मला पांडुरंग । पाय मिजों नेदी अंग ॥२॥ मागे उतरिले बहुत । पैल तीरीं साधुसंत ॥३॥ तुका म्हणे लागवेगें । जाऊं तयाचियामार्गें ॥४॥

११३४. नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ॥ १ ॥ असें तुमचा रजरेण । संतापाईंची वाहाण ॥२॥ नाहीं स्वरूपीं वोळखी । भक्तीभाव करीं देखीं ॥३॥ नाहीं शून्याकारी । क्षर वोळखी अक्षरीं ॥४॥ नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें काई ॥५॥ कांहीं नव्हे तुका । पायां पडणें हें ऐका ॥६॥

११३५. सत्य साच खरें । नाम विठोबाचें बरें ॥१॥ येणें तुटती बंधनें । उभय लोकीं कीर्ती जेणें ॥२॥ भाव ज्याचे गांठीं । त्यासी लाभ उठाउठी ॥३॥ तुका म्हणे भोळा । जिंकूं जाणे कळीकाळा ॥४॥

११३६. सत्य तो आवडे । विकल्पानें भाव उडे ॥१॥ आम्ही तुमच्या कृपादानें । जाणों शुद्ध मंद सोनें ॥ २ ॥ आला भोग अंगा । न लाऊं उशीर त्या त्यागा ॥३॥ तुका म्हणे देवा । अंजन तें तुझी सेवा ॥४॥

११३७. करावें चिंतन । तेंचि बरें न भेटून ॥१॥ बरवा अंगीं राहे भाव । तंग तोचि जाणा देवो ॥२॥ दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ॥३॥ तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ॥४॥

११३८. जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवें ॥१॥ सहज पूजा याची नांवें । गळित अभिमानें व्हावें ॥२॥ अवघे भोगितां गोसावी । आदि अवसानीं जीवीं ॥३॥ तुका म्हणे शीण । न धरितां नव्हे भिन्न ॥४॥

११३९. नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥१॥ देह पडो या चिंतनें । विठ्ठल नामसंकीर्तनें ॥२॥ दंभास्थिती भलत्या भावें । मज हरिजन म्हणावें ॥३॥ तुका म्हणे काळांतरीं । मज सांभाळील हरी ॥४॥

११४०. नये जरी कांहीं । तरी भलतेंची वाहीं ॥१॥ म्हणविल्या दास । कोणी न धरी वेठीस ॥२॥ समर्थांच्या नांवें । भलतेसेंचि विकावें ॥३॥ तुका म्हणे सत्ता । वरी असे ते बहुतां ॥४॥

११४१. न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥१॥ म्हणवोनि नारा-

यणा । कींव माकितों करुणा ॥२॥ नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अक्षर ॥३॥ तुका म्हणे थोडें । आयुष्य वेचें अवघें कोडें ॥४॥

११४२. येकाचि उत्तरें । गोड अमृत मधुरें ॥ १ ॥ ऐशा देवाच्या विभूति । भिन्न प्रारब्धाची गती ॥२॥ एकाचीं वचनें । कटु अत्यंत तीक्ष्णें ॥३॥ प्रकाराचे तीन । तुका म्हणे केले जन ॥४॥

११४३. वचनें ही नाड । न बोले तें मुकें खोड ॥१॥ दोहीं वेगळें तें हित । बोली अबोलणीं नीत ॥२॥ अंधार प्रकाशीं । जाय. दिवस पावे निशी ॥३॥ बीज पृथ्वीच्या पोटीं । तुका म्हणे दावी दृष्टी ॥४॥

११४४. विचारावांचून । न पवीजे समाधान ॥१॥ देहे त्रिगुणांचा बांधा । माजी नाहीं गुण सुधा ॥२॥ देवाचिये चाडे । देवा द्यावें जें जें घडे ॥३॥ तुका म्हणे होतें । बहु गोमटें उचितें ॥४॥

११४५. तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥१॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥२॥ वसों न शके पाप । जाय त्रिविध तो ताप ॥३॥ तुका म्हणे माया । होय दासी लागे पायां ॥४॥

११४६. मुसावलें अंग । रंगी मेळविला रंग ॥१॥ येकीं येक दृढ झालें । मुळा आपुलिया आलें ॥२॥ सागरीं थेंबुटा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥३॥ तुका म्हणे नवे । नव्हे जाणावे हें देवें ॥४॥

११४७. अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥१॥ परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥२॥ हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ॥३॥ तुका म्हणे पापा । शिवों नये अनुतापा ॥४॥

११४८. चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥१॥ तैसी नव्हे भोळी सेवा । येक भावचि कारण देवा ॥२॥ तपें इंद्रियां आघात । क्षणा येका वाताहात ॥३॥ मंत्र चळे थोडा । तरि धडचि होय वेडा ॥४॥ व्रतें करितां सांग । तरी येक चुकतां भंग ॥५॥ धर्म सत्वचि कारण । नाहीं तरी केला शीण ॥ ६ ॥ भूतदयेसी आघात । उंचनीच वाताहत ॥७॥ तुका म्हणे दुजें । विधि निषेधाचें वोझें ॥८॥

११४९. सोडिला संसार । माया तया वरी फार ॥१॥ धांवे चाले

मागें मागें । सुखदुःख साहे अंगें ॥२॥ यानें घ्यावें नाम । तिसीं करणें त्याचें काम ॥३॥ तुका म्हणे मोळी । विठ्ठलकृपेची कोंवळी ॥४॥

११५०. बैसों खेळूं जेऊं । तेथें नाम तुझें गाऊं ॥१॥ रामकृष्णनाममाळा । घालूं वोंऊनियां गळां ॥२॥ विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥३॥ तुका म्हणे आतां । आम्हां जीवन शरणागतां ॥४॥

११५१. पाठीं पोटीं देव । कैंचा हरिदासां भेव ॥१॥ करा आनंदें कीर्तन । नका आशंकित मन ॥२॥ येथें कोठें काळ । करील देवापासीं बळ ॥३॥ तुका म्हणे धनी । सपुरता काय वाणी ॥४॥

११५२. मनोमय पूजा । हेचि पढिये केशीराजा ॥१॥ घेतो कल्पनेचे भोग । न मानिती बाह्य रंग ॥२॥ अंतरींचें जाणें । आदिवर्तमान खुणें ॥३॥ तुका म्हणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥४॥

११५३. जाणें भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ॥१॥ आणिक नये माझ्या मना । हो का पंडीत शाहाणा ॥२॥ नामीं रूपीं जडलें चित्त । दास त्याचा मी अंकित ॥३॥ तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥४॥

११५४. याजसाठीं वनांतरा । जातों सांडोनियां घरा ॥१॥ माझें दिटावेल प्रेम । बुद्धि होईल निष्काम ॥२॥ अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥३॥ तुका म्हणे अहंब्रह्म । आड येऊं नेदी भ्रम ॥४॥

११५५. बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥१॥ नको मानूं भार । पाहूं दोषाचे डोंगर ॥२॥ आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥३॥ तुका म्हणे दोषी । मी तो पातकांची राशी ॥४॥

११५६. अक्षई तें जालें । आतां न मोडे रचिलें ॥१॥ पाया पडिला खोले ठायीं । तेथें पुढें चाली नाहीं ॥२॥ होतें विखुरलें । ताळा जमे झडती आलें ॥३॥ तुका म्हणे बोली । पुढें कुंठीतचि झाली ॥४॥

११५७. न मानावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ॥१॥ ज्यानें लौकिक हा केला । तो हा निवारिता भला ॥२॥ माझे इच्छे काय । जाणार तें येक ठाय ॥३॥ सुखा आणि दुःखा । म्हणे वेगळा मी तुका ॥४॥

११५८. तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥१॥ जपतपादि साधनें । मज चिंतवेना मनें ॥२॥ करुणावचनें । म्यां भाकावी तुम्हां दीनें ॥३॥ तुका म्हणे घेईं । माझें थोडें फार ठायीं ॥४॥

११५९. लाउनी काहाळा । सुखें करितों सोहळा ॥१॥ सादावीत गेलों जना । भय नाहीं सत्य जाणा ॥२॥ गात नाचत विनोदें । टाळ-घागऱ्यांच्या छंदें ॥३॥ तुका म्हणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥४॥

११६०. मुक्त कासया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥१॥ सुखें करितों कीर्तन । भय विसरलें मन ॥२॥ देखिजेना नास । घालों कोणावरी कास ॥३॥ तुका म्हणे साह्य । देव आहे तैसा आहे ॥४॥

११६१. बोनाम्याच्या काळें । खडे मांडवले बाळें ॥१॥ तेंचि पुढें पुढें कायी । मग लागलिया सोई ॥२॥ रज्जु सर्प होता । तोंवरीच न कळतां ॥३॥ तुका म्हणे साचें । भय नाहीं बागुलाचें ॥४॥

११६२. आतां पुढें घरीं । माझे आठव वैखरी ॥१॥ नको बडबडूं भांडे । कांहीं वाउगें तें रांडे ॥२॥ विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडोनियां बोल ॥३॥ तुका म्हणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥४॥

११६३. काय नव्हे करितां तुज । आतां राखे माझी लाज ॥१॥ मी तों अपराधाची राशी । शिखा अंगुष्ठ तोपाशीं ॥२॥ त्राहे त्राहे त्राहे । मज कृपादृष्टीं पाहे ॥३॥ तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥४॥

११६४. वंदीन मी भूतें । आतां अवघेचि समस्तें ॥१॥ तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥२॥ गाळूनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥३॥ तुका म्हणे मग । नव्हे दुजयाचा संग ॥४॥

११६५. पूजा पूज्यमान । कथे उभे हरिजन ॥१॥ ज्याची कीर्ति वाखाणीती । तेथें वोतिली ते मूर्ती ॥२॥ देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥३॥ गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥४॥ शोक मोह चिंता । यांची नेणती ते वार्ता ॥५॥ तुका म्हणे सखे । विठोबाचे ते सारिखे ॥६॥

११६६. भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥१॥ धांवे जाती-

पाशीं जाती । खुण येरयेरां चित्तीं ॥२॥ हिरा हिरकणी । काढी आंतून अहिरणीं ॥३॥ तुका म्हणे भलें । मन शुद्ध तिहीं केलें ॥४॥

११६७. वरी बोला रस । कथी ज्ञान माजी फांस ॥१॥ ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना परलोक ॥२॥ परिसे येक सांगे । अंगा धुळीहि न लागे ॥३॥ तुका म्हणे हाडें । कुतऱ्या लाविलें झगडे ॥४॥

११६८. हेचि तुझी पूजा । आतां करिन केशीराजा ॥१॥ अवघीं तुझीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥२॥ न वर्जित दिशा । जाय तेथेंचि सरिसा ॥३॥ नव्हे येकदेशी । तुका म्हणे संकल्पेशीं ॥४॥

११६९. आपुलें तों कांहीं । येथें सांग जैसें नाहीं ॥१॥ परि हे वाणी वायचळे । छंद करवितें बरळे ॥२॥ पंचभूतांचाही मेळा । देह सत्यत्वें निराळा ॥३॥ तुका म्हणे भूली । इची उफराटी चाली ॥४॥

११७०. विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्या साठीं वाचा ॥१॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥२॥ न पाहे सिदोरी । जाति कुळ न विचारी ॥३॥ तुका म्हणे भेटी । हाक देतां उठाउठी ॥४॥

११७१. कृपावंत किती । दीन बहु आवडती ॥१॥ त्याचा भार वाहे माथां । करी योगक्षेम चिंता ॥२॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥३॥ तुका म्हणे जीवें । अनुसरल्या येका भावें ॥४॥

११७२. नेणती वेद श्रुति कोणी । आम्हां भाविकांवांचोनी ॥१॥ रूप आवडे आम्हांसी । तैसी जोडी हृषीकेशी ॥२॥ आम्ही भावे बळिवंत । तुज घालूं हृदयांत ॥३॥ तुका म्हणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥४॥

११७३. मन गुंतलें लुलया । जाय धांवोनी त्या ठाया ॥१॥ मार्गे परतवी तो बळी । शूर येक भूमंडळीं ॥२॥ येवोनियां घाली घाला । नेणों काय होईल तुला ॥३॥ तुका म्हणे येणें । बहु नाडिले शहाणे ॥४॥

११७४. घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥१॥ तुम्ही ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥२॥ तुम्ही घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥३॥ मना तेथें धांव घेई । राहे विठोबाचे पाई ॥४॥ तुका म्हणे जीवा । नको सांडूं या केशवा ॥५॥

११७५. धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळीतां ॥१॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सावळी सुरंग ॥२॥ सकळ मंगळाचें सार । सुख सिद्धीचें भांडार ॥३॥ तुका म्हणे सुखा । अंत पार नाहीं लेखा ॥४॥

११७६. जरी मी नव्हतों पतीत । तरी तूं पावन कैंचा तेथ ॥१॥ म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥२॥ लोहो महिमा न परिसा । नाहीं तरी दगड तैसा ॥३॥ तुका म्हणे याचक भावें । कल्पतरु मान पावे ॥४॥

११७७. येक भाव चित्तीं । तरी नलगे कांहीं युक्ती ॥१॥ कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥२॥ आठवचि पुरे । सुख अवघें मोहरे ॥३॥ तुका म्हणे मन । पूजा इच्छी नारायण ॥४॥

११७८. तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥१॥ आणिक नेणें कांहीं देवा । तुजवांचोनि केशवा ॥२॥ हेंचि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तनें ॥३॥ तुझ्यानामाचीं भूषणें । तुका म्हणे ल्यालों लेणें ॥४॥

११७९. तुज मागणें ते देवा । आम्हां तुझी चरणसेवा ॥१॥ आन नेघों देशी तरी । ऋद्धिसिद्धी मुक्ती च्यारी ॥२॥ संतसंग सर्व काळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥३॥ तुका म्हणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥४॥

११८०. उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ॥१॥ तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसारासी तुटी ॥२॥ आतां नोहे बाधा । कोणेविशीं कांहीं कदा ॥३॥ तुका म्हणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥४॥

११८१. क्रियासतीहीन । येक मी गा तुझें दीन ॥१॥ देवा करावा सांभाळ । वारीं माझी तळमळ ॥२॥ नको माझे ठाईं । गुणदोष घालूं कांहीं ॥३॥ अपराधाच्या कोटी । तुका म्हणे घाला पोटीं ॥४॥

११८२. नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥१॥ तैसी चित्तशुद्धी नाहीं । तेथें बोध करिल काई ॥२॥ वृक्ष न धरी पुष्प फळ । काय करील वसंतकाळ ॥३॥ वांझे न होतीं लेंकुरें । काय करावें भ्रतारें ॥४॥ नपुंसका पुरुषासी । काय बाइल करील त्यासीं ॥५॥ प्राण गेलिया

शरीर । काय करील वेव्हार ॥६॥ तुका म्हणे जीवनेविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥७॥

११८३. नवा नवसाची । झालों तुम्हांसी वाणीची ॥१॥ कोण तुझें नाम घेतें । देवा पिंडदान देतें ॥२॥ कोण होतें मागें पुढें । दुजें बोलाया रोकडें ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । कोणा घेतासी वोसंगा ॥४॥

११८४. एका बीजा केला नाश । मग भोगिलें कणीस ॥१॥ कळे सकळां हा भाव । लहान थोरावरी जीव ॥२॥ लाभ नाहीं फुकासाठीं । केल्याविण जीवासाठीं ॥३॥ तुका म्हणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥४॥

११८५. आयुष्य गेलें वायांवीण । थोर झाली नागवण ॥१॥ आतां धांवाधांव करी । काय पाहतोसी हरी ॥२॥ माझें तुझें याच गती । दिवस गेले तोंडीं माती ॥३॥ मन वाव घेऊं नेदी । बुडऊं पाहे भवनदी ॥४॥ पडिला विषयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥५॥ शरण आलों आतां धावें । तुका म्हणे मज पावें ॥६॥

११८६. सोसुनी विपत्ती । जोडी दिल्ही तुझें हातीं ॥१॥ त्याचा हाचि उपकार । अंतीं आम्हांसी वेव्हार ॥२॥ नामरूपा केला ठाव । तुज कोण म्हणते देव ॥३॥ तुका म्हणे हरी । तुज ठाव दिल्हा घरीं ॥४॥

११८७. आपुलें मागतां । काय नाहीं आम्हां सत्ता ॥१॥ परी या लौकिकाकारणें । उरी ठेविलें बोललें ॥२॥ येचि आतां घडी । करूं बैसो तेचि फडी ॥३॥ तुका म्हणे करितों तुला । ठाव नाहींसे विठ्ठला ॥४॥

११८८. असो आतां किती । तुज यावें काकुळती ॥१॥ माझें प्रारब्ध हें गाढें । तूं बापुडें तयांपुढें ॥२॥ सोडवीन आतां । ब्रीद तुझें पंढरिनाथा ॥३॥ तुका म्हणे बळी । तो गांढ्याचे कान पिळी ॥४॥

११८९. काय नव्हे केलें । येका चिंतितां विठ्ठलें ॥१॥ सर्व साधनाचें सार । भवसिंधु उतरी पार ॥२॥ योगयागतपें । केलें तयानें अमुपें ॥३॥ तुका म्हणे जपा । मंत्र तीन अक्षरी सोपा ॥४॥

११९०. हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥१॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनें सहित ॥२॥ नसो भाव चित्तीं । हरिचे

गुण गातां गीतीं ॥३॥ करी अनाचार । वाचे हरिनाम उच्चार ॥४॥ हो कां मलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥५॥ म्हणवी हरिचा दास । तुका म्हणे धन्य त्यास ॥६॥

११९१. हाके सरिसी उडी । घालोनियां स्तंभ फोडी ॥१॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥२॥ करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥३॥ तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥४॥

११९२. लोहोचुंबकाचें बळें । उभे राहिले निराळे ॥१॥ तैसा तूंचि आम्हां ठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ॥२॥ भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि वाचवी मोहरा ॥३॥ तुका म्हणे आधीलपणें । नेली लाकडें चंदनें ॥४॥

११९३. डोई वाढऊनि केश । भूतें आणिती अंगास ॥१॥ तरी ते नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥२॥ मेळउनी नरनारी । शकुन सांगे नानापरी ॥३॥ तुका म्हणे मेंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥४॥

११९४. गाढवाचें घोडें । आम्हीं करूं दृष्टीपुढें ॥१॥ चघळी वाहाना । माघारिया वांडा सुना ॥२॥ सोंग संपादणी । तरी करूं शुद्ध वाणी ॥३॥ तुका म्हणे खळ । करूं सयमीं निर्मळ ॥४॥

११९५. बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥१॥ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥२॥ बाईल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥३॥ पोर मेलें बरें झालें । देवें मायेविरहित केलें ॥४॥ माता मेली मजदेखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥५॥

११९६. योग तप यांचीं नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥१॥ करणें तें हेंचि करा । सत्य बरा व्यापार ॥२॥ तरी खंडे वेरझार । नेघे भार देहाचा ॥३॥ तुका म्हणे मानामान । हें बंधन नसावें ॥४॥

११९७. करी संध्या स्नान । वारी खाउनियां अन्न ॥१॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मनीं ॥२॥ मजुराचें धन । चिळा दोरचि जतन ॥३॥ तुका म्हणे नाहीं । अधिरासी देव कांहीं ॥४॥

११९८. वाखर घेऊनियां आले । त्यासी तरवारे नेहाले ॥१॥ नव्हे

आपुलें उचित । करुनि टाकावे फजित ॥२॥ आंगोळिया मोडी । त्यासि काय शिलें घोडीं ॥३॥ नपुंसकासाठीं । तुका म्हणे नलगे जेठी ॥४॥

११९९. प्रेमसूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥१॥ मनेंसहित वाचा काया । अवघें दिल्हें पंढरिराया ॥२॥ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुळती ॥३॥ तुका म्हणे ठेवी तैसे । आम्ही राहों त्याचे इच्छें ॥४॥

१२००. पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥१॥ त्यासी चिंतीलिया मनीं । चिंता करूं गवसणी ॥२॥ पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥३॥ तुका म्हणे तई । सिद्धि वोळंगति पाई ॥४॥

१२०१. धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥१॥ पूजीप्रतीमेचे देव । संत म्हणती तेथें भाव ॥२॥ विधिनिषेध नेणती । येक निष्ठा धरुनी चित्तीं ॥३॥ तुका म्हणे तैसें देवा । होणें लागे त्याच्या भावा ॥४॥

१२०२. आधींच आळशी । वरि गुरुचा उपदेशी ॥१॥ मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥२॥ नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥३॥ तुका म्हणे तें गाढव । घेती मनासवें धांव ॥४॥

१२०३. नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणी लोटी ॥१॥ माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ॥२॥ न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ॥३॥ तुका म्हणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ॥४॥

१२०४. कथा करोनियां दावी प्रेमकळा । अंतरीं जिव्हाळा कुकर्मांचा ॥१॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकेची ॥२॥ टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळ पोटासाठीं ॥३॥ गोसाव्याचें रूपें हेरी परनारी । तयांचे अंतरीं काम लोभ ॥४॥ कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंवीण डोळे गळताती ॥५॥ तुका म्हणे ऐसे भावेचे हे मैंद । त्यापासीं गोविंद नाहीं नाहीं ॥६॥

---

## शाक्तप्रकरणीचे अभंग.

१२०५. टवकारुनी दृष्टी लावोनियां रग । दावी झगमग डोळ्यांपुढें ॥१॥ म्हणती शिष्यांसी लागली समाधी । लटिकीच उपाधि झकविती ॥२॥ दीपाचिया जोती कोंडियेले तेज । उपदेश सांजरात्रीमाजी ॥३॥ रांगोळीया चौक शृंगोरोनि वोजा । आवरण पूजा यंत्र करी ॥४॥ पडदा लावोनी दीप चहूं कोनी । बैसोनी आसनीं मुद्रा लावी ॥५॥ नैवेद्यासी म्हणे करावें पक्वान्नें । पात्रासी दिव्यान्न परवडी ॥६॥ झाला उपदेश कवळ घ्या रे मुखीं । आपोषण शेखी बुडविलें ॥७॥ पापांड करूनी मांडिली जीविका । बुडवी भाविकां लोकांप्रती ॥८॥ कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥९॥ शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्व भूषणें भोग भोगी ॥१०॥ विधीचाही लोप बुडविला वेद । शास्त्रांचाही बोध हारविला ॥११॥ योगांची धारणा नाहीं प्राणायाम । सांडी यमनियम नित्यादिक ॥१२॥ वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप । वाढविलें पाप मतिलंडें ॥१३॥ तुका म्हणे गेलें गुरुत्व गुखाडी । पूर्वजांसी धाडी नरकवासा ॥१४॥

१२०६. गुरुमार्गामुळें भ्रष्ट झाले सकळ । म्हणती याती कूळ नाहीं आम्हीं ॥१॥ पवित्राला म्हणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ॥२॥ लोहार डोहार दासी बलुतीं बारा । उपदेशिती फार रांडापोरें ॥३॥ कांहीं टाण्या टोण्या विप्रशिष्य होती । उघड फजिती स्वधर्माची ॥४॥ नसतां करूनि होम खाती येके ठायीं । म्हणती पाप नाहीं मोक्ष येणें ॥५॥ इंद्रियांचे पेठे भला कौल देती । मर्यादा जकाती माफ केली ॥६॥ नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणें । उपदेशुनी घेणें द्रव्य कांहीं ॥७॥ तुका म्हणे ऐसे गुरुशिष्य जाण । विठोबाची आण नरका जाती ॥८॥

१२०७. ऐका कलीचें हें फळ । पुढें होईल ब्रह्मगोळ ॥१॥ चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती येके पंक्ती ॥२॥ पूजिती असुरा रांडा । मद्य प्राशितील पेंडा ॥३॥ वाम कवळ मार्जन । जन जाईल अधःपतन ॥४॥ तुका हरिभक्ति करी । शक्ति पाणी वाहे घरीं ॥५॥

१२०८. शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या ॥१॥ सुकृताचा उदो केला । गोंधळ घाला इंद्रियें ॥२॥ क्रोधरूपें वसे काम । तिचें नाम जपतसे ॥३॥ मद्यभक्षण मांगिणयाती । विटाळ चित्तीं सांठविला ॥४॥ स्तउनियां पूजी रांड । नलगे भांड दाढीसी ॥५॥ तुका म्हणे भगवंतीं । नेइल अंतीं आपणापें ॥६॥

१२०९. राजा प्रजा द्वाड देश । शाक्त वास करीति तो ॥१॥ अधर्माचें उघड पीक । धर्म रंक ते गांवीं ॥२॥ न पिके भूमि कांपे भारें । मेघ वारे पीतील ॥३॥ तुका म्हणे अवघीं दुःखें । येती सुखें वस्तीसी ॥४॥

१२१०. ऐसे कलियुगाच्यामुळें । झालें धर्माचें वाटोळें ॥१॥ सांडुनियां राम नाम । ब्राह्मण म्हणती दोम दोम ॥२॥ शिवों नये तीं निळीं । वस्त्रें पांघरतीं काळीं ॥३॥ तुका म्हणे वृत्ती । सांडुनि गदा मागत जाती ॥४॥

१२११. अवघ्या पापें घडला येक । उपासक शक्तीचा ॥१॥ त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥२॥ कामक्रोध मद्या अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥३॥ करितां पाप न धरी शंका । म्हणे तुका कोणीही ॥४॥

१२१२. वारितां बळें धरितां हातीं । जुलुमें जाती नरकामधीं ॥१॥ रंडिदासाप्रती कांहीं । उपदेश तोही चालेना ॥२॥ जन्म गेला वाताहत । थोर घात ये ठाईं ॥३॥ तुका म्हणे पंढरिनाथा । तुझी कथा दूषिती ॥४॥

१२१३. शाक्ताची सूकरी माये । विष्टा खाये बिदीची ॥१॥ तिची त्या पडली सवे । मागे धांवे म्हणोनी ॥२॥ शाक्ताची गाढवी माये । भुंकत जाये वेसदारा ॥३॥ तुका म्हणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥४॥

१२१४. हरिहर सांडुनी देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥१॥ ऐका त्याची विटंबना । देवपणा भक्ताची ॥२॥ अंगीं कवडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं ॥३॥ गळां गाठा हिंडे द्वारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ॥४॥ माथा सेंदुर दांत खाती । झेंगट हातीं सटवीचें ॥५॥ पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥६॥ ऐशा छंदें चुकली वाटा । भाव खोटा भजन ॥७॥ तुका म्हणे विष्णु शिवा । वांचोनि देवा भजती ते ॥८॥

१२१५. कांद्यासाठीं झालें ज्ञान । तेणें जन नाडिलें ॥१॥ काम क्रोध

बुचबुची । भुंके पुची व्यालीची ॥२॥ पूजेलागीं द्रव्य मागे । काय सांगे शिष्यांतें ॥३॥ तुका म्हणे कैंचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयाचा ॥४॥

१२१६. सांडोनियां पंढरिराव । कवणातें म्हणो देव ॥१॥ बहु लाज वाटे चित्ता । आणिकातें देव म्हणतां ॥२॥ सांडुनियां हिरा । कोणें वेंचाव्या त्या गारा ॥३॥ तुका म्हणे हरिहर । ऐसि सांडुनियां धुर ॥४॥

१२१७. बहुत गेले वायां । न भजतां पंढरिराया ॥१॥ करिती कामिकांची सेवा । लागुन मागुन खात्या देवा ॥२॥ अवघियांचा धणी । त्यासी गेलें विसरोनी ॥३॥ तुका म्हणे अंतीं । पडती यमाचिये हातीं ॥४॥

१२१८ असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठऊं ॥१॥ रक्षिता तूं होसी जरी । तरी काय येरीं करावें ॥२॥ कायावाचामनें पाई । राहे ठाईं करूं ते ॥३॥ तुका म्हणे गाइन गीतीं । रूप चित्तीं धरूनियां ॥४॥

१२१९ नाहीं आम्ही विष्णुदास । करित आस कोणाची ॥१॥ कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥२॥ असो मलते ठाईं मनें । समाधानें आपूलिया ॥३॥ तुका म्हणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥४॥

१२२० पाखांडीयानें पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥१॥ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपण भिकारी अर्थ नेणें ॥२॥ न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ॥३॥ तुझ्या पायावीण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वां ठायीं येक मज ॥४॥ तुका म्हणे खीळ पडो त्याच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकांसी ॥५॥

१२२१ कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहु झाले ॥१॥ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी कोरडें-चि ॥२॥ दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥३॥ वेदाज्ञें करूनि न करिती स्वहित । नव्हती अलिप्त देहाहुनी ॥४॥ तुका म्हणे दंड साहिले यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥५॥

१२२२ विषयाचें सुख येथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥१॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचें किंकर बहुसाल ॥२॥ असिपत्र तरु खरोच विंगळ । निघताती ज्वाळ तैल पाकी ॥३॥ तप्तभूमीवरी

चालविती पाहीं । अग्निस्तंभा बाही कवटाळविती ॥४॥ म्हणोनियां तुका येतो काकुळती । पुरे आतां याती गर्भवास ॥५॥

१२२३ अल्प माझी मती । म्हणोनि येतों काकुळती ॥१॥ आतां दाखवा दाखवा । तुमचीं पाउलें केशवा ॥२॥ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥३॥ तुका म्हणे दया । मज करा अभागिया ॥४॥

१२२४ वाटुली पाहतां शिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं वो डोळां ॥१॥ तूं माय माउली कृपेची साऊली । विठ्ठले पाहिली वास तूझी ॥२॥ कां बा मोकलिलें कवणा निरवीलें । कठिण कैसे झालें हृदय तुझें ॥३॥ तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥४॥

१२२५ देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख येथें नाम आहे ॥१॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर ते झालें ब्रह्मरूप ॥२॥ यजन याजन तप व्रत करिती । विकल्पें नागवीती शुद्ध पुण्या ॥३॥ तुका म्हणे सर्व सुख येथें आहे । भ्रांती दूर पाहें टाकोनियां ॥४॥

१२२६ तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौनपणें ॥१॥ मौनपणें वाचा थोटावल्या ज्याच्या । ऐसें तुझें रूप आहे ॥२॥ रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हे झकवे ब्रह्मादिक ॥३॥ ब्रह्मादिक देवां कर्माची कचाटी । म्हणोनि आटाआटी फार त्यासी ॥४॥ तुका म्हणे तुझे गुण नाम रूप । आहेसी अमूप वाणूं काय ॥५॥

१२२७. मनवाचातीत तुझें हें स्वरूप । म्हणोनियां माप भक्ती केलें ॥१॥ भक्तीचिये मापें मोजितों अनंता । इतरानें तत्त्वतां न मोजवे ॥२॥ योग याग तपें देहाचिये योगें । ज्ञानाचिये लागे न सांपडसी ॥३॥ तुका म्हणे आम्ही भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥४॥

१२२८. जंववरी नाहीं देखिली पंढरी । वर्णिसील थोरी वैकुंठींची ॥१॥ मोक्षसिद्धी तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप ॥२॥ वृंदावन सडे चौक रंगमाळा । अभिनव सोहळा घरोघरीं ॥३॥ नामघोष

कथा पुराण कीर्तनीं । वोवीया कांडणीं पांडुरंग ॥४॥ सर्व सुख तेथें असे सर्व काळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥५॥ तुका म्हणे जें न साधे सायासें ॥ तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरी ॥६॥

१२२९. दुःख वाटे ऐसी ऐकोनियां गोष्टी । जेणें घडे तुटी तुझे पाईं ॥१॥ येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजीत नायकती ॥२॥ काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ती । दंडूनी पुढती वाटे लाऊं ॥३॥ तुका म्हणे मज दाऊं नको ऐसें । दृष्टीपुढें पिसें पांडुरंगा ॥४॥

१२३०. सूकरासी इष्टा माने सावकाश । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥१॥ तेवीं अभक्तासी आवडे पाषांड । नलगे त्या गोड परमार्थ ॥२॥ श्वानासी भोजन दिल्हें पंचामृत । परी त्याचें चित्त हाडावरी ॥३॥ तुका म्हणे सर्पा पाजीलिया क्षीर । वमितां विखार वीष झालें ॥४॥

१२३१. रासभ धूतला महातीर्थामाजीं । नव्हे ऐसा तेजी शामकर्ण ॥१॥ तेवीं खळा काय केल्या उपदेश । नव्हेची मानस शुद्ध त्याचें ॥२॥ सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणें ॥३॥ तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन । सवेंची वमन जेवीं तया ॥४॥

१२३२. जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषतुल्य ॥१॥ तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तयांलागी झाला सन्निपात ॥२॥ कामीण जयाच्या झालीया नेत्रासीं । देखे तो चंद्रासी पीतवर्ण ॥३॥ तुका म्हणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥४॥

१२३३. आतां असो मना अभक्ताची कथा । न होई दुश्चिता हरीनामीं ॥१॥ नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नामें ॥२॥ प्रभातें न घ्यावें नाम माकडाचें । तैसें अभक्ताचें सर्व काळ ॥३॥ तुका म्हणे आतां आठऊं मंगळ । जेणें सर्व काळ सुखरूप ॥४॥

१२३४ नाम आठवितां सद्गदीत कंठीं । प्रेम वाटे पोटीं ऐसें करीं ॥१॥ रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांगहि गात्रीं प्रेम तुझें ॥२॥ सर्वेहि शरीर वेचों या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥३॥ तुका म्हणे दुजें न करी कल्पांतीं । सर्वदा विश्रांती संतांपाईं ॥४॥

१२३५. जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥१॥ अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तोची जाणे ॥२॥ शरणांगत जेणें घातले पाठीसी । तो जाणे तेविशीं राखों तयां ॥३॥ कासे लागे तया न लगती सायास । पोहोणार त्यास पार पावी ॥४॥ तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिल्हा त्याची गती तोचि जाणे ॥५॥

१२३६. नका वाटूं मन विधिनिषेधासी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥१॥ खादलिया अन्ना मासी बोलों नये । अवघेंचि जाय येका घांसे ॥२॥ जोडी होते परी ते बहु कठीण । करीत जतन सांभाळावें ॥३॥ तुका म्हणे येथें न माना विषाद । निंबेवीन व्याध तुटों नये ॥४॥

१२३७. नको होऊं देऊं भावीं अभावना । याचि नांवें जाणा बहु दोष ॥१॥ मेघवृष्टी येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥२॥ उत्तम विभागें कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥३॥ तुका म्हणे जिणें बहु थोडें आहे । आपुलिया पाहे पुढें बरें ॥४॥

१२३८. त्याग तंव मज न वजतां केला । कांहींची विठ्ठला मनांतूनी ॥१॥ मागलिया आला उबग सहज । न धरितां काज झालें मनीं ॥२॥ देह जड झालें रीणाच्या आभारें । केले संवसारें कासावीस ॥३॥ तुका म्हणे गेला आळस किळस । कर्तव्य ते दोष निवारिलें ॥४॥

१२३९. मढें झाकोनियां करिती पेरणी । कुणबियांचे वाणी लवलाहें ॥१॥ तयापरी करी स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥२॥ वोटीच्या परीस मुठिचे तें वाढें । यापरी कैवाड स्वहिताचें ॥३॥ नाहीं काळ सत्ता आपुलिये हातीं । जाणते ते गुंती उगविती ॥४॥ तुका म्हणे पाहे आपुली सूचना । करितो शहाणा मृत्यूलोकीं ॥५॥

१२४०. राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥१॥ कोणी कोणा येथें न मानीजी फुका । कृपेवीण येका देवाचिया ॥२॥ श्रृंगारिलें नाहीं तगों येत वरी । उमटे लौकरी जैसें तैसें ॥३॥ तुका म्हणे घरीं वसे नारायण । कृपेची ते खुण साम्या येते ॥४॥

१२४१. वत्स पळे धेनू धांवे पाठीलागीं । प्रीतीचा तो अंगीं आवि-

भाव ॥१॥ शिकविलें काय येईल कारणा । सूत्र वोढी मना आणिकाच्या ॥२॥ सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां । म्हणवोनी लाथा मागें सारी ॥३॥ तुका म्हणे आग्रह करावा नलगे । सांगतसे हा घे अनुभव ॥४॥

१२४२. देवाच्या समंधे विश्वचि सोयीरें । सूत्र वोढी दोरे येका येक ॥१॥ आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखे सामावले ॥२॥ आणिकाचें सुख दुःख उमटे अंतरीं । येथील इतरी तेणें न्यायें ॥३॥ तुका म्हणे ठसावले शुद्ध जाती । शोभाची पुढती विशेषता ॥४॥

१२४३. अवघा वेंचलों इंद्रियांचे वोढी । झालें तैं ते घडी निरोपिलें ॥१॥ असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतारिला ॥२॥ कायावाचामनें तोचि निजध्यास । येथें झालें वोस भक्तिभावें ॥३॥ तुका म्हणे करूं येईल धांवणें । तरी नारायणें सांभाळावें ॥४॥

१२४४. राहो आतां हेंचि ध्यान । डोळा मन लंपटो ॥१॥ कोंडकोंडुनि धरिन जीव । देह भावें वोवाळिन ॥२॥ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥३॥ तुका म्हणे गोजिरीया । विठोबा पायां पडों द्या ॥४॥

१२४५. आदि मध्य अंत दावियेला दीपें । हा तों आपणापें यत्न बरा ॥१॥ दास्यत्वें दाविलें धन्याचें भांडार । तों तों नव्हे सार येथुनियां ॥२॥ उपायानें सोस नासला सकळ । सत्ते सत्ताबळ अंगा आलें ॥३॥ तुका म्हणे दृष्टी सकळांचे शिरीं । वचनचि करी बैसोनियां ॥४॥

१२४६. सांठविलें वान । पैस घातलें दुकान ॥१॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्धचि जवळी ॥२॥ निवडिलें साचें । उत्तम मध्यम कनिष्ठाचें ॥३॥ तुका बैसला दुकानीं । दावी मोला ऐसी वाणी ॥४॥

१२४७. अवगुण तों कोणीं नाहीं प्रतिष्ठिलें । मागें होत आले शिष्टाचार ॥१॥ दुर्बळाचे नांवें पीटावा डांगोरा । हा तों नव्हे बरा सत्यवाद ॥२॥ मद्य आणि मधु येकरासी नांवें । तरी तें कां खावें आधारें त्या ॥३॥ तुका म्हणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद वृष्टिन्यायें ॥४॥

१२४८. लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माऊली ॥१॥ उभयतां आवडी लाड । कोडें कोड पुरतसे ॥२॥ मेळवितां अंगें आंग । प्रेमरंग वाढतो ॥३॥ तुका म्हणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥४॥

१२४९. भूतीं भगवंत । हा तों जाणतों संकेत ॥१॥ भारी मोकलितो बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥२॥ करावा उपदेश । निवडूनि तरी दोष ॥३॥ तुका म्हणे वाटे । चुकतां आडरानें कांटे ॥४॥

१२५०. आम्हा हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजीत चुकती ते ॥१॥ कासयाचा बाध येकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥२॥ अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥३॥ तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्यापरी ॥४॥

१२५१. दर्पणासी नकटें लाजे । शुद्ध कीजे देखोनी ॥१॥ ऐसें अवगुणाच्या बाधें । दिसे सुधें विपरीत ॥२॥ आंधळ्यासी काय हिरा । गाराची तो सारिखा ॥३॥ तुका म्हणे भुंके सुणे । ठाया नेणें ठाव तो ॥४॥

१२५२. नावडे तरी कां येतील हे मांड । घेऊनियां तोंड काळें येथ ॥१॥ नासोनियां जाय रस या संगतीं । खळाचे पंगतीं नारायणा ॥२॥ तोंडावाटे नर्क काढी अमंगळ । मिष्टान्ना वीटाळ करी सुणें ॥३॥ तुका म्हणे नाहीं संतांची मर्यादा । निंद्य तोचि निंदा मायझवा ॥४॥

१२५३. लेंकरा आईतें पित्याचि जतन । दावी निज धन सर्व जोडी ॥१॥ तयापरी आमुचा झालासे सांभाळ । देखीलाचि काळ नाहीं आड ॥२॥ भूकेचे सन्निध वसे स्तनपान । उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥३॥ आळऊनि तुका उभा पैल थडी । घातली या उडी पांडुरंगें ॥४॥

१२५४. शुद्ध चर्या हेंची संतांचें पूजन । लागतची धन नाहीं वित्त ॥१॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांति । आपणचि येती चोजवीत ॥२॥ कीर्तनेंचि वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास सन्निधान ॥३॥ तुका म्हणे वर्म सांगतों सवेग । मन लावा लाग स्वहिताचा ॥४॥

१२५५. जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेकड ते वोढी अमंगळ ॥१॥ चित्ताच्या संकोचें कांहींच न घडे । अतिशय वेडे चार तेची ॥२॥ काळावीण कांहीं रुचों नाहीं येत । करूनि संकेत ठेवीयेला ॥३॥ तुका म्हणे कळे वचनी चांचणी । काय बोलोनी वेळोवेळां ॥४॥

१२५६. कामातुर चवी सांडी । बरळ तोंडी बरळे ॥१॥ रंगलें तें

अंगीं दावी । विष देववी आसडें ॥२॥ धन सोसें लागें वेड । ते बडबड शमेना ॥३॥ तुका म्हणे वेसनें दोन्हीं । नरकखाणी भोगावया ॥४॥

१२५७. कृष्णांजनें झालें सोज्वळ लोचनें । तेणें दिल्हे वाण निवडोनी ॥१॥ निरोपाच्या मापें करी लडबड । त्याचें तेणें गोड नारायणें ॥२॥ भाग्यवंता घरीं करितां विश्वास । काय त्या सरिसें होईल तें ॥३॥ तुका म्हणे पोट भरें बरें वोजा । नीज ठाव नीजा निजस्थानीं ॥४॥

१२५८. मेंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥१॥ पुढें नाडीयेलें जग । नेतो लागों नेदीं माग ॥२॥ उभारोनी बाहे । दृष्टादृष्टी वेधीताहे ॥३॥ वैकुंठींहूनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥४॥ पुंडलीकें थारा । देउनि आणिलें या चोरा ॥५॥ तुका म्हणे चला । तुम्ही आम्ही धरूं त्याला ॥६॥

१२५९. भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळा साक्षत्वेंसीं ॥१॥ माझी माझी म्हणे येकमेकां मारी । हें तों नाहीं दुरी उभयतां ॥२॥ तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥३॥ तुका म्हणे एके ठायीं आहे वर्म । हेचि होय श्रम निवारितें ॥४॥

१२६०. लटिक्याच्या आशा । होतों पडिलों वोळसा । होउनियां दोषा । पात्र मिथ्या अभीमान ॥१॥ बरवी उघडली दृष्टी । नाहिंतरी होतों कष्टी । आक्रंदते सृष्टी । मात्र या चेष्टांनीं ॥२॥ मरणाची नाहीं शुद्धी । लोभीं प्रवर्तली बुद्धि । परती तों कधीं । घडेचिना माघारी ॥३॥ सांचवूनि मरे धन । लावी पोरासीं भांडण । नाहीं नारायण । तुका म्हणे स्मरियेला ॥४॥

१२६१. जवळी मुखापासीं । असतां नेघे अहर्निशीं ॥१॥ भव निर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नाशी काम ॥२॥ सुखाचे शेजार । करूं कां नावडे घर ॥३॥ तुका म्हणे ठेवा । कां हा न करीचि बरवा ॥४॥

१२६२. बरवे देशाउर झाले । काय बोले बोलावे ॥१॥ लाभे लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें ॥२॥ भाग्य झाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥३॥ तुका म्हणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥४॥

१२६३. सांगतां हें नये सुख । कीर्ति मुख न पुरे ॥१॥ आवडीनें सेवन करूं । जीवींचे धरूं जिवींच ॥२॥ उपमा या देतां लाभा । काशा शोभासारिखी ॥३॥ तुका म्हणे नुचली डोई । ठेविली पाई संतांचें ॥४॥

१२६४. आपुलाला लाहो करूं । केणें मरूं हा विठ्ठल ॥१॥ भाग्य पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥२॥ पुढती कोठें घडे ऐसें । बहुतां दीसें फावलें ॥३॥ तुका म्हणे झाली जोडी । चरण घडी न वीसंबें ॥४॥

१२६५. उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥१॥ संत-दर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥२॥ संपुष्ट हें हृदयपेटी । करूनि पोटीं साठऊं ॥३॥ तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥४॥

१२६६. आम्हांसी आपुलें नावडे संचित । चरफडी चित्त कळवळ्यानें ॥१॥ न कळतां झाला खोळंबा मारगा । जगीं झालों जगा बहुरूपी ॥२॥ कळों आलें बरें उघडले डोळे । कर्णधार मिळे तरी बरें ॥३॥ तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा । तरी नारायणा उडी घाला ॥४॥

१२६७. बरगासाठीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥१॥ फजीत तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥२॥ वोढाळाची वोंगळ ओढी । उगी खोडी नवजाय ॥३॥ तुका फजित करी बुच्या । विसरे कुच्या खोडी तेणें ॥४॥

१२६८. धांव घाली आई । आतां पाहातेसी काई ॥१॥ धीर नाहीं माझे पोटीं । झालों वियोगें हिंपुटीं ॥२॥ करावें शीतळ । बहु झाली हळहळ ॥३॥ तुका म्हणे डोई । कधीं ठेवीन हे पाईं ॥४॥

१२६९. तुम्हा ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ॥१॥ होती काशानें सुटका । तरी हे वैकुंठनायका ॥२॥ नसते सांभाळिलें । जरी तुम्हीं आश्वासिलें ॥३॥ तुका म्हणे कृपाळुवा । बरवा केला सावाधांवा ॥४॥

१२७०. देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥१॥ पाहातां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥२॥ अरुष हे वाणी । गोड करूनि घेतां कानीं ॥३॥ आवडीनें खेळे । तुका फुकाचे सोहळे ॥४॥

१२७१. दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥१॥ जीव आला पायांपासीं । येथें असें कलेवरेसीं ॥२॥ कांहींच नाठवे । ठाईं बैसले नूठवें ॥३॥ जीव असतां पाही । तुका ठकावला ठाईं ॥४॥

१२७२. भोगावरी आम्हीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥१॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । कशासाठीं बळा येऊं आतां ॥२॥ काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरीं काय ठेऊं ॥३॥ केला तरी उरे शीणचि कोरडा । बळें घ्यावीं पीडा स्वप्नींची ॥४॥ अवघेंचि वाण आलें तुम्हां घरा । मजुरी मजुरा रोजकीर्दी ॥५॥ तुका म्हणे कांहीं नेणें लाभ हाणी । असेल तो धणी राखो वाडा ॥६॥

१२७३. कां हो येथें काळ आला आम्हां आड । तुम्हांपाशीं नाड करावया ॥१॥ कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥२॥ कां हो उपजेना द्यावी ऐसी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥३॥ पाप फार किंवा झालासी दुर्बळ । मागील तें बळ नाहीं आतां ॥४॥ काय झालें देणें निघालें दिवाळें । कीं बांधलासी बळें रूणेंपाईं ॥५॥ तुका म्हणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडू-नियां ॥६॥

१२७४. काय देह घालूं कर्वती कमेरीं । टाकूनियां भीतरीं अग्नीमाजी ॥१॥ काय सेऊं वन शीत उष्ण ताहान । साहो किंवा मौन धरूनि बैसों ॥२॥ काय लाऊं अंगीं भस्म उधळण । हिंडों देश कोण खुंट चारी ॥३॥ काय त्यजूं अन्न करूं मी उपवास । काय करूं नाश जीवित्वाचा ॥४॥ तुका म्हणे काय करावा उपाय । ऐसा देईं भाव पांडुरंगा ॥५॥

१२७५. दंभे कीर्ति पोट भरे मानी जन । स्वहित कारण नव्हे कांहीं ॥१॥ अंतरती तुझे पाय मज दुरी । धरितां हे थोरी जाणीवेची ॥२॥ पिंडाच्या पाळणें धांवती विकार । मज दावेदार मजमाजी ॥३॥ कैसा करूं घात आपला आपण । धरूनि गुमान लोकलाज ॥४॥ तुका म्हणे मज दावीं तो सोहळा । देखें पाय डोळां तुझे देवा ॥५॥

१२७६. धिग जीणें त्याचा स्वामी हिन वर । मरण तें बरें भलें मग

॥१॥ आईकाजी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥२॥ देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयांचें कुतरें परी भलें ॥३॥ तुका म्हणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनियां अंतर ओळखावें ॥४॥

१२७७. आतां गाऊं तुज वोवीया मंगळी । करूं गदारोळी हरिकथा ॥१॥ होसी निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्यें ॥२॥ भोगिले ते भोग लाऊं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहों ॥३॥ तुका म्हणे आम्ही लाडिकीं लेंकुरें । न राहों अंतरें पायांवीण ॥४॥

१२७८. सर्व सुखें आजी येथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥१॥ सर्व काळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥२॥ तुका म्हणे वाचा राहिली कुंठीत । पुढें झालें चित्त समाधान ॥३॥

१२७९. विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल हा चित्तीं बैसलासे ॥१॥ विठ्ठलें हें अंग व्यापिली ही काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥२॥ बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥३॥ सकळ इंद्रियां मन हें प्रधान । तेंहि करी ध्यान विठोबाचें ॥४॥ तुका म्हणे त्या हो विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥५॥

१२८०. होय होय वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥१॥ काय करावीं साधनें । फळ अवघेंचि येणें ॥२॥ अभिमान नुरे । कोड अवघेंचि पुरे ॥३॥ तुका म्हणे डोळां । विठो बैसला सांवळा ॥४॥

१२८१. पंढरीसी जाय । तो विसरे मायबाप ॥१॥ अवघा होय पांडुरंग । राहो धरोनियां अंग ॥२॥ नलगे धन मान । देहभावें उदासीन ॥३॥ तुका म्हणे मळ । नाशी तात्काळ तें स्थळ ॥४॥

१२८२. बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं झाला त्याग अंतरींचा ॥१॥ ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासीं हा ठावा समाचार ॥२॥ जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातो विसरोनी सकळहि ॥३॥ प्रपंचा बाहेरी नाहीं आलें चित्त । केलें करी नित्य व्यवसाव ॥४॥ तुका म्हणे मज भोरप्याचे परी । झालें सोंग वरी आंत तैसें ॥५॥

१२८३. म्हणवितों दास तें नाहीं करणी । आंत वरी दोन्हीं भिन्न

भाव ॥१॥ गातों नाचतों तें दाखवीतों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥२॥ पावीजे तें वर्म न कळेचि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया॥३॥मांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी॥४॥ तुका म्हणे वायां गेलों ऐसा दिसे । होयील या हासें लौकिकाचें ॥५॥

१२८४. न कळे तों काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझे पाईं ॥१॥ येवोनियां वास करीसी हृदयीं । ऐसें घडे काई कासयानें ॥२॥ साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हे करिसी कैं गा देवा ॥३॥ लटिकें हें माझें करूनियां दूरी । साच तूं अंतरीं येउनी राहे ॥४॥ तुका म्हणे मज राखावें पतिता । आपुलीया सत्ता पांडुरंगा ॥५॥

१२८५. चिंतिलें तें मनिंचें जाणें । पुरवी खुणें अंतरींचें ॥१॥ रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥२॥ नवसियाचे पुरवी नवस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥३॥ तुका म्हणे समचि देणें । समचरणीं उभा असे ॥४॥

१२८६. उद्धाराचा संदेह नाहीं । याच्या कांहीं सेवका ॥१॥ पांडुरंग अभिमानी । जीवदानी कोंवसा ॥२॥ बुडतां जळीं जळतां आगीं । ते प्रसंगीं राखावें ॥३॥ तुका म्हणे आम्हांसाठीं । कृपा पोटीं वागवी ॥४॥

१२८७. काय विरक्ती न कळेचि आम्हां । जाणों येका नामा विठोबाच्या ॥१॥ नाचेन मी सुखें वैष्णवाचे मेळीं । दिंडी टाळ घोळीं आनंदें ॥२॥ शांति क्षमा दया मी काय जाणें । गोविंदकीर्तनें वांचोनियां ॥३॥ कासया येकांत सेऊं तया वना । आनंद तो जनामाजी असे ॥४॥ कासया उदास होऊं देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥५॥ तुका म्हणे मज आहे हा भरवसा । विठ्ठल सरिसा चालतसे ॥ ६ ॥

१२८८. जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥१॥ दोष नाहीं वोखदासी । दूत सांगे यमापासी ॥ २ ॥ गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥३॥ सहज तया जना छंद । वाचे गोविंद गोविंद ॥४॥ तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठ सोहळा ॥५॥ तुका म्हणे भेणें । काळ नये तेणें रानें ॥६॥

१२८९. माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥१॥ पढिये देहेभाव पुरवी वासना । अंतीं ते आपणांपासी न्यावें ॥२॥ मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलीया आघाता निवारावें ॥३॥ योगक्षेम त्याचें जाणें जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥४॥ तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारोनी ॥५॥

१२९०. सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणिक तें वर्म नेणें कांहीं ॥१॥ काय जाणों संतां निरविलें देवें । करितां या भावें कृपा मज ॥२॥ तुका म्हणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळों यावा ॥३॥

१२९१. उदंड शाहाणे होते तर्कवंत । परी नेणवे अंत विठोबाचा ॥१॥ उदंड अक्षरा करोत भरोवरी । परी नेणवी थोरी विठोबाची ॥२॥ तुका म्हणे नाहीं भोळेपणावीण । जाणीव तो शीण रितें माप ॥३॥

१२९२. आधारावांचोनी । काय सांगसी कहाणी ॥१॥ ठावा नाहीं पंढरिराव । तोंवरि आवघेंचि वाव ॥२॥ मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥३॥ तुका म्हणे ठेवा । जाणपण येक सेवा ॥४॥

१२९३. मज संतांचा आधार । तूं येकेलें निर्विकार ॥१॥ पाहा विचारोनि देवा । नको आम्हासवें दावा ॥२॥ तुज बोल न बोलावें । आम्हा भांडायाची सवे ॥३॥ तुका म्हणे तरी । ऐक्यभावें नूरे उरी ॥४॥

१२९४. अनाथाची तुम्हां दया । पंढरिराया येतसे ॥१॥ ऐसी ऐको-नियां कीर्ती । बहु विश्रांति पावलों ॥२॥ अनाथांच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ॥३॥ तुका म्हणे सवघड हित । ठेऊं चित्त पायांपें ॥४॥

१२९५. येथें नाहीं उरों आले अवतार । येर तो पामर जीव किती ॥१॥ विषयाचे झणी व्हाल लोलंगत । चेवालिया अंत नलगे मग ॥ २ ॥ वाहो-नियां भार कुंथसील वोझें । नव्हे तेंचि माझें थीतां त्याग ॥३॥ तुका म्हणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥४॥

१२९६. हींच त्यांचीं पंचभूतें । जीवन भाते प्रेमाचें ॥१॥ कळवळा धरिला संतीं । तो निगुती कैवाड ॥२॥ हाचि काळ वर्तमान । समाधानही संपत्ती ॥३॥ तुका म्हणे दिवस राती । हेचि खाती अन्नातें ॥ ४॥

१२९७. दीप न देखे अंधारा । आतां जतन हेंचि करा ॥१॥ नारायण नारायण । गांठीं धन बळकट ॥२॥ चिंतामणीपाशीं चिंता । तत्त्वतांही न येल ॥३॥ तुका म्हणे उभयलोकीं । हेचि निकी सामग्री ॥४॥

१२९८. धन्य काळ संतभेटी । पाईं मिठी पडली तो ॥१॥ संदेहाची सुटली गांठी । झालों पोटीं शीतळ ॥२॥ भवनदीचा झाला तारा । या उत्तरा प्रसादें ॥३॥ तुका म्हणे मंगळ आतां । कोण दाता याहूनी ॥४॥

१२९९. दिनरजनीं हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥१॥ संकल्पिला देह देवा । सकळ हेवा ते ठाईं ॥२॥ अवसान घडी । सकळ जोडी इंद्रिया ॥३॥ कीर्ती मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥४॥

१३००. खरें नानवट निक्षेपींचें जुनें । काढिलें ठेवणें समर्थांचें ॥१॥ मजुराचे हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥२॥ कुलाळाच्या हातें घटाची उत्पत्ती । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥३॥ तुका म्हणे जीवन तें नारायणीं । प्रभा जाते किर्णीं प्रकाशाची ॥४॥

१३०१. गंगोचिये अंतविण काय चाड । आपुलें तें कोड तृषेपाशीं ॥१॥ विठ्ठल हे मूर्ती साजिरी सुंदर । घालूं निरंतर हृदयपुटीं ॥२॥ कारण तें असे नवनीतापाशीं गाबाळ ते सोसी येर कोण ॥३॥ बाळाचे सोईतें घांस घाली माता । आटहास चिंता नाहीं तया ॥४॥ गाऊं नाचूं करूं आनंदसोहळा । भावचि वेगळा नाहीं आतां ॥५॥ तुका म्हणे अवघें झालें येकमय । परलोकींचि काय चाड आतां ॥६॥

१३०२. स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषईं पडीभर अतिशय ॥१॥ आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥२॥ येवोनियां आड ठाके लोकलाज । तें हे दिसे काज अंतरलें ॥३॥ तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्ही देवा सांभाळावें ॥४॥

१३०३. पडिलों भोवणी । होतों बहु चिंतवणी ॥१॥ होतों चुकलों मारग । लाहो केला लागवेग ॥२॥ इंद्रियांचे संधीं । होतों सांपडलों बंदी ॥३॥ तुका म्हणे बरें झालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥४॥

१३०४. बरें झालें आली ज्याचीं त्याच्या घरा । चुकला पान्हेरा वोढा-

ळाचा ॥१॥ बहु केलें दुःखी त्याचिये सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें ॥२॥ त्याचिया अन्यायें भोगा माझें अंग । सकळहि लाग द्यावा लागे ॥३॥ नाहीं कोठें स्थिर राहों दिल्हें क्षण । आजीवरी शीण पावलों तो ॥४॥ वेगळाल्या खोडी केल्या तडातोडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥५॥ निरउनि तुका चालीला गोवार । देवापाशीं भार सांडऊनी ॥६॥

१३०५. न करावी आतां पोटासाठीं चिंता । आहे त्या संचिता माप लाऊं ॥१॥ दृष्टी ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपाईं शीण झाला ॥२॥ येथें तंव नाहीं घेईजेसे सवें । कांहीं नये जीवें वेंचो मिथ्या ॥ ३ ॥ खंडणची नव्हे उद्वेग वेरझारी । आपुडें संसारीं सदा असो ॥४॥ शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजा बळें कोणें कष्टीं व्हावें ॥५॥ तुका म्हणे आतां सकळाचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥६॥

१३०६. आमुच्या हें आलें भागा । जिव्हार या जगाचें ॥१॥ धरोनियां ठेलों जीवें । बळकट भावें येकविध ॥२॥ आणुनियां केला रूपा । उभा सोपा जवळी ॥३॥ तुका म्हणे अंकित केला । खालीं आला वचनें ॥४॥

१३०७. खरें भांडवल सांपडलें गांठीं । जेणें नये तुटी उदीमासी ॥१॥ सर्वंगाचें केणें सांपडलें घरीं । भरोनी वैखरी सांठविलें ॥२॥ देतां घेतां लाभ होतसे सकळा । सदैव दुबळा भाव तैसा ॥ ३ ॥ फडा आलीया तो न वजे नीरास । जरी कांहीं त्यास न कळतां ॥४॥ तुका म्हणे आतां झालिसे निश्चिंती । आणीक तें चित्तीं न धरूं दुजें ॥५॥

१३०८. पदोपदीं दिल्हें अंग । जालें सांग कारण ॥१॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥२॥ पुढती चाली मना लाहो । वाढे देहो संतोषें ॥३॥ तुका म्हणे क्षरभागीं । झालों जगीं व्यापक ॥४॥

१३०९. निवडुनि दिल्हें नवनीत । संचित तें भोगीतें ॥१॥ आतां पुढें भाव सार । जीवना थार पाहावया ॥२॥ पारखियाचे पडिलों हातीं । चाचपती आंधळीं ॥३॥ तुका म्हणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥४॥

१३१०. उचित न कळें इंद्रियांच्या वोढी । मुखें वडबडी शिकलें तें ॥१॥ आपण जाऊन न्यावें नरकास । बळें बेताळीस कुळें जग ॥२॥ अबोलणें

बोले डोळे झांकोनियां । बडबडी वायां दंभासाठीं ॥३॥ तुका म्हणे आम्ही तेथील पारखी । नाचों देखों वेखी जाणों खरें ॥४॥

१३११. येक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येईल कैसें ॥१॥ म्हणवोनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावी संग प्रारब्धाचा ॥२॥ आणिका संकल्पा नको गोऊं मन । तयास कारण साध्य होय ॥३॥ तुका म्हणे ऐसें जाणावें उचित । तरी सहज स्थित येईल कळों ॥४॥

१३१२. गावें म्हणवोनि गीत । धरुनि राहे तैसें चित्त ॥१॥ हेंचि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥२॥ ऐकावी म्हूण कथा । राहे तैसें धरुनि चित्ता ॥३॥ तुका म्हणे धणी । नव्हे जेविल्यावांचुनी ॥४॥

१३१३. कळेल हे खुण । तरि दावी नारायण ॥१॥ सत्य संतापासी राहे । येरा भय आड आहे ॥२॥ अणुचिया ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥३॥ इंद्रियाचे धणी । ते हे जाती समजूनि ॥४॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥५॥ तुका म्हणे ल्यावे । डोळां अंजन बरवें ॥६॥

१३१४. जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ॥१॥ कैसा जालासे बेशरम । लाज नाहीं म्हणे राम ॥२॥ पाहे वैरियाकडे । डोळे वांसोनियां रडे ॥३॥ बांधोनिया यमा हातीं । दिल्हे नाहीं त्याची खंती ॥४॥ नाहीं यांपें काम । ऐसें जाणतो अधम ॥५॥ अझुनि तरी मुका । कां रे जालासी म्हणे तुका ॥६॥

१३१५. वांटा घेई लवकरी । मागें अंतरसी दुरी । केली भरोवरी । सार नेती आणीक ॥१॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती । समयो नेणती । माता भार वाहोनी ॥२॥ नाहीं सरलें तोंवरी । धांव घेई वेग करी । घेतलें पदरीं । फावलें ते आपुलें ॥३॥ फटलंडी म्हणे तुका । येक न साहावे धका । तरीच या सुखा । मग कैसा पावसी ॥४॥

१३१६. चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया । आईकिल्या वायां वारता त्या ॥१॥ आईका जी वोजे पडतसे पायां । भावाचि ते जाया वाट नव्हे ॥२॥ व्याली कुमारीच्या अनुभवें अनुभव । सांगता तो भाव येत नाहीं ॥३॥ तुका म्हणे येथें पाहिजे आरालें । बिंब निवळलें तरी भासे ॥४॥

१३१७. काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥१॥ जया न फळे उपदेश । धस ऐसें त्या नांवें ॥२॥ काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ॥३॥ तुका म्हणे कुचर दाणा । तैसा म्हणा डेंग हा ॥४॥

१३१८. देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्या ऐशी केवीं गारगोटी ॥१॥ मर्यादा ते जाणे अरे अभागिया । देवाच्या ऐशिया सकळ मूर्ती ॥२॥ काय पडिलेसी लटिक्याचे भरी । वोवाळुनि थोरी परती सांडी ॥३॥ तुका म्हणे पुढें दिसतसे घात । करितो फजित म्हणऊनी ॥४॥

१३१९. संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवी ॥१॥ भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासि मुकावें ॥२॥ भिक्षा आणि वेवसाव । काला करी तो गाढव ॥३॥ करुनि वस्ती बाजारीं । म्हणवी कासया निस्पृही ॥४॥ प्रसादा आडुनि कवी । केलें तूप पाणी तेवीं ॥५॥ तुका म्हणे होई शूर । किंवा निसूर मजूर ॥६॥

१३२०. तेज्या इशारती । तट्टा फोकावरी घेती ॥१॥ काय सांगावें त्याहूनी । आइकारे धरा मनीं ॥२॥ नव्हे भांडखोर । वोढुनि धरूं पदर ॥३॥ तुका म्हणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥४॥

१३२१. मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥१॥ आचारातें भ्रष्ट होती लोक कलीं । पुण्य क्षीण बळी झालें पाप ॥२॥ वर्ण धर्म कोणी न धरिती विटाळ । घालिती गोंधळ येके ठायीं ॥३॥ वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषईं मांड ॥४॥ तुका म्हणे किती करावे फजीत । तेचि छंद नित्य बहु होती ॥५॥

१३२२. अक्षराचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥१॥ अवघीयाचा तळ धरीं । जीवा उरी नुरउनी ॥२॥ फळलें तें लवे भारें । पीक बरें आलें तईं ॥३॥ तुका म्हणे हा गे देव । पुढें भाव सारावा ॥४॥

१३२३. उचित जाणावे मुख्य धर्म आधीं । चित्त शुद्ध बुद्धी ठाईं स्थीर ॥१॥ न घालावी धांव मनाचिये वोढी । वचनीं आवडी संतांचिया ॥२॥ अंतरीं या राहे वचनाचा विश्वास । नलगे उपदेश तुका म्हणे॥३॥

१३२४. जीवन्मुक्त ज्ञानी जरि जाले पावन । त्यजा हो दुर्जन संगतीही ॥१॥ बहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघेंचि तेणें विष होय ॥२॥ तुका म्हणे जेणें आपुलें स्वहित । तैशी करी नीत विचारूनी ॥३॥

१३२५. द्रव्याचा तो आम्ही धरितों विटाळ । तया पाठीं काळ लाग करी ॥१॥ करूनियां हेंचि राहिलों जीवन । येक नारायण नाम ऐसें ॥ २ ॥ तुका म्हणे हेंचि करोनि जतन । आलियाही दान याचकासी ॥३॥

१३२६. द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग । म्हणोनियां संग खोटा त्याचा ॥१॥ निरयाचें मूळ घालोनियां मागें । मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥२॥ आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा । पुढिल भार देवावरीं घाला ॥३॥ प्रारब्ध हें कांहीं न पालटे सोसें । तृष्णेचें हे पिसें वायांवीण ॥४॥ तुका म्हणे घेई राहे ऐसें धन । सादर श्रवण करोनियां ॥५॥

१३२७. रडे अळंकार दैन्याचिये कांतीं । उत्तम विपत्ति संग घडे ॥१॥ येकावीण येक अशोभ दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥२॥ रांधू नेणें तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वायां जाय ॥३॥ तुका म्हणे चिंतामणी शेळीगळा । पाव अवकळा म्हणऊनी ॥४॥

१३२८. दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसी ॥१॥ कांहीं न करितां विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥२॥ भोगें कळों येती मागील ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥३॥ तुका म्हणे येथें झांकितील डोळे । भोग देते वेळे येइल कळों ॥४॥

१३२९. सदैव तुम्हां अवघें आहे । हातपाय चालावया ॥१॥ मुखीं वाणी कानीं कीर्ती । डोळे मूर्ति देखावया ॥२॥ अंध बहिर ठकलीं किती । मुकीं होतीं पांगुळें ॥३॥ घरा आगी लाउनि जागा । न पळे तो गा वांचेना ॥४॥ तुका म्हणे जागा हिता । कांहीं आतां आपुलिया ॥५॥

१३३०. ऐसे पुढती मिळता आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥१॥ म्हणुनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥२॥ संचित प्रारब्ध

गाढें । धांवे पुढें क्रियमाण ॥३॥ तुका म्हणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें सूकराचें ॥४॥

१३३१. सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडूं येक ॥१॥ संसाराची मज न साहेचि वार्ता । आणिक म्हणतां माझे कोण्ही ॥२॥ देहसुख कांहीं बोलिले उपचार । विष तें आदर बंध वाटे ॥३॥ उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ॥४॥ तुका म्हणे कांहीं आणिक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ॥५॥

१३३२. आणिक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥१॥ भिन्न भेद देह भावना स्वभाव । नव्हे कांहीं देव येकविध ॥२॥ गुणदोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म अकर्म तें ॥३॥ तरीच भले आतां न करावा संग । दुःखाचे प्रसंग तोडावया ॥४॥ तुका म्हणे गुण गाई या देवाचे । घेई माझे वाचे हेचि धणी ॥५॥

१३३३. आपुला विचार करीन जीवासीं । काय या जनासीं चाड मज ॥१॥ आपुलें स्वहित जाणती सकळ । निरोधितां बळ दुःख वाटे ॥२॥ आइको नाइको कथा कोणी तरी । जावोनियां घरीं निजो सुखें ॥३॥ माझी कोण वोज जाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लागे ॥४॥ तुका म्हणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे॥५॥

१३३४. धाई अंतरींच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥१॥ विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभव गोडी ॥२॥ वाटे तळमळ उभयतां । नाहीं देखिलें अनुभवितां ॥३॥ आपुलाल्या मतें पीसें । परि तें आहे जैसें तैसें ॥४॥ साधनाची सिद्धी । मौन करा स्थीर बुद्धी ॥५॥ तुका म्हणे वादें । वायां गेलीं ब्रम्हवृंदें ॥६॥

१३३५. कुशळ गुंतलें निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥१॥ कैसीं ठकलीं बापुडीं । दंभविषयाची सांकडीं ॥२॥ भूस उफणून केलें काय । हरपले दोनी ठाय ॥३॥ तुका म्हणे लागे हातां । काय मंथिलें घुसळितां ॥४॥

१३३६. संतांची उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥१॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥२॥

करितों कवित्व बोबड्या उत्तरीं । म्हणी मजवरी कोप धरा ॥३॥ काय माझी याती नेणा हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥४॥ तुका म्हणे मज बोलवि तो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ॥५॥

१३३७. चंदनाच्या वासें धरीतील नाक । नावडे कनक न घडे हें ॥१॥ साखरेची गोडी सारखी सकळां । थोरां मोठ्या बाळां धाकुटीया ॥२॥ तुका म्हणे माझें चित्त शुद्ध होतें । तरी कां निंदितें जन मज ॥३॥

१३३८. तुज ऐसी कोण उदाराची राशी । आपुलेंचि देशी पद दासां ॥१॥ शुद्ध हीन कांहीं न पाहसी कूळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥२॥ भावेंही कदान्न खासीं त्याचें घरीं । अभक्तांच्या परी नावडती ॥३॥ नवजासी तेथें दूरी दवडीता । न येसी जो चित्ता योगियांच्या ॥४॥ तुका म्हणे ऐशीं तुझीं ब्रीदें खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥५॥

१३३९. तरि का नेणते होते मागें ऋषी । तिहीं या जनासीं दूराविलें ॥१॥ वोळंगती जया अष्ट महासिद्धी । ते या जनबुद्धी नातळती ॥२॥ कंदमुळें पाला घातूच्या पोपणें । खाती वास रानांतरीं केला ॥३॥ लाउनियां नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले मौन्यमुद्रे ॥४॥ तुका म्हणे ऐसें करी माझ्या चित्ता । दुऱ्हावी अनंता जन दुरी ॥५॥

१३४०. कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देइल धीर माझ्या जीवा ॥१॥ शास्त्रज्ञ पंडित नव्हे मी वाचक । याति शुद्ध येक ठाव नाहीं ॥२॥ कलियुगीं बहु कुशल हे जन । छळतील गूण तुझे गातां ॥३॥ मज हा संदेह झाला दोहींसवा । भजन करूं देवा किंवा नको ॥४॥ तुका म्हणे आतां दुरावीतां जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥५॥

१३४१. काय उणें जाले तुज समर्थासी । ऐसा मजपासीं कोण दोष ॥१॥ जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमध्यें ॥ २ ॥ तुजवीण रत आणीकाचें ठाईं । ऐसि कोण गोही दावीं मज ॥ ३ ॥ तुका म्हणे काय धरुनि गुमान । सांग उगऊन पांडुरंगा ॥४॥

१३४२. काय करूं आन दैवतें । येकावीण पंढरिनाथें ॥१॥ सरता मिळाली सागरीं । आणिका नांवा कैची उरी ॥२॥ अनेक दीपींचा

प्रकाश । सूर्य उगवतां नाश ॥३॥ तुका म्हणे नेणें दुजें । येकावीण पंढरिराजे ॥४॥

१३४३. काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥१॥ होसि नामाची सारिखा । समजाविली नाहीं लेखा ॥२॥ नाहीं वेंचावेंच जाला । उरला आहेसी संचला ॥३॥ तुका म्हणे माझें । काय होईल तुम्हां वोझें ॥४॥

१३४४. येका येकीं हातोफळी । ठाया बळी पावले ॥१॥ आम्ही देवा शक्तिहीन । भाकूं तेणें करुणा ॥२॥ पावठणी केला काळ । जया बळ होतें तें ॥३॥ तुका म्हणे वीर्यावीर । संतधीर समुद्र ॥४॥

१३४५. पुढिलाचें इच्छी फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥१॥ संत गेले तया ठायां । देवराया पाववी ॥२॥ जेष्ठाची कां आम्हां जोडी । परवडी न लाभो ॥३॥ तुका म्हणे करीं कोड । पुरवी लाड आमुचा ॥४॥

१३४६. कैवल्याच्या तुम्हां घरीं । राशी हारी उदंड ॥१॥ मजसाठीं कां जी वाणी । नको धणी विभागा ॥२॥ सर्वा गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनी ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । झालों सांगा सन्मुख ॥४॥

१३४७. आपुलाल्या तुम्ही रूपासी समजा । कासया वरजा आरसिया ॥१॥ हें तों नव्हे देहबुद्धीचें कारण । होईल नारायणें दान केलें ॥२॥ बभ्रुचिया बाणे वर्मासी स्पर्शावें । हे तों नाहीं ठावें मोकली त्या ॥ ३ ॥ तुका म्हणे बहु सुख या वचना । सत्यावीण जाणा चाली नाहीं ॥४॥

१३४८. न मनावी चिंता तुम्हां संतजनीं । हिरा स्फटिकमणी केंवी होय ॥१॥ पडिला प्रसंग स्थळा त्या सारिखा । देखिला पारखा भाव कांहीं ॥२॥ बहुतांसी भय येकाचिये दंडें । बहुत या तोंडें वचनासी ॥३॥ तुका म्हणे नाहीं वैखरी वासर । करायाचे चार वेडे वेडे ॥४॥

१३४९. यथाविधि पूजा करी । सामग्री तो वरी हे नाहीं ॥१॥ आतां माझा सर्व भार । तूं दातार चालविला ॥२॥ मंगळ तें तुम्ही जाणा । नारायणा काय तें ॥३॥ तुका म्हणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥४॥

१३५०. भवसिंधूचें हेंचि तारूं । मज विचारूं पाहतां ॥१॥ चित्तीं

तुझे धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥२॥ माझ्या खुणा मनापासीं । ते या रस्तीं बुडाले ॥३॥ तुका म्हणे वर्म आलें । हातां भलें हें माझ्या ॥४॥

१३५१. पाहतां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक न वजे माझ्या ॥१॥ जिव्हे गोडी तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥२॥ श्रवणींचि वाट चोखाळिली शुद्ध । गेले भेदाभेद वारोनियां ॥३॥ महामळें मन होतें जें गादलें । शुद्ध चोखाळिलें स्फटिक जैसें ॥४॥ तुका म्हणे माझ्या जीवींचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥५॥

१३५२. हाचि परमानंद आळंगीन बाही । क्षेम देतां ठाई द्वैत तुटे ॥१॥ बोलायाची मात मन निवे हर्षें चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख ॥२॥ जनांत भूषण वैकुंठी सरता । फावलें स्वहिता सर्व भावें ॥३॥ तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥४॥ तुका म्हणे तो हा विठ्ठलची व्हावा । आणिक या जीवा चाड नाहीं ॥५॥

१३५३. आमुची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥१॥ प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टी हे निर्मळ अमृताची ॥२॥ भूक तान दुःख वाटों नेदी शीण । अंतरींचा गुण जाणोनियां ॥३ आशा तृष्णा माया चिंता दवडीं दूरी । ठाव आम्हां करीं खेळावया ॥४॥ तुका म्हणे लावीं संतांच्या सांगात । जेथें न पवे घात कळिकाळाचा॥५॥

१३५४. जेथे जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेष संतसंगें ॥१॥ पूर्वपुण्यें जरी होती सानुकुळें । अंतरायमुळ नुपजे तेथें ॥२॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतां पाईं ॥३॥ तुका म्हणे हेचि करावी मिरासी । बळी संतांपासीं द्यावा जीव ॥४॥

१३५५. आतां कांहीं सोस न करीं आणीक । धरीन तें येक हेंची दृढ ॥१॥ जेणें भवसिंधु उतरी जे पार । तुटे हा दुस्तर गर्भवास ॥२॥ जोडीन ते आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥३॥ तुका म्हणे बरा जोडला हा देह । मनुष्यपणें इहलोकां आलों ॥४॥

१३५६. जतन करिन जीवें । शुद्ध भावें करोनी ॥१॥ विठ्ठल विठ्ठल

हें धन । जीवन अंतकाळींचें ॥२॥ वरदळ हें संचित सारूं । बरवा करूं उदीम हा ॥३॥ तुका म्हणे हृदयपेटी । ये संपुटीं सांठऊं ॥४॥

१३५७. येवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावें ॥१॥ होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥२॥ येवढा तो जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥३॥ आला नांवरूपा । तुका म्हणे झाला सोपा ॥४॥

१३५८. भाग्यें ऐसी झाली जोडी । आतां घडी न विसंबे ॥१॥ विटेवरी समचरण । संतीं खूण सांगीतली ॥२॥ अवघें आतां काम सारूं । हाचि करूं कैवाड ॥३॥ तुका म्हणे खंडूं खेपा । पुढें पापापुण्याच्या ॥४॥

१३५९. पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हां नारायण तैशापरी ॥१॥ सर्वभावें लोभ्या आवडतें धन । आम्हां नारायण तैशापरी ॥२॥ तुका म्हणे येकविध झालें मन । विठ्ठलावांचून नेणें दुजें ॥३॥

१३६०. विठ्ठल गीतीं गावा । विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पाहावा विटेवरी ॥१॥ अनाथाचा बंधु विठ्ठल कृपासिंधु । तोडी भवबंधु यमपाश ॥२॥ तोचि शरणागता विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या संतां समागमें ॥३॥ विठ्ठल गुणनीधी विठ्ठल सर्वसिद्धी । लागली समाधि विठ्ठलनामीं ॥४॥ विठ्ठलाचें नाम घेतां झालें सुख । गोडावलें मुख तुका म्हणे ॥५॥

१३६१. विठो सांपडावया हातीं । ठावी झाली येक गती । न धरि भय चित्तीं । बळ किती तयाचें ॥१॥ लागे आपणचि हातीं । कींव भाकावी काकुळती । करि मग चित्तीं । असेल तें तयाचें ॥२॥ येकलिया भाव बळें । कैं सांपडे तो काळें । वैष्णवाचे मेळे । उभा ठाके हाकेशी ॥३॥ बांधा माझिया जीवाशी । तुका म्हणे प्रेमपाशीं । न सोडी तयासी । सर्वस्वासी उदार ॥४॥

१३६२. वाट वैकुंठीं पाहती । भक्त कैं पां येथें येती । तयां जन्ममरणखंतीं । नाहीं चित्तीं परलोक ॥१॥ धन्य धन्य हरिचे दास । तयां सुलभ गर्भवास । ब्रह्मादिक करिती आस । तीर्थवास भेटीची ॥२॥ कथा श्रवण व्हावयास । यमधर्मा थोरी आस । पाहे रात्रंदिवस वाट कर

जोडोनियां ॥३॥ ऋद्धिसिद्धी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्तां । मोक्षसायोज्यता वाट पाहाती भक्तांची ॥४॥ असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले । आणिकहि उद्धरिले । महादोषी चांडाळ ॥ ५ ॥ सकळ करितो त्याची आस । सर्वभावें ते उदास । धन्य भाग्य त्यांस । तुका म्हणे दरुशनें ॥ ६ ॥

१३६३. सोनें दावी वरी तांबें तया पोटीं । खरीयाचेसाठीं विकूं पाहे ॥१॥ पारखी तो जाणें तयाचे जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥२॥ क्षीरा नीरा कैसें होय येकपण । स्वादी तोचि भिन्न भिन्न काढी ॥३॥ तुका म्हणे थीता आपणाचि खोटा । अपमान मोठा पाववीला ॥४॥

१३६४. फोडोनि सांगडी बांधिली माजासी । पैल थडी कैसी पावेल सहज ॥१॥ आपला घात आपणचि करी । आणिका सांगतां नायके तरी ॥२॥ भुकेभेणें विष देऊं पाहे आतां । आपुल्याचि घाता करूं पाहे ॥३॥ तुका म्हणे येक चालतील पुढें । तयासि वांकडें जातां ठके ॥४॥

१३६५. उपकारासाठीं बोलों हे उपाय । येणेंवीण काये आम्हां चाड ॥१॥ बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणुनीयां ॥२॥ तुका म्हणे माझे देखतील डोळे । भोग देते वेळे येइल कळों ॥३॥

१३६६. आठवे देव तो करावा उपाव । येर त्यजी वाव खटपट ॥१॥ होईं या जागा होईं बा जागा । वाउगा कां गा शीणसील ॥२॥ जाणिवेच्या भारें भवाचिया डोहीं । बुडशी तो कांहीं निघशीना ॥३॥ तुका म्हणे देवा पावलीस भावें । जाणता तें ठावें कांहीं नव्हे ॥४॥

१३६७. माझ्या मुखा वाटे नयो हें वचन । व्हावें हे संतान द्रव्य कोणा ॥१॥ सुखाचा विभाग पतन दुःखासी । दोहिमुळें त्यासी तेंची साध्य ॥ २ ॥ नायकावी निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होऊनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे देव असाध्य यामुळें । आशामोहजाळीं गुंतलीया ॥ ४ ॥

१३६८. चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहिता ते ठाईं आपणापें ॥१॥ मनासी विचार तोचि साच भाव । व्यापला हा देव अंतर्बाही ॥२॥

शुद्ध भाव नलगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिके ठाईं ॥३॥ भोगित्यासि काज अंतरींचीं गोडी । बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥४॥ तुका म्हणे भाव शुद्ध हें कारण । भाट नारायण होईल त्याचा ॥५॥

१३६९. नव्हती माझे बोल । अवघे करी तो विठ्ठल ॥१॥ कांहीं न धरावी खंती । हित होईल धरा चित्तीं ॥२॥ खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥३॥ ज्याचें तोचि जाणें । मी मापाडें तुका म्हणे ॥४॥

१३७०. वासनेचे मुखीं आदळुनि भितें । निर्वाहापुरतें कारण तें ॥१॥ या नांव अंतरा आला नारायण । चित्त समाधान खुण त्याची ॥२॥ सर्व काळ हाची करणें विचार । विवेकीं सादर आत्मतत्वाचे ॥३॥ तुका म्हणे जों जों भजनासी वळे । अंगीं तों तों कळे सन्निधता ॥४॥

१३७१. चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तेंचि किती काळ वाढवावें ॥१॥ अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनासीं उरी उरली नाहीं ॥२॥ करूं आला तो तो केला लवलाहो । उरोंच संदेहो दिला नाहीं ॥३॥ तुका म्हणे मोहो परतेचि ना मागें । म्हणोनियां त्यागें त्याग झाला ॥४॥

१३७२. निर्गुणासी द्यावें गुणासी दर्शन । येकायेकीं भिन्न भेद घडे ॥१॥ तुम्हां आम्हां आतां न पडो यावरी । आहों तेंचि बरी जेथें तेथें ॥२॥ आपणापासुनि नसावें अंतर । वेचिलें उत्तर म्हणऊनी ॥३॥ तुका म्हणे अंगा आली कठीणता । आमुच्या अंनता तुम्हां ऐशी ॥४॥

१३७३. तुजची पासाव झालोंसें निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥१॥ पाहावा जी ठाईं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचिना ॥२॥ ठेवियेलें ठाईं आज्ञेचें पाळण । करोनी जतन राहीलोंसे ॥३॥ तुका म्हणे आतां बोलतसे स्पष्ट । झालों क्रियानष्ट तुम्हां ऐसा ॥४॥

१३७४. प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तीरस सांगा कां जी तुम्ही ॥१॥ म्हणऊनि कांहीं न ठेवींचि उरी । आलों वर्मावरी येकायेकीं ॥२॥ न देखोंचि कांहीं परतों माघारी । उरली ते उरी नाहीं मुळीं ॥३॥ तुका म्हणे आला अंतरासी खंड । तरी माझें तोंड खवळीलें ॥४॥

१३७५. लटिका देव म्हणतां ऐसा । संदेहसा वाटतसे ॥१॥ ऐसे

आलें अनुभवा । मजहि सेवा करितां ॥२॥ शून्याकारी बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ॥३॥ तुका म्हणे ताळी नाहीं । येके ठायीं चपळत्वें ॥४॥

१३७६. जैशासाठीं तैसें व्हावें । हें बरवें कळलेंसें ॥१॥ उदास तूं नारायणा । मीहि म्हणा तुम्हीच ॥२॥ ठका महाठका जोडा । जो धड-फुडा लागासी ॥३॥ येकांगींच भांडे तुका । नाहीं धोका जीवित्वें ॥४॥

१३७७. बहुतां रीती काकुळती । आलों चित्तीं न धराच ॥१॥ आतां कशासाठीं देवा । मिथ्या हेवा वाढऊं ॥ २ ॥ तुम्हां आम्हां झाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥३॥ तुका म्हणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥४॥

१३७८. आश्चर्य तें येक झालें । मना आलें माझिया ॥१॥ मढ्यापासीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥२॥ न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥३॥ तुका म्हणे कैंचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥४॥

१३७९. मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचें ॥१॥ लटि-कीयाची न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनी ॥२॥ हिशोबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥३॥ तुका म्हणे स्वामी सेवा । येथें देवां काशाची ॥४॥

१३८०. पाठवणें पडणें पायां । उद्धार वायां कशाचा ॥१॥ घडलें तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळा हें ॥२॥ न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोरड्या ॥३॥ अबोल्यानें असे तुका । अंतर येका साक्षी तें ॥४॥

१३८१. अभयाचें स्थळ । तें हें येक अचळ ॥१॥ तरी धरिला विश्वास । ठेलों होऊनियां दास ॥२॥ पुरली आवडी । पाईं लागलीसे गोडी ॥३॥ तुका म्हणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसे प्रेम ॥४॥

१३८२. संदेह निरसे तरी रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥१॥ आतां नको मज खोट्यानें फटऊं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥२॥ गेला तरी काय जीवाचें सांकडें । वांचउनी पुढें काय काज ॥३॥ तुका म्हणे कसी नीवडा जी बरें । केली तैसीं पोरें आळी पाईं ॥४॥

१३८३. वदे वाणी परी दुर्लभ अनुभवो । चालीचाची वाहो बहुतेक ॥१॥ आम्ही ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ जिंकीतसे ॥२॥

वाढवीतां पोट दंभाचे पसारे । येतील माघारे मुदला तोटे ॥३॥ तुका म्हणे बरें जागवितां मना । तुमच्या नारायणा अभय करें ॥४॥

१३८४. उगेंचि हें मन राहातें निश्चळ । तरी कां तळमळ साट होती ॥१॥ काय तुमची नेणों कौतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥२॥ नाना छंदें आम्हां नाचवावें जीवा । वाढवाव्या हावा भलत्यापुढें ॥३॥ तुका म्हणे तुम्ही आपुली प्रतिष्ठा । वाढवावया चेष्टा करीतसा ॥४॥

१३८५. आम्ही बळकट जाहलों फिराउनि । तुमच्या वचनीं तुम्हां गोऊं ॥१॥ झालें तेव्हां झालें मागीलें तें मागें । आतां वर्म लागें ठावीं झालीं ॥२॥ तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध । शुद्धापासीं शुद्ध बुद्ध व्हावें ॥३॥ तुका म्हणे आम्हां आत्मत्वाची सोय । आपणची होय तैसाची तूं ॥४॥

१३८६. तुम्ही साच नुपेक्षाल हा भरवसा । मज जाणतसां अधीरसें ॥१॥ कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा करकर वारूनियां ॥२॥ सुटों नये ऐसें कळलें निरुतें । कां घ्यावें मागुतें आळऊनी ॥३॥ तुका म्हणे तुम्ही सभाग्य जी देवा । माझा तुम्हां केवा काय आला ॥४॥

१३८७. तुम्हां होईल देवा पडिला विसर । आम्ही तें उत्तर यत्न केले ॥१॥ पतितपावन ब्रीद मिरवीसी । याचा काय देसी झाडा सांग ॥२॥ आहाच मी नव्हे अर्थाचे भुकेले । भलत्या येका बोलें वारेन तो ॥३॥ तुका म्हणे देह देई न सांडणें । सहित अभिमानें वोवाळुनी ॥४॥

१३८८. जडलों अंगाअंगीं । मग ठेवी प्रसंगीं । कांहीं उरी जगीं । लोकीं आहे पुरती ॥१॥ ठेवीं निवारूनि आधीं । अवकाश तोचि बुद्धि । सांपडलों संधी । मग बळ कोणासी ॥२॥ गळा बांधोन पायीं । हलों नेदी ठाईंच्या ठाईं । निवाड तो तईं । आवकळा केलिया ॥३॥ तुका म्हणे ठावें । आम्हां असा जी बरवें । बोभाटाचीं सवें । मुळिंहूनी विठोबा ॥४॥

१३८९. आम्ही शक्तिहीनें । कैसें कराल तें नेणें । लिगाडाच्या गुणें । खोळंबला राहिलों ॥१॥ माझें मज देई देवा असेल तो ठेविला ठेवा । नाहीं करीत हेवा । कांहीं अधिक आगळा ॥२॥ नाहीं गळां पडलों

झोंड । तुमचें तेंचि माझें तोंड । चौघा चार खंड । लांवणी हे अनुचित ॥३॥ नाहीं येत बळा । आतां तुम्हांसी गोपाळा । तुका म्हणे गळा । उगवा पाई लागतों ॥४॥

१३९० काय कृपेवीण घालावें साकडें । निश्चिंती निवाडें कोण्या येका ॥१॥ आहों तैसें पुढें असों दीनपणें । वेंचूनी वचनें करूणेचीं ॥२॥ धरूनि भय आतां काय वाहूं चिंता । काय करूं आतां आपपण ॥३॥ तुका म्हणे आम्ही भावहीन जीव । म्हणउनी देव दूरे दूरी ॥४॥

१३९१. नाहीं उलंघिलें कोणाचें वचन । मज कां नारायण दुरी झाला ॥१॥ आशंकित मनें करी आळवण । नाहीं समाधान निश्चिंतीचे ॥२॥ दासाचा विसर हें तों अनुचित । असे सर्व नीत पायापासीं ॥३॥ तुका म्हणे तुम्हां लाज येत नाहीं । आम्हां चिंताडोहीं बुडवीतां ॥४॥

१३९२. जीव जाय वरी सांडी करी माता । हें तों आश्चर्यता बाळकाची ॥१॥ दुर्बळा कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून झालें ॥२॥ क्षणक्षणा माझा न घ्या सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥३॥ तुका म्हणे नाहीं वचनासी रुची । फलकट चेंची तें तें होय ॥ ४ ॥

१३९३. म्हणवोनि दास नव्हे ऐसा झालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥१॥ कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मीच माझ्या वेंचे अट्टाहास्यें ॥२॥ कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीती कांहीं रस वांचुनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे अगा चतुर शिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥४॥

१३९४. काय आम्ही आतां पोटची भरावें । जग चाळवावें भक्त म्हणूं ॥१॥ ऐसा तरी येक सांगा जी विचार । बहू होतों फार कासावीस ॥२॥ काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षराची ॥३॥ तुका म्हणे काय गुंफोनी दुकाना । राहों नारायणा करूनि घात ॥४॥

१३९५. वर्म तरी आम्हां दावा । काय देवा जाणें मी ॥१॥ बहुता रंगीं हीन झालों । तरी आलों शरण ॥२॥ घाल जरी तुम्ही धीर । होईल स्थीर मन ठाईं ॥३॥ तुका म्हणे सत्तावळें । लडिवाळें राखावी ॥४॥

१३९६. सांगों देवा नेणा काय । बोलाचिये आवडी ॥१॥ वायां मज

चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥२॥ आवडीच्या करा ऐसे । अंतर वासें जाणतसां ॥३॥ तुका म्हणे समाधानें । होईन मनें मोकळा ॥४॥

१३९७. निर्धारार्चे अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥१॥ बैसलीया भाव पाईं । बरा तईं नाचेन ॥२॥ स्वामी कळे सावधान । परी मन उल्हासे ॥३॥ तुका म्हणे आश्वासायें । प्रेम द्यावें विठ्ठलें ॥४॥

१३९८. झाली तडातोडी । अवघीं पडिलों उघडी ॥१॥ नव्हे कोणाचिच कांहीं । तुझे भरलीया वाहीं ॥२॥ पारुषला संसार । मोडली बैसण्याची थार ॥३॥ आतां म्हणे तुका । देवा अंतर राखों नका ॥४॥

१३९९. आधार तो व्हावा । ऐसी आस करी देवा ॥१॥ तुम्हांपासीं काय उणें । काय वेंचें समाधानें ॥२॥ सेवेच्या अभिलाषें । मन बहु झालें पिसें ॥३॥ अरे भक्त पराधीना । तुका म्हणे नारायणा ॥४॥

२४००. तुमचा तुम्ही केला गोवा । आतां चुकवितां देवा ॥१॥ कैसें सरे चाळवणें । केलें कशाला शाहाणे ॥ २ ॥ कासया हो रूपा । नांवा आलेती गा बापा ॥३॥ तुका म्हणे आतां । न सरे हवाले घालितां ॥४॥

१४०१. माझी भक्ती भोळी । येकविध भावबळी ॥१॥ मी कां पडेन निराळा । ऐसा सांडोनी सोहळा ॥२॥ आतां आनारीसा । येथें न व्हावें सहसा ॥३॥ तुका म्हणे जोडोनि पाय । पुढें उगा उभा राहे ॥४॥

१४०२. आहे तरी सत्ता । ऐशा करितों वारता ॥ १ ॥ अंगसंगाचीं उत्तरें । सलगि सेवेनें लेकरें ॥ २ ॥ तरी निकट वासें । असो आशंकेच्या नाशें ॥३॥ तुका म्हणे रुची । येथें भिन्नता कईची ॥४॥

१४०३. काळ सारावा चिंतनें । येकांतवासी गंगास्नानें । देवाचें पूजन । प्रदाक्षिणा तुळशीच्या ॥१॥ युक्त आहार विहार । नेम इंद्रियासी सार । नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥२॥ परमार्थ महा धन । जोडी देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥ ३ ॥ देहे समर्पीजे देवा । भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका म्हणे आनंद ॥४॥

१४०४. मऊ मेणाहुनि आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥१॥ मेले जित असो निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥२॥

मले तरी देऊं गांठींची लंगोटी । नाठाळाचे काठीं देऊं माथा ॥३॥ मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रुहूनी ॥४॥ अमृत तें काय गोड आम्हांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥५॥ तुका म्हणे आम्ही अवघेची गोड । ज्याचें पुरें कोड त्याचेपरी ॥६॥

१४०५. गाढवाचे तान्हें । पालटलें क्षणक्षणे ॥१॥ तैसे अधमाचे गुण । येकवीध नाहीं मन ॥२॥ उपजतां बरें दीसें । रूप वाढतां ते नाशे ॥३॥ तुका म्हणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥४॥

१४०६. विटाळ तो परद्रव्य परनारी । येथोनि जो दुरी तो सोंवळा ॥१॥ गद्य पद्य कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीनचि बुद्धि करुनी ठेवा ॥२॥ विचाराचें कांहीं करावें स्वहित । पापपुण्यातीत मांडवल ॥३॥ तुका म्हणे नलगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखेंची ॥४॥

१४०७. कल्पतरु रुया नव्हति बाभुळा । पुरविती फळा इच्छितया ॥१॥ उदंड त्या गाई म्हैसी आणि शेळ्या । परी त्या निराळ्या कामधेनु ॥२॥ तुका म्हणे देव दाखवील दृष्टी । तयासवें भेटी थोर पुण्य ॥३॥

१४०८. जळो प्रेमा तैसा रंग । जाय भूलोनि पतंग ॥१॥ सासुसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥२॥ मैंद मुखींचा कोवळा । भाव अंतरीं निराळा ॥३॥ जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं नये हातीं ॥४॥ बक ध्यान धरी । सोंग करुनि मासे मारी ॥५॥ तुका म्हणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥६॥

१४०९. वेशा नाहीं बोल अवगुण दूषिले । ऐशा बोला भले झणीं क्षोभा ॥१॥ कोण नेणें अन्न जीवाचें जीवन । विष मेळवण विष होय ॥२॥ सोनें शुद्ध नेणें कोण हा विचार । डाकें हीणवर केलें त्यासी ॥३॥ याति शुद्ध परी अधम लक्षण । वायां गेलें तेणें सोंगही तें ॥४॥ तुका म्हणे शूर तोचि पावे मान । आणिक मंडण भार वाही ॥५॥

१४१०. अणुरेणुया थोकडा । तुका आकाशायेवढा ॥१॥ गिळुनि सांडिलें कलेवर । भवभ्रमाचा आकार ॥२॥ सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥३॥ तुका म्हणे आतां । उरलों उपकारा पुरता ॥४॥

१४११. धन्य आजी दिन । झालें संतांचें दर्शन ॥१॥ झाली पापा-तापा तुटी । दैन्य गेलें उठाउठी ॥२॥ झालें समाधान । पाईं विसावलें मन ॥३॥ तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥४॥

१४१२. हेंचि माझें धन । तुमचे वंदावे चरण ॥१॥ येणें भाग्य असो जित । येवढें समर्पुनी चित्त ॥२॥ सांभाळिलें देवा । मज अनाथा जी जीवा ॥३॥ जोडूनियां करं । तुका विनवीतो किंकर ॥४॥

१४१३. फजितखोरा मना किती तूज सांगों । नको कोणा लागों मागें मागें ॥१॥ स्नेहवाद दुःख जडेल हें अंगीं । निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥२॥ निंदा स्तुति कोण्ही करो दया माया । न धरीं चाड या सुखदुःखा ॥३॥ योगीराज कां रे न राहती बैसोनी । येकीये आसनीं याचि गुणें ॥४॥ तुका म्हणे मना पाहें विचारून । होईं रे कठिण वज्रा ऐसें ॥५॥

१४१४. जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं । आवडी हे विधी । निषेधींच चांगली ॥१॥ तूं स्वामी मी सेवक । उंच पद येक नीच । ऐसें करावें कवतुक । नको करूं खंडणा ॥२॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलीया फळा । भोक्ता तो निराळा । तेणें गोडी निवडिली ॥३॥ हिरा शोभला कोंदणें । अलंकारी मिरवी सोनें । येक असतां तेणें । काय दुजे जाणावें ॥४॥ उष्णें छाये सुख वाटे । बाळें माता पान्हा फुटे । येकायेक भेटे । कोण सुख ते काळीं ॥५॥ तुका म्हणे हित । हेंचि मानी माझें चित्त । नव्हे आतां मुक्त । ऐसा जाला भरवसा ॥६॥

१४१५. मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसा ॥१॥ जातीचें तें झुरे येरेयेरासाठीं । वियोगेंही तुटी नेघे कधीं ॥२॥ भेटीची अपेक्षा वारता आदर । पुसे नसे धीर मागूतालें ॥३॥ तुका म्हणे माझ्या जिवाचें जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥४॥

१४१६. नव्हे आराणूक परि मनीं वाहो । होईल त्या साह्य पांडुरंग ॥१॥ पंढरिसी जावें उद्वेग मानसीं । धरिल्या पावसीं संदेह नाहीं ॥२॥ नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाको नको ॥३॥ तुका म्हणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे येणें याजसाठीं ॥४॥

१४१७. कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतों दिन होतों तरी ॥१॥ साधन तें सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाईजे तें ॥२॥ न पुसे ते कोण्ही कोठेंही असतां । समाधान चित्ताचिया सुखें ॥३॥ तुका म्हणे जन अव्हेरीतें मज । तरि केशिराज सांभाळीतां ॥४॥

१४१८. चतुर मी झालों आपुल्या मोंवतां । भावेंविण रिता स्फुंद अंगीं ॥१॥ आतां पुढें वायां जावें हें तें कोई । काम क्रोधें ठाईं वास केला ॥२॥ गुण दोष आले जगाचे अंतरीं । भूताच्या मत्सरावरी बुद्धी ॥ ३ ॥ तुका म्हणे करूं उपदेश लोकां । नाहीं झालों येका दोषा परता ॥४॥

१४१९. धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥१॥ येथें उपकारासाठीं । आलें घर ज्या वैकुंठीं ॥२॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥३॥ मधुरा वाणी ओटीं । तुका म्हणे वाव पोटीं ॥४॥

१४२०. कांडिल्या कुटिल्या होतो मांडा । आळसें धोंडा पडतसे ॥१॥ राग नको धरूं मनीं । गांडमनीं सांगतों ॥२॥ तरटापुढें बरें नाचे । सुते कांचें मुसळ ॥३॥ तुका म्हणे काढी सार । करी फार शाहाणें ॥४॥

१४२१. कळों येते तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥१॥ जाणतांचि होतो घात । परिसा मात देवा हे ॥२॥ आविसासाठीं फासा मान । पाडी धन इच्छा ते ॥३॥ तुका म्हणे होणार खोटें । कर्म मोठें बळिवंत ॥४॥

१४२२. मोकळें मन रसाळ वाणी । याची गुणीं संपन्न ॥१॥ लक्ष्मी त ऐशा नांवें । भाग्य जायें तरि त्यांनीं ॥२॥ नमन नम्रता अंगीं । नेघें रंगीं पालट ॥३॥ तुका म्हणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ४ ॥

१४२३. शेवटींची विनवणी । संतजनीं परिसावी ॥१॥ विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हांसी ॥२॥ पुढें फार बोलों काई । अवघें पायीं विदित ॥३॥ तुका म्हणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥४॥

१४२४. करितों कवित्व म्हणाल हें कोण्ही । नव्हे माझी वाणी पदरींची ॥१॥ माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवीतो ॥ २ ॥ काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥ ३ ॥

निमित्त आपासीं बैसविलों आहें । मी तों कांहीं नव्हें स्वामीसत्ता ।। ४ ।। तुका म्हणे आहें पाईकचि खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ।।५।।

१४२५. आम्हीं गावें तुम्हीं कोण्हीं कांहीं न म्हणावें । ऐसें तंव आम्हां सांगितलें नाहीं देवें ।।१।। म्हणा राम राम टाळी वाजवा हातें । नाचा डोला प्रेमें आपुलीया स्वहितें ।।२।। सहज घडे या आळस करणें तें काई । अग्नीचें भातुकें हात पाळितां कां पाई ।।३।। येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हासे तया घडे ब्रह्महत्या पातक ।।४।। जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताळ विताळ या देवा ।।५।। सदैव त्या कथाकाळीं घडे श्रवण । तुका म्हणे येर जन्मा आले तें पाषाण ।।६।।

१४२६. देव घ्या कोणी देव घ्या कोणी । ऐता आला घर पुसोनी ।।१।। देव नलगे देव नलगे । साठवणेचे रुधले जागे ।।२।। देव मंदला देव मंदला । भाव बुडाला काय करूं ।।३।। देव घ्या फुका देव घ्या फुका । नलगे रुका मोल कांहीं ।।४।। दुबळा तुका भावहीव । उधारा देव घेतला ऋणें ।।५।।

१४२७. विष्णुमय सर्व वैष्णवासी ठावें । येरांनीं वाहावें भार माथां ।।१।। साधनें संकट सर्वांलागीं शीण । व्हावा लागे क्षीण अहंभाव ।।२।। भाव हा कठीण वज्र हें भेदावें । परि न छेदवे माया जाळ ।।३।। तुका म्हणे वर्म भजनींचि सांपडे । येरासी तों पडे वोस दिशा ।।४।।

१४२८. कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ।।१।। कोण्ही व्हा रे अधीकारी । त्यासि हरि देईल ।।२।। वैराग्याचें बळ । साही खळा जिणावे ।।३।। उरले ना उरी । तुका करी बोभाट ।।४।।

१४२९. काया वाचा मन ठेविलें गहाण । घेतलें तुझें रिण जोडी-लागीं ।।१।। अवघें आलें आतां पोटा पडिलें थीतें । सारूनी निश्चिंत झालों देवा ।।२।। द्यावयासी आतां नाहीं तोळामासा । आधील मवेशा तूज ठावे ।।३।। तुझ्या रिणें गेले बहुत बांधोनी । झाले मजहूनी थोर थोर ।।४।। तुका म्हणे तुझे खंती जे गुंतले । करुनी आपुले घेई देवा ।। ५ ।।

१४३०. आलें भरा केणें । येरझार चुके जेणें ।।१।। उभें केलें विटे-

वरी । पेठ इनाम पंढरी ॥२॥ वाहाती मारग । अवघें मोहोरलें जग ॥३॥ तुका म्हणे माप । खरें आणा माझे बाप ॥४॥

१४३१. लक्ष्मीवल्लभा । दीनानाथा पद्मनाभा ॥१॥ सुख वसे तुझे पाईं । मज ठेवीते तेचि ठाईं ॥२॥ माझी हे वासना । तूं तों उदाराचा राणा ॥३॥ तुका म्हणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥४॥

१४३२. करी ऐसे जागें । वेळोवेळां पायां लागें ॥१॥ प्रेम झोंबे कंठीं । देहे धरणीये लोटी ॥२॥ राहे लोकाचार । पडे अवघा विसर ॥३॥ तुका म्हणे घ्यावें । तुज व्यभिचारभावें ॥४॥

१४३३. टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते सांगाती ॥१॥ जाल तरी कोणी जागी । करा सिदोरि ते वेगा ॥२॥ जाती सादावीत । तेथें असों द्यावें चित्त ॥३॥ तुका म्हणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥४॥

१४३४. वायां जातों देवा । नेणें भक्ती करूं सेवा ॥ १ ॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥२॥ करावें तें काय । न कळे अवलोकितों पाय ॥३॥ तुका म्हणे दान । दिल्हें पदरीं घेईन ॥४॥

११३५. जिवींचा जिव्हाळा । पाहों आपुलीया डोळां ॥१॥ आम्हां विठ्ठल येक देव । येर अवघेचि वाव ॥२॥ पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवोनि कटीं ॥३॥ तुका म्हणे चित्तीं । वाहूं रखमाबाईचा पति ॥४॥

१४३६ जीव, खादला दैवतें । माझा येणें महाभूतें । झोंबलें निरुतें । कांहीं करितां न सुटे ॥१॥ आतां करूं काय । न चले करितां उपाय । तुम्हां आम्हां सय । विघडावीघडी केली ॥२॥ बोलतां दुश्चिती । मी वो पडियेलों भ्रांती । आठव हा चित्तीं । नये म्हणतां मी माझें ॥३॥ भलतेंचि चावळे । जना अवघिया, वेगळें । नाठवती बाळें । आपपरासारिखे ॥४॥ नका बोलों सये । मज वचन न साहे । बैसल्या त्या राहे । उग्या वाचा खुंटोनी ॥५॥ तुम्हां आम्हां भेटी । नाहीं झाली जिवेसाठीं । तुका म्हणे दृष्टी । पाहा जवळी आहे तो ॥६॥

१४३७. माझें आराधन । पंढरपुरीचें निधान ॥१॥ तया येकावीण

दुजें । कांहीं नेणें पंढरिराजे ॥ २ ॥ दास विठ्ठलाचा । अंकित अंकीला ठाईंचा ॥३॥ तुका म्हणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥४॥

१४३८. आतां आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम । वाहुनियां टाळी प्रेम । सुखें आनंदें नाचावें ॥१॥ अवघी झाली आराणुक । मागें पुढें सकळिक । त्रिपुटीचें दुःख । प्रारब्धा सारिलें ॥२॥ गोदातटीं निर्मळें । देव देवांचीं देवळें । संत महंत मेळें । दिवस जाय सुखाचा ॥३॥ तुका म्हणे पंढरिनाथा । आणिक नाहीं मज चिंता । योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥४॥

१४३९. चोरटें सुनें मारिलें टाळे । केऊं करी परी न सांडी चाळे ॥१॥ ऐसे येक दुराचारी गा देवा । आपुलीया जीवा घात करी ॥२॥ नाक गेलें तरी लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥३॥ तुका म्हणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तयां पुढें मागें सरों ॥४॥

१४४०. मुनि मुक्त झालें भेणें गर्भवासा । आम्हां विष्णुदासां सुलभ तो ॥१॥ ओघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठल स्वरूप म्हणोनियां ॥२॥ पुराणीं उपदेश साधन उद्धट । आम्हां सोपी वाट वैकुंठींची ॥३॥ तुका म्हणे जनां सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥४॥

१४४१. न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥१॥ भारें भवनदी नुतरवे पार । दुराविती दूर तुमचे पाय ॥२॥ तुका म्हणे गर्व पुरविला पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥३॥

१४४२. तुमचिया दासीचा दास करुनि ठेवा । आशिर्वाद द्यावा हाचि मज ॥१॥ नवविधा काय बोलिली जे भक्ती । द्यावी माझे हातीं संतजनीं ॥२॥ तुका म्हणे तुमच्या पायाच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥३॥

१४४३ चोरटे काचे निघाले चोरी । आपलें तैसें पारिखें घरीं ॥१॥ नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥२॥ बुद्धिहीन नव्हे कांहींचि कारण । तयासवें जाण तेंचि सुख ॥३॥ तुका म्हणे नाहीं ठाऊकें वर्म । तयासी तें कर्म वोढवलें ॥४॥

१४४४. समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥१॥ आगुणि जरी झालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥२॥ तुका म्हणे तैसा मी येक पतित । परी मुद्रांकित झालों तुझा ॥३॥

१४४५. गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें भेटी तेणें केली ॥१॥ सहज गुण जयाचिये देहीं । पालट तो कांहीं नाहीं तया ॥२॥ माकडाच्या गळां मोलाचा मणी । घातला चाऊनी थुंकोनि टाकी ॥३॥ तुका म्हणे खळा नावडेचि हीत । अविद्या वाढत आपुलें मतें ॥४॥

१४४६. नेणें सुनें चोर पाहुणा मागता । देखोनी भलता भुंकतसे ॥१॥ शिकविलें कांहीं न चले तें तया । बोलीयेले वायां बोल जाती ॥२॥ क्षीर ओकोनी खाय अमंगळ । आपुले ते ढाळ जाऊं नेदी ॥३॥ वंद्य निंद्य संतां काय दुराच्यार । खळाचा विचार तुका म्हणे ॥४॥

१४४७. जन मानवलें वरि बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं झालों ॥१॥ म्हणोनि पंढरिनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥२॥ संतां ब्रह्मरूप झाले अवघे जन । ते माझे अवगुण न देखती ॥३॥ तुका म्हणे मी तों आपणासी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥४॥

१४४८. काम क्रोध माझे जितातीं शरीरीं । कोवळें तें वरी बोलतसे ॥१॥ कैसा सरता मी झालों तुझे पाईं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥२॥ पुराणींची ग्वाही बोलतील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध झालें ॥३॥ तुका म्हणे मज आणुनी अनुभवा । दाखवी हे देवा साच खरें ॥४॥

१४४९. स्तुती करीं जैसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥१॥ तुमचे मी दास संताचे दुर्बळ । करूनी सांभाळ राखा पाईं ॥२॥ रामकृष्णहरि मंत्र उच्चारणा । आवडी चरणा विठोबाच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । क्षमा करी धीट होऊनीयां ॥४॥

१४५०. बहु दूरवरि । वेठी वोझें होतें शिरीं ॥१॥ आतां उतरला भार । तुम्हीं केला अंगीकार ॥२॥ बहु काकुळती । आलों असें मागें किती ॥३॥ तुका म्हणे देवा । आजि सफळ झाली सेवा ॥४॥

———

पाईक अभंग ११

१४५१. पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूर धरि मात वचन चित्तीं ॥१॥ पाईकीवांचुनी नव्हे कधीं सुख । प्रजामध्यें दुःख न सरे पीडा ॥२॥ तरि व्हावें पाईक जीवाचें उदार । सकळ त्याचा भार स्वामी वाहे ॥३॥ पाईकीचें सूख जया नाहीं ठावें । धिग त्यांनीं जावें वायांवीण ॥४॥ तुका म्हणे येका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥५॥

१४५२. पाईकीचें सुख पाईकासी ठावें । म्हणोनियां जीवें केली साठी ॥१॥ येतां गोळ्या बाण साहिले भडिमार । वर्षता अपार वृष्टी वरी ॥२॥ स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण । मग त्या मंडण शोभा दावी ॥३॥ पाईकानें सुख भोगीलें अपार । शूर आणि धीर अंतर्बाही ॥४॥ तुका म्हणे याही सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शहाणा करी तो भोगी ॥५॥

१४५३. पाईक तो जाणे पाईकीचा भाव । लगबग ठाव चोर वाटा ॥१॥ आपणां राखोनी ठकावें आणिक । घ्यावें सकळिक हिरोनीयां ॥२॥ येऊं नेदी लाग लागों नेदी माग । पाईक त्या जग स्वामी मानी ॥३॥ ऐसे जन केले पाईकें पाईक । जया कोणी भीक न घालीती ॥४॥ तुका म्हणे ऐसें जयाचे पाईक । बळिया तो नाईक त्रैलोकींचा ॥५॥

१४५४. पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांठा मोडोनियां ॥ १ ॥ पारखीये ठाईं घेउनीयां खाण । आपुले ते जन राखीयेले ॥२॥ आधारेंवीण जे बोलतां चावळे । आपुलें तें कळे नव्हे ऐसें ॥३॥ सांडितां मारग मारिती पाईक । आणिकासी सीक लागावया ॥४॥ तुका म्हणे विश्वा घेउनि विश्वास । पाईक तयांस सुख देती ॥५॥

१४५५. पाईक तो प्रजा राखोनीयां कूळ । पारखीया मूळ छेदी दुष्टा ॥१॥ तो येक पाईक पाईका नाईक । भाव सकळीक स्वामीकाजीं ॥२॥ तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाईक त्या भिन्न नाहीं स्वामी ॥३॥ विश्वासावांचोनी पाईकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोललीया ॥४॥ तुका म्हणे नये स्वामी उणेपण । पाईक जतन करी त्यासी ॥५॥

१४५६. धनी ज्या पाईका मानितो आपण । तया भीतें जन सकळीक ॥१॥ जिवाचे उदार शोभती पाईक । मीरवति नाईक मुगुटमणी

॥२॥ आपुलीया सत्ता स्वामीचें वैभव । मोगिती गौरव सकळ सुख ॥३॥ कमाइचीं हिनें पडलीं उदंड । नाहीं तया खंड येती जाती ॥४॥ तुका म्हणे तरी पाईकीचि भली । थोडी बहुत केली स्वामीसेवा ॥५॥

१४५७. पाईकपणें खरा मुशारा । पाईक तो खरा पाईकीनें ॥१॥ पाईक तो जाणे मारितें अंग । पाईकासी भंग नाहीं तया ॥२॥ येक दोहीं घरीं घेतलें खाणें । पाईक तो पणें निवडला ॥३॥ करूनी कारण स्वामी यश द्यावें । पाईक त्या नांवें खरेंपण ॥४॥ तुका म्हणे ठाव पाईका निराळ । नाहीं स्वामिस्थळा गेल्याविण ॥५॥

१४५८. उंच नीच कैसी पाईकाची वोळी । कोण गांढे बळी निवडले ॥१॥ स्वामीकाजी येक सर्वस्वें तत्पर । येक ते कुचर आशाबद्ध ॥२॥ प्रसंगावांचूनी आणिति आविर्भाव । पाईक तो नांव मिरवी वायां ॥३॥ गणतीचे येक उंच नीच फार । तयामध्यें शूर विरळा थोडे ॥४॥ तुका म्हणे स्वामी जाणे त्यांचा मान । पाईक पाहोन मोल करी ॥५॥

१४५९. येकाच स्वामीचे पाईक सकळ । जैसें तैसें बळ मोल तयां ॥१॥ स्वामीपदीं येका ठाव उंच स्थळीं । येक ती निराळी जवळी दुरि ॥२॥ हीन कमाईचा हीन आन ठाव । उंचा सर्व भाव उंच पद ॥३॥ पाईकपण तो सर्वत्र सरता । चांगा तरि परता गांढ्या वाव ॥४॥ तुका म्हणे मरण आहे या सकळां । भेणें अवकळा अभय मोल ॥५॥

१४६०. प्रजीं तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाठीं येक जैसी तैसी ॥१॥ आगळें पाऊल आणिकासी तारी । पळती माघारी तोंडिजेती ॥२॥ पाठीवरि घाय म्हणती फटमर । धडा अंगशूर मान पावे ॥३॥ घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळीक सर्व हरी ॥४॥ तुका म्हणे नव्हे बोलाचें कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥५॥

१४६१. जातीचा पाईक ओळखे पाईका । आदर तो येका त्याचे ठाईं ॥१॥ धरितील पोटासाठीं हतियारें । कळतीं तीं खरें वेठीचींसीं ॥२॥ जातीचें तें असे खरें घायडाय । पारखीया काय पाशीं लोपे ॥३॥ तुका म्हणे नमूं देव म्हूण जना । झालीयाच्या खुणा जाणतसों ॥४॥

---

१४६२. बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता हा नाहीं मनुष्यदेह ॥१॥ आपुल्या हिताचे न्व्हति सायास । गृहदारा आस धनवित्त ॥२॥ अवचित निधान लागलेंसें हातीं । भोगावी विपत्ती गर्भवास ॥३॥ यावें जावें पुढें एसेंचि कारण । भोगावें पतन नरकवास ॥४॥ तुका म्हणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरी कांहीं बरें न्व्हे ॥५॥

१४६३. आम्हीं पतितांनीं घालावें सांकडें । तुम्हां लागे कोडें उगवणें ॥१॥ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकळ तुम्हां हातीं ॥२॥ न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥३॥ दयासिंधु नाम पतितपावन । हें आम्हां वचन सांपडलें ॥४॥ तुका म्हणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तुम्ही देवा ॥५॥

१४६४. जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥१॥ हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घालीं कवतुकें ॥२॥ भवसिंधु सुखें । उतरि कासे लाउनी ॥३॥ थोर भक्ताची आस । पाहे मोंवतालीं वास ॥४॥ तुका म्हणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥५॥

१४६५. अखंड तुझी जया प्रीति । मज दे तयाची संगती । मग मी कमळापति । तुज बा नाणी कंटाळा ॥१॥ पडोन राहिन तये ठाईं । उगाचि संतांचिये पाईं । न मागें न करी कांहीं । तुझी आण गा विठाबाई ॥२॥ तुम्ही आम्ही पीडों जेणें । दोनि वारती येकानें । बैसलों धरणें । हाका देत दारेसी ॥३॥ तुका म्हणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला । न पाहीजे केला । औघा माझा अव्हेर ॥४॥

१४६६. पुनित केलें विष्णुदासीं । संगें आपुलीया दोषी ॥१॥ कोण पाहे तयकांडे । वीर विठ्ठलाचे गाढे ॥२॥ अशुभ त्यांपुढें । शुभ होऊनि ठाके ॥३॥ प्रेमसुखाचिया राशी । पाप नाहीं वोखंदासी ॥४॥ तुका म्हणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥५॥

१४६७. जन देव तरि पायाची पडावें । त्याचीया स्वभावें चाड नाहीं ॥१॥ अग्निचें सौजन्य शीत निवारण । अंगेसी जळून दुःख पावे ॥२॥ तुका म्हणे विंचू सर्प नारायणा । वंदावे दुरून शिवों नये ॥३॥

१४६८. भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हें तों भाग्यहीन त्याची जोडी ॥१॥ आम्ही विष्णुदासी देव घ्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धेंची ॥२॥ जगरूढीसाठीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनी ॥३॥ तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ती पीडा रिद्धिसीद्धि ॥४॥

---

घोंगड्याचे अभंग

१४६९. ठकिलें काळा मारिली दडी । दिल्ही कुडी टाकोनी ॥१॥ पांघरलों बहु काळें । घोंगडें बळें सांडवलें ॥२॥ नये ऐसा लाग वरी । परते दुरी लपालें ॥३॥ तुका म्हणे आड सेवा । लाविला हेवा धांदली ॥४॥

१४७०. घोंगडियांचा पालट केला । मुलांमुलां आपुल्यांत ॥१॥ कान्होबा तो मीच दिसें । लाविलें पिसें सौंगडियां ॥२॥ तो बोले मी उगाचि बैसें । अनारीसें न दीसे ॥३॥ तुका म्हणे दिल्हें सोंग । नेदी व्यंग जाऊं देऊं ॥४॥

१४७१. खेळों लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥१॥ कान्होबाचे पडिलों गळां । घेई गोपाळा देई झाडा ॥२॥ मी तों हागे उघड झालों । अवघ्या आलों बाहेरी ॥३॥ तुका म्हणे बुद्धि काची । नाहीं ठाईची मजपासीं ॥४॥

१४७२. घोंगडियांची येक राशी । त्याजपाशीं तेंही होतें ॥१॥ माझीयाचा माग दावा । केला गोवा उगवों द्या ॥२॥ व्हावें ऐसें निसंतान । घेईन आण तुजपासीं ॥३॥ तुका म्हणे लहान मोठा । सोडा ताठा हा देवा ॥४॥

१४७३ नाहीं तुझे उगा पडत गळां । पुढें गोपाळा जाऊं नको ॥१॥ चाहाड तुझे दावीन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥२॥ तुम्हां आम्हां पडदा होता । सरला आतां सरोवरीं ॥३॥ तुका म्हणे उरती गोठी । पडिली मीठी न सुटे ॥४॥

१४७४. तुम्हां आम्हां उरी तोंवरी । जनाचारी आहे तैसी ॥१॥ माझें घोंगडें टाकुनि देई । येके ठाईं मग असों ॥२॥ विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥३॥ तुका म्हणे तूं जाणता हरि । मज वेव्हारीं बोलाविसी ॥४॥

१४७५ मुळींचा. तुम्हां लागला चाळा । तो गोपाळा न संडा ॥१॥ घ्यावें त्याचें देणें नाहीं । येचि वाहि देखतसों ॥२॥ माझी तरि घोंगडी मोठी । गांडीची लंगोटी सोडिस ना ॥३॥ तुका म्हणे म्या सोडिली आशा । हुंगिला फांसा येथुनियां ॥४॥

१४७६. घोंगडियास घातली मिठी । न सोडी साटी केली जीवें ॥१॥ हा गे चोर धरा धांवा कोण्ही । घरांत राहाटे चहूं कोनीं ॥२॥ नोळखवे म्यां धरिला हातीं । देहा दीप माया लाविली वाती ॥३॥ न पवे धांवणें मारितों हाका । जनाचारी तुका नागवला ॥४॥

१४७७. आतां मी देवा पांघरों काई । भीकेचें तेंहि उरेचिना ॥१॥ सदैव दुबळे नेणें चोर । देखोनी सुनाट फोडितो घर ॥२॥ नाहीं मज-पासी फुटकी कवडी । पांचांनी घोंगडी दिल्ही होती ॥३॥ तुका म्हणे जना वेगळें झालें । येकचि नेलें येकल्याचें ॥४॥

१४७८. मी माझें करित होतों जतन । भीतरल्या चोरें घेतलें खाण ॥१॥ मज आल्यावीण आधींच तो होता । मज न कळतां मजमाजी ॥२॥ घोंगडें नेलें घोंगडें नेलें । उघडें केलें उघडेंचि ॥३॥ तुका म्हणे चोरटाचि झाला साव । सहज न्याय नाहीं तेथें ॥४॥

१४७९. घोंगडें नेलें सांगों मी कोणा । दुबळें माझें नाणिती मना ॥१॥ पुढें तें मज न मिळे आतां । जवळी सत्ता दाम नाहीं ॥२॥ शेटे महाजन ऐका कोणी । घोंगडियाची करा शोधणी ॥३॥ घोंगडियाचा करा बोभाट । तुका म्हणे जंव भरला हाट ॥४॥

१४८०. माझें घोंगडें पडिलें ठाईं । माग तया पाईं सांपडला ॥१॥ चोर तो भला चोर तो भला । पाठिसी घातला पुंडलीकें ॥२॥ चोर कुठोरि येकचि ठाईं । वेगळें पाहावें नलगे कांहीं ॥३॥ आणिकांचीही चोरिलीं आधीं । माझें तयामधीं मेळवीलें ॥४॥ आपल्या आपण शोधिलें तिहीं । करिन मीही तेची परी ॥५॥ तुका म्हणे माझें हीतचि झालें । फाटकें जाउनी धडकें आलें ॥६॥

---

१४८१. सर्प भूलोनी गुंतला नादा । गारोडिये फांदा घालीतसे ॥१॥ हिंडवोनि पोट भरी दारोदारीं । कोंडोनी पेटारीं आसे रया ॥२॥ तैसी परी मज झाली पांडुरंगा । गुंतलों मी तो गा सोडीं आतां ॥३॥ माझें मज कांहीं न चलेसें झालें । कृपा हे तूज न करितां ॥४॥ आमिषानें मीन लावियेला गळीं । भक्ष तो गीळी म्हणवोनी ॥५॥ काढुनी बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथें बाप माय कवण तया ॥६॥ पक्षी पिलीयां पातले आशा । देखोनियां फांसा गुंते बळें ॥७॥ मरण नेणें माया धावोनि वोरसें । जिवीत्वा नाश जालीं बाळें ॥८॥ गोडपणें मासी गुंतली लिगाडी । सांपडे फडफडी अधिकाधीक ॥९॥ तुका म्हणे प्राण घेतला या आशा । पंढरी निवासा धांव घालीं ॥१०॥

१४८२. यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ॥१॥ काय सुख मज तयाचिये खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥२॥ द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होतां गांठी ॥३॥ तुका म्हणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ॥४॥

१४८३. सितळ साउली आम्हुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ॥१॥ जाउनि वोसंगा रीघेन वोरसे । लागेल तें इच्छे पीइन वरी ॥२॥ कृपा तनु माझी सांभाळा दुभोनी । अमृतसंजिवनी लोटलीसे ॥३॥ आनंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥४॥ सैर जाय पडे तयेसी सांकडें । सांभाळीत पुढें मागें असे ॥५॥ तुका म्हणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हे विठाईचें ॥६॥

---

रामचरित्र

१४८४. रामा वनवास । तेणें वसे देश ॥१॥ केलें नामाचें जतन । समर्थ तो नव्हे भिन्न ॥२॥ वनांतरीं रडे । ऐसें पुराणीं पवाडे ॥३॥ तुका म्हणे ऋषी नेम । ऐसा कळोनि कां भ्रम ॥४॥

१४८५. राम म्हणे ग्रासोग्रासीं । तो नर जेवीला उपवासी ॥१॥ धन्य धन्य तें शरीर । तीर्थव्रताचें माहेर ॥२॥ राम म्हणे करितां धंदा ।

सुखसमाधि त्या सदा ॥३॥ राम म्हणे वाट चाली । यज्ञ पाउला पाउलीं ॥४॥ राम म्हणे भोगी त्यागी । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥५॥ ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे तो जीवन्मुक्त ॥६॥

१४८६. तारि ऐसे जड । उदकावरि जो दगड ॥१॥ तो हा न करीं तें काई । कां रे लीन व्हाना पाईं ॥२॥ शिळा होती मनुष्य झाली । ज्याच्या चरणाचे चाली ॥३ । वानरां हातीं लंका । घेववीली म्हणे तुका ॥४॥

१४८७. राम म्हणतां रामचि होइजे । पदीं बैसोनी पदवी घेईजे ॥१॥ ऐसें सुख वचनीं आहे । विश्वासे अनुभव पाहें ॥२॥ रामरसाचिया चवी । आन रस रुचती केवी ॥३॥ तुका म्हणे चाखुनि सांगें । मज अनुभव आहे अंगें ॥४॥

१४८८. राम अक्षरें । कंठा धरिलीं आपण शंकरें ॥१॥ कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां । हळाहळ शितळ केलें शिवा देखा ॥२॥ हाचि मंत्र उपदेश भवानी । तिच्या चुकल्या गर्भाधयोनी ॥ ३ ॥ जुनाट नागर नी नवें । तुका म्हणे म्यां धरिलें जीवें भावें ॥४॥

१४८९. राम म्हणतां तरे जाणता नेणता । हो का याती भलता कूळहीन ॥१॥ राम म्हणतां नलगे आणिक सायास । केले महा दोष तेही जळती ॥२॥ राम म्हणे तया जवळि नये भूत । कैचा यमदूत म्हणतां राम ॥३॥ राम म्हणतां तरे भवसिंधुपार । चुके वेरझारा म्हणतां राम ॥४॥ तुका म्हणे हेंचि सुखाचें साधन । सेवीं अमृतपान येका भावें ॥५॥

१४९०. पैल आला राम रावणासी सांगती । काय निदुसरा निजलासी भूपती ॥१॥ अवघे लंकेमाजी आले रामाचे दूत । व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥२॥ अवघे अंगलग तुझे वधीयेले वीर । होईल शरणागत किंवा युद्धासी सादर ॥३॥ तुका म्हणे येक्या भावें रामासी भेटी । करुनि घेई आतां या संबंधेशीं तुटी ॥ ४ ॥

१४९१. समरंगणा आला । रामें रावण देखिला ॥१॥ कैसे भीडतील दोन्ही । नांव सारूनियां रणीं ॥२॥ प्रेमसुखाचें संधान । बाणें निवारिती बाण ॥ ३ ॥ तुकया स्वामी रघुनाथ । वर्म जाणुनि केली मात ॥ ४ ॥

१४९२. केला रावणाचा वध । अवघा तोडिला संबंध ॥१॥ लंका राज्य बिभीषणा । केलि चिरकाळ स्थापना ॥२॥ औदार्याची सीमा । काय वर्णू रघुरामा ॥३॥ तुका म्हणे माझा दाता । रामें सोडवीली सीता ॥४॥

१४९३. रामरूप केली । रामें कौसल्या माउली ॥१॥ राम राहिला मानसीं । ध्यानीं चिंतनीं जयासी ॥२॥ राम होय त्यासी । संदेह नाहीं भरवसा ॥३॥ अयोध्येचें लोक । राम झाले सकळिक ॥४॥ स्मरतां जानकी । रामरूप झालें कपी ॥५॥ रावणेंसीं लंका । राम आपण झाला देखा ॥६॥ ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥७॥

१४९४. आनंद झाला अयोध्येसी आले रघुनाथ । औघा जयजयकार आळंगिला भरत ॥१॥ आनंदले लोक नरनारी परिवार । शंख भेरि तुरे वाद्याचे गजर ॥२॥ करिति आक्षवाणें वोवाळीति रघुवीरा । लक्षुमी सहित लक्षुमण दुसरा ॥३॥ झालें रामराज्य आनंदलीं सकळें । तुका म्हणे गाईवत्सें नरनारी बाळें ॥४॥

१४९५. झालें रामराज्य काय उणें आम्हांसी । धरणी धरी पीक गाई वोळल्या म्हैसी ॥१॥ राम वेळोवेळां आम्ही गाऊं वोविये । दळितां कांडितां जेवितां गे बाईये ॥२॥ स्वप्नींहि दुःख कोणी न देखे डोळां । नामाच्या गजरें भय सुटलें काळा ॥३॥ तुका म्हणे रामें सुख दिल्हें आपुलें । तया गर्भवासी येणें जाणें खुंटलें ॥४॥

१४९६. अहिल्या जेणें तारिली रामें । गणिका परलोका नेली नामें ॥१॥ रामहरे रघुराजहरे । रामहरे महाराजहरे ॥२॥ कंठी जपतां शीतळ शूळपाणी । राम जपे अविनाश भवानी ॥३॥ तारक मंत्र श्रवण काशी । नाम जपतां वाल्मिक ऋषि ॥४॥ रामजपें बीजमंत्र नळा । सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥५॥ नामजपें जीवन मुनिजना । तुकया स्वामी रघुनंदना ॥६॥

१४९७. मी तों अल्पमती हीन । काय वर्णू तुझे गुण । उदकीं तारिले पाषाण । हें महिमान नामाचें ॥१॥ नाम चांगलें चांगलें । माझें कंठीं राहों भलें । कपीकुळ उद्धरिलें । मुक्त केलें राक्षसां ॥२॥ द्रोणा-

गिरी कपी हातीं । आणविला सीतापती । थोर केली ख्याती । भरत-भेटी समई ॥३॥ शिळा होती मनुष्य झाली । थोर कीर्ति वाखाणिली । लंका दहन केली । हनुमंतें काशानें ॥४॥ राम जानकी जीवन । योगी-याचें निजध्यान । राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥५॥

१४९८. सुटायाचा कांहीं करितों उपाय । तों हे देखे पाय गोवीयेले ॥१॥ ऐसिया दुःखाचे सांपडलों संधी । हरपली बुद्धी बळ माझें ॥२॥ प्रारब्धक्रियमाण संचितार्चे । वोढत ठाईंचें आलें साचें ॥३॥ विधीनिषे-धाचे सांपडलों चेपें । येका येक लोपें निवडेना ॥४॥ सारावें तें वाटे त्याचियाचि अंगें । तृष्णेचिया संगें दुःखी झालों ॥५॥ तुका म्हणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन झालों देवा ॥६॥

१४९९. भय वाटे पर । न सुटे हा संवसार ॥१॥ ऐसा पडिलों कांचणी । करि धांवा म्हणवोनी ॥२॥ विचारितां कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥३॥ तुका म्हणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥४॥

१५००. येइ गा येइ गा पांडुरंगा । घेई उचलोनी वोसंगा ॥१॥ ऐसी असोनियां वेसी । दिसतों मी परदेसी ॥२॥ उगवोनी गोवा । सोडउनी न्यावें देवा ॥३॥ तुज आड कांहीं । बळ करी ऐसें नाहीं ॥४॥ तुका म्हणे हृषीकेशी । काय उसीर लावीसी ॥५॥

१५०१. माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हावली ॥१॥ कुर्वा-ळोनी लावी स्तनीं । नवजे दूरि जवळुनी ॥२॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोवळी ॥३॥ तुका म्हणे घास । मुखीं घाली ब्रह्मरस ॥४॥

१५०२. आम्ही उतराई । भाव निरोपोनी पाई ॥१॥ तुम्हीं पुरवावी आळी । करावी ते लडीवाळी ॥२॥ आमुचा हा नेम । तुम्हां उचित हा धर्म ॥३॥ तुका म्हणे देवा । जाणों सांगितली सेवा ॥४॥

१५०३ केलें पाप जेणें दिल्हें अनुमोदन । दोघांसी पतन सारखेंची ॥१॥ विष नवनीता विष करी संगे । दुर्जनाच्या त्यागें सर्वहीत ॥२॥ देखीलें वोढाळ निघाली ती सेता । टाळावें निमित्ता थैक म्हूण ॥३॥ तुका म्हणे जोडे केल्याविण कर्म । देखतां तो श्रम न मनितां ॥४॥

१५०४. विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांती भोग जया ॥१॥ विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥२॥ विठ्ठल जागृतीं स्वप्नींहि सुषुप्तीं । आण दुजे नेणतीं विठ्ठलावीण ॥३॥ भूषण अळंकार सुखाचा प्रकार । विठ्ठल निर्धार जया नरा ॥४॥ तुका म्हणे तेही विठ्ठलची झाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥५॥

१५०५. दास झालों हरिदासाचा । बुद्धि काया मनें वाचा ॥१॥ तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळ मृदंग कल्होळ ॥२॥ नासे दुष्ट बुद्धी सकळ समाधी हरिकीर्तनीं ॥३॥ ऐकतां हरिकथा । भक्ति लागे त्या अभक्ता ॥४॥ देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ॥५॥ हें सुख ब्रह्मादिका । नाहीं नाहीं म्हणे तुका ॥६॥

१५०६. गति अधोगति मनाची हे युक्ति । मन लावी येकांती साधुसंगें ॥१॥ जतन हें करा जतन हें करा । धांवतसे सैरा वोढाळ तें ॥२॥ मान अपमान मनाचें लक्षण । लावीलीया ध्यान तेंचि करी ॥३॥ तुका म्हणे मन उतरी भवसिंधु । मन करी बंधु चौऱ्यायशीचा ॥४॥

१५०७. पंढरीसी दुःख न मिळे वोखदा । प्रेमसुख सदा सर्व काळ ॥१॥ पुंडलीकें हाट भरियेली पेठ । अवघे वैकुंठ आणियेलें ॥२॥ उदिमासी तूटी नाहीं कोणा हानी । घेऊनीयां धनी लाभ घेती ॥३॥ पुरलें देशासी भरलें सिगेसी । औघी पंचक्रोसी दुमदुमीत ॥४॥ तुका म्हणे संता लागलीसे धणी । बैसले राहूनि पंढरीस ॥५॥

१५०८. द्वारकेचें केणें आलें याचि ठायां । पुढें भक्तराया चोजवीत ॥१॥ गोविलें विसारें माप केलें खरें । न पाहे माघारें अद्यापवरी ॥२॥ वैष्णव मापारी नाहीं झाली सळे । पुढेंही न कळे पार त्याचा ॥३॥ लाभ झाला त्यांनीं धरीला तो विचार । आइक्य परत्र सांठविलें ॥ ४ ॥ तुका म्हणे मज मिळाली मजुरी । विश्वास या घरीं संतांचिया ॥५॥

१५०९. सुरवर येती तीथें नित्यकाळ । पेठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥१॥ साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अद्‍भुत वर्णवेना ॥२॥ पंचक्रोशीमाजी रिघ नाहीं दोषा । जळती आपैसा अघोर ते ॥३॥ निर्विषय नर

चतुर्भुज नारी । औघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥४॥ तुका म्हणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटी ॥५॥

१५१०. विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड जैसा ॥१॥ वादावाद करणें त्यासी तोंचि वरीं । गुखाडीची चाड सरे तोंचि बाहेरी ॥२॥ सौभाग्यसंपन्न हो का वृद्धप्रतिष्ठा । छी करूनि सांडी पाया लागली ते विष्ठा ॥३॥ नाहीं याति कूळ फांस वोढी तयासी । तुका म्हणे काय मुद्रा सोंग जाळिसी ॥४॥

१५११. देव होसी तरि आणिकातें करिसी । संदेह येविशी करणें नलगे ॥१॥ दुष्ट होसी तरि आणिकांतें करिसी । संदेह येवीसीं करणें नलगे ॥२॥ तुका म्हणे जें दर्पणीं बिंबलें । तें तयां बाणलें निश्चयेसीं ॥३॥

१५१२. कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विज लोक ॥१॥ तेंचि कळों आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेकती धर्म नव्हे ॥२॥ तप व्रत करितां लागति सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥३॥ देव म्हणवोनी न येती देउळा । संसार वेगळा तरि कां नव्हे ॥४॥ तुका म्हणे मज न धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥५॥

१५१३. नमो विष्णु विश्वरूपा माय बापा । अपारा अमुपा पांडुरंगा ॥१॥ विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें येक आइकावें ॥२॥ तुझी स्तुति वेद करितां भागला । निवांतचि ठेला नेति नेति ॥३॥ ऋषी मुनी बहु सिद्ध कवि जन । वर्णितां ते गुण न सरती ॥४॥ तुका म्हणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ति देवा ॥५॥

१५१४. अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥१॥ घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथाची ॥२॥ मज याचकाची पुरवावी आशा । पंढरिनिवासा मायबापा ॥३॥ नासली आशंका माझीया जिवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥४॥ तुका म्हणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥५॥

१५१५. उदार कृपाळ अनाथाचा नाथ । ऐकसी ही मात शरणागता ॥१॥ सर्व भार माथां चालवीसी त्याचा । अनुसरले वाचा काया मनें

॥ २ ॥ पाचारितां उभा राहसी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ ३ ॥ चालतांहि पंथ सांभाळीसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥ ४ ॥ तुका म्हणे चिंता नाहीं तुझ्या दासा । तूं त्यांचा कोवसा सर्वभावें ॥५॥

१५१६. काय कीर्ति करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥ १ ॥ मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जीवा वायांवीण ॥२॥ होईल थोरपण जाणीवेचा भार । दुऱ्हावेन दूर तुझ्यापाईं ॥३॥ अंतरींचा भाव काय कळे लोकां । येक मानी येका देखोवेखी ॥४॥ तुका म्हणे तुझे पाय आंतुडती । त्या मज विपत्ती गोड देवा ॥५॥

१५१७. मानावया जग व्हावीं द्रव्यमाया । नाहीं हे माझिया जिवा चाड ॥१॥ तुझ्या पायांसाठीं केली आराणूक । आतां कांहीं येक नको दुजें ॥२॥ करूनियां कृपा करिं अंगीकार । न लावी उसीर आतां देवा ॥३॥ नव्हे साच कांहीं कळों आलें मना । म्हणोनी वासना आवरली ॥४॥ तुका म्हणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानीधी पाववावें ॥५॥

१५१८. आतां सर्वभावें हा माझा निर्धार । न करीं विचार आणिकासी ॥१॥ सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥२॥ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहेन भरूनी डोळे मूख ॥३॥ निर्लज्ज होउनी नाचेन रंगणीं । येवो नेदी मनीं शंका कांहीं ॥४॥ अंकित अंकीला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा । तुका म्हणे ॥५॥

१५१९. जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आम्हां ॥१॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधी नाना रोग सुखदुःखें ॥२॥ पापपुण्य शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणा कारणें कवणें केलीं ॥३॥ आम्हां मरण नाश तूं तंव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥४॥ तुका म्हणे तूंचि निवडी हे गूढार । दाखवि साचार तेंची मज ॥५॥

१५२०. यथार्थ वाद सांडोनी उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥१॥ चोरा धरितां सांगे कुठोऱ्याचें नांव । दोघांचेहि पाव हात जाती ॥२॥ तुका म्हणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥३॥

१५२१. धीर तो कारण । साह्य होतो नारायण । नेदी होऊं सीण ।

वाहों चिंता दासांची ॥ १ ॥ सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचे गुण वारी सुदर्शन । आपणची कळिकाळा ॥२॥ जीव वेंची माता । बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता । प्राकृतां यांसारिखा ॥३॥ हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें ॥४॥ तुका म्हणे सत्य व्हावें । आहाच नये कारणा ॥५॥

१५२२. पुढें आतां कैंचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥१॥ सर्वथाहि फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥२॥ पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥३॥ तुका म्हणे चुकती बापा । पुन्हां खेपा सकळा ॥४॥

१५२३. दूध दहीं ताक पशूचें पाळण । त्यामध्यें कारण घृतसार ॥१॥ हेंचि वर्म आम्हां भाविकांचे हातीं । म्हणोनी चित्तीं धरिला राम ॥२॥ लोह कफ गार अग्नीचिया काजे । येऱ्हवीं तें वोझें कोण वाहे ॥३॥ तुका म्हणे खोरीं पाहारा जतन । जोंवरी हें धन हाता लागे ॥४॥

१५२४. वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥१॥ करिति घोष जयजयकार जळती दोषांचे डोंगर ॥२॥ दया क्षमा शांती । बाण अभंग हे हातीं ॥३॥ तुका म्हणे बळी । तेचि येक भूमंडळीं ॥४॥

१५२५. आइके रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा पंढरिचा राणा । मनामाजी स्मरावा ॥१॥ मग कैचें रे बंधन । नाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण । येच तीरीं सरेल ॥२॥ दास्य करिल कळिकाळ । बंध तुटेल मायाजाळ । होतील सकळ । रिद्धिसिद्धी म्हणयारी ॥३॥ सकळ-शास्त्रांचें सार । हें वेदाचें गव्हार । पाहतां विचार । हाचि करिती पुराणें ॥४॥ ब्राह्मण क्षेत्री वैश्य शूद्र चांडाळांहि अधिकार । बाळें नारीनर । आदिकरुनि वश्याही ॥५॥ तुका म्हणे अनुभवें । आम्हीं पाडियेलें ठावें । आणिकेहि दैवें । सुख घेती भाविकें ॥६॥

१५२६. न करीं तळमळ राहे रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥१॥ अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्याशीच्या ॥२॥ आणिकया जीवा होईल उद्धार । तेहि उपकार घडती कोटी ॥३॥

आहिक्य परत्रीं होशिल सरतां । वाचे उच्चारीतां रामनाम ॥४॥ तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥५॥

१५२७. कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥१॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या आगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणें ॥२॥ आणिकही भोग आणिका इंद्रियांचे । नाहीं ऐसें साचें जवळी कांहीं ॥३॥ रूप दृष्टि धाये पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥४॥ तुका म्हणे कां रे नाशीवंतासाठीं । देवासवें तुटी करीतोसी ॥५॥

१५२८. बैसोनी निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्न वस्त्र दाता ॥१॥ काय आम्हां करणें अधीक सांचोनि । देव झाला ऋणी पूरवीता ॥२॥ दयाळ मायाळ जाणें कळवळा । शरणागता ळळा राखों जाणे ॥३॥ नलगे सांगणें मागणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥४॥ तुका म्हणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥५॥

१५२९. सोनियाचा कळस । माजी भरला सुरारस ॥१॥ काय करावें प्रमाण । तुम्ही सांगा संतजन ॥२॥ मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांठ ॥३॥ तुका म्हणे हित तें मज सांगावें त्वरित ॥४॥

१५३०. सेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥१॥ नाहीं वेठीं जेवा सारा । जाहाति नाहीं म्हणीयारा ॥२॥ सरिक नाहीं दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥३॥ जप तप नांगरणी । नलगे आटी दूनवणी ॥४॥ कर्म कुळवणी । नलगे धर्म पाळी दोन्ही ॥५॥ ज्ञानपाभारीं तीफणी । नलगे करावी पेरणी ॥६॥ बीज नलगें संचिताचें । पीक पीकलें ठाईचें ॥७॥ नाहीं यमाचे चोरटें । विठ्ठल पागोऱ्याच्या नेटें ॥८॥ पीक नवजे हा भरवसा । करि उद्वेग तो पिसा ॥९॥ सराये सर्व काळ । वायां नवजे घटिका पळ ॥१०॥ प्रेम पिकलें अपार । नाहीं सांठवावया थार ॥११॥ ऐसी जोडी जो चुकला । तुका म्हणे धीग त्याला ॥१२॥

१५३१. वोणव्या सोंकरीं । शेत खादलें पाखरीं ॥१॥ तैसा खाऊं नको दगा । निदसुरा राहोन जागा ॥२॥ चोरांसवें वाट । चालोनि केलें तळपट ॥३॥ डोळे झाकूनी राती । कूपीं पडे दिवसा जोती ॥४॥ पोसी

वांझ गाय । तेथें कैंची दुधा सोय ॥५॥ फुटकी सांगडी । तुका म्हणे न पवे थडी ॥६॥

१५३२. शेत आलें सुगी सांभाळावें च्यारी कोन । पीक आलें परी केलें पाहिजे जतन ॥१॥ सोंकरीं सोंकरीं सोहंकरी । विसांवा तोंवरी नको उभें आहे तों ॥२॥ गोफणेसी गुंडा घाली पागोऱ्याचें नेटें । पळति हाहाकारें आवघीं पाखरांचीं थाटें ॥३॥ पेटउनी आगटी राहें जागा पालटुनी । पडलीया मानी बळबुद्धि व्हावीं दोन्ही ॥४॥ खळें दानें विश्वसुखी करी होतां रासी । सारा सारूनियां ज्याचे भाग दे त्यासी ॥५॥ तुका म्हणे मग नाहीं आपुलें कारण । निज आलें हाता भुस सांडिलेंनि कण ॥६॥

१५३३. नका घालूं दूध जयामध्यें सार । ताकाचे उपकार तरी करा ॥१॥ नेदा तरी हें हो नका देऊं अन्न । फुकाचें जीवन तरी पाजा ॥२॥ तुका म्हणे मज सगुणाची चाड । पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥३॥

---

उत्तराधी अभंग

१५३४. क्यां गाऊं कोई सुननेवाला । देखें तो सब जगही भूला ॥१॥ खेलों आपने रामहिसात । जैसी वैसी कररहुं मात ॥२॥ कांहासे लाऊं मधुरा बानी । रिझे ऐसी लोक बिरानी ॥३॥ गिरिधर लाल तो भावका भुका । राग कला नहिं जानत तुका ॥४॥

१५३५. छोडे धन मंदीर बन बसाया । मागत तुका घरघर खाया ॥१॥ तिनसों हाम करवो सलाम । ज्या मुख बैठा राजाराम ॥२॥ तुळसीमाला बभूत चऱ्हावे । हरजीके गुन निर्मल गावे ॥३॥ कहे तुका जो साई हमारा । हिरनकसप जिन्हे मारहि डारा ॥४॥

१५३६. मंत्रतंत्र नहिं जानत साखी । प्रेमभाव नहिं अंतर राखी ॥१॥ राम कहे त्याके पग हूं लागूं । देखत कपट अभिमान दूर भागूं ॥२॥ अधिक याति कुलहीन नहि जानूं । जाने नारायण सो प्रानी मानूं ॥ ३ ॥ कहे तुका जिव तन धन डारु वारी । राम उपासिहूं बलीयारी ॥४॥

१५३७. चुराचुराकर माखन खाया । गौलनिका नंदकुमर कन्हया

॥१॥ काहे बराई दिखावत मोहि । जानतहुं प्रभुपन ते राखो भाई ॥२॥ और बात सुन उखलसु गला । बांधलीया आपना तूं गोपाला ॥३॥ फिरत बनबन गाउं धरावत । कहे तुकायाबंधू लकरि लेले हात ॥४॥

१५३८. हरिसूं मील दे येकहि देर । पाछे तूं फीर नावे घर ॥१॥ मात सुनो दुति आवे मनावन । जाया करति भर जोबन ॥२॥ हरिसुख मोहि कहिया न जाये । तब तूं बूझे अगो पाये ॥३॥ देखहि भाव कछु पकरी हात । मिलाई तुका प्रभुसात ॥४॥

१५३९. क्या कहुं नहि बुझत लोका । लीजावे जम मारत धका ॥१॥ क्या जीवनकी पकरी आस । हातों लिया नहि तेरा घास ॥२॥ किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तन तु सब ल्या न्यारा ॥३॥ कहे तुका तुं भया दिवाना । अपना बीचार करले जाना ॥४॥

१५४०. कब मरुं पाउ चरन तुम्हारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥१॥ जग डेरे ज्याकु सो मोहि मीठा । मीठा दर आनंदसाहि पैठा ॥२॥ भला पाउ जनम इन्हे बेर । सब मायाके असंग फेर ॥३॥ कहे तुका धन मानहि दारा । वोहि लिये गुंडली पसारा ॥४॥

१५४१. दासों पाछें दौरे राम । सोवे खडा आपे मुकाम ॥१॥ प्रेम-रसडि बांधि गले खैंच चले उधर चेले ॥२॥ आपने जनसुं भूल न देवे । करहि धर आगे बाट बतावे ॥३॥ तुका प्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हूं गोपाला ॥४॥

१५४२. ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥१॥ इतने गोते काहे खाता । जब तूं आपना भूल न होता ॥२॥ अंतरज्यामी ज्यानत साचा । मनका येक उपर बाचा ॥३॥ तुका प्रभु देशबिदेश । भरीया खाली नहि लेस ॥४॥

१५४३. मेरे रामको नाम जो लेवे बारोबार । त्याके पाऊं मेरे तनकी पैजार ॥१॥ हासत खेलत चालत बाट । खाना खाते सोते खाट ॥२॥ जातनसुं मुजे कछु नहिं प्यार । आसतेके नहिं हिंदु धेड चांभार ॥३॥ ज्याका चित्त लगा मेरे रामको नाम । कहे तुका मेरा चित लगा त्या के पाव ॥४॥

१५४४. आप तरे त्याकी कोन बराई । आवरनकुं भलो नाम धराई ॥१॥ काहे भूमी ईतना भार राखे । दुभते धेनु नहिं दुध चाखे ॥२॥ बरसते मेघ फलतेहीं बीरखा । कोन काम आपनि उन्हो तीरखा ॥ ३॥ काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन येक बैठ न पावत घेरा ॥४॥ काहे परिस कंचन करे धातु । नही मोल तुटत पावत घातु ॥५॥ कहे तुका उपकार हि काज । सबकर रहिया रघुराज ॥६॥

१५४५. जग चले उस घाट कोन जाय । नहिं समजत फिरफिर गोते खाय ॥१॥ नहिं येक दो सकल संसार । जो बुझे सो अगला स्वार ॥२॥ उपर स्वार बैठे तृष्णापीठ । नहिं बाचे कुइ जावे लूट ॥३॥ देखहि डर फेर बैठा तुका । जोवत मारग रामहि येका ॥४॥

१५४६. भले रे भाई जिन्हे कीया चीज । अच्छा नहीं मीलत बीज ॥१॥ फिरतफिरत पाया सारा । मिलत लोले धन किनारा ॥२॥ तीरथ बरत फिर पाया जोग । नहीं तलमल तुटत भवरोग ॥३॥ कहे तुका मैं तोको दास । नहीं सिरभार चलावे पास ॥४॥

१५४७. लाल कमली वोढे पेनाये । मोसु हरिथे कैसे बनाये ॥१॥ कहे सखी तुम्हे कारिति सोर । हिरदा हरिका कठिन कठोर ॥२॥ नहीं क्रिया सरम कछु लाज । और सुनाउ बहुत हे भाज ॥३॥ और नामरूप नहीं गौलिया । तुका प्रभु माखन खाया ॥४॥

१५४८. राम कहो जीवना फल सोहि । हरिभजनसु विलंब न पाई ॥१॥ कवनका मंदिर कवनकी झोपरी । येक रामबिन सबहि फुकरी ॥२॥ कवनकी काया कवनकी माया । येक रामबिन सबही जाया ॥३॥ कहे तुका सबहि चलनार । येक रामबिन नहिं वो सार ॥४॥

१५४९. काहे भुला धन संपत्ति घोर । रामनाम सुन गाउ हो बापरे ॥१॥ राजे लोक सब कहे तुं आपना । जब काल नहिं पाया ठाना ॥२॥ माया मिथ्या मनका सब धंदा । तेजो अभिमान भजो गोविंदा ॥३॥ राणा रंक डोंगरकी राई । कहे तुका करे इलाहि ॥४॥

१५५०. काहे रोवे आगले मरना । गव्हार तुं भुला आपना ॥१॥

केते मालुम नहीं पडे । नन्हे बडे गये सो ॥२॥ बाप भाई लेखा नहीं । पाछे तुही चलनार ॥३॥ काले बाल सोपत भये । खबर पकरो तुका कहे ॥४॥

१५५१. क्या मेरे राम कवन सुख सारा । कहकर दे पुछु दास तुम्हारा ॥१॥ तनजोबनकी कोन बराई । व्याधपीडा दीस काटहि खाई ॥२॥ कीर्त बधाऊं तो नाम न मेरा । काहे झुटा पछतऊं घेरा ॥३॥ कहे तुका नहिं समजत मात । तुम्हारे शरण हे जोडत हात ॥४॥

१५५२. देखत आखों झुटा कोरा । तो काहे छोरा घरबार ॥१॥ मानसुं किया चाहिये पाक । उपर खाक पसारा ॥२॥ कामक्रोधसो संसार । वो शिरभार चलावे ॥३॥ कहे तुका वो संन्यास । छोडे आस तनकी ही ॥४॥

१५५३. रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जन्मदुख राई ॥१॥ दुधभात घृत साकरपारे । हरते भुक नहि अंत तारे ॥२॥ खावत जुग सब चलीजावे । खाटीमीठा फिर पछतावे ॥३॥ कहे तुका रामरस जो पीवे । बहुरीहि फेरा वो कबहु न खावे ॥४॥

१५५४. बारबार काहे मरत अभागी । बहुरि मरनसे क्या तोरे भागी ॥१॥ येहि तन करते क्या ना होय । भजन भगति कर बैकुंठ जाय ॥२॥ रामनाम मोल नहीं बेचे कवरी । वोहि सब माया छुरावत सगरि ॥३॥ कहे तुका मनसु मिल राखो । रामरस जिव्हा नित चाखो ॥४॥

१५५५. हे उदास तिन्हके सुनाउ लोका । रावन मार बिभीखन दइ लंका ॥१॥ गोवरधन नख प गोकुल राखा । बरसन लागा जब मेहु फतरका ॥२॥ बैकुंठनायक काल कंसासुरका । दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥३॥ स्तंभ फोड पेट चिरा कश्यपका । प्रल्हादके लिये कहे भाई तुका ॥४॥

---

दोहरा

१५५६. तुका बस्तर बिचारा क्या करे रे अंतर भगवान होय । भीतर मैला कब मीठे रे मरे उपर धोय ॥१॥ ामनाम कहे मन अबरसु नहिं

काज । बहुत उतारे पार आगे राख तूकाकी लाज ॥२॥ लोभीके चित धन बैठे कामिनि चित्त काम । माताके चित्त पुत बैठे तुकाके मन राम ॥३॥ तुका पंखी बहिर न मानुं वोई जनावर बाग । असंतनकु सतन मानुं जे वर्मकुं दाग ॥४॥ तुका राम बहुत मिठा रे भर राखुं शरीर तनकी करुं नावरि उतारुं पैल तीर ॥५॥ संत पन्हैय्या ले खडा रहुं ठाकुरद्वार । चलत पाछे हुं फिरो रज उडत लेऊं शिर ॥६॥ तुका प्रभु बडो न मनुं न मानूं बडो जिसपास बहु दाम । बलीहरि उस मुखकी जिसेति निकसे राम ॥७॥ राम कहे सो मुख भला रे बिनरामसे बिख । अब न जानो मत बेरो जब काल लगावे सीख ॥८॥ राम कहे सो मुख भला रे खाय खीर खांड । हरिबिन मुखमो धुल परि रे क्या जनी उस रांड ॥९॥ कहे तुका मै सवदा बेचुं लेवेके तन हार । मिठा साधुसंतजन रे मुरुखके सिर मार ॥१०॥ तुका दास तिनका रे रामभजन निरास । क्या बिचारे पंडित करो रे हात पसारे आस ॥११॥ तुका प्रीत रामसूं तैसी मीठि राख । पतंग जाय दिपपरे करे तनकी खाक ॥१२॥ कहे तुका जग भुला रे कह्या न मानत कोय । हात परे जब कालके मारत फोडत डोय ॥१३॥ तुका सुरा नहि सबदका रे जब कमाई न होय । चोट साहे घनकी रे हिरा निबरे तोय ॥१४॥ तुका सुरा बहुत कहावे लडत बिरला कोय । येक पावे उंच पदवी येक खोंसा जोय ॥१५॥ तुका मारया पेटका और न जाने कोय । जपतां कछु रामनाम हरिभगतनकी सोय ॥१६॥ तुका सज्जन तिनसुं कहिये जिनथींप्रेम दुनाये । दुर्जन तेरा मुख काला थीता प्रेम घटाये ॥१७॥ काफर सोहि अपन बुझे आला दुनिया भर । कहे तुका तुम सुनो रे भाई हिरदा जिन्होका कठोर ॥१८॥ भीस्त नई पावे मालथि पढिया लोक रिझाय । निचा जेथ कमतरीण सोहि सो फल खाय ॥१९॥ फल पाया तो सुख भया किन्हेसु न कर वेवाद । बान न देखे मिरगा चित्ता मिलिया नाद ॥२०॥ तुका दास रामका मनमे येकहि भाव । तो न पालटु आब येहि तन जाय ॥२१॥ तुका रामसुं चित बंधु राखु तैसा अपनि हात । धेनु बछेरा छोर जावे

प्रेम न छुटे सात ॥२२॥ चित्तसु चित्त जब मिले तब तन थंडा होय । तुका मीलना जिन्हेसु ऐसा बिरला कोय ॥२३॥ चित्त मिले तो सब मिले नहिं तो फुकट संग । पानी पाथर येकही ठोर कोर न भीजे अंग ॥ २४ ॥ तुका संगत तिनसे कहिये जिनसे सुख दुनाये । दुर्जन तेरा मुख काला थीता प्रेम घटाये ॥ २५ ॥ तुका मीलना तो भला मनसुं मन मिल जाय । उपर उपर मटि घसनि उनकी कोन बराय ॥२६॥ तुका कुटुंब छोरे रे लरके जोरे सिर मुंदाय । जब ते इच्छा नहिं मुई तब तुं कीया काय ॥२७॥ तुका इच्छा मिटी नहीं तो कहा करे जट खाक । मथिया गोला डारदिया तो नहि मिले फेर न ताक ॥२८॥ त्रीद मेरे साईयाको तुका चलावे पास । सुरा सोहि लरे हमसे छोडे तनकी आस ॥२९॥ कहे तुका भला भया हूवा संतनका दास । क्या जानुं केते मरता न मीटति मन की आस ॥३०॥ तुका और मिठाई क्या करु रे पाले बिकार पिंड । राम कहावे सो भली रुखी माखन खीर खांड ॥३१॥

---

१५५७. म्हणसी नाहीं रे संचित । न करिं न करिं ऐसी मात ॥१॥ लाहो घेई हरिनामाचा । जन्म जाऊं नेदी साचा ॥२॥ गळां पडेल यम-फांसी । मग कैचा हरि म्हणसी ॥३॥ पुरला साठीं देहाडा । ऐसें न म्हणे मूढा ॥४॥ नरदेह दुबळा । ऐसें म्हणे रे चांडाळा ॥५॥ तुका म्हणे सांगों किती । शेखीं तोंडीं पडेल माती ॥६॥

१५५८. संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकाचें काम नाहीं येथें ॥१॥ बहु दुधड जरी झाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥२॥ तुका म्हणे अंगें व्हावें ते आपण । तरिच महिमान कळों येईल ॥३॥

१५५९. नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥१॥ नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥२॥ तुका म्हणे मीळे जीवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥३॥

१५६०. नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरीं संदेह कांहीं

मनीं ॥ १ ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणुनी संमता संतांचिया ॥ २ ॥ नाम म्हणे तया उरलें साधन । ऐसें हें वचन बोलों नये ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दोन्हीं मायबापें ॥४॥

१५६१. सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधवीला गळा आपुले हातीं ॥१॥ काय करूं बहु गुंतलोंये आतां । नयेचि सरतां मागें पुढें ॥२॥ होतें गांठि तें सरलें आतां । अणिक ते माथा रीण झालें ॥ ३ ॥ सोहं करविल्यावीण गमावीलें पीक। रांडा पोरें भीके लावीयेलीं ॥४॥ बहुतांची बहू घेतलीं तीं घरें । न पडेचि पूरें कांहीं केल्या ॥५॥ तुका म्हणे कांहीं न धरावी आस । जावें हें सर्वस्व टाकोनियां ॥६॥

१५६२. न मानावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥१॥ आड आला म्हणोनि फोडियेला डोळा । बळिनें आंधळा शुक्र केला ॥२॥ करी देव तरि काय नव्हे येक । कां तुम्ही पृथक शिणा वायां ॥३॥ उल्लंघोनि तई भ्रताराचि आज्ञा । अन्न ऋषीपत्न्या घेउनि गेल्या ॥४॥ अवघेचि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखीयेली ॥५॥ पीतियासी पुत्रें केला वैराकार । प्रल्हादें असूर मारविला ॥६॥ बहुत विघ्नें केलीं तया आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥७॥ गौळणी करिती देवासीं व्यभीचार । सांडोनि आचार भ्रष्ट होती ॥८॥ तयांसी दिल्हें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाहीं हरी झाला ॥९॥ देव जोडे तरी करावा अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ॥१०॥ तुका म्हणे हा जाणतो कळवळा । म्हणोनि अज्यामेळा उद्धरिलें ॥११॥

१५६३. अरे गिळिलें हो संसारे । कांहीं तरी राखा खरें । दिल्हा करुणाकरें । मनुष्यदेह सत्संग ॥१॥ येथ न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड । उठाउठी गोड । बीजें बीज वाढवी ॥२॥ केलें तें क्रियमाण । झालें तें संचित म्हण। प्रारब्ध जाण । उर्वरित उरलें तें ॥३॥ चित्त खोटें चालीवरी । रोग भोगाचे अंतरीं । रसने अनावरी । तुका म्हणे ढुंग वाहे ॥४॥

१५६४. अग्नी तापलीया कायाचि होम तापत्रयें संतप्त होती । संचित

क्रियमाण प्रारब्ध तेथें न चुके संसार स्थिती । रहाटघटिका जैसी फिरतांचि राहिली भरली झाली होती येके रिती । हा साधीं प्रपंच पंचाय अग्र तेणें पावसिल निज शांति रे ॥ १ ॥ नारायण नाम नारायण नाम नित्य करी काम जिव्हा मुखें । जन्म जरा व्याधी पाप पुण्य तेथें नासती सकळहि दुःखें रे ॥२॥ शित उष्ण वन सेवितां कपाट आसन समाधी साधी । तप तीर्थ दान व्रत आचरण यज्ञ नाना मन बुद्धि । भोगाभोग तेथें न चुकति प्रकार जन्मजरादुःखव्याधी । साहोनी काम क्रोध अहंकार आश्रमी अविनाश साधीं रे ॥३॥ घोकितां अक्षर अभिमानविधि । निषेध लागला पाठीं । वाद करितां निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भविष्यती । दूषणांचें मूळ भूषण । तुका म्हणे सांडी मिथ्या खंती । रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहे भलतिया स्थिति रे ॥४॥

१५६५. नव्हे गुरुदास्य संसारिया । वैराग्य तरि भेणें कांपे विषयां । तैसें नाम नोव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥१॥ म्हणोनी गोड सर्वभावें । आंघोळी नलगे तोंड धुवावें । अर्थ चाड जीवें । नलगे भ्यावें संसारा ॥२॥ कर्मा तंव न पुरे संसारिक । धर्म तरी फळदायक । नाम विठ्ठलाचें येक । नासी दुःख भवाचें ॥३॥ नलगे सांडणें मांडणें । आगमानिगमाचें देखणें । अवघें तुका म्हणे । विठ्ठल नामें आटलें ॥४॥

१५६६. नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥१॥ देहाचा निग्रही त्याचे तो सांभाळी । मग नये कळी अंगावरी ॥२॥ आपुलीया इच्छे माता सेवा करी । न बाधी ते थोरी येणें क्षोभें ॥३॥ तुका म्हणे सांडा देखीचे दिमाख । मोडसीचें दुःख गांड फाडी ॥४॥

१५६७. सत्य सत्य देतें फळ । नाहीं लागतचि बळ ॥१॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥२॥ करावीच चिंता । नाहीं लागत तत्त्वतां ॥३॥ तुका म्हणे भावें । शरण म्हणवितां बरवें ॥४॥

१५६८. साधक झाले कली । गुडगुडीची लांब नळी ॥१॥ पचीं पडे मद्यपान । भांगभुर्का हें साधन ॥२॥ अभेदाचें पाठांतर । अति विषई

पडीभर ॥३॥ चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भगपाळ ॥४॥ सेवा मानधन। बरे इच्छेनें संपन्न ॥५॥ सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां सोडी॥६॥

१५६९. मज पाहतां हें लटीकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥१॥ कोणाचा कोणासीं न धरवे संबंध । आहे शुद्धबुद्ध ठाइचें ठाईं ॥२॥ काढा जी आपुलें मोहो बुंथि जाळें । नका लाऊं बळें वेड आम्हां ॥३॥ जीव शिव कांहीं ठेवियेलीं नांवें । सत्य तुम्हां ठावे असुनीयां ॥४॥ सेवेच्या अभिलाषें न धरा विचार । आम्हां दारोदार हिंडविलें ॥५॥ आहे तैसें आतां कळलीया वरी । परते सांडा दुरि दुजेपण ॥६॥ तुका म्हणे काय छायेचा अभिलाष । हंस पावे नाश तारांगणीं ॥७॥

१५७०. पंचभूतांचा गोंधळ । केला येके ठाईं मेळ । लावीला सबळ। अहंकार त्या पाठीं ॥१॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें वोझें। देह केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥२॥ जीवन देखें मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोग शुभ अशुभासी ॥३॥ इच्छा वाढविते वेल। खुंटावा तो खरा बोल । तुका म्हणे मोल। झांकलें तें पावेल ॥४॥

१५७१. पुसावेसें हेंचि वाटे । जें जें भेटे तयासी ॥१॥ देव कृपा करिल मज । काय लाज राखील ॥२॥ औघीयाचा विसर झाला । हा राहिला उद्योग ॥३॥ तुका म्हणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसें ॥४॥

१५७२. जाळा तुम्ही माझें जाणतें मीपण । येणें माझा खून मांडियेला ॥१॥ खादल्या पचे तरिच तें हित । वोकीलिया थीत पिंड पीडी ॥२॥ तरि भलें भोगें जोडिलें तें धन । पडिलीया खाणें जीवनासी ॥३॥ तुका म्हणे मज तारीं गा विठ्ठला । नेणताची भला दास तुझा ॥४॥

१५७३. याति मतिहीन रूपें लीन दीन । आणिक अवगुण जाणोनियां ॥१॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगिकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥२॥ जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचित कळों चित्ता ॥३॥ झालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥४॥ तुका म्हणे यासी नामाचा अभिमान । म्हणोनि शरण तारी बळें ॥५॥

१५७४. बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥१॥ तुझ्या पाईं मज झालासे विश्वास । म्हणोनियां आस मोकालिली ॥२॥ ऋषी मुनी सिद्धि साधक अपार । कळला विचार त्यांसी तुझा ॥३॥ नाहीं नास तें जें सुख दिल्हें त्यांस । झाले जे उदास सर्वभावें ॥४॥ तुका म्हणे सुख न माये मानसीं । धरिलें जीवेंसी पाय तुझे ॥५॥

१५७५. मायामोहोजाळीं होतों सांपडला । परि या विठ्ठला कृपा आली ॥१॥ काढोनी बाहेरी ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखवीलें ॥२॥ नाचे उडे माया करी कवतुकें । नासीवंत सुखें साच केलीं ॥३॥ रडे स्फुंदे दुःखें कुटितील माथा । येकासी रडतां तेंहि मरे ॥४॥ तुका म्हणे मज वाटतें नवल । मी हे माझे बोल ऐकोनियां ॥५॥

१५७६. देहभाव आम्ही राहिलों ठेवोनी । निवांत चरणीं विठोबाच्या ॥१॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ॥२॥ म्हणवोनि नाहीं सुखदुःख मनीं । ऐकीलिया कानीं वचनाचें ॥३॥ झालों मी निःसंग निवांत येकला । भार त्या विठ्ठला घालोनियां ॥४॥ तुका म्हणे झालों जयाचे अंकीत । तोचि माझें हीत सर्व जाणे ॥५॥

१५७७. आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरी तें जतन होय देठीं ॥१॥ नामेंचि हें सिद्धी नामेंचि सिद्धी । व्यभिचार बुद्धी न पवतां ॥ २ ॥ चालीला पंथ तो पाववील ठाया । जरी आड तया नये कांहीं ॥३॥ तुका म्हणे मध्यें पडतां आघात । तेणें होय घात हानी लाभ ॥४॥

१५७८. विरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥१॥ म्हणवोनि जीवा न साहे संगती । बैसतां येकांतीं गोड वाटे ॥२॥ देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला याचा ॥३॥ तुका म्हणे देव अंतरे यामुळें । आशामोहजाळें दुःख वाटे ॥४॥

१५७९. तुजसी संबंधची खोटा । परता परता रे तूं थोटा ॥१॥ देवा तुझें काय घ्यावें । आपआपणा ठकावें ॥२॥ जेथें मुद्दल नये हातां । व्याजें मरावें लेखितां ॥३॥ तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥४॥

१५८०. याचि ह्यका तुझे द्वारीं । सदा देखों रिणकरी ॥१॥ सदा करिसी खंड दंड । देवा बहु तूं गा लंड ॥ २ ॥ सुखें गोविसी भोजना । लपउनीयां आपणा ॥३॥ येक येक बुझाविसी । तुका म्हणे ठक होशी ॥४॥

१५८१. आम्ही जाणों तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥१॥ फांको नेदी चुकवितां । नेघों थोडे बहु देतां ॥२॥ बहुता दीसांचें लिगाड । आलें होत होत जड ॥३॥ तुका म्हणे आतां । नेघों सर्वस्वही देतां ॥४॥

१५८२. रीण वैरहत्या । हें तों न सुटे नेदितां ॥१॥ हें कां नेणा पांडुरंगा । तुम्ही सांगतसा जगा ॥२॥ माझा संबंध तो किती । चुकवा लोकांची फजिती ॥३॥ तुका म्हणे याचसाठीं । मज घेतां नये तुटी ॥४॥

१५८३. नाहीं मागितला । तुम्हां मान म्यां विठ्ठला ॥१॥ जे हे करविली फजिती । माझि येवढी जना हातीं ॥२॥ नाहीं केला पोट । पुढें घालोनि बोभाट ॥३॥ तुका म्हणे धरूनी हात । नाहीं नेलें दीवाणांत ॥४॥

१५८४. तूं पांढरा स्फटिकमणी । करिसी आणिकां त्याहुनी ॥१॥ म्हणोनी तुझ्या द्वारा । न येति ठकती दातारा ॥२॥ तुझी ठावी नांदणूक । अवघा बुडविला लौकिक ॥३॥ तुका म्हणे ज्याचें घेसी । त्यासी हेंचि दाखविसी ॥४॥

१५८५. बोलतों निकुरें । नव्हतीं सलगीचीं उत्तरें ॥१॥ माझें संतापलें मन । परपीडा आयकोन ॥२॥ अंगावरी आलें । तोंवरि जाईल सोशिलें ॥३॥ तुज भक्ताची आण देवा । जरी तुका येथें ठेवा ॥४॥

१५८६. बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवीतां चित्तीं काय नव्हे ॥१॥ आणिका उपाया कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥२॥ गीति गावों नाचों छंदे वाहों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥३॥ अनंत ब्रह्मांडें येका रोमावळी । आम्ही केला भोळी भावें उभा ॥४॥ लटिका हा केला संसारसिंधु । मोक्ष करा बद्धु नाहीं पुढें ॥५॥ तुका म्हणे ज्याच्या नामाचे अंकीत । राहिलों निश्चिंत त्याच्या बळें ॥६॥

१५८७. नलगे मायेसी बाळें निरवावें । आपुल्या स्वभावें वोढें त्यासी ॥१॥ मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याच्या माथा ॥२॥ गोड धड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥३॥ खेळतां गुंतलें उमगुनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥४॥ त्याच्या दुःखें पडे आपण खापरी । लाही तळीं वरी होय जैसी ॥५॥ तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥६॥

१५८८. ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतिमधीं विचारूनी ॥१॥ जयासी नावडे हरिनाम कीर्तन । आणिक नर्तन वैष्णवांचें ॥२॥ सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ॥३॥ तुका म्हणे येथें मानी अनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥४॥

१५८९. ब्राह्मण तो याती आंतेज असतां । मानावा तत्त्वतां निश्चयेसी ॥१॥ रामकृष्ण नाम उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥२॥ शांती क्षमा दया अळंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥३॥ तुका म्हणे गेल्या षडउर्मि अंगें । सांडोनियां मग ब्रह्मचि तें ॥४॥

१५९०. येक करिती गुरुगुरु । भोवता भारु शिष्यांचा ॥१॥ पुस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥२॥ परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविली ॥३॥ तुका म्हणे निर्भंग चित्तीं । अधोगति जावया ॥४॥

१५९१. येका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥१॥ पाप नलगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ॥२॥ कांहीं दुसरा विचार । नलगे करावाचि फार ॥३॥ असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥४॥ सत्य बोले मुखें । तेथें उचंबळति सुखें ॥५॥ तुका म्हणे दोन्ही । जवळीच लाभ हानी ॥६॥

१५९२. जळतें संचित । ऐसी आहे धर्म नीत ॥१॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥२॥ नेदी कर्म घडो । कोठें आडरानें पडो ॥३॥ तुका म्हणे मळ । राहों नेदी तापजाळ ॥४॥

१५९३. संतापाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उर फोडी ॥१॥ बासर तो भुंके गाढवाचे परी । उडे पाठीवरी यमदंड ॥२॥ समयो नेणें तें वेडे चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥३॥ तुका म्हणे काय वायां चाळवणी । पीट पीट घाणी हगवणीची ॥४॥

१५९४. घेशी तरी घेई संतांचिये भेटी । आणिक ते गोष्टी नको मना ॥१॥ सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणिक ते बोल न बोलती ॥२॥ करिसील तो करी संतांचा सांगात । आणिक ते मात नको मना ॥३॥ बैससील तरी बैस संतांमधीं । आणिक ते बुद्धि नको मना ॥४॥ जासी तरी जाई संतांचिया गांवा । होईल विसावा तेथें मना ॥५॥ तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेई ॥६॥

१५९५. संताचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःख लेश ॥१॥ मी राहीन होऊनी याचक । घालतील भीक तेचि मज ॥२॥ संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥३॥ संतांचें भोजन अमृताचें पान । करीति कीर्तन सर्व काळ ॥४॥ संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुख साठ घेती देती ॥५॥ तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनी भिकारी झालों त्यांचा ॥६॥

१५९६. संतांचें सुख झालें या देवा । म्हणवोनी सेवा करी त्यांची ॥१॥ तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥२॥ निर्गुण आकार झाला गुणवंत । घाली दंडवत पूजूनियां ॥३॥ तीर्थें त्यांची इच्छा करिति नित्यकाळ । न्हावया निर्मळ आपणासी ॥४॥ अष्ट सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ॥५॥ तुका म्हणे ते बळिया शिरोमणी । राहिले चरणीं निकटवासें ॥६॥

१५९७. जो मानी तो देईल काई । न मानी तो नेईल काई ॥१॥ आम्हां विठ्ठल सर्व भूतीं । भलतैसा राहों चित्तीं ॥२॥ आधीन ते जन काई । जल्पे वायांविण ठाई ॥३॥ वंदी निंदी तुज तो गा । तुका म्हणे पांडुरंगा ॥४॥

१५९८. भावबळें कैसा झालाशी लाहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ १ ॥ तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥२॥ पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आलिंगूनी मीठी देईं पाईं ॥ ३ ॥ चरणीं दृष्टी उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥४॥ तुका म्हणे उत्कंठित हे वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥५॥

१५९९. कृपाळू म्हणोनी बोलतीं पुराणें । निर्धार वचनें याचि मज ॥१॥ आणिक उपाय नेणेंचि मी कांहीं । तुझें वर्म ठाईं पडे ऐसें ॥२॥ नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥३॥ कृपा करिसी तरी थोडें तुज काम । माझा तरी श्रम बहु हरे ॥४॥ तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥५॥

१६००. सर्वभावें आलों तुजची शरण । कायावाचामनसहित देवा ॥१॥ आणीक दुसरें नये माझ्या मना । राहिली वासना तुझें पाईं ॥२॥ माझीया मनीचें कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण दुजें ॥३॥ तुझे आम्ही दास आमुचा तूं ऋणी । चालत दुरोनी आलों मागें ॥४॥ तुका म्हणे आतां घेतलें धरणें । हिशेबाकारणें भेटी देईं ॥५॥

१६०१ कईं मात माझे आईकती कान । बोलतां वचन संतांमुखीं ॥१॥ केला पांडुरंगें तुझा अंगीकार । मग होईल धीर माझ्या जीवा ॥२॥ म्हणवोनी मूख अवलोकीतों पाय । हेंचि मज आहे थोर आशा ॥३॥ माझीया मनास हाचि पैं विश्वास । न करी सायास साधनांचे ॥४॥ तुका म्हणे मज होईल भरंवसा । तरलों मी ऐसा साच भावें ॥५॥

१६०२. दोन्ही हात ठेउनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कष्टलासी साठीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥१॥ भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा । आम्हांलागीं सोपा । दैत्यां काळ कृतांत ॥२॥ होतासी क्षीर-सागरीं । महि दाटली आसुरीं । म्हणूनियां धरिं । गौळीयांचे अवतार ॥३॥ केला पुंडलीकें गोवा । तुज पंढरीये देवा । तुका म्हणे भावा । साठिं हातीं सांपडसी ॥४॥

१६०३. गोड झालें पोट धालें । अवचित वाचे आलें । म्हणतां पाप गेलें । विठ्ठलसे वाचेसी ॥१॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलीया ॥२॥ चित्त पावलें आनंदा । सुखसमाधी ते सदा । म्हणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ ३ ॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका म्हणे दावी । रूप तेंची अरूप ॥४॥

---

भूपाळ्या–अभंग

१६०४. बोलोनियां दाऊं का तुम्ही नेणा जी देवा । ठेवाल तें ठेवा ठाईं तैसा राहेन ॥१॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय । म्हणउनी पाय जिवीं धरुनी राहिलों ॥२॥ त्यागे भोगे दुःख काय सांडावें मांडावें । ऐसी धरियेली जीवें माझ्या थोर आशंका ॥३॥ तुका म्हणे माता बाळ चुकलिया वनीं । न पवतां जननी दुःख पावे विठ्ठले ॥ ४ ॥

१६०५. ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ । कांहो कळवळा तुम्हां उमटेचिना ॥१॥ आहो पांडुरंगे पंढरीचे निवासे । लाउनियां आसे चाळउनि ठेविलें ॥२॥ काय जन्मा येउनियां केली म्यां जोडी । ऐसें घडोघडीं चित्ता येतो आठव ॥३॥ तुका म्हणे खरा न पवेचि विभाग । धिःकारितें जग हेंचि लाहे हिसेब ॥ ४ ॥

१६०६. कां गा केविलवाणी केलों दीनाचा दीन । काय तुझी हीन शक्ति झालीसे दिसे ॥१॥ लाज येते मना तुझा म्हणवितां दास । गोडी नाहीं रस बोलीलिया सारिखी ॥२॥ लाजविली मागें संतांची हीं उत्तरें । कळों येतें खरें दुजें येकावरूनी ॥३॥ तुका म्हणे माझी कोणी वदविली वाणी । प्रसादावांचुनी तुमचिया विठ्ठला ॥४॥

१६०७. जळों माझें कर्म वाया केली कटकट । झालें तैसें तंट नाहीं आले अनुभवा ॥१॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना । ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥२॥ गुणवंत केलों दोष जाणायासाठीं । माझें माझें

पोटीं वळकट दूषण ॥३॥ तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा लळा पाळियेला शेवटीं ॥४॥

१६०८. कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटों पाहे हृदय ॥१॥ कां गा सासुरवासी मज केलें भगवंता । आपुलीया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ॥२॥ प्रभातेसी वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥३॥ येथें अवघे वायां गेले दीसती सायास । तुका म्हणे नास दिसे झाल्या वेचाचा ॥४॥

१६०९. जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझे तुमचे पाय ॥१॥ आतां मज साह्य येथें करावें देवा । तुझी घेईं सेवा सकळ गोवा उगऊनी ॥२॥ भोगें रोगा जोडोनियां दिल्हें आणिकां । अरुचि ते हो का आतां सकळांपासूनी ॥३॥ तुका म्हणे असो तुझें तुझे मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें ॥४॥

१६१०. न सांगतां तुम्हां कळों येतें अंतर । विश्वीं विश्वंभर परिहारचि नलगे ॥१॥ परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान ते घडी पुरों येकी देत नाहीं ॥२॥ काय उणें मज येथें ठेविलीया ठाईं । पोटा आलों तईंपासोनियां समर्थ ॥३॥ तुका म्हणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणा दुसरियापासूनी ॥४॥

१६११. तुजसवें आम्ही अनुसरलों अबळा । नको अंगीं कळा राहों हरि हीन देऊं ॥ १ ॥ सासुरवासी भीते जीव वोढे तुजपाशीं । आतां दोहींविसीं लज्जा राखें आमुची ॥२॥ न कळतां संग सहज झाला खेळतां । प्रवर्तली चिंता मागीलाची यावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे असतां जैसें तैसें बरवें । वचन या भावें वेचुनियां विनटलों ॥४॥

---

१६१२. रवि दीप हिरा दावीति देखणें । अदृश्य दर्शनें संतांचिया ॥१॥ त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥२॥ तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥३॥

मायबापें पिंड पाळीयेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥४॥ संतांचे वचनें वारि जन्मदुःख । मिष्टान्न तें भूक निवारण ॥५॥ तुका म्हणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥६॥

१६१३. हरि हरि तुम्ही म्हणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥१॥ आणिक नका कांहीं गाबाळाचे भरी । पडों येथें थोरी नागवण ॥२॥ भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । म्हणावें पतित वेळोवेळां ॥३॥ तुका म्हणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील ॥४॥

१६१४. ऐसे कुळीं पुत्र होती । बुडवीती पूर्वजां ॥१॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥२॥ त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥३॥ तुका म्हणे ग्रामपशु । केला नाशू आयुष्या ॥४॥

१६१५. गांठोळीस धन भाकावी करुणा । दाउनी सज्जना कींव पाडी ॥१॥ नाठाळाची भक्ति कुचराचें बळ । कोरडें वोंगळ मार खाये ॥२॥ सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विन्हळ त्या धोंडी पूजा दावी ॥३॥ तुका म्हणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धंदधंद सिंदळीचे ॥४॥

१६१६. आतां जागा रे भाई जागा रे । चोर निजल्या नाडूनि भागा रे ॥ १ ॥ कैसे असुनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणा ॥ २ ॥ आतां नका रे भाई नका रे । आहे गांठी तें लुटऊं लोकां रे ॥३॥ तुका म्हणे येकाच्या घाये । कां रे जाणुनि न धरा भय ॥४॥

१६१७. मुद्दल जतन झालें । मग लाभाचें काय आलें ॥१॥ घरिं देउनी अंतर गांठी । राखा पारख्या न सुटे मिठी ॥२॥ घाला पडे थोडेंच वाटे । काम भैंदाचें चपेटे ॥३॥ तुका म्हणे वरदळ खोटे । फांसे अंतरींचे कपटें ॥४॥

१६१८. मज अंगाच्या अनुभवें । काय वाईट बरें ठावें ॥१॥ झालों देहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ॥२॥ वोस वसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥३॥ तुका म्हणे घेऊं देवा । सवें करूनि बोळवा ॥४॥

१६१९. पाववावें ठाया । ऐसें सर्वें बोलों तयां ॥ १ ॥ भावा ऐसी क्रिया राखे । खोट्या खोटेपणें वाखे ॥२॥ न ठेऊं अंतर । कांहीं भेदाचा पदर ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवेंभावें । सत्य मानवीजे देवें ॥ ४ ॥

१६२०. माझा पाहा अनुभव । केला देव आपुला ॥ १ ॥ बोलविलें तेंचि द्यावें । उत्तर व्हावें ते काळीं ॥२॥ सोडलिया जग निंद्य । मग गोविंद म्हणियारा ॥३॥ तुका म्हणे धीर केला । तेणें याला गोविलें ॥४॥

१६२१. मोल देवोनियां सांठवावे दोष । नटाचे ते वेष पाहोनियां ॥१॥ हरिदासां मुखें हरिकथा कीर्तन । तेथें पुण्यापुण्य विशेषता ॥२॥ हरितील वस्त्रें गोपिकांचे वेषें । पाप त्यासरिसें मात्रागमन ॥३॥ तुका म्हणे पाहा ऐसे जाले जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥४॥

१६२२. विठोबा विसांविया विसांवीया । पडों देई पायां ॥१॥ बहु खेद क्षीण । आलों सोसूनियां वन ॥२॥ बहु काकुळती । आलों सोसिली फजिती ॥३॥ केली तुजसाठीं । तुका म्हणे येवढी आटी ॥४॥

१६२३. कां गा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥१॥ उभाउभीं पाय जोडीं । आतां फांको नेदी घडी ॥२॥ नको सोडूं ठाव । आतां घेऊं नेदी वाव ॥३॥ तुका म्हणे इच्छा । तैसा करीन सरिसा ॥४॥

१६२४. तुमची तों भेटी नव्हे ऐसी झाली । कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ॥१॥ आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणासवें ॥२॥ तुम्हा निमित्यासी सांपडलें अंग । नेदावा हा संग विचारिलें ॥३॥ तुका म्हणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाचीच होती ॥४॥

१६२५. आहे तेंचि आम्ही मागों तुजपासीं । न हो तुज ऐसीं क्रिया-नष्टें ॥१॥ न बोलावी तोंची वर्म बरें दिसे । प्रगट ते कैसे गुण करूं ॥२॥ येका ऐसा येक द्यावयाचा मोळा । कां तुम्हां गोपाळा नाहीं ऐसा ॥३॥ तुका म्हणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥४॥

१६२६. आम्हीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥१॥ आहे

तैसें असो आतां । चिंतें चिंता वाढते ॥२॥ बोलिल्याचा मनीं शीण । भिन्न भिन्न राहावें ॥३॥ तुका म्हणे आम्हांपाशीं । धीरा ऐसी जतन॥४॥

१६२७. आम्हापाशीं याचें बळ । कोण काळवरी तों ॥१॥ धरूनी ठेलों जीवेसाठीं । होय भेटी तोंवरी ॥२॥ लागलों तो न फिरे पाठीं । पडिल्या गांठीवांचुनी ॥३॥ तुका म्हणे अवकाशें । तुमच्या ऐसें व्हावया॥४॥

१६२८. बोलिलेंची बोलें पडताळूनी । उपजत मनीं नाहीं शंका ॥१॥ बहुताची माय बहुत कृपाळ । साहोनी कोल्हाळ बुजाविसी ॥२॥ बहुतांच्या भावें वाटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥३॥ तुका म्हणे ऐसें जाणतसों वर्म । कारणें तो श्रम न वजे वायां ॥४॥

१६२९. कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥१॥ आड कांहीं न दुजें । फळ ये बीज आणिलें ॥२॥ उद्वेग तो वायांवीण कैंचा सीण चिंतनें ॥३॥ तुका म्हणे गेला श्रम । तुमच्या धर्में पायांच्या ॥४॥

१६३०. संसार तो कोण देखे । आम्हां सखे हरिजन ॥१॥ काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥२॥ स्वप्नीं तेहि नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥३॥ तुका म्हणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥४॥

१६३१. येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां ॥१॥ पडियेलों वनीं थोर चिंतवनीं । उसीर कां अझुनी लावीयेला ॥२॥ काय तुज नाहीं लौकीकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥३॥ तुका म्हणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥४॥

१६३२. आपुले गांवींचें देखीसें झालें । परदेशी येकले किती कंठूं ॥१॥ म्हणवोनि पाहे मूळ येतां वाटे । जिवलग भेटे कोणी तरी ॥२॥ पाहतां अवघ्या दिसतील दीशा । सकळही वोसा दृष्टीपुढें ॥३॥ तुका म्हणे कोणी न सांगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥४॥

१६३३. जन तरि देखें गुंतले प्रपंचीं । स्मरण तें त्याचें त्यास नाहीं ॥१॥ म्हणवोनि मागें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ॥२॥ इंद्रियांचा

गाजे गोंधळ ये ठाईं । फोडितसे डोई अहंकार ॥३॥ तुका म्हणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ॥४॥

१६३४. धांवे त्यासी फावे । दुजे उगवोनी गोवे ॥१॥ घ्यावे भरुनियां घर । मग नाहीं वेरझार ॥२॥ धनी उभें केलें । पुंडलीकें या उगलें ॥३॥ तुका म्हणे ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥४॥

१६३५. लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥१॥ ऐरावती रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ॥२॥ ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठिण ॥३॥ तुका म्हणे जाण । व्हावें लहानाहूनि लहान ॥४॥

१६३६. नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही दावा ॥१॥ महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहाती ॥२॥ येती सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥३॥ तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥४॥

१६३७. उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखवीती कळा कवित्वाची ॥१॥ ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥२॥ तुका म्हणे येका नारायणा ध्याई । वरकडा वाही शोक असे ॥३॥

१६३८. आवडीच्या मतें करिती भोजना । भोग नारायणा म्हणती केला ॥१॥ औघा देव म्हणे वेगळें तें काय । अर्थासाठीं डोय फोडूं पाहे ॥२॥ लाजे कमंडलू धरितां मोपळा । आणिक थिगळा प्रावरणा ॥३॥ झाला गडवे धातु द्रव्यइच्छा चित्तीं । नैश्वर बोलती अवघे मुखें ॥४॥ तुका म्हणे तयां देवा नाहीं भेटीं । ऐसे कल्पकोटी जन्म घेतां ॥५॥

१६३९. म्हणवितां हरिदास कां रे नाहीं लाज । दीनासीं महाराज म्हणसी हीना ॥१॥ काय ऐसें पोट न भरेसें झालें । हालविसी कुलें सभेमाजी ॥२॥ तुका म्हणे पोटें केली विटंबना । दीन झाला जना कींव भाकी ॥३॥

१६४०. रिद्धिसिद्धि दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥१॥ लोड बालिस्ते पलंग सुपती । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥२॥ पुसाल तरी आम्हां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥३॥ तुका म्हणे आम्ही राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचें उणें पुरे ॥४॥

१६४१. अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिल्ही भूमी ॥१॥ अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥२॥ अवघींच तीर्थें व्रतें केले याग । अवघेंचि सांग झालें कर्म ॥ ३ ॥ अवघेंचि फळ आलें आम्हां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥४॥ तुका म्हणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥५॥

१६४२. घरोघरीं झालें औघें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहू माजी ॥१॥ निरें कोणापासीं होय येक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥२॥ आशा तृष्णा माया कालउनी दोन्ही । दंभ तो दुरोनी दिसतसे ॥३॥ काम क्रोध लोभ शीणवी बहुत । मेळउनी आंत काळकूट ॥४॥ निंदा अहंकार द्वेष बहु फार । माजी वरी धूर सारीयला ॥५॥ तुका म्हणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोलें जाये वायांविण ॥६॥

१६४३. मोहरा ऐसीं फळें नाहीं । आलीं कांहीं गळती ॥१॥ पक्कदशे येती थोडीं । नाश आढी वेंचे तों ॥२॥ विरुळा पांवे विरुळा पांवे । अवघड गोवे शेवटाचे ॥३॥ उंच नीच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥४॥ झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणीं बहु थोडे ॥५॥ पावेल तो पैल थडी । म्हणा गडी आपुला ॥६॥ तुका म्हणे उमाऱ्यानें खरें कोण मानीतसे ॥७॥

१६४४. अवघ्या उपचारा । येक मनची दातारा ॥१॥ घ्यावी घ्यावी हेचि सेवा । माझी दुर्बळाची देवा ॥२॥ अवघीयाचा ठाव । पायांवरी जीवभाव ॥३॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥४॥

१६४५. आळी सलगी पायांपासीं । होईल तैसें करीन ॥१॥ आणिक आम्ही कोठें जावें । येथें जीवें वेंचलों ॥२॥ औघ्या निरोपणा भाव । हाचि ठाव उरलासे ॥३॥ तुका म्हणे पाळीं लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥४॥

१६४६. देह आणि देहसंबंधें निंदावीं । इतरें वंदावीं श्वानशूकरें ॥१॥ येणें नांवें झाला मी माझ्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥२॥ ग्रह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरा भेटावें श्वापदांझाडां ॥३॥ तुका म्हणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥४॥

१६४७. देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कलेवर वोवाळुनी ॥१॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचें वेगीं सारीं वोझें ॥२॥ करुणावचनीं लाहो येकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥३॥ तुका म्हणे सांडी लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥४॥

१६४८. देह नव्हें मी हें सरें । उरला उरें विठ्ठल ॥ १ ॥ म्हणवोनि लाहो करा । काळ सारा चिंतनें ॥२॥ पाळणाची नाहीं चिंता । ठाव रिता देवाचा ॥३॥ तुका म्हणे जीवासाठीं । देव पोटीं पडेल ॥४॥

१६४९. पृथक मी सांगों किती । धर्म नीति सकळां ॥१॥ अवघियाचा येक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥२॥ क्षराक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥३॥ तुका म्हणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ॥४॥

१६५०. पुण्यविकरा तें मातेसीं गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥१॥ आत्महत्यारा विषयाचा लोभी । म्हणावें तें नाभी करवी दंड ॥२॥ नागवला अल्प लोभाचिये साठीं । घेउनी कांचवटी परिस दिल्हा ॥३॥ तुका म्हणे हात झाडिलें परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं वेठी केली ॥४॥

१६५१. अंतरींचें ध्यान । मुख्य या नांवें पूजन ॥१॥ उपाधी ते अवघें पाप । गोड निरसतां संकल्प ॥२॥ आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥३॥ तुका म्हणे वृत्ति । अवीट हे सहजास्थिती ॥४॥

१६५२. मूळ कारण सत्ता । नाहीं मिळत उचिता ॥१॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥२॥ सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ॥३॥ तुका म्हणे भावें । होतें सकळ बरवें ॥४॥

१६५३. बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी ॥१॥ झालें आम्हांसी जीवन । धणिवरी हें सेवन ॥२॥ सोपें आणि गोड । किती अमृताहि वाड ॥३॥ तुका म्हणे अच्युता । आमचा कल्पतरु दाता ॥४॥

१६५४. तृषाकाळीं उदक भेटी । पडे मिठी आवडीची ॥१॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥२॥ मिष्टान्नाचा योग भुके । म्हणतां चुके पुरेसें ॥३॥ तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥४॥

१६५५. कुचराचें श्रवण । गुणदोषांवरी मन ॥१॥ असोनियां नसे कथे । मूर्ख अभाग्य तें तेथें ॥२॥ निरर्थक कारणीं । कान डोळे वेंची वाणी ॥३॥ पापाचे सांगाती । तोंडीं वोढाळाचे माती ॥४॥ हिताचिया नांवें । वोस पडिलें देहभावें ॥५॥ फजित करूनी सांडी । तुका करी बोडाबोडी ॥६॥

१६५६. जग तरी आम्हां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥१॥ येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हणुनी काळा ॥२॥ नाहीं कोणी सखा । आम्हां निरपराध पारिखा ॥३॥ उपक्रमें वदे । तुका वर्मासी तो भेदे ॥४॥

१६५७. सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनी नाचा ॥१॥ समाधीचें सुख सांडा वोवाळुनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥२॥ पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्य बळें निर्भरता ॥३॥ उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥४॥ तुका म्हणे मन पावोनी विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥५॥

१६५८. गंगा न देखे विटाळ । तेचि रांजणींहि जळ ॥१॥ अल्प महदा नव्हे सरी । विटाळतो भेद धरी ॥२॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पायरी कां लोका ॥३॥ तुका म्हणे आगीविण । बीजें वेगळी तों भिन्न ॥४॥

१६५९. देवावरिल भार काढुं नये कांहीं पर ॥१॥ ताहान भुकें आठवण । घडे तें बरें चिंतन ॥२॥ देखावी निश्चिंती । तेंचि अंतर श्रीपती ॥३॥ वैभव सकळ । तुका मानीतो विटाळ ॥४॥

१६६०. थुंकोनियां मान । दंभ करितो कीर्तन ॥१॥ झालों उदासीन देहीं । येकावीण चाड नाहीं ॥२॥ अर्थ अनर्थासारिखा । करुनी ठेविला पारिखा ॥३॥ उपाधी वेगळा । तुका राहिला सोंवळा ॥४॥

१६६१. काय याचें घ्यावें । नित्य नित्य कोणें गावें ॥१॥ केलें हरिकथेनें वांज । अंतरोनी जाते नीज ॥२॥ काम संवसार । अंतरीं हें करकर ॥३॥ तुका म्हणे हेंड । ऐसे मानिती ते लंड ॥४॥

१६६२. वदे साक्षत्वेंसी वाणी । नारायणीं मिश्रित ॥१॥ नलगे कांहीं चांचपावें । जातों भावें पेरित ॥२॥ भांडार त्या दातयाचें । मी कईचें ये ठाईं ॥३॥ सादावीत गेला तुका । येथें येकायेकीं तो ॥४॥

१६६३. ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥१॥ जेणें पावीजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥२॥ गुंफोनि चावटी । तेथें कोण लाभे भेटी ॥३॥ तुका म्हणे कळा । देवावीण अमंगळा ॥४॥

१६६४. साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥१॥ व्यभिचारिण टाकमटिका । उपहास होती लोकां ॥२॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥३॥ तुका म्हणे जीणें । शर्तीवीण लाजिरवाणें ॥४॥

१६६५. मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ति ॥१॥ जा रे चाळवीं बापुडीं । कोण्ही धरितील ती गोडी ॥२॥ रिद्धिसीद्धि देसी । आम्ही चुंबळीं नव्हों तैसीं ॥३॥ तुका म्हणे ठका । ऐसे नागविलें लोकां ॥४॥

१६६६. पाहातोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥१॥ वरि ठेऊं दे मस्तक । ठेलों जोडोनी हस्तक ॥२॥ बरवें करीं सम । नको भंगूं देऊं प्रेम ॥३॥ तुका म्हणे चला । पुढति सामोरे विठ्ठला ॥४॥

१६६७. भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेलें आशापाश निवारुनी ॥१॥ विषय तो त्यांचा झाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥२॥ निर्वाणी गोविंद असे मागें पुढें । कांहींच सांकडे पडों नेदी ॥३॥ तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भय नरका जाणें ॥४॥

१६६८. तोंचि हें क्षुल्लकें सखी सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखीतों ॥१॥ नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होता सकळ मिथ्या ॥२॥ रवी उगवे तों दीपिकांचें काज । प्रकाशें तें तेज सहज लोपे ॥३॥ तुका म्हणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥४॥

१६६९. यज्ञ भूतांचा पाळणा । भेद कारीये कारणा । पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥१॥ येक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये

अंगीं । धन्य तोचि जगीं । आदि अंत सांभाळी ॥२॥ अवश्यक तो शेवट । मागें अवघी खटपट । चालों जाणें वाट । ऐसा विरळा येखादा ॥३॥ तुका होऊनी निराळा । क्षराअक्षरा वेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ॥४॥

१६७०. वेदपुरुष तरी नेति कां वचन । निवडुनी भिन्न दाखविलें ॥१॥ तुझीं वर्में तूंचि दाउनी अनंता । होतोसी नेणता कोण्या गुणें ॥२॥ यज्ञाचा भोक्ता तरि कां नोव्हे सांग । उणें पडतां अंग क्षोभ घडे ॥३॥ वससी तूं या भूतांचें अंतरीं । तरि कां भेद हरी दावियेला ॥४॥ तपतीर्थाटण तुझें मूर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥५॥ आतां क्षमा कीजे विनवीतो तुका । देऊनियां हाका उभा द्वारीं ॥६॥

---

लोहोगांवीं स्वामीचें अंगावर उष्ण पाणी घातलें तो अभंग

१६७१. जळे माझी काया लागला वोणवा । धांव रे केशवा मायबापा ॥१॥ पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन झालें ॥२॥ फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहोतोसी काय ह्रदय माझें ॥३॥ घेउनी जीवन धांवे लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥४॥ तुका म्हणे माझी तूं होसी जननी । आणिक निर्वाणीं कोण राखे ॥५॥

---

श्रीपांडुरंग व नामदेव स्वप्नांत येऊन कवित्व करणें म्हणोन आज्ञा केली ते अभंग.

१६७२. नामदेवें केलें स्वप्नामाजि जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥१॥ सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥२॥ माप टाकी सळे धरिली विठ्ठलें । थापटुनी केलें सावधान ॥३॥ प्रमाणाचि संख्या सांगे शतकोटी । उरले ते शेवटीं लावी तुका ॥४॥

१६७३. द्याल ठाव तरी राहेन संगती । संतांचें पंगतीं पायापासीं ॥१॥ आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥२॥ शेवटील स्थळ नीच माझी वृत्ती । आधारें विश्रांति पावईन ॥ ३ ॥ नामदेवा पाईं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥४॥

१६७४. अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥१॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥२॥ ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥३॥ तुका म्हणे अंगीं लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥४॥

१६७५. त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणाजोगें । येक जातां लागे । येक पाठी लागतें ॥१॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कृपें खांदीं हरि वाहे ॥ २ ॥ पापपुण्यात्मयाच्या शक्ति । असती योजिल्या श्रीपति । यावें काकुलति । येथें सत्तानायका ॥३॥ तुका उभा पैलथडी । तरी हे प्रकाश निवडी । घातल्या सांगडी । ताफे पेटी हाकारी ॥४॥

१६७६. देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंतीं ॥१॥ जैसा गाव तैसें फळ । स्वातीतोय येक जळ ॥ २ ॥ पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदंतर तेवीं ॥३॥ तुका म्हणे हिरा । पारखीयां मूढां गारा ॥४॥

१६७७. अनुभवें अनुभव अवघाचि साधिला । तरी स्थिरावला मनु ठाईं ॥१॥ पिटूनियां मुसे आला अलंकार । दग्ध तें असार होउनियां ॥२॥ येकचि उरलें कायावाचामना । आनंदभुवनामाजि त्रयीं ॥३॥ तुका म्हणे आम्हीं जिंकिला संसार । होउनी किंकर विठोबाचे ॥४॥

१६७८. ऐसिया संपत्ति आम्हां संवसारीं । भोगाचिया परी काय सांगों ॥ १ ॥ काम तो कामना भोगीतसे देवा । आलिंगनें हेवा चरण चुंबी ॥२॥ शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धि ॥३॥ तुका म्हणे पाहे तिकडे सारिखें । आपुले पारिखें निरसलें ॥४॥

१६७९. राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एकचि सकळ दुजें नाहीं ॥१॥ मंगळावांचुनी उमटेना वाणी । अखंडचि खाणी येक रासी ॥२॥ मोडलें हें स्वामी ठायाठाव सेवा । वाढवावा हेवा कोणा अंगें ॥३॥ तुका म्हणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हेंचि आतां ॥४॥

१६८० निवडुनियां वाण काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ १ ॥ जयाचा विभाग तयासीच फळे । देखणें निराळें कौतुकासी ॥२॥ शूर तो वोळखे घायडायहात । येरा होइल मात सांगायासी ॥३॥ तुका म्हणे माझी केळवते वाणी । केला निजस्थानीं जानवसा ॥४॥

१६८१. याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दीस गोड व्हावा ॥१॥ आतां निश्चिंतीनें पावलों विसावा । खुंटलीया धांवा तृष्णेचिया ॥२॥ कवतुक वाटे झालिया वेचावें । नांवें मंगळाचे तेणें गुणें ॥३॥ तुका म्हणे मुक्ति पर्णिली नोवरी । आतां दीस चारी खेळीमेळी ॥४॥

१६८२. भक्तिचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींचि ठेवणी सकळ वस्तु ॥१॥ माउलीचे मागें बाळकांची हारी । येका सूत्रें दोरी वोढितसे ॥२॥ जेथील जें मागें तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥३॥ सेवेचिया सत्तें धनीच सेवक । आपुलें तें येक न वंचि कांहीं ॥४॥ आदि अंत ठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे मग उंचासनीं ॥५॥ भावारूढ तुका झाला येकायेकीं । देवचि लौकिकीं अवघा केला ॥६॥

१६८३. सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ॥१॥ भजनाचे सोई जगा परिहार । नेणत्या सादर चित्त कथे ॥२॥ नायकवे कानीं साधन उपाय । आयके तो गाय हर्षें गीत ॥३॥ नव्हे आराणुक जावयासी वना । वेध कामिमना हरिकथेचा ॥४॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्टौप्रहर ॥५॥ तुका म्हणे आम्ही खेळों भातुकुलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥६॥

१६८४. जाणपण बरें देवाचिये शिरीं । आम्ही ऐसीं बरीं नेणतींच ॥१॥ देखणियांपुढें रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥२॥ आशंकेची

बाधा नाहीं लडिवाळां । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥३॥ तुका म्हणे दिशा मोकळ्या सकळा । अवकाशीं खेळा ठाव झाला ॥४॥

१६८५. वचनाचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥१॥ जातां घरामागें उरों नेणें खंती । मिळाल्या बहुति फांकलीया ॥२॥ उदयींच अस्त उदयो संपादला । कल्पनेचा केला जागेपणें ॥३॥ जाणोनियां गेला हांडोरिया पोरा । सावध इतरा करुनी तुका ॥४॥

---

स्वामीस संतांनीं पुशिलें, 'कोण्या प्रकारें तुम्हांस वैराग्य प्राप्त झालें, तें सांगावें.'

१६८६. याती शूद्र वैश्य केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥१॥ नये बोलों परी पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥२॥ संवसारीं झालों अति दुःखें दुःखी । मायबापें शेखीं क्रमलीया ॥३॥ दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री येकीं अन्न अन्न करीत मेली ॥४॥ लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । व्यवसाय देखें तुटी येतां ॥५॥ देवाचें देऊळ होतें जें भंगलें । चित्तासी तें आलें करावेसें ॥६॥ आरंभीं कीर्तन करी येकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥७॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वास आदरें करूनियां ॥८॥ गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥९॥ संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येवों दिल्हीं ॥१०॥ ठाकला तो केला कांहीं परोपकार । केलें हें शरीर कष्टऊनी ॥११॥ वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचीं वीट आला ॥१२॥ सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमता ॥१३॥ मानियेला स्वप्नीं गुरुचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥१४॥ यावरी झाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥१५॥ निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें

चित्त दुखवलें ॥१६॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥१७॥ विस्तार सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥१८॥ आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥१९॥ भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आला ॥२०॥ तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥२१॥

१६८७. एका वचन हे संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । करितसां आदरें ॥१॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । येकाचिये वाहीं । येक देखी मानिती ॥२॥ बहु पीडिलों संसारीं । मोडीं पिसें पिटीं ढोरे । न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥३॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही । त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥४॥ प्रियापुत्रबंधु । यांचा तोडिला संबंधु । सहज झालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥५॥ तोंड न दाखवी जना । शिरें सांदी भरे राना । येकांत तो जाणा । तयासाठीं लागला ॥६॥ पोटें पिडिलों काहारे । दया नाहीं या विचारें । बोलावितां बरें । सहज म्हणे यासाठीं ॥७॥ सहज वडिलां होती सेवा । म्हणूनि पूजितों या देवा । तुका म्हणे भावा । साठीं झणी घ्या कोणी ॥८॥

१६८८. बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरें या दुष्काळें पीडा केली ॥१॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । झाला हा वमन संवसार ॥२॥ बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥३॥ बरें झाले जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥४॥ बरें झालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥५॥ बरें झालें तुझें केलें देवाईल । लेंकुरें बाईल उपेक्षीलीं ॥६॥ तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासी जागरण ॥७॥

१६८९. बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभावें ॥१॥ येणें सोसें मन झालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥२॥ बंधनापासूनी उकलली गांठी । देतां आली मिठी सावकाश ॥३॥ तुका म्हणे देह भरला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥४॥

१६९०. जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥१॥ आधीं आपणयां नासी । तरी उतरे ये कसीं ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें या निश्चयें उत्तर ॥३॥ तुका म्हणे ते उन्मनीं । नास कारीये कारणीं ॥४॥

१६९१. मीच मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥ १ ॥ आतां पुरले नवस । निरसोनी गेली आस ॥२॥ झालों वारा बळी । गेलों मरोन ते काळीं ॥३॥ दोहीं कडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥४॥

१६९२. साधनाच्या कळा आकार आकृति । कारण नवनीतीं मंथनाचें ॥१॥ पक्षियासी नाहीं मार्गीं अडथळा । अंतरिक्षीं फळासीचि पावे ॥२॥ भक्तीची जोडी उखत्याची साठीं । उणें पुरे तुटी येथें नाहीं ॥३॥ तुका म्हणे आले सांचत सांचणी । आजि झाली धणी येकसरें ॥४॥

१६९३. नाहीं येथें वाणी । सकळा वर्णीं घ्यावी धणी ॥१॥ झालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यास दावी रंग ॥२॥ येका भावाचा येकांत । पीक पीकला अनंत ॥३॥ तुका खळे दानीं । करी बैसोनी वाटणी ॥४॥

१६९४. ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥१॥ जया पासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥२॥ निवडिलें वरळा भूस । सार आईन जिन्नस ॥३॥ तुका म्हणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥४॥

१६९५. भ्रमणा पाऊलें वेचिलीं तीं वाव । प्रवेशाचा ठाव येकद्वारें ॥१॥ सार तीं पाउलें विठोबाचे जीवीं । कोणी न विसंबावी क्षणभरी ॥२॥ सुलभ हें केलें सकळा जीवन । फुंकावाचि कान नलगेसे ॥३॥ तुका म्हणे येथें सकळहि कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥४॥

१६९६. कांहीं जाणों नये पांडुरंगावीण । पावीजेल सीण संदेहानें ॥१॥ मलतिया नांवें आळविला पिता । तरी जो जाणता कळवळा ॥२॥ अहंकार जातो गौरवितां वाणी । सर्व गात्रां धणी हरिकथा ॥३॥ तुका म्हणे उपजे विल्हाळ आवडी । करावा तो घडीघडी लाहे ॥४॥

१६९७. बीजापोटीं पाहे फळ । विध न करितां सकळ ॥ १ ॥ तया मूर्ख म्हणावे वेडे । कैसें तुटेल सांकडें ॥ २ ॥ दावि तया वाट । वेठीं धरूं पाहे चाट ॥३॥ पुढिल्या उपाया । तुका म्हणे राखे काया ॥४॥

१६९८. मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण तें ॥१॥ वेदा निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥२॥ आगी लावीं घरा । मग वसती कोठें थारा ॥३॥ तुका जाणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥४॥

१६९९. वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥१॥ ऐसे सांगा मजपासीं । संता निरवितो येविसीं ॥२॥ असां जी प्रवीण । ग्रंथीं कळे शुद्ध हीन ॥३॥ तुका म्हणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥४॥

१७००. ज्या ज्या आम्हापासीं होतील ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अलंकारूं ॥१॥ अवघा पायांपासीं दिल्हा जीवभाव । जन्ममरण ठाव पुसियेला ॥२॥ ज्याचे देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकवीलें ॥३॥ तुका म्हणे येथें उरला विठ्ठल । खाय बोले बोल गाय नाचे ॥४॥

१७०१. आम्ही आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकरें । ॥१॥ पायीं गोविली वासना ॥२॥ तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥२॥ येतां पाहे मूळा । वाट पंढरीची डोळां ॥३॥ तुका म्हणे स्थळ । मग मी पाहेन सकळ ॥४॥

१७०२. आइत्याची रासी । आली पाकसिद्धीपासीं ॥ १ ॥ आतां सांडोनी भोजन । भीके जावें वेडेपण ॥२॥ उसंतिली वाट । मागें परतावें फुकट ॥३॥ तुका म्हणे वाणी । वेंचो बैसोनि ठाकणी ॥४॥

१७०३. धन्य शुद्ध जाती । धरिं लौकरी परती ॥१॥ ऐकिलें तेंचि कानीं । होये परिपाक मनीं ॥२॥ कळवळा पोटीं । सावधान हितासाठीं ॥३॥ तुका म्हणे भाव । ज्याचा तोचि जाणा देव ॥४॥

१७२०. नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥१॥ काम वाटे भय वासनेच्या द्वारें । सांडावें ते धीरें आच्यावाचा ॥२॥ कापउनी टिरी शूरत्वाची मात । केली वाताहात उचित काळें ॥३॥ तुका म्हणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मूळ स्तुति होतां ॥४॥

१७२१. नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चित्तीं नारायण सर्व भोगी ॥१॥ मातेचिये खांदीं बाळ नेणें शीण । भावना त्या भिन्न मुडाविया ॥२॥ नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं । लाउनी सरे अंगीं देवाचिया ॥३॥ तुका म्हणे नको पुसो वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥४॥

१७२२. अवघी मिथ्या आटी । राम नाहीं जंव कंठीं ॥१॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥२॥ सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळ दंडे ॥३॥ तुका म्हणे आलें भागा । देउनि चिंती पांडुरंगा ॥४॥

१७२३. न सांगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥१॥ उगीच लागतील पाठी । होती रितींच हिंपुटीं ॥२॥ शिकविल्या गोष्टी । शिकोन धरितील पोटीं ॥३॥ तुका म्हणे शीण । होईल अनुभवावीण ॥४॥

१७२४. जाति विजातीची व्हावयासी भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥१॥ होणार तें घडो होणाराच्या गुणें । होईल नारायणें निर्मिलें तें ॥२॥ व्याघ्राचिया भूके वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥३॥ तुका म्हणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥४॥

१७२५. शाहाणियां पुरे येकचि वचन । इशारतीची खूण तेचि त्यासी ॥१॥ उपदेश असे बहुतां कारणें । घेतला तो मनें पाहिजे हा ॥२॥ फांसावेना तरी दुःख घेतें वाव । मग होतो जीव कासावीस ॥३॥ तुका म्हणे नको राग धरूं झोडा । नुघडितां पीडा होईल डोळे ॥४॥

१७२६. अभिनव सुख तरी या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥१॥ रूपाच्या आठवे दोन्हीही आपण । वियोगें तो क्षण होत नाहीं ॥२॥ पूजा तरी चित्तें कल्पते ब्रम्हांड । आहाच तो खंड येकदेसी ॥३॥ तुका म्हणे माझा अनुभव यापरी । डोई पायांवरी ठेवीतसे ॥४॥

१७२७. नटनाट्य तुम्हीं केलें याचीसाठीं । कवतुकें दृष्टि नित्रवावी ॥१॥ नाहीं तरी काय कळलेंचि आहे । वाघ आणि गाय लांकडाची ॥२॥ अभेदचि असे मांडियेला खेळा । केल्या दीपकळा बहु येती ॥३॥ तुका म्हणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरी ते ॥४॥

१७२८. रवीचा प्रकाश । तोचि निशी घडे नाश । झाल्या बहुत्रस । तरी त्या काय दीपिका ॥१॥ आतां हाची वसो जीवीं । माझे अंतरीं गोसावी । होऊं येती ठावीं । काय वर्मे त्याच्यानें ॥२॥ सर्वे असतां धणी । आड येऊं न शके कोण्ही । नलगे विनवणी । पृथकाची करावी ॥३॥ जन्माचिया गती । येणें अवघ्या खुंटती । कारण तें प्रीति । तुका म्हणे जवळी ॥४॥

१७२९. ऐसें सांडोनियां धुरे । केविलवाणे दिसा कां रे । कामें ऊर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥१॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभीमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥२॥ नलगे पुमात्री चाकरी । कोन्ही वकील या घरीं । त्याचा तोचि करी । पारपत्य सकळां ॥३॥ नाहीं आड-काठी । तुका म्हणे जातां भेटी । न बोलतां मीठी । उगीच पाईं घालावी ॥४॥

१७३०. उपकारी असे आरोनी उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥१॥ लाभावरी घ्यावें सांपडलें काम । आपुला तो श्रम न विचारी ॥२॥ जीवा ऐसे देखे आणिका जीवासी । निखिळचि रासी गुणांचीच ॥३॥ तुका म्हणे देव तयाचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥४॥

१७३१. कोण्या पुण्यें त्यांचा होईन सेवक । जिहीं द्वंद्वादिक दुरावलें ॥१॥ ऐसी वर्मे मज दावीं नारायणा । अंतरींच्या खुणा प्रगटोनी ॥२॥ बहु अवघड असे संतभेटी । तरी जगजेटी करुणा केली ॥३॥ तुका म्हणे मग नये वृत्तिवरी । सुखाचे सेजारीं पहुडईन ॥४॥

१७३२. क्षणक्षणां सांभाळितो । साक्षी होतों आपुला ॥१॥ न घडावी पाईं तुटी । मनें मीठी घातली ॥२॥ विचारतो वचना आधीं । धरुनी शुद्धी ठेविली ॥३॥ तुका म्हणे मागें भ्यालों । तरी झालों जागृत ॥४॥

१७३३. आणोनियां मना । अवघ्या धांडोळील्या खुणा । देखिला

तो राणा । पंढरपूर निवासि ॥१॥ यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वायां जाय । देखिले ते पाय । सम जीवीं राहाती ॥२॥ तो देखावा हा विश्व । चिंतनेंचि कार्य सिद्ध । आणिका संबंध । नाहीं पर्वकाळासी ॥३॥ तुका म्हणे खेळ । होती क्षणेंचि निर्मळ । जाऊनीयां मळ । वाळवंटीं नाचती ॥४॥

१७३४. धरितां पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें ॥१॥ वंदूं येती देव पदें । त्या आनंदें उत्साहे ॥२॥ नृत्यछंदें उडती रज । ते सहज चालतां ॥३॥ तुका म्हणे गरुडटके । वैष्णव निके संभ्रम ॥४॥

१७३५. नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे । होताति बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥१॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥२॥ झालें भोजनसें दिसे । चिरा पडोनि ठेला इच्छे । घालीयाचे ऐसे । अंगा येते उद्गार ॥३॥ सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥४॥

१७३६. रुची रुची घेऊं गोडी । प्रेमसुखें झाली जोडी ॥१॥ काळ जाऊं नेदूं वायां । चिंतू विठोबाच्या पायां ॥२॥ करूं भजन भोजन । धणि घेऊं नारायण ॥३॥ तुका म्हणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥४॥

१७३७. वेळोवेळां हेचि सांगे । दान मागे जगासी ॥१॥ विठ्ठल हे मंगळवाणी । घेऊं धणी पंगती ॥२॥ वेंचतसे पळें पळ । केलें बळ पाहिजे ॥३॥ तुका म्हणे दुश्चित नका । राहों फुंका नाड हा ॥४॥

१७३८. आणिक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगासारिखें ॥१॥ दैवत ये भूमंडळीं । उद्धार कली पाववींतें ॥२॥ कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठाईं स्थळासी ॥३॥ अन्यत्रींचें तीर्थीं नासे । तीर्थीं वसे वज्रलेप ॥४॥ पांडुरंगींचे पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ॥५॥ ऐसें हरे गिरिजेप्रती । गुह्य स्थिती सांगितली ॥६॥ तुका म्हणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ॥७॥

१७३९. पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥१॥ नव्हती हे आहाच बोल । मांकळे फोल कवित्व ॥२॥ भावे घ्या रे भावे घ्या रे । येकदां जा रे पंढरिये ॥३॥ भाग्य आलेति मनुष्य देहा । तो हा पाहा विठ्ठल ॥४॥ पाप पुण्य करी झाडा । जाईल पीडा जन्माची ॥५॥ घ्यावी

हातीं टाळ दिंडी । गावें तोंडीं गुणवाद ॥६॥ तुका म्हणे घटपटा । नलगे वाटा शोधाव्या ॥७॥

१७४०. कर्मधर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥१॥ भलत्या काळें नामावळी ॥ सुलभ भोळीं भाविकां ॥२॥ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तया वैष्णवां ॥३॥ तुका म्हणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥४॥

१७४१. पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविकां ॥१॥ पाचारिल्या सरिसों पावे । ऐसी सवे बराडी ॥२॥ शुष्क काष्ठीं गुरगुरी । लाज हरि न धरितां ॥३॥ तुका म्हणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं ॥४॥

१७४२. बहुत सोसिलें मागें न कळतां । पुढती काय आतां अंध व्हावें ॥१॥ येकाचिये अंगीं ठेवावें लावून । नये भिन्न भिन्न चांचपडों ॥२॥ कोण होईल तो ब्रह्मांड चाळक । आपणचि हाक देईल हाके ॥३॥ तुका म्हणे दिल्ही चेतउनी सुणी । कौतुकावांचूनी नाहीं छळ ॥४॥

१७४३. आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसे दिल्हे साचें करुनियां ॥१॥ दुजियासी तंव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्ष येथें ॥२॥ येकीं अनेकत्व अनेकीं येकत्व । प्रकृति स्वभाव प्रमाणेचि ॥३॥ तुका म्हणे करूं उगऊं जाणसी । कुशळ येविशीं तुम्ही देवा ॥४॥

१७४४. अस्त नाहीं आतां येकाचि मोहरा । पासूनी अंधारा दुरी झालों ॥१॥ साक्षित्वें या आलों गुणाचा देखणा । करी नारायणा तरी खरें ॥२॥ आठव विसरूं पडियेला मागें । आलें तेचि भागें यत्न केले ॥३॥ तुका म्हणे माझा विनोद देवासी । आम्ही तुम्हां ऐसी दोनी नहों ॥४॥

१७४५. क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दूरी धरा ॥१॥ तैसे आम्ही नेणों पालटेचि कांहीं । त्यागिल्याचो नाहीं मागें चाड ॥२॥ प्रतिपादिता तूं शमविषमाचा । प्रसाद तो याचा पापपुण्य ॥३॥ तुका म्हणे तुम्हा नाना अवगणी । लागे संपादणी लटिक्याची ॥४॥

१७४६. सर्वरसीं मिनलें चित्त । अखंडित आनंदू ॥१॥ गोत पति विश्वंभरी । झाला हरी सोयरा ॥२॥ वोळखिते येका नांवें । इतर वाव खंडण ॥३॥ तुका म्हणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥४॥

१७४७. मी हें ऐसे काय जाती । अवघड कीर्ति पाहतां ॥१॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरे ॥२॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अंतर ॥३॥ तुका म्हणे मधें देव । घेतां ठाव दावील ॥४॥

१७४८. कवीश्वराचा तो आम्हांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडीती ॥१॥ दंभाची आवडी बहिरट आंधळे । शेवटासी काळें होईल तोंड ॥२॥ सोन्याचे शेजारीं तों लाखेची जतन । सतत ते गुण जैसे तैसे ॥३॥ सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका म्हणे गोवीं पावती हीं ॥४॥

१७४९. वाढलिया मान न मानावी निश्चिती । भूतांचीया प्रीती भूतपण ॥१॥ म्हणवोनि मना लावावी कांचणी । इंद्रियाचे झणी वाढी भरे ॥२॥ येका येकपणें येकाचीये अंगीं । लागे रंग रंगी मिळालीया ॥३॥ तुका म्हणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणाचा ॥४॥

१७५०. माया साक्षी आम्ही नेणों भीडभार । आप आणि पर नाहीं दोन्हीं ॥१॥ सत्याचियेसाठीं अवघाची भर । नावडे व्यापार तुटीचा तो ॥२॥ पोंभाळितां चेरे अंतरीचें दुःख । लासें फासें मुख उघडावें ॥३॥ तुका म्हणे नव्हे स्फूर्तीचा हाचि ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥४॥

१७५१. संतां आवडे तो काळाचाही काळ । समर्थाचे बाळ जेवीं समर्थ ॥१॥ परि सत्ता तेथें नाहीं येकाविण । मोहो पावे शिण ऐसे राखे ॥२॥ केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखे दुसरें नासा मुळ ॥३॥ तुका म्हणे मुख्य कल्पतरू छाया । काय नाहीं दया तये ठाईं ॥४॥

१७५२. संतांच्या धिःकारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परी ॥१॥ कूळ आणि रूप वायां संवसार । गेला भरतार मोकलीतां ॥२॥ मूळ राखे तयो फळ काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणे ॥३॥ तुका म्हणे सायास तो येके ठाईं । दीप हातीं तई अवघें बरें ॥४॥

१७५३. बोले मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासेंसी सांग कार्यसिद्धि ॥१॥ नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कइवाड तोंचिवरि ॥२॥ दोरें चिरा कापे पडिला कांचणी । अभ्यास सेवनीं विष पडे ॥३॥ तुका म्हणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव येकायेकीं ॥४॥

१७५४. अमर आह्मां अमर आह्मां । खरें कीं पाहा खोटें हें ॥१॥ न म्हणा देह माझा ऐसा । मग भरवसा कळेल ॥२॥ कैंचा धाक कैंचा धाक । सकळीक हे आपुले ॥३॥ देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥४॥

१७५५. काम नाहीं काम नाहीं । झालों पाहीं रिकामा ॥१॥ फावल्या त्या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनी ॥२॥ नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विव्हळतसे ॥३॥ येकायेकीं येकायेकीं । तुका लोकीं निराळा ॥४॥

१७५६. हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कळिवरा पाठी ॥१॥ नेउनी निजविलें स्मशानीं । माणसें जाळित टाकणीं ॥२॥ काढिलें तें वोढे । मागिल उपचाराच्या पुढें ॥३॥ नाहीं वाटों आला भेव । सुखदुःख भोगिता देव ॥४॥ याचसाठीं हें निर्वाण । केलें कसियेलें मन ॥५॥ तुका म्हणे अनुभव खरा । नाहीं तरी शास्त्र होय चोरा ॥६॥

१७५७. कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥१॥ प्रेमें छंदें नाचे डोले । हारपले देहभाव ॥२॥ येकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ॥३॥ तुका म्हणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥४॥

१७५८. न बोलसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥१॥ येका तुमच्या नामाविण । अवघा शीण कळतसे ॥२॥ संकल्पासी वोढी मन । पापपुण्य सर्वांचि ॥३॥ तुका म्हणे नारायणीं । पावो वाणी विसावा ॥४॥

१७५९. प्रारब्धा हातीं जन । सुख शीण पावतसे ॥१॥ करितां घायाळाचा संग । अंगें अंग माखावें ॥२॥ अविसा अंगें पीडा वसे । त्यागें आसें बहु सुख ॥३॥ तुका म्हणे जीव भ्याला । अवघा आला बाहेरी ॥४॥

१७६०. आशा ते करविते बुद्धीचा लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥१॥ आपला आपण करावा विचार । प्रसन्न तें सार मन गोही ॥२॥ नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । होतें तें निर्मळ शुद्ध बुद्ध ॥३॥ अंधळ्यानें नये देखण्याची चाली । चाले ऐसी बोली तुका बोले ॥४॥

१७६१. जळो आतां नांवरूप । माझें पाप गांठीचें ॥१॥ संतांचिया चरणरजें । उतरूं वोझें मातीचें ॥२॥ लटिक्याचा अभिमान । होता शीण पावत ॥३॥ तुका म्हणे अरूपीचें । सुख साचें निनांवें ॥४॥

१७६२. निंदा स्तुति करी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥१॥ जटा राखी विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥२॥ शृंगारिलें मढें । जीवावीण जैसें कुडें ॥३॥ तुका म्हणे रागे । भलते चावळे वाउगें ॥४॥

१७६३. भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसीयासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥१॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पीला जीव । नाहीं तो हा व्यभीचार ॥२॥ जगा घालावें सांकडें । दीन होउनी बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि अविश्वास ॥३॥ काय न करि विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥४॥

१७६४. भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥१॥ योग भाग्य घरा येती । सर्व शक्ती चालत ॥२॥ पित्याचें जें का धन । पुत्रा कोण वंचिल ॥३॥ तुका म्हणे कडे बैसों । नेणें असों निर्भर ॥४॥

१७६५. कोरड्या गोष्टी चटक्या बोल । शिकल्या सांगे नाहीं बोल ॥१॥ कोण याचे मना आणी । ऐकों कानीं नायकोनी ॥२॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भुस शीण कांडिति ॥३॥ तुका म्हणे आपुल्या मति । काय रीतीं पोकळ ॥४॥

१७६६. नव्हातियाचा सोस होता । झाडों आतां पदर ॥१॥ देखणें तें देखियेलें । आतां भलें साक्षित्वें ॥२॥ लाभ कळों आली हानी । राहों दोन्हीं निराळीं ॥३॥ तुका म्हणे येकायेकीं । हा कां लोकीं पसारा ॥४॥

१७६७. सोसें वाढे दोष । झाला न पालटे कस ॥१॥ ऐसें बरवें वचन । करिता तें नारायण ॥२॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमाचि हा उरे श्रमे ॥३॥ सुख देते शांति । तुका म्हणे धरितां चित्तीं ॥४॥

१७६८. काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम । उचिताचे धर्म । भागा आलें तें करूं ॥१॥ देईन हाका नारायणा । ते तों नाकळे बंधना । पंढरिचा राणा । आइकोनि धांवेल ॥२॥ सातांपांचांचें गाठलें । प्रारब्धें आकारिलें । आतां हें संचलें । असो भोगा सांभाळी ॥३॥ फावलीं ते बरवी संधी । सावधान करूं बुद्धि । तुका म्हणे मधीं । कोठें नेघे विसावा ॥४॥

१७६९. नलगे देशकाळ । मंत्र विधानें सकळ । मनेंचि निश्चळ ।

करुनि करुणा भाकावी ॥१॥ येतो बैसलीया ठायां । आमनें व्यापी देव-राया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥२॥ कल्पनेचा साक्षी । तरि आदरें लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटा ॥३॥ घेणें तरि भाव । लक्षी दासाचा उपाव । तुका म्हणे जीव । जीवीं मिळवी अनंत ॥४॥

१७७०. नाहीं आलें भक्तीसुख अनुभवा । तों मी ज्ञान देवा काय करूं ॥१॥ नसावें जी तुम्ही कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥२॥ येकायेकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥३॥ तुका म्हणे वाचा गुर्गी लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥४॥

१७७१. मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ॥१॥ संत साक्षी या वचना । त्यासि ठाऊकीया खुणा ॥२॥ होईन धरणेंकरी । मग मी रिघों नेदी बाहेरी ॥३॥ तुका म्हणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥४॥

१७७२. जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥१॥ येर काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥२॥ पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ॥३॥ तुका म्हणे जावें । संतकीर्तनीं बरवें ॥४॥

१७७३. मिटवण्याचे धणी । तुम्ही व्यवसाय जनीं ॥१॥ कोण पडिये लिगाडीं । केली तैसी उगवा कोडीं ॥२॥ केलें सांगितलें काम । दिल्हे पाळुनीयां धर्म ॥३॥ तुका म्हणे आतां । असो तुमचें तुम्हां माथां ॥४॥

१७७४. समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥१॥ पूजा होते मुक्ता-फळीं । रस वोविया मंगळी ॥२॥ धार अखंडित । वोघ चालीयेला नित्य ॥३॥ पूर्णाहुती जीवें । तुका घेउनी ठेला भावें ॥४॥

१७७५. अवघाचि आकार ग्रासीयेला काळें । येकचि निराळें हरिचें नाम ॥१॥ धरूनी राहिलों अविनाश कंठीं । जीवन हें पोटीं सांठवीलें ॥२॥ शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥३॥ तुका म्हणे आतां उपाधीच्या नांवें । आणियेला देवें वीट मज ॥४॥

१७७६. बोलणेंचि नाहीं । आतां देवावीण कांहीं ॥१॥ येकसरें केला नेम । देवा दिल्हे क्रोध काम ॥२॥ पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टि धाय ॥३॥ तुका म्हणे मनें । हेचि संकल्प वाहाणें ॥४॥

१७७७. येथूनियां ठाव । अवघे लक्षयाचे भाव ॥१॥ उंच देवाचे चरण । तेथें झालें अधिष्ठान ॥२॥ आघाता वेगळा । असे ठाव हा निराळा ॥३॥ तुका म्हणे स्थळ । धरूनी राहिलों अचळ ॥४॥

१७७८. भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट । संचिताची वाट । वाटा होऊनी फांकती ॥१॥ भोगा ऐसे ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव । द्रष्टा येथें देव । विरहीत संकल्पा ॥२॥ दिल्हा पाडूनियां धडा । पापपुण्याचा निवाडा । आचरती गोडा । आचरणें आपुल्या ॥३॥ तुका म्हणे पराधीनें । झाली वोढलीया रिणें । तुटती बंधनें । जरि या देवा आळविती ॥४॥

१७७९ आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहों भाव तुझे पाईं ॥१॥ काय चाले तुम्हीं बांधिलें दातारा । वाहिलीया भारा उसंतितों ॥२॥ शरीर तें करी शरीराचा धर्म । नको देऊं वर्म चुकों मना ॥३॥ चळण फिरवी ठाव बहुवस । न पडो आळस चिंतनाचा ॥४॥ इंद्रियें करोत आपुला व्यापार । आवडीसी थार देईं पाईं ॥५॥ तुका म्हणे नको देऊं काळा हातीं । येतों काकुळती म्हणवोनी ॥६॥

१७८०. आम्हां अवघें भांडवल । येक विठ्ठल येकला ॥१॥ कायावाचामनोभावें । येथें जीवें वेंचलों ॥२॥ परी तें कांहीं नेणें दुजें । तत्त्वबीज पाउलें ॥३॥ तुका म्हणे संतसंगें । येणें रंगें रंगलों ॥४॥

१७८१. साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥१॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कलेवर । संचिताची थार मोडूनियां ॥२॥ महत्त्वाचे ठाईं भोगावी अप्रतिष्ठा । विटंबावें नष्टा पंचभूतां ॥३॥ तुका म्हणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥४॥

१७८२. निर्वैर होणें साधनाचें मूळ । येर तें विल्हाळ सांडीं मांडीं ॥१॥ नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥२॥ त्यागा नांव तरी निर्विषय वासना । कार्याकारणा पुरते विधि ॥३॥ तुका म्हणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेंसीं ॥४॥

१७८३. पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं या विषयांचे ॥१॥ ठेवोनियां लोभीं लोभ । झाला क्षोभ आत्मत्वीं ॥२॥ केला आणिका वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥३॥ तुका म्हणे मोठा घात । वाताहात हा देह ॥४॥

१७८४. कां जी धरीयेलें नाम । तुम्ही असोनी निष्काम ॥१॥ कोणा सांगतसां ज्ञान । ठकाठकींचें लक्षण ॥२॥ आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥३॥ तुका म्हणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥४॥

१७८५. खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥१॥ ऐसे फुकाचे उपाय । सांडोनियां वायां जाय ॥२॥ परउपकार । येका वचनाचा फार ॥३॥ तुका म्हणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥४॥

१७८६. दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥१॥ पावे धांवोनिया घरा । राहे धरूनियां थारा ॥२॥ कीर्तनाचे वाटे । बराडियां ऐसा लोटे ॥३॥ तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥४॥

१७८७. शिष्याची जो नेघे सेवा । मानि देवासारिखें ॥१॥ त्याचा फळे उपदेश । आणिका दोष उफराटे ॥२॥ त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देह-भावें ॥३॥ तुका म्हणे सत्य सांगें । येवोत रागें येतिल ॥४॥

१७८८. माझीं मेलीं बहुवरी । तूं कां जैसा तैसा हरी ॥१॥ विठो कैसा वांचलासी । आतां सांग मजपासीं ॥२॥ तुज देखतांचि माझा । बाप गेला आजा पणजा ॥३॥ आम्हां लागलेंसे पाठी । बालत्व तारुण्य काठी ॥४॥ ॥५॥ तुज फावलें ते मागे । कोणी नसतां वादी लागें ॥६॥ तुका म्हणे तुझ्या अंगीं । मज देखिल लागलीं अवघीं ॥७॥

१७८९. आणिक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥१॥ विठ्ठला वांचूनि आणिक जे वाणी । नायकें मी कानीं आपुलीया ॥२॥ समाधानासाठीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥३॥ जिवाहुनी मज तेंचि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥४॥ तुका म्हणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नाहीं बोला ॥५॥

१७९०. आशा हे समूळ खणोनि काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥१॥ नाहीं तरी सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥२॥

आशा मारुनीयां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनी ॥३॥ तुका म्हणे जरी योगाची तांतडी । आशेची बीबुडी करी आधीं ॥४॥

१७९१. निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चूकों नये ॥१॥ निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकाची ॥२॥ तुका म्हणे ऐसा कोणे उपेक्षीला । नाहीं आयकीला ऐसा कोणी ॥३॥

१७९२. नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ॥१॥ सोडवील माझा स्वामी निश्चयेंसीं । प्रतिज्ञा हे दासीं केली आम्हीं ॥२॥ गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥३॥ तुका म्हणे कडु वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥४॥

१७९३. किती या काळाचा सोसावा बोळसा । लागला सरिसा पाठोपाठीं ॥१॥ लक्ष चौऱ्यासीची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥२॥ उपजल्या पिंडा मरण सांगातें । मरतें उपजतें सवेंचि तें ॥३॥ तुका म्हणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलीया ॥४॥

१७९४. नाम म्हणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करिसी काई । बधिर व्हावें त्याचे ठाईं । दुष्ट वचन वाक्य तें ॥१॥ जयाचें राहिलें मानसीं । तेंचि पावले तयासी । चांचपडतां मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ॥२॥ नवविधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद । जन्मा आले निंद्य । सुकरयाति संसारा ॥३॥ काय सांगों वेळोवेळां । आठव नाहीं चांडाळा । नामासाठीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥४॥ आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं । फोडोनियां पोटीं । वेद चारी काढिले ॥५॥ जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली । आणिकही उद्धरिलीं । पातकी महादोषी ॥६॥ जे जे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखे हातीं विषाचे ॥७॥ काय सांगों ऐसे किती । तुका म्हणे नामख्याती । नरकाप्रति जाती । निषेधिती कितियेक ॥८॥

१७९५. गासी तरी येक विठ्ठलची गाई । नाहीं तरि ठाई राहें उगा ॥१॥ अद्वैतीं तो नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा सीण करिसी वायां ॥२॥ तुका म्हणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥३॥

१७९६. जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥१॥ शत्रु तो म्यां केला न म्हणे आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥२॥ जयासी नावडे विठोबाचें नाम । तो जाणा अधम तुका म्हणे ॥३॥

१७९७. आम्हांसी तों नाहीं आणिक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥१॥ घालुनियां कास करितो कैवाड । वागों नेदी आड कळिकाळासी ॥२॥ अबद्ध वांकडे जैसे तैशापरी । वाचे हरि हरि उच्चारावें ॥३॥ तुका म्हणे आम्हां सांपडलें निज । सकळही बीज पुराणांचें ॥४॥

१७९८. जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण ते मुक्ति पाखांड्याची ॥१॥ पिंडाच्या पोषकीं नागविले जन । लटिकें पुराण केले वेद ॥२॥ मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाहीं पुन्हा ॥३॥ तुका म्हणे पाठीं उडति यमदंड । पापपुण्य लंड न विचारीं ॥४॥

१७९९. भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गती आणीकासी ॥१॥ जाणोनि नेणते झाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥२॥ अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढवावया जगीं प्रेमसुख ॥३॥ टाळघोळ कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥४॥ तुका म्हणे हें तों आहे तया ठावें । जिहीं येकाभावें जाणीतले ॥५॥

१८००. आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासलीया पूज्य होईजे ते ॥१॥ अधीरासी नाहीं चालों जातां मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचें ॥२॥ तुका म्हणे नाहीं आणिकासी बोल । वायां जाय मोल बुद्धीपासीं ॥३॥

१८०१. चिंतनें सरे तो धन्य धन्य काळ । सकळ मंगळ मंगळाचे ॥१॥ संवसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ॥२॥ जन वन ऐशा कृपेच्या सागरें । दाटला आभारें पांडुरंग ॥३॥ तुका म्हणे देवाभक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी येक ॥४॥

१८०२. मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोडीस ॥१॥ भक्तीचे सोहळे होतील जिवासी । नवल तेविशीं पुरविता ॥२॥ ज्याचें त्यासी देणें कोणतें उचित । मानोनियां हित घेतों सुखें ॥३॥ तुका म्हणे सुखें देई संवसार । आवडीसी थार करीं माझें ॥४॥

१८०३. चिंतनासी नलगे वेळ । सर्वकाळ करावें ॥१॥ सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥२॥ पढिये सर्वोत्तमा भाव । येर वाव पसारा ॥३॥ ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥४॥

१८०४. अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तोचि बाधी ॥१॥ बैसलिये ठाईं आठवीन पाय । पाहेन तो ठाय तुझा देवा ॥२॥ अखंड ते खंडें संकल्प विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥३॥ तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे । राहो ऐसे दशे सुखरूप ॥४॥

१८०५. येकाचिया घाव्या टोके । येका फिके उपचार ॥१॥ ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥२॥ येकाचें तें उच्छिष्ट खाय । येका जाय ठकोनी । तुका म्हणे बहु सोपें । बहु रूपें अनंत ॥३॥

१८०६. कोठें नाहीं अधिकार । गेले नर वायां ते ॥१॥ ऐका हें सोपें वर्म । नलगे श्रम चिंतना ॥२॥ मृत्यूचिये अंगीं छाये । उपायाचि खुंटता ॥३॥ तुका म्हणे अवघे जन । येथें मन असों द्या ॥४॥

१८०७. ज्यानें ज्यानें जैसें घ्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥१॥ सगुण-निर्गुणांचा ठाव । विटेपाव धरियेले ॥२॥ अवघें साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥३॥ तुका म्हणे जें जें करी । तें तें हरि भोगिता ॥४॥

१८०८. आचरती कर्में । तेथें कळे धर्माधर्में ॥१॥ खेळे गोवळियां सवें । करिती ते त्यांचें साहावें ॥२॥ यज्ञमुखें घांस । मंत्रपूजेसी उदास ॥३॥ तुका म्हणे चोरी । योगीयांहीं सवें करी ॥४॥

१८०९. नामाचे पवाडे बोलती पुराणें । होउनी कीर्तनें तूंचि ठेलें ॥१॥ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ॥२॥ आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम येक तुझें ॥३॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥४॥ परिक्षीती मृत्यू साता दिवसांचा । मुक्त झाला वाचा उच्चारितां ॥५॥ कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामाआधीं ॥६॥ सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं ॥७॥

१८१०. भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारी सर्वभावें ॥१॥ शिकल्या बोलाचा धरिसील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ॥२॥ हिरा परिस मोहरा आणिक पाषाण । नव्हे परि जन संता तैसी ॥३॥ सरिता बोहोळ गंगा सागरा समान । लेखी तयांहून अधम नाहीं ॥४॥ आणिक अमुप होती तारांगणें । रविशशीमानें लेखूं नये ॥५॥ तुका म्हणे नाहीं नम्रता ते अंगीं । नव्हे ते फिरंगी कठिण लोह ॥६॥

१८११. आणिक कांहीं मज नावडेचि मात । येका पंढरीनाथावांचुनियां ॥१॥ त्याचीच कथा आवडे कीर्तन । तें मज श्रवण गोड लागे ॥२॥ तुका म्हणे संत म्हणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनीं कांहीं ॥३॥

१८१२. ठेवा जाणीव गुंडून । येथें भावाचि प्रमाण ॥१॥ येक अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरिराज ॥२॥ तर्क वितर्कांसी । वाव नलगे सायासीं ॥३॥ तुका म्हणे भावेंविण । अवघा बोलती तो शीण ॥४॥

१८१३. येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥१॥ तोचि ध्यावा चित्तें । करुनी रितें कलेवर ॥२॥ षडऊर्मी हृद्यांत । याचा अंत पुरवुनी ॥३॥ तुका म्हणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥४॥

१८१४. मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहसंगीं लज्जा चिंता ॥१॥ सुख पात्र शांति धरूनि येकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥२॥ तुका म्हणे लागे थोडाचि विचार । परि हे प्रकार नागवीती ॥३॥

१८१५. कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणिक नाहीं ॥१॥ पावेल गौरव वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूताचे ॥२॥ शब्दज्ञानी येक आपुलाले मतें । सांगती वेदांत भिन्नभावें ॥३॥ तुका म्हणे येक भाव न धरीती । पडली हे माती त्यांचे तोंडीं ॥४॥

१८१६. देवा ऐकें हे विनंति । मज नको रे हे मुक्ति । तया इच्छा गति । हेंचि सुख आगळे ॥१॥ या वैष्णवांचें घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धि द्वारीं । कर जोडोनि तिष्ठती ॥२॥ नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नाश । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥३॥ तुझ्या

नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा । तुका म्हणे आम्हां । जन्म गोड यासाठीं ॥४॥

१८१७. न पूजीं आणिकां देवा न करी त्यांची सेवा । न मनीं या केशवावीण दुजें ॥१॥ काय उणें झालें मज तया पाईं । तें मी मागों काई कवणासी ॥२॥ आणिकांची कीर्ति नाईके न बोले । चाड या विठ्ठलेंवीण नाहीं ॥३॥ न पाहे लोचनीं श्रीमुखावांचुनी । पंढरी सांडोनी न वजे कोठें ॥४॥ न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास । नभीं संसारास येतां जातां ॥५॥ तुका म्हणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवावीण दुजें ॥६॥

१८१८ नव्हे खळवादी मताचि पुरता । सत्याचिये सत्ता उपदेश ॥१॥ साक्षत्वेसीं मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥२॥ नव्हे येकदेशी शब्द हा उरवता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥३॥ तुका विनवणी करी जाणतिया । बहुमतें वायां श्रमूं नये ॥४॥

१८१९. कथा करूनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नर्कवास ॥१॥ रौरव कुंभिपाक । भोगिती यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥२॥ असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ॥३॥ तुका म्हणे तया नरक न चुकती । सांपडल्या हातीं यमाचिया ॥४॥

१८२०. नायकावे कानीं तयांचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥१॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंवीण । दुःख पावे शीण श्रोता वक्ता ॥२॥ अहंब्रह्म म्हणोनि पाळीतसे पिंडा । बोलों नये भांडा तयासवें ॥३॥ वेदबाह्यलंड बोलतो पाखांड । त्याचें काळें तोंड संतामध्यें ॥४॥ तुका म्हणे खंडी देवभक्तपण । वरिष्ठ त्याहुनी श्वपच तो ॥५॥

१८२१. तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥१॥ तें आम्हीं देखीलें आपुले नयनीं । फिटलीं पारणीं डोळीयांचीं ॥२॥ जीवांचें जीवन सुखाचें शेजार । उभें कटीं कर ठेऊनियां ॥३॥ जगाचा जनिता कृपेचा सागर । दीनां लोभपर दुष्टां काळ ॥४॥ सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तोचि असे ॥५॥ तुका म्हणे नाहीं श्रुती आतुडलें । आम्हां सांपडलें गीतीं गातां ॥६॥

१८२२. वेद विहित तुम्ही आईको हो कर्म । बोलतों तीं वर्मे संतांपुढें ॥१॥ चारी वर्ण झाले येकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभागिलें ॥२॥ प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥३॥ आंबे बोरी वड बाभुळा चंदन । गुणागुणें भिन्न अग्नि येक ॥४॥ तुका म्हणे मन उन्मन जो होय । तोंवरी हे सोय विधि पाळी ॥५॥

१८२३. माझे मनोरथ पावविले सिद्धि । तईं पाईं बुद्धि स्थिरावली ॥१॥ समाधानें जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ॥२॥ त्रिविध तापाचें झालेंसें दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥३॥ महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगाअंगीं संग अखंडित ॥४॥ जीवनाचा झाला वोल्हावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावले ॥५॥ तुका म्हणे माप भरूं आलें शीगे । धारबोळ गंगे पूर वाहे ॥६॥

१८२४. कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद । आनंदीं आनंद वाढवावा ॥१॥ बहुतांच्या भाग्यें लागलें जहाज । येथें आतां काज लवलाहो ॥२॥ अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें आतां चुका न पाहिजे ॥३॥ तुका म्हणे जिन्हा श्रवणाचे द्वारें । माप भरा बरें शिगेवरी ॥४॥

१८२५. पापपुण्य सुखदुःखाचीं मंडळें । येक येका बळें धाव घेती ॥१॥ कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचविती काळ जीवाशी तो ॥२॥ स्वर्गाचिये भोगें सरला नरक । मागें पुढें येक येक दोन्ही ॥३॥ तुका म्हणे भय उपजलें मना । घेईं नारायणा कडिये मज ॥४॥

१८२६. वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥१॥ केला आतां अंगीकार । न मनी भार समर्थ ॥२॥ संसाराचा नाहीं पांग । देवें सांग सकळ ॥३॥ तुका म्हणे कीर्ति वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥४॥

१८२७. कथा करूनियां मोल ज्यापें घेती । तेहि दोघे जाती नरकामध्यें ॥१॥ ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंडित स्मरा रामराम ॥२॥ मधुरा वाणीच्या नका पडूं भरी । जाल यमपुरी भोगावया ॥३॥ तुका म्हणे करी ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥४॥

१८२८. गोड नांवें क्षीर । परी साकरेचा धीर ॥१॥ तैसें जाणा ब्रह्म-

ज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥२॥ रुचि नेदी अन्न । ज्यांत नसतां लवण ॥३॥ आंधळ्याचे श्रम । शिकविल्याचेंचि नाम ॥४॥ तुका म्हणे तारा । नाव तंबुऱ्याच्या सारा ॥५॥

१८२९. नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥१॥ हेंचि शूरत्वाचें अंग । हरि आणिला श्रीरंग ॥२॥ अवघा झाला पण । लवण सकळां कारण ॥३॥ तुका म्हणे पाणी । पातळपणें तळा आणी ॥४॥

१८३०. आपुल्या महिम्यानें । धातु परिसें केलें सोनें ॥१॥ तैसें न मनीं माझें आतां । गुण दोष पंढरिनाथा ॥२॥ गांवामागील वोहळ । गंगा न मनीं अमंगळ ॥३॥ तुका म्हणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥४॥

१८३१. आशाबद्ध वक्ता । भय श्रोतयांच्या चित्ता ॥१॥ गातो तेंही नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं द्यावें ॥२॥ झालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ॥३॥ उभयतां लोभी मन । वायां गेलें तें भजन ॥४॥ बहिरे मुके येके ठाईं । तैसे झालें तया दोहीं ॥५॥ माप आणि गोणी । तुका म्हणे रीतीं दोन्हीं ॥६॥

१८३२. तक्र शिष्या मान । दुग्धा म्हणे नारायण ॥१॥ ऐसीं ज्ञानाचीं डोंबडें । आशा विटंबिली मूढें ॥२॥ उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ॥३॥ रसनाशिस्नाचे अंकित । तुका म्हणे वदंळ स्फीत ॥४॥

१८३३. ब्रम्हचारी धर्म घोकावीं अक्षरें । आश्रमीं विचार षट्कर्में ॥१॥ वानप्रस्थ तरी संयोग वियोग । संन्यास तो त्याग संकल्पांचा ॥२॥ परमहंस तरी जाणे सहज वर्म । तेथें याति धर्म कुळ नाहीं ॥३॥ बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥४॥ तुका म्हणे कांहीं नाहीं नेमावीण । मोकळा तो शीण दुःख पावे ॥५॥

१८३४. आम्ही क्षेत्रींचे संन्यासी । देह भरित हृषीकेशी । नाहीं केली ऐसी । आशाकामवोहरी ॥१॥ आलें अयाचित आंगा । सहज तें आम्हां भागा । दाता पांडुरंगा । ऐसी करितां निश्चिति ॥२॥ दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडण । बंदीबंदाची कौपिन । बहिर्वास औटडें ॥३॥ काळें साधियेला काळ । मन करूनी निश्चळ । लौकिकीं विटाळ । धरुनि

असो येकांत ॥४॥ कार्यकारणाची चाली । वाचा वाचत्वें नेमिली । येका नेमें चाली । स्वरूपींच राहाणें ॥५॥ नव्हे वेषधारी । तुका आहाच वरीवरी । आहे तैसीं बरीं । खंडें निवडी वेदांचीं ॥६॥

१८३५. निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ॥१॥ कोठेंहि चित्तासी नसावें बंधन । हृदईं नारायण सांठवावा ॥२॥ नये बोलों फार बेसों जनामधीं । सावधान बुद्धि इंद्रियदमीं ॥३॥ तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणाची गोवी उगवोनी ॥४॥

१८३६. याचि नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥१॥ मना अंगीं पुण्यपाप । अशुभ उत्तम संकल्प ॥२॥ बीजा ऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥३॥ तुका म्हणे चित्त । शुद्ध करावें हें हित ॥४॥

१८३७. कुशळ वक्ता नव्हे जाणीव तो श्रोता । राहे भाव चित्ता धरूनियां ॥१॥ धन्य तोचि जगीं धन्य तोचि जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥२॥ न धोवी तोंड न करी आंघोळी । जपे सदाकाळीं रामनाम ॥३॥ जप तप ध्यान नेणें याग युक्ति । कृपाळू जो भूतीं दयावंत ॥४॥ तुका म्हणे होय जाणूनी नेणता । आवडे अनंता जिवाहूनी ॥५॥

१८३८. काळाची ये सत्ता ते नाहीं घटिका । पंढरिनायका आठवितां ॥१॥ सदा काळ गणना करी आयुष्याची । कथेच्या वेळेची आज्ञा नाहीं ॥२॥ या कारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे त्रिजगतीं थोरवाट ॥३॥ तुका म्हणे जन्मा आलियाचें फळ । स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥४॥

१८३९. घरोघरीं झाले कवी । नेणें प्रसादाची चवी ॥१॥ लंडा भूषणाची चाड । पुढें न विचारी नाड ॥२॥ काढावें आईतें । तेंचि जोडावें स्वहितें ॥३॥ तुका म्हणे कळे । आहाच झांकतील डोळे ॥४॥

१८४०. नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्तांचें गुरुपुत्रा ॥१॥ म्हणवूनी बरें धरितां येकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥२॥ नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥३॥ तुका म्हणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिये दृष्टीं पाप वाढे ॥४॥

१८४१. म्हातारपणीं थेटे पडसें खोकला । हात कपाळाला लाउनि

बैसे ॥१॥ खोबऱ्याची वाटी झालें असे मूख । गळतसे नाक श्लेष्मापूरीं ॥२॥ बोलों जातां शब्द नयेचि हा नीट । गडगडी कंठ कफ भारी ॥३॥ शेजारी म्हणती मरेना कां मेला । आणिला कंटाळा येणें आम्हां ॥४॥ तुका म्हणे आतां सांडोनियां काम । स्मरा रामराम क्षणक्षणा ॥५॥

१८४२. बाळपणीं ऐशीं वरुषें गेलीं बारा । खेळतां या पोरा नानामतें ॥१॥ विटीदांडू चेंडू लगोऱ्या वाघोडीं । चंपे पेंड खडी येकी बेकी ॥२॥ हमामा हुंबरी पकव्याच्या बारे । खेळे जंगी भोंवरे चुंबाचुंबी ॥३॥ सेलडेरा आणि निसरभोवंडी । उचली बाळे धोंडी अंगबळें ॥४॥ तुका म्हणे ऐसें बाळपण गेलें । मग तारुण्य आलें गर्वमूळ ॥५॥

१८४३. तारुण्याचे मदें न मानी कोणासी । सदा मुसमुसी घुळी जैसा ॥१॥ आटोनी वेटोनी बांधला मुंडासा । फिरतसे म्हैसा जनामध्यें ॥२॥ हातीं दीड पान वरतिच मान । नाहीं तो सन्मान भलीयासी ॥३॥ श्वानाचिये परी हिंडे दारोदारीं । पाहे परनारी पापदृष्टी ॥४॥ तुका म्हणे ऐसा थोर हा गयाळी । करितां टवाळी जन्म गेला ॥५॥

१८४४. काय माझें नेती वाईट म्हणोन । करूं समाधान कशासाटीं ॥१॥ काय मज लोक नेती परलोका । जातां कोणीयेका निवारील ॥२॥ न म्हणे कोणासी उत्तम वाईट । सुखें माझी कूट खावो मागें ॥३॥ सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥४॥ तुका म्हणे माझें सर्वहि साधन । नाम संकीर्तन विठोबाचें ॥५॥

१८४५. जैसी तैसी तरी । शरणांगतें तुझी हरि ॥१॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ॥२॥ शुद्ध नाहीं चित्त । परि म्हणवीतों भक्त ॥३॥ मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥४॥

१८४६. नाशिवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे राम ॥१॥ नामेंचि तारिलें कोटयानें कोटी । नामें हें वैकुंठीं बैसविलें ॥२॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुम्ही मनीं आठवाना ॥३॥ तुका म्हणे नाम वेदासी आगळें । तें दिल्हें गोपाळें फुकासाठीं ॥४॥

१८४७. आळविती बाळें । माते तें सुख आगळें ॥१॥ द्यावें आवडी

भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥२॥ लेवऊनि अळंकार । दृष्टि करावी सादर ॥३॥ आपुलीया पदीं । बैसऊनी कोडे बंदी ॥४॥ नेदि लागो दिठी । उचलोनी लावी कंठीं ॥५॥ तुका म्हणे लाभा । वरि घ्यावें पद्मनाभा ॥६॥

१८४८. तप तीर्थ दान व्रत आचरण । गातां हरिगुण वारूं नये ॥१॥ कोटिकुळें त्याचीं वाटुळीं पाहातीं । त्यां तया घडती ब्रह्महत्या ॥२॥ आपुलीया पापें न सुटे सायासें । कोणा काळें ऐसें निस्तरेल ॥३॥ व्हावें साह्य तया न घालावें भय । फुकासाठीं पाहे लाभ घात ॥४॥ तुका म्हणे हित माना या वचना । सुख दुःख जाणा साधे फुका ॥५॥

१८४९. देवासाठीं जाणा तयासीच आटी । असेल ज्या गांठीं पुण्यरासी ॥१॥ निर्बळा पाठवी बळें वाराणसी । मेला आला त्यासी अर्ध-पुण्य ॥२॥ कथे निद्रा भंग करावा भोजनीं । तया सुखा धणी पार नाहीं ॥३॥ यागीं ऋण घ्यावें द्यावें सुख लाही । बुडतां चिंता नाहीं उभयतां ॥४॥ तुका म्हणे वर्म जाणोनी करावें । येक न घालावें येकावरी ॥५॥

१८५०. अग्निमाजी पडे धातु । लीन होउनि राहे आंतु । होय शुद्ध न पवे घातु । पटतंतु प्रमाण ॥१॥ बाह्य रंगाचें कारण । मिथ्या औषेंची भूषण । गर्व तांठा हें अज्ञान । मरण सर्वे वाहातसे ॥२॥ पुरें मातलीया नदी । लव्हाळा नांदे जीवनसंधी । वृक्ष उन्मळोनी भेदी । परि तो कधीं भंगेना ॥३॥ हस्ती परदळ जो भंगी । तया पाईं न मरे मुंगी । कोण जाय संगीं । पानोवाणी तयाच्या ॥४॥ पिटितां घणे वरि सैरा । तया पोटीं राहे हिरा । तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनी ॥५॥ लीन दीन हेंचि सार । भव उतरावया पार । बुडे माथां भार । तुका म्हणे वाहोनि ॥६॥

१८५१. आम्ही वीर झुंजार । करूं जमदाढे मार । थापटिले भार । मोड झाला दोषांचा ॥१॥ झाला हाहाकार । आले अंकीत झुंजार । शंखचक्रांचे श्रृंगार । कंठीं हार तुळसीचे ॥२॥ रामनामांकित बाण । गोपि लाविला चंदन । झळकती निशाण । गरुडटके पताका ॥३॥ तुका म्हणे काळ । झालों जिंकोनी निश्चळ । पावला सकळ । भोग आम्हां आमुचा ॥४॥

१८५२. आशा बद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्व जनां

॥१॥ आहे तें आधीन आपुलें हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥२॥ जाणतिया पाठीं लागला उपाध्र । नेणता सावध भोजनासी ॥३॥ तुका म्हणे भय बांधिलें गांठीं । चोर लागे पाठीं धुम तया ॥४॥

१८५३. आणिकांसि तारी ऐसा नाहीं कोणी । धड ते नासुनि भलता टाकी ॥१॥ सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं ॥२॥ बोल शूद्ध काळीं काळें जिरें बीज । कैंचे लागे निज हातीं तेथें ॥३॥ येक गहू करीती अनेक प्रकार । सांजा दिवशीं क्षीर धुगरीया ॥४॥ तुका म्हणे विषा रुचि येका हातीं । पाधाणी नासीती नवनीत ॥५॥

१८५४. वाटे या जनाचें थोर हें आश्चर्य । न करिती विचार का हिताचा ॥१॥ कोण दम ऐसा आहे याचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥२॥ काय मानुनीयां राहिले निश्चितीं । काय जाव देती यमदूतां ॥३॥ कां हें विसरली मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥४॥ काय हातीं नाहीं करिल तयासी । काय झालें यासी कोण जाणे ॥५॥ कां हे नाठवीती देवकीनंदना । सुटाया बंधना पासुनीयां ॥६॥ काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥७॥ तुका म्हणे कांहीं भोगीतील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥८॥

१८५५. काय येका झालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ॥१॥ देखातिल डोळां अईकती कानीं । बोलिलें पुराणी तेंचि ठावें ॥२॥ काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥३॥ कां हें कळों नये आपुलें आपणा । बालत्व तारुण्या वृद्ध दशा ॥४॥ कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा आलें ॥५॥ कां हें जन्म वायां घातलें उत्तम । कां हें रामराम न म्हणती ॥६॥ काय भूली यासी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥७॥ काय करिती हें बांधलिया काळें । तुका म्हणे बळें वज्रपाशीं ॥८॥

१८५६. झुंजार ते येक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥१॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्या मनीं बैसलासे ॥२॥

उर्ध्व पुंड्र भाळ कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें ॥३॥ तुका म्हणे शंखचक्राचे शृंगार । नामामृत सार मुखामाजी ॥४॥

१८५७. जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छीतसे ॥१॥ संचितासी जाय मिळोनियां खोडी । पतनासी जोडी वरी हाव ॥२॥ बांधलें गांठीं तें लागतें भोगावें । ऐसीयासी देवें काय कीजे ॥३॥ तुका म्हणे जया गांवा जाणें जया । पुसोनियां तया वाट चाले ॥४॥

१८५८. मानी भक्तांचे उपकार । रुणिया म्हणवी निरंतर । केला निर्गुणी आकार । कीर्ति मुखें वर्णितां ॥१॥ म्हणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा । झाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडाया ॥२॥ अंबऋषीकारणें । जन्म घेतले नारायणें । येवढें भक्तीचें लाहाणें । दास्य करी दासांचें ॥३॥ म्हणीये करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिचे द्वारीं । भक्तीचा आभारी । रींग न पुरे जावया ॥४॥ अर्जुनाचे रथवारू । ते वागवी सर्वेश्वरू । येवढे भक्तीचे उपकारू । मागें मागें हिंडतसे ॥५॥ पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलें विटेवरी । नवजे कट करीं । धरुनि तेथें राहिला ॥६॥ भाव भक्तीचा अंकित । नाम साजे दीनानाथ । म्हणोनि राहिला निवांत । तुका चरण धरून॥७॥

१८५९. सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥१॥ त्याचा आम्हांसी कांटाळा । पाहों नावडती डोळां ॥२॥ रिद्धिसिद्धीचे साधक । वाचासिद्ध होती येक ॥३॥ तुका म्हणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥४॥

१८६०. ठाकलोंसें द्वारीं । उभे याचक भिकारी ॥१॥ मज भीक कांहीं देवा । प्रेम भातुकें पाठवा ॥२॥ याचकाचा भार । नये घेऊं वेरझार ॥३॥ तुका म्हणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥४॥

१८६१. ऐसें कां झालें तें मजही न कळे । कीर्तनाचे रळेपळे जगीं ॥१॥ कैसें तुम्हां देवा वाटतसें बरें । संतांचीं उत्तरें लाजवीलीं ॥२॥ भावीका कंटक करिताति पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥३॥ तुका म्हणे नाम निर्वाणिचा बाण । याचा अभिमान नाहीं तुम्हां ॥४॥

१८६२. तुम्ही बैसलेती निर्गुणाचे खोळे । आम्हां कां हे डोळे कान दिल्हे ॥१॥ नाइकावे तुझी अपकीर्ति देवा । अव्हेरिली सेवा न देखवे ॥२॥

आपुले पोटीं तों राखीयेला वाव । आम्हांसि कां भाव अल्प दिल्हा ॥३॥ तुका म्हणे दुःखी ऐसें हें कळों द्या । पुढिलीया धंद्या मन नेघे ॥४॥

१८६३. अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥१॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥२॥ माझी कोणी न धरों शंका । ऐसें हो कां निर्द्वंद्व ॥३॥ तुका म्हणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥४॥

१८६४. सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥१॥ सारा अवघे गाबाळ । डोळ्यांआडील पडळ ॥२॥ शुद्ध भावावीण । जो जो केला तो तो शीण ॥३॥ तुका म्हणे कळे । परि होताती आंधळे ॥४॥

१८६५. सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥१॥ येथें अलंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥२॥ अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥३॥ तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्त काळ घडी आल्याविण ॥४॥

१८६६. काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवितसे ॥१॥ थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणें सीवो कैसें लोखंडासी ॥२॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टवीती उपकारें ॥३॥ भूतांचि हे दया भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥४॥ तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥५॥

१८६७. जन्मा आलों त्याचें । आजि फळ झालें साचें ॥१॥ तुम्हीं सांभाळिलें संतीं । भय निरसली खंतीं ॥२॥ कृतकृत्य झालों । इच्छा केली तें पावलों ॥३॥ तुका म्हणे काळ । आतां करूं न शके बळ ॥४॥

१८६८. काय पुण्यराशी । गेल्या भेदूनी आकाशीं ॥१॥ तुम्ही झालेति कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥२॥ काय बोळलें संचित । ऐसें नेणें अगणित ॥३॥ तुका म्हणे नेणें । काय केलें नारायणें ॥४॥

१८६९. गायें नाचें वाहें टाळी । साधन कली उत्तम हें ॥१॥ काय जाणों तरले किती । नाव आयती या बैसा ॥२॥ सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें येक ॥४॥

१८७०. असे येथिंचि या दिनें । भाग्यहीन कळा ॥१॥ भांडवल येवढें

गांठीं । नाम कंठीं धरियेलें ॥२॥ आणिक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥३॥ तुका म्हणे केला कोणें । येवढा नेणें लौकिक ॥४॥

१८७१. सर्व काळ माझे चित्तीं । हेचि खंती राहिली ॥१॥ बैसलें तें रूप डोळां । वेळोवेळां आठवे ॥२॥ वेव्हाराची सरली मात । अखंडीत अनुसंधान ॥३॥ तुका म्हणे वेध झाला । अंगा आला श्रीरंग ॥४॥

१८७२. जैसें दावी तैसा राहे । तरी कां देव दूरी आहे ॥१॥ दुःख पावावयाचें मूळ । रहणी ठाव नाहीं ताळ ॥२॥ माळामुद्रांवरि । कैंचा सोंगें जोडे हरि ॥३॥ तुका म्हणे देख । ऐसी परीची बहुतेक ॥४॥

१८७३. अवघा तो शकुन । हृदईं देवाचें चिंतन ॥१॥ येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥२॥ संग हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥३॥ तुका म्हणे हरिच्या दासा । शुभकाळ अवघ्या दिशा ॥४॥

१८७४. ब्रह्मरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥१॥ ठेविलिया दिसे रंगाऐसी शीळा । उपाधि निराळा स्फटिक मणी ॥२॥ नाना भाष्यमतें आळविती बाळें । प्रबोधी तो मूळ जननी ठाईं ॥३॥ तुका म्हणे माझें नमन जाणतियां । लागतसे पायां वेळोवेळां ॥४॥

१८७५. नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥१॥ वाऱ्या हातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण ॥२॥ प्रभा आणि रवी काय असे आन । उदईं ते जन सकळ साक्षी ॥३॥ तुका म्हणे वरा सत्याचा सायास । नवनीता नास नाहीं पुन्हां ॥४॥

१८७६. तीर्थाटणें येक तपें हुंबरती । नाथिलें धरिती अभिमान ॥१॥ तैसे विष्णुदास नव्हती साबडे । येकाचिया पडे पायां येक ॥२॥ अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥३॥ तुका म्हणे विधिनिषेधाचे डोहीं । बुडाले त्या नाहीं देव कधीं ॥४॥

१८७७. पट्टेढाळ् आम्ही विष्णुदास जगीं । लागो नेदुं अंगीं पापपुण्य ॥१॥ निर्भर अंतरीं सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥२॥ बळिवंत जेणें रचिलें सकळ । आम्हां त्याचें बळ अंकितासि ॥३॥ तुका म्हणे आम्ही देखताचि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥४॥

१८७८. कथेचा उल्लंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम बोळखा तो ॥१॥ कासया जीऊन झाला भूमीभार । आन उपकार माते कुसी ॥२॥ निद्रेचा आदर जागरणी वीट । त्याचें पोटीं कीट कुपथ्याचें ॥३॥ तुका म्हणे दोन्ही बुडविलीं कुळें । ज्याचें तोंड काळें कथेमाजी ॥४॥

१८७९. सांडोनी दों अक्षरा । काय करूं हा पसारा । विधिनिषेधाचा भारा । तेणें दातारा नातुडसी ॥१॥ म्हणोनी बोबड्या उत्तरीं । वाचे जपे निरंतरीं । नाम तुझें हरि । भवसागरीं तारूं तें ॥२॥ सर्वमय ऐसे वेदाचें वचन । श्रुति गर्जती पुराणें । नाहीं आणीक ध्यान । साधन मज चाड ॥३॥ शेवटीं ब्रह्मार्पण । याचि मंत्राचें कारण । काना मात्रा वायांविण । तुका म्हणे बिंदुलीं ॥४

१८८०. हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधु पारू उतरलों ॥१॥ फावलें फावलें आतां । पाईं संतां निवटलों ॥२॥ हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा छेदिला ॥३॥ हरिनामाचें धनुष्यकांड । विन्मुख तोंड कळिकाळ ॥४॥ येणेंचि बळें सरते आम्ही । हरिच्या नामीं लोक तीहीं ॥५॥ तुका म्हणे झालों साचें । श्रीविठ्ठलाचें डिंगर ॥६॥

१८८१. नव्हे हें गुरुत्व मेघवृष्टी वाणी । आयकावी कानीं संतजनीं ॥१॥ आरुष हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥२॥ देहपिंड दान दिल्हा येकसरें । मुळींचें तें खरें टांकसाळ ॥३॥ तुका म्हणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ॥४॥

१८८२. घटीं अलिप्त असे रवी । अग्नि काष्ठामाजी जेवी । तैसा नारायण जीवीं । जीव साक्षी वर्तणें ॥१॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध तें जगीं । विचित्र ये रंगीं । रंगे रंगला गोसावी ॥२॥ देहे संकल्पासारिखे । सुख आणि दुःखें । अंगीं कर्मे त्रिविध ॥३॥ तुका म्हणे कोडें । न कळे तयासी सांकडें । त्याचिया निवाडे । उगवी केलें विंदान ॥४॥

१८८३. सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥१॥ चिंतनाचा येक लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥२॥ नेत्रीं जळ वाहे सदा । आनंदाचे रोमांच ॥३॥ तुका म्हणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥४॥

१८८४. जेथें देखे तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥१॥ डोळां

बैसले बैसले । ध्यान राहोनी संचलें ॥२॥ सरसावलें मन । केले सोज्वळ लोचन ॥३॥ तुका म्हणे सर्वे । आतां असिजेत देवें ॥४॥

१८८५. तान्हें तान्ह प्याली । भूक भुकेनें खादली ॥१॥ जेथें तेंच नाहीं झालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥२॥ वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पाई ॥३॥ शेष उरला तुका । जीवीं जीवा' झाला चुका ॥४॥

१८८६. पाणिपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥१॥ आवश्यक देव मनीं । चिंतनीच सादर ॥२॥ भिक्षा कामधेनु ऐसी । अवकाशीं शयन ॥३॥ पांघरून तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥४॥

१८८७. विषईं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥१॥ माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥२॥ लाभाचिया सोसें पुढें चाले मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥३॥ तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि येकमय ॥४॥

१८८८. रामकृष्णनाम मांडी पां वोळी । तेणें होईल होळी पापा धूणी ॥१॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नाश ब्रह्मरसा ॥२॥ जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस उरे मागुताली ॥३॥ तुका म्हणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥४॥

१८८९. परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥१॥ थोडाचि स्फुल्लिंग बहुत दावाग्नी । वाढतां इंधनीं वाढविला ॥२॥ पितयानें तैसा वंदावा कुमर । जयाचे अंतरीं देव वसे ॥३॥ तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥४॥

१८९०. ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥१॥ देव तया जवळी वसे । पाप नासे दरुशनें ॥२॥ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं झाली समता ॥३॥ तुका म्हणे भेदाभेद । गेला वाद खंडोनी ॥४॥

१८९१. सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेद काम निवारूनी ॥१॥ नलगे हालावें चालावें बाहेरी । अवघेचि घरीं बैसलिया ॥२॥ देवाचींच नामें देवाचिये शीरीं । सर्व अलंकारीं समर्पावे ॥३॥ तुका म्हणे होय भावेंचि संतोषी । वसे नामापासीं आपुलिया ॥४॥

१८९२. ज्ञानियाचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥१॥ म्हणवोनि औघे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥२॥ वेद पारायण पंडित वाचक । न मिळती येक येकामधीं ॥३॥ पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥४॥ आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । येकी करिती रागें गुरुगुरु ॥५॥ तुका म्हणे मज कोणाचा पांगीला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥६॥

१८९३. पंढरिची वाट पाहे निरंतर । निढळावरी कर ठेऊनीयां ॥१॥ जातियां निरोप पाठवी माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥२॥ पैल कोण दिसे गरुडाचे वारिखें । विठ्ठलासारिखें चतुर्भुज ॥३॥ तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवा पांडुरंगा ॥४॥

१८९४. ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥१॥ नाशिवंत आटि प्रियापुत्रधन । बीज ज्याचा शीण तेंचि फळ ॥२॥ नाव धड करा सहस्रनामाची । जे भव सिंधूची थडी पावे ॥३॥ तुका म्हणे काळा हाणा तोंडावरी । भाता भग हरि रामबाणें ॥४॥

१८९५. पाहें मजकडे भरूनियां दृष्टी । बहुत हिंपुटी झालों माते ॥१॥ करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक ॥२॥ सत्यासाठीं माझी शब्दविवंचना । जोडिल्या वचनाचे तें नव्हे ॥३॥ तुका म्हणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥४॥

१८९६. तुज म्हणतील कृपेचा सागर । तरि का केला धीर पांडुरंग ॥१॥ आझुनि कां नये तुज माझी दया । काय देवराया पाहातोसी ॥२॥ आळवितों जैसें पाडस कुरंगिणि । पीडिलिया वनीं तानभूक ॥३॥ प्रेमरस पान्हा पाजिं माझे आई । धांवे वो विठाई वोरमूनी ॥४॥ तुका म्हणे माझें कोण वारी दुःख । तुजवीण येक पांडुरंगा ॥५॥

१८९७. भक्ति ते कठीण सुळावरिल पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥१॥ जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायावीण भिंत तांतडीची ॥२॥ कामाविलें तरी पाका वोज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥३॥ तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दीस जागृतीचा ॥४॥

१८९८. पापी म्हणों तरी आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनी ॥१॥ ऐशा विचाराची घालोनी कोंडणी । काय चक्रपाणी निजलेती ॥२॥ येक वेळे जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कसें नेलें दुःख ॥३॥ तुका म्हणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमचीया ॥४॥

१८९९. उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणों किती ॥१॥ ख्याति केली अजामीळें । होतें निघालें दिवाळें ॥२॥ मोकलीला प्रायश्चितीं । कोणि न धरिती हातीं ॥३॥ तुका म्हणे मुक्त वाट । वैकुंठींची घडघडाट ॥४॥

१९००. सरळ हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥१॥ पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हावो येती ॥२॥ अवघेंचि लाभे बैसलिया घरा । येती भाव धरा येकें ठाईं ॥३॥ शेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती म्हैस । कामधेनु तैसी नव्हे येक ॥४॥ तुका म्हणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभचि ॥५॥

१९०१. पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥१॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥२॥ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥३॥ काय त्या उरलें वेगळें आणिक । वैकुंठनायक जया कंठीं ॥४॥ तुका म्हणे देव भक्तांचा संगम । तेथें वोघ नाम त्रिवेणीचा ॥५॥

१९०२. पाप ताप दैन्य जाय उठाऊठी । झालीया ही भेटी हरिदासांची ॥१॥ ऐसें बळ नाहीं आणिकाचे अंगीं । तपें तीर्थें जगीं दानें व्रतें ॥२॥ चरणींचे रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांच्या माथां ॥३॥ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥४॥ तुका म्हणे मना झालें समाधान । देखिले चरण वैष्णवाचे ॥५॥

१९०३. येणें बोधें आम्ही असों सर्वकाळ । करूं हें निर्मळ हरिकथा ॥१॥ आम्ही भूमीवरी येक पैं दैवाचे । निधान हें साचें सांपडलें ॥२॥ तरतील कुळें दोन्हीं उभयतां । गातां आईकतां सुखरूप ॥३॥ न चळे हा मंत्र न म्हणे यातीकुळ । नलगे काळ वेळ विचारावी ॥४॥ तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा । सांठवीन हांवा हृदयांत ॥५॥

१९०४. बहुतां जन्मांचें सांचित । सबळ होय जरी बहुत । तरिच हो-हरिभक्त । कृपावंत मानसीं ॥१॥ म्हणवी म्हणियारा तयाचा । दास आपुल्या दासाचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥२॥ असे भूतदया मानसीं । औघा देखे ऋषिकेशी । जीवें न विसंबे तयासी । मागें मागें हिंडतसे ॥३॥ तुका म्हणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तया जन्म चुकले ॥४॥

१९०५. तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तीरीं ॥१॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें राशी धन ॥२॥ झाला हरिनामाचा तारा । शीड लागलें फरारा ॥३॥ तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥४॥

१९०६. आळवनि स्वरें । कैशा मधुरा उत्तरें ॥१॥ ये वो ये वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दे गे ॥२॥ पसरोनी चोंची । वचनें हीं करुणेचीं ॥३॥ तुका म्हणे बळी । आम्ही लडीवाळें आळीं ॥४॥

१९०७. सकळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचून ॥१॥ रूप दाखवि रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥२॥ शंख चक्र पद्म गदा । गरुडासहित ये गोविंदा ॥३॥ तुका म्हणे कान्हा । भूक लागली नयना ॥४॥

१९०८. पतित पावना । दिनानाथा नारायणा ॥१॥ तुझें रूप माझे मनीं । राहों नाम जपो वाणी ॥२॥ ब्रम्हांडनायका । भक्तजनांच्या पाळका ॥३॥ जीविंचीया जीवा । तुका म्हणे देवदेवा ॥४॥

१९०९. करीं हेंचि काम । मना जपे रामराम ॥१॥ लागो हाचि छंद । मना गोविंद गोविंद ॥२॥ तुका म्हणे मना । मज भीक द्यावी दीना ॥३॥

१९१०. आपुलिया लाजा । धांवे भक्ताचिया काजा ॥१॥ नाम धरिलें दीनानाथ । सत्य करावया व्रत ॥२॥ घात आघात निवारी । छाया पितांबर करी ॥३॥ उभा कर कटीं । तुका म्हणे याजसाठीं ॥४॥

१९११. साधावया भक्तिकाज । नाहीं लाज धरित ॥१॥ ऐसियासी शरण जावें । शक्ति जीवें न वंची ॥२॥ भीष्में पण केला खरा । धनुर्धरा रक्षिले ॥३॥ तुका म्हणे साक्ष हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ॥४॥

१९१२. धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥१॥ तैसें करी वो

माझे आई । ठाव देवोनि राखें पाई ॥२॥ काढितां तळमळी । जीवना बाहेरी मासोळी ॥३॥ तुका म्हणे कुडी । जीवप्राणांची आवडी ॥४॥

१९१३. हरिजनाची कोणा न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥१॥ रूपा येवोनियां धरी अवतार । भक्तां अभयकर खळां कष्ट ॥२॥ दुर्वास हा छळों आला अंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळीत फिरे ॥३॥ द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांती । होउनी श्रीपति साह्य केलें ॥४॥ न साहेचि बभ्रु पांडवा पारिखा । धुडाविला सखा बळिभद्र ॥५॥ तुका म्हणे अंगीं राखिली दुर्गंधी । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रा ॥६॥

१९१४. ज्यासी आवडी हरिनामाची । तोचि येक बहु शुची ॥१॥ जपतो हरिनाम बीज । तोचि वर्णांमाजी द्विज ॥२॥ तुका म्हणे वर्ण धर्म । अवघें आहे सम ब्रह्म ॥३॥

१९१५. विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥१॥ आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपळिया धन ॥२॥ विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत हे संजीवनी ॥३॥ रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥४॥

१९१६. विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापी निर्मूळ ॥१॥ भाग्यवंता छंद मनीं । कोड कानीं ऐकती ॥२॥ विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥३॥ तुका म्हणे भलते याती । विठ्ठल चितीं शुद्ध ते ॥४॥

१९१७. म्हणे विठ्ठल ब्रह्म नोव्हे । त्याचे बोल नायकावे ॥१॥ मग तो हो का कोणी येक । आदि करूनि ब्रह्मादिक ॥२॥ नाहीं विठ्ठल जया ठावा । तोहि डोळां न पहावा ॥३॥ तुका म्हणे नाहीं । त्याची भीड मज कांहीं ॥४॥

१९१८. यक पाहातसा येकचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा ॥१॥ मारा हाक देवा भयें अट्टाहास्यें । जंव काळाऐसें झालें नाहीं ॥२॥ मरणाची तंव गांठोडीं पदरीं । जिणें तोचिवरी माप भेर ॥३॥ तुका म्हणे धिग वाहती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥४॥

१९१९. संतांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरी तो ॥१॥ म्हणवोनी तया न वजावें ठायां । होतसे घात या दुर्बळाचा ॥२॥ भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ॥३॥ तुका म्हणे जया संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ॥४॥

१९२०. संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ॥१॥ हेंडग्याच्या आळा अवघींचि पाडें । काय तेथें गोडें निवडावी ॥२॥ ढेकाणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥३॥ तुका म्हणे मद्य सांडवि लंगोटी । सांगितला शेठीं विचारल्या ॥४॥

१९२१. पंढरिये माझें माहेर साजणी । वोवीया कांडणी गाऊं गीति ॥१॥ राहिरखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता माहीयेर ॥२॥ उद्धव अक्रूर व्यास अंबऋषी । भाई नारदासी गौरवीन ॥३॥ गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । याचें कवतुक वाटे मज ॥४॥ मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत वोवीयेसी ॥५॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझीया नामदेवा ॥६॥ नागो जनमित्रा नरहरी सोनारा । रोहिदासा कबिरा सोयरिया ॥७॥ परिसा भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळांसी ॥८॥ चोखामेळा संत जीवाचे सोयरे । न पडे विसर यांचा घडी ॥९॥ जीवींच्या जीवना येका जनार्दना । पाठक हा कान्हया मिराबाई ॥१०॥ आणिक हे संत महानुभाव मुनी । सकळा चरणीं जीव माझा ॥११॥ आनंदें वोविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरिसी वारकरी ॥१२॥ तुका म्हणे माझा बळिया बापमाय । हर्षें नांदताहे घराचारी ॥१३॥

१९२२. जातिचें तें चढे प्रेम । पक्षी स्मरे रामराम ॥१॥ ते कां गुण लागती येरा । कागा न शोभे पिंजरा ॥२॥ शिकविलें सुजात सोसी । मग मोल चढे त्यासी ॥३॥ तुका म्हणे वेषधारी । हिजड्या न होती त्या नारी ॥४॥

१९२३. वसणें थिल्लरीं । बेडुक सागरा धिःकारी ॥१॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंडपीटी । करी हावा ॥२॥ फुगतें काउळे । म्हणे मी राजहंसा आगळे ॥३॥ गजाहुनी खर । म्हणे चांगला मी फार ॥४॥ मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥५॥

१९२४. मुक्त होता परी बळें झाला बद्ध । घेउनीयां छंद माझें माझें ॥१॥ पापपुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणें कोण करिता तो ॥२॥ तुका म्हणे गेलें व्यर्थ वायांवीण । जैसा मृग सीणे मृगजळें ॥३॥

---

## स्वामीनें काया ब्रह्म केली ते अभंग

१९२५. शोधीतांची नये । म्हणोनी वोळंगतों पाय ॥१॥ आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥२॥ परतोनी मन । गेलें ठाईंच मुरोन ॥३॥ विसरला तुका । बोलों चालों झाला मुका ॥४॥

१९२६. रज्जुसर्पाकार । भासयलें जगडंबर ॥१॥ म्हणोनी आठवीतों पाय । घेतों आलाय बलाय ॥२॥ दृश्य द्रुमाकार लाणीं । केलों सर्वस्वासी धणी ॥३॥ तुकीं तुकला तुका । विश्वीं भरूनी उरला लोका ॥४॥

१९२७. म्हणवींतों दास । परि मी आसें उदास ॥१॥ हाचि निश्चय माझा । परि मी निश्चयाहुनी दुजा ॥२॥ सरतें कर्तृत्व माझ्यानें । परि मी त्याहुनी असें भिन्न ॥३॥ तुका तुकासी तुकला । तुकी तुकाहुनि निराळा ॥४॥

१९२८. घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्त आत्मस्थिती सांडवीन ॥१॥ ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरि ऋणी देवा ऐसें ॥२॥ तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडू स्वर्गवास करिन भोग ॥३॥ सांठवीन तपोनीधि अभीमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥४॥ भक्तिभाग्यासीमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ नीज ठेवा ॥५॥ धन्य म्हणवीन याही लोकीं लोकां । भाग्य आम्हीं तुका देखीयेला ॥६॥

१९२९. संसाराचे अंगीं औघींच व्यसनें । आम्ही या कीर्तनें शुद्ध झालों ॥१॥ आतां हें सोंवळें झालें त्रिभुवन । विषम धुवोन सांडियेलें ॥२॥ ब्रह्मपुरीं वास करीन अखंड । न देखीजे तोंड विटाळाचें ॥३॥ तुका म्हणे आम्हा येकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेऊं सदा ॥४॥

१९३०. तुम्ही सनकादीक संत । म्हणवीता कृपावंत ॥१॥ येवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥२॥ भाकावी करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥३॥ तुका म्हणे मज आठवा । मूळ लौकरी पाठवा ॥४॥

१९३१. गरुडाचे पाईं । ठेवि वेळोंवेळां डोई ॥१॥ वेगीं आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरी ॥२॥ पाय लक्षुमीचे हातीं । म्हणोनी येतों काकुळती ॥३॥ तुका म्हणे शेषा । जागें करा ऋषिकेशा ॥४॥

१९३२. आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप हा संतां हातीं

आला ॥१॥ सुखदुःखें माझें आयाकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥२॥ करुनी सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसे येक न्यावयासी ॥३॥ त्याची पंथें माझें लागलेंसें चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥४॥ तुका म्हणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलीया मायबाप ॥५॥

१९३३. चिन्हें उमटताती अंगीं । शकुनाजोगीं उत्तम ॥१॥ आठवला बापमाय । येईल काय मूळ नेणों ॥२॥ उत्कंठित झालें मन । तेचि खूण तेथींची ॥३॥ तुका म्हणे कामा वारीं । आळस घरीं करमेना ॥४॥

१९३४. आरोनीयां पाहें वाट । कटकट सोसेना ॥१॥ आलीयासी पुसे मात । तेथें चित्त लागलें ॥२॥ दळी कांडी लोकां ऐसें । परि मी नसें ते ठाई ॥३॥ तुका म्हणे येथें पिसें । तेथें तैसें असेल ॥४॥

१९३५. येथीलीया अनुभवें । कळों जीवें येतसे ॥१॥ दोहीं ठाईं येक जीव । माझी कींव त्या अंगीं ॥२॥ भूक भुकेचि खाउनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥३॥ तुका म्हणे सुख झालें । अंतर धालें त्या गुणें ॥४॥

१९३६. पैल आले हरि । शंख चक्र शोभे करीं ॥१॥ गरुड येतो फडत्कारें । ना भी ना भी म्हणे त्वरें ॥२॥ मुगुटकुंडलाच्या दीप्ती । तेजें लोपला गभस्ती ॥३॥ मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥४॥ चतुर्भुज वैजयंती । गळा माळा हे रुळती ॥५॥ पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥६॥ तुका झालासे संतुष्ट । घरा आले वैकुंठपीठ ॥७॥

१९३७. शंख चक्र गदा पद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥१॥ ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥२॥ दुरुनी येतो दिसे दृष्टी । धाकें दोप पळती सृष्टी ॥३॥ तुका देखोनी येकला । वैकुंठीहुनि हरि आला ॥४॥

१९३८. पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥१॥ आला पंढरीचा राणा । दिसताती त्याच्या खुणा ॥२॥ सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥३॥ उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥४॥ तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥५॥

१९३९. चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥१॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं ॥२॥ फेडावया धणी । प्रेमसुखाची

आजी ॥३॥ पुढें आलें कृपावंत । मायबाप साधुसंत ॥४॥ तुका आळंगीला बाहीं । ठेविला विठोबाचे पाईं ॥५॥

१९४०. पाहुणे घरासी । आजि आले हृषीकेशी ॥१॥ काय करूं उपचार । कोप मोडकी जर्जर ॥२॥ कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥३॥ घरीं मोडकीया बाजा । वरि वाकळेच्या शेजा ॥४॥ मुखशुद्धी तुळसीदळ । तुका म्हणे मी दुर्बळ ॥५॥

१९४१. संतीं केला अंगीकार । त्यांसी अभिमान थोर ॥१॥ कांहीं ठेवीलें चरणीं । घेती तेचि पूरउनी ॥२॥ तुका पायवणि । घेउनीयां निराळा ॥३॥ नसतां कांहीं संचित । भेटि झाली अवचित ॥४॥ देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥५॥

१९४२. अवघीयांच्या आलों मुळें । येक वेळे न्यावया ॥१॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधिं ठावें करितों ॥२॥ जोंवरि ते घटिका दुरि । आहे उरी तो काळ ॥३॥ मंगळाचे वेळे उभे । असा शोभे सावध ॥४॥ औघीयांचा वियोग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥५॥ तुका म्हणे पाहे वाट । बहु आट करूनी ॥६॥

१९४३. सकळहि माझी बोळवण करा । परतोनी घरा जावें तुम्हीं ॥१॥ कर्मधर्में तुम्हां असावें कल्याण । घ्या माझें वचन आशीर्वाद ॥२॥ वाढवूनि दिल्हें येकाचिये हातीं । सकळ निश्चिंती झाली तेथें ॥३॥ आतां मज जाणे प्राणेश्वरासवें । मी माझिये भावें अनुसरलों ॥४॥ वाढवितां लोभ होईल उसीर । अवघींच स्थीर करा ठाईं ॥५॥ धर्म अर्थ काम झाला येके ठाईं । मेळविला जींहीं हातोहात ॥६॥ तुका म्हणे आतां झाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥७॥

१९४४. बोलिलों तें आतां पाळावें वचन । काय ऐसें पुण्य माझें गांठीं ॥१॥ जातों आतां आज्ञा घेऊनिया स्वामी । काळक्षेप आम्ही करूं कोठें ॥२॥ न घडे यावरी न धरवेचि धीर । पीडितां राष्ट्र देखोनी जग ॥३॥ तुका म्हणे तुम्ही दिसे मोकलीलें । काय आतां आलें जीवित्वाचे ॥४॥

१९४५. करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥१॥ अवघें एकमय ।

राज्य बोलों चालों नये ॥२॥ दुजयाची सत्ता । न चलेसी झाली आतां ॥३॥ आतां नाहीं तुका । पुन्हा हारपला लोका ॥४॥

१९४६. आम्ही जातों तुम्ही कृपा असों द्यावी । सकळां सांगावी विनंति माझी ॥१॥ वाड वेळ झाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावीतो ॥२॥ अंतकाळीं विठो आम्हासी पावला । कुडीसहित झाला गुप्त तुका ॥३॥

.१९४७. न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥१॥ कृपेचिये सिंहासनीं । अधिष्ठानीं बैसविलें ॥२॥ वाजतां तो नलगे वारा । क्षीरसागरा शयनीं ॥३॥ तुका म्हणे अवघे ठाईं । मज पाईं राखिलें ॥४॥

१९४८. चालीलें न वाटे । गाउनीयां जातां वाटे ॥१॥ बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥२॥ नाहीं भय आड । कांहीं विषमाची जड ॥३॥ तुका म्हणे भक्ति । सुखरूप आदि अंतीं ॥४॥

शके १५७१ विरोधीनामसंवत्सरे फाल्गुन कृष्ण २ द्वितीया

सोमवारीं प्रातःकाळीं स्वामी गुप्त झाले.

भांडण कान्होबाचें व देवाचें ते अभंग

१९४९. दुःखें दुभागलें हृदयसंपुष्ट । गहिवरें कंठ दाटताहे ॥१॥ ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिल्हें टाकोनियां वनामाजी ॥२॥ आक्रंदती बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी कांपो पाहे ॥३॥ काय हें सामर्थ्य नव्हे तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूता ॥४॥ तुज ठावें आम्हा कोणी नाहीं सखा । उभय लोकीं तुका तुजवीण ॥५॥ कान्हा म्हणे तुझ्या वियोगें पोरटीं । झालों दे रे भेटी बंधुराया ॥६॥

१९५०. सख्यत्वासी गेलों करीत सलगी । नेणेंचि अभागी महिमा तुझा ॥१॥ पावलों आपुलें केलें लाहें रास । निर्दैवा परीस काय होय ॥२॥ कष्टविलास मी चांडाळें संसारीं । अद्यापिवरी तरी उपदेशी ॥३॥ उचित अनुचित सांभाळीलें नाहीं । कान्हा म्हणे काई बोलों आतां ॥४॥

१९५१. असो आतां काय करुनीयां खंती । कोणा काकुळती येईल येथें ॥१॥ करूं कांहीं दीस राहे तो सायास । झोंबे त्या लागास भावा-

चीया ॥२॥ करिती रुदना बापुडे म्हणती । परि नये अंतीं कोणी कामा ॥३॥ तुकयाबंधु म्हणे पीडीयेलों वनीं । विचार तो मनीं बोलीयेला ॥४॥

१९५२. चरफडे चरफडे शोकें शोक होय । कार्य मूळ आहे धीरापासीं ॥१॥ कल्पतसे मज ऐसें हें पाहातां । करावी ते चिंता मिथ्या खोटी ॥२॥ न चुके होणार सांडिल्या शूरत्वा । फुकटची सत्वा होईल हानी ॥३॥ तुकयाबंधु म्हणे दिल्हें या बंद मना । वांचूनि नीधाना न पविजे ॥४॥

१९५३. नलगे चिंता अतां अनुमोदन हाता । आलें मूळ भ्राता गेला त्याचें ॥१॥ घरभेद्या येथें आहे तो सुकाणू । धरितो कवळूनी पाय दोन्ही ॥२॥ त्याचें त्याचिया मुखें पडियेलें ठावें । नलगे सारावें मागें पुढें ॥३॥ तुकयाबंधु म्हणे करील भेटी भावा । सोडीन तेधवां या विठ्ठला ॥४॥

१९५४. मूळस्थान त्याचें गोमतीचें तीरीं । तो हा सारी दोरी खेळवीतो ॥१॥ ऐसें हें कळलें असों द्या सकळां । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ॥२॥ वैष्णव हे हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगीतली ॥३॥ तुकयाबंधु म्हणे आलें अनुभवास । तेणेंच आम्हांस नागविलें ॥४॥

१९५५. बरा रे निर्गुणा नष्टा नारायणा । घरबुडवणा भेटलासी ॥१॥ येके घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी आपरापरी केली आम्हां ॥२॥ कान्हा म्हणे काय निष्काम देखिलें । म्हणोनी मना आलें करितोसी ॥३॥

१९५६. धींद धींद तूझ्या करीन धिंदड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ॥१॥ केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरी नास आरंभिला ॥२॥ मरावें मारावें या आलें प्रसंगा । काय पांडुरंगा पाहतोसी ॥३॥ तुकया बंधु म्हणे तुझी माझी ऊरी । उडाली न धरीं भीड कांहीं ॥४॥

१९५७. भुक्ति मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥१॥ नको तूं आपूल्या नेऊं वैकुंठासीं । दे माझ्या भावासी आणुनि वेगीं ॥२॥ रिद्धि सिद्धि मोक्ष ठेवीं गुंडाळून । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥३॥ नको होऊं कांहीं होसील प्रसन्न । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥४॥ तुकयाबंधू म्हणे पाहा हो नाहीं तरी । हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥५॥

१९५८. मुख्य आहे आम्हा मातेचा पठंगा । तुज पांडुरंगा कोण

लेखी ॥१॥ नको लावुं आम्हा सवें तूं तोंवरी । पाहा दूरवरी विचारूनी ॥२॥ साह्य संतजन केले महाराज । न घडे आतां तुज भेईन मी ॥३॥ तुकयाबंधू म्हणे ऐक्य ऐक्यता । वाढतें अनंता दुःखें दुःख ॥४॥

१९५९. नये सोमसरि उपचाराचीं हरि । करकरेचें करी काळें तोंड ॥१॥ मागतों इतुकें जोडुनियां कर । ठेवोनियां शिर पायांवरी ॥२॥ तुम्हां आम्हां येके ठाईं रहिवास । येथें द्वैत द्वेष काय बरा ॥३॥ तुकयाबंधू म्हणे बहुतां बहुतां रीती । अनंता विनंति परिसावी हे ॥४॥

१९६०. लालुचाईसाठीं बळकावीमी भावा । परि मी जाण देवा जिरों नेदी ॥१॥ असों द्या निश्चय हा मनोमानसीं । घातली येविशीं दृढ कास ॥२॥ मज आहे बळ आळीचें सबळ । फोडीन अंत्राळ हृदय तुझें ॥३॥ करुणारसें तुकयाबंधु म्हणे भुलवीन । काढुन घेईन निज वस्तु ॥४॥

१९६१. तुझीं वर्में आम्हां ठावीं नारायणा । परि तूं शाहाणा होत नाहीं ॥१॥ मग कालाभुली हाक देते वेळे । होतोसी परि डोळे नुघडसी ॥२॥ जाणोनी अज्ञान करावें मोहरें । खोटी खोडी हे रे तुझी देवा ॥३॥ तुकयाबंधु म्हणे कारण प्रचीती । पाहातों वेळ किती तेच गुण ॥४॥

१९६२. आवधीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ॥१॥ म्हणतां लाज नाहीं सकळांची माऊली । जवळी धरिली येक दुरी ॥२॥ येक सुख द्यावें घेवूनी ओसंगा । येके दारीं गळा श्रमविति ॥३॥ येका नवनीत पाजावें दाटून । येक अन्न अन्न करतील ॥४॥ येका वाटतील न वजावें दूर । येकाचा मत्सर जवळी येतां ॥५॥ तुकयाबंधु म्हणे नावडति त्याम । कासया व्यालास पांडुरंगा ॥६॥

१९६३. निनांव हें तूला । नांव साजे रे विठ्ठला । बरा सिरकावीला । फाटक्यामध्यें पाव ॥१॥ कांहीं तरी विचारिलें । पापपुण्य असें केलें । भुरळें घातलें । येकायेकीं भावासीं ॥२॥ मुद्रा धारण माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे । हातीं फाशांचें गुंडाळें । कोण चाळे गृहस्था हे ॥३॥ तुकयाबंधू म्हणे मिस्कीन । करितोसी देखोन । पाहा दुरवर इच्छिन । केला परी संसार ॥४॥

१९६४. नाहीं घटिका म्हणसी । लाग लागला तुजपासी । पडिले ऋषीकेशी । जाब सकळ करणें ॥१॥ माझें नेलें पांघरूण । ठावें असोनि दुर्बळ दीन । माणसांमधून । उठविलें खानोऱ्या ॥२॥ आम्ही जोडोनी होतों पाणी । संदि देवदेव करूनी । झालासी कोठोनी । पैदा चोर देहाचा ॥३॥ तुकयाबंधु म्हणे केलें । उघडें मजाचि उमगीलें । ऐसें कांहीं एक केलें । तें तुज न पुरतें ॥४॥

१९६५. कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । म्हणवितोसी परि केवळ । गळेकाटू दिसतोसी ॥१॥ काय केलें होतें आम्हीं । सांग तुझें येके ये जन्मीं । झालासी जो स्वामी । येवढीं सत्ता करावया ॥२॥ भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करूनी बंधु वेडा । जोडा माझा विघडिला ॥३॥ तुकयाबंधू म्हणे भला । कैसें म्हणताति तूजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहीं तरी ॥४॥

१९६६. आतां कळों आलें गुण । अवघेचि यावरुन । चोखट हें लक्षण । धरिलें घरघेणें ॥१॥ या नांवें कृपासिंधू । म्हणवितोसी दीनबंधु । मज तरि मैंदु । दिसतोसी पाहातां ॥२॥ अमळ दया नाहीं पोटीं । कठिण तैसाचि कपटी । आंधळ्याची काठी । माझी गुदरलीशीच ना ॥३॥ तुकयाबंधू म्हणे पुरता । नाहीं बरें म्हुण अंनता । येऱ्हवीं तरी आस्ता । तुझा घोंट भरियेला ॥४॥

१९६७. काय सांगों ऋषिकेशा । आहे अनुताप आला ऐसा । गीळावयासी निमिषा । निमिष लागों न द्यावें ॥१॥ माझें बुडवीलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लावीला काहार । तारातरि करूनी ॥२॥ जीव द्यावा किंवा घ्यावा । तुझा आपुला केशवा । इतुकें उरलें आहे भावा । याचिया निमित्य ॥३॥ तुकयाबंधू म्हणे जग । बरें वाईट म्हणो मग । याकारणें परि लाग । न संडावा सर्वथा ॥४॥

१९६८. मायबाप मीनल्यावरि । घातले भावाचे आभारी । तोहि परि हरि । तुज झाला आसमई ॥१॥ हे का भक्तीचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता वेव्हारा । शेवठीं हे झालासी ॥२॥ येका जीवावरि । होतों

दोन्हि कुटुंबारि । चाळऊं तोंवरि । तुज येतें रे निर्लज्जा ॥३॥ तुकयाबंधू म्हणे भला । आणिक काय म्हणावें तुला । वेडा त्यांनीं केला तुजसवें संमंधू ॥४॥

१९६९. पूर्वीं पूर्वजांची गति । हेचि आयकिली होती । सर्वे लाउनी श्रीपती । निश्चिती केली तयाची ॥१॥ कां रे पाठी लागलासी । ऐसें सांग ऋषीकेशी । अद्यापवरी न पाहासी । किती तरी म्हणो ॥२॥ जन्मजन्मांतरीं दावा । आम्हा आपणा केशवा । निमित्य चालवा । काईयास्तव हें ॥३॥ तुकयाबंधु म्हणे न देखणा । किती होसी नारायणा । देखों सकवेना । खात्यासी न खात्या ॥४॥

१९७०. निसुर संसार करून । होतों पोट भरून । केली विवशी निर्माण । देवपण दाखविलें ॥१॥ ऐसा काढियेला नीस । काय म्हणू सहित वंश । आणिलें शेवटास । हौस तरि न पुरे ॥२॥ उरलों पालव्या शेवटीं । तेंहि न देखवे दृष्टी । दोघामध्यें तुटी । रोकडीची पाडिली ॥३॥ तुकयाबंधू म्हणे गोड । बहु झाले अति वाड । म्हणोनी कां बूड । मूळासहीतहि खावें ॥४॥

१९७१. बरा जाणतोसी धर्मनीति । उचित अनुचित श्रीपती । करूं येते राती । ऐसे डोळे झांकुनी ॥१॥ आतां जाब काय कैसा । देसी तो जगदीशा । आणिला बोळसा । आपणां भोंवता ॥२॥ सेवेचिया सुखास्तव । बळें धरिलें अज्ञानत्व । येईल परी हा भाव । त्याचा त्यासी कारण ॥३॥ तुकयाबंधू म्हणे नाहीं । आतां आम्हा बोल कांहीं । जोडुनी पाहीं । तुझें तूंचि घेतलें ॥४॥

१९७२. कांहीं विपत्ति आपत्या । आतां आमुचीया होतां । काय होईल अनंता । पहा बोलों कासया ॥१॥ बरें अनायासें झालें । सायासावीण बोले चाले । कां वाड चुकलें । केलें कष्टा वेगळें ॥२॥ बरा सांपडलासी बोजा । वर्मावरि केशीराजा । बोलायासी तुझा । हुजुरची नाहींसा ॥३॥ तुकयाबंधु म्हणे दगा । बरा दिल्हा होता बा गा । झडकरि चला गा । चांग दैवें पावलों ॥४॥

१९७३. देवा तुजपें माझ्या पूर्वजांचें ऋण । आहे तें कां नेदीसी अझुन । अवगलासी झोंडपणें । परि मी जाण जीवें न सोडीं ॥१॥ कळों येईल रोकडें । उभा करिन संतांपुढें । तुझें काय येवढें । भय आपुलें मागतां ॥२॥ आजिवरि होतों नेणता । तैं तुज फावलें अनंता । कवडीचा तो आतां । पडों नेदींच फेर ॥३॥ ठेविला ये जीवनीं जीव । म्हणे तुकयाचा बांधव । माझा गळा तुझा पाव । येके ठाईं बांधीन ॥४॥

१९७४. मागें असतासी कळला । उमस घेऊं नसतां दिल्हा । तेणेंचि काळें केला । असतां अवघा निवाडा ॥१॥ इतुका न लागतां उशीर । न धरितों भीडभार । भिद्रासी वेव्हार । कासयासी लागला ॥२॥ असोनियां माल खरा । किती केल्या वेरझारा । धरणेंही दिवस तेरा । माझ्या भावें घेतलें ॥३॥ अझुनि तरी इतुक्यावरी । चुकवीं जनाचार हरि । तुकयाबंधु म्हणे उरी । नाहीं तरी नुरे कांहीं ॥४॥

१९७५. आतां न राहे क्षण एक । तुझा कळला रे लौकिक । नेदी हालों एक । कांहीं केल्यावांचुनी ॥१॥ संमंध पडिला कोणासी । काय डोळे झांकितोसी । नेईन पांचापासीं । दे नाहीं तरी वोढुनियां ॥२॥ सुखें नेदिस जाणवलें । नास केल्याविण उगलें । तरि तेही विचारिलें । आम्ही आहे तुज आधीं ॥३॥ असेंचि करुनी किती । नागविली नाहीं नीति । तुकयाबंधु म्हणे अंतीं । न सोडिसी ते खोडि ॥४॥

१९७६. तुज सवें आहे ठावें । घ्यावें त्याचें बुडवावें । परि तें आम्हां-सवें । आतां न फावे कांहीं ॥१॥ नव्हे सोडायाचा धणी । कष्टें मेळविलें करूनी । पाहा विचारूनी । अटि धरुनी काम नाहीं ॥२॥ अवघे राहिले प्रकार । झालों जीवासी उदार । ऐसा हा निर्धार । कळला असावा असेल ॥३॥ आतां निदसूर नसावें । गांठ पडली कुणब्यासवें । तुकयाबंधु म्हणे राखावें । देवा महत्त्व आपुलें ॥४॥

१९७७. बहु बोलणें नये कामा । वाउगें तें पुरुषोत्तमा । येकाची वचनें आम्हा । काय सांगणें तें सांगा । देणें आहे कीं भंडाई । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा ॥२॥ मागें गेलें जें होउनी ।

असों तें धरित नाहीं मनीं । आतां पुढें येथून । कैसा काय विचार ॥३॥ सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळलें सकळ । तुकयाबंधु म्हणे खळखळ । करावी ते उरेल ॥५॥

१९७८. आतां हें न सुटे न चुके । बोल कांहीं दोंडीसी फिके । जनलोक पारिखे । अवघें केलें म्यां यासाठीं ॥१॥ नये सरतां नव्हे भलें । तुझें लक्षण कळलें । बैसलासी काढिलें । देहाचें मुळीं दिवाळें ॥२॥ दिसतोसी बरा बोल कोवळें । गुण मैंदाचें चाळे । दिसताती ये वेळे काय करूं विसंबोनी ॥३॥ तुकयाबंधु म्हणे देखतां । अंध बधिर ऐकतां । कैसें व्हावें आतां । इतुकीयाउपरि ॥४॥

१९७९. तिहीं ताळीं हेचि हाक । म्हणती पांढरा स्फटिक । औघा बुडविला लौकिक । सुखेंचि भीक लागली ॥१॥ थोटा नांव शिरोमणी । नाहीं जोडा त्रिभुवनीं । म्हणोनी शहाणे जे कोणी । तुझे दारीं बैसती ना ॥२॥ निर्गुणा निलाजिरा निनांवा । लंड झोंड कुडा देवा । नागवण या नांवा । वांचूनि दुजा नाइकों ॥३॥ सर्वगुणें संपन्न । कळों आलासी संपूर्ण । तुकयाबंधु म्हणे चरण । आतां जीवें न सोडीं ॥४॥

१९८०. तोचि प्रसंग आला सहज । गुज धरितां काज । न सांडितां लाज । पुढें ओज न दिसे ॥१॥ तूं तर न होसी शाहाणा । नये सांगतां तेंहि मना । आपुला आपणा । आतां प्रयत्न देखावा ॥२॥ न पुरे पाहतां वाट । द्यावें प्रमाण चोखट । कांस घालुनियां धीट । चौघाचार करावा ॥३॥ आतां श्रमाचें कारण । नव्हे व्हावें उदासीन । न पडे तयावीण । गाठीं तुकयाबंधु म्हणे ॥५॥

१९८१. हळुहळु जाड । होत चालिलें लिगाड । जाणवेल निवाड । न करिसी परि पुढें ॥१॥ मी तो सांगोन उतराई । झालों आतां तुज काई । कळों येईल भाई । तैसा करीं विचार ॥२॥ मागें युगें अठ्ठावीस । झालीं दिवसांचा दिवस । मुद्दल व्याज कासावीस । होसी देवा ये कामें ॥३॥ तुकयाबंधु म्हणे राखें । आतां टाकी तीं तुझीं सुखें । जगज्याहिर ठाउकें । झालें नाहीं खंडलेंसें ॥४॥

१९८२. पत्र उचटिलें प्रयत्नें । ग्वाही करावया कारणें । नाहीं तरी पुण्य । तुझ्या काय उणें आम्हा ॥१॥ नांव तुझेंचि करूनी । अहो सुखें पोट भरुनी । केली केली जाणवनी । म्हणउनी नाहीं म्हणसील ॥२॥ आतां ईतुकीया परी । दे नको भलतें करी । म्हणती रिणकरी । आमुच्या इतुके उदंड ॥३॥ तुकयाबंधु म्हणे जागा । आळवाया पांडुरंगा । केला कांहीं मागा । याचि नव्हती गरज ॥४॥

१९८३. माझ्या भावें केली जोडी । न सरेसी कल्पकोडी । आणियेलें धाडी । घालूनीयां अवघे वैकुंठ ॥१॥ आतां नलगे यावें जावें । कोठें कांहींच करावें । जन्मोंजन्मीं खावें सुखें । बैसोनसें झालें ॥२॥ असंख्य संख्या नाहीं पार । आनंदें दाटलें अंबर । न माय अपार । त्रिभुवनीं सांठवितां ॥३॥ औघें भरलें सदोदित । झाले सुखाचे पर्वत । तुकयाबंधु म्हणे परमार्थ । धन अद्भूत सांपडलें ॥४॥

१९८४. आतां चुकलें देशावर । करणें अकरणें सर्वत्र । घरासी आगर । आला सकळ सिद्धींचा ॥१॥ झालों निधाई निधान । लाधले अनंत गुणरत्न । जन्माचें विच्छिन्न । दुःख गेलें दरिद्र ॥२॥ तारूं सागरींचें अवचितें । हेंदोवलें आलें येथें । वोढिलें संचितें । पूर्व दत्त लाधलें ॥३॥ तुकयाबंधु म्हणे सीमा । नाहीं आमुचिया दैवा । आतां पुरुषोत्तमा । ऐसा सौदागर सांपडला ॥४॥

१९८५. सांपडलें जुनें । आमुच्या वडीलांचें ठेवणें । केली नारायणें । कृपा पुण्यें पूर्वीचिया ॥१॥ सुखें आनंदरूप असतां । आम्ही आहों याकारितां । निवारिली चिंता । देणें घेणें चूकलें ॥२॥ झालें भांडवल घरींचें । अमुप नाम विठ्ठलाचें । सुकृत भावाचें । हें तयानें दाखविलें ॥३॥ तुकयाबंधु म्हणे फिटला । पांग नाहीं बोलायाला । चाल दुसरी विठ्ठला । वाचुनि आणिक ॥४॥

१९८६. वरतें करूनियां तोंड । हाक मारीतो प्रचंड ॥१॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥२॥ आशा धरूनि मनीं । कांहीं देईल म्हणोनी । पोटा येकासाठीं । तुका म्हणे झालों कष्टी ॥४॥

१९८७. जाली महाकर्में । दावी निजसुखवर्मे ॥१॥ ऐसें कळलें आम्हां येक । झालों नामाचे धारक ॥२॥ तपाचे सायास । नलगे घ्यावा वनवास ॥३॥ तुका म्हणे येणें । कळिकाळ हें ठेंगणें ॥४॥

१९८८. ये हरि मज देईं कृपादान । नासीं तिमिर दाखवीं चरण । आर्त पुरवावे भेटी देऊन । नको उपेक्षूं आलिया शरण ॥१॥ काम क्रोध अहंकार नको देहीं । आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं । वास पंढरीचा जन्म सदा देईं । आणिक दुजें मागणें तुज नाहीं ॥२॥ नाम अखंड हृदयीं राहो वाणी । न पडो विसर क्षण जागृतिं स्वप्नीं । संतसमागम ऐसा दे लावूनी । आणिक दुजें कांहीं नेणें तुजवांचुनी ॥३॥ पंथपुरींचा रविसुत पुरे आतां । आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता । नाहीं अडथळा त्रैलोक्यामाजि सरता । विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवूनी माथा ॥४॥

१९८९. तट्टाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लहान नेणे ॥१॥ परि तो त्या विशेष मनुष्य होऊन । करी खंड मान वडीलांचा ॥२॥ बेरसा गाढव माय ना बहीण । भुंके चवीविण भलतेंची ॥३॥ तुकयाबंधु म्हणे बोकड मातले । न विचारी आपुलें तोंडीं मुते ॥४॥

१९९०. मायझवा खर गाढवाचें बीज । तें ऐसें सहज कळों येतें ॥१॥ अपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन । तेचि त्याची खुण वोळखावी ॥२॥ मद्यपी तो पुरा अधम यातीचा । तया उपदेशाचा राग वायां ॥३॥ तुकयाबंधु म्हणे पिसाळलें सुणें । आपपर तेणें विचारावें ॥४॥

१९९१. मच्छकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथीवीचा भार वाहावया ॥१॥ काय धाक आम्हा कासयाची चिंता । ऐसा तो असतां साहाकारी ॥२॥ शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तांसाठीं ॥३॥ पांडवा जो हरि राखिलें कुसरी । तो हा बंधूचा कैवारी तुकयाच्या ॥४॥

१९९२. राम म्हणतां कामक्रोधाचें दहन । होय अभिमान देशोधडी ॥१॥ राम म्हणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम शीण स्वप्नामाजी ॥२॥ राम म्हणतां जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्र्यास पात्र कधीं ॥३॥ राम म्हणतां यम शरणागत बापुडें । अढळपद पुढें काय तेथें ॥४॥

राम म्हणतां धर्म घडती सकळ । तिमिरपडळ नासे हेळा ॥५॥ राम म्हणतां म्हणे तुकयाचा बंधु । तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ॥६॥

१९९३. मरोनी जाईन गुणनामावरूनी । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥१॥ चुकविलीं दुःखें मायेचा वोळसा । तोडोनियां आशापाश तेणें ॥२॥ केली काया तनु हींवशी शीतळ । चिंता तळमळ नाहीं ऐसी ॥२॥ काळें तोंड काळ करूनी राहिलें । भूतमात्र झाले सज्जनसखे ॥४॥ तुकयाबंधु म्हणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ॥५॥

१९९४. आतां मागतों तें ऐक नारायणा । भावपूर्वक मनापासूनियां ॥१॥ असों दे मोकळी जिव्हा जरी गाईल गुण । नाहीं तरी खिळोनि टांकी परती ॥२॥ मातेचिया परि देखति परनारी । ठेवी नेत्र तरी नाहीं तरी नको ॥३॥ तरी बरें कंटाळा करीति निंदास्तुतीचा । नाहीं तरी कानाचाहि देखे प्रयत्न ॥४॥ सकळां इंद्रियांचा निग्रह करूनी येक । राखावी पृथक् तोडूनी भ्रम ॥५॥ तुकयाबंधु म्हणे तेचि वाट प्राणां । पडतां नारायणा विसर तुझा ॥६॥

१९९५. नमस्कारीं भूतें विसरूनीयां याति । तेणें आत्मस्थिति जाणितली ॥१॥ परउपकारीं वेचियेल्या शक्ति । तेणें आत्मस्थिति जाणितली ॥२॥ द्वैताद्वैत भाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिति जाणितली ॥३॥ जयाचिये वाचे नये निंदास्तुति । तेणें आत्मस्थिति जाणीतली ॥४॥ उचित अनुचित जाणें धर्मनीति । दृढ भाव भक्ति मानव तो ॥५॥ तुकयाबंधु म्हणे वर्कड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥६॥

१९९६. चौदा भुवनें लोक तिन्ही दाढे जो कवळी । संपुष्ट संबळीमध्यें देखा ॥१॥ उत्पत्ति संव्हार करितां जो पाळण । तो नंदाचा नंदन म्हणवीतसे ॥२॥ असुर तोडरीं दैत्यांचा काळ । झाला द्वारपाळ बळीचा तो ॥३॥ लक्ष्मीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्ट कवळा पसरी मुख ॥४॥ तुकयाबंधु म्हणे चतुराचा रावो । भावें तो पहा हो झाला वेडा ॥५॥

१९९७. कोण पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं । जहाज पृथ्वीपति । केली ख्याती अद्‌भुत ॥१॥ भला रे पुंडलीका भला । महिमा

नवजाय वर्णिला । दगा देऊनी अवधीयांला । सांठविला अविनाश ॥२॥ केलें येक घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें । दुमदुमीलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ॥३॥ तुकयाबंधु म्हणे किल्या । संतांचिया हातीं दिल्या । आंगावेगळें आपुल्या । टाकोन झाला महिमान ॥४॥

१९९८. पाहा हो कलीचें महिमान । असत्यासि रिझले जन । पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ॥१॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मूळ । प्रळयकाळ आरंभला ॥२॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडुनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥३॥ ऐसे यथार्थाथे अनर्थ । झाला बुडाला परमार्थ । नाहीं झाली ऐसी नीत । हाहा भूत पातले ॥४॥ शांति क्षमा दया । भावभक्ती सत्क्रिया । ठाव नाहीं सांगावया । सत्त्वधैर्य भंगलें ॥५॥ राहिले वर्णाश्रम धर्म । अन्योन्य विचरती कर्म । म्हणावितां रामराम । महा श्रम मानिती ॥६॥ थेर भोरप्याचे विशीं । धावती भूतें आमिष्या तैसी । कथा पुराण म्हणतां सिसीं । तिडिक उठे न करियाची ॥७॥ विषयलोभासाठीं । सर्वार्थेसीं प्राण साठी । परमार्थेसि पिठ मुठी । मागतां उठी सुणिंसी ॥८॥ धनाढ्य देखोनि आनामिक । तयातें मानिती आवश्यक । आपमानिलें वेदपाठक । सात्त्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥९॥ पुत्र ते पितयापासीं । सेवा घेति सेवका ऐसी । सुनाचिया दासी । सासा जाल्या आंदण्या ॥१०॥ खोटें जालें आली विवसी । केली मर्यादा नाहींसी । भार्या भ्रतारेसी । रंक तैसी मानिती ॥११॥ नमस्कारावया हरिदासां । लाजती धरिती कांहीं गर्वसा । पोटासाठीं खौसा । वंदिती म्लेंच्छाच्या ॥१२॥ बहुत पाप जालें उचंबळ । उत्तम न म्हणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणि न धरिती कोणाचा ॥१३॥ कैसें झालें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण । अविंधवाणी वदताती ॥१४॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासिंचि प्रिती चुंबिती । सोंवळ्याच्या स्थिती । जगीं मिरविती पवित्रता ॥१५॥ मद्यपानाची सुराणी । नवानिता न पुसे कोणी । केवळ ती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥१६॥ केवढी दोपाची सबळता । जालि पाहा हो

भगवंता । पुण्य धुंडावोनि संता । तीर्थी हारि आणिली ॥१७॥ भेणें मंद जालि मेघवृष्टी । अकांतली कांपे सृष्टी । देव रिघाले कपाटीं । आटाआटि प्रवर्तली ॥१८॥ आपिक धान्यें दिवसेंदिवसे । गाई म्हैसी चेवल्या गोरसें । नगरें दिसतीं उदासें । पिकलीं बहुवसें पाखांडे ॥१९॥ होम हरपलीं हवनें । यज्ञयाग अनुष्ठानें । जपतपादि साधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥२०॥ आठरा यातींचा व्यापार । करिती तस्कराई विप्र । सांडोनियां शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघुरती ॥२१॥ गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्री । अश्वाचिये परि कुमारी । विकिती वेद वक्ते ॥२२॥ वेदाध्ययनसंहितारुचि । भकांद्या करिती तयाची । आवडी पंडिताची । मुसाफावरी बैसली ॥२३॥ मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं उच्छेदुनि केलीं दिनें । कुडीं कपटी महा मोहनें । मिरवताती दुर्जनें ॥२४॥ कळा कुशळतां चतुराई । तर्कवादी भेद निंदेठायीं । त्रिधीनिषेधाच्या वाही । एकही ऐसी नाडलीं ॥२५॥ संन्यासी तापसी ब्रह्मचारी । होती बैरागी दिगांबर । निस्पृह काम क्रोधें व्यापिलें भारी । इच्छेकरी न सुटती ॥२६॥ कैसे विनाशकाळाचें कौतुक । राजे झाले प्रजांचे अंतक । पिते पुत्र सहोदर एकाएक । शत्रुघातें वर्तताती ॥२७॥ केवढी रांडेची अंगवण । भ्रमविलें अवघे जन । याती अठरा चारी वर्ण । कर्दम करूनि विटाळविलें ॥२८॥ पूर्वी होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ झालें । ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥२९॥ आतां असे आघवें । गति नव्हे कलीमध्यें वावरावे । देवाशी करुणा भाकावे । स्मरावें अंतरीं ॥३०॥ अगा ये वैकुंठनायका । काय पहातोसि कौतुका । धाव कलीनें गांजिलें लोका । देतो हाका सेवक तुकयाचा ॥३१॥

१९९९. केली हमोळां आंघोळी । येउनि बैसलों राउळी ॥१॥ आजिचें झालें भोजन । राम कृष्ण नारायण ॥२॥ तुकयाबंधु म्हणे नाश । नाहीं कल्पांतीं जयास ॥३॥

२०००. तुजलागीं माझा जीव झाला पिसा । अवलोकीतों दिशा पांडुरंगा ॥१॥ सांडिला वेव्हार माया लोकाचार । छंद निरंतर हाची मनीं ॥२॥ आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया शीण करिताती ॥३॥

प्राण हा वीकळ होय कासावीस । जीवनाविण मच्छ तयापरी ॥४॥ तुका म्हणे आतां कोणता उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥५॥

२००१. कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरि ठावा असेल तुम्हां कोणा ॥१॥ लागतसें पायां येतों लोटांगणीं । मात तरी कोणी सांगायाची ॥२॥ गुण रूप याचें वाणीतां या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥३॥ सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ॥४॥ तुका म्हणे गाई वत्सा ताडातोडी । तैसी जाती घडी येकी मज ॥५॥

२००२. विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळ धर्म देव विठ्ठल माझा ॥१॥ विठ्ठल माझा गुरू विठ्ठल माझा तारू । उतरिल पारू भवनदीचा ॥२॥ विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिण बंधु ॥३॥ विठ्ठल हे जन विठ्ठल माझें मन । सोयरा सज्जन विठ्ठल माझा ॥४॥ तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा । नश्वरित गांवा जाईन त्याच्या ॥५॥

२००३. येकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधलीया साधे काय तेथें ॥१॥ काय हातीं लागे भूसाचे कांडणीं । सत्यामी दाटणी करुनी ठेवी ॥२॥ कवित्वाची रूढी पायां पाडि जग । सुखावोनी मग नरका जाय ॥३॥ तुका म्हणे देवे केल्याविण साह्य । फजीति ती आहे लटिक्या अंगीं ॥४॥

२००४. भल्याचें दरुशन । तेथें शुभचीं वचन ॥१॥ बोलावी हे धर्मनीत । क्षोभें होत नाहीं हित ॥२॥ मर्यादा ते बरी । वेळ जाणावी चतुरीं ॥३॥ तुका म्हणे बहु । लागे ऐसें बरें मऊ ॥४॥

२००५. आवडीनें धरीलीं नावें । प्रियभावें चिंतन ॥१॥ वेडा झाला वेडा झाला । लाचावला भक्तीसी ॥२॥ निचाड हा चाड धरी । तुळसी करीं दळ मागें ॥३॥ धरिला मग न करी बळ । तुका म्हणे कळ पाईं ॥४॥

२००६. कंठीं राहो नाम । अंगीं भरूनीयां प्रेम ॥१॥ ऐसें कांहीं द्यावें दान । आलों पतीत शरण ॥२॥ संतांचीये पाईं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥३॥ तुका म्हणे तरे । भव सिंधु येकसरें ॥४ ॥

२००७. विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रम्हानंदें गर्जावें ॥१॥ वाहे टाळ

टाळ्या टाळी । होय होळी विघ्नांची ॥२॥ विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ॥३॥ तुका म्हणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आइका ॥४॥

२००८. पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे ॥१॥ पुंडलिका दिला वर । करुणाकर विठ्ठलें ॥२॥ मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लाउनी ॥३॥ तुका म्हणे खरें झालें । येका बोलें संतांच्या ॥४॥

२००९. अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीहि ॥१॥ ऐसीयाचा संग देईं नारायणा । बोलावा वचना जयांचीया ॥२॥ उत्तम सेवन शीतळ कंठासी । पुष्टिकांति तैसी दिसे वरी ॥३॥ तुका म्हणे तैसे होईजेत संगें । वास लागे अंगें चंदनाच्या ॥४॥

२०१०. पंढरीसी जा रे आल्या ना संसारा । दीनांचा सोयरा पांडुरंग ॥१॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळु तांतडी उतावीळ ॥२॥ मागील परीहार पुढें नाहीं शीण । झालीया दर्शन येक वेळा ॥३॥ तुका म्हणे नेदि आणिकाचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥४॥

२०११. न कळे कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें येकाचिया ॥१॥ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें येकाचिया ॥२॥ न बोलो तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें येकाचिया ॥३॥ न भेटे तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥४॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥५॥ तुका म्हणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥६॥

२०१२. बहुजन्में केला लाग । तो हा भाग लाधलों ॥१॥ जीव देईन हा बळी । करीन होळी संसारा ॥२॥ गेलें मग नये हाता । पुढती चिंता वाटतसे ॥३॥ तुका म्हणे तांतड करूं । पाय धरूं बळकट ॥४॥

२०१३. भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचका ज्ञानीयासी ॥१॥ आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ॥२॥ तुका म्हणे कृपा करील नारायण । तरीच हे वर्म ठाईं पडे ॥३॥

२०१४. दुधाळ गाढवी जरी झाली पाहे । पावेल ती काय धेनुसरी ॥१॥ कागाचीया गळां पुष्पांचीया माळा । हंसाची ते कळा काय जाणे

॥२॥ मर्कटें अंघोळी लावियेले टिळे । ब्राम्हणाचे लीळे वर्तू नेणे ॥३॥ जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट । तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥४॥

२०१५. देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करीतसे ॥१॥ भाग्य द्यावें तरि अंगीं भरे ताठा । म्हणोनी करंटा करुनी ठेवी ॥२॥ स्त्री द्यावी गुणवंती नस्ती गुंते आशा । यालागीं कर्कशा करुनी ठेवी ॥३॥ तुका म्हणे साक्ष मज आली देवा । आणिक या लोकां काय सांगों ॥४॥

२०१६. वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें मला ॥१॥ अंतरीं भरसी तें न चुके । मज का मारीतोसी भुकें ॥२॥ येरु म्हणे भला भला । निवाडा तुझ्या तोंडें झाला ॥३॥ देहे तो जाणार । घडेल हा उपकार ॥४॥ येरु म्हणे मनीं । ऐसें जावें समजुनी ॥५॥ गांठी पडली ठका ठका । त्याचि वर्म बोले तुका ॥६॥

२०१७. जेथें आठवीती स्वामीचे ते पाय । उत्तम तो ठाय रम्य स्थळ ॥१॥ रान अथवा घर येकांत लोकांत । समाधान चित्त तें घडी ॥२॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥३॥ तुका म्हणे लाभकाळ तेंचि जीणें । भाग्य नारायणें उत्तम तें ॥४॥

२०१८. तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥१॥ माझा बळिया नेणसी कोण । संता साह्य नारायण ॥२॥ शंख वधीला सागरीं । वेद घेउनि आला च्यारी ॥३॥ कूर्मं दैत्य वधिला जेठीं । हात पाय लपवी पोटीं ॥४॥ वराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढे ॥५॥ हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥६॥ वामन झाला दीनानाथ । बळि पाताळीं घातला दैत्य ॥७॥ छेदुनीयां सहस्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥८॥ शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषणा रावणा मारी ॥९॥ मारुनीयां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥१०॥ पांचालीसी गांजिता वैरी । वस्त्रें आपण झाला हरी ॥११॥ गजेंद्र स्मरे रामराम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥१२॥ तुका म्हणे हरिरूप झालें । पुन्हा जन्मा नाहीं आलें ॥१३॥

२०१९. सर्वांभूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारून । उपतिष्ठे कारण ।

तेथें बीज पेरिजे ॥१॥ पुण्य करितां होय पाप । दुध पाजोनी पोसीला साप । करुनी अघोराचा जप । दुःख विकत घेतलें ॥२॥ भूमीं पाहतां नाहीं वेगळी । माळ बरड येक काळी । उत्तम निराळी । मध्यम ते कनिष्ठ ॥३॥ म्हणोनी विवेकें । कांहीं करणें तें निकें । तुका म्हणे फिकें । रुचि नेदी मिष्टान्न ॥४॥

२०२०. वर्ततां वासर । काय करावें शरीर ॥१॥ ठेवा नेमून नेमून । माझें तुमचे पाईं मन ॥२॥ नेणावीया वृत्ति । कोठें फांकोची श्रीपति ॥३॥ तुका म्हणे भलें । जन्मां येऊनीयां ज्यालें ॥४॥

२०२१. केली प्रतिज्ञा मनासी । तरी मी दास सत्यत्वेसी । नेईन पायापासीं । स्वामी मूळ पंढरिये ॥१॥ तोंवरी हे भरी पोट । केला तो मिथ्या बोभाट । नाहीं सांपडली वाट । सयराट फिरतसे ॥२॥ जावें आदराचें जीणें । स्वामी कृपा करी तेणें । पाळिल्या वचनें । सख्यत्वाचा अनुभव॥३॥ घडे तैसें घडो आतां । मायाबापाची ते सत्ता । तुका म्हणे चिंता । काय पाहे मारग ॥४॥

२०२२. नेत्र झांकोनीयां काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं प्रेमभाव ॥१॥ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥२॥ मंत्र तंत्र कांहीं करिति जडीबुटी । तेणें भूतसृष्टि पावशील ॥३॥ तुका म्हणे ऐक सुंदर मंत्र येक । भवसिंधु तारक रामनाम ॥४॥

२०२३. संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ॥१॥ काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥२॥ शेप घेईन उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ॥३॥ तुका म्हणे संतांपाईं । जीव ठेविला निश्चयीं ॥४॥

२०२४. जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोवडे शब्द गोड॥१॥ आपुले आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वाटे ॥२॥ तुका म्हणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणतसे ॥३॥

२०२५. देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥१॥ गाईचें पाळण नयेचि विचारा । अश्वासीं खरारा करी अंगें ॥२॥ लेंकुराची गांड स्वयें धांवें क्षाळूं । न म्हणे प्रक्षाळूं द्विज पायां ॥३॥ तुका

म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातां यमलोका भोगावया ॥४॥

२०२६. ऊरा लावी ऊर आळंगितां कांता । संतांसी भेटतां अंगचोरी ॥१॥ अतित देखोनी होय पाठिमोरा । व्याह्यांसीं सामोरा जाय वेगीं ॥२॥ द्विजा नमस्कारां मनीं भाव कैचा । तुर्काचे दासीचा लेक होय ॥३॥ तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणी ॥४॥

२०२७. ब्रह्मज्ञान जगीं कळे उठाउठी । तरी कांहिं पुटी वेदशास्त्रें ॥१॥ शास्त्रांचें भांडण तप तीर्थाटण । पूर्वींच भ्रमण याजसाठीं ॥२॥ याजसाठीं जप याजसाठीं तप । व्यासेंहि अमुप ग्रंथ केले॥३॥ याजसाठीं संत पाय हे सेवावे । तरीच तरावे तुका म्हणे ॥४॥

२०२८. गायत्री विकुनी पोट जे जाळीती । तयां होय गती यमलोकीं ॥१॥ कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नर्कपाता ॥२॥ नाम गाऊनीयां द्रव्य जे मागती । नेणों तया गति कैसी होय ॥३॥ कैसें होईल त्यांचें तेचि हो जाणती । आम्हांसी संगति नलगे त्यांची ॥४॥ आमुचा सांगातीं आहे श्रीहरी । नलगे दुराचारी तुका म्हणे ॥५॥

२०२९. साधूच्या दर्शना लाजसी गव्हारा । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ॥१॥ वेश्या दासी मुरळी जगाची वोंगळी । ते तुज सोंवळी वाटे कैसी ॥२॥ तुका म्हणे आतां लाज धरीं बुच्या । टाचराच्या कुच्या मारा वेगीं ॥३॥

२०३०. राउळासीं जातां त्रास मानी मोठा । बैसे तो चोंहाटा आदेंसी न करितां स्नानसंध्या न म्हणे रामराम । गुडगुडींचें प्रेम अहर्निशीं ॥२॥ देव ब्राह्मणांसी न जाय शरण । दासीचे चरण वंदी भावें ॥३॥ सुगंध चंदन सांडोनिया माशी । बैसे दुर्गंधिसी अत्यादरें ॥४॥ तुका म्हणे अरे एक भाग्यहिना । कां रे रामराणा वीसरसी ॥५॥

२०३१. दुर्बुद्धी ते मना । कदा नुपजो नारायणा ॥१॥ आतां मज ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरी ॥२॥ उपजला भावो । तुझ्या कृपें सिद्धि जावो ॥३॥ तुका म्हणे आतां । लाभ नाहीं या परता ॥४॥

२०३२. तरुवर बीजापोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥१॥ तैसें तुम्हां आम्हां झालें । येकिं येक सामावलें ॥२॥ उदकावरील तरंग । तरंग उद-

काचें अंग ॥२॥ तुका म्हणे बिंबछाया । ठाईं पावली विलया ॥४॥

२०३३. साखरेच्या गोण्या बैलाचीये पाठीं । तयासी शेवटीं कडबा रे ॥१॥ मालाचे पैं पेठे वाहताति उंटें । तयालागिं कांटे भक्षावया ॥२॥ वाउगा हा धंदा आशा वाढवीती । बांधोनियां देती यमाहातीं ॥३॥ जयासी असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं बापुडीं सिणलीं वायां ॥४॥ तुका म्हणे शाहाणा होइ रे गव्हारा । चौऱ्याशींचा फेरा फिरूं नको ॥५॥

२०३४. चिरगुटें घालूनी वाढविलें पोट । गरवार बोभाट जनामध्यें ॥१॥ लटिकेची डोहळे दाखवी प्रकार । दूध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥२॥ तुका म्हणे अंतीं वांझ तेचि खरी । फजीती दुसरी जनामध्यें ॥३॥

२०३५. माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायांशीं न विसंबे ॥१॥ विसरतां रूप क्षण येक चित्तीं । जिवलग मूर्ति सांवळी ते ॥२॥ विसरतां हरि क्षण येक घडी । अंतरली जोडी लक्ष लाभ ॥३॥ तुका म्हणे माझ्या विठोबाचे पाय । संजीवनी आहे हृदयामाजी ॥४॥

२०३६. काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचताती पुढें संसाराचे ॥१॥ झाडा देते वेळे विचकती दांत । घेई यमदूत दंड वरी ॥२॥ हात दांत कान हालवीती मान । दावीती हें जन मानावया ॥३॥ तुका म्हणे किती झाली हे फजिती । मागें नाहीं मीत भार वाहे ॥४॥

२०३७. थोर ते गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥१॥ व्यर्थ भगभर केलें पाठांतर । जोंवरी अंतर शुद्ध नाहीं ॥२॥ घोडें काय थोडें वागवीती वोझें । भावावीण तैसें पाठांतर । तुका म्हणे धरा निष्ठावंत भाव । जरी पंढरिराव पाहिजे तो ॥४॥

२०३८. संतांच्या हेळणें बाटलें जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकांचें ॥१॥ भेसळीचें वीर्य ऐशा अनुभवें । आपुलें परावें नाहीं खळा ॥२॥ संतांचा जो शोध करीतो चांडाळ । धरावा वीटाळ बहु त्याचा ॥३॥ तुका म्हणे केली प्रतिज्ञा यासाठीं । कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ॥४॥

२०३९. जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥१॥ सांडोनियां वाळवंट । काय इच्छीसी वैकुंठ । खांदा पताकांचा भार । तुळसी माळा

आणि अबीर ॥३॥ साधुसंताच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥४॥

२०४०. बहु टाळाटाळी । होतो भोंवताहे कळी ॥१॥ बरें न होईल शेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥२॥ मुरगळीतां कान । घुसमाडिला सावधान ॥३॥ अबोलणा तुका । ऐसें कोणी लेखूं नका ॥४॥

२०४१. जिव्हे झाला चळ । नेघे औसान तें पळ ॥१॥ हेंचि वोसणावोनि उठी । देव सांठवीला पोटीं ॥२॥ नाहीं वोढा वारा । पडिला प्रसंग तो बरा ॥३॥ तुका म्हणे झाली । मज अनावर हे बोली ॥४॥

२०४२. गोहो यात्रा गांवा । ऐसे नवस करी आवा ॥१॥ केंचें पुण्य तिचे गांठीं । व्रतें वेंची लोभासाठीं ॥२॥ वाढावें संतान । गृहीं व्हावें धनधान्य ॥३॥ मागे गारगोटी । परीसाचे साटोवाटी ॥४॥ तुका म्हणे मोल । देउनि घेतला सोमल ॥५॥

२०४३. जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥१॥ बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥२॥ तट्टा वृषभासी दाणा । तृणा मागों नये जाणा ॥३॥ तुका म्हणे द्रव्य घेती । देति तेहि नरका जाती ॥४॥

२०४४. लंकेमाजी घरें किती तें आइका । सांगतमें संख्या जैसी तैसी ॥१॥ पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटेबंदी ॥२॥ कोटी घरें जेथें कांशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं सप्तकोटी ॥३॥ तुका म्हणे ज्यांची संपदा येवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥४॥

२०४५. व्यभिचारिणी गणिका कुंटणी । विश्वास तिचे मनीं राघोबाचा ॥१॥ ऐसी ही पापिणी वाहिली विमानीं । अचळ भूवनीं ठेवियेली ॥२॥ पतितपावन तिहीं लोकीं ठसा । कृपाळु कोवसा अनाथाचा । तुका म्हणे विठोबाची धरा सोय । आणिक उपाय नेणों किती ॥४॥

२०४६. गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें । जळामाजीं नक्रें पीडीलासे ॥१॥ सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साह्य । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥२॥ कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघां जणां तारियेलें ॥३॥ तुका म्हणे नेलें वाहूनी विमानीं । मीहि आयकोनी विश्वासलों ॥४॥

२०४७. कईं वाहावें जीवन । कईं पलंगीं शयन ॥१॥ जैसी जैसी वेळ

पडे । तैसें तैसें होणें घडे ॥२॥ कईं भोज्य नानापरी । कईं कोरड्या भाकरी ॥३॥ कईं बसावें वाहनीं । कईं पाईं अन्हवाणी ॥४॥ कईं उत्तम प्रावर्णे । कईं वसनें तीं जीर्णे ॥५॥ कईं सकळ संपत्ति । कईं भोगणें विपत्ति । कईं सज्जनांचा संग । कईं दुर्जनाचा योग ॥७॥ तुका म्हणे जाण । सुखदुःख तें समान ॥८॥

२०४८. उंच निंच कांहीं नेणें भगवंत । तिष्ठे भावभक्ति देखोनियां॥१॥ दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी ॥२॥ चर्म रंगूं लागे रोहिदासा संगें । कबीराचे मागें विणी शेले ॥३॥ सजन कसाया विकूं लागे मांस । माळी सावत्यास खुरपूं लागे ॥४॥ नरहरी सोनारा घडूं फुंकूं लागे । चोखामेळ्या संगें ढोरें वोढी ॥५॥ नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानीयाची भिंत अंगें वोढी ॥६॥ नामयाची जनी सवें वेंची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥७॥ अर्जुनाचे रथीं होय हा सारथि । भक्षी पोहे प्रीती सुदाम्याचे ॥८॥ गौळीयाचे घरीं आंगें गाई वळी । द्वारपाळ बळी द्वारीं झाला ॥९॥ येकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । अंबऋषीचे सोसी गर्भवास ॥१०॥ मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा झाला पाडेवार ॥११॥ घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥१२॥ पुंडलीकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात धन्य त्याची॥१३॥

२०४९. भेटिलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिस वाट तुझी ॥१॥ पौर्णिमेचा चंद्र चकोर जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥२॥ दिवाळीच्या मूळा लेकी असावली । पाहातसे वाटुली पंढरीची ॥३॥ भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परी माउलीची ॥४॥ तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवोनी श्रीमुख दावीं देवा ॥५॥

२०५०. आले संत पाय ठेविति मस्तकीं । इहीं उभय लोकीं सरता केलों ॥१॥ वंदिन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छा धणी फिटवाल॥२॥ अवघीं पूर्वपुण्यें झालीं सानुकूळ । औघेंचि मंगळ संतभेटी ॥३॥ तुका म्हणे कृतकृत्य झालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखे ॥४॥

२०५१. करी धंदा परि आवडती पाय । प्रीति सांगों काय नेणों देवा

॥१॥ रूप डोळां देखे सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥२॥ नेमुनी ठेविली काया हे कारणीं । आमुची हे वाणी गुण वदे ॥३॥ मनासी उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धन्याधन्य ॥४॥ उसंति तो पंथ वेठीचीया परी । जीवनसूत्र दोरीपाशीं वोढे । तुका म्हणे ऐसें करितों निर्वाण । जीव तुम्हा भिन्न नाहीं माझा ॥६॥

२०५२. कां रे पोरें माझीं म्हणवीती ढोरें । मायबाप खरें काय येक ॥१॥ कां रे गेले म्हणुनी करीसी तळमळ । मिथ्याच कोल्हाळ गेलीयाचा ॥२॥ कां रे माझें माझें म्हणसील गोत । न सोडवीं दूत यमाहातीं ॥३॥ कां रे मी बळिया म्हणवीसि ऐसा । सरणापासीं कैसा उचलसी ॥४॥ तुका म्हणे न धरि भरवसा कांहीं । वेगीं शरण जाई पांडुरंगा ॥५॥

२०५३. अगा करुणाकरा करीतसे धांवा । या मज सोडवा लवकरी ॥१॥ ऐकोनियां माझीं करुणेचीं उत्तरें । व्हावें नारायणें उतावीळ ॥२॥ मागें पुढें दिसे औघा रिता ठाव । ठेउनि पाई भाव वाट पाहें ॥३॥ उशीर तो आतां न पाहिजे केला । आहो जी विठ्ठला मायबापा ॥३॥ उरलें तें मज हेंची येक आतां । अवघे विचारीतां शून्य झालें ॥५॥ तुका म्हणे आतां करी कृपादान । पाउलें समान दावी डोळां ॥६॥

२०५४. न मनी तें ज्ञानी न मनी ते पंडित । ऐसे परिचे येकयेका भावें ॥१॥ धातु पोसुनीयां आणीका उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥२॥ न मनी तो योगी न मनी तो हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परींचीं ॥३॥ तुका म्हणे तया नमन बाह्यात्कारीं । आवडति परि चित्तशुद्धीचे ॥४॥

२०५५. कासया पाषाण पूजीती पितळ । अष्टधातु खळ भावहीन ॥१॥ भावाचि कारण भावाचि कारण । मोक्षाचें साधन बोलीयेलें ॥२॥ काय करिल जपमाळ कंठमाळा । करिसी वेळोवेळां विषयजप ॥३॥ काय ते करीसी पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥४॥ काय करिसील कुशळ गायन । अंतरीं मळीन कुबुद्धी तो ॥५॥ तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होसी ॥६॥

२०५६. अंतरींच गोड । राहे आवडीचें कोड ॥१॥ संघट्टणे येती

अंगा । गुणदोष मनोभंगा ॥२॥ उचिताच्या कळा । नाहीं कळत सकळा ॥३॥ तुका म्हणे अभावना । भावी मूळ तें पतना ॥४॥

२०५७. शिळा जया देव । तैसा फळे त्याचा भाव ॥१॥ होय जतन ते गोड । अंतराय येती नाड ॥२॥ देव जोडे भावें । इच्छेचें तें प्रेम घ्यावें ॥३॥ तुका म्हणे मोड दावी । तैशीं फळें आलीं व्हावीं ॥४॥

२०५८. कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुम्ही देवा संतजनीं ॥१॥ विचित्र विंदानीं नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥२॥ काय वानराचे अंगीचि तें शक्ति । उदकीं तरती वरी शिळा ॥३॥ तुका म्हणे करी निमित्तचि आड । चेष्टउनी जड दावी पुढें ॥४॥

२०५९. पाया पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पाईं ॥१॥ तरी हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ ॥२॥ काय उणें तुम्हा संताचिये घरीं । विदित यापरी सकळहि ॥३॥ तुका म्हणे माझी उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ॥४॥

२०६०. वदवावी वाणी माझी कृपावंता । वाक्पुष्प संतां समर्पिसी ॥१॥ सर्व संकटांचा तुम्हा परिहार । घालावा म्यां भार पांडुरंगा ॥२॥ येकसरें चित्त ठेवूनियां पाईं । झालों उतराई होतों तेणें ॥३॥ तुका म्हणे येथें झालें अवसान । कायावाचामनें वेंचूनियां ॥४॥

२०६१. न मावे हे पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचीया ॥१॥ कृपेचा वोरस न समाये पोटीं । म्हणोनी उफराटीं वचनें हीं ॥२॥ तुमची उष्टावळी तें माझें भोजन । झाडावें अंगण केर पुंजे ॥३॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझे गांठीं । जेणें पडे मिठी पायांसवें ॥४॥ तुका म्हणे राहे आठवण चित्तीं । ऐसी कृपा संतीं केली तुम्हा ॥५॥

२०६२. काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥१॥ काय नाहीं त्याची करितसे सेवा । काय नाहीं जीवा गोमटे ते॥२॥ अमंगळपणें कंटाळा न धरी । उचलोनी करी कंठी लावी ॥३॥ लेववी आपुले अंगें अळंकार । संतोषावें फार देखोनियां ॥४॥ तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हा लाज थोरी अंकिताची ॥७॥

२०६३. माझीया मीपणावरी पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें । पापा नाहीं पार दुःखाचे डोंगर । झालों ये भूमीसी ओझें ॥१॥ काय विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसें दुःख । नर नारी सकळ उत्तम चांडाळ । न पाहाती डोळां माझें मुख ॥२॥ काया वाचा मनें अघटित करणें । चर्म चक्षु हात पाय । निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणिक सांगों किती काय ॥३॥ लक्ष्मीमदें घडलें बहु दोष । पत्नी दोनी भेदाभेद । पितृवचनीं घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुचरवादी निंद्य ॥४॥ आणिक किती ते सांगा अवगुण । न वळे जिव्हा मन कांपे । भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट शब्दहीन ॥५॥ संत महानुभाव ऐका हें उत्तर । अवगुण अविचार बुद्धि पापा । तुका म्हणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ॥६॥

---

### कृष्णजन्माचे अभंग

२०६४. फिरविलीं दोन्हीं । कन्या आणि चक्रपाणी ॥१॥ झाला आनंदी आनंद । अवतरले गोविंद ॥२॥ तुटलीं बंधनें । वसुदेवदेवकीचें दरुशनें ॥३॥ गोकुळासी आलें । ब्रह्म अव्यक्त चांगलें ॥४॥ नंद दसवंती । धन्य देखील श्रीपती ॥५॥ निसी जन्माकाळ । आले अष्टमी गोपाळ ॥६॥ भार गेला सकळहि ॥ ७ तुका म्हणे कंसा । आठ भोवीला वोळसा ॥८॥

२०६५. सोडिल्या गांठी । दरुशन कृष्णा भेटी ॥१॥ करिती नारी अक्षयवाणें । जीवभाव देति दानें ॥२॥ उपजल्या काळें । रुपें मोहिलीं सकळें ॥३॥ तुका तेथें वारी । येकी आडुनी दूसरी ॥४॥

२०६६. सुख डोळां पाहे । तैशीच ते उभी राहे ॥१॥ केल्याविण नव्हे हातीं । धरुनि अरती परती ॥२॥ न धरिती मनीं । कांहीं संकोच दाटणी ॥३॥ तुका म्हणे देवें । वोस केल्या देहभावें ॥४॥

२०६७. गोकुळींच्या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥१॥ बाळकृष्ण नंदा घरीं । आनंदल्या नरनारी ॥२॥ गुढीया तोरणें । करिती कथा गाती गाणें ॥३॥ तुका म्हणे छंदें । येणें वेधीलें गोविंदें ॥४॥

२०६८. विटंबीला भट । दिल्हा पाठीवरी पाट ॥१॥ खोटें जाणोनी

अंतर । न साहेचि विश्वंभर ॥२॥ तेंचि करीं दान । जैसें आईकें वचन ॥३॥ तुका म्हणे देवें । पूतना शोषियेली जीवें ॥४॥

२०६९. प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें । न धरावी मनें । शुद्धि देशकाळाची ॥१॥ मुक्त लज्जाविरहीत । भाग्यवंत हरीभक्त । झाले वोसंडत । नामकीर्ति पवाडे ॥२॥ जोडि जाली अवीनाश । जन्मोनि झाले हरिचे दास । त्यांस नव्हे गर्भवास । सौरस परब्रह्मीं ॥३॥ हेचि वाहती संकल्प । पुण्य-प्रसंगाचे जप । तुका म्हणे पाप । नाहीं गांवीं हरिजना ॥४॥

२०७०. तोचि लटिकयामाजि भला । म्हणे देव म्यां देखिला ॥१॥ ऐसीयाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे ॥२॥ बुडवी आपणासरिसे । अभीमानें आणिकास ॥३॥ आणिक नाहीं जोडा । देव म्हणवी तया मूढा ॥४॥ आणिकाचे न मनी साचें । तुका म्हणे या श्रेष्ठाचें ॥५॥

२०७१. होईल झाला अंगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥१॥ येरांनीं सांगावी रेमट काहाणी । चित्ता रंजवणी करावया ॥२॥ धाला आणिकांची नेणें तानभूक । सुखें पाहें मुख आपुलीया ॥३॥ तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव । शब्दाचें गौरव कामा नये ॥४॥

२०७२. कां नवजावें बैसोनी कथे । ऐसें ऐका हो श्रोते । पांडुरंग तेथें । उभा असे तिष्ठत ॥१॥ म्हणवोनी करी धीर । लक्ष लावूनी सादर । भव-सिंधुपार । असेल ज्या तरणें ॥२॥ कथे कांहीं अणुमात्र । न बोलावें हा वृत्तांत । देवभक्तां चित्त । समरमी खंडण ॥३॥ का वैष्णवा पूजावें । ऐका घेईल जो भावें । चरणरजा शिवें । वोडवीला मस्तक ॥४॥ ऐसे जाणारे निभ्रांत । देव वैष्णवाचा अंकित । अलिप्त अतीत । परमित त्यासाठीं ॥५॥ घालोनी लोळणी । तुका आला लोटांगणीं । वंदी पायवणी । संतचरणींचें माथां ॥६॥

२०७३. अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसे ॥१॥ नव्हति हात-तुके बोल । मूळ ओल अंतरींची ॥२॥ उतरूनी दिल्हें कसीं । शुद्धरसीं सरते ॥३॥ तुका म्हणे दुसरें नाहीं । ऐसी ग्वाही गुजरली ॥४॥

२०७४. साधकाची दशा उदास असावी । उपाधी नसावी अंतर्बाह्य॥१॥

लोलुप्यता काय निद्रेसी जिणावें । भोजन करावें परिमित ॥२॥ येकांतीं लोकांतीं स्त्रियांसी भापण । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥३॥ तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥४॥

२०७५. अंतरींची ज्योति प्रकाशली दीप्ति । मुळींचि ती होती आच्छादिली ॥१॥ तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न माय । उपमेसी काय देऊं सुखा॥२॥ भावाचे मथिलें निर्गुण संचिलें । ते हे उभे केलें विटेवरी ॥३॥ तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी सांठवण ॥४॥

२०७६. कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥१॥ कासया गा मज घातलेंसे जन्मा । नाहीं तुझ्या प्रेमा नित्य नवा॥२॥ नामाविण माझी वाचा अमंगळ । ऐसा का चांडाळ निर्मियेला ॥३॥ तुका म्हणे माझी जळो जळो काया । विठ्ठल सखया वांचूनियां ॥४॥

२०७७. प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥१॥ सोस करितोसि वायां । भज मना पंढरिराया ॥२॥ प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे दुःख ॥३॥ प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥४॥

२०७८. हीन माझी याति । वरि स्तुति केली संतीं ॥१॥ अंगीं वसों पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥२॥ मी येक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥३॥ राख राख गेलों वायां । तुका म्हणे पंढरिराया ॥४॥

२०७९. माता कापी गळा । तेथें कोण राखे बाळा ॥१॥ हें कां नेणा नारायणा । मज चाळवीतां दीना ॥२॥ नागवी धांवणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥३॥ राजा सर्व हरि । तेथें दुजा कोण वारी ॥४॥ तुझ्या केल्यावीण । नव्हे स्थीर वश्य मन ॥५॥ तुका म्हणे हरि । सूत्र तुझ्या हातीं दोरी ॥६॥

२०८०. गाऊं नेणें परी मी कांहीं गाईन । शरण जाईन पांडुरंगा ॥१॥ ब्रह्मांड नायक मी त्याचा अंकित । काय यमदूत करिती काळ ॥२॥ वेश्या ज्याच्या नामें तारिली गणिका । अजामिळासारिखा पापराशी ॥३॥ चरणींच्या रजें अहिल्या तारिली । रूपवंत केली कुब्जा दासी ॥४॥ पृथिवी तारीली पाताळासी जातां । तुका म्हणे आतां आम्ही किती ॥५॥

२०८१. गाजराचि पुंगी । तैसे नव्हे झाले जोगी ॥१॥ काय करुनी

पठण । केली अहंता जतन ॥२॥ अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभीमान ॥३॥ तुका म्हणे लंड । त्याचें हाणुनि फोडा तोंड ॥४॥

२०८२. परद्रव्य परनारी । अभिलाषूनी नाक धरी ॥१॥ जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥२॥ सोवळ्याची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥३॥ तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥४॥

२०८३. टिळे टोपी उंच दावी । जगीं मी येक गोसावी ॥१॥ औघा वरपंग साग । पोटीं विषयाचा थारा ॥२॥ मुद्रा लावीतो कोरुनी । मान व्हावयासीं जनीं ॥३॥ तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती॥४॥

२०८४. ऐसे संत झाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥१॥ स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोढवली ॥२॥ भांगभुर्का हें साधन । पचीं पडे मद्यपान ॥३॥ तुका म्हणे अवघे सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥४॥

२०८५. जातीची शिंदळी । तिला कोण कसा वळी ॥१॥ अपघर ना बापघर । चिंति मनीं व्यभीचार ॥२॥ सेजे असोनिया धणी । परद्वार मना आणि ॥३॥ तुका म्हणे असली जाती । जातीसाठीं खाती माती ॥४॥

२०८६. आंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥१॥ हें कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥१॥ चाळवूनी हातीं । साकर म्हणुनी द्यावी माती ॥३॥ तुका म्हणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥४॥

२०८७. प्रीतीचिया बोला नाहीं पेंसपाड । भलतैसें गोड करूनी घेई ॥१॥ तैसे विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गाय नाम तुझें ॥२॥ वेडेवांकडे हे बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप । तुका म्हणे तुज येवो माझी दया । जीवीच्या सखया जिवलगा ॥४॥

२०८८ माझें मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥१॥ आतां आड उभा राहे नारायणा । दयासिंधूपणा साच करीं ॥२॥ वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां आधीन झालों देवा ॥३॥ तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥४॥

२०८९. वर्णावी ती थोरी येका विठोबाची । कीर्ति मानवाची बोलूं नये ॥१॥ उदंडचि झाले जन्मोनियां मेले । होऊनियां गेले राव रंक ॥२॥

त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साहि वेद चारी वर्णिताती ॥३॥ अक्षई आढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥४॥ तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरणव्यथा दूरी होती ॥५॥

२०९०. नको देऊं देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाठवीसी ॥१॥ नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो येक उद्वेग होय जीवा ॥२॥ तुका म्हणे करी फकिराचे परी । रात्रिदिवस हरि येईल वाचे ॥३॥

२०९१. जोडोनियां धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेंच करी ॥१॥ उत्तमचि गती तो येक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ॥२॥ परउपकार नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥३॥ भूतदया गाई पशूंचें पाळण । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥४॥ शांतिरूप नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडीलांचें ॥५॥ तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥६॥

२०९२. हरि म्हणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि म्हणतां ॥१॥ हरि म्हणतां भुक्ती हरि म्हणतां मुक्ती । चुके यातायाति हरि म्हणतां ॥२॥ तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि म्हणतां ॥३॥ तुका म्हणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुम्हां ॥४॥

२०९३ नये वाटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ॥१॥ पाय विठोबाचें चित्तीं । असों द्यावें दिवसरातीं ॥२॥ नये काकुळती । कोणा येऊं हरिभक्ति ॥३॥ तुका म्हणे साई । करिल कृपेची विठाई ॥४॥

२०९४. सकळ देवांचें दैवत । उभें असे या रंगांत ॥१॥ रंग लुटा माझे बाप । शुद्ध भावें खरें माप ॥२॥ रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादी संतीं ॥३॥ तुका लुटितां हे रंग । साह्य झाला पांडुरंग ॥४॥

२०९५. उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥१॥ मज दिल्हें कोणा हातीं । काय मानीली निश्चिंती ॥२॥ कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थीर ॥३॥ तुका म्हणे जीव । ऐशी भाकितसे कींव ॥४॥

२०९६. तुका वेडा अविचार । करी गडबड फार ॥१॥ नित्य वाचे हाची छंद । राम कृष्ण हरि गोविंद ॥२॥ धरीं पांडुरंगीं भाव । आणिक

नेणें दुजा देव ॥३॥ गुरुज्ञान सर्वां ठाईं । दूजें न विचारि कांहीं ॥४॥ बोल नावडे कोणाचे । कथे नागव्याची नाचे ॥५॥ संग उपचारें कांटाळे । सुखें भलतें ठाई लोळे ॥६॥ कांहीं उपदेशिलें नेणें । वाचे विठ्ठल विठ्ठल म्हणे ॥६॥ केला बहुतीं फजित । परि हेंची करी नित्य ॥८॥ अहो पंडित जन । तुका टाकावा थुंकोन ॥९॥

२०९७. आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ॥१॥ अंतरीं पापाच्या कोडी । वरि वरि बोडी डोई दाढी ॥२॥ बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥३॥ पाप गेल्याचि काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥४॥ भक्तिभावेंवीण । तुका म्हणे अवघा शीण ॥५॥

२०९८ तुज घालोनीयां पूजितों संपुष्टीं । परि तुझे पोटीं चौदा भुवनें ॥१॥ तुज नाचऊनी दाखऊं कवतूक । परि रूपरेख नाहीं तूज ॥२॥ तुजलागीं आम्ही गात असों गीत । परि तूं अतीत शब्दाहुनी ॥३॥ तुजलागीं आम्ही घातियेल्या माळा । परि तूं वेगळा कर्तृत्वासी ॥४॥ तुका म्हणे आतां होऊनी परमीत । माझें कांहीं हीत विचारावें ॥५॥

२०९९. पापाची मी रासी । सेवाचोर पायांपासी ॥१॥ करा दंड नारायणा । माझ्या मानाची खंडणा ॥३॥ जना हातीं सेवा । घेतों लंडपणें देवा ॥३॥ तुझा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥४॥

२१००. दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥१॥ ध्यान लागे ऐसें हरी । तुझ्या चरणीं तैशापरी ॥२॥ आवतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥३ लोभ्या काळांतराची आस । बोटें मोजी दिवस मास ॥४॥ तुका म्हणे पंढरिनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥५॥

२१०१. लागोनीयां पायां विनवितों तुम्हांला । कर टाळी बोला मुखीं नाम ॥१॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळो वेळां । हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥२॥ कृष्णा विष्णु हरि गोविंद गोपाळा । मार्ग हा प्रांजळ वैकुंठीचा ॥४॥ सकाळांसी येथें आहे अधिकार । कलियुगीं उद्धार हरिनामें ॥४॥ तुका म्हणे नामापासीं चारी मुक्ति । ऐसें बहुतां ग्रंथीं बोलीयेलें ॥५॥

२१०२. लटिकें हांस लटिकें रडे । लटिकें उडे लटिक्यापें ॥१॥ लटिकें

माझें लटिकें तुझें । लटिकें वोझें लटिक्याचें ॥२॥ लटिकें गाय लटिकें ध्याय । लटिकें जाय लटिक्यापें ॥३॥ लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जगमाया ॥४॥ लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ॥५॥

२१०३. झालों म्हणती त्याचें मज वाटे आश्चर्य । ऐका नव्हे धीर वचन माझें ॥१॥ शिजलीया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेसी चाखत न कळे कैसें ॥२॥ तापलीया तेलें बावन चंदन । बुंद येक क्षण शीतळ करी ॥३॥ पारखीतो जाणे अंतरीचा भेद । मूढ जना छंद लावण्याचा ॥४॥ तुका म्हणे कैसी निवडे आपण । शुद्ध मंद हीन जैसें तैसें ॥५॥

२१०४. हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥१॥ ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥२॥ वाहील्या उद्वेग दुःखाचि केवळ । भोगणें तें बळ संचिताचें ॥३॥ तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापाईं ॥४॥

२१०५. जन्मा येणें घडे पातकाचें मुळें । संचिताचें फळ आपुलिया ॥१॥ मग वायांवीण दुःख वाहों नये । रुसोनियां काय देवावरी ॥२॥ ठाउकाचि आहे संसार दुःखाचा । चित्तीं शीण याचा वाहूं नये ॥३॥ तुका म्हणे नाम त्याचें आठवावें । तेणें विसरावें जन्म दुःख ॥४॥

२१०६. आतां माझें नका वानूं गुणदोष । करितों उपदेश याचा कांहीं ॥१॥ मानदंभासाठीं छळीतसे कोणा । आण या चरणा विठोबाची ॥२॥ तुका म्हणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥३॥

देवांनीं स्वामीस चिंचवडास नेलें ते वेळचे अभंग ५

२१०७. वांझा गाई दुभती । देवा ऐशी तुझी ख्याती ॥१॥ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥२॥ चातक पाखरूं । त्यासि वरुषे मेघधारु ॥३॥ पक्षी राजहंस । अमोलीक मोतीं त्यास ॥४॥ तुका म्हणे देवा । कां गा खोंचलासी जीवा ॥५॥

२१०८. परतें मी आहें सहजचि दूरी । वेगळें भीकारि नामरूपा ॥१॥ नलगे रुसावें धरावा संकोच । सहज तें नीच आलें भागा ॥२॥

पडियेलें ठाईं उच्छिष्ट सेवावें । आर्त तेची देवें केलें ऐसें ॥३॥ तुका म्हणे तुम्ही आम्हां जी वेगळे । केले तें निराळे द्विज देवें ॥४॥

२१०९. चिंतामणी देवा गणपतीसी आणा । करवावें भोजना दुजे पात्रीं ॥१॥ देव म्हणाति तुम्या येवढी कैंची थोरी । अभिमाना भीतरीं नागवलों ॥२॥ वाढ वेळ झाला शिळें झालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ॥३॥ तुका म्हणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरितें मोरयासी ॥४॥

२११०. भोक्ता नारायण लक्षुमीचा पति । म्हणोनी प्राणाहुति घेतलीया ॥१॥ भर्ता आणि भोक्ता कर्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ॥२॥ विश्वंभर कृपादृष्टि सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥३॥ कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका म्हणे ॥४॥

२१११. माझा स्वामी तुझी वागवितों लात । तेथें मी पतीत काय आलों ॥१॥ तीर्थें तुमच्या चरणीं झालीं पैं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वानूं ॥२॥ तुका म्हणे तुम्ही देवा द्विजवंद्य । मी तो काय निंद्य हीन याती ॥३॥

२११२. वंदिलें वंदावें जीवाचीयासांठीं । किंवा वरि तूटी आरंभींच ॥१॥ स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंची मोल धीरा अंगीं ॥२॥ शिंपीलें तें रोप वरावरी बरें । वाळलीया पुरें कोंभ नये ॥३॥ तुका म्हणे टांकी घाय देवपण । फुटलीया जन कुह्या पुसी ॥४॥

२११३. आम्हा विष्णुदासां हेंचि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥१॥ वाणी नाहीं घ्यावें आपुलीया हातें । करूनियां चित्तें समाधान ॥१॥ तुका म्हणे द्रव्य मिळवीलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ॥३॥

२११४. सुखाचे व्हेव्हारीं सुख लाभ झाला । आनंद कोंदला मागें पुढें ॥१॥ संगती पंगती देवासवें घडे । नित्य नित्य पडे तेची सांचा ॥२॥ समर्थाचे घरीं सकळ संपदा । नाहीं तुटी कदा कासयाची ॥३॥ तुका म्हणे येथें लाभाचिया कोटी । बहु वाव पोटीं समर्थाचे ॥४॥

२११५. काय देवा खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥१॥ म्हणतां गजरें राम येकसरें । जळती थोर पापें भयधाकें ॥२॥ काय खोळंबिलें हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥३॥ कोण लोकीं

सांग घातला बाहेरी । म्हणतां हरि हरि तुका म्हणे ॥४॥

२११६. उत्तम त्या याती । देवा शरण अनन्यगती ॥१॥ नाहीं दुजा ठाव । कोणि उत्तम मध्यम भाव ॥२॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ती अंगीं दिसे ॥३॥ भाविक विश्वासी । तुका म्हणे नमन त्यासी ॥४॥

२११७. भय हरीजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥१॥ नारायण ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥२॥ चित्त वित्त हेवा । समर्पूनी रहा देवा ॥३॥ तुका म्हणे मन । असों द्यावें समाधान ॥४॥

२११८. आयुष्य मोजाया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारीं संसाराच्या ॥१॥ नेइल बोढुनी ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरीवीण ॥२॥ कठिण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तये ठाईं ॥३॥ राहातील दुरी सज्जन सोयरीं । आठवीं श्रीहरी लवलाहीं ॥४॥ तुका म्हणे किती करीसी लंडाई । होईल भंडाई थोर पुढें ॥५॥

२११९. होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥१॥ हाटीयाची गोष्टी मोडोनी टाकावी । सोयहि धरावी विठोबाची ॥२॥ आपुले आधीन करूनीयां ठेवा । नाहीं तरी जीवा घातक हें ॥३॥ तुका म्हणे झाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥४॥

२१२०. नामावीण काय वाऊगी चावट । वाया वटवट हरीवीण ॥१॥ फुकटची सांगे लोकांचीया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥२॥ मेळवोनि चाट करी सुरापान । विषयाच्या गुणें मातलासे ॥३॥ बैसोनी टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥४॥ बळें यम दांत खाये तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥५॥ तुका म्हणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठवीला ॥६॥

२१२१. संत गाती हरिकीर्तनीं । त्याचें घेईन पायवणी ॥१॥ हेंचि तप तीर्थ माझें । आणिक मी नेणें दुजें ॥२॥ काया कुर्वंडि करीन । संत महंत वोवाळीन ॥३॥ संत महंत माझी पूजा । आन भाव नाहीं दुजा ॥४॥ तुका म्हणे नेणे कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥५॥

२१२२. झालें भांडवल । अवघा पिकला विठ्ठल ॥१॥ आतां वाणी

कशासाठीं । धीर धरावाच पोटीं ॥२॥ आपुल्या ंकोचें । म्हणऊनी तेथें टाचे ॥३॥ घेतां खऱ्या मापें । तुका देखुनीया सोपें ॥४॥

२१२३. शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥१॥ रवि रसा सकळां शोषी । गुण दोषीं न लिंपे ॥२॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥३॥ सत्य तरि ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं ॥४॥

२१२४. अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवें तोचि तापे जाऊनियां ॥१॥ उदक म्हणे काय या हो मज प्यावें । तृषीत तो धांवे सेवावया ॥२॥ काय वस्त्र म्हणे घ्या वो मज नेसा । आपुल्या स्वइच्छा जग वोढी ॥३॥ तुकया स्वामी म्हणे काय मज स्मरा । आपुल्या उद्धारा लागोनियां ॥४॥

२१२५. भक्त देवाघरचा सुणा । देव भक्तांचा पोसणा ॥१॥ येरयेरा जडले कैसे । जीवा अंग जैसें तैसें ॥२॥ देव भक्तांची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥३॥ तुका म्हणे अंगें । येक येकाचीया संगें ॥४॥

२१२६. बरव्याबरवंट । विटे चरण सम नीट ॥१॥ ते म्यां हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ॥२॥ सकळां तीर्थां अधिष्ठान । करि लक्ष्मी संवाहन ॥३॥ तुका म्हणे अंतीं । ठाव मागीतला संतीं ॥४॥

२१२७. मांस चर्म हाडें देवा अवघींच गोडें ॥१॥ जे जे हरि रंगीं रंगले । कांहीं न वजे वायां गेले ॥२॥ वेद खाय शंखासुर । त्याचें वागवी कलेवर ॥३॥ तुका म्हणे ऐसा । बराडीया भक्तीरसा ॥४॥

२१२८. कोणा चिंता आड । कोणा लोकलाज नाड ॥१॥ कैचा राम अभागीया । करी बडबड वायां ॥२॥ स्मरणाचा राग । क्रोधें विटाळलें अंग ॥३॥ तुका म्हणे जडा । काय चाले त्या दगडा ॥४॥

२१२९. आपलीया काज । आम्ही सांडियेली लाज ॥१॥ तुम्हा असों जागवीत । आपुलीये हातीं हीत ॥२॥ तुम्ही देहशून्य । आम्हा कळे पाप-पुण्य ॥३॥ सांगायासी लोकां । उरउरित उरला तुका ॥४॥

२१३०. सत्य आम्हा मनीं । नहो गाबाळाचे धणी ॥१॥ ऐसें जाणारे सकळ । भरा शुद्ध टाका मळ ॥२॥ देतो तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥३॥ तुका म्हणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ॥४॥

२१३१. शिकऊनी हीत । सोई लावावें हें नीत ॥१॥ त्याग करूं नये खरें । ऐसें विचारावें बरें ॥२॥ तुमचिया तोंडें । धर्माअधर्माचीं खंडें ॥३॥ मजसाठीं देवा । कां हो लपविला हेवा ॥४॥ झाला सावधान । त्यासी घालावें भोजन ॥५॥ तुका म्हणे पिता । वरि बाळाच्या तो हिता ॥६॥

२१३२. सुख सुखा भेटे । मग तांडिल्या न तुटे ॥१॥ रवि रश्मिकळा । नये घालितां पैं डोळा ॥२॥ दुरि तें जवळी । स्नेहें आकाश कवळी ॥३॥ तुका म्हणे चित्त । माझें पाईं अखंडित ॥४॥

२१३३. तुम्हा न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥१॥ फुकासाठीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥२॥ कृपेचे भुकेले । होय जीवदान केलें ॥३॥ तुका म्हणे शीकविलें । माझें एकावें विठ्ठलें ॥४॥

२१३४. लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म उपाव ॥१॥ आतां कळेल तें करीं । सिस तुझे हातीं सुरी ॥२॥ अधिकार नाहीं । पूजा करितां ऐसा कांहीं ॥३॥ मन जाणे पापा । तुका म्हणे मायबापा ॥४॥

२१३५. येक म्हणे भले । आणिका सहज निंदिलें ॥१॥ कांहीं न करितां मायास । सहज घडले ते दोष ॥२॥ बरें वाईटाचें । कांहीं मज नाहीं साचें ॥३॥ तुका म्हणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥४॥

२१३६. आणिलें शेवटा । आतां कामा नये फाटा ॥१॥ मज आपुलासा म्हणा । उदारिया नारायणा ॥२॥ वेचियेली वाणी । युक्ति अवघी चरणीं ॥३॥ तुका धरी पाय । क्षमा करोनी अन्याय ॥४॥

२१३७. न करा टांचणी । येथें कांहीं अडचणी ॥१॥ जिव्हा अमुप करी माप । विठ्ठल पिकला माझा बाप ॥२॥ आठही पाहार । बारा मास निरंतर ॥३॥ तुका म्हणे सर्वकाळ । अवघा गोविंद गोपाळ ॥४॥

२१३८. तुझ्या नामाची आवडी । आम्ही विठो तुझीं वेडीं ॥१॥ आतां न वजों आणिका ठायां । गावों गीत लागों पायां ॥२॥ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥३॥ संतसमागममेळ । प्रेमसुखाचा सुकाळ ॥४॥ तुका म्हणे तुझ्या पाईं । जन्ममरणा ठाव नाहीं ॥५॥

२१३९. साखरेच्या योगें वर्ख । राजा कागदातें देख ॥१॥ तैसें आम्हा

माणुसपण । रामनाम कोण्या गुणे ॥२॥ फिरंगीच्या युगें करी । राजा काष्ठ हातीं धरी ॥३॥ रत्नकनकयोगें लाख । कंठीं धरिती श्रीमंत लोक ॥४॥ देवा देवपाट । देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ॥५॥ ब्रह्मानंद योगें तुका । पढियंता जनलोका ॥६॥

२१४०. धनवंतालागीं । सर्वमान्यता आहे जगीं ॥१॥ माता पिता बंधू जन । सर्व मानीती वचन ॥२॥ जव मोठा चाले धंदा । तव बहिण म्हणे दादा ॥३॥ सदा शृंगार भूषणें । कांता लवे बहुमानें ॥४॥ तुका म्हणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥५॥

२१४१. न विचारितां ठायाठाव । काय भुंके तो गाढव ॥१॥ केला तैसा लाहे दंड । खळ अविचारी लंड ॥२॥ करावें लाताळें । ऐसें नेणे कोण्या काळें ॥३॥ न कळे उचित । तुका म्हणे नीत हीत ॥४॥

२१४२. कंठीं नाम सिक्का । आतां कळिकाळासी धक्का ॥१॥ रोखा माना का सिक्का माना । रोखा सिक्का तत्समाना ॥२॥ रोखा न माना का सिक्का न माना । जतन करा नाक काना ॥३॥ सिक्का न मानी रावण । त्याचें केलें निसंतान ॥४॥ सिक्का मानी हाळाहाळ । झालें सर्वांग शीतळ ॥५॥ तुका म्हणे नाम सिक्का । पटीं बैसलों निजसुखा ॥६॥

२१४३. भूतीं देव म्हणुनी भेटतों या जना । नाहीं हें भावना नरनारी ॥१॥ जाणो भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥२॥ दयेसाठीं केला उपाधि पसारा । जड जीवा तारा नाव कथा ॥३॥ तुका म्हणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरूनीयां ॥४॥

२१४४. हारपल्याची नका चिंतीं । धरूं खंती वायाच ॥१॥ पावलें तें म्हणे देवा । सहज सेवा या नांवें ॥२॥ होणार तें भोगें घडे । लाभ जोडे संकल्पें ॥३॥ तुका म्हणे मोकळें मन । अवघें पुण्य या नांव ॥४॥

२१४५. नेसणें आलें होतें गळ्या । लोक रळ्या करिती ॥१॥ आपणिया सावरिलें । जग भलें आपण ॥२॥ संबंध तुटला येणें । जागेपणें चेष्टाचा ॥३॥ भलतिसवें होतीं आंगें । बासर वेगें पडिलें ॥४॥ मावरिलें नीट वोजा । दृष्टीलाजा पुढिलांच्या ॥५॥ बरें उघडले डोळे । हाळहाळे-

पासुनी ॥६॥ तुका म्हणे विटंबना । नारायणा चुकली ॥७॥

२१४६. जिव्हा जाणे फिके मधूर कीं क्षार । येर मास पर हाता न कळे ॥१॥ देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदुःखें कळों येती ॥२॥ परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । येकाचें कारण येका नये ॥३॥ येके देहीं भिन्न दाविंयेल्या कळा । नाचवी पुतळा सूत्रधारी ॥४॥ तुका म्हणे ऐसी जयाची सत्ता । कां तया अनंता विसरलेती ॥५॥

२१४७. नलगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥१॥ मग जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥२॥ तुका म्हणे कई होईल स्वहित । निधान जो थीत ठाकूं पाहे ॥३॥

२१४८. मोलें वेचुनीयां धुंडिती सेवका । आम्ही तरी फुका मागों बळें ॥१॥ नसतां जवळी हित फार करूं । जीवभाव धरूं तुझे पाईं ॥२॥ नेदूं भोग आम्ही आपुल्या शरीरा । तुम्हासी दातार व्हावें म्हणून ॥३॥ कीर्ति तुझी करूं आमुचे सायास । तूं कां रे उदास पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे तुज काय मागों आम्ही । फुकाचें कां ना भी म्हणसीना ॥५॥

२१४९ काय लवणकणिकेविण । येक क्षण सागर ॥१॥ मा हे येवढी अडचणी । नारायणी मजविण ॥२॥ कुबेर अट्टाहास जोडी । काय कवडी कारणें ॥३॥ तुका म्हणे कांचमणी । कोण गणी भांडारीं ॥४॥

२१५०. तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥१॥ तूं माझा आकार । मी तो तूंचि निरधार ॥२॥ मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या आंगे सेवा ॥३॥ मी तुजमाजि अचळ । मजमाजी तुझें बळ ॥४॥ तूं बोलसी माझ्या मुखें । मी तो तुजमाजी सुखें ॥५॥ तुका म्हणे देवा । विपरीत ठाई नांवा ॥६॥

२१५१. वैराग्याचें भाग्य । संतसंग हाची लाभ ॥१॥ संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥२॥ तोचि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥३॥ तुका प्रेमें नाचे गाय । गाणियांत विरोन जाय ॥४॥

२१५२. जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ॥१॥ राहें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥२॥

कीर्तनीं समाधी साधन ते मुद्रा । राहातील थारा धरुनियां ॥३॥ तुका म्हणे मुक्ति हरिदासाच्या घरीं । वोळंगती चारी रिद्धिसिद्धि ॥४॥

२१५३. नाहीं तुज कांहीं मागत संपत्ति । आठवण चित्तीं असों द्यावी ॥१॥ सरलीया भोग येईन शेवटीं । पायापें या भेटी अनुसंधानें ॥२॥ आतां मज यासाठीं याल आकारास । रोकडी हे आस नाहीं देवा ॥३॥ तुका म्हणे मूर्खीं असों तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ ॥४॥

२१५४. हितावरि यावें । कोणी बोलिलों या भावें ॥१॥ नव्हती विनोद उत्तरें । केलें रंजवाया चारे ॥२॥ केली आटाआटी । अक्षराची देवासाठीं ॥३॥ तुका म्हणे खिजो । नका जागा येथें निजों ॥४॥

२१५५. संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा झाला नारायण ॥१॥ नाहीं आम्हासी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ॥२॥ द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें ॥३॥ तुका म्हणे हरि आम्हा माजी क्रीडा करि ॥४॥

२१५६. नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा ॥१॥ धांव बुडतों मी काढी । सत्ता आपुलिया वोढी ॥२॥ क्रियाकर्महीन । झालों इंद्रिया आधीन ॥३॥ तुका विनंती करी । वेळोंवेळां पाय धरी ॥४॥

२१५७. जयापासुनि सकळ । महिमंडळ हें झाली ॥१॥ तो येक पंढरिचा राणा । नये अनुमान श्रुतीसी ॥२॥ विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥३॥ तुका म्हणे तो आकळ । आहे सकळ व्यापक ॥४॥

२१५८. नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धरावया ॥१॥ जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥२॥ नाहीं आकार विकार । चराचर भरलेसें ॥२॥ नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥४॥ तुका म्हणे भावावीण । त्याचें मन वोळेना ॥५॥

२१५९. आहे सकळां वेगळा । खेळे कळा चोरूनी ॥१॥ खांबसूत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥२॥ आपण राहोनी नीराळा । कैसी कळा नाचवी ॥३॥ जेव्हां आसुडितां दोरी । भूमीवरि पडे तेव्हां ॥४॥ तुका म्हणे तो जाणावा । सखा करावा आपुला ॥५॥

२१६०. आतां पुढें मना । चाली झाली नारायणा ॥१॥ तेथें राहिलें

राहिलें । कैसे गुंतोनि उगलें ॥२॥ भोवते भोवणी । आलियाची ऐसी धणी ॥३॥ तुका म्हणे रंगें । रंगे रंगलों पांडुरंगें ॥४॥

२१६१. आळस पाडी विषयकामीं । शक्ति देईं तुझ्या नामीं ॥१॥ आणिक वचना मुकी वाणी । तुमच्या गर्जो द्यावी गुणीं ॥२॥ हेचि विनवणी । विनविली धरा मनीं ॥३॥ तुका म्हणे पाय डोळा । पाहे येरवीं आंधळा ॥४॥

२१६२. कोण वेंचीं वाणी । आतां क्षुल्लका कारणीं ॥१॥ आतां हेंचि काम करूं । विठ्ठल हृदयांत धरूं ॥२॥ नेदावीया वृत्ति । आतां उठोंची बहुती ॥३॥ उपदेश लोकां । करुनी वेडा होतो तुका ॥४॥

२१६३. मागेन तें येक तुज । देईं विचारूनी मज । नको दुर्जनाचा संग । क्षणक्षणा चित्तभंग ॥२॥ जन्म घेईन मी नाना । बहु सोसीन यातना ॥३॥ रंक होईन दीनाचा । घायें देहपात साचा ॥४॥ तुका म्हणे हेची आतां । देईं देईं तूं सर्वथा ॥५॥

२१६४. जाणसी उचित । पांडुरंगा धर्मनीत ॥१॥ तरि बोलावें तें काईं । सरे ऐसें तुझे पाईं ॥२॥ पालटती क्षणे । संचित प्रारब्ध क्रियमाणे ॥३॥ तुका म्हणे सत्ता । होसि सकळ करिता ॥४॥

२१६५. तुम्ही कांटाळलां तरी । आम्हा न सोडणें हरी ॥१॥ जावें कवणीया ठाया । सांगा विनवितों पाया ॥२॥ केली जीवा साठीं । आतां सुखें लागा पाठीं ॥३॥ तुका म्हणे ठाव । न सोडणें हाचि भाव ॥४॥

२१६६. येऊनी संसारीं । मी तो जाणे येक हरी ॥१॥ नेणें आणिक कांहीं धंदा । नित्य ध्यातसे गोविंदा ॥२॥ काम क्रोध लोभ स्वार्थ । औघा माझा पंढरिनाथ ॥३॥ तुका म्हणे येक । धणी विठ्ठल मी सेवक ॥४॥

२१६७. सर्वपक्षीं हरि साह्य सखा झाला । वद्धचा अंगणीच्या कल्पलता त्याला ॥१॥ सहजचाली चालतां पायवाटे । चिंतामणीसमान होति गोटे ॥२॥ ऐसें हरिभक्ताचें ज्ञान महिमान । अतर्क्य तयाचें दुर्लभ दरुशन ॥३॥ तुका तरि सहज बोले वाणी । त्यांचे घरीं वेदांत वाहे पाणी ॥४॥

२१६८. आम्हां घरीं गाये येक दुभताहे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥१॥ वान ते सांवळी नाव ते श्रीधरा । चरे वसुंधरा चवदा भुवनें ॥२॥

वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय । कुर्वाळी तों लाहे भावभरणा ॥३॥ चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धालें सनकादिक सिद्धमुनी ॥४॥ तुका म्हणे माझी भूक तेथें काय । जोगावीति माय तिन्ही लोक ॥५॥

२१६९. काय पुण्य असें आहे मजपाशीं । तातडि धांवसी पांडुरंगा ॥१॥ काय ऐसा भक्त वायां गेलों थोर । तूं मज सामोरा होसी वेगा ॥२॥ काय कष्ट माझे देखिली चाकरी । तो तूं झडकरी पाचारिसी ॥३॥ कोण मी नांवाचा थोर गेलों मोठा । अपराधी करंटा नारायणा ॥४॥ तुका म्हणे नाहीं ठाउकें संचित । येणे जन्में हित नाहीं केलें ॥५॥

२१७०. आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरून राहिलासी ॥१॥ समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्हा आठवण वांचूनियां ॥२॥ चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाचे मुळें सांभाळावे ॥३॥ तुका म्हणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनी हरि बुझवावें ॥४॥

२१७१. आम्हां मेलों तेव्हां देह दिल्हा देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥१॥ सुत्रधारी जैसा हालवितो कळा । नाचवी पुतळा नाचें छंदें ॥२॥ बोलतसें जैसे बोलवीतो देव । नाहीं हा संदेह कासयाचा ॥३॥ पापपुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आम्हासवें ॥४॥ तुका म्हणे तुम्ही आईका हो मात । आम्ही या अतीत देहाहूनी ॥५॥

२१७२. लागो नेदी बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आन ॥१॥ परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनी धन नीच मानी ॥२॥ तुका म्हणे याची लाज असे कोणा । साहाकारी दीना ज्याची तया ॥३॥

२१७३. हेचि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥१॥ सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या ताहान भूक जाय ॥२॥ दुरिल जवळी आपणचि होतें । कवळीलें चित्तें जीवनासी ॥३॥ तुका म्हणे नाम घेता वेळोंवेळां । होतील सकळा शीतळ नाडी ॥४॥

२१७४. आपुलीया बळें नाहीं मी बोलवत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥१॥ साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शीकविता धणी वेगळाची ॥२॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलवीलें ॥३॥

तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायावीण ॥४॥

२१७५. हित सांगे तेणें दिल्हें जीवदान । घातकी तो जाण मनामागें ॥१॥ बळें हे वारावे अधर्म करितां । आंधळे चालतां आडरानें ॥२॥ द्रव्य देवोनियां धाडावें तीर्थासी । नेदावें चोरासी चंद्रबळ ॥३॥ तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं । नाहीं माझी वाणी पदरींची ॥४॥

२१७६. ऐसा घेई कां संन्यास । करि संकल्पाचा नाश ॥१॥ मग तूं राहें भलते ठाईं । जनीं वनीं खाटे भाई ॥२॥ तोडीं जाणिवेची कळा । होई वृत्तींसी वेगळा ॥३॥ तुका म्हणे नभा । होईं अणूचाही गाभा ॥४॥

२१७७. सोळा सहस्र होउं येतें । भरिलें रितें आम्हांपै ॥१॥ ऐसे तुम्ही ठायां ठाव । देव म्हणून संपादे ॥२॥ कैंची चिरामध्यें चिरे । मना बरे आले तें ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । अंगसंगा भिन्न परा ॥४॥

२१७८. इहलोकीं आम्हा भूषण अवकळा । भोंपळा वाकळा अन्न भिक्षा ॥१॥ निमोली संपदा भयाविरहित । सर्वकाळ चित्त समाधान ॥२॥ छिद्राचा आश्रम उंदीर कुळवाडी । धन नाम जोडी देवाची ते ॥३॥ तुका म्हणे येके शेवटीं राहाणें । वर्तंतो या जना विरहित ॥४॥

२१७९. गाऊं नेणें कळा कुसरी । कान धरुनी म्हणे हरि ॥१॥ माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥२॥ मज हांसतील लोक । परि मी गाईन निःशंक ॥३॥ तुझे नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥४॥ तुका म्हणे माझी विनंती । तुम्ही परिसा कमळापती ॥५॥

२१८०. विष पोटीं सर्पा । जन भीत तया दर्पा ॥१॥ पंच भूतें नाहीं भिन्न । गुण दुःख देती शीण ॥२॥ चंदन प्रिय वासें । आवडति जाती ऐसें ॥३॥ तुका म्हणे दाणा । कुचर मिळों नये अन्ना ॥४॥

२१८१. देव अवघें प्रतिपादी । वंदी सकळां येका निंदी ॥१॥ तेणें अवघें गेलों वायां । वीष घांसे येके ठायां ॥२॥ सर्वांग कुरवाळी । उपटी एक रोमावळी ॥३॥ तुका म्हणे चित्त । नाहीं जयाचें अंकित ॥४॥

२१८२. मज माझा उपदेश । आणिका नये याचा रीस ॥१॥ तुम्ही अवघे पांडुरंग । मीचि दुष्ट सकळ चांग ॥२॥ तुमचा मी शरणागत । कांहीं

करा माझें हित ॥३॥ तुका पाय धरीं । मी हें माझें दूर करी ॥४॥

२१८३. जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवति ॥१॥ मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवावीण कळों नये ॥२॥ तुका म्हणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥३॥

२१८४. अभिमानी पांडुरंग । गोवा कशाचा हा मग ॥१॥ अनुसरा लवलाहीं । नका विचार करूं कांहीं ॥२॥ कोठें राहातील पापें । जाहालीया हो अनुतापें ॥३॥ तुका म्हणे येचि घडी । उभ्या पाववील थडी ॥४॥

२१८५. तुझें वर्म हातीं । दिल्हें सांगोनीयां संतीं ॥१॥ मुखीं नाम धरी कंठीं । अवघा सांठवीन पोटीं ॥२॥ नवविधा वेढिन आधीं । सांपड- लासी भावासंधी ॥३॥ तुका म्हणे बळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥४॥

२१८६. माझ्या मना लागो चाळा । पाहावया विठ्ठल डोळां ॥१॥ आणिक नाहीं चाड । नलगे संसार हा गोड ॥२॥ तरीच फळ जन्मा आलों । सरतां पांडुरंगीं झालों ॥३॥ तुका म्हणे देवा । देई चरणाची सेवा ॥४॥

२१८७. आवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥१॥ गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ॥२॥ औघी सुखाचीच रासी । पुंडली- कासी वोळली ॥३॥ तुका म्हणे जवळी आले । उभे ठेले समचरणीं ॥४॥

२१८८. देह तुझ्या पाईं । ठेवोनि झालों उतराई ॥१॥ आतां माझ्या जीवा । करणें तें करीं देवा ॥२॥ बहुता अपराधी । मतिमंद हीन बुद्धी ॥३॥ तुका म्हणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥४॥

२१८९. जन हें सुखाचें दिल्हा घेतल्याचें । अंतहि काळींचें नाहीं कोण्ही ॥१॥ झाल्या हीन शक्ति नाक डोळे गळती । सांडोनियां पळती रांडापोरें ॥२॥ बाईल म्हणे खर मरता तरी बरें । नाशीलें हें घर थुंकोणियां ॥३॥ तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥४॥

२१९०. जाणोनी नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखुण देवोनियां ॥१॥ मग मी वेव्हारीं असेन वर्तत । जेवीं जळां आंत पद्मपत्र ॥२॥ ऐकोनी नाईके निंदा स्तुति कानीं । जैसा कां उन्मनी योगीराज ॥३॥ देखोनी न

देखे प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टी चेवविल्या जेवीं ॥४॥ तुका म्हणे ऐसें झालीया वांचून । करणें तें शीण वाटतसे ॥५॥

२१९१. विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥१॥ कां रे कृपाळू न होसी । काय झालें मजविशीं ॥२॥ झाल्या येरझारा । जन्म बहुतांचा फेरा ॥३॥ तुका म्हणे नष्टा । अवोलण्या तुझ्या चेष्टा ॥४॥

२१९२. प्रपंच वोसरो । चित्त तुझे पाईं मुरो ॥१॥ ऐसें करीं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावें रंगा ॥२॥ पुरे पुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥३॥ लटिकें तें फेडा । तुका म्हणे जावो पीडा ॥४॥

२१९३. बोलाचें गौरव । नव्हे माझा अनुभव ॥१॥ माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांची पांगीली ॥२॥ व्याली वाढविलें । निजपदीं निजविलें ॥३॥ दाटली वोरसें । त्रिभुवनीं ब्रह्मरसें ॥४॥ विष्णु जोडी कर । माथां रज वंदी हार ॥५॥ तुका म्हणे बळ । तोडरीं हा कळिकाळ ॥५॥

२१९४. शेवट तो भला । माझा बहु गोड झाला ॥१॥ आलों निजाच्या माहेरा । भेटी रखुमाईच्या वरा ॥२॥ परिहार झाला । औघ्या दुःखाचा मागीला ॥३॥ तुका म्हणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥४॥

२१९५. तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था ॥१॥ तुझ्या नामाचा विश्वास । आम्हा कैचा गर्भवास ॥२॥ तुझ्या नामीं विसर पडे । तरी कोटि हत्या घडे ॥३॥ नाम घ्यारे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥४॥

२१९६. बाइल तरी ऐसी व्हावी नरका गोवी अनिवार ॥१॥ घडों नेदी तीर्थयात्रा । केला कुत्रा हातसोका ॥२॥ आपुलीच करवि सेवा । पूजवी देवासारिखे ॥३॥ तुका म्हणे गाढव पशू । केला नाशू आयुष्या ॥४॥

२१९७. बाईले आधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या अवलोकनें पडिजे द्वाड । कासयातें जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारुड्याच्या ॥२॥ बाईलेच्या मना येईल तें खरें । अभागी ते पुरे बाइलेचे ॥३॥ तुका म्हणे मेंग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ॥ ४ ॥

२१९८. जगीं मान्य केलें हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे

पुढें ॥१॥ करितों कवित्व जोडितों अक्षरें । येणें काय पुरें झालें माझें ॥२॥ तोंवरी हे माझी न सरे करकर । जों नव्हे विचार तुझ्या मुखें ॥३॥ तुका म्हणे तुज पुंडलिकाची आण । जरि कांहीं वचन करिसी मज ॥४॥

२१९९. झड मारोनीयां बैसलों पंगती । उठवितां फजिती दातयाची ॥१॥ काय तें उचित तुम्हा का न कळे । कांहो झांका डोळे पांडुरंगा ॥२॥ घेईन इच्छेचें मागोनी सकळ । नाहीं नव्हे काळ बोलायाचा ॥३॥ तुका म्हणे झालों माना अधिकारी । नाहीं लोकां परी लाज देवा ॥४॥

२२००. माझ्या वडिलाची मिरासी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥१॥ उपवास पारणीं राखिला दारवंटा । केला भोगवटा आम्हालागीं ॥२॥ वंशपरंपरा दास मी अंकित । तुका मोकलीतां लाज कोणा ॥३॥

२२०१. नाम न वदे ज्याची वाचा । तो लेंक दो बापाचा ॥१॥ हेचि वोळख तयाची । खुण जाण अभक्ताची ॥२॥ ज्यासि विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥३॥ ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातीचा तो मांग ॥४॥ नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ॥५॥ तुका म्हणे तेचि दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥६॥

२२०२. पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥१॥ तारियेले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥२॥ द्रौपदी बहीण वैरी गांजियेली । आपणाऐशी केली पांडुरंगा ॥३॥ प्रल्हादा-कारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा ॥४॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडीला । आपणा ऐसा केला पांडुरंगा ॥५॥ तुका म्हणे तुज शरण निजभावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा ॥६॥

२२०३. कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजि असे सार मोल तया ॥१॥ आणिकहि तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तया ॥२॥ काय रूपें असे परिस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥३॥ फीरंगीं आटितां नये बारा रुके । गुणें मोल विके सहस्रवरी ॥४॥ तुका म्हणे नाहीं जाति-सवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ॥५॥

२२०४. नव्हे मी स्वतंत्र आंगाचा पाईक । जें हें सकळिक सत्ता वारू

॥१॥ तुम्हा आळवावें पाउलापाउलीं । कृपेची साउली करी मज ॥२॥ शक्तिहीन तरी झालों शरणागत । आपुला वृत्तांत जाणोनियां ॥३॥ तुका म्हणे भवाभेणें धरिले पाय । आणिक उपाय नेणों कांहीं ॥४॥

२२०५. पाहूं ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं । नाहीं ऐसी मती अर्थ कळे ॥१॥ होईल तें हो या विठोबाचे नांवें । आर्चिले ते भावें जीवीं धरूं ॥२॥ येखादा अंगाशीं येईल प्रकार । विचारितां फार युक्ति वाढे ॥३॥ तुका म्हणे अळी करितां गोमटी । मायबापा पोटीं येती दया ॥४॥

२२०६. पाहतां रूप डोळां भरे । अंतर नुरे वेगळें ॥१॥ इच्छावसे खेळ मांडी । अवघें सांडी बाहेरी ॥२॥ तो हा नंदनंदन बाई गे । यासी काय परिचार ॥३॥ दिसतो हा नव्हे तैसा । असे दिशाव्यापक ॥४॥ लाघव हा खेळेसाठीं । होता भेटी परतेना ॥५॥ म्हणोनी उभी ठाकलींये । परतलींये या वाटा ॥६॥ आड करूनीयां तुका । जो या लोका दाखवितो ॥७॥

२२०७. इंद्रियांचीं दिनें । आम्ही केलों नारायणें ॥१॥ म्हणवोनी ऐसें सोसीं । काय सांगो कोणापाशीं ॥२॥ नाहीं आंगीं बळ । त्याग करिसा सकळ ॥३॥ तुका म्हणे मोटें । प्रारब्धें होती खोटें ॥४॥

२२०८. हातीं धरूं जावें । तेणें परतेंचि व्हावें ॥१॥ ऐसा कांहो आला वाटा । हीन भाग्याचा करंटा ॥२॥ देव ना संसार । दोहीं ठाईं नाहीं थार ॥३॥ तुका म्हणे पीक । भूमी नेदी न मिळे भिक ॥४॥

२२०९. मोलें घातलें रडाया । नाहीं असु आणि माया ॥१॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥२॥ वेठीं धरिल्या दावि भाव । मागें पळायाचा पाव ॥३॥ काजव्याचे जोती । तुका म्हणे नलगे वाती ॥४॥

२२१०. तरीच जन्मा यावें । दास विठोबाचें व्हावें ॥१॥ नाहीं तरी काय थोडी । श्वानसूकर बापुडीं ॥२॥ जन्मल्याचें तें फळ । आंगीं लागों नेदी मळ ॥३॥ तुका म्हणे भले । ज्याच्या नांवें मानवले ॥४॥

२२११. द्या जी माझा विचारूनीया विभाग । न खंडे हा लाग अहाचपणें ॥१॥ किती नेणों तुम्हा साहाते कटकट । आम्हींच वाईट निवडलों ते ॥२॥ करितां कलह जीवाचीयेसाठीं । हे तुम्हा वोखटी ढाळ

देवा ॥३॥ तुका म्हणे धीर कारण आपुला । तुम्ही तों विठ्ठला मायातीत ॥४॥

२२१२. आम्हुचे ठाउके तुम्हा गर्भवास । बळिवंत दोष केले भोग ॥१॥ काय हा सांगावा नसता नवलाव । मैंदपणें भाव भुलवण्याचा ॥२॥ येका पळवोनी येका पाठी लावा । कवतुक देवा पाहावया ॥३॥ तुका म्हणे ऐसें जेणें चेतवीलें । त्याच्यानें उगलें कैसें नव्हे ॥४॥

२२१३. निर्दयासी तुम्ही करितां दंडण । तुमचें गाऱ्हाणें कोणें द्यावें ॥१॥ भाकीतों करुणा आईकती कान । उगलेंचि मौन धरिलें ऐसें ॥२॥ दीनपणें पाहे पाय भीडावोनी । मंजुळ वचनीं विनवीतसे ॥३॥ तुका म्हणे गाठी मनासी उकला । काय जी विठ्ठला पाहातसां ॥४॥

२२१४. नसतों केविलवाणें । कांहीं तुमच्या कृपादानें ॥१॥ हेचि तयाची वोळखी । धालें टवटवीत मुखी ॥२॥ वायां जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥३॥ तुका म्हणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥४॥

२२१५. झालों तंव साचें । दास राहावणें काचें ॥१॥ हें कां मिळतें उचिता । तुम्ही नेणा कृपावंत ॥२॥ सिंहाचीं तें पिलें । जाय घेऊनीयां कोल्हें ॥३॥ तुका म्हणे नास । आम्हा म्हणवीलीया दास ॥४॥

२२१६. देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभरें ॥१॥ लोभाचे संकल्प पळालीया वरी । कैची तेथें उरी पापपुण्या ॥२॥ शुद्ध भक्ति मन झालीया निर्मळ । कुश्चळीं, विटाळ वज्रलेप ॥३॥ तुका म्हणे ज्याचें तयासीच कळे । प्रांत येतो फळे कळों मग ॥४॥

२२१७. कडसणी धरितां अडचणीचा ठाव । म्हणवोनी जीव त्रासलासे ॥१॥ लौकिका बाहेरी राहिलों निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥२॥ संकोचानें नाहीं होत धणिवरी । उरउनी उरी काय काज ॥३॥ तुका म्हणे केलें इच्छेचि सारखें । नाहींसे पारिखें येथें कोण्ही ॥४॥

२२१८. हेंचि जतन करा दान । धरुनी चरण राहिलों ते ॥१॥ आणिक कांहीं न घालीं भार । बहु फार सांकडें ॥२॥ घ्यावि माझ्या हातें सेवा । हेचि देवा विनवणी ॥३॥ तुका तुमचा म्हणवी दास । त्याचि आस पुरवावी ॥४॥

२२१९. आपुल्याच फुंदें । जेथें तेथें घेती छंदें ॥१॥ पडिला सत्याचा दुष्काळ । बहु चौकशी फार झाली घोळ ॥२॥ विश्वासाचा माठ । त्याचें कपाळीं ते नाट ॥३॥ तुका म्हणे घाणा । मुढा तीर्थप्रदक्षिणा ॥४॥

२२२०. उद्वेगाची धांव बैसली आसनीं । पडिले नारायणीं मोटळें हें ॥१॥ सकळ निश्चिंती झाली हा भरवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ॥२॥ आपुलीया नांवें नाहीं आम्हा जीणें । अभिमान तेणें नेला देवें ॥३॥ तुका म्हणे चळे येकाचीया सत्ता । आपुले मी रीतापण ऐसे ॥४॥

२२२१. बहुतां पुरे ऐसा वाण । आलें धन घरासी ॥१॥ घ्यारे फुका मोलेंविण । नारायण न भूला ॥२॥ ऐका नीवळल्या मनें । बरवे कानें सादर ॥३॥ तुका म्हणे करूनि अंतीं । निश्चिती ते ठेवावी ॥४॥

२२२२. माझी मज जाती आवरली देवा । नव्हता या गोवा इंद्रियांचा ॥१॥ कासया मी तुझा म्हणवीतों दास । असतो उदास सर्वभावें ॥२॥ भयाचिया भेणें धरियली कास । न पुरतां आस काय थोरी ॥३॥ तुका म्हणे आपआपली जतन । कैचें थोरपण मग तुम्हा ॥४॥

२२२३. विनवीतो तरि आणीतोसी परी । याचकानें थोरि दातयाची ॥१॥ आमुचेही काहीं आसों उपकार । येकल्यानें थोर कैचे तुम्ही ॥२॥ न घ्यावी जी कांहीं बहुसाल सेवा । गौरव तो देवा यत्न कीजे ॥३॥ तुका म्हणे नाहीं आमुचि मीरासी । असावेसी ऐसी दुर्बळेंची ॥४॥

२२२४. एका ऐसें येक होतें कोण्या काळें । समर्थाचे बळें काय नव्हे ॥१॥ घालोनी बैसलों मीरासीसी पाया । जिंकों देवराया संदेह नाहीं ॥२॥ केला तो न संडी आतां कईवाड । वारिन हे आड कामक्रोध ॥३॥ तुका म्हणे झाली आळशाची धाडी । नव्हति आली जोडी कळों सात्र ॥४॥

२२२५. झालें समाधान । तुमचे धरिले चरण ॥१॥ आतां उठावेंसें मना । येत नाहीं नारायणा ॥२॥ सुखाडिकपणें । येथें सांपडलें केणें ॥३॥ तुका म्हणे भोग । गेला निवारला लाग ॥४॥

२२२६. मुखाकडे वास । पाहे करूनियां आस ॥१॥ आतां होईल तें शीरीं । मनोगत आज्ञाधारी ॥२॥ तुम्ही अंगीकार । केला पाहिजे तो सार

॥३॥ तुका म्हणे दारीं । उभे याचक मी हरी ॥४॥

२२२७. नाहीं माथा भार । तुम्ही घेत हा विचार ॥१॥ जाणोनियां ऐसें केलें । दुरिल अंगासी लाविलें ॥२॥ आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडोघडी ॥३॥ तुका म्हणे दुरी । देवा खोटी ऐसी ऊरी ॥४॥

२२२८. माझें जड भारी । आतां अवघे तुम्हांवरी ॥१॥ झालों अंकित अंकीला । तुमचा मुकलों मागीला ॥२॥ करिती जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥३॥ तुका पाया लागे । कांहीं नेदी ना न मागें ॥४॥

२२२९. तुम्ही आम्ही भले आतां । झालों चिंता काशाची ॥१॥ आपुलाले आलों स्थळीं । मौन कळि वाढेना ॥२॥ सहज मनीं होतें । तें उचीतें घडलें ॥३॥ तुका म्हणे नसतें अंगा । येत सांगा सारिखें ॥४॥

२२३०. चित्ता ऐसी नको देऊं आठवण । जेणें देवाचे चरण अंतरती॥१॥ आलीया वचन रामनामध्वनी । आयकावी कानीं ऐसा गोडी ॥२॥ मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेवीण जीवा दुःख देतो ॥३॥ तुका म्हणे राहे अंतरीं शीतळ । शांतिचें तें बळ क्षमा अंगीं ॥४॥

२२३१. तरिच हा जीव संसारीं उदास । धरीला विश्वास तुम्हा सोई ॥१॥ येके जातीवीण नाहीं कळवळा । वोढली गोपाळा सूत्रदोरी ॥२॥ फुटतसे प्राण क्षणाच्या विसरें । हें तों परस्परें सारिखेंची ॥३॥ तुका म्हणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारिला ॥४॥

२२३२. किती विवंचना करितसे जीवीं । मन धांवडवी दाही दिशा ॥१॥ कोणा येका भावें तुम्ही अंगीकार । करावा विचार याजसाठीं ॥२॥ इतर ते आतां लाभ तुच्छ झाले । अनुभव आले गुणागुण ॥३॥ तुका म्हणे लागो अखंड समाधी । जावें प्रेमबोधीं बुडोनीयां ॥४॥

२२३३. दिकचि नाहीं संसारसंबंधा । तुटेना या बाधा भवरोगाची ॥१॥ तातडि ते करी म्हणोनी तातडी । साधीली ते घडी सोनीयाची ॥२॥ संकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली । प्रारब्ध तें घाली गर्भवासा ॥३॥ तुका म्हणे बीजें जाळुनी सकळ । करावे गोपाळें आपुले भाट ॥४॥

२२३४. आतां होईन धरणेकरी । भीतरीच कोंडीन ॥१॥ नाहीं केली

जीवेसाठीं । तों कां गोष्टि रुचे ते ॥२॥ आधीं निर्धार तो सार । मग भार सोसीन ॥३॥ तुका म्हणे खाऊं जेऊं । नेदु होऊं वेगळा ॥४॥

२२३५. होईल तरी पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥१॥ तोंवरि मी पुढें कांहीं । आपुले नाहीं घालित ॥२॥ जाणोनिया अंतर देव । जेव्हां भेव फेडील । तुका म्हणे धरील हातीं । करील खंती वेगळें ॥४॥

२२३६. हा तो नव्हे कांहीं निराशेचा ठाव । भले पोटीं वाव राखिलीया ॥१॥ विश्वंभरें विश्वा सामाविलें पोटीं । तेथेंचि शेवटीं आम्ही असों ॥२॥ नेणतां चिंतन करितों अंतरीं । तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥३॥ तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा । पुरवूं खुणे खुणा जाणतसो ॥४॥

२२३७. निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोवळा सगुणें प्रतिपाळी ॥१॥ केलाच करावा केला कईवाड । होईल तें गोड न पुरतें ॥२॥ मथिलिया लागे नवनीत हातां । नासे वितळतां अहाच तें ॥३॥ तुका म्हणे आतां मनासीं विचार । करावा तो सार येकचित्त ॥४॥

२२३८. बहु देवा बरें झालें । नसतें गेलें सोवळें ॥१॥ धोवटासी पडिली गांठी । जगजेठी प्रसादें ॥२॥ गादल्याचा झाला झाडा । गेली पीडा विकल्प ॥३॥ तुका म्हणे बराबरी । निर्मळ करी निर्मळा ॥४॥

२२३९. स्वामित्वाचीं वर्में असोनि जवळी । वाहों जावें मोळी गुणासवें ॥१॥ काबाडापासोनी सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥२॥ धनंवत्र्याचिये अंगीं सत्ताबळ । व्याधि ते सकळ तोडावया ॥३॥ तुका म्हणे आलें मोडयासी कोंपट । सांडोव्याची वाट विसरावी ॥४॥

२२४०. ऋणाच्या परिहारा झालों बोळंगणा । द्यावी नारायणा वासलाती ॥१॥ झालों उतराई शरीरसंकल्पें । चुको द्यावीं पापें सकळहि ॥२॥ आजिवरी होतो धरूनी जिवासीं । व्याजीं कासावीस बहु केलें ॥३॥ तुका म्हणे मना आणिला म्यां भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ॥४॥

२२४१. येणें पांगें पायांपासीं । निश्चयेसी राहेन ॥१॥ सांगीतली करीन सेवा । सकळ देवा दास्यत्व ॥२॥ बंधनाची तुटली बेडी । हेचि जोडी मग आम्हा ॥३॥ तुका म्हणे नव्हे क्षण । पायावीण वेगळा ॥४॥

२२४२. आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करुनी घ्याल ॥१॥ उद्धारासी काय उद्धाराचें काम । वाढऊंचि श्रम नये देवा ॥२॥ करा मजसाठीं आतां वाड पोट । ठावें नाहीं तंट झाले लोकीं ॥३॥ तुका म्हणे बाकी झडलियावरी ॥३॥ न पडे वेव्हारीं संचिताचे ॥४॥

२२४३. सर्वसंगीं वीट आला । तूं येकला आवडसी ॥१॥ दिल्ही आतां पाईं मिठी । जगजेठी न सोडीं ॥२॥ बहु झालों खेदक्षीण । येणें शीण तो नासे ॥३॥ तुका म्हणे गंगवास । बहु त्या आस स्थळाची ॥४॥

२२४४. शीतळ तें शीतळाहुनी । पायवणि चरणीचे ॥१॥ सेवन हें शिरसा धरी । अंतरीं ही वरदळा ॥२॥ अवघेंचि नाशी पाप । तीर्थ बाप माझ्याचे ॥३॥ बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ॥४॥

२२४५. गोदे कांठीं होता आड । करूनी कोड कौतुकें ॥१॥ देखण्यानें येक केलें । आईत्या नेलें जीवनापें ॥२॥ राखोनीयां होतों ठाव । अल्प जीव लावोनी ॥३॥ तुका म्हणे फिटे धणी । हे सज्जनीं विश्रांती ॥४॥

२२४६. न पाहे माघारें आतां परतोनी । संसारा पासोनी विटला जीव ॥१॥ सामोरे येऊनी कवळी दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥२॥ सावधान चित्त होईल आधारें । खेळतांही बरें वाटईल ॥३॥ तुका म्हणे कंठ दाटला या सोसें । न पवेचि कैसे जवळी हे ॥४॥

२२४७. मथनींचें नवनीत । सर्व हीतकारक ॥१॥ दंडवत दंडापरि । मागें उरी न उरावी ॥२॥ वचनाचा तो पसरु काईं । तातडी डोईपासींच ॥३॥ तुका म्हणे जगजेठी । लावीं कंठीं उचलोनी ॥४॥

२२४८. अवचिताची हातीं ठेवा । दिल्हा सेवा न करितां ॥१॥ भाग्य फळलें झाली भेटी । नेघे तुटी यावरी ॥२॥ दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आतां यावरी ॥३॥ तुका म्हणे वांटा झाला । बोलों बोल देवासी ॥४॥

२२४९. समर्थाची धरिली कास । आतां नाश कशाचा ॥१॥ धांवे पावे करिल लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥२॥ नलगे मज पाहाणे दिशा । हाकेसरसा वोढसी ॥३॥ तुका म्हणे नव्हे धीर । तुम्हा स्थीर दयेनें ॥४॥

२२५०. करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण ॥१॥ जिहीं केला

मूर्तिमंत । ऐसा संतप्रसाद ॥२॥ सोज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागिल्या ॥३॥ तुका म्हणे घेऊं धांवा । करूं हावा तें जोडी ॥४॥

२२५१. अचळ न चळे ऐसें झालें मन । धरूनी निज खूण राहिलोंसे ॥१॥ आवडी बैसली गुणाची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥२॥ येकविध भाव नव्हे अभावना । आणिक या गुणा न मीळवे ॥३॥ तुका म्हणे माझे पडिलें आहारीं । ध्यान विटेवरी ठाकलें तें ॥४॥

२२५२. वैष्णवा संगती सुख वाटे जीवा । आणिक मी देवा कांहीं नेणें ॥१॥ गाय नाचे उडे आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥२॥ लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ॥३॥ तुका म्हणे आतां आपुल्या सायासें । आम्हा जगदीशें सांभाळावें ॥४॥

२२५३. शरण शरण वाणी । शरण त्रिवाचा विनवणी ॥१॥ स्तुति न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासांचा ॥२॥ देह न सांभाळून । पायांवरी लोटांगण ॥३॥ विनवी तुका संतां दीन । नव्हे गौरवें उत्तीर्ण ॥४॥

२२५४. लेंकरा लेववी माता आळंकार । नाहीं अंत पार आवडीसी ॥१॥ कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ॥२॥ आरुष उत्तरीं संतोषे माउली । कवळुनी घाली हृदयांत ॥३॥ पोटा आलें त्याचे नेणे गुणदोष । कल्याणाची आस असावी हे ॥४॥ मनाची ते चाली मोहाचीये सोई । वोघ गंगा काई परतो जाणे ॥५॥ तुका म्हणे कोठें उदार मेघा शक्ति । माझी तृषा किती चातकाची ॥६॥

२२५५. युक्ति तंव झाल्या कुंठीत सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥१॥ संतचरणीं भावें ठविलें मस्तक । जोडोनी हस्तक राहिलोंसें ॥२॥ जाणपणें नेणें कांहींच प्रकार । साक्षीनें अंतर अंतरासी ॥३॥ तुका म्हणे तुम्हीं केलें अभयदान । तेणें समाधान राहिलोंसें ॥४॥

२२५६. हागे आलों म्हणे कोण्ही बुडतीया । तेणें किती तया बळ चढे ॥१॥ तुम्ही तंव भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ॥२॥ भुकेलिया आस दाविता निर्धार । किती होय धीर समाधान ॥३॥ तुका म्हणे दिल्ही चिंतामणीसाठीं । उचित कांचवटी दंडवत ॥४॥

२२५७. कैसा तो देखिला होसील गोपाळीं । पुण्यवंतां डोळीं नारायणा ॥१॥ तेणें लोभें जीव झालासे बराडी । आम्ही ऐसी जोडी कई लाभों ॥२॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभवीतां ॥३॥ तुका म्हणे वाटे देशी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥४॥

२२५८. कासया या लोभें केलें आर्तभूत । सांगा माझें चित्त नारायणा ॥१॥ चातकाचे परि येकचि निर्धार । लक्षभेदी तीर फिरा नेणे ॥२॥ सांवळे रूपडे चतुर्भूज मूर्ति । कृष्णराम चित्तीं संकल्प हा ॥३॥ तुका म्हणे करीं आवडिसी ठाव । नको माझा भाव भंगूं देऊं ॥४॥

२२५९. काय माझा पण होईल लटिका । ब्रीदावळी लोकां दावीली ते ॥१॥ खरी करूनियां देई माझी आळी । येउनी कुर्वाळी पांडुरंगें ॥२॥ आणिक म्यां कोणा म्हणवावें हातीं । नये काकुळती दुजीयासी ॥३॥ तुका म्हणे मज येथींची वोळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥४॥

२२६०. तुम्हा आम्हा जंव झालीया समान । तेथें कोणाकोण सनमानी ॥१॥ उरि तों राहिली गोमटें गौरव । वोढे माझा जीव पायांपाशीं ॥२॥ नेणपणें आम्ही आळवूं वोरसें । बोलवीतो रसें शब्दरत्नें ॥३॥ तुका म्हणे लळे पाळीं वो विठ्ठलें । काय हे उरवीले भेदाभेद ॥४॥

२२६१. नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळ्याचा वाद करीतसे ॥१॥ कासयानें बळ करूं पायांपाशीं । भाकावी ते दासी करुणा आम्ही ॥२॥ काय मज चाड असे या लौकीके । परि असे नीकें अनुभवावे ॥३॥ लांचावल्यासाठीं वचनाची आळी । ठकल्यानें घोळी जवळी मन ॥४॥ वाटतसे आस पुरवीसी ऐसें । तरी अंगीं पिसें लावियेलें ॥५॥ तुका म्हणे माझी येथेंचि आवडी । श्रीमुखाची गोडी इच्छीतसें ॥६॥

२२६२. जन्मा आलीयाचा लाभ । पद्मनाभ दरुशनें ॥१॥ म्हणउनी लवलाहें । पाय आहें चिंतित ॥२॥ पाठीलागा येतो काळ । तूं कृपाळ माउली ॥३॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥४॥ कोण्या उपाय हें घडे । भव अंगडें सुटकेचें ॥५॥ तुका म्हणे तूं जननी । ये निर्वाणी विठ्ठले ॥६॥

२२६३. जेणें वाढे अपकीर्ति । सर्वाअर्थी तें त्यजावें ॥१॥ सत्य रुचे भलेपण । वचन तें जगासी ॥२॥ होईजे तें शूर त्यागें । वाउगें तें सारावें ॥३॥ तुका म्हणे खोटें वर्म । निंद्य कर्म काळिमा ॥४॥

२२६४. याची सवे लागली जीवा । गोडी हेवा संगाचा ॥१॥ परतें न सरवे दूरी । क्षण हरीपासूनी ॥२॥ झालें तरी काय तंट । आतां चट न सांडे ॥३॥ तुका म्हणे चक्रचाळे । वेड बळें लाविलें ॥४॥

२२६५. याचा तंत्र हाचि मोळा । देखिला डोळा उदंड ॥१॥ नेदी मग फिरों मागें । अंगा अंगें संचरें ॥२॥ कां गा याची नेणा खोडी । जिभा जोडी करीतसे ॥३॥ पांघरे तें बहु काळें । घोंगडेंहि ठाईंचे ॥४॥ अंगीं वसेचि ना लाज । न म्हणे भाज कोणाची ॥५॥ सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणी नसावें ॥६॥ तुका म्हणे धरिला हातीं । मग निश्चिती हरीनें ॥७॥

२२६६. प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥१॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घरबुडी ॥२॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागे लागेना ॥३॥ हो कां नर अथवा नारी । लहान थोरी आदर ॥४॥ झाले वेगळे लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥५॥ कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा ॥६॥ तुका म्हणे दुसऱ्या भावें । छाया नावें न देखवे ॥७॥

२२६७. न सांडावा आतां ऐसा वाट ठाव । भयासी उपाव रक्षणाचा ॥१॥ म्हणऊनी मनां वोळियेलें मन । कारया कारण चाड नाहीं ॥२॥ मानावी उपाधि करूनीयां मूळ । राखतें विटाळ तोंचि व्हावें ॥३॥ तुका म्हणे येथें न वचे वचन । निर्जी निजखूण सांपडली ॥४॥

२२६८. सत्तेचें भोजन समयीं आंतुडे । सेवणही घडे रुचिनेसी ॥१॥ वर्में भ्रम नेला झालें येकमय । हृदयस्थीं सोय संग झाला ॥२॥ कोथळीस जमा पडिलें संचित । मापल्याचा वीत्त नेम झाला ॥३॥ तुका म्हणे धनी ऐसा झालों आतां । करीन ते सत्ता माझी आहे ॥४॥

२२६९. देईल तें उणें नाहीं । याचे कांहीं पदरीं ॥१॥ पाहिजे तें

संचित आतां । येथें सत्ता करावया ॥२॥ गुणा ऐसा भरणा भरी । जों जों चारी तें लाभे ॥३॥ तुका म्हणे देवीं देव । फळे भाव आपुला ॥४॥

२२७०. तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हा भिन्नपासुनी ॥१॥ आतां बोलों नये ऐसें । अनारीसें वेगळें ॥२॥ सन्मुख झालों स्वामीकडे । भव औटडे निराळे ॥३॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥४॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं तें वचन ॥५॥ तुमची देवा धरिली कास । केला नाश प्रपंच्या ॥६॥ तुका म्हणे जाणों वर्म । कर्माकर्मं ठेविलीं ॥७॥

२२७१. केला कइवाड संताच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥१॥ काय जीवित्वाची धरुनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥२॥ आबाळिनें जावें निश्चिंतींच्या ठायां । रांडा रोटा वायां करूं नये ॥३॥ तुका म्हणे बळी देता तें निधान । भिकेसाठीं कोण राज्य देतो ॥४॥

२२७२. संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभी अनुभव असिजेते ॥१॥ जैसी तैसी असो पुढिलाची सोई । धरिती हातीं पाईं आचारिये ॥२॥ उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलाची सदा दया चित्तीं ॥३॥ तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ति । पुरवावी आर्ती निर्बळाची ॥४॥

२२७३. करितां विचार सांपडलें वर्म । समूळ निश्रम परिहाराचे ॥१॥ मज घेउनीयां आपणासी द्यावें । सांडी जीवेंभावें नारायणा ॥२॥ उरी नाहीं मग पडदा कां आला । स्वमुखेंची भला करितां वाद ॥३॥ तुका म्हणे माझें खरें देणें घेणें । तुम्ही साक्षी जाणें अंतरींचे ॥४॥

२२७४. कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥१॥ बरवें झालें शरण गेलों । उगविलों संकटीं ॥२॥ आणिला इही रूपा बळें । करूनी खळें हरिदासीं ॥३॥ तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥४॥

२२७५. आतां देह अवसान । हे जतन तोंवरी ॥१॥ गाऊं नाचूं गदारोळें । जिंकों बळें संसार ॥२॥ याची जीऊं अभिमानें । सेवाधन बळकट ॥३॥ तुका म्हणे न सरे मागें । होईन लागे आगळा ॥४॥

२२७६. ज्यानें आड यावें कांहीं । त्याचें नाहीं बळ आतां ॥१॥ मन येथें साह्य झालें । हरीच्या धालें गुणवादीं ॥२॥ चुकुर तो गेला काळ ।

झालें बळ संगाचें ॥३॥ तुका म्हणे करूं सत्ता । होईल आतां करूं तें ॥४॥

२२७७. देवासी तो पुरे येकभाव गांठी । तोचि त्याचे मिठी देईल पाईं ॥१॥ पाहोनि राहेन कौतुकें निराळा । मी मज वेगळा होऊनियां ॥२॥ कांहीं नेघे शिरीं निमित्याचा भार । नलगे उत्तर वेंचावेंची ॥३॥ तुका म्हणे जिवें पडलिया गांठी । मग नाहीं मिठी सुटों येत ॥४॥

२२७८. लौकिकासाठीं या पसाऱ्याचा गोवा । कांहीं नाहीं देवा लागो येथें ॥१॥ ठेवावा माथा तो नुचलावा पाईं । ठाईंचिये ठाईं हालों नये ॥२॥ ढवळिल्या मनें वितळलें रूप । नांव ऐसें पाप उपाधीचें ॥३॥ तुका म्हणे देव प्रीतीनें कवळी । ठेवील जवळी उठऊनी ॥४॥

२२७९. नाहीं होत भार घातला उदास । पुरवावी आस सकळही ॥१॥ ऐसा नाहीं मज येकाचा अनुभव । धरिला तो भाव उद्धरील ॥२॥ उतावीळ ऐसे शरणागत काजे । धांवा केशीराजे आईकतां ॥३॥ तुका म्हणे हितचिंतन भरवसा । नेदी गर्भवासा येऊं देऊं ॥४॥

२२८०. उपजों मरों हे तों आमुची मिरासी । हें तूं निवारीसी तरी थोर ॥१॥ उभा राहे करी खराखोटा वाद । आम्ही झालों निंद्य लंडीपणें ॥२॥ उभयतां आहे करणें समान । तुम्हा ऐसा म्हणे मीहि देवा ॥३॥ तुका म्हणे हातीं सांपडलें वर्म । अवघाची भ्रम फेडीन आतां ॥४॥

२२८१. मेलियाच्या रांडा इच्छिती लेंकरूं । लाज नाहीं धरूं प्रीति कैसी ॥१॥ मागीला पुढिला येक सरोवरी । काळाची पेटारी खांदा वाहे ॥२॥ आन दिसे परी मरणचि खरें । सांपळां उंदीरें सामावलीं ॥३॥ तुका म्हणे झाली मनाची परती । निवळली ज्योती दिसों आली ॥४॥

२२८२. निष्ठुर मी झालों अतिवादागुणें । हें कां नारायणें नेणिजेहे ॥१॥ सांडियेली तुम्ही गोत परिसोय । फोडविली डोय कर्माहातीं ॥२॥ सांपडुनी संधी केली जिवेसाठीं । घ्यावयासी तूटी कारण हें ॥३॥ तुका म्हणे तुज काय म्हणो उणें । नाहीं अभिमानें चाड देवा ॥४॥

२२८३. माझें माझ्या हातां आलें । आतां भलें सकळ ॥१ कशासाठीं विषम थारा । तो अंतर विटाळ ॥२॥ झाली तया दुःखें तुटी । मागिल

पोटीं नसावें ॥३॥ तुका म्हणे शुद्ध कूळ । तेथें मळ कशाचा ॥४॥

२२८४. समर्थपणें हे करा संपादणी । नसतेंच मनीं धरिल्याची ॥१॥ दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत । तरी मी निवांत पाय पाहें ॥२॥ खोटियाचें खरें खरियाचें खोटें । मानलें गोमटें तुम्हासी तें ॥३॥ तुका म्हणे तुम्हासवें करितां वाद । होइजेतें निंद्य जनीं देवा ॥४॥

२२८५. तुम्हा आम्हासवें न पडावी गांठी । आलेति जगजेठी कळों आतां ॥१॥ किती म्हणो आतां वाईटा वाईट । शिवों नये वीट आल्यावरी ॥२॥ बोलियाची आतां हेचि प्रचित । भीड फार थीत उडविली ॥३॥ तुका म्हणे आली रोकडी प्रचीती । झांकणें किती कोठें देवा ॥४॥

२२८६. सकळ सत्ताधारी । व्हावें ऐसें काय हरी ॥१॥ परी या कृपेच्या वोरसें । कुढावयाचेंचि पिसें ॥२॥ अंगें सर्वोत्तम । अवघाचि पूर्ण काम ॥३॥ तुका म्हणे दाता । तरि हा जीवदान देता ॥४॥

२२८७. कोणापासीं द्यावें माप । आपेंआप राहिलें ॥१॥ कासयाची भरोवरी । काय दूरी जवळीच ॥२॥ येकें दाखविलें दाहा । फांटा पाहा पुसूनी ॥३॥ तुका म्हणे सरलें ओझें । आतां माझें सकळ ॥४॥

२२८८. नभोमय झालें जळ । येकीं सकळ हरपलें ॥१॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥२॥ कैंचा तेथें यावा सांडी । आप कोंडी आपणा ॥३॥ तुका म्हणे कल्प झाला । अस्त गेला उदयीं ॥४॥

२२८९. राजा करी तैसे दाम । चाम तेहि चालती ॥१॥ कारण तें सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥२॥ वाहिलें तें सुनें खांदीं । चाले पदीं बैसविलें ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें ॥४॥

२२९०. आम्ही देव तुम्ही देव । मध्यें भेव अधिक ॥१॥ कैवाडाच्या धांवा लागे । मागें मागें विठ्ठलें ॥२॥ भेडसाविलें हाके नादें । बोळखीं भेदें मोडलीं ॥३॥ तुका म्हणे उभा राहे । मागें पाहे परतोनी ॥४॥

२२९१. हीनसुर बुद्धिपाशीं । आकृतीसी भेद नाहीं ॥१॥ येक दांडी येक खांदी । पदोपदीं भोगणें ॥२॥ येका ऐसें एक नाहीं । भिन्न पाही प्रकृति ॥३॥ तुका म्हणे भूमी खंडें । पीक दंडे जेथें ते ॥४॥

२२९२. काय बोलों सांगा । याउपरी पांडुरंगा ॥१॥ कांहीं आधारा-वांचून । पुढें न चले वचन ॥२॥ वाढे ऐसा रस । कांहीं करावा सौरस ॥३॥ भक्तिभाग्यसीमा । द्यावा जोडोनीयां प्रेमा ॥४॥ कोरड्या उत्तरीं । नका गौरवू वैखरी ॥५॥ करीं विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥६॥

२२९३. आहाच तो मोड वाळलीया मधीं । अधीराची बुद्धि तेणें न्यायें ॥१॥ म्हणउनी संग न करी दुसरें । चित्त मलिन द्वारें दोड पडे ॥२॥ विषासाठीं सर्पा भयाभीत लोक । हें तों सकळिक जाणतसा ॥३॥ तुका म्हणे काचे राहे कुळाकुड । औगुण तो नाडे ज्याचा तया ॥४॥

२२९४. क्षणक्षणा जीवा वाटतसे खंती । आठवती चित्तीं पाय देवा ॥१॥ येई वो येई वो येई लवलाही । अलिंगुनी बाहीं क्षेम देई ॥२॥ उतावीळ पंथ मन अवलोकीं । आठवतां चुकी काय झाली ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवींच्या जीवना । घाला नारायणा उडी वेगीं ॥४॥

२२९५. आळी करावी तें कळतें बाळका । बुझवावें हें का नेणा तुम्ही ॥१॥ निवाड तो येथें असे पायांपासीं । तुम्हा आम्हाविशीं येकें ठायीं ॥२॥ आणिक ते आम्ही न देखोंसें झालें । जाणावें ते शिणले भागलेसे ॥३॥ तुका म्हणे तुम्हा लागतें सांगावें । अंतरीचें ठावें काय नाहीं ॥४॥

२२९६. तांतडीनें आम्हा धीरचि न कळे । पाळावें हें लळे लवलाही ॥१॥ नका कांहीं पाहों सावकासी देवा । करा येक हेवा तुमचा माझा ॥२॥ वोरसाचा यावा सांभाळावी प्रीत । नाहीं राहों येत अंगीं धंदा ॥३॥ तुका म्हणे मज नको गोऊं खेळा । भोजनाची वेळा राखीयेली ॥४॥

२२९७. नाहीं लोपों येत गुण । वेधे आणिक चंदन ॥१॥ न सांगतां पडे ताळा । रूप दर्पणीं सकळां ॥२॥ सारविलें वरी । आहाच ते क्षण-भरी ॥३॥ तुका म्हणे ओहळे । सागराच्या ऐसें व्हावें ॥४॥

२२९८. वचनेंचि व्हावें आपण उदार । होईल विश्वंभर संतुष्टचि ॥१॥ सत्यसंकल्पाचीं फळें बीजा ऐसीं । शुद्ध नाहीं नाशीं पावों येत ॥२॥ वेचलीया काय येतसे उपेगा । शरीर हें नरकाचेंचि आलें ॥३॥ तुका म्हणे जीव जितां थारे लावा । पडिलीया गोवा देशधडी ॥४॥

२२९९. उरवते आयुष्य जायाचें कलिवर । औघें वोडंबर विषयांचें ॥१॥ कोणासी हा लागे पुसणें विचार । मनचि सादर करूं आतां ॥२॥ उत्पत्ति प्रळय पडिलें दळण । पाकाचें भोजन बीज वाढे ॥३॥ तुका म्हणे जाऊं अभयाच्या ठायां । रिघों देवराया शरण वेगीं ॥४॥

२३००. बोलावें म्हणू बोलतों उपाय । प्रवाहेंचि जाय गंगाजळ ॥१॥ भाग्ययोगें कोणा घडेल सेवन । कैचें तेथें जन अधिकारी ॥२॥ मुखीं देतां घांस लपविती तोंड । अंगींचिया भांड असुकानें ॥३॥ तुका म्हणे पूजा करितों देवाची । आपुलीया रुची मनाचिये ॥४॥

२३०१. लटिक्याची वाणी चवी ना संवाद । नाहीं कोणा वाद रुचों येत ॥१॥ अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायबापीं वेळा न साधिली ॥२॥ अनावर अंगीं प्रबळ अवगुण । तातडीनें मन लाहो साधी ॥३॥ तुका म्हणे दोष आणि अवकळा । न पडतां ताळा घडतसे ॥४॥

२३०२. नये स्तवूं काचें होत क्रियानष्ट । स्फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ ॥१॥ नाहीं परमार्थ साधीत लौकिकें । धरुनी होतों फिकें अंगा आलें ॥२॥ पारखीया पुढें न घालीचि तोंड । तुटी लाभा खंड होतो माना ॥३॥ तुका म्हणे तरी मिरवते परवडी । कामावल्या गोडी अविनाश ॥४॥

२३०३. कोण्या काळें येइल मना । नारायणा तुमचीया ॥१॥ माझा करणें अंगीकार । सर्व भार फेडुनी ॥२॥ लागली हे तळमळ चित्ता । तरी दुश्चिता संसारीं ॥३॥ मुखाचाच पाहे वास । मागें दोष सांभाळीं ॥४॥ इच्छा पूर्ण झाल्यावीण । कैसा सीण वारेल ॥५॥ लाहो काया वाचा मनें । दिवसाचा भेटीचा ॥६॥ कंटाळा तो न धरावा । तुम्ही देवा दासांचा ॥७॥ तुका म्हणे माझे वेळे । न कळे कां हें उफराटें ॥८॥

२३०४. घ्यावी तरी घ्यावी उदंडचि सेवा । द्यावें तरि देवा उदंडचि ॥१॥ ऐसीं कैचीं आम्ही पुरतीं भांडवलें । आल्या करी बोलें समाधान ॥२॥ व्हावें तरि व्हावें बहूताचि दूरी । आलीया अंतरीं वसवावें ॥३॥ तुका म्हणे तुझें सख्यत्व आपणीं । अससील ऋणी आवडीचा ॥४॥

२३०५. काय करूं जीव होतो कासावीस । कोंडली हे दीशा गमेचिना

॥१॥ पहिलें हें दिसे ब्रह्मांडचि वोस । दाटोन उश्वास राहातसे ॥२॥ तुका म्हणे अगा सर्व जाणतीया । विश्वंभरें काया निवबावी ॥३॥

२३०६. सुकलीया कोंभा अत्यंत जळधर । तेणेंच प्रकारें न्याय असे ॥१॥ न चले पाऊलीं सांडीं गरुडासन । मनाचें हो मन त्वरेलागीं ॥२॥ तुका म्हणे भूक न साहावे बाळा । जीवनाची कळा वोढलीसे ॥३॥

२३०७. शृंगारीक माझीं नव्हतीं उत्तरें । आळवितो खरें अवस्थेच्या ॥१॥ न घालावा मधीं कामाचा विलंब । तुम्ही तो स्वयंभ करुणामूर्ति ॥२॥ तुका म्हणे केलें सन्मुख वदन । देखतां चरण पोटाळीन ॥३॥

२३०८. तूं माझी माउली तूं माझी साऊली । पाहातो वाटोली पांडुरंगे ॥१॥ तूं मज येकुला वडील धाकुला । तूं मज बापूला सोयरा जीव ॥२॥ तुका म्हणे जीव तुजपासीं असे । तुजवीण वोस सर्व दिशा ॥३॥

२३०९. कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥१॥ बळियाचीं आम्ही बाळें । असो निर्भर या सळें ॥२॥ आतां कोठें काळ । मध्यें रिघेल वोंगळ ॥३॥ तुका म्हणे पंढरिराया । थापटितों ठोक बाह्या ॥४॥

२३१०. डोळा भरलें रूप । चित्तीं पायाचे संकल्प ॥१॥ ओघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥२॥ जिव्हा केली माप । रासी हरिनाम अमूप ॥३॥ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥४॥

२३११. आतां आहे नाहीं । न कळे आळीकरा कांहीं ॥१॥ देसी पुरवोनी इच्छा । आतां पंढरीनिवासा ॥२॥ नेणे भाग शीण । दुजें कांहीं तुजविण ॥३॥ आतां नव्हे दूरी । तुका पाई मिठी मारी ॥४॥

२३१२. संकल्पासी अधिष्ठान । नारायण गोमटें ॥१॥ ओघीयांचें पुरे कोड । फिटे जड देहत्व ॥२॥ उभय लोकीं उत्तम कीर्ति । देव चित्तीं राहिलीया ॥३॥ तुका म्हणे जीव धाये । नये हाये जवळी ॥४॥

२३१३. भाग्यवंता ऐसी जोडी । परवडी संतांची ॥१॥ धन धरीं पांडुरंग । अभंग जे सरेना ॥२॥ जनाविरहित हा लाभ । टाचे नभ सांठवणें ॥३॥ तुका म्हणे विष्णुदासा । नाहीं आशा दूसरी ॥४॥

२३१४. जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता वेवसाई

।१।। तृष्णेचीं मजूरें नेणती विसावा । वाढे हाव हावा काम कामीं ।।२।। वैभवाचीं सुखें नातळतां अंगीं । चिंता करी भोगी विघ्नें जाळी ।।३।। तुका म्हणे वाहे मरणाचें भय । रक्षण उपाय करुनि असे ।।४।।

२३१५. कोण होईल आतां संसार पांगिलें । आहे उगविलें सहजची ।।१।। केला तो चालवी आपुला प्रपंच । काय कोणा वेच आला घे दे ।।२।। सहजचि घडे आतां मोळ्यावीण । येथें काय शीण आणि लाभ ।।३।। तुका म्हणे झालों सहज देखणा । ज्याच्या त्यानें खुणा दाखविल्या ।।४।।

२३१६. आम्हा शरणागता । येवढी काय करणें चिंता ।।१।। परि हे कौतुकाचे खेळ । औघे पाहातों सकळ ।।२।। अभयदान वदे । आम्हा कैचीं भयद्वंद्वें ।।३।। तुका म्हणे आम्ही । हरिजन साधनाचे स्वामी ।।४।।

२३१७. देवाचिये चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासी ।।१।। नये राहुं उभें कशमलापासीं । भुंकतील तैशी सांडावी तीं ।।२।। तुका म्हणे क्षमा सुखाची हे रासी । साहुनी कां ऐसें दुःखी व्हावें ।।४।।

२३१८. खळा सदा क्षुद्र दृष्टी । करी कष्टी सज्जना ।।१।। करिती आपुलाले परी । धणीवरी व्यापार ।।२।। दया संतां भांडवल । वेंचि बोल उपकार ।।३।। तुका म्हणे आपुलालें । उसंतिलें ज्यांनीं तें ।।३।।

२३१९. जग ऐसें बहुनांवें । बहुभावें भावना ।।१।। पाहों बोलों बहु नये । सत्य काय सांभाळा ।।२।। कार्यासी जें कारण । तें जतन करावें ।।३।। तुका म्हणे संतजनीं । हेंचि मनीं धरावें ।।४।।

२३२०. निघालें तें आगीहुनी । आतां झणी आतळे ।।१।। पळवा परपरते दुरी । आतां हरि येथुनी ।।२।। धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें पाहों प्रपंचीं ।।३।। अबोल्यानें ठेला तुका । भेउनी लोकां निराळा ।।४।।

२३२१. आतां दुसरें नाहीं वनीं । निरंजनीं पडिलों ।।१।। तुमचीच पाहें वास । औघी आस निरसली ।।२।। मागीलाचा मोडला माग । घडला याग अरुची ।।३।। तुका म्हणे करुणाकरा । तूं सोयरा दीनांचा ।।४।।

२३२२. धरूनीया सोई परतलें मन । अनुलक्षी चरण करूनीयां ।।१।। पाई पांडुरंगे नेई सांभाळूनी । करुणावचनीं आळवितों ।।२।। बुद्धि झाली

साह्य परि नाहीं बळ । अवलोकीतों जळ वाहे नेत्रीं ॥३॥ न चालती पाय गलित झाली काया । म्हणुनी दया येऊं द्यावी ॥४॥ दिसेच्या करितो वारियासी मात । जोडोनियां हात वाट पाहे ॥५॥ तुका म्हणे वेग करावा सत्वर । पाववया तीर भवनदीचें ॥६॥

२३२३. कौलें भरियेलीं पेंठ । निग्रहाचे खोटे तंट ॥१॥ ऐसें माता जाणें वर्म । बाळा वाढविता धर्म ॥२॥ कामाविता लोह कसें । तातडीनें काम नासे ॥३॥ तुका म्हणे खडे । देतां अक्षर तें जोडे ॥४॥

२३२४. करितां विचार । तो हा दृढ संवसार । ब्रह्मादीकां पार । नुलंघवे सामर्थ्यें ॥१॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना । आलें तें वचना । पासीं माझ्या सामर्थ्य ॥२॥ पाठीवरि मोळी । तोचि कळवा पाई तळीं । सांपडला जाळीं । मच्छ झाला तो न्याय ॥३॥ आतां करीन तांतडी । लाभाची ते याच जोडी । तुका म्हणे वोढी । पायां सोइ मनाची ॥४॥

२३२५. बहुता जातीचा केला अंगीकार । बहुतहि फार सर्वोत्तमें ॥१॥ सरलाचि नाहीं कोणाचिये वेंचे । अक्षोभ ठाईंचें ठाई आहे ॥२॥ लागतचि नाहीं घेतां अंतपार । वसवी अंतर अणूचेंही ॥३॥ तुका म्हणे केला होय ठाकी ऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते ॥४॥

२३२६. पोट धालें आतां जीवनीं आवडी । पुरवावी परवडी बहुतांची ॥१॥ काय अंचवणा तांतडीचें काम । मागील तो श्रम न पाववी ॥२॥ वाढतिया पोटीं बहु असे वाव । सांभाळितां ठाव काय वेंचे ॥३॥ दाविल्यावाचोनि नाहीं कळों येत । तेथेंही दुश्चित येकपण ॥४॥ नावेचा भार तो उदकाचे शिरीं । काय हळू भारी तये ठाई ॥५॥ तुका म्हणे गीती गाऊनी गोविंद । करूं ब्रह्मानंद येकसरें ॥६॥

२३२७. येका हातीं टाळ येका हातीं चिपळिया । घालीती हुंबरी येक वाहती टाळिया ॥१॥ मातले वैष्णव नटति नानाछंदें । नाहीं मोक्षपदीं चाड भजनीं आवडी ॥२॥ हाका आरोळीया गीतवाद्य सुख सोहळे । जाय तें न कळे केव्हां रजनी दिवस ॥३॥ तीर्थी नाहीं चाड नलगे जावें वनांतरा । तुका म्हणे हरिहरात्मकची पृथ्वी ॥४॥

२३२८. देव सखा आतां केलें नव्हे काई । तेणें सकळहि सोयरींच ॥१॥ भाग्यवंत झालों गोते सपुरतीं । आतां पुण्या मीती पार नाहीं ॥२॥ पाहतां दिसती भरलीया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥३॥ अविनाश जोडी आम्हा भाग्यवंता । झाली होती सत्ता संचिताचीं ॥४॥ पायांवरी डोई ठेवाया अरोथा । झाली याची सत्ता क्षेम ऐसी ॥५॥ तुका म्हणे जीव पावला विसावा । म्हणविता देवा तुमचासा ॥६॥

२३२९. कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥१॥ सत्ता झाली त्रिभूवनीं । चक्रपाणि कोंवसा ॥२॥ लडिवाळाचा भार वाहे । उभा राहे कुडावया ॥३॥ तुका म्हणे घटका दिस । निमिषहि न विसंबे ॥४॥

२३३०. आम्हा आवडे नाम घेतां । तोही पिता संतोषे ॥१॥ उभयतां येकचित्त । तरी प्रीत वाढली ॥२॥ आम्ही शोभो निकटवासे । अनारिसें न दिसे ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगे । अवघीं अंगें निवालीं ॥४॥

२३३१. देह तंव असे भोगाचे आधीन । याचें सुख शीण क्षण-भंगुर ॥१॥ अविनाश जोडी देवापाईं भाव । कल्याणाचा ठाव सकळहि ॥२॥ क्षणभंगुर हा येथील पसारा । आलीया आकारा औघें नासे ॥३॥ तुका म्हणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥४॥

२३३२. आतां अवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥१॥ केलें तरी आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥२॥ नाहीं भक्तराजीं ठेविला उद्धार । नामाचा आकार त्याचीयानें ॥३॥ तुका म्हणे माझ्या वडिलांचें ठेवणें । गौप्य नारायणें न करावें ॥४॥

२३३३. कायावाचामनें श्रीमुखाची वास । आणीक उदास विचारासी ॥१॥ काय आतां मोक्ष करावा जी देवा । तुमाचिया गोवा दर्शनासी ॥२॥ केलीया नेमासी उभे ठाऊ व्हावें । नेमिलें तें भावें पालटेना ॥३॥ तुका म्हणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ॥४॥

२३३४. पुढीलाच्या सोई माझ्या मना चाली । मत्ताची आणिली नाहीं बुद्धि ॥१॥ केलासी तो उभा आजीवरि संतीं । धरवीले हातीं कट देवा ॥२॥ आहे तेचि मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बळा लेकरासी ॥३॥ तुका

म्हणे माझ्या साक्षीचा वेव्हार । कृपण जी थोर परी तुम्ही ॥४॥

२३३५. बहुत करूनी चाळवा चाळवी । किती तुम्ही गोवी करीतसां ॥१॥ लागटपणें मी आलों येथवरी । चाड ते दुसरी न धरुनी ॥२॥ दुजियाचा तंत्र तुम्हासी कंटाळा । राहासी निराळा येकायेकीं ॥३॥ तुका म्हणे आतां यावरि गोविंदा । मजसीं विनोदा येऊं नये ॥४॥

२३३६. तीर्थ जळ देखे पाषाणप्रतिमा । संत ते अधमा माणसा ऐसे ॥१॥ वांझेचें मैथुनापरि गेले वायां । बांडिल्याचे जाया झालें पीक ॥२॥ अभावीक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचीना ॥३॥ तुका म्हणे वरदळीं ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥४॥

२३३७. नव्हे मतोळ्याचा वाण । नित्य नवा नारायण ॥१॥ सुख उपजे श्रवणें । खरें टाकसाळीं नाणें ॥२॥ लाभ हातोहातीं । अधिक पुढतों पुढती ॥३॥ तुका म्हणे नेणों किती । पुरूनी उरलें पुढती ॥४॥

२३३८. घातलें दुकान । देती आलियासी दान ॥१॥ संत उदार उदार । भरलें अमूप भांडार ॥२॥ मग त्याची पुरे । धणी आणिकासी उरे ॥३॥ तुका म्हणे पोतें । देवें भरलें नव्हे रितें ॥४॥

२३३९. नरस्तुति आणि कथेचा विकरा । हें नको दातारा घडों देऊं ॥१॥ ऐसीये कृपेची भाकीतों करुणा । आहेसी तूं राणा उदारांचा ॥२॥ परावीया नारी आणि परधन । नको देऊं मनावर येऊं ॥३॥ भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडो देऊं ॥४॥ देह अभीमान नको देऊं शरिरीं । चढो कांहीं परि एक देऊं ॥५॥ तुका म्हणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ॥६॥

२३४०. लौकिकापुरती नव्हे माझी सेवा । अनन्य केसवा दास तुझा ॥१॥ म्हणउनी करी पायांसवें आळी । आणिक वेगळी नेणें परी ॥२॥ येकविध आम्ही स्वामी सेवेसाठीं । वरि तोचि पोटीं येक भाव ॥३॥ तुका म्हणे करीं सांगितलें काम । तुम्हा धर्माधर्म ठावे देवा ॥४॥

२३४१. ज्याच्या संगें होतों पडिलों भोवणीं । ते केली धोवणी सांडोनियां ॥१॥ आतां येकायेकीं मनासी विचार । करूं नाहीं भार

दुजियांचा ॥२॥ प्रसाद सेवनें आली उष्टावळी । उचित ते काळीं अवचित ॥३॥ तुका म्हणे वर्म सांपडलें हातीं । सांडिली ते खंती चिंता देवा ॥४॥

२३४२. आवडी भोजन प्रकार परवडी । भिन्नाभिन्न गोडी येक रसा ॥१॥ भोगत्या पंगती लाधलों प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला ॥२॥ पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ॥३॥ तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥४॥

२३४३. समर्थाचा ठाव संचिलाचि असे । दुबळाची आस पुढें करीं ॥१॥ पावलें घेईन पदरीं हें दान । येकांतीं भोजन करूं दावी ॥२॥ नलगे पाहावी उचिताची वेळ । अयाचित काळ साधला तो ॥३॥ तुका म्हणे पोट धालिया उपरी । गौरवा उत्तरीं पूजूं देवा ॥४॥

२३४४. आपुल्याचा करीन मोळा । माझ्या कुळाचाराचा ॥१॥ औचियांचे वंदिन पाय । ठायाठाय न देखे ॥२॥ नेदी तुटों समाधान । थांबूं जन सकळ ॥३॥ तुका म्हणे झाडा होई । तो हे सोई न मंडी ॥४॥

२३४४. जन्ममरणाची विसरलों चिंता । तूं माझ्या अनंता मायबापा ॥१॥ होतील ते डोळां पाहीन प्रकार । भय आणि भार निरसले ॥२॥ लिगाडाचे मूळें होतीं पंचभूतें । त्या-या त्या पुरतें विभागिलें ॥३॥ तुका म्हणे झाला प्रपंच पारिखा । जीवासी तू सखा पांडुरंगा ॥४॥

२३४६. उदार तूं हरि । ऐशी कीर्ति चराचरीं । अनंत हे थोरी । गर्जतातीं पवाडे ॥१॥ तुझे पाईं माझा भाव । पुशी जन्ममरण ठाव । देवाचा तूं देव । स्वामी सकळ ब्रह्मांडा ॥२॥ मागणें तें तूज मागों । जीव भाव तुजची मांगों । लागों तरि लागों । पायां तुमच्या दातारा ॥३॥ दिसों देसी केविलवाणें । तरि तूजचि हें उणें । तुका म्हणे जिणें । माझें तूज आधीन ॥४॥

२३४७. पाहा किती आले । शरण समानचि केले । नाहीं विचारिले । गुण दोष कोणाचे ॥१॥ मज शेवटींसा द्यावा । ठाव तयाचीये देवा । नाहीं करीत हेवा । कांहीं थोरपणाचा ॥२॥ नाहीं पाहिला आचार । कुळगोत्राचा विचार । फेडूं आला भार । मग न म्हणे दगड ॥३॥ तुका म्हणे सर्व जाणा ।

तुझ्या आल्यावरी मना । केला तो उगाणा । घडल्या महादोषांचा ॥४॥

२३४८. आतां चुकलें बंधन । गेलों विसरोन दान । आपुलें तें वान । सावकाश विकावें ॥१॥ लाभ जोडला अनंत । घरीं सांपडलें वित्त । हातो-हातीं थित । उरी तळ नव्हाची ॥२॥ होतें गोविलें वीसारें । माप झालें येकसरें । होतें होरें वारें । तोचि लाहो साधीला ॥३॥ करावया जतन । तुका म्हणे निजधन । केला नारायण । साह्य नेदी विसंबों ॥४॥

२२४९. तुझ्या रूपें माझी काया । भरों द्यावी पंढरिराया । दर्पणाची छाया । येक रूपें भिन्नत्व ॥१॥ सुख पडिलें साठवणें । सत्तावेचे शनैःशनै । अडचणिचे कोन । चारि मार्ग उगवले ॥२॥ वसो डोळ्यांची बाहुली । कवळें भिन्न छाया आली । कृष्णांजन चाली । नव्हे परती माघारा ॥३॥ जीव ठसावला शीवें । मना आलें तेथें जावें । फांटा पडिला नांवें । तुका म्हणे खंडलें ॥४॥

२३५०. सोसें भोसें मारूं हाका । होईल चूका म्हणउनी ॥१॥ मागें पुढें क्षणभरी । नव्हे दुरी अंतर ॥२॥ नाम मुखीं बैसला चाळा । वेळोवेळां पडताळी ॥३॥ तुका म्हणे सुखी केलें । या विठ्ठलें बहुतांशी ॥४॥

२३५१. धरोनियां चाली हावा । येईन गांवा धांवत ॥१॥ पाठवीसी मूळ तरी । लवकरी विठ्ठले ॥२॥ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ति मुखें गाईन ॥३॥ तुका म्हणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥४॥

२३५२. मायबापाचिया भेटी । अवघ्या तूटी संकोच्या ॥१॥ भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ॥२॥ उत्तम तें बाळापाठीं । लावी होटीं माउली ॥३॥ तुका म्हणे झाली धणी । आनंद मनीं न समाये ॥४॥

२३५३. उदासीनाचा हा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागे तया ॥१॥ अनुताप अंगीं अग्निचीया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥२॥ दोष ऐसा नांवें देहाचा आदर । विटलें अंतर अहंभावें ॥३॥ तुका म्हणे जाय नासोनिया खंती । तंवचि हे चित्तीं बद्धता ते ॥४॥

२३५४. बंधनाचा तोडूं फांसा । देऊं आशा टाकोनी ॥१॥ नाहीं तेचि घेतां शीरीं । होईल दुरी निजपंथ ॥२॥ नाथीलेंचि माझें तुझें । कोण वोझें

वागवी ॥३॥ तुका म्हणे अंतराये । देवि काय जीणे ते ॥४॥

२३५५. तेंचि किती वारंवार । बोलों फार बोलिलों ॥१॥ आतां माझें दंडवत । तुमच्या संत चरणाशी २ आवडी ते नीत नवी । झाली जिवीं वसती ॥३॥ तुका म्हणे बरवें झालें । घरा आलें बंदगीचें ॥४॥

२३५६ उगासा सेवटीं अन्नासवें भेटी । तैसी माझी मिठी पडों पाईं ॥१॥ पुरवीं वासना साच सर्व जाणा । आम्हा नारायणा अंकीतांची ॥२॥ बहुदीस पुत्रा मातेसवें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीति उभड ॥३॥ तुका म्हणे धन कृपणा सोइरे । यापरि दुसरें नव्हे आतां ॥४॥

२३५७. रणीं निवतां शूर न पाहे माघारें । ऐसा मज धीरें राखे आतां ॥१॥ संवसार हातीं अंतरलों दूरी । आतां कृपा करी नारायणा ॥२॥ वागवीतों तुझ्या नामाचें हत्यार । हाचि बडिवार मिरवितों ॥३॥ तुका म्हणे मज फिरतां माघारें । तेथें उणें पुरें तुम्ही जाणा ॥४॥

२३५८. सकळा पूजा स्तुती । करावें तें व्हावें याती ॥१॥ म्हणवोनी वारा जन । संत पूजा नारायण ॥२॥ सेवावें तें बरें । दावी उमटोनी ढेकरीं ॥३॥ तुका म्हणे सुरा । दुधा म्हणतां केवीं बरा ॥४॥

२३५९. धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥१॥ भार घातलीयावरी । दासां नुपेक्षील हरी ॥२॥ या ऐसी आटी । घावी द्रव्याचीये साठीं ।
तुका म्हणे पोटें । देवा बहु केलें खोटें ॥४॥

२३६०. द्रव्याचीया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥१॥ अंतीं बोलवणेसाठीं । पांडुरंग धरा कंठीं ॥२॥ लोभाचीया लोभीकें । याचें संन्नीधान फिके ॥३॥ तुका म्हणे हितें । जग नहो पडो रितें ॥४॥

२३६१. कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कवीं खटपट सरेल हे ॥१॥ कोणा आराणूक होईल कोणे काळीं । आपुलालीं जाळीं उगऊनी ॥२॥ माझा येणें दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन सुखी असे ॥३॥ भोगा आधीं मनें मानिलासे त्रास । पाहे लपायास ठाव कोठें ॥४॥ तुका म्हणे देतों देवाचें गाऱ्हाणें । माझें ऋण येणें सोशीयलें ॥५॥

२३६२. राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥१॥ करूं जगाचा

विनोद । डोळां पाहोनीयां छंद ॥२॥ मुललीयां संमारें । आलें डोळ्यासी मांजीरें ॥३॥ तुका म्हणे माथा । कोणी नुचली सर्वथा ॥४॥

२३६३. आम्हा येकविध पुण्य पर्वकाळ । चरणकमळ स्वामीचें तें ॥१॥ चित्ताचे संकल्प राहिलें चलण ॥३॥ आज्ञा ते प्रमाण करुनी असों ॥२॥ दुजियापासुन परतलें मन । केलें द्यावें दान होईल तें ॥३॥ तुका म्हणे आतां पुरलें नवम । येकावीण सोस सकळही ॥४॥

२३६४. राहाणें तें पायांपाशीं । आणिका रसीं विटोनी ॥१॥ ऐसा धीर देई मना । नारायणा विनवितों ॥२॥ अंतरीं तो तुझा वास । आणिका नाश कारणा ॥३॥ तुका म्हणे शेवटींचें । वाटे साचें राखावें ॥४॥

२३६५ चंदन तो चंदनपणें । सहज गुणें संपन्न ॥१॥ वेधलीया धन्य जाती । भाग्य होती सन्मुख ॥२॥ परिसा अंगीं परिसपण । बाणोनी तें राहिलें ॥३॥ तुका म्हणे कैंची खंती । सुजाती ते ठाकणी ॥४॥

२३६६. लय लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ॥१॥ हें तों असाध्यचि सर्वत्र या जना । भलें नारायणा आळवितां ॥२॥ कामनेचा त्याग वैराग्य या नांवें । कुटुंब तें सर्व विषयजात ॥३॥ कर्म उसंतावें चालतां पाऊलीं । होय जंव राहिली देहबुद्धि ॥४॥ भक्ती तें नमावें जीवजंतुभूत । शांतऊनी ऊत कामक्रोध ॥५॥ तुका म्हणे साध्या साधन अवघडें । देतां हें सांकडें देह बळी ॥६॥

२३६७. ऐसें कां हो न करा काहीं । पुढें नाहीं नाश ज्या ॥१॥ विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदुनी ॥२॥ श्रुतीचें कां न घ्या फळ । सारमूळ जाणोनी ॥३॥ तुका म्हणे पुढें कांहीं । वाट नाहीं यावरी ॥४॥

२३६८. झाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानींचा ॥१॥ रडति रात्रंदीस कामक्रोधमाये । म्हणती हाय हाय यमधर्म ॥२॥ वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा । ज्ञानाग्नी लागला ब्रह्मत्वेसी ॥३॥ फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य जनीं बोंब झाली ॥४॥ दिल्ही तिळांजुळी कुळनामरूपासी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥५॥ तुका म्हणे रक्षा झाली आपेंआप । उजळीला दीप गुरुकृपा ॥६॥

२३६९. आपलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो झाला सोहळा अनुपम्य ॥१॥ आनंदें दाटलीं तिही त्रिभूवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥२॥ येकदेशीं होतों अहंकारें आथीला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥३॥ फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझे संकोचें दूरी झालों ॥४॥ नारायणें दिल्हा वसतिसी ठावो । ठेउनीयां भावो ठेलों पायीं ॥५॥ तुका म्हणे दिल्हें उमटूनी जगीं । घेतलें तें अंगीं लाउनीयां ॥६॥

२३७०. बोळविला देह आपुलेनीं हातें । हुताशीलीं भूतें ब्रह्माग्नीसी ॥१॥ येक वेळ झालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥२॥ अमृतसंजीवनीं निववीली खाई । अंगें तये ठाईं हारपलीं ॥३॥ एकादशीविध जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥४॥ अवघीं कर्में झाली घटस्फोटापासीं । संबंध येकेसी उरला नामीं ॥५॥ तुका म्हणे आतां आनंदीं आनंदु । गोविंदें गोविंदु विस्तारला ॥६॥

२३७१. पिंडदान पिंडें ठेवीलें करून । तिळीं तिळवण मूळत्रई ॥१॥ सारीले संकल्प येकाचीं वचनें । ब्रह्मीं ब्रह्मार्पणें शेवटींच्या ॥२॥ सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । येकायेकीं वर्म येकोविष्णु ॥३॥ पितापुत्रत्वाचें झालें अवसान । जनीं जनार्दन अभेदासी ॥४॥ आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधीयेला ॥५॥ तुका म्हणे केला ओव्यांचा उद्धार । आतां नमस्कार शेवटींचा ॥२॥

२३७२. सरले आतां नाहीं । न म्हणे वेळकाळ कांहीं ॥१॥ विठ्ठल कृपाळु माउली । सदा प्रेम पान्हायली ॥२॥ क्षीण न वीचारी भाग । नव्हे निष्ठुर नाहीं राग ॥३॥ भेदाभेद नाहीं । तुका म्हणे तीच्या ठायीं ॥४॥

२३७३. तुज पाहावें हे धरितों वासना । परि आचरणा ठाव नाहीं ॥१॥ वरिसीं कैवाड आपुलीया सत्ता । तरिच देखता होईन पाय ॥२॥ बाहीरल्या वेषें उत्तम दंडीलें । भीतरीं मुंडिलें नाहीं तैसें ॥३॥ तुका म्हणे वायां गेलोंच मी आहें । जरी तुम्ही साह्य न व्हा देवा ॥४॥

२३७४. दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥१॥ आतां तुम्ही सर्व जाणा पांडुरंगा । पाहिजे प्रसंगा ऐसें केलें ॥२॥

व्याघ्राजावयांच्या पंगती दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ॥३॥ तुका म्हणे आतां झालों शरणागत । पुढील उचित तुम्हा हातीं ॥४॥

२२७५. आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा । घडलीया सेवा समर्थाची ॥१॥ आतां माझ्या मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें ॥२॥ येथें नाहीं झाली कोणाची निरास । आल्या याचकास कृपेवीसीं ॥३॥ तुका म्हणे येथें नाहीं दुजि परी । राया रंका सरी देवा पाईं ॥४॥

२३७६. वैष्णवे चोरटी । आली घरासी करंटी ॥१॥ आजि आपुलें जतन । करा भांडें पांघरूण ॥२॥ ज्याचें घरीं खावें । त्याचें सर्वस्वही न्यावें ॥३॥ तुका म्हणे माग । नाहीं लागों देत लाग ॥४॥

२३७७. आयिकतों दाट । आले येकाचे बोभाट ॥१॥ नका विश्वासों यावरी । चोर देहाचे खानोरी ॥२॥ हेचि याची जोडी । सदा बोडकी उघडी ॥३॥ तुका म्हणे न्यावें । ज्याचें त्यास नाहीं ठावें ॥४॥

२३७८. आणिकाची सेवा करावी शरीरें । तीं येथें उत्तरें कोरडींच ॥१॥ ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेवे वेरझारा याचकांच्या ॥२॥ आणिकांचे भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचनही ॥३॥ आणिकानें देणें काळीं पोट भरे । येथील न सरे कल्पांतींही ॥४॥ आणिक दंडीती चुकलीया सेवा । येथें सोस हेवा नाहीं दोन्ही ॥५॥ तुका म्हणे करी आपणासारिखे । उद्धरी पारीखे उंच निंच ॥६॥

२३७९. दुर्जनाची जाती । त्याचें तोंडीं पडे माती ॥१॥ त्याचि बुद्धी त्यासी नाडी । वाचे अनुचित बडबडी ॥२॥ पाहे संतांकडे । दोषदृष्टी पाहे भडे ॥३॥ उंच निंच नाहीं । तुका म्हणे खळा कांहीं ॥४॥

२३८०. न करीं उदास । माझी पुरवावी आस ॥१॥ ऐका ऐका नारायणा । माझी परिसा विज्ञापना ॥२॥ मायबाप बंधुजन । तूंचि सोयरा सज्जन ॥३॥ तुका म्हणे तुजविरहित । माझें कोण करिल हित ॥४॥

२३८१. जीवन उपाय । वैद्यराणि तुझे पाय ॥१॥ ते मी नाठवीं खडिघाडि । म्हणोनीयां चरफडी ॥२॥ तुटे भवरोग । जेथें सर्व सुख भोग ॥३॥ तुका म्हणे वीट । धरियेलें जें गोमटें ॥४॥

२३८२. ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडुन कर तुम्हां ॥१॥ तर्के करुनीयां आपुल्या भावना । बोलतिया जना कोणावरी ॥२॥ आमुचे जिवींचा तोचि जाणे भावो । रुक्माईचा नाहो पांडुरंग ॥३॥ चित्त माझें त्याचे गुंतलेंसे पाई । म्हणवोनी कांहीं नावडे त्या ॥४॥ तुका म्हणे मज न साहे मिनती । खेद होय चित्तीं भंग मना ॥५॥

२३८३. ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ॥१॥ निंब घेती रोगी कवणिया सुखें । हरावया दुःखें व्याधी पीडा ॥२॥ काय पळे सुख चोर लागे पाठी । न घालावी काठी आड तया ॥३॥ जयाचें कारण तोचि जाणे करूं । नये कोणा वारूं आणिकासी ॥४॥ तुका म्हणे तरी सांपडे निधान । द्यावा वोवाळून जीव बळी ॥५॥

२३८४. काय मी अन्यायी तें घाला पालवीं । आणिक वाट दावीं चालावया ॥१॥ माग पाहोनियां जातो तेचि सोई । नवजावें कांहीं कोणा सांगा ॥२॥ धोपट मारग लागलासे गाढा । मग काय पीडा करा तुम्ही ॥३॥ वारितांहि भय कोण धरी धाक । परि तुम्हा येक सांगतों मी ॥४॥ तुका म्हणे शूर दोहीं पक्षी भला । मरतां मुक्त झाला मान पावे ॥५॥

२३८५. नव्हति माझे बोल जाणा हा निर्धार । मी आहे मजूर विठोबाचा ॥१॥ निर्धारा वचन सोडवीलें माझ्या । कृपाळुवें लज्जा राखीयेली ॥२॥ निर्भर मानसीं झालों आनंदाचा । गोडावली वाचा नामघोषें ॥३॥ आतां भय माझें नासलें संसारीं । झालोंसे यावरी गगनाचा ॥४॥ तुका म्हणे हा तों संतांचा प्रसाद । लाधलें आनंद प्रेमसुख ॥५॥

२३८६. जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी । मृत्युचेही भेटी जवळी आली ॥१॥ आतां माझ्या मना होई सावधान। ओंपुण्याची जाण कार्यसिद्धी ॥२॥ शेवटील घडी बुडतां नलगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥३॥ तुका म्हणे चिंतीं कुळीची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥४॥

२३८७. मागील ते आटी येणें घडे सांग । सुतवेल अंग येकासूत्रें ॥१॥ पहिपाहुणेर तें सांहळ्या पुरतें । येथुनि आरते उपचारी ते ॥२॥ अवश्यक तेथें आगळा आदर । चाले थोडे फार संपादतें ॥३॥ तुका म्हणे ऋण फिटे

येके घडी । अलभ्य ते जोडी हातां आल्या ॥४॥

२३८८. साधावा तो देव सर्वस्वाचे साटीं । प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥१॥ मग कासयानें पुन्हा संवसार । बीजाचें अंकूर दग्ध होती ॥२॥ जेणें दिल्हें त्यासी द्यावें पिंडदान । उत्तीर्ण चरण धरुनी व्हावें ॥३॥ तुका म्हणे नीज भोगईल निजतां । नाहीं होईल सत्ता दुजियाची ॥४॥

२३८९. जळो आगी पडो खाण । नारायण भोक्ता ॥१॥ ऐसी ज्याची वदे वाणी । नारायणीं ते पावे ॥२॥ भोजनकाळीं करितां धंदा । म्हणे गोविंदा पावलें ॥३॥ तुका म्हणे नलगे मोल । देवा बोल आवडती ॥४॥

२३९०. संतांसी क्षोभवी कोणाही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभय लोकीं ॥१॥ देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वीवरी थार नेदी तया ॥२॥ संतांपासीं याचा नुरेची विश्वास । त्याचे झाले दोष बळीवंत ॥३॥ तुका म्हणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धांवे लागे विषमें मारूं ॥४॥

२३९१. उदकीं कालवी शेण मळमूत्र । तो होय पवित्र कासयानें ॥१॥ उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संताचीया ॥२॥ दुखवितां बुडे सांगडीचा तापा । आतित्याई पापाचीच मूर्ति ॥३॥ तुका म्हणे जेव्हां फिरतें कपाळ । तरी अमंगळ योग होतो ॥४॥

२३९२. शोकवावा म्यां देहे । ऐसें नेणो पोटीं आहे ॥१॥ तरिच नेदा जी उत्तर । दुःख राखिलें अंतर ॥२॥ जावें वनांतरा । येणें उद्देशें दातारा ॥३॥ तुका म्हणे गीरी । मज सेववावी दरी ॥४॥

२३९३. येईल तुझ्या नामा । लाज म्हणो पुरुषोत्तमा ॥१॥ धीर राहिलों धरुनी । त्रास उपजला मनीं ॥२॥ जगा कथा नाव । निराशेनें नुपजे भाव ॥३॥ तुम्ही साक्षी कीं गा । तुका म्हणे पांडुरंगा ॥४॥

२३९४. नेणें जप तप अनुष्ठान याग । काळें तंव लाग घेतलासे ॥१॥ रिघालों या भेणें देवाचे पाठीसीं । लागे त्याचें त्यांसी सांभाळणें ॥२॥ मापें माप सळे चालिली चढती । झाली मग राती काय चाले ॥३॥ तुका म्हणे चोरा हातीं जे वांचले । लाभावरी आलें वारिलेशु ॥४॥

२३९५. कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुम्हांसी ॥१॥ तरी वीर्य

नाहीं नामा । जातो प्रेमा खंडत ॥२॥ आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥३॥ तुका म्हणे गुण झाला । हा विठ्ठल हीन शक्ति ॥४॥

२३९६. लागों दिलें आंगा । ऐसें कां गा सन्निध ॥१॥ कोण्या पापें उदयो केला । तो देखिला प्रळय ॥२॥ न देखवे पीडिला सर्प दयादर्प विषाचा ॥ ॥३॥ तुका म्हणे भलें । मज तो नवल जे साहिलें ॥४॥

२३९७. धांवा शीघ्रवत । किंवा घ्यावें दंडवत ॥१॥ तुमचा जातो बडिवार । आम्ही होतों हीनवर ॥२॥ न धरावा धीर । धांवा नका चालों स्थीर ॥३॥ तुका म्हणे वाणी । माझी लाजली जी गुणीं ॥४॥

२३९८. सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥१॥ मनाचिये मूळीं राहावें बैसोन । आकर्षावे गुण पायांपाशीं ॥२॥ भेटीची तातडी करितसे लाहो । वोवाळावा देहो ऐसें वाटे ॥३॥ तुका म्हणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥४॥

२३९९. उद्वेगाचे बहु फांकति मारग । नव्हे ऐसे अंग माझे होतें ॥१॥ आतां काण यासी करणें विचार । तां देखा साचार पाडुरंगा ॥२॥ मज तों अत्यंत दर्शनाची आस । झाला तरि हो नाश जिवित्वाचा ॥३॥ तुका म्हणे आहे वचनाची उरी । करीतों तोंवरी विज्ञापना ॥४॥

२४००. दुःखाची संगाती । तिच्या ठाई कोण प्रीति ॥१॥ औषें असो हे निराळें । करूं सोइरे सांवळे ॥२॥ क्षणभंगुर तो ठाव । करूनी सांडावाची वाव ॥३॥ तुका म्हण बरा । ठाव पावलों हा थारा ॥४॥

२४०१. मेला तरि सुखें जावो नरकासी । कळंकी याविशीं सिवों नये ॥१॥ रजस्वला करी वेलासी आघात । अंतर तों हीत दुरि बरें ॥२॥ उगीच कां आलीं नासवावीं फळें । विटाळ विटाळें कालवूनी ॥३॥ तुका म्हणे लोणी घालोनी शेणांत । उपेगाची मात काय असे ॥४॥

२४०२. वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥१॥ विश्वासीया घडे लाभ । देइल तरि पद्मनाभ ॥२॥ भाव शुद्ध तरी । सांगीतलें काम करी ॥३॥ तुका म्हणे भोळा देव । परि हा नागवी संदेह ॥४॥

२४०३. संचितावांचून । पंथ न चलवे कारण । कोरडी ते औषी आटी ।

वायां जाय लाळ घोटी ॥२॥ धन वित्तें जोडे । देव ऐसा तो न घडे ॥३॥ तुका म्हणे आड । स्वहितासी बहु नाड ॥४॥

२४०४. अतित्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचें त्या ॥१॥ हें तों आपुलीया गुणें । असें जेणें योजिलें ॥२॥ अवचटें अग्नि जाळी । न सांभाळी तो दुःख पावे ॥३॥ जैसें तैसें दावी आरिसा । नकटा कैसा पालटे ॥४॥

२४०५. हेंदऱ्याचे भरितां कान । हालवी मान भोंक रीतें ॥१॥ नाहीं मी येथें सांगों स्पष्ट । भावें नष्ट घेत नाहीं ॥२॥ अवगुणि बाटलें चित्त । तया हीत आतळेना ॥३॥ तुका म्हणे फजितखोरा । म्हणतां बरा उगी राहा ॥४॥

२४०६. नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥१॥ सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येते ॥२॥ काय आगीपासीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापासीं ॥३॥ तुका म्हणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढउनी ॥४॥

२४०७. लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे वोंगळा उपदेश ॥१॥ वचनचर्येचि न कळे चांचणी । ऐसी संघट्टणी अमंगळ ॥२॥ समयो न कळे वेडगळ बुद्धि । विजाती ते शुद्धि चांच चाड ॥३॥ तुका म्हणे त्याचा धिक्कारचि बरा । बहुमती खराहुनि हीन ॥४॥

२४०८. येक धरिला चित्तीं । आम्ही रखुमाईचा पती ॥१॥ तेणें झालें अवघें काम । निवारला भवभ्रम ॥२॥ परद्रव्य परनारी । जाली विषाचिया परी ॥३॥ तुका म्हणे फार । नाहीं लागत वेव्हार ॥४॥

२४०९. भेणें पळे डोळसा । न कळे मृत्यु तो सरीसा ॥१॥ कैसी झाली दिशाभुली । नवजाति ये वाटे चाली ॥२॥ संसाराची खंती । मावळल्या तरि शक्ती ॥३॥ तुका म्हणे हीना । बुद्धि चुकली नारायणा ॥४॥

२४१०. अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ॥१॥ लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनी ॥२॥ लागलीसे पाठि लाज । झालें काज नासाया ॥३॥ तुका म्हणे कुश्चळ मनीं । विटंबणीं पडिलीं तीं ॥४॥

२४११. चोराचिया धुडका मनीं । वसे ध्यानीं लांछन ॥१॥ ऐशा

आम्ही करणें काये । वर्षो न्यायें पर्जन्य ॥२॥ ज्याच्या बैसे खतावरी । ते चुरचुरी दुखउनी ॥३॥ तुका म्हणे ज्याची खोडी । त्याची जोडी त्यासी पीडी ॥४॥

२४१२. बुद्धिहीना उपदेश । तें तें विष अमृतीं ॥१॥ हुंगों नये गोव्ह-बाडी । तेथें जोडी विटाळ ॥२॥ आळसीयाचें अंतर कुडें । जैसें मढें निष्काम ॥३॥ तुका म्हणे ऐशा हातीं । मज श्रीपती वांचवा ॥४॥

२४१३. न करीं तुमची सेवा । बापुडें मीपणें देवा । बोलिलों तो पावावा । पण सिद्धि सकळ ॥१॥ आणिक काय तुम्हा काम । आम्हा नेदा तरि प्रेम । वैसे धर्माधर्म । निश्चयेसी राहातील ॥२॥ आम्हां वेंचिलों शरीरें । तुम्ही बीज पेरा खरें । संयोगाचें बरें । गोड होतें उभयतां ॥३॥ येके हातीं टाळी । कोठें वाजती निराळी । झाला तरी बळी । स्वामीवीण शोभेना ॥४॥ रूपा यावें जी अनंता । धरीन पुटाची त्या सत्ता । होईन सरतां । संतांमाजि पोपणा ॥५॥ ठेविलें उधारा । वरि काय तो पातेरा । तुका म्हणे बरा । रोकडाची निवड ॥६॥

२४१४. भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥१॥ हे तों चाळवा चाळवी । केलें आपणची जेवी ॥२॥ नैवेद्याचा आळ । वेचे ठाकणी सकळ ॥३॥ तुका म्हणे जड । मज न राखावें दगड ॥४॥

२४१५. सर्व भाग्यहीन । ऐसे सांभाळिलों दीन ॥१॥ पाईं संतांचे मस्तक । असों जोडोनी हस्तक ॥२॥ जाणे तरी सेवा । दीन दुर्बळाची देवा ॥३॥ तुका म्हणे जीव । समर्पूनी भाकीं कींव ॥४॥

२४१६. भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥१॥ येथोनीयां नुठो माथा । मरणावांचूनी सर्वथा ॥२॥ होईं बळकट । माझ्या मना तूं रे धीट ॥३॥ तुका आला लोटांगणी । भाक्तिभाग्य झाली धणी ॥४॥

२४१७. नाहीं तरि आतां कैचा अनुभव । झालासी तूं देव घरघेणा ॥१॥ जेथें तेथें देखे लांचांचा पर्वत । घ्यावें तरि चित्त समाधान ॥२॥ अधी वरि हात या नावें उदार । उसण्याचे उपकार फिटाफीट ॥३॥ तुका म्हणे जैसी तैसी करूं सेवा । सामर्थ्यानें देवा पायांपासीं ॥४॥

२४१८. आम्ही सर्वकाळ कैचीं सावधानें । वेत्रसाई मन अभ्यासलें ॥१॥ तरी म्हणा मोठे ठेवीले चरणीं । केलों गुणागुणी कासावीस ॥२॥ याचे कानसुळीं मारितसे हाका । मज घाटूं नका आतां मधीं ॥३॥ तुका म्हणे निद्रा जागृतिं सुषुप्तीं । तुम्हा हो श्रीपति साक्षी येथें ॥४॥

२४१९. नसताचि दाउनि भेव । केला जीव हिंपुटी ॥१॥ झालों तेव्हां कळलें जना । वाउगा हा आकांत ॥२॥ गवमिलों पुढें मागें । लाग लागें पावगा ॥३॥ तुका म्हणे केली आयनी । सलगीच्यांनीं सन्मुख ॥४॥

२४२०. हें कां आम्हा सेवा दान । देखों शीण विषमाचा ॥१॥ सांभाळा जी ब्रीदावळी । तुम्ही कां कलीसारिखे ॥२॥ शरणागत वैऱ्या हातीं । हे निश्चिति देखीली ॥३॥ तुका म्हणे इच्छा भेटी । पाय पोटीं उफराटे ॥४॥

२४२१. कां हो आलें नेणों भागा । पांडुरंगा माझिया ॥१॥ उफराटि तुम्हा चाली । क्रिया केली सत्याची ॥२॥ साक्षी हेंग माझें मन । आर्त कोण होतें तें ॥३॥ तुका म्हणे समर्थपणें । काय नेणें करितसा ॥४॥

२४२२. शकुनानें लाभ हानी । येथुनीच कळतसे ॥१॥ भयारूढ झालें मन । आतां कोण विश्राम ॥२॥ प्रीत कळे आलिंगनीं । संपादणी अत्यंत ॥३॥ तुका म्हणे मोकलिलें । कळों आलें बरवें हें ॥४॥

२४२३. न होय निग्रह देहासी दंडण । न वजे भुक तान्ह साहावली ॥१॥ करि नित्य नित्य करी आळवण । माझा अभिमान असों द्यावा ॥२॥ नाहीं विटाळलें कायावाचामन । संकल्पाशीं भिन्न असेचिना ॥३॥ तुका म्हणे भवसागरीं उतार । करावया आधार इच्छीतसें ॥४॥

२४२४. ऐकीली कीर्ति संतांच्या वदनीं । तरि हें टाकुनी आलों स्थळ ॥१॥ मागीला पुढीला करावें सारिखें । पालटो पारिखे नये देवा ॥२॥ ॥२॥ आम्हांसी विश्वास नामाचा आधार । तुटतां हे थार उरि नाहीं ॥३॥ तुका म्हणे येथें नसावें जी दुजें । विनंती पंढरीराजे परिसावी हे ॥४॥

२४२५. मोलानें आयुष्य वेंचतसे सवे । नुगवतां गांवे खेद होतो ॥१॥ उगऊं आलेति तुम्ही नारायणा । परिहार शीणा निमिष्यांत ॥२॥ लींगाडाची मासी न्यायें झाली परी । उरली ते उरी नाहीं कांहीं ॥३॥ तुका

म्हणे लाहो साधीं वाचाबळें । वोडीयेलों काळें धांव घाला ॥४॥

२४२६. म्हणउनी झालों क्षेत्रीचे संन्यासी । चित्त आशापाशीं आवरूनी ॥१॥ कदापिही नव्हे सीमा उल्लंघन । केलें विसर्जन आव्हानीचें ॥२॥ पारिखा ता आतां झाला दुजा ठाव । दृढ केला भाव एकविध ॥३॥ तुका म्हणे कार्य कारणाचा हेवा । नाहीं जीव देवा समर्पिला ॥४॥

२४२७. विश्रंभीली बुद्धि देहांत जवळी । काळाची आवकाळी वायचाळा ॥१॥ पालटलें जैसे देह मांडि पान । पिकलें आपण तयापरी ॥२॥ न मारितां हीनबुद्धि दुःख पावी । माजल्याचे गांवी तयापरी ॥३॥ तुका म्हणे गळ लागलीया मच्छा । तळमळे तैसा लवलाहें ॥४॥

२४२८. नवजावा तो काळ वायां । ह्रदय दया हे देवा ॥१॥ म्हणउनी जैसे तैसे । रहणी असे पायांचे ॥२॥ मोकळे हें मन कष्ट । करी नष्ट दुर्जन ॥३॥ तुका म्हणे कांहीं नेणे नवजे येणे परि वायां ॥४॥

२४२९. कल्पतरू अंगीं इच्छिलें तें फळ । अभागी दुर्बळ भावें सिद्धि ॥१॥ धन्य त्या जाति धन्य त्या जाति । नारायण चित्तीं सांठविला ॥२॥ बीजा ऐसा द्यावा उदकें अंकुर । गुणाचे प्रकार ज्याचे तया ॥३॥ तुका म्हणे कळे पारखिया हिरा । वोझें पाठी खरा चंदनाचें ॥४॥

२४३०. उकरडा आधीं अंगें नरकाडी । जातिचि ते जोडी तेचि चित्तीं ॥१॥ कासयानें देखे आंधळें माणिकें । चवीविण फिकें वायां जाय ॥२॥ काय जागे विष पालटे उपच्यारें । मुखासी अंतर तोचि बरें ॥३॥ तुका म्हणे काय उपदेश वेड्या । संगें होतां रेड्यासवें कष्ट ॥४॥

२४३१. जया शिरीं कारभार । बुद्धि सार तयाची ॥१॥ वर्ते तैसें वर्ते जन । बहुतां गुण येकाचा ॥२॥ आपणिया पाक करी । तो इतरिं सेविजे ॥३॥ तुका म्हणे शूर राखे । गांढ्या वाखे सांगातें ॥४॥

२४३२. येक येका साह्य करूं । आंघे धरूं सुपंथ ॥१॥ कोण जाणे कैसी परी । पुढें उरी ठेवितां ॥२॥ अवघे धन्य होऊं आतां । सरवितां सरण ॥३॥ तुका म्हणे आंघी जोडी । ते आवडी चरणाची ॥४॥

२४३३. फलकट तो संसार । येथें सार भगवंत ॥१॥ ऐसें जागवितों

मना । सरे जनासहित ॥२॥ अवघें निरसुनी काम । घ्यावें नाम विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे दुर्बाण । केला सीण तो मिथ्या ॥४॥

२४३४. शुधारसें वोल्हावली । रसना धाली न धाय ॥१॥ कळों नये झाली धनी । नारायणीं पूर्णता ॥२॥ आवडते तेंचि यासीं । ब्रह्मरसीं निरसे ॥३॥ तुका म्हणे बहुतांपरी । करुनी करी सेवन ॥४॥

२४३५. असंतीं कांटाळा हा नव्हे मत्सर । ब्रह्म ते विकारविरहित ॥१॥ तरी म्हणा त्याग प्रतिपादलासे । अनादि हा असे वेराकार ॥२॥ शिजलें हिरवें येका नांवें धान्य । सेवनारे भिन्न निवडतें ॥३॥ तुका म्हणे भूतीं साक्षी नारायण । अवगुणीं दंडण गुणीं पूजा ॥४॥

२४३६. आपुल आपण जागावें स्वहीत । जेणें राहे चित्त समाधान ॥१॥ बहुरंगें माया असे विखुरली । कुंटितचि चाली होतां बरें ॥२॥ पूजा ते अबोल्या चित्ताचे प्रकारीं । भाव विश्वंभरीं समर्पावा ॥३॥ तुका म्हणे गेला फिटोनियां भव । मग होतो देव मनाचाची ॥४॥

२४३७. असोनि न कीज अलिप्त अहंकारें । उगीच या भारें कुंथा-कुंथी ॥१॥ धांवा सोडवणें वेगीं लवकरी । मी तों झालों हरि शक्तिहीन ॥२॥ भ्रमल्यानें दिसे बांधल्याचे परि । माझें मजवरी वाहोनियां ॥३॥ तुका म्हणे धांव घेतलीसे सोई । आतां पुढें येई लवकरी ॥४॥

२४३८. आपुल्याचा भोत चाटी । मारी करंटी पारख्या ॥१॥ ऐसें जन भुललें देवा । मिथ्या हेवा वाढवी ॥२॥ गळ गिळी आमिषें मासा । प्राण आशा घेतला ॥३॥ तुका म्हणे बोकड मोहो । धरी पाहो खाटीकाचा ॥४॥

२४३९. विषय तो मरणासंगीं । नेणें सुटिका अभागी ॥२। शास्त्राचा केला लुंडा । तोंडीं पाडियेला धोंडा ॥२॥ अगर्दी मोक्ष नाहीं ठावा । काय सांगावें गाढवा ॥३॥ तुका म्हणे ग्यानगंड । सुखें पावो देवा नाड ॥४॥

२४४०. मीच विखळ मीच विखळ । येर सकळ बहु बरें ॥१॥ पाहिजे हें क्षमा केलें । येणें बोले विनवणी ॥२॥ मीच माझें मीच माझें । झालें वोझें अन्यायें ॥३॥ आधीं आंचवला आधीं आंचवला । तुका झाला निमनुष्य ॥४॥

२४४१. येणें जाणें तरी । राहे देव कृपा करी ॥१॥ ऐसें तव पुण्य नाहीं । पाहतां माझें गांठीं कांहीं ॥२॥ भय निवारिता । कोणा वेगळा अनंता ॥३॥ तुका म्हणे वारे भोग । वारी तरी पांडुरंग ॥४॥

२४४२. भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥१॥ परि आम्ही असों येकाचिये हातीं । नाचविते चित्तीं त्याचें तैसें ॥२॥ वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥३॥ तुका म्हणे तुम्ही बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥४॥

२४४३. लाउनियां पुष्टि पोरें । आणि करकर कथेमाजी ॥१॥ पडा पायां करा विनंति । दवडा हातीं धरुनियां ॥२॥ कुर्वाळूनि बैसे मोहें । प्रेम कां हें नाशितसे ॥३॥ तुका म्हणे वाटे चित्त । करा फजीत म्हणउनी ॥४॥

२४४४. पुण्य उभें राहो आतां । संतांचें या कारणें ॥१॥ पंढरिचे लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥२॥ संकल्प हे यावे फळा । कळवळा बहुतांचा ॥३॥ तुका म्हणे होउनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ॥ ४ ॥

२४४५. आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥१॥ प्रेम वाढविलें देवा । बरवी घेवोनियां सेवा ॥२॥ केली विनवणी । तैशी पुरविली धणी ॥३॥ तुका म्हणे काया । रमा कुरोंडि वरोनियां ॥४॥

२४४६. संतांची स्तुति ते दर्शनाच्या योगें । पडिलया प्रसंगें ऐसी किजे ॥१॥ संकल्प ते सदा स्वामीचेचि चित्तीं । फाको नये वृत्ति अखंडित ॥२॥ दास्यत्व तें असे एकविध नांवें । उरों नये जीवें भिन्नस्वासी ॥३॥ निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे तें परी तये वेळे ॥४॥

२४४७. सेजेचा येकांत आगिराशीं कळे । झाकलिया डोळे अधःपात ॥१॥ राहो अथवा मग जळो आगिमवीं । निवाड तो आधीं हाउनि गेला ॥२॥ भेणें झडपणें नाहीं येथें दुजें । पादरधिटा वोझें हातियारें ॥३॥ तुका म्हणे मज नाहींजि भरवसा । तोंवरि सहसा निवाड तो ॥४॥

२४४८. न सरे भांडार । भरलें वेंचितां अपार ॥१॥ मवीत्याचें पोट भरे । पुढीलासि पुढें उरे ॥२॥ कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ॥३॥ तुका म्हणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥४॥

२४४९. तरी हाव केली अमुप व्यापारें । व्हावें येकमरें धनवंत ॥१॥ झालों हरिदास शूरत्वाच्या नेमें । झालीं ठावीं वर्मे पुढीलांचीं ॥२॥ जना वेगळें हे असे अभिनव । बळी दिल्हा जीव म्हणउनि ॥३॥ तुका म्हणे तरी लागलों विल्हेमी । चालतिया दिसां स्वामी ऋणी ॥४॥

२४५०. कोण दुजें हारि सिण । शरण दीन आल्याचा ॥१॥ तुम्हावीण जगदीशा । उदार ठसा त्रिभुवनीं ॥२॥ कोण ऐसें वारि पाप । हरी ताप जन्माचा ॥३॥ तुका म्हणे धांव घालीं । कोण चाली मनाची ॥४॥

२४५१. ग्रंथाचे अर्थ नेणतां हे खळ । बहु अनर्गळ झाले विषई ॥१॥ नाहीं भेद म्हणून भलतेचि आचरे । मोकळा विचरे मनासवें ॥२॥ तुका म्हणे विषा नाम तें अमृत । पापपुण्या भीत नाहीं नष्ट ॥३॥

२४५२. कायावाचामनें झाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥१॥ विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥२॥ तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येवोनी गोपाळ राहे तेथें ॥३॥

२४५३. येई गा तूं मायबापा पंढरीच्या राया । तुजविण शीण वाटे क्षीण झाली काया ॥१॥ याति हीन मति हीन कर्म हीन माझें । सांडूनिया सर्व लज्जा शरण आलों तुज ॥२॥ दीननाथ दीनबंधु नाम तुज साजे । पतीतपावन नाम ऐसें ब्रीदावळी गाजे ॥३॥ विटवरी नीट उभा कटावरी कर । तुका म्हणे हेंचि आम्हा ध्यान निरंतर ॥४॥

२४५४. गंगा आली आम्हावरी । संतपाउलें साजिरीं ॥१॥ तेथें करीन आंघोळी । उडे चरणरजधूळी ॥२॥ येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळी ॥३॥ पाप पळालें जळालें । भवदुःख दुराविलें ॥४॥ तुका म्हणे धन्य झालों । संत सागरीं नाहालों ॥५॥

२४५५. हरिनाम कदाकाळीं कां रे नये वाचे । म्हणतां राम राम तुझ्या बाचें काय वेचे ॥१॥ पोटासाठीं खटपट करिसी अवघा वेळ । राम राम म्हणतां तुझी बसती दांतखीळ ॥२॥ द्रव्याच्या आशा तुजला दाही दिशा न पुरती । कीर्तनासीं जातां तुझी जड झाली माती ॥३॥ तुका म्हणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न म्हणे त्याचा गाढव माता पिता ॥४॥

२४५६. आम्हा सुकाळ नामाचा । जवळी हाट पंढरीचा । सादावीती वाचा । रामनामें वैष्णव ॥१॥ घ्या रे आपुलाल्यापरी । नका ठेऊं कांहीं उरीं । वोसरतां भरी । तोंडवरी अंबर ॥२॥ वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलीका । उभेंचि विकिलें येका । सनकादिकां सांपडले ॥३॥ धन्य धन्य भूमंडळीं । प्रगटली नामावळी । घेती जीं दुबळीं । तीं ही आगळीं सदैव ॥४॥ माप आपुलेनि हातें । कोणी नाहीं निवारितें । पैसे करुनि चित्तें । घ्यावें हितें आपुलिया ॥५॥ नाहीं वांटितां सरलें । आहे तैसेंचि भरलें । तुका म्हणे गेलें । वायांवीण न घेतां ॥६॥

२४५७. चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळां ॥१॥ तैसें जागें करि चित्ता । कांहीं आपुलिया हिता ॥२॥ निक्षेपीलें धन । तेथें गुंतलेंसें मन ॥३॥ नाशिवंतासाठीं । तुका म्हणे करिसि अटी ॥४॥

२४५८. करुनि जतन । कोणा कामा आलें धन ॥१॥ ऐसे जाणत जाणतां । कां रे होसील नेणता ॥२॥ प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज या संबंधु ॥३॥ तुका म्हणे येका । हरिविण नाहीं सखा ॥४॥

२४५९. आम्ही देतों हांका । कां रे झाला तूं मुका ॥१॥ न बोलसी नारायणा । कळलासी क्रियाहीना ॥२॥ आधिं करूं चोंघाचार । मग सांडूं भीडभार ॥३॥ तुका म्हणे शेवटीं । तुम्हा आम्हा घालूं तुटी ॥४॥

२४६०. नव्हे भिडा हें कारण । जाणें करूं ऐसे जन ॥१॥ जों जों धरावा लौकिक । रडवितोसि आणिक ॥२॥ चला जाऊं संतापुढें । ते हें निवडति रोकडे ॥३॥ तुका म्हणे तूं निर्लज्ज । आम्हा रोकडी गरज ॥४॥

२४६१. बहु होता भला । परि या रांडेनें नासीला ॥१॥ बहु सिकला रंग चाळे । खरें खोटें ईचे वेळे ॥२॥ नव्हतें आळवितें कोण्ही । ईनें केला जग ऋणी ॥३॥ ज्याचे त्यासी नेऊं देऊं । तुका म्हणे धावे खाऊं ॥४॥

२४६२. काय करावें तें आतां । झालें नयेसें बोलतां ॥१॥ नाहीं दोघांचीये हातीं । गांठी घालवी येकांतीं ॥२॥ होय आपुलें काज । तोंवरी भीड सांडूं लाज ॥३॥ तुका म्हणे देवा । आधीं निवडूं हा गोवा ॥४॥

२४६३. केली सलगी तोंडपिटी । आम्ही लडिवाळें धाकुटीं ॥१॥ न

बोलावें तेंचि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥२॥ अवघ्यामध्यें येक वेडे । तेचि खेळविती कोडें ॥३॥ तुका म्हणे मायबापा । मजवरी कोपों नका ॥४॥

२४६४. सिकउनी बोल । केलें कवतुक नवल ॥१॥ आपणिया रंजविलें । बापें माझिया विठ्ठलें ॥२॥ हातीं प्रेमाचें भातुकें । आम्हा देउनियां निकें ॥३॥ तुका करी टाहो । पाहे रखुमाईचा नाहो ॥४॥

२४६५. तेथें सुखाची वसती । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । जे गर्जताति हरिनामे ॥१॥ दोषां झाली घेघेमारी । पळति भरले दिशा चारी । न येती माघारी । नाहीं उरी परताया ॥२॥ विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें ॥३॥ पीट सेवितां न धाय । मुक मुकेलीच राहे । तुका म्हणे पाहे । कोण वास मुक्तीची॥४॥

२४६६. शुद्रवंशीं जन्मलों । म्हणउनी दंभें मोकलिलों ॥१॥ अरे तूं माझा आतां मायबाप पंढरिनाथा ॥२॥ घोकावया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥ ॥३॥ सर्वभावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥४॥

२४६७. वेडें वाकडें गाईन । परि मी तुझाची म्हणवीन ॥१॥ मज तारी दीननाथा । ब्रीदें साच करी आतां ॥२॥ केल्या अपराधाच्या राशी । म्हणउनि आलों तुजपाशीं ॥३॥ तुका म्हणे मज तारी । सांडीं ब्रीदें नाहीं तरी ॥४॥

२४६८. हरिभक्त माझे जीवलग सोईरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥१॥ अंतकाळीं येती माझ्या सोडवणे । मस्तक बैसणें देईन त्यासीं ॥२॥ आणिक सोईरे सज्जन वो कोण्ही । वैष्णवांवांचूनि नाहीं मज ॥३॥ देईन आलिंगन धरीन चरण । संवसारशीण नासे तेणें ॥४॥ कंठीं तुळसीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥५॥ तयाचे चरणीं घालीन मी मिठी । चाड त्या वैकुंठीं नाहीं मज ॥६॥ आळसें दंभ भावें हरीचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ॥७॥ कायावाचामनें देईन क्षेम त्यांसीं । चाड जीवित्वासी नाहीं मज ॥८॥ हरिचें नाम जे म्हणतील कोण्ही । तयां सुखा धनी पार नाहीं ॥९॥ तुका म्हणे तया उपकारें बांधलों । म्हणवोनि आलों शरण संतां ॥१०॥

२४६९. लटिका तो प्रपंच येक हरि साच । हरिविण आहाच सर्वेंद्रियें ॥१॥ लटिकें तें मौन्य भ्रमाचें तें स्वप्न । हरिविण ध्यान नैश्वर अवघें ॥२॥ लटिक्या विपत्ती हरिवीण करिती । हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥३॥ तुका म्हणे हरि हे धरिसि निर्धारीं । तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥४॥

२४७०. सर्वस्वा मुकावें तेणें हरिसि जिंकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥१॥ मोह ते ममता माया चाड चिंता । विपयकंदुव्यथा जाळुनीयां ॥२॥ लोक लज्जा दंभ आणि अहंकार । करुनि मत्सर देशधडी ॥३॥ शांति क्षमा दया सखया विनवणी । मूळ चक्रपाणी धाडि त्यांसि ॥४॥ तुका म्हणे याति अक्षरें अभिमान । सांडोनीयां शरण रिघे संतां ॥५॥

२४७१. येकांतींचें सुख देइ मज देवा । आघात या जीवा चुकऊनी ॥१॥ ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदी ॥२॥ मायबाळा भेटि सुखाची आवडी । तैशी मज गोडी देईं देवा ॥३॥ कीर्ति ऐकोनियां झालों शरणागत । दासाचें तूं हित करीतोसी ॥४॥ तुका म्हणे मी तो दीन पापराशी । घालावें पाठिसी मायबापा ॥५॥

२४७२. लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥१॥ लटिकाचि दंभ घातलें दुकान । चाळविले जन पोटासाठीं ॥२॥ लटिकेंचि केलें वेदपारायण । जरी नाहीं स्फुंदन प्रेम कथे ॥३॥ लटिकें तें तप लटिका तो जप । आळस निद्रा झोंप कथाकाळीं ॥४॥ नाम नावडे तो करिल बोहरी । नाहीं त्याचि खरी चित्तशुद्धी ॥५॥ तुका म्हणे ऐशीं गर्जति पुराणें । शिष्टांचीं वचनें मागिलाही ॥७॥

२४७३. भूतीं भगवद्भाव । मात्रांसहित जीव । अद्वैत तो ठाव । निरंजनी येकला ॥१॥ ऐसीं गर्जति पुराणें । वेदवाणी सकळ जन । संत गर्जतील तेणें । अनुभवें निर्भर ॥२॥ माझें तुझें हा विकार । नीरसतां येकंकार । नलगे कांहीं फार । विचारांचि कारण ॥३॥ तुका म्हणे दुजें । हें तों नाहींच सहजें । संकल्पाचें काजें । आपेआप वाढलें ॥४॥

२४७४. नेणें फुंको कान । कांहीं येकांतींचें ज्ञान ॥१॥ तुम्ही आईका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥२॥ नाहीं देखीला तो डोळां । देव दाखऊं

सकळां ॥२॥ चिंतनाचे सुखें । तुका म्हणे नेणें दुःखें ॥३॥

२४७५. त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥१॥ मज जैसा तैसा राहे । काय पाहे उरलें तें ॥२॥ अंतरीचे विषम गाढे। येऊं पुढें न द्यावें ॥३॥ तुका म्हणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥४॥

२४७६. मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ती ॥१॥ देह विसरे आपुला । जवळी घेतां शीण गेला ॥२॥ दावी प्रेम भातें । अंगावरी चढतें ॥३॥ तुका संतांपुढें । पाईं झोंबे लाडें कोडें ॥४॥

२४७७. कोणा पुण्या फळा आलें । आजि देखिलीं पाउलें ॥१॥ ऐसें नेणो नारायणा । संतीं सांभाळीलें दीना ॥२॥ कोण लाभकाळ । दीन आजिवा मंगळ ॥३॥ तुका म्हणे झाला । येव्हढा लाभ हा विठ्ठला ॥४॥

२४७८. मान इच्छि तो तो अपमान पात्र । अमंगळ सर्व अभाग्याची ॥१॥ येकाचिये अंगीं दुजियाचा वास । आशा पुढें नाश सिद्ध करी ॥२॥ अधील फलाशी कोठें पावों शके । वासनेचे भीकेवरि चाली ॥३॥ तुका म्हणे राजहंस ढोरा नावें । काय तया द्यावें अलंकाराचें ॥४॥

२४७९. संसारापासुनि कई सोडवीसी । न कळे हृषिकेशी काय जाणे । करितां न सरे कांहीं अधिक वढ पाही । तृष्णा देशधडी केली । भक्ति-भजनभाव यासि नाहीं ठाव । चरणीं तुझ्या अंतरलों । मागें पुढें रिग न पुरेचि पाहतां । अवघा अवघीं वेष्टिलों ॥१॥ आतां माझी लाज राखें नारायणा । हीन दीन लीन याचकाची । करितां न कळे कांहीं असतील गुण दोष । करि होळी संचिताची ॥२॥ इंद्रियद्वारें मन धांवें सैर । नागवे कारतांची कांहीं । हात पाय कान मुख लिंगस्थान । नेत्रद्वारें घ्राण पाहीं । जया जसी सोय तया तैसें होय । क्षण येक स्थीर नाहीं । करिती तडातोडि ऐसी याची खोडी । न चले माझें यास कांहीं ॥३॥ शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधु । धनलोभ मायावंत । जन लोकपाळ मैत्र हे सकळ । सोयरे सज्जन बहुत । नाना कर्म डाय करिती उपाय । बुडावया घातपात । तुका म्हणे हार राखें भलत्यापरी । आम्ही तुझीं शरणागतें ॥४॥

२४८०. नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥१॥ ऐसा लाभ

बांधा गाठीं । विठ्ठल पाईं पडे मिठी ॥२॥ नामापरतें साधन नाहीं । जें तूं करिसी आणिक कांहीं ३॥॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहुं नका ॥४॥

२४८१. प्राण समर्पीला आम्ही । आतां उसीर कां स्वामी ॥१॥ माझें फेडावें उपणें । भार न मना या रिगें ॥२॥ झाला कंठस्फोट । जवळि पातलें निकट ॥३॥ तुका म्हणे सेवा । कैसी बरी वाटे देवा ॥४॥

२४८२. येणें मार्गें आले । त्याचें निसंतान केलें ॥१॥ ऐसी अवघड वाट । कोणा सांगावा बोभाट ॥२॥ नागविल्या थाटी । उरों नेदीच लंगोटि ॥३॥ तुका म्हणे चोर । तो हा उभा कटीं कर ॥४॥

२४८३. जोंवरि तोंवरि जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥१॥ तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्ति ब्राह्मणा देखिलें नाहीं ॥२॥ तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी देखीली नाहीं ॥३॥ तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमायीचा पूत दृष्टी देखिला नाहीं ॥४॥ जोंवरी तोंवरि माळामुद्रांचें भूषण । जंव तुक्याचें दर्शन झालें नाहीं ॥५॥

२४८५. धरुनि दोनी रूपें पाळणें संव्हार । करी कोप रुद्र दयाळु विष्णु ॥१॥ ज़टाजूट येका मुकुट मांथा शिरीं । कमळापति गौरीहर येक ॥३॥ भस्म उधळण लक्षुमीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ॥३॥ वैजयंती माळा वासुकीचा हार । लेगें अलंकार हरिहरां ॥४॥ कपाळ झोळी येका स्मशानींचा वास । येक जगन्निवास विश्वंभर ॥५॥ तुका म्हणे मज उभयरूपीं येक । सारोनी संकल्प शरण आलों ॥६॥

२४८६. उचिताचा भाग होतों राखोनियां । दिसती ते वायां कष्ट केले ॥१॥ वचनाची कांहीं राहेचिना रुचि । खळा ऐसे वाची कुची झाले ॥२॥ विश्वासानें माझें बुडविलें घर । करविला धीर येथवरी ॥३॥ तुका म्हणे सेखी थार नाहीं बूढ । कैसें तुम्हीं कोड पुरविलें ॥४॥

२४८७. लांब लांब जटा काय वाढऊनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले॥१॥ खायाचा बोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापसाला बोध कैंचा ॥२॥

सेवी भांग अफू तमाखू उदंड । परि तो अखंड भ्रांती माजी ॥३॥ तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यांसी अंतरला पांडुरंग ॥४॥

२४८८. अवघींच तीर्थे घडलीं येक वेळा । चंद्रभागा डोळा देखिलीया ॥१॥ अवघींच पापें गेलीं दिगंतरीं । वैकुंठ पंढरी देखिलीया ॥२॥ अवघीया संतां येक वेळां भेटी । पुंडलीक दृष्टी देखिलीया ॥३॥ तुका म्हणे जन्मा आल्याचें सार्थक । विठ्ठलचि येक देखिलीया: ॥४॥

२४८९. आम्ही असों निश्चिंतीनें । येक्या गुणे तुमचिया ॥१॥ दुराचारी तरलें नामें । घेतां प्रेमें म्हणोनी ॥२॥ नाहीं तुम्हां धांव घेतां । कृपावंता आळस ॥३॥ तुका म्हणे विसरूं काई । तुज वो आई विठ्ठले ॥४॥

२४९०. अनुभवें वदे वाणी । अंतर ध्यानीं आपुले ॥१॥ कैची चिका दूधचवी । जरी दावी पांढरें ॥२॥ जाति ऐसा दावी रंग । बहु जग या नांवें ॥३॥ तुका म्हणे खद्योत तें । ढुंगाभोंवतें आपुलीया ॥४॥

२४९१. परपीडक तो आम्हा दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनी ॥१॥ दंडूं त्यागूं बळें नावलोकूं डोळां । राखूं तो चांडाळ ऐसा दुरी ॥२॥ अनाचार कांहीं न साहे अवगुण । बहु होय मन कासावीस ॥३॥ तुका म्हणे येकविध माझी सेवा । विन्मुख तें देवा वाळी चित्तें ॥४॥

२४९२. कांहीं न मागे कोणासी । तोचि आवडे देवासी ॥१॥ देव तयासी म्हणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥२॥ भूतदया ज्याचे मनीं । त्याचें घरीं चक्रपाणी ॥३॥ नाहीं नाहीं त्या समान । तुका म्हणे मी जमान ॥४॥

२४९३. नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥१॥ ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥२॥ ब्रह्मादीकां ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥३॥ तुका म्हणे सार ध्यावें । मनें हरिरूप पाहावें ॥४॥

२४९४. अडलीया जना होसी साहाकारी । आंधळीया करीं काठी तूंची ॥१॥ आडले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥२॥ प्रल्हाद तो महासंकटीं रक्षिला । तुम्ही आपंगिला नानापरी ॥३॥ आपुलेंचि अंग तुम्ही वोढवीलें । त्याचें निवारिलें महादुःख ॥४॥ तुका म्हणे तुझे

कृपे पार नाहीं । माझे विठाबाई जननीये ॥५॥

२४९५. तपाशीं तें मन करूं पाहे घात । धरुनि सांगात इंद्रियांचा ॥१॥ म्हणोनि कीर्तन आवडलें मज । सांडुनिया लाज हेंचि करी ॥२॥ पाहातां आगमनिगमाचा ठाव । तेथें नाहीं भाव येकवीध ॥३॥ तुका म्हणे येथें नाहीं वो विकार । नाम येक सार विठोबाचें ॥४॥

२४९६. गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥१॥ भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दूसरा ॥२॥ न कळतां दोरी साप । राहो नेदावा तो कांप ॥३ तुका म्हणे गुण दोषीं । ऐसें न पडावें सोसी ॥४॥ .

२४९७. अंगीकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तेंहि तेणें वंद्य केलें ॥१॥ अजामीळ भिल्ली तारिली कुंटिणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली । ब्रह्म-हत्या रासी पातकें अपार । वाल्मिक किंकर तारियेला ॥३॥ तुका म्हणे येथें मज न प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥४॥

२४९८. अवीट हें क्षीर हरिकथा माउली । सेवितां सेविली वैष्णवजनीं ॥१॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥२॥ पतीत पातकी पावन पंगती । चतुर्भुज होती देवा ऐसे ॥३॥ सर्व सुखें तयां मोहरति ठायां । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥३॥ निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंतीं । धरूनीयां प्रीति गायनाची ॥५॥ तुका म्हणे केली साधना गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनि ठेला ॥६॥

२४९९. धनवंता घरीं । करी धनाची चाकरी । होय बैसल्या व्यापार । नलगे सांडावेंचि घर ॥२॥ रानीं वनीं द्वीपीं । असतीं तीं होतीं सोपीं ॥३॥ तुका म्हणे मोल । देतां कांहीं नव्हे खोल ॥४॥

२५००. हा गे माझा अनुभव । भक्तिभाव भाग्याचा ॥१॥ केला ऋणी नारायण । नव्हे क्षण वेगळा ॥२॥ घालोनियां भार माथां । अवघी चिंता वारली ॥३॥ तुका म्हणे वचनासाठीं । नाम कंठीं धरियेलें ॥४॥

२५०१. देव आहे सुकाळ देशीं । अभाग्यासी दुर्भिक्ष ॥१॥ नेणति हा करूं सांठा । भरले फांटा आडराणें ॥२॥ वसऊनि असे घर । माग दूर घातला ॥३॥ तुका म्हणे मन मुरे । मग जें उरे तेंचि तूं ॥४॥

२५०२. खुंटोनियां दोरी आपणियांपासीं । वाउडी आकाशीं मोकलिली ॥१॥ आपुलिया आहे मालासी जतन । गहाणाचें ऋण बुडों नेणे ॥२॥ बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन तें सार करायाची ॥३॥ तुका म्हणे माझी निश्चितीची सेवा । वेगळें नाहीं देवा उरों दिलें ॥४॥

२५०३. शहाणपणें वेद मुका । गोपिका त्या ताकटी ॥१॥ कैसें येथें कैसें तेथें । शाहाणे ते जाणती ॥२॥ यज्ञमुखें खोडी काढी । कोण गोडी बोराची ॥३॥ तुका म्हणे भावावीण । अवघा शीण केला तो ॥४॥

२५०४. मजुराचें पोट भरे । दाता उरे संचला ॥१॥ या रे या रे हातोहातीं । काम माती साराची ॥२॥ राजकीर्दी होतो झाडा । रोकडाची पर्वत रे तुका म्हणे खोल पाया । वेचों काया कैसेसी ॥४॥

२५०५. स्मशानीं आम्हा न्याहाळींचें सुख । या नांवें कवतुक तुमची कृपा ॥१॥ नाहीं तरी वायां अवघेंचि निर्फळ । शब्द ते पोकळ बडबड ॥२॥ झाडें झुडें जीव सोईरे पाषाण । होते तईं दान तुम्हीं केलें ॥३॥ तुका म्हणे आतां पाहे अनुभव । घेऊनि हातीं जीव पांडुरंगा ॥४॥

२५०६. आमुचि जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचें ॥१॥ लागल तरी कोणी घ्या रे धणीवरी । अमुपचि परी आवडीच्या ॥२॥ उभारिला कर प्रसिद्ध या जगें । करूं केला त्याग मागें पुढें ॥३॥ तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसें देऊं दान येक वेळा ॥४॥

२५०७. दधीमाजी लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणें मथन ॥४॥ अग्नि काष्ठामाजी ऐसें जाणे जन । मथिलियावीण कैसा जाळीं ॥२॥ तुका म्हणे मुख मलीन दर्पणीं । उजळल्यावांचुनी कैसें भासे ॥३॥

२५०८. नको नको मना गुंतों मायाजाळीं । काळ आला जवळीं ग्रासावया ॥१॥ काळाचिये उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥२॥ सोडवीना राजा देशीचा चौधरी । आणिक सोयरीं भलीं भलीं ॥३॥ तुका म्हणे तूज सोडवीना कोण्ही । येका चक्रपाणी वांचुनीयां ॥४॥

२५०९. पुढें जेणें लाभ घडे । तेंचि वेडे नाशिती ॥१॥ येवढी कोठें नागवण । अंधारून विष घ्यावें ॥२॥ होणारासी मिळे बुद्धी । नेणे शुद्धी

धरूं ते ॥३॥ तुका म्हणे जना सोंग । दावी रंग आणीक ॥४॥

२५१०. ऐका गा ये अवघे जन । शुद्ध मन तें हीत ॥१॥ अवघा काळ नव्हे जरी । समयावरी जाणावें ॥२॥ नाहीं कोण्ही सर्वे येतां । संचिता या वेगळें ॥३॥ कर्मभूमि ऐसा ठाव । वेवसाव जाणावा ॥४॥ बरवा अवकाश आहे । करा साह्य इंद्रियें ॥५॥ तुका म्हणे उत्तम जोडी । जाती घडी नरदेह ॥६॥

२५११. संत सेवेसी अंग चोरी । दृष्टि न पडो तयावरी ॥१॥ ऐसी-यासी व्याली रांड । जळो जळो तिचें तोंड ॥२॥ संत चरणीं ठेवितां भाव । आपोआप भेटे देव ॥३॥ तुका म्हणे संतसेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा ॥४॥

२५१२. गेले पळाले दिवस रोज । काय म्हणसी माझें माझें ॥१॥ सळे धरुनि बैसला काळ । फांकों नेदी घटका पळ ॥२॥ कां रें अद्यापि न कळे । केश फिरले कान डोळे ॥३॥ हित कळोनि असतां हातीं । तोंडीं पाडुनि घेसी माती ॥४॥ तुज ठाऊकें मी जाणार । पाया शोधुनि बांधिसी घर ॥५॥ तुका म्हणे वेगें । पंढरिराया शरण रीघें ॥६॥

२५१३. आतां माझ्या मायबापा । तूं या पापा प्रायश्चित्त ॥१॥ फजित हे केले खळ । तो विटाळ निवारी ॥२॥ प्रेम आतां पाजी रस । करी वास अंतरीं ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । जीवलगा माझीया ॥४॥

२५१४. कां रे न पवसि धांवण्या । अंगरख्या नारायणा ॥१॥ अंगीं असोनिया बळ । होसी खट्याळ नाट्याळ ॥२॥ आम्हा नरकां जातां । काय येईल तुझ्या हाता ॥३॥ तुका म्हणे कान्हा । क्रियानष्टा नारायणा ॥४॥

२५१५. माझे पाय तुझी डांई । ऐसें करिं गा भाक देईं ॥१॥ पाहातां तंव उफराटें । घडे तरी भाग्य मोठें ॥२॥ बहू साधन मोलाचें । यासी जोडा दुजें कैचें ॥३॥ नको अनुमानूं विठ्ठला । तुका म्हणे धडा झाला ॥४॥

२५१६. पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥१॥ येर वेठ्या पोट भरी । चाम मसकेच्या परि ॥२॥ जेवुनी तो धाला । हरिचिंतनीं केला काला ॥३॥ तुका म्हणे चवी आलें । जें कां मिश्रीत विठ्ठलें ॥४॥

२५१७. चरणांचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥१॥ अंध पारखी माणिकें । बोलवीसी स्पष्ट मुके ॥२॥ काय नाहीं सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥३॥ तुका म्हणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥४॥

२५१८. बळिवंत कर्म करी । आपुला तो धर्म ॥१॥ पुढें घालोनीयां सत्ता । न्यावें पतना पतिता ॥२॥ आचरणें खोटीं । केलीं सलताति पोटीं ॥३॥ तुका म्हणे देवा । नाहीं भजन केली सेवा ॥४॥

२५१९. जननिया बाळका रे घातलें पाळणा । पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा । अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा । वैखरी धरुनी हातीं भाव दावी खेळणा ॥१॥ निजीं रे नीज आतां म्हणोनि परियदे माता । खेळतां कष्टलासी बाळा तूं रे नेणतां ॥२॥ खेळतां बाहेरी रे मुला लोकांच्या सवें । बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें । खेळतां दुश्चित्त रे देखोनी तें न्यावें । म्हणोनि सांगतों तुज शीघ्र वचन पाळावें ॥३॥ संचित मागें तुज शुद्ध होतें सांगाती । तेणें तुज वांचविलें वेरझारीया हातीं । आणिक नेलीं मागें काय जाणों ते किती । आलासी येथवरी थोर पुण्य बहूतीं ॥४॥ खेळतां शुक देव रे तो लागला पाठीं । लपला वरुषें बारा तये मातेचे पोटीं । रिघतां बाहेरी रे पळे घेउनि कासोटी । तेचि परि झाली स्वामी भेणें रिघे कपाटीं ॥५॥ खेळतां चक्रवर्ती जनका लागला धाक । पडिला अग्नीमाजी पाव जळत येक । भरलासे कांप अंगीं सुख नाठवे दुःख । आपपर तेंहि नाहीं देहभाव सकळिक ॥६॥ शिबिया चक्रवर्ती कव पडिली अवचित्तीं । धीट तो न भिये तया मास कापिलें हातीं । टाकिलें तयावरी खुणे गोविला अंतीं । पावला मायबाप हिरोनि घेतला हातीं ॥७॥ बांधलें अजामिळा वेश्या गणिका कैसी । मारिली हाक धाकें कळलें मायबापासी । घातली धांव नेटें वेगीं पावला त्यासी । हिरोनि नेलीं दोघें आपणया तीं पासीं ॥८॥ धरुनी आठऊं रे बाळ राहें निश्चळ । खेळतां दुश्चित्ता रे नको जाऊं बरळ । ठाकताहे तुजलागी दिवस लेखुनी काळ । मग नेदी आठऊं रे नेत्रीं घालीं पडळ ॥९॥ ऐसी ती कृपावंतें बाळा मोहिलें चित्त । सुस्वरें कंठ गाय मधुर आणि संगीत । तेणें तेंचि चित्त राहे होवोनियां निवांत ।

पावती तुका म्हणे नाहीं विश्वास ते घात ॥१०॥

२५२०. देवें देऊळ सेविलें । उदक कोरडेंचि ठेविलें ॥१॥ नव्हे मत गुढ ऊमाने कांहीं । तूं आपआपणातें पाहीं ॥२॥ पाटे पूर वोसंडला । सरिता सागर तुंबुनि ठेला ॥३॥ वांझे घरीं बाळ तान्हा । येक बाळी दे कानां ॥४॥ तुका म्हणे पैस । अनुभविया ठावा गोडी रस ॥५॥

---

लोहगावीं मूल कीर्तनांत मेलें तें जिवंत केलें तो अभंग

२५२१. अशक्य तें तुम्हां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥१॥ मागें काय जाणों स्वामींचे पवाडे । आतां कां रोकडे दाऊं नये ॥२॥ थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे । म्हणवितों दास काय थोडे ॥३॥ तुका म्हणे माझे निववावे डोळे । दाऊनि सोहळे सामर्थ्याचे ॥४॥

२५२२. दाता तो येक जाणा । नारायणा स्मरवी ॥१॥ आणिक नाशिवंतें काय । न सरे हाय ज्याच्यानें ॥२॥ यावें तया काकुळती । जे दाविती सुपंथ ॥३॥ तुका म्हणे उरि नुरे । त्याचे खरे उपकार ॥४॥

२५२३. लाडकी लेक संताची । मजवरी कृपा बहुतांची ॥१॥ अक्षईचा चूडा हातां आला । अंकण मोती नाकाला ॥२॥ बोध मुराळी श्रृंगारिला । चौऱ्यांसींचा शिक्का केला । तुका तुकीं उतरला । साहनकेचा कौल दिल्हा ॥४॥

२५२४. जाती पंढरीस । म्हणे जाईन तयास ॥१॥ तया आहे संवसार । ऐसें बोलतो माहार ॥२॥ असो नसो भाव । जो हा देखे पंढरिराव ॥३॥ चंद्रभागे न्हाती । तुका म्हणे भलते याती ॥४॥

२५२५. धरियेलीं सोंगें । अवघिं येणें पांडुरंगें ॥१॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागे तिरीं ॥२॥ अंतर्व्यापी बाह्य । धुंडाळीतां कोठें नोव्हे ॥३॥ योगयागतपें । ज्याकारणें दान जपें ॥४॥ दिल्हें नेदी जती । भोग सकळ ज्या होती ॥५॥ अवघि लीला पाहे । तुका म्हणे दासा साह्य ॥६॥

२५२६. ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥१॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा साहा चौ अठराजणा ॥२॥ चिंतीतां जयासी । भुक्ति मुक्ति कामारी दासी ॥३॥ वैकुंठासी जावें । तुका म्हणे ज्याच्या नांवें ॥४॥

२५२७. ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन पडे ॥१॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुती ॥२॥ शिणलीं सहस्र तोंडें । शेषा फणि ऐसीं धेंडें ॥३॥ तुका म्हणे मही । पत्र सिंधु न पुरे शाई ॥४॥

२५२८. देव राखे तया मारिल कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥१॥ न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेंहि अमृत पाहीं ॥२॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ॥३॥ तुका म्हणे नारायण । येतां गोव्या वारी बाण ॥४॥

२५२९. कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥१॥ दीननाथा ब्रीदा सांभाळीं आपुले । नको पाहों केलें पापपुण्य ॥२॥ पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरिले ॥३॥ तुकयाबंधु म्हणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥४॥

२५३०. कोठें गुंतलासी करुण्याच्या धांवया । आली देवराया निद्रा तूज ॥१॥ कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती सुखें गोपिकांचीं ॥२॥ काय पडिलें तूज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चालवे ॥३॥ काय माझे तूज गुणदोष दिसतो । म्हणोनि श्रीपति कोपलासी ॥४॥ काय झालें सांगा माझिय कपाळा । उरला जीव डोळां तुका म्हणे ॥५॥

२५३१. परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवीतें चित्ता ॥१॥ काय बोलोनियां तोंडें । मनामाजी कानकोंडें ॥२ धर्मधारिष्ट गोष्टी सांगे । उष्ट्या हातें मुडवी काग ॥३॥ जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥४॥ बोले तैसा चाले । तुका म्हणे तो अमोल ॥५॥

२५३२. असत्य वचन होता सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥२॥ जाईल पतना यासी संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों तें ॥२॥ वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ट त्या कर्मासाठीं गेला ॥३॥ तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें । अंतरीचें कुडें देईल दुःख ॥४॥

२५३३. जळों तिचें तोंड । ऐसियातें व्याली रांड ॥२॥ सदा भोव-यांसी गांठी । क्रोध धडडित पोटीं ॥२॥ फोडीली गोवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥३॥ तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥४॥

२५३४. तोंडें खाय फार । पादे बोचा करी मार ॥१॥ एक ऐसे ते शाहाणे । आपुले आधीन तें नेणे ॥२॥ कुरें घालूनि उघडे । रागें पाहे लोकांकडे ॥३॥ खेळे द्यूतकर्म । मग बोंबले जुलूम ॥४॥ निजतां आला मोहो । वीता म्हणे मेला गांहो ॥५॥ तुका म्हणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी ॥६॥

२५३५. पतिव्रता नेणें आणिकाचि स्तुती । सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥१॥ तैसें माझें मन येकविध झालें । नावडे विठ्ठलेंविण दुजें ॥२॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा । गाय ते कोकिळा वसंतसी ॥३॥ तुका म्हणे बाळ मातेपुढें नाचे । बोल आणिकाचे नावडती ॥४॥

२५३६. पंडित म्हणतां थोर सुख । परि तो पाहतां आवघा मूर्ख ॥१॥ काय करावें घोकिलें । वेदपठण वायां गेलें ॥२॥ वेदीं सांगीतलें न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥३॥ तुका देखे जीव शीव । हाचि तेथींचा अनुभव ॥४॥

२५३७. पंडित तोचि भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥१॥ अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥२॥ रिता नाहीं कोण्ही ठाव । सर्वां भूतीं वासुदेव ॥३॥ तुका म्हणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष ॥४॥

२५३८. ऐका पंडित जन । तुमचें वंदितों चरण ॥१॥ नका करूं नरस्तुति । माझी परिसा हे विनंति ॥२॥ अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा अधीन ॥३॥ तुका म्हणे वाणी । सुखें वेंचा नारायणीं ॥४॥

२५३९. विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥१॥ विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥२॥ विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥३॥ विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥४॥

२५४०. काय तुझें वेंचे मज भेटी देतां । वचन बोलतां येक दोन ॥१॥ काय तुझें रूप घेतों मी चोरून । त्या भेणें लपोन राहिलासी ॥२॥ काय तुझें आम्हा करावें वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ॥३॥ तुका म्हणे

तुझी नलगे दसोडी ॥४॥ परी आहे आवडी दर्शनाची ॥५॥

२५४१. संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर तें यमपुरी ॥१॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । ज्याच्या संगें जना पीडा ॥२॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जीताचि नर्कवासी ॥३॥ तुका म्हणे नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥४॥

२५४२. आलें देवाचिये मना । तेथें कोणाचें चालेना ॥१॥ हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबा घरीं पाणी ॥२॥ पांडवांचा साहाकारी । राज्यावरुनि केलें दुरी ॥३॥ तुका म्हणे उगेंचि राहा । होईल तें सहज पाहा ॥४॥

२५४३. निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्यां कीर्तन करितां डोले ॥१॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ॥२॥ मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागेंपुढें ॥३॥ तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥४॥

२५४४. काम क्रोध आम्ही वाहिले विठ्ठलीं । आवडी धरीली पायांसवें ॥१॥ आतां कोण पाहें मागें परतोनी । गेला हारपोनि देहभाव ॥२॥ रिद्धिसिद्धि सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥३॥ तुका म्हणे आम्ही विठोबाचे दास । करुनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥४॥

२५४५. उठाउठी अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥१॥ तें या पंढरिसीं घडे । खळा पाझर रोकडे ॥२॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥३॥ तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ॥४॥

२५४६. पंढरी पंढरी म्हणतां पापचि बोहरी ॥१॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्साव ॥२॥ रिद्धिसिद्धि लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ॥३॥ अधिक अक्षरनें येका । भूवैकुंठ म्हणे तुका ॥४॥

२५४७. भार घाली देवा । नलगे देश डोईं घ्यावा ॥१॥ देह प्रारब्धा आधीन । सोसे अधिक वाढे शीण ॥२॥ व्यवसाय निमित्य । फळ देतसे संचित ॥३॥ तुका म्हणे फिरे । भोवंडीनें दम जीरे ॥४॥

२५४८. भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करुनि ठेवा ॥१॥ शांति धरणें जीवासाठीं । दशा उत्तर गोमटी ॥२॥ देह लेखावे असार । सत्य

परउपकार ॥३॥ तुका म्हणे हे मिराशी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥४॥

२५४९. येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरी जाय ॥ध्रु॥ मज न साहे वांकडे ॥१॥ ये विठ्ठलकथेपुढें ॥२॥ ऐकोनि मरसी वृथा । जंव आहेसी तूं जीता ॥३॥ हुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड ॥४॥ पुसेल कोणि त्यास । जोर करी उपदेश ॥५॥ आम्ही विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शिर ॥६॥ घेउं पुढति जन्म । वानूं कीर्ति मुखें नाम ॥७॥ तुका म्हणे मुक्ति । नाहीं आसचि ये चित्तीं ॥८॥

२५५०. अनुहतीं गुंतला नेणें बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥१॥ मदें माते तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ॥२॥ आणिकाची वाणी वदे तेणें मुखें । उपचार दुःखें नाठवती ॥३॥ तें सुख बोलतां आश्चर्य या जनां । विपरीत मना भासतसे ॥४॥ तुका म्हणे बाह्य रंग ते विटलें । अंतर निवालें ब्रह्मरसें ॥५॥

२५५१. ब्रह्मरसगोडी तयासी फावली । वासना निमाली सकळ ज्याची ॥१॥ नाहीं त्या विटाळ अखंड सोंवळा । उपाधि वेगळा जाणीवेसीं ॥२॥ मन हें संचलें झालें येके ठाईं । तया उणें काईं निजसुखा ॥३॥ तेचि पुण्यवंत परउपकारी । प्रबोधी त्या नारी नर लोकां ॥४॥ तुका म्हणे त्याचे पाईं पायपोस । होवोनियां वास करीन तेथें ॥५॥

२५५२. जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥१॥ दासा कृपासिंधु नुपेक्षि सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥२॥ मागों नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदि श्रम पावों काईं ॥३॥ तुका म्हणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥४॥

२५५३. परद्रव्य परनारीचा अभिलाष । तेथुनि हा ऱ्हास सर्वभाग्या ॥१॥ घटिका दीस मास वर्षें लागति तीन । बांधलें पतन गांठोळीस ॥२॥ पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करि गुण निश्चयेसीं ॥३॥ तुका म्हणे येका तडताथवड । काळ लागे नाड परि खरा ॥४॥

२५५४. आम्हा हरिच्या दासा कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥१॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥२॥ जैसा केला तैसा होय । धांवे

सोय धरोनी ॥३॥ तुका म्हणे असो सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥४॥

२५५५. समर्थाचें केलें । कोणा जाईल मोडिलें ॥१॥ वायां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥२॥ ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥३॥ ज्यानें त्याचे हातीं । भुंके तयाची फजिती ॥४॥ तुका म्हणे कोटी । बाळे झाले शूळ पोटीं ॥५॥

२५५६. हे माझी मिरासी । ठाव तुझ्या पायांपासीं ॥१॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥२॥ देवोनियां जीव । वडीलें साधिला हा ठाव ॥३॥ तुका म्हणे देवा । जुनाट हे माझी सेवा ॥४॥

२५५७. नेणे गति काय कवण अधोगती । मानिली निश्चिंती तुझ्या पाईं ॥१॥ कर्म धर्म कोण नेणे हा उपाव । तुझ्या पाईं भाव ठेवियेला ॥२॥ नेणे निरसूं पाप पुण्य नेणे काय । म्हणोनियां पाय धरिले तूझे ॥३॥ वेडा मी अविचार न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे तुजकरितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥५॥

२५५८. तुझा म्हणवोनि जालों उतराई । त्याचें वर्म काई तें मी नेणें ॥१॥ हातीं धरुनियां दावीं मज वाट । पुढें कोण तेचि देवा ॥२॥ देव भक्तपण करावें जतन । दोहीं पक्षीं जाण तूंचि बळी ॥३॥ अभिमानें तूज लागली हे लाज । शरणागता काज करावया ॥४॥ तुका म्हणे बहु नेणता मी फार । म्हणोनि विचार जागविला ॥५॥

२५५९. मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥१॥ सर्व सुख लागे घेवोनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस वोती ॥२॥ पीतांबर छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥३॥ तुका म्हणे हेंचि करावें जीवन । वाचे नारायण तान भूक ॥४॥

२५६०. झालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥१॥ ठाव द्यावा पायांपासीं । मी तों पातकाची राशी ॥२॥ सकळहि गोवा । माझा उगवोनी देवा ॥३॥ तुका म्हणे भय । करा जवळी तें नये ॥४॥

२५६१. अंतरींच जाणा । तरी कां येऊं दिल्हें मना ॥१॥ तुमची करावी म्यां सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥२॥ नव्हति मोडामोडी । केली

मार्गे तेचि घडी ॥३॥ तुका म्हणे दिल्हा ठाव । पाईं लागों दिल्हा भाव ॥४॥

२५६२. पवित्र होईन चरित्र उच्चारें । रूपाच्या आधारें गोजरिया ॥१॥ अपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठीं । पाईं घाली मिठी पाहे डोळां ॥२॥ गाईन वोविया शिष्टांच्या आधारें । सारिन विचारें आयुष्याचा ॥३॥ तुका म्हणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलीया ॥५॥

२५६३. काय ऐसा जन्म जावा वायांवीण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥१॥ कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥२॥ शता येका तरी जन्माचे शेवटीं । कृपाळुवा पोटीं येईल दया ॥३॥ तुका म्हणे नाहीं फाको तरी देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥४॥

२५६४. नाहीं कोण्हि दिसे जात वायांवीण । साध्य नाहीं शीण लटिकाचि ॥१॥ येकाचिया माथा असावें निमित्त । नसो नाहीं हीत कपाळीं ते ॥२॥ कांहीं तरि येक बोलायाचा जागा । नेदिति वाउगा उभा ठाकों ॥३॥ तुका म्हणे वर्म कळो येती कांहीं । वोळखी जें नाहीं होईल तें ॥४॥

२५६५. काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दरिद्र लाज नाहीं ॥१॥ मजपासोनी हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणें ॥२॥ नामाच्या चिंतनें नाशी गर्भवास । नेदी करूं आस आणिकाची ॥३॥ ऐसें हें कळों आलें माझ्या मना । हरिचिया जना नाश नाहीं ॥४॥ तुका म्हणे नेणों किती वायां गेले । तया उद्धरिलें पांडुरंगें ॥५॥

२५६६. संध्या करितोसी केशवाचे नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥१॥ किति या सांगावें करुनि फजीत । खळ नेणे हीत जवळी तें ॥२॥ माजल्या न कळे उचित तें काय । न घ्यावें तें काय घ्यावें सांडी ॥३॥ तुका म्हणे घेती भीतिसवें डोकें । वावसी तें येक अंधारिलीं ॥४॥

२५६७. दुधाचे घागरी मद्याचा हा बिंदु । पडिलीया शुद्ध नव्हे मग ॥१॥ तैसें खळा मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥२॥ काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वायां गेलें ॥३॥ तुका म्हणे अन्न जिरों नेदी मासी । आपुलिया जैसी संसर्गें ॥४॥

२५६८. सांगावें तें बरें असतें हें पोटीं । दुःख देती खोटी बुद्धी मग

॥१॥ आपुला आपण करावा वेव्हार । जिंकोनी अंतर मन ग्वाही ॥२॥ नाहीं मागें येत बोलिलें वचन । पावावा तो शीण बरा मग ॥३॥ तुका म्हणे बहु भ्यालों खटपटे । आतां देवा खोटे शब्द पूरे ॥४॥

### वाराणीस पत्र पाठविलें ते अभंग.

२५६९. परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसे ॥१॥ भागीरथी महादोषनिवारणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥२॥ जितां भुक्ती मोक्ष मरण तुझ्या तीरीं । ऐहिकपरत्रीं सुखरूप ॥३॥ तुका विष्णुदास संतांचे पोषण । वाग्पुष्प तेणें पाठवीलें ॥४॥

२५७०. तुम्ही विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ॥१॥ कृपा कराल ते थोडी । पायां पडिलों बराडी ॥२॥ काय उणें तुम्हापासीं । मी तों अल्पचि संतोषी ॥३॥ तुका म्हणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥४॥

२५७१. पिंड पदावरी । दिल्हा आपुलिये करीं ॥२॥ माझें झालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥२॥ केलें कर्मांतर । बोंब मारीली हरिहर ॥३॥ तुका म्हणे माझें । भार उतरलें वोझें ॥४॥

२५७२. मथुरेच्या राया । माझें दंडवत पायां ॥१॥ तुमचे कृपेचें पोसणें । माझा समाचार घेणें ॥२॥ नाम धरियेलें कंठीं । असें आर्तभूत पोटीं ॥३॥ जीवींचें तें जाणा । तुका म्हणे नारायणा ॥४॥

२५७३. जाय तिकडे लागे पाठीं । नाहीं तुटी आठवाची ॥१॥ हिरोनियां गेलें चित्त । माझें थीत भांडवल ॥२॥ दावोनियां रूप डोळां । मन चाळा लावियेलें ॥३॥ आणिक तोंडा पडली मिठी । कान गोष्टी नायकती ॥४॥ बोलिल्याचा आठव न घडे । वाणी वोढे ते सोई ॥५॥ तुका म्हणे प्रेमधर्गी । भरली अंगीं अखंड ॥६॥

२५७४. नको झालें ऐसें अन्न । भूक तान ते गेली ॥१॥ गोविंदाची आवडि जीवा । करीन सेवा धणिवरी ॥२॥ राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहींचें ॥३॥ देह धरिल्याचें फळ । आणिक काळ धन्य हा ॥४॥ जाऊं नेदी करितां सोस । क्षमा दोष करवीन ॥५॥ तुका म्हणे याचे पाठीं । आतां साटी जीवाची ॥६॥

२५७५. वाट पाहे हरि कां नये आझुनी । निष्ठुर कां मनीं धरियेलें ॥१॥ काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥२॥ नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥३॥ नाहीं आलें कळों अंतरा अंतर । कपावंत फार आईकतों ॥४॥ बहुतां दिसाचें राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुर्वाळिलें ॥५॥ तुका म्हणे देईं येक वेळां भेटी । सीतळ हें पोटीं होईल मग ॥६॥

२५७६. नाहीं दिल्हें कधीं कठीण उत्तर । तरि कां अंतर पडियेलें ॥१॥ म्हणउनी आतां वियोग न साहावे । लांचावलें देहे संघष्टणें ॥२॥ वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिकाचि प्रेम चढे घेतां ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगे जननीये । घेवांनी कडिये बुझाविलें ॥४॥

२५७७. आतां न करीं सोस । सेवीन हा ब्रम्हरस ॥१॥ सुखें सेवीन अमृत । ब्रम्हपदींचें निश्चित ॥२॥ तुमचा निज ठेवा । आम्हीं पडियेला ठावा ॥३॥ तुका म्हणे देवराया । आतां लपालेति वायां ॥४॥

२५७८. जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहासी ॥१॥ ऐसा पसरीन भाव । रिता नाहीं कोण्ही ठाव ॥२॥ चित्त जडलें पाईं । पाळती हें ठाईं ठाईं ॥३॥ तुका म्हणे पोटीं । देव घालोनि सांगे गोष्टी ॥४॥

२५७९. सांपडला हातीं । तरि झाली हे निश्चिंती ॥१॥ नाहीं धांवा घेत मन । इंद्रियांचें समाधान ॥२॥ सांडियला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥३॥ तुका म्हणे काम । निरसुनियां घेतों नाम ॥४॥

२५८०. मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासा । संसार तो कैसा न देखती ॥१॥ बैसला गोविंद जडोनीयां चित्तीं । आदि तेचि अंतीं अवसानीं ॥२॥ भोग नारायणा देऊनी निराळीं । वोविया मंगळीं तोचि गाती ॥३॥ बळ बुद्धी त्याची उपकारासाठीं । अमृत ते पोटीं सांठवीलें ॥४॥ दयावंत तरी देवाचि सारिखीं । आपुलि पारखीं नोळखती ॥५॥ तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती तो ॥६॥

२५८१. सेविन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवाचे नाहणीं होईन किडा ॥१॥ ऐसे जन्म आतां मज देईं देवा । आवडी हे जीवा सर्वकाळ

॥२॥ त्यांचे चरणरज येती अंगावरी । वंदीन ते शीरीं जाईन मागें ॥३॥ तुका म्हणे येथें राहिलासे भाव । सकळहि वाव जाणोनियां ॥४॥

२५८२. क्षेम देयाला हो । स्फुरताति दंड बाहो ॥१॥ आतां झडझडां चाले । देईं उचलुनि पाउलें ॥२॥ सांडीं हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥३॥ तुका म्हणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥४॥

२५८३. जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥१॥ कंठ कंठा मिळों देईं । माझा वोरस तूं घेईं ॥२॥ नको पीतांबर । सावरूं हे अलंकार ॥३॥ टाकीं वो भातुकें । लौकिकाचें कवतुकें ॥४॥ हातां पायां नको । कांहीं वेगळाले राखों ॥५॥ तुका म्हणे यावरी । मग सुखें अळंकारी ॥६॥

२५८४. दाऊनियां कोणा कांहीं । तेचि वाहीं चाळविली ॥१॥ तैसें नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥२॥ रिद्धीसिद्धी ऐसी आड । येती नाड नागऊं ॥३॥ उदका ऐसें दाऊनि वोढी । ऊर फोडी झळई ॥४॥ दर्पणींचें दिल्हें धन । दिसे पण चरफडे ॥५॥ तुका म्हणे पायांसाठीं । करितों आटी कळों द्या ॥६॥

२५८५. काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥१॥ आवडीनें गळां मिठी । घाली उटी बैसवी । लाऊं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥३॥ भावंडाचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ॥४॥ माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥५॥ तुका म्हणे नारायणा । तुम्ही जाणा बुझाऊं ॥६॥

२५८६. कृपेचा वोल्हावा । दिसे वेगळाची देवा ॥१॥ मी हें इच्छीतसें साचें । नलगे फुकट साई काचें ॥२॥ जेणें जाय कळसा । पायां उत्तम तो तैसा ॥३॥ तुका म्हणे घरीं । तुझ्या अवघियापरी ॥४॥

२५८७. तरी आम्ही तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वायां गेला ॥१॥ अगा पंढरीच्या उभा विठेवरी । येईं लवकरी धांवे नेटें ॥२॥ पालवितों वरी उभारोनि बाहे । कृपावंता पाहे मजकडे ॥३॥ तुका म्हणे तुज बहु कान डोळे । कां हो माझे वेळे ऐसी परी ॥४॥

२५८८. करावा कंटाळा नव्हे हें उचित । आधींच कां प्रीत लावियेली ॥१॥

जाणतसां तुम्ही रूपाचें लाघव । आपुलाले जीव घेतें ऐसा ॥२॥ काय म्हणऊनि आलेति आकारा । आम्हा उजगरा करावया ॥३॥ तुका म्हणे भीड होती आजिवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥४॥

२५८९. धरूनी पालव आसडीन करें । मग काय बरें दिसे लोकीं ॥१॥ काय तें विचारा ठाईंचें आपणा । जो हा नारायणा अवकाश ॥२॥ अंतर पायांसीं तोंवरी या गोष्टी । पडिलिया मिठी हालों नेदी ॥३॥ रुसलेती तरी होईल बुझावणी। तांतडी करूनि साधावें हें ॥४॥ सांपडलिया अर्थी कारणासी ठाव । येथें करूं भाव दृढ आतां ॥५॥ तुका म्हणे तुझे ठाउके बोभाट । मग खटपट चुकली ते ॥६॥

२५९०. निष्ठुर उत्तरीं न धरावा राग । आहे लाग भाग ठाईंचाची ॥१॥ तूं माझी जननी तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥२॥ मुळींच्या ठेवण्या आहे अधिकार । दुराऊनि दूर गेलों होतों ॥३॥ पोटींचा आठवा पडिला विसर । कांहीं आला भार माथां तेणें ॥४॥ राखिला ह्या होता बहु चौघाचार । साक्षीनें व्यवहार निवडीला ॥५॥ तुका म्हणे कांहीं बोलणें नलगे । आतां पांडुरंगें तुम्ही ऐसे ॥६॥

२५९१. सांगतां गोष्टी लागती गोड । हा तो रोकडा अनुभव ॥१॥ सुख झालें सुख झालें । नये बोलें बोलतां ॥२॥ अंतर तें नये दिसों । आतां सोस कासया ॥३॥ तुका म्हणे जतन करूं । हेंचि धरूं जीवेसी ॥४॥

२५९२. मजसीं पुरें न पडे वादें । सुख दोन्हींच्या संवादें ॥१॥ तूंचि आगळा कशानें । शीर काय पायावीण । ॥२॥ वाहों तुझा भार । दुःख साहोनि अपार ॥३॥ तुका म्हणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥४॥

२५९३. तुज नाहीं शक्ति । काम घेसी आम्हां हातीं ॥१॥ ऐसें अनुभवें पाहीं । उरलें बोलीजेसें नाहीं ॥२॥ लपोनियां आड । आम्हां तुझा कैवाड ॥३॥ तुका म्हणे तुजसाठीं । आम्हा संसारेसी तुटी ॥४॥

२५९४. तुझ्या ठाईं वास । दोन्ही पुण्य आणि दोष ॥१॥ झडलें उरलें किती । आम्हीं धरियेलें चित्तीं ॥२॥ कळलासी नष्टा । यातिक्रियाकर्मभ्रष्टा ॥३॥ तुका म्हणे बोला । नाहीं ताळा गा विठ्ठला ॥४॥

२५९५. भांडावें तों हित । ठाईं पडेतें उचित ॥१॥ नये खंडों देवो वाद । आम्हां भांडवल भेद ॥२॥ शब्दासारसें भेटी । नये पडों देऊं तुटी ॥३॥ तुका म्हणे आळस । तोचि कारणाचा नाश ॥४॥

२५९६. नव्हों गांढे आळसी । जो तूं आम्हांपुढें जासी ॥१॥ अरे दिल्हें आम्हा हातीं । वर्म वेवादाचें संतीं ॥२॥ धरुनियां वाट । झालों शिरोमणि थोट ॥३॥ तुका म्हणे देवा । वाद करिन खरी सेवा ॥४॥

२५९७. तुझा विसर नको माझिया जीवा । क्षण रे केशवा मायबापा ॥१॥ जावो राहो देह आतां हेचि घडी । कायसी आवडी याची मज ॥२॥ कुश्चळ इंद्रियें आपुलिया गुणें । याचिया पाळणें कोण हित ॥३॥ पुत्र पत्नी बंधु सोयरी खाणोरीं । यांचा कोण धरी संग आतां ॥४॥ पिंड हा उसणा आणिला पांचांचा । सेखीं लागे ज्याचा त्यासी देणें ॥५॥ तुका म्हणे नाहीं आणिक सोइरे । तुजविण दुसरे पांडुरंगा ॥६॥

. २५९८. ऐसें सत्य माझें येईल अंतरा । तरी मज करा कृपा देवा ॥१॥ वचनासारिखें तळमळी चित्त । बाहेरि तो आंत होईल भाव ॥२॥ तरी मज ठावा द्यावा पायांपाशीं । सत्यत्वें जाणसी दास खरा ॥३॥ तुका म्हणे सत्य निकट शेवक । तरीच भातुकें प्रेम द्यावें ॥४॥

२५९९. आदि वर्तमान जाणसी भविष्य । मागें पुढें नीस संचिताचा ॥१॥ आतां काय देऊं पायापें परिहार । जाणा तो विचार करा देवा ॥२॥ आपुलें तें येथें काय चाले केलें । जोडावे ते भले हात पुढें ॥३॥ तुका म्हणे फिके बोल माझे वारा । कराल दातारा होईल तें ॥४॥

२६००. सुखें न मनी अवगुण । दुःख त्याच भोगी कोण ॥१॥ हें कां ठाईंचें न कळे । राती करा झांकुनि डोळे ॥२॥ चालोनि आड वाटे । पाईं मोडवीले कांटे ॥३॥ तुका म्हणे कोणा । बोल ठेवितो शाहाणा ॥४॥

२६०१. आम्ही न देखों अवगुणा । पापी पवित्र शाहाणा ॥१॥ अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥२॥ मज भक्ति सर्वे चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥३॥ तुका म्हणे घोटीं । विष अमृत तुजसाठीं ॥४॥

२६०२. मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड । घेतां वाटे गोड नाम

तुझें ।।१।। नेणें तें लेंकरूं आवडीचें तान्हें । बोलतों वचन आवडीनें ।।२।। भक्ति नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं । घातला विठाई भार तूज ।।३।। तुका म्हणे नाचे निर्लज्ज होऊनी । नाहीं माझे मनीं दुजा भाव ।।४।।

२६०३. काय माझी संत पाहती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पाई ।।१।। कारण सरतें करा पांडुरंगीं । भूपणाची जगीं काय चाड ।।२।। बोबड्या उत्तरीं म्हणे हरिहरी । आणिक भिकारी नेणें दुजें ।।३।। तुका म्हणे तुम्ही विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ।।४।।

२६०४. जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांडभुषणु नारायण ।।१।। सुखाचा सांगात अंतकासि अंत । निजाचा निवांत नारायण ।।२।। गोडा-चेंहि गोड हर्षाचेंहि कोड । प्रीतीचाहि लाड नारायण ।।३।। भावाचा निज भाव नांवाचाहि नांव । अवघा पंढरीराव अवतरलासे ।।४।। तुका म्हणे जें हें साराचेंहि सार । माझा अंगीकार तेणें केला ।।५।।

२६०५. आतां मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ । यातिहीन कुळ दैन्य वाणा ।।१।। माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ।।२।। बापुडा मी नव्हे दुर्बळ ठेंगणा । पांगीला हा कोणा आणिकासी ।।३।। दुष्ट नहों आम्ही अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ।।४।। संवसार आम्हा सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ।।५।। तुका म्हणे झालों निर्भर मानसीं । जोडिलिया राशी सुखाचिया ।।६।।

२६०६. केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ।।१।। देवचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ।।२।। त्यागिल्याचें ध्यान न राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबणा ।।३।। तुका म्हणे आपआपणां विचारा । कोण दुसरा सांगे तुम्हां ।।४।।

२६०७. हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्ध सेवा देवाची ते ।।१।। आवडी विठ्ठल गाईजे येकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ।।२।। आणिका अंतरीं नेदावी वसती । करावी हे शांती वासनेची ।।३।। तुका म्हणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेंचूं नये ।।४।।

२६०८. हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरी ।।१।। ते

मज विठोबासमान । नमूं आवडीनें जन ॥२॥ ज्याचें अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥३॥ त्याचा संग सर्वकाळ । घडी मज हे मंगळ ॥४॥ तुका म्हणे भावें । जींहीं प्रेम वोसंडावें ॥५॥

२६०९. हरीची हरिकथा नावडे जया । अधम म्हणतां तया वेळ लागे ॥१॥ मनुष्यदेहीं तया नाट हें लागलें । अघोर साधिलें कुंभपाक ॥२॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होउन पडिला नाहीं ॥३॥ उपजे मरोनी वेळोवेळां भांड । परी न धरी लंड लाज कांहीं ॥४॥ ऐसियाचि माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी ॥५॥ देवधर्मावीण तो हा चांडाळ नर । न साहे भूमि भार क्षणभरी । राम म्हणतां तुझें काय वेंचलें । कां हित आपुलें न विचारिसी ॥७॥ जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका म्हणे चुकी जरी यासी ॥८॥

२६१०. उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात ऐकियेली ॥१॥ आतां काय ब्रीद सांडिलें आपुलें । ठाईंचें धरिलें जाणोनियां ॥२॥ माझ्या दोषासाठीं होइल पाठिमोरा । ऐसा कोण पुरा भोगे बळी ॥३॥ तुका म्हणे रूप आमुच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतुर्भुज ॥४॥

२६११. आवडिसारिखें संपादिलें सोंग । अनंत हीं मग झालीं नामें ॥१॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाहि साक्षी ॥२॥ हातें जेवी येक मुखीं मागे घास । माउली जयास तैसी बाळा ॥३॥ तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी । तैसीच गोजिरी दिसे मूर्ति ॥४॥

२६१२. धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥१॥ धन्य झालों आतां यासी संदेह नाहीं । न पडों या बाहीं काळा हातीं ॥२॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगतीं सर्वकाळ ॥३॥ तुका म्हणे पोट धालेंचि न धाय । खादलेंचि खाय आवडीनें ॥४॥

२६१३. आवडी न पुरे सेवीतां न सरे । पडियेली धुरेसवें गांठी ॥१॥ न पुरे हा जन्म हें सुख सांठितां । पुढतीहि आतां हेंचि मागों ॥२॥ मारगाची चिंता पालखीं बैसतां । नाहीं उसंतितां कोसपेणी ॥३॥ तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली तान भूक ॥४॥

२६१४. नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । म्हणऊनि मन स्थिरावलें ॥१॥ धरियेलीं जीवीं पाऊलें कोंवळीं । कंठी येकावळी नाममाळा ॥२॥ शितळ होऊनी पावलों विश्रांती । न साहे पुढती चाली चित्ता ॥३॥ तुका म्हणे झाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥४॥

२६१५. मायबापापुढें लाडिकें लेंकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥१॥ कृपावंता घालीं प्रेमपान्हारस । वोळली वोरस पांडुरंगा ॥२॥ नाहीं धीर खुंटी जवळी हुंबरे । ठाईंच पाखरे कवाळिते ॥३॥ तुका म्हणे मज होऊं नेदी शीण । कळों नेदी भिन्न आहे ऐसें ॥४॥

२६१६. उत्तम घालावें आमुचीये मुखीं । निवारावें दुःखी होऊं नेदी ॥१॥ न बैसे न वजे जवळुनीया दुरी । मागें पुढें वारि घातपात ॥२॥ नाहीं शंका असो भलतिये ठाईं । मावळलें पाहीं द्वैताद्वैत ॥३॥ तुका म्हणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरलें बाह्य रूप ॥४॥

२६१७. आठवोचि नेदी आवडि आणिक । भरोनियां लोक तिन्ही राहे ॥१॥ मन धांवे तेथें तिचेंचि दुभतें । संपूर्ण आईतें सर्वकाळ ॥२॥ नलगे वळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरो दिला ॥३॥ तुका म्हणे सम पाऊलाचा खुंट । केला बळकट हालों नेदी ॥४॥

२६१८. आम्हां अलंकार मुद्राचे श्रृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं ॥१॥ लाडिके डिंगर पंढरीरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥२॥ आम्हां आणिकाची चाड चित्तीं नाहीं । सर्व सुख पाईं विठोबाच्या ॥३॥ तुका म्हणे आम्ही नेघोचि या मुक्ती । येकावीण चित्तीं दुजे नाहीं ॥४॥

२६१९. चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवर पाहूं ॥१॥ डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥२॥ संतमहंतां होती भेटी । आनंदें नाचूं वाळवंटीं ॥३॥ तेथें तीर्थाचें माहेर । सर्व सुखाचें भांडार ॥४॥ जन्म नाहीं रे आणीक । तुका म्हणे माझी भाक ॥५॥

२६२०. पैल घरीं झाली चोरी । देहा करी बोंब ॥१॥ हाबा हाबा करिसी काय । फिराउनी नेटया वाय ॥२॥ सांडोनीया शुद्धी । निजलासि गेली बुद्धी । चोरी तुझा काढिला बूर । वेगळे भाव घातले दूर ॥३॥ भलती-

यासी देशी वाव । लाहेसी तूं येवढा ठाव ॥४॥ तुका म्हणे अजुनि तरी । उरलें तें जतन करी ॥६॥

२६२१. किती वेळां खादला दगा । अझुनि कां गा जागासि ना ॥१॥ लाज नाहीं हिंडतां गांवें । दुःख नवे नित्य नित्य ॥२॥ सर्वे चोरा हातीं फासे । देखतां कैसें न देखती ॥३॥ तुका म्हणे सांडिती वाट । तळपट करावया ॥४॥

२६२२. मुद्लामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥१॥ आणिकाची कां लाज नाहीं । आळसा जिहीं जिंतिलें ॥२॥ येके सांते सारिखें वित्तें । हानी हीते वेगळाली ॥३॥ तुका म्हणे हित धरा । नव्हे पुरा गांवढळ ॥४॥

२६२३. निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥१॥ असो ज्याचे त्याचे माथां । आपण करावी ते कथा ॥२॥ उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥३॥ तुका म्हणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥४॥

२६२४. शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥१॥ केला न संडी कैवाड । जीवेंसाठीं तों हें होड ॥२॥ धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥३॥ तुका म्हणे हरि । दासा रक्षितो निर्धारीं ॥४॥

२६२५. हरिच्या दासा भयें । ऐसें बोलों तेंहि नये ॥ १॥ राहोनियां आड । उभा देव पुरवी कोड ॥२॥ हरिच्या दासां चिंता । अघटीत हे वारता ॥३॥ खावें ल्यावें द्यावें । तुका म्हणे पुरवावें ॥४॥

२६२६. आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥१॥ मायबापांचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥२॥ नाहीं निपराध । कोणा आम्हामध्यें भेद ॥३॥ तुका म्हणे मान । अवघें आमुचें हें धन ॥४॥

२६२७. दासा सर्व काळ । तेथें प्रेमाचा कल्लोळ ॥१॥ जेथें वसती हरिचे दास । पुण्य पिके पापा नाश ॥२॥ फिरे सुदर्शन । घेवोनियां नारायण ॥३॥ तुका म्हणे घरीं । होय म्हणीयारा कामारी ॥४॥

२६२८. काय ढोरापुढें घालोनी मिष्टान्न । खराशी लेपन चंदनाचें ॥१॥ नको नको देवा खळाची संगती । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥२॥ काय सेज बाज माकडा विलास । अलंकारा नाश करूनि टाकी ॥३॥ तुका म्हणे

काय पाजूनी नवनीत । सर्पा विष थीत अमृताचे ॥४॥

२६२९. आनंदे येकांतीं प्रेमें वोसंडत । घेवो अगणीत प्रेमसुख ॥१॥ गौप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनासी ॥२॥ झणी दृष्टी लागो आवडीच्या रसा । सेऊं जीरे तैसा आपणासी ॥३॥ तुका म्हणे हे बहु सकुमार । न साहावे भार वचनाचा ॥४॥

२६३०. मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आम्हा जन्म घेणें युगायुगीं ॥१॥ विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढती पुढती आस सेवावे हें ॥२॥ देवा हातीं रूप धरऊं आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥३॥ तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याईन पाउलें विटेवरी ॥४॥

२६३१. नको बोलों भांडा । खीळ घालोनि बैसे तोंडा ॥१॥ ऐक विठोबाचे गुण । करी सादर श्रवण ॥२॥ प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ॥३॥ तुका म्हणे हिता । कां रे नागवसी थीता ॥४॥

२६३२. अती झालें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सुवासीन न म्हणावी ॥१॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणा मोल वाव थोरपण ॥२॥ शूरत्वा वांचूनी शूरामाजि ठाव । नाहीं आयुभाव आणिलीया ॥३॥ तुका म्हणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण नाहीं ॥४॥

२६३३. शूरा साजती हातियारें । गांड्या हांसतील पोरें ॥१॥ काय केली विटंबण । मोती नासिकावांचून ॥२॥ पतिव्रते रूप साजे । शिंदळ काजळ लेतां लाजे ॥३॥ दासी पत्नी सुता । नव्हे सरी येक पिता ॥४॥ मान बुद्धिवंता । थोर न मानीती पिता ॥५॥ तुका म्हणे तरी । आंत शुद्ध दंडेवरी ॥६॥

२६३४. काय केलें जळचरीं । धीवर त्यांचा घात करी ॥१॥ हा तों ठाईंचा विचार । आहे याति वैराकार ॥२॥ श्वापदांतें वधी निरपराधें पारधी ॥३॥ तुका म्हणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥४॥

२६३५. वाईटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥१॥ येकाविणें येका । कैचें मोल होतें फुका ॥२॥ विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥३॥ काळीमेनें ज्योती । दिवसें कळों आली राती ॥४॥ उंच निंच गारा । हिरा

परिस मोहरा ॥५॥ तुका म्हणे भले । ऐसें नष्टांनीं कळलें ॥६॥

२६३६. असो ऐसे खळ फार । आम्हा त्यांचे उपकार ॥१॥ करिती पातकाची धुणी । मोल न घेतां साबणी ॥२॥ फुकाचे मजूर । वोझे वागवीती भार ॥३॥ पार उतरून म्हणे तुका । आम्हा आपण जाती नरका ॥४॥

२६३७. संत पंढरीसी जाती । निरोप धाडी तया हातीं ॥१॥ माझा न पडावा विसर । तुका विनविती किंकर ॥२॥ केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥३॥ तुमचे पायीं पायतण । मोचे माझें तन मन ॥४॥ तांबूलाची पिकधरणी । ते मी असें मुख पसरोनी ॥५॥ तुमची विष्ठा पंढरिराया । ते सारसुबी माझी काया ॥३॥ लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥७॥ तुका म्हणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥८॥

२६३८. इच्छेचें पाहिलें । डोळिया अंतीं मोकलिलें ॥१॥ याचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ॥२॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले जाणतां ॥३॥ पिंड पाळितां वोसरे । अवघे घेऊनि मागें सरे ॥४॥ करितां उपच्यार । कोणा नाहीं उपकार ॥५॥ अल्प जीवन करी । तुका म्हणे साधीं हरि ॥६॥

२६३९. यज्ञनिमित्तें तें शरीरासी बंधन । कां रे तृष्णा वायांवीण वाढविली ॥१॥ नव्हे तेचि भक्ति परलोकसाधन । विषयानें बंधन केलें तुज ॥२॥ आशा धरूनि फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंची ॥३॥ तुका म्हणे शिणसी वायां । शरण न वजतां पंढरिराया ॥४॥

२६४०. संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारीतां ॥१॥ न वेंचे मोल कांहीं न लागती सायास । तरी कां आळस करीसी झणी ॥२॥ ऐसें हें सार कां न घेसी फुकाचें । काय तुझें वेंचे मोल तया॥३॥ पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा ॥४॥ अनाथाच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलोनी परलोका ॥५॥ अंतकाळीं गणिका पक्षियांच्या छंदें । राम राम शब्दें उच्चारिलें ॥६॥ तंव त्या दीनानाथा कृपा आली कैसी । त्याणें तियेस वैकुंठा नेलें ॥७॥ अवचिता नाम आलिया हे गति । चिंतीतां चित्तीं जवळी असे ॥८॥ तुका म्हणे भावें स्मरतां राम राम ।

कोण जाणे तये दशे ॥९॥

२६४१. दुष्टाचें चिंतन भिन्न अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशीला । पालथे घागरी घातलें जीवन । न धरीच जाण तेंहि त्याला ॥१॥ जन्मा येउनी तेणें पतनचि साधीलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा । जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संसारा ॥२॥ पाषाण जीवनीं असतां कल्पवरी पाहातां अंतरीं कोरडा तो । कूचर मूग नचेचि पाका । पाहातां सारिखा होता तैसा ॥३॥ तुका म्हणे असे उपाय सकळां । न चले या खळा उपाय कांहीं । म्हणूनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हीत ॥४॥

२६४२. कासयानें पुजा करूं केशिराजा । हाचि संदेह माझा फेडीं आतां ॥१॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप तुझें । तेथें काय माझें वेंचे देवा ॥२॥ गंधांचा सुगंध पुष्पांचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥३॥ फळदाता तूंचि तांबूल अक्षता । तरी काय आतां वाहों तुज ॥४॥ वाहूं दक्षिणा तरी धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दूजें कांहीं ॥५॥ गातों ते ॐकार टाळी नादे स्वर । नाचावया थार नाहीं कोठें ॥६॥ तुका म्हणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरी ॥७॥

२६४३. गातां आईकतां कंटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥१॥ रागें यमधर्म जाचवीती तया । तुज दिल्हे कासया मुख कान ॥२॥ विषयाच्या सुखें अखंड जागसी । नवजे येकादशी जागरणा ॥३॥ वेंचूनीयां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिल्हें अन्न अतीतासी ॥४॥ तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्टलोभें ॥५॥ तुका म्हणे मग केला साहे दंड । नायकति लंड सांगितलें ॥६॥

२६४४. तुझें म्हणवितां काय नाश झाला । ऐक बा विठ्ठला कीर्ति तुझी ॥१॥ परी तूज नाहीं आमुचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥२॥ समूळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥३॥ लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यासि नाहीं थार ऐसें केलें ॥४॥ मृत्तीका पाषाण तैसें केलें धन । आपलें तें कोण पर नेणें ॥५॥ तुका म्हणे झालों देहासि उदार । आणिक विचार काय तेथें ॥ ॥६॥

२६४५. जाउनीयां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरिवरी ॥१॥ अंतरीचें शुद्ध कासियानें झालें । भूषण त्या केलें आपणया ॥२॥ वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचिना ॥३॥ तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदा तुम्ही ॥४॥

२६४६. बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंत पार नाहीं ॥१॥ येऊनि अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलीया ॥२॥ राम कृष्ण हरी मुकुंद मुरारी । मंत्र हा उच्चारी वेळोवेळां ॥३॥ तुका म्हणे ऐसे देईन मी दिव्य । जरी होय भाव येकविध ॥४॥

२६४७. धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरीये ॥१॥ न करीं आळस आलिया संवसारीं । पाहें पां पंढरि भूवैकुंठ ॥२॥ न पविजे केलें तपाचिया राशी । तें जनलोकांसी दाखविलें ॥३॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥४॥ विष्णुपद गया रामनाम काशी । अवघीं पायापाशीं विठोबाच्या ॥५॥ तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ हा नाश अहंकाराचा ॥६॥

२६४८. धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलीकें॥१॥ धन्य तेहि लोक अवघा दैवाचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥२॥ धन्य तेही भूमी धन्य ते तरुवर । धन्य सरोवर तीर्थरूप ॥३॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदे भुवन गर्जतसे ॥४॥ धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे ॥५॥ तुका म्हणे धन्य संसारा तें आलीं । हरिरंगी रंगलीं सर्वभावें ॥६॥

२६४९. मायबाप करिती चिंता । पोर नाईके सांगतां ॥१॥ नको जाऊं देउळासी । नेतो बागूल लोकांसी ॥२॥ कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दे लावी भीक ॥३॥ वैष्णवा संगतीं । हातीं पडलीं नेणो किती ॥४॥ आम्हा कैंचा मग । करिमी उधडीयाचा संग ॥५॥ तुका म्हणे जाणे नरका । त्याचा उपदेश आईका ॥६॥

२६५०. मागतीयांचे दोन्हीच कर । अमित भांडार दातयाचें ॥१॥ काय करूं आतां कासयांते भरूं । हा मज विचारू पडियेला ॥२॥ येके

सांठवणें प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥३॥ तुका म्हणे आतां आहे येथें असो । आंखोनीयां बैसों पायापासी ॥४॥

२६५१. मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडि येकी पळ स्थीर नाहीं ॥१॥ आतां तूं उदास नव्हे नारायणा । धांव मज दीना गांजियेले ॥२॥ धांव घाली पुढें इंद्रियाचे वोढी । केलें तडातोडी चित्त माझें ॥ ३॥ तुका म्हणे माझा न चले सायास ॥३॥ राहिलों हे आस धरुनी तुझी ॥४॥

२६५२. जीचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥१॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्रदोरी येक जीव ॥२॥ सुखाची विश्रांति । उमटे मातेचिये चित्तीं ॥३॥ तुका म्हणे संत । तुम्हि बहु कृपावंत ॥४॥

२६५३. यावें माहेरास । हेचि सर्व काळ आस ॥१॥ घ्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थें इच्छि पायवणी ॥२॥ भोग उभा आड । आहे तोंवरीच नाड ॥३॥ तुका म्हणे देवें । माझें सिद्धी पाववावें ॥४॥

२६५४. लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥१॥ ऐशी कळवळ्याचि जाति । करी लाभावीण प्रीती ॥२॥ पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वी साहे ॥३॥ तुका म्हणे माझें । तैसें तुम्हा संतां ओझें ॥४॥

२६५५. आम्हा गांजी जन । तरी कां मेला नारायण ॥१॥ झालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळ ॥२॥ आम्ही जना भ्यावें । तरी कां न लाजीजे देवें ॥३॥ तुका म्हणे देश । झाला देवावीण ओस ॥४॥

२६५६. तुम्हीं पाय संतीं । माझें ठेवीयेलें चित्तीं ॥१॥ आतां बाधूं न शके काळ । झाली विषमें शीतळ ॥२॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥३॥ तुका म्हणे भय । आतां स्वप्नींही नये ॥४॥

२६५७. आम्ही काळाचेहि काळ। विठोबाचे लडिवाळ ॥१॥ करूं सत्ता सर्वां ठाईं । वसों निकटवास पाईं ॥२॥ ऐसी कोणाची वैखरी । वदे आमूचे सामोरीं ॥३॥ तुका म्हणे बाण । हातीं हरिनाम तीक्ष्ण ॥४॥

२६५८. जन्मा येउनि उदार झाला । उद्धार केला वंशाचा । मेळउनि धन मेळवी माती । सदा विपत्ती भोगितसे ॥१॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलीया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे निजोनी

डोकियासि ॥२॥ घरा व्याही पाहुणा आला । म्हणे त्याला बरें नाहीं । तुमचे गांवीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥३॥ उजऊं किती होतील पोरें । मरतां बरें म्हणे यासी । म्हणउनि देवा नवस करीं । दावी घरींहुनि बोनें ॥४॥ पर्वकाळीं भट घरा आला । बोंब घाला म्हणे पोरां । तुमचा उणा होईल वांटा । काळ पिठासी पैं आला ॥५॥ दाढी करितां अडका गेला । घरांत आला बाईलेपें । म्हणे आतां उगवीं मोडीं । डोई बोडी आपुली ॥६॥ तीर्थ स्वप्नीं नेणें गंगा । पूजन लिंगा गांवींचिया । अडकूनि द्वार बैसे द्वारीं । आल्या घरीं म्हणे वोस ॥७॥ तुका म्हणे ऐसे आहेत गा हरि । याही तारि जीवासी । माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती म्हणउनी ॥८॥

२६५९. जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥१॥ तोहि कारणाचा दास । देव म्हणवितां पावे नाश ॥२॥ वेंची अनुष्ठान । सिद्धी करावया प्रसन्न ॥३॥ तुका म्हणे त्याचें । मुद्दल गेलें हाट वेंचे ॥४॥

२६६०. घातलें दुकान । पढिये तैसा आहे वान ॥१॥ आम्ही भांडारी देवाचे । द्यावें घ्यावें माप वाचे ॥२॥ उगऊं जाणों मोडी । झाली नव्हे त्याची जोडी ॥३॥ तुका म्हणे पुडी । मोला तैसी खरी कूडी ॥४॥

२६६१. सादाविलें येका । सरे अवघियां लोका । आतां आवडीचे हातीं । भेद नाहीं ये पंगती ॥२॥ मोकळींच पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥३॥ तुका म्हणे बरा । आहे ढसाळ वेव्हारा ॥४॥

२६६२. तडामोडी करा । परी उत्तम तें भरा ॥१॥ जेणें खंडे येके खेपे । जाय तेथें लाभें वोपे ॥२॥ दाखविल्या सारिखें । मागें नसावें सारिखें ॥३॥ मागें पुढें रीण । तुका म्हणे फिटे हीन ॥४॥

२६६३. नसावे वोशाळ । मग मानिती सकळ ॥१॥ जाये तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ॥२॥ राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासीं टाकी ॥३॥ व्हावा वाटे जना । तुका म्हणे साठीं गुणा ॥४॥

### श्रीअनघडसिद्धाचयाशब्दें करून रामेश्वरभट्टास दाह झाला तो या अभंगें शमला.

२६६४. चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥१॥ विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥२॥ दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥३॥ आवडेल जीवा जीवाचिये परी । सकळा अंतरीं एक भाव ॥४॥ तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणिजेते येणें अनुभवें ॥५॥

२६६५. लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं येक माझे अंगीं ॥१॥ मोजूनि झिजलों मापाचिया परी । जाळावी ते थोरी लाभावीण ॥२॥ कोमळ कंटक तीक्षण अगरीं । पोचट ते वरी अंगकांती ॥३॥ चित्रींचे लेप श्रृंगारिलें निकें । जीवेंविण फिकें रूप त्याचें ॥४॥ तुका म्हणे दिसे वायां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥५॥

२६६६. बोलविसी माझे मुखें । परी या जना वाटे दुःख ॥१॥ जया जयाची आवडी तयालागीं ते चरफडी ॥२॥ कठीण देतां काढा । जल्प रोगी मेळवी दाढा ॥३॥ खाऊं नये तेंचि मागे । निवारितां रडों लागे ॥४॥ वैद्या भीड काय । आततांई जीवें जाय ॥५॥ नये भीडा सांगों आन । पथ्य औषधा कारण ॥६॥ धन माया पुत्र दारा । हें तों आवडी नरका थारा ॥७॥ तुका म्हणे यांत । आवडे ते करा मात ॥८॥

२६६७. पतिव्रते आनंद मनीं । शिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥१॥ जळो वर्म लागो आगी । शुद्धपण भलें जगीं ॥२॥ सुख पुराणीं आचारशीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥३॥ शूरा उल्हास आंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥४॥ शुद्ध सोनें उजळलें आगीं । हीन काळें धांवे रंगीं ॥५॥ तुका म्हणे तोचि हिरा । घणघायें निवडे पुरा ॥६॥

२६६८. चालती आड वाट । आणिका दावीती जे नीट ॥१॥ न मानी तयाचे उपकार । नाहीं जोडा तो गव्हार ॥२॥ विष सेउनी वारि मागें । प्राण जातां जेणें संगें ॥३॥ बुडता हाक मारी । ठाव नाहीं आणिका वारी ॥४॥ तुका म्हणे न करीं हिंका । गुण घेउनी अवगुण टाका ॥५॥

२६६९. कुळींचें दैवत ज्यांचें पंढरिनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥१॥ शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करि भलते ठायीं दास तूझा ॥२॥ पंढरीसी कोणी जाती वारकरी । होईन त्याचे घरीं पशुयाति ॥३॥ विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतण त्याचे पाईं ॥४॥ तुळसिवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचे घरीं ॥५॥ तुका म्हणे हाची भाव माझे चित्तीं । नाहीं आणिकां गति चाड मज ॥६॥

२६७०. चंदनाचे गांवीं सर्पाची वसती । भोगीते ते होती द्वीपांतरीं ॥१॥ येका वोझें येका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥२॥ क्षीराचे वसती अशुद्ध सेवावें । जवळीं तें जावें भोगें दूरी ॥३॥ तुका म्हणे ऐशी बुद्धी ज्याचि जड । त्याहूनि दगड बरे देवा ॥४॥

२६७१. अवघिया चाडा कुंठित करुनि । लावीं आपुलीच गोडी । आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी । मीतूंपणा पासाव गुंतलों मिथ्या । संकल्प तो माझा तोडीं । तुझिये चरणीं माझे दोन्ही पक्ष । अवधी करूनि दावी पिंडी रे रे ॥१॥ माझें साच काय केलें मृगजळें । वर्ण याति कुळ अभिमान । कुमारि भातुकें खेळति कौतुकें । काय त्याचें साचपण ॥२॥ वेगळाल्या भावें चित्ता तडातोडि । केलों देशधडि माया जाळें । गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं बाळें । येकायेक न धरि समंधु पुरलिया । पातलीया जवळि काळें । जाणुनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥३॥ येका जवळि घरीं आणिका अंतरीं । तीं काय सोयरीं नव्हतिं माझीं । येकासी पालन येकासी भांडण । चाड कवणये काजीं । अधिक असे उणें कवण कवण्या गुणें । हे माव न कळेचि तुझी । म्हणोनि चिंतनीं राहिलों श्रीपति । तुका म्हणे भाक माझी ॥४॥

२६७२. आणिकां छळावया झालासी शाहाणा । स्वहिता घातलें खाण । आडिकें पैके करुनि सायासे । कृपणें सांचलें धन । न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याति तयाचा गुण । तारुण्य दशे अधम मातला । दवडी हात पाय कान ॥१॥ काय झालें यास वायां कां ठकले । हातीं सांपडलें टाकितसे । घेऊनि स्फटिकमणि टाकी चिंतामणि । नागवले आपुले

इच्छे ॥२॥ सिद्धीं सेविले सेविती अधम । पात्रासारिखें फळ । सिंपिला तो मोतीं जन्मलें स्वातींचें । वरुषलें सर्वत्र जळ । कापूस पट नयेचि कारण । तयासी पातला काळ । तेंचि भुजंगें धरिलें कंठीं । मा विष झालें त्याचीं गरळ ॥३॥ भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलोनि केळें । घालुनियां घसां अंगोळीया । वांती करूं पाहे बळें । कुंथावयाचि आवडी वोवा । उन्हवणीं रडवीं बाळें । तुका म्हणे जे जैसे करिति । ते पावति तैसींच फळें ॥४॥

२६७३. तुज दिल्हें आतां करीन यत्न याचा । जीवेंभावें वाचा काया मनें ॥१॥ भागलों दातारा शीण झाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥२॥ नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हताहि कोण्ही कांहीं माझी ॥३॥ वर्म नेणें दिशा हिंडती मोकाट । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥४॥ वेरझारी फेरा शिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगीकारीं ॥५॥ तुका म्हणे मन इंद्रियाचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥६॥

२६७४. स्वयंपाक करी । संशय तोचि धरी । संदेहसागरीं । आणिक परि बुडती ॥१॥ जाणे विरळा येक । झालें तेथींचेंहि सुख । देखिलें बहुतेक । पुसतां वाटा चुकले ॥२॥ तोचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचे मुळें । नाचती पाल्हाळें । जे वीटाळें कोंडिले ॥३॥ तोचि साधी संधि । सावधान त्रिकाळ जो बुद्धि । संदेहाची संधि । वेठी आणिक धरियेली ॥४॥ अखंड तें ध्यान । समबुद्धि समान । सोंग वायांविण । तें झांकूनि बैसती ॥५॥ करणें जयासाठीं । जो नातुडे कवणे आंठी । तुका म्हणे साठीं । चित्त वित्तावांचूनी ॥६॥

२६७५. माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता । पळसी पंढरिनाथा । भेणें आतां तयाच्या ॥१॥ तरी मज कळलासी । नव्हतां भेटी जाणिवेशी । येक संपादिसी । मान करिसी लोकांत ॥२॥ तरी हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें । काय तुज म्यां कोडें । सांकडे रे घालावें ॥३॥ भोगाधीपति क्रियमाण । तें तुज नागवें आझून । तरी कां वायांवीण । तुज म्यां शीण करावा ॥४॥ तुज नव्हता माझें कांहीं । परि मी न संडी

भक्तीसोई । हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥५॥ तूं भितोसी माझिया दोषा । काहीं मागणें ते आशा । तुका म्हणे ऐसा । काहीं न धरीं संकोच ॥६॥

२६७६. लोकमान देहे सुख । संपत्ति उपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिये भेटीवांचूनि ॥१॥ तरी मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट । थोर पुण्यें वीट । तुज दैवेंचि लाधली ॥२॥ काय ब्रह्मज्ञान करूंचि कोरडें । तितें मायेचें मापाडें । भेटीविण कुडें । तुझिया अवघें मज वाटे ॥३॥ आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार । न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥४॥ रिद्धि सिद्धि काय करूं । अथवा आगम विचारूं । भेटीविण मारू । तुझिये वाटे मज याचा ॥५॥ तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिये जीवें । तुका म्हणे द्यावें । दरुशन पायांचें ॥६॥

२६७७. तुझा म्हणउनि तुज नेणें । ऐसें काय माझें जिणें ॥१॥ तरी मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ॥२॥ काय शब्दाचि ऐकिला । भेटी नसतां गा विठ्ठला ॥३॥ तुका म्हणे आतां । अभय देईं पंढरिनाथा ॥४॥

२६७८. उद्धवअक्रूरासी । आणिक व्यासअंबऋषी । रुक्मांगद-प्रल्हादासी । दाविलें तें दाखवीं ॥१॥ तरी मी पाहेन पाहेन । तुझें श्रीमुख-चरण । उतावीळ मन । तयाकारणें तेथें ॥२॥ जनकश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी । विदुराच्या घरीं । कण्या धरीं कवतुकें ॥३॥ पांडवां आकांतीं । तेथें पावसी स्मरती । घातलें द्रौपदी । यागीं बिरडें चोळीचें ॥४॥ करीं गोपिचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख । दावीं तेंचि मुख । दृष्टी माझ्या अ पुलें ॥५॥ तरी तूं अनाथाचा दाता । मागतिया शरणागता । तुका म्हणे आतां । कोड पुरवी माझें ॥६॥

२६७९. मागता भिकारी झालों तुझे द्वारीं । देईं मज हरि कृपादान ॥१॥ प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजी ॥२॥ सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी येक ॥३॥ तापत्रयें माझी तापवीली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥४॥ संबंधीं जनवादीं पीडिलों परोपरी । अंतरलों दुरि तुजसी तेणें ॥५॥ तुका म्हणे आतां तुझा

शरणागत । करावें सनाथ मायबापा ॥६॥

२६८०. न मनि नाम न मने त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी ॥१॥ भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥२॥ नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके तस्करघाई ॥३॥ तुका म्हणे त्याचा संग । नको शब्द स्पर्श अंग ॥४॥

२६८१. दिन दिन शंका वाढे । आयुष्य नेणवतां गाढे ॥१॥ कैसीं भुललीं बापुडीं । दंभविषयाचे सांकडीं ॥२॥ विसरला मरण । त्याची नाहीं आठवण ॥३॥ देखत देखत पाहीं । तुका म्हणे आठव नाहीं ॥४॥

२६८२. माझें मज आतां न देखे निरपतां । म्हणउनि आधार केला । संसाराची आस सांडुनी लौकिक । जीव भाव तुज दिल्हा । नव्हती माझी कोण्ही मी कवणाचा । अर्थ मोह सांडवला । तारीं मारीं करीं भलतें दातारा । होउनि आतां तुझा ठेलों रे ॥१॥ असो माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप । बाळकासी चिंता काय पोटव्यथा । जया शीरीं मायबाप ॥२॥ पापपुण्य श्रुति आटिल्या । शास्त्रासि नलगेचि ठाव । विधिनिषधें गोविलीं पुराणें । वेदासी तो अहंभाव । ॐकारानें मूळ व्यापिलें माया । तेथें न धरीच भाव । म्हणउनि कावाड सांडियेलें । उपमतां धरिलें तुझेंचि नांव ॥३॥ तनमनइंद्रियें ठेवोनि राहिलों । सर्व आशा तुझे पायीं । तप तीर्थ दान करऊं कोणा हातीं । आधीन तें मज काई । आहिक्य परत्रें चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देई । मायामोहपाश करी विष तेंचें । तुका म्हणे माझ्या ठाईं ॥४॥

२६८३. नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळहि ॥१॥ रसना येरा रसा विटे । घेतां घोट अधिक हे ॥२॥ आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी समोरें ॥३॥ तुका म्हणे आहार झाला । हा विठ्ठल आम्हांसी ॥४॥

२६८४. धालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेऊं तोंवरीं ॥१॥ क्रीडा करूं निरंजनीं । न पुरे धणी हरिसवें ॥२॥ अवघे खेळों अवघ्यामधीं । डाई न पडो ऐसी बुद्धी ॥३॥ तुका म्हणे वांचवितां । आम्हां सत्ता समर्थ ॥४॥

२६८५. येकल्यानें नव्हे खेळ चांग । धरिला संग म्हणउनी ॥१॥

उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥२॥ दुसरा परी येक ऐसा । न वजे रीसा निकुरेंहि ॥३॥ तुका म्हणे कळल्या कळे । येरा खेळे खेळ म्हूण ॥४॥

२६८६. बोलाविलें जेणें । तोचि त्याचें गुह्य जाणें ॥१॥ मी तो काबाडाचा धनी । जेऊं मागावें थिंकोनी ॥२॥ मजूराच्या हातें । माप केलें झालें रितें ॥३॥ झाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥४॥ मायबापांसवें । बाळें कौतुकें खेळावें ॥५॥ जैसा करिती धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥६॥ त्याच्या साच गाई म्हसी । येणें खेळावें मातीसीं ॥७॥ तुका म्हणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥८॥

२६८७. कां हो तुम्ही माझी वदविली वाणी । नेदा निवडुनी पांडुरंगा ॥१॥ आणिक कोणा म्यां पुसावा विचांर । समुळीं संसार दुराविला ॥२॥ स्वामीसेवा म्हूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ॥३॥ तुका म्हणे नाहीं सिकविले जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥४॥

२६८८. सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥१॥ आणिकाचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं टळों नये ॥२॥ समय सांभाळुनि आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥३॥ तुका म्हणे तरी म्हणवावें सेवक । खादलें तें हक्क अन्न होय ॥४॥

२६८९. नये पुसों आज्ञा केली येकसरें । आम्हासी दुसरें नाहीं आतां ॥१॥ ज्याचा तो बळिवंत सर्व निवारितां । आम्हा काय चिंता करणें लागे ॥२॥ बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं येक अंगीं तया ॥३॥ तुका म्हणे मज होईल वारिता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥४॥

२६९०. बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातलिया कास कळीकाळाशीं ॥१॥ तेथें माणसाचा कोण आला पाड । उल्लंघोनि जड गेलों आधीं ॥२॥ संसाराचे बळी सांधिलें निधन । मारिले दुर्जन षडवर्ग ॥३॥ तुका म्हणे येक उरला धरीता ठाव । येर केलें वाव तृणवत ॥४॥

२६९१. येक गांवें आम्ही विठोबाचें नाम । आणिकांचें काम नाहीं

आतां ॥१॥ मोडुनियां वाटा सुक्षम दुस्तर । केला राज्य भार चाले ऐसा ॥२॥ लावोनिं मृदंग टाळ श्रुतिघोष । सेऊं ब्रह्मरस आवडीनें ॥३॥ तुका म्हणे महापातकी पतित । ऐशीयाचें हीत हेळामात्रें ॥४॥

२६९२. वाचेच्या चापल्यें बहु झालों कुशळ । नाहीं बीज मूळ हातां आलें ॥१॥ म्हणोनि पंढरिराया दुःखी होतें मन । अंतरींचें कोण जाणें माझें ॥२॥ पूज्य झालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥३॥ तुका म्हणे खुण न कळे निरूती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥४॥

२६९३. आतां काढाकाढी करीं गा पंढरिराया । नाहीं तरि वायां गेलों दास ॥१॥ जाणतां बैसलों दगडाचि नावे । तिचा तो धर्म घ्यावे प्राण हाचि ॥२॥ मनाचा स्वभाव इंद्रियांचे वोढी । पतनाचे जोडी वरी हाव ॥३॥ तुका म्हणे झाली आंधळ्याची परी । आतां मज हरि वाट दावी ॥४॥

२६९४. सज्जन तो शब्द सत्यचि जो मानी । छळि जे दुर्जनीं आणि-कासी ॥१॥ येक गुण केला आसे दो ठाईं । ज्याचा त्यास पाहीं, जैसा तैसा ॥२॥ भाविक तो शब्दा बोले हा वाणीचा । लटिका या वाचा बाचाळतो ॥३॥ परउपकार घडे तोचि भला । नाठ्याळ तयाला दया नाहीं ॥४॥ जातिवंत तोचि पायरीच जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥५॥ हित तें अनहित केलें कैसें । तुका म्हणे पिसें लागलें त्या ॥६॥

२६९५. तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ॥१॥ हें मज देईं हें मज देईं । आणिक दुजें कांहीं न मागें तुज ॥२॥ बधिर कान तुझी कीर्ति नायकतां । पाय न देखतां जात डोळे ॥३॥ मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग ते चांडाळ जळो जळो ॥४॥ हात पाय तेणें पंथें न चालतां । जावोत अनंता गळोनीयां ॥५॥ तुजवीण जिणें नाहीं मज चाड । तुका म्हणे गोड नाम तुझें ॥६॥

२६९६. म्हणसी होउनी निश्चिंता । हरुनी अवघी चिंता । मग जाऊं येकांता । भजन करूं ॥१॥ संसारसंभ्रमें । आशा लागे पाठी । तेणें जिवा-साठीं । होइल तुझ्या ॥२॥ शेखी नाडशील नाडशील । विषयसंगें औघा

नाडशील । मागुता पडशील । भवडोहीं ॥३॥ शरीर सकळ । मायेचा बांधा । यासी नाहीं कदा । आगणूक ॥४॥ करिसी तडातोडी । आंतबाह्यांत्कारीं । ऐसे जाती चारी । दिवस वेगीं ॥५॥ मोलाची ते घडी । जाती वायांवीण । न मिळे धन मोल । देतां कोडी ॥६॥ जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका म्हणे हाय करिसी मग ॥७॥

२६९७. पांडुरंगे ये वो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे ये वो पांडुरंगे॥१॥ कनवाळू कृपाळु भक्तालागीं मोही । गजेंद्राचा धांवा तूंवा केला विठाई ॥२॥ भक्ताचे कैवारें कष्टलीस विठ्ठले । अंबऋषीकारणें जन्म दाहा घेतले ॥३॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं आवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥४॥ उपमन्यूकारणें कैसी धांवसी लवलाहीं । पाजि प्रेम पान्हा क्षीरसागरा ठाईं ॥५॥ कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसी झाली माउली ॥६॥ दुर्वास पातला धर्म छळावया वनीं । धांवसी लवलाहीं शाखादेंठ घेऊनी ॥७॥ कृपाळु माऊली भुक्तिमुक्तीभांडार । करीं माझा अंगाकार तुका म्हणे विठ्ठल ॥८॥

२६९८. कवणाचें कारण नलगेचि कांहीं । सर्वां सर्वां ठाईं तूं मज येक ॥१॥ कायावाचामन ठेविलें तुझे पाईं । आतां उरलें कांहीं न दिसे देवा ॥२॥ कवणा पाषाणासी धरूनीयां भाव । कवणावरी पाव ठेऊं आतां ॥३॥ म्हणोनि निश्चिंत राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ॥४॥ जळीं जळ काय धोवियेलें येक । कवण तें पातक हरलें तेथें ॥५॥ पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥६॥ पितरस्वरूपीं तूंचि जनार्दन । सव्य ते कवण अपसव्य ॥७॥ तुका म्हणे जित पिंड तुम्हां हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥८॥

२६९९. शिणलों दातारा करितां वेरझारा । आतां सोडवी संसारापासोनियां ॥१॥ न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा । घातलेंसे खोडा हाडाचिया ॥२॥ मायबापें माझीं जिवाचीं सांगातीं । तें देतील हातीं काळाचिया ॥३॥ पडताळुनि सुरी बैसला शेजारीं । यमपाश करीं घेऊनियां ॥४॥ पाठीं पोटीं येके लागलीं सरसीं । नेतीं नरकापासीं । वोढूनीयां ॥५॥

जन साह्यभूत असे या सकळां । मी येक निराळा परदेशी ॥६॥ कोणा काकुळती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥७॥ तुका म्हणे मज तुझाचि भरवसा । म्हणवोनि आशा मोकलिली ॥८॥

२७००. देवाचा तो भक्त देवासीच गोड । आणिकांची चाड नाहीं त्यासी ॥१॥ कवणाचा सोयरा नव्हेचि सांगाती । अवघीयां हातीं अंतरला ॥२॥ निष्काम वेडें म्हणतील बापुडे । अवघीयां सांकडे झाला कैसा ॥३॥ माझें ऐसें तया न म्हणती कोणी । असे रानीं वनीं भलत्या ठाईं ॥४॥ प्रातःस्नान करी विभूति चर्चून । देखोनियां जन निंदा करी ॥५॥ कंठीं तुळसीमाळा बैसोनी निराळा । म्हणती या चांडाळा काय झालें ॥६॥ गातां शंका नाहीं बैसे भलते ठाईं । शिव्या देती आईबाप भाऊ ॥७॥ घरीं बाईल म्हणे कोठें व्याली रांड । बरें होतें पंढ मरता तरी ॥८॥ जन्मोनीयां झाला अवघियां वेगळा । म्हणोनी गोपाळा दुर्लभ तो ॥९॥ तुका म्हणे जो संसारा रुसला । तेणेंचि टाकीला सिद्धपंथ ॥१०॥

२७०१. कस्तूरी मिनली जये मृत्तिके । तयेसि आणिके कैसी सरी ॥१॥ लोखंडाचे अंगीं लागला परीस । तया आणिकासी कैसी सरी ॥२॥ तुका म्हणे मी न वजे यातिवरी । पूज्यमान करी वैष्णवासी ॥३॥

२७०२. अनुहात ध्वनी वाहे सकळा पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥१॥ सकळ जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा वीण न तरे ॥२॥ ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीवीण तेंच ब्रह्म नये ॥३॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लागतां उन्मनींचा ॥४॥ तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतूडेना ॥५॥

२७०३. नेणें अर्थ कांहीं नव्हते माझे बोल । विनवितों कोपाल संत झणीं ॥१॥ नव्हति माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंग व्यापोनीयां ॥२॥ मज मूढाशक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥३॥ राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारी । बोबड्या उत्तरीं हेंचि ध्यान ॥४॥ तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥५॥

२७०४. देवासि लागे सकळांसी पोसावें । आम्हां काय खावें नलगे

चिंता ॥१॥ देवासि विचारावें लागे पापपुण्य । आम्हासि हे जन अवघें भलें ॥२॥ देवासि उत्पत्ति लागला संव्हार । आम्हा नाहीं फार थोडें कांहीं ॥३॥ देवासि काम लागला हा धंदा । आम्हांसि ते सदा रिकामिक ॥४॥ तुका म्हणे आम्ही भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥५॥

२७०५. घेईन मी जन्म याजसाठीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥१॥ हरिनाम कीर्तन संतांचें पूजन । घालुं लोटांगण महाद्वारीं ॥२॥ आनंदें निर्भर असो भलते ठाईं । सुखदुःखा नाहीं चाड आम्हां ॥३॥ आणिक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्वभावें ॥४॥ मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी । होय सांगों तैसी तुका म्हणे ॥५॥

२७०६. देवा तुज मज पण । पाहों आगळा तो कोण ॥१॥ तरी साच मी पतित । तूंचि खोटा दीनानाथ ॥२॥ ग्वाही साधुसंत जन । करुनि अंगा लावीन ॥३॥ आम्ही धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छंद ॥४॥ न चले तुझें कांहीं त्यास । आम्ही बळकाविले दोष ॥५॥ दिशा भरल्या माझ्या मनें । लपलासी त्याच्या भेणें ॥६॥ तुका म्हणे चित्त । करि तुझी माझी नीत ॥७॥

२७०७. लापणीक शब्दें नातुडे हा देव । मनींचा गुह्य भाव शुद्ध बोला ॥१॥ अंतरींचा भेद जाणे परमानंद । जयासी संवाद करणें लागे ॥२॥ तुका म्हणे जरी आपुलें स्वहित । तरि करीं चित्त शुद्ध भाव ॥३॥

२७०८. 'नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हे सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥१॥ काय करिसी वायां लटिकाची पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणीवेचा ॥२॥ मीच देव ऐसें सांगसि या लोकां । विषयाच्या सुखा ठोकोनियां ॥३॥ अमृताची गोडी पुढीला सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥४॥ तुका म्हणे जरी राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदीत ॥५॥

२७०९. गंगाजळा पाहीं पाठीं पोटीं नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ॥१॥ रवि दीप काळिमा काय जाणे हीरा । आणिक तीमिरा नाश तेणें ॥२॥ कर्पूर कांडणीं काय कोंडाकणी । सिंधु मेळवणी काय चाले ॥३॥ परिस चिंतामणी आणिकाचा गुणी । पालटे लागोनी नव्हे तैसा ॥४॥

तुका म्हणे तैसे जाण। संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥५॥

२७१०. परिस काय धातु सोनें न करीतु । फेडितो निभ्रांतु लोह पांगु ॥१॥ काय तयाहुनि झालासी बापुडें । फेडिता सांकडें माझें येक ॥२॥ कल्पतरु कोड पुरवितो रोकडा । चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥३॥ चंदनाचें वासें वसतां चंदन । होती काष्ट आन वृक्षयाती ॥४॥ काय त्याचें उणें झालें त्यासी देतां । विचारी अनंता तुका म्हणे ॥५॥

२७११. तोडोनि पुष्पवाटिका वृक्षफळयाती । बाभळा राखती करुनी सार ॥१॥ कोण हीत तेणें देखिलें आपुलें । आणिक पाहिलें सुख काई ॥२॥ धान्य बीजें जेणें जाळिलीं सकळें । पेरितों कान्हाळें जीरें बीज ॥३॥ मोडुनियां वाटा पुढिलांची सोय । आडरानें जाये घेऊनि लोकां ॥४॥ विषाचें अमृत ठेऊनियां नाम । करीतो अधम ब्रह्महत्या ॥५॥ तुका म्हणे त्यास नाईकें सांगतां । तया हाल करितां पाप नाहीं ॥६॥

२७१२. संसाराच्या भेणें । पळों न लाहेसें केलें ॥१॥ जेथें तेथें आपण आहे । आम्ही करावें तें काय ॥२॥ येकांतासी ठाव । तिहीं लोकीं नाहीं वाव ॥३॥ गांवा जातो ऐसें । नलगे म्हणावें तें तैसें ॥४॥ स्वप्नाचे परी । जागा पाहें तंव घरीं ॥५॥ तुका म्हणे काय । तुझें घेतलें म्यां आहे ॥६॥

२७१३. आपण काय सादर । विशीं आम्हा कां निष्ठुर ॥१॥ केले भक्त तैसें देई । तुझें प्रेम माझ्या ठाईं ॥२॥ काय पंगतीसी कोंडा । येकांतासी साकर मांडा ॥३॥ काय येकपण । पोतां घालूनि गांठी खूण ॥४॥ काय द्यावें तैसें । तया आपण अनारीसें ॥५॥ तुका म्हणे संधी । आतां तोडूं भेद बुद्धी ॥६॥

२७१४. चित्त तुझ्या पाईं । ठेउनि झालों उतराई ॥१॥ परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥२॥ आम्ही सर्वस्वें उदार । तुज देवोनी वेव्हार ॥३॥ इंद्रियांची होळी । संसार दिल्हा बळी ॥४॥ न पडे विसर । तुझा आम्हा निरंतर ॥५॥ प्रेम येकासाठीं । तुका म्हणे न वजे गांठी ॥६॥

२७१५. आम्ही पतित म्हणुनी तुज आलों शरण । करितों चिंतन दिवस रात्रीं ॥१॥ नाहीं तरी मज काय होती चाड । धरावया भीड तुज

चित्तीं ॥२॥ आम्हां न तारावें तुम्हीं काय करावें । सांगीजो जी भावें नारायणा ॥३॥ अन्याय येकाचा अंगीकार करणें । तया हातीं देणें लाज तेची ॥४॥ काय तें शूरत्व मिरउनि बोलणें । जनामध्यें दावणें । बळ रया ॥५॥ पोह्या अन्नमत्र घालोनीयां घरीं । दंडितो बाहेरी आलियासी ॥६॥ नव्हे कीर्ति कांहीं न मानेचि लोकां । काय विटंबणा तैसी तैसी ॥७॥ प्रत्यक्षासी काय द्यावें गा प्रमाण । पाहातां दर्पण साक्षी काई ॥८॥ तुका म्हणे तरी आम्हा कां न कळे । तरलों किंवा नाहीं आम्ही ॥९॥

२७१६. काग बग रीठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥१॥ तो मज दावा तो मज दावा । नंदनंदन जीवा आवडतो ॥२॥ गोवर्धन गीरी उचलिला करीं । गोकुळ भीतरीं राखीयेलें ॥३॥ वधुनि भौमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥४॥ पांडव जोहरिं राखिले कुसरी । विवरा भीतरीं चालविले ॥५॥ तुका म्हणे हा तो भक्तांचा कृपाळ । दुष्ट जना काळ नारायण ॥६॥

२७१७. तुजविण देवा । कोणा म्हणे माझी जिव्हा ॥१॥ तरी हे हो कां शतखंड । पडो झडोनियां रांड ॥२॥ कहीं इच्छेपाठीं । करी वळवळ करंटी ॥३॥ तुका म्हणे कर । कटीं तयाचा विसर ॥४॥

२७१८. आम्हां सर्व हेंचि काम । न विसंबावें तुझें नाम ॥१॥ नलगे करावी हे चिंता । तरणें करणें काय आतां ॥२॥ आसनीं शयनीं । दुजें नाहीं ध्यानीं मनीं ॥३॥ तुका म्हणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥४॥

२७१९. नव्हे कांहीं कवणाचा । भाव जाणवला साचा ॥१॥ म्हणोनि तुझ्या पाई । जीव ठेविला निश्चई ॥२॥ शरीर जायाचें कोपट । याचि काय खटपट ॥३॥ तुका म्हणे वायांवीण । देवा कळों आला शीण ॥४॥

२७२०. रज्जु धरोनियां हातीं । भेडसावीलीं नेणतीं । कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ॥१॥ तुम्हांआम्हांमध्यें हरी । झाली होती तैशी परि मृगजळाचे पूरीं । ठाव पाहों तरावया ॥२॥ सरि चितांक भोंवरी । अलंकाराचिया परी । नामें झालीं दुरी । येक सोनें आटितां ॥३॥

पिसाचीं पारवीं । करूनि बाजागीरी दावी । तुका म्हणे तेवीं । मज नको चाळऊं ॥४॥

२७२१. नेघे तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥१॥ वाढे वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥२॥ आतां तुझ्या घरा । कोण करी वेरझारा ॥३॥ तुका म्हणे ठाईं । मजपाशीं काय नाहीं ॥४॥

२७२२. व्यवहार तो खोटा । आतां नवजों तुझ्या वाटा ॥१॥ येका नामा नाहीं ताळा । केली सहस्राची माळा ॥२॥ पाहों जातां घाईं । खेळसील लपंडाई ॥३॥ तुका म्हणे चार । बहु करितोसी फार ॥४॥

२७२३. लटिकाची केला । सोंग पसारा दाविला ॥१॥ अवघा बुडालासी रिणें । बहुतांचें घेणें देणें ॥२॥ लावियला चाळा । बहु दावूनि पुतळा ॥३॥ तुका म्हणे हात । आम्ही आवरली मात ॥४॥

२७२४. दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥१॥ थोंटा झोंडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥२॥ सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥३॥ तुका म्हणे काय । तुझें घ्यावें उरें हाय ॥४॥

२७२५. लाज ना विचार । बाजारी तूं भांडखोर ॥१॥ ऐसें ज्यानें व्हावें । त्याची गांठी तुजमवें ॥२॥ फाडिसी लंगोटी । घेसी सकळासी तुटी ॥३॥ तुका म्हण चोरा । तुला आप ना दुसरा ॥४॥

२७२६. ठाव नाहीं बुड । घरें वसविसी कुड ॥१॥ भलते ठाईं तुझा वास । सदा येऱ्हवीं उदास ॥२॥ जागा ना निजेला । होसी धाला ना भुकेला ॥३॥ न पुसतां भलें । तुका म्हणे बुझे बोलें ॥४॥

२७२७. श्वानासि दिल्ही सवें । पायां भोवते तें भोवे ॥१॥ तैसी झाली मज परी । वसे निकट सेजारीं ॥२॥ जेवितां जवळी । येवोनियां पुस घोळी ॥३॥ तुका म्हण धणी । कोपेल हे मना नाणी ॥४॥

२७२८. वटवट केली । न विचारितां मना आली ॥१॥ मज कराल ते क्षमा । कैसें नेणो पुरुषोत्तमा ॥२॥ उचित न कळे । जिव्हा भलतेंचि बरळे ॥३॥ तुका म्हण कांहीं । लौकिकाची चाड नाहीं ॥४॥

२७२९. जिवें व्हावें साठीं । पडे संसारेसी तुटी ॥१॥ ऐसीं बोलिलों

वचनें । सर्वे घेऊनी नारायणें ॥२॥ येणें नाहीं जाणें । केलें कोणा न मागणें ॥३॥ नाहीं जन्मा आलों । करील ऐसें नेदी बोलों ॥४॥ ठाव पुसी तेणें । तुका म्हणे खुंटे येणें ॥५॥

२७३०. आतां पंढरिराया । माझ्या निरसावें भया ॥१॥ मनीं राहिली आशंका । स्वामी भयाची सेवका ॥२॥ ठेवा माथां हात । कांहीं बोलों अभयमात ॥३॥ तुका म्हणे लाडें । खेळे ऐसें करा पुढें ॥४॥

२७३१. कवतुकवाणें । बोलों बोबड्या वचनें ॥१॥ हें तों नसावें अंतरीं । आम्हा धरायाचें दूरीं ॥२॥ स्तुति तैसी निंदा । माना समान गोविंदा ॥३॥ तुका म्हणे बोलें । मज तुम्ही शिकविलें ॥४॥

२७३२. असो मागें झालें । पुढें गोड तें चांगलें ॥१॥ आतां माझे मनीं । कांहीं अपराध न मानीं ॥२॥ नेदी अवसान । करितां नामाचें चिंतन ॥३॥ तुका म्हणे बोलें । तुज अधींच गोविलें ॥४॥

२७३३. मातेविण बाळा । आणिक न माने मोहळा ॥१॥ तैसें झालें माझ्या चित्ता । तुजविण पंढरिनाथा ॥२॥ वाट पाहे मेघा बिंदु । नेघे चातक सरिता सिंधु ॥३॥ सारसास निशीं । ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥४॥ जीवना-लागीं मच्छ । जैसे धेनुलागीं वत्स ॥५॥ पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्तमानें ॥६॥ कृपणाचें धन । लोभ्यालागीं जैसें. मन ॥७॥ तुका म्हणे काय । तुजविण प्राण राहे ॥८॥

२७३४. तुज ऐसा कोणी न देखें उदार । अभयदानशूर पांडुरंगा ॥१॥ शरण येती त्याचे न विचारीसी दोष । न मागतां त्यास अढळ देसी ॥२॥ धांवसी आडणी ऐकोनियां धांवा । कैवारें त्या देवा भक्तांचिया ॥३॥ दोष त्याचे जाळी कल्पकोटीवरी । नामासाठीं हरि आपुलिया ॥४॥ तुका म्हणे तुज वानूं कैशा परी । येक मुख हरि आयुष्य थोडें ॥५॥

२७३५. वाळूनियां जन सांडी मज दुरी । करिसील हरि ऐसें कधीं ॥१॥ आटवीन पाय धरुनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥२॥ नावडती जीवा आणिक प्रकार । आवड ते फार येकांताची ॥३॥ तुका म्हणे ऐसी धरितों वासना । होई नारायणा साह्य मज ॥४॥

२७३६. सांगतों तें मना तें माझें नायकें । घातावरी टेंके चांडाळ हें ॥१॥ म्हणोनियां पाहे तरतें बुडतें । न लाहे पुरतें बळ करूं ॥२॥ काय तें संचित न कळे पाहतां । मतिमंदा चिंता उपजते ॥३॥ तुका म्हणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहोनियां वेगीं पार टाकीं ॥४॥

२७३७. आतां नको चुको आपुल्या उचिता । उदारा या कांता रखु-माईच्या ॥१॥ आचरावें दोष हें आम्हां विहित । तारावे पतित तुमचे ते ॥२॥ आम्ही तों आपुलें केलेंसें जतन । घडो तुम्हा कून घडेल तें ॥३॥ तुका म्हणे विठो चतुरांच्या राया । आहे तें कासया मोडों देशी ॥४॥

२७३८. मुखें बोलावें तें जीवींचें जाणसी । विदित पायासीं सर्व आहे ॥१॥ आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणा तुम्ही त्याचा ॥२॥ आपुलें तों येथें केलें नव्हें कांहीं । साधनाच्या वाहीं पडों नये ॥३॥ तुका म्हणे देह दिल्हा पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥४॥

२७३९. कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥१॥ नवल हे लीला कर्त्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥२॥ लोभा-लोभ येका धनाचिये ठाईं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥३॥ तुका म्हणे भूक न विचारी प्रकार । योजे तेंचि सार यथाकाळें ॥४॥

२७४०. बांधी सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेकडे गोविती आपणां बळें ॥१॥ भुललियासि नाहीं देहाचा आटव । धोतऱ्यानें भाव पालटीला ॥२॥ घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई, घेवोनि फोडी ॥३॥ तुका म्हणे देवा गेली विसरोन । आतां वर्म कोण दावी यासी ॥४॥

२७४१. कोण जन्मता कोण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥१॥ कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥२॥ कवण भोगवीता कवण भोगिता । न कळे कृपावंता माव तुझी ॥३॥ कवण ते रूपता कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥४॥ सर्वां ठाईं तूंचि सर्वहि झालासी । तुका म्हणे यासी दुजें नव्हे ॥५॥

२७४२. जे दोष घडले न फिटे करितां कांहीं । सरते तुझ्या पाईं झालों तैसे ॥१॥ माझा कांहो करूं नये अंगिकार । झालेति निष्ठुर

पांडुरंगा ॥२॥ यातिहीन नये ऐकों ज्या वेद । तया दिल्हें पद वैकुंठींचें ॥३॥ तुका म्हणे कां रे येकाचा आभार । घेसी माथां भार वाहोनियां ॥४॥

२७४३. जेथें देखे तेथें तुझीच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें । रूप गुण नाम अवघा मेघःशाम । वेगळें तें काय उरलें । जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी । सकळ देवपाट झाल । सदा पर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें रे ॥१॥ अवघा आम्हां तूंचि झालासी देवा । संसार हेवा काम धंदा । नलगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥२॥ वाचे बोले ते तुझेच गुणवाद । मंत्रजप कथा स्तुति । भोजन मारुं ठाईं । फळ तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती । चालतां प्रदक्षिणा निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति । देखोनि दृष्टि परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ती रे ॥३॥ झाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ झालें । महाल मंदिरें माड्या तनघरें । झोंपड्या अवघीं देव देवाइलें । ऐके कानीं त्या हरिनामध्वनि । नानाशब्द होते झाले । तुका म्हणे आम्ही या विठोबाचे दास । सदा प्रेमें सुखें धालों ॥४॥

२७४४. हरिकथेची आवडी देवा । करितों सेवा दासांची ॥१॥ म्हणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागे घालितसे ॥२॥ निर्लज्ज भोजे नाचे रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ॥३॥ तुका म्हणे विकिलें देवें । आपणा भावें सेवसाटीं ॥४॥

२७४५. साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥१॥ शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥२॥ वैष्णवांचा संग रामनाम गाणें । मंडित भूषणें अलंकार ॥३॥ भवनदी आड नव्हतीसी झाली । कोरडीच चाली जावें पाईं ॥४॥ मायबाप दोवें पाहातील वाट । ठेवोनियां कटीं कर उभीं ॥५॥ तुका म्हणे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥६॥

२७४६. यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी ॥१॥ वेदश्रुति तुज नेणती कोण्ही । चोविस ठेंगणीं धांडोळितां ॥२॥ आतां मज क्षमा करावें ते देवा । सलगी ते केशवा बोलियेलों ॥३॥ सगुण

कीं साकार निर्गुण कीं निराकार । न कळे हा पार वेदश्रुती ॥४॥ तो आम्हीं भावें केलासी लहान । ठेवोनियां नांवें पाचारितों ॥५॥ सहस्र मुखें शेष शीणला स्तावितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला ॥६॥ तेथें माझी देहबुद्धि ते काई । थोर मी अन्यायी तुका म्हणे ॥७॥

२७४७. कृष्ण ध्यातां चित्तीं कृष्ण गातां गीतीं । तेहि कृष्ण होती कृष्णध्यानें ॥१॥ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । म्हणा रे हा भोक्ता नारायण ॥२॥ वोविया दळणीं गाता नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥३॥ नर नारी याति हो कोणी भलती । भावें एका प्रीति नारायण ॥४॥ तुका म्हणे येका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप येक ॥५॥

२७४८. डोळियां पाझर कंठ माझा दाटी । येई वो देई भेटी पांडुरंगे ॥१॥ बहु दीस टाकिलें निरास कां केलें । कोठें वो गुंतलें चित्त तुझें ॥२॥ बहु धंदा तूज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ॥३॥ पंढरिसी जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं धाडीं ॥४॥ तुजविण कोण सांवा धांवा करी । यावें झडकरी पांडुरंगे ॥५॥ काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळु परि विसरलासी ॥६॥ येक वेळ माझा धरूनि आठवो । तुका म्हणे ये वो न्यावयासी ॥७॥

२७४९. काय करूं या मना आतां । कां विसरतें पंढरिनाथा ॥१॥ करूं संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती ॥२॥ अधिक कोंडतां चरफडी । भलतिकडे घाली उडी ॥३॥ भजन नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकून ॥ बहुत चंचळ चपळ । जातां येतां नलगे वेळ ॥४॥ किती राखों दोन्ही काळ । निजलिया जागे वेळ ॥५॥ मज राखें आतां । तुका म्हणे पंढरिनाथा॥६॥

२७५०. कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥१॥ करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्म नीत ॥२॥ देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥३॥ विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥४॥ हत्या क्षत्रधर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥५॥ तुका म्हणे संतीं । करुनि ठेविली आयती ॥६॥

२७५१. पडोनियां राहीं । उगाचिये संतांचिये पाई ॥१॥ नलगे पुसणें सांगातें । चित्त शुद्धि करीं भावें ॥२॥ सहज ते स्थिति । उपदेश पर युक्ति

॥३॥ तुका म्हणे भाव । जवळि धरुनी आणी देव ॥४॥

२७५२. देवाचे घरीं देवें केली चोरी । देवें देव नागउन केला भिकारी ॥१॥ धांवणियां धांवा धांवणियां धांवा । मागचि नाहीं जावें कवणियां गांवा ॥२॥ सर्वांचि होता चोर घरीचिया घरीं । फावलियावरी केलें अवघें वाटोळें ॥३॥ तुका म्हणे येथें कोणीच नाहीं । नागवले कोण गेलें कोणाचें काई ॥४॥

२७५३. जतन करा रे जतन करा । घालूं पाहे घरावरी घाला चोरटे ॥१॥ अवघेच निजों नका अवघिये ठाईं । वेळ अवेळ तरी सांभाळावीं कांहीं ॥२॥ सिंतरली फार खाती भोंवताले फेरे । गेले नये हातां सेखीं तळमळ उरे ॥३॥ तुका म्हणे आम्ही करूं आपुलें जतन । नलगे कांहीं कोणा द्यावें उघडा रे कान ॥४॥

२७५४. काळोखी खावोनि कैवाड केला धीर । आपुलिया हितें झालों जनामध्यें शूर ॥१॥ कां रे तुम्ही नेणा कां रे तुम्ही नेणा । अल्प सुखा-साठीं पडशी विपत्तीच्या घाणां ॥२॥ नाहीं ऐसी लाज काय तयापें आगळे । काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥३॥ तुका म्हणे तरी सुख अवघेंचि बरें । जतन करूं हीं आपुलालीं ढोरें ॥४॥

२७५५. जाय परतें काय आणीला कांटाळा । बोला येक वेळा ऐसें तरी ॥१॥ कां हो केली तुम्ही निष्ठुरता देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥२॥ भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आम्हुचिया ॥३॥ तुका म्हणे तुम्हापासूनि अंतर । न पडे नाहीं स्थीर बुद्धि माझी ॥४॥

२७५६. अनुभवें कळों येतें पांडुरंगा । रुसावें तें कां गा तुम्हांवरी ॥१॥ आवरितां चित्त नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥२॥ अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । म्हणोनि अंतर तुझ्या पाईं ॥३॥ तुका म्हणे काय करूं नेणें वर्म । आलें तैसें कर्म सोसूं पुढें ॥४॥

२७५७. तुज करितां होतें आनाचें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥१॥ कां नये कइवाड करूं अंगीकार । माझा बहु भार जड झाला ॥२॥ चुकलासी म्हणों तरी जीवाचाहि जीव । रिता नाहीं ठाव उरों दिल्हा ॥३॥

तुका म्हणे ऐसें काय सत्ताबळ । माझें परी कृपाळ आह्मां तुम्ही ॥४॥

२७५८. फळ देंठिहुनि झडे । मग मागुतें न जडे ॥१॥ म्हणोनी तांतडि खोटी । कारण उचिताचे पोटीं ॥२॥ पुढें चढे हात । त्याग मागीला उचित ॥३॥ तुका म्हणे रणीं । नये पाहों परतोनी ॥४॥

२७५९. आगी देखोनीयां सती । अंगीं रोमांच उठती ॥१॥ हा तो नव्हे उपदेश । सुख अंतरीं उल्हास ॥२॥ वित्तगोतांकडे । चित्त न घाली ना रडे ॥३॥ आठवोनि येका । उडी घाली म्हणे तुका ॥४॥

२७६०. फळ पिकें देंठी । निमित्य वारियाचे भेटी ॥१॥ हा तों अनुभव रोकडा । कळों येतो खरा कुडा ॥२॥ तोडिलीया बळें । वायां जाती काचीं फळें ॥३॥ तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ॥४॥

२७६१. हालउनि खुंट । आधिं करावा बळकट ॥१॥ मग तयाच्या आधारें । करणें तें अवघें बरें ॥२॥ सुखदुःख साहे । हर्षामर्ष भंगा नये ॥३॥ तुका म्हणे जीवें । आधिं मरोनि राहावें ॥४॥

२७६२. धावें मातें सोई । बाळ न विचारितां कांहीं ॥१॥ मग त्याचें जाणें निकें । अंग वोडवी कौतुकें ॥२॥ नेणें सर्प दोरी । आगि भलते हातीं धरी ॥३॥ तीवीण तें नेणें । आणिक कांहीं तुका म्हणे ॥४॥

२७६३. भोग द्यावे देवा । त्याग भोगच बरवा ॥१॥ आपण व्हावें येकीकडे । देव कळेवरि जोडे ॥२॥ योजे यथाकाळें । उत्तम पाला कंदमुळें ॥३॥ वंचकासी दोष । तुका म्हणे मिथ्या सोस ॥४॥

२७६४. पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥१॥ मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥२॥ नव्हे हा उपदेश । तुमचे वडवडीले शेष ॥३॥ तुमचे कृपेचे पोषणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥४॥

२७६५. जायाचें अंगुलें लेतां नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविले ॥१॥ घुमळितां ताक कांडितां भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वायां ॥२॥ तुका म्हणे नाहीं स्वतां भांडवल । भिकेचें तें फोल बीज नोव्हे ॥३॥

२७६६. न बोलावें परी पडिला प्रसंग । हाकलिनें जग तुझ्या नामें ॥१॥ लटिकेंचि सोंग मांडिला पसारा । भिकारी तूं खरा कळों आलें ॥२॥ निला-

जीरीं आम्ही करूनियां धीर । राहिलों आधार धरूनियां ॥३॥ कैसा नेणे आतां करिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ॥४॥ तुका म्हणे कांहीं न बोलसी देवा । उचित हे सेवा घेई माझी ॥५॥

२७६७ नाहीं झाले मोल कळों देतां काळीं । कोण पाहों बळी दोघां-मध्यें ॥१॥ आम्ही तरी झालों जीवासी उदार । कईचा हा धीर तुजपाशीं ॥२॥ बहु चालविलें मागें आजिवरी । आतां पुढें हरी जाऊं नेदी ॥३॥ नव्हती जों भेटी नामाची वोळखी । म्हणउनि दुःखी बहु झालों ॥४॥ तुका म्हणे कांहीं राहों नेदी बाकी । येक वेळां चुकी झाली आतां ॥५॥

२७६८. कैसा कृपाळू हे न कळसी देवा । न बोलसी सेवा घेसी माझी ॥१॥ काय ऐसें बळ आहे तुजपासीं । पाहों हरि घेसी कोण आड ॥२॥ पाडियेला ठाई तुझा थारा मारा । अवघा दातारा लपसी तो ॥३॥ आतां तुम्हां आम्हां उरिनोचि बरें । काय हें उत्तर वाढऊनी ॥४॥ तुका म्हणे मज साह्य झाले संत । म्हणउनि मात फावली हे ॥५॥

२७६९. चुकलीया आम्हां करितसा दंड । हाकासी कां खंड पांडुरंगा ॥१॥ चालवीलीं येके रिद्धीसिद्धीवरी । तैसा मी भिकारी नव्हे देवा ॥२॥ कां मी येथें गुंतों मांडुनि पसारा । मागुता दातारा दंभासाठीं ॥३॥ केलें म्यां जतन आपुलें वचन । ठाईचें धरून होतों पोटीं ॥४॥ तुका म्हणे ताळा घातला आडाखीं । ठावें होतें सेखीं आडवीसी ॥५॥

२७७०. कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ति स्तुति करूं ॥१॥ आम्ही तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते ॥२॥ अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सच्चिता सर्वोत्तमा ॥३॥ चांगलीं हीं नामें घेतलीं ठेऊन । झालासी लहान भक्तिकाजा ॥४॥ तुका म्हणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥५॥

२७७१. आतां तुझा भाव कळों आला देवा । ठकोनियां सेवा घेसी माझी ॥१॥ टाकोनि सांकडें आपुलीया माथां । घातला या संतांवरी भार ॥२॥ स्तुति करुनियां पिटीला डांगोरा । तें कोण दातारा साच

करी ॥३॥ जातीचे वाणी असे पोटींचें कूडें । नका मजपुढें ठकाठकी ॥४॥ तुका म्हणे नाहीं आलें अनुभवा । आधींच मी देवा कैचा नाचों ॥५॥

२७७२. जन पूजी याचा मज कां आभार । हा तुम्ही विचार जाणा देवा ॥१॥ पत्र कोण मानी वंदीतील शिक्का । गौरव सेवकां याचिमुळें ॥२॥ मीपणें मी होतों जनामध्यें आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥३॥ आतां तूं भोगिता सर्व नारायणा । नको आम्हा दीना पीडा करूं ॥४॥ आपुलीया हातें देशील मुशारा । तुका म्हणे खरा तोचि आम्हां ॥५॥

२७७३. आमुचि कां नये तुम्हांसि करुणा । किती नारायणा आळवावें ॥१॥ काय जाणा तुम्ही दुर्बळाचें जीणें । वैभवाचिया गुणें आपुलिया ॥२॥ देति घेति करिती खटपटा आणिका । निराळा कौतुकें पाहोनियां ॥३॥ दिवस बोटीं आम्हीं धरियेलें माप । वाहातों संकल्प स्वहिताचा ॥४॥ तुका म्हणे मग देसी कोण्या काळें । चुकुर दुर्बळें होतों आम्ही ॥५॥

२७७४. आम्हां तुम्हां तूटी होईल यावरी । ऐसें मज हरी दिसतसे ॥१॥ वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥२॥ सारिलें संचित होतें गांठीं कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोण्ही ॥३॥ जावेंची नलगे कोणाचिये घरा । उडाला पातेरा तुझ्या संगें ॥४॥ तुका म्हणे आम्हां हाची लाभ झाला । मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥५॥

२७७५. देव मजूर देव मजूर । नाहीं उजूर सेवेपुढें ॥१॥ देव गांढ्याळ देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे ॥२॥ देव तर काई देव तर काई । तुका म्हणे राई तरी मोठी ॥३॥

२७७६. देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥१॥ देव उदार देव उदार । थोड्यासाठीं फार देऊं जाणे ॥२॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥३॥

२७७७. देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥१॥ देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा म्हणे कोंडी ॥२॥ देव लागट देव

लागट । लाविलीया चट जीवीं जडो ॥३॥ देव बावळा देव बावळा । भावें जवळा लुडबुडी ॥४॥ देव न व्हावा देव न व्हावा । तुका म्हणे गोवा करि कामीं ॥५॥

२७७८. देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥१॥ देव अकुळी देव अकुळी । भलते स्थळीं सोयरिक ॥२॥ देव लिगाड्या देव लिगाड्या । तुका म्हणे भाड्या दंभें ठकी ॥३॥

२७७९. देव बराडी देव बराडी । घाली देंठासाठीं उडी ॥१॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥२॥ देव भावीक भावीक । होय दासांचा सेवक ॥३॥ देव होया देव होया । जैसा म्हणे तैसा तया ॥४॥ देव लहान देव लहान । तुका म्हणे अणुरेणु ॥५॥

२७८०. देव भला देव भला । मिळोनी जाय जैसा त्याला ॥१॥ देव उदार देव उदार । देतां नाहीं थोडें फार ॥२॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥३॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वां जीवा ॥४॥ देव चांगला चांगला । तुका चरणासीं लागला ॥५॥

२७८१. देव पाहों देव पाहों । उंच ठाईं उभे राहों ॥१॥ देव देखीला देव देखीला । तो नाहीं कोणा भ्याला ॥२॥ देवासी कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासि सांगों ॥३॥ देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचीये खुणे ॥४॥ देव कातर देव कातर । तुका म्हणे अभ्यंतर ॥५॥

२७८२. देव आमुचा देव आमुचा । जीव सकळ जीवांचा ॥१॥ देव आहे देव आहे । जवळी आम्हां अंतर्बाह्य ॥२॥ देव गोड देव गोड । पुरवी कोडाचेंहि कोड ॥३॥ देव आम्हां राखे राखे । घाली कळिकाळासी खांके ॥४॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुकयाचा सांभाळ ॥५॥

२७८३. जाऊं देवाचिया गांवा । देव देईल विसांवा ॥१॥ देवा सांगों सुखदुःख । देव निवारील भूक ॥२॥ घालूं देवासीच भार । देव सुखाचा सागर ॥३॥ राहों जवळीं देवापासीं । आतां जडोनि पायांसी ॥४॥ तुका म्हणे आम्ही बाळें । या देवाचीं लडिवाळें ॥५॥

२७८४. प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥१॥ प्रेम यावें

तया गांवा । चोजवी तया वैष्णवां ॥२॥ प्रेम पाठी लागे बळें । भक्त देखोनियां भोळे ॥३॥ प्रेम नवजे दवडीतां । शिरे बळें जेथें कथा ॥४॥ तुका म्हणे थोर आशा । प्रेम घरीं विष्णुदासां ॥५॥

२७८५. संत मानीतील मज । तेणें वाटतसे लाज ॥१॥ तुम्ही कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥२॥ गोविलों थोरिवा । दुःख वाटतसे जीवा ॥३॥ तुका म्हणे मायां । आवरा हे पंढरिराया ॥४॥

२७८६. नाहीं तुम्हीं केला । अंगिकार जी विठ्ठला ॥१॥ सोंगें न पवीजे थडी । माझि फुटकी सांगडी ॥२॥ प्रेम नाहीं अंगीं । भलें म्हणवीलें जगीं ॥३॥ तुका म्हणे देवा । मज वायां कां चाळवा ॥४॥

२७८७. आतां चक्रधरा । झणें आम्हासी अव्हेरा ॥१॥ तुमचीं म्हणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥२॥ काळ आम्हां खाय । तरी तुझें नांव जाय ॥३॥ तुका म्हणे देवा । आतां पण सिद्धि न्यावा ॥४॥

२७८८. काय तुझे उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजीं आतां ॥१॥ जतन हें माझें करोनि संचित । दिल्हें अवचित आणूनियां ॥२॥ घडल्या दोषाचे न घालींच भरी । आलियासी थोरी कृपा देवा ॥३॥ नव्हे तें ठाउकें आयकिलें नाहीं । न मागतां पाहीं दान दिल्हें ॥४॥ तुका म्हणे याच्या उपकारासाठीं । नाहीं माझे गांठी कांहीं येक ॥५॥

२७८९. मज ऐसे कोण उद्धरीला सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसा॥१॥ हातींच्या कांकणा कायसा आरसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥२॥ धनवंत्री हाती रोग्याचिया व्यथे । तें तों कांहीं येथें न देखीजे ॥३॥ तुका म्हणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाऊगें कोण मानी ॥४॥

२७९०. काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय झालें बळ शक्तीहीन । ॥१॥ माझिया संचितें आणिलासी हरि । झालें तुजवरी वरिष्ठ तें ॥२॥ काय गमाविली सुदर्शन गदा । त्या भेणें गोविंदा लाजतसां ॥३॥ तुका म्हणे काय ब्रीदाचें तें काम । सांडी परतें नाम दीनानाथा ॥४॥

२७९१. बळ बुद्धि वेंचुनियां शक्ति । उदक चालवावें युक्ती ॥१॥ नाहीं चळण तया अंगीं । धांवे लवणामागें वेगीं ॥२॥ पाट मोट कळा । भरीत

पखाला सागळा ॥३॥ बीजा ज्यासी द्यावें । तुका म्हणे तैसें व्हावें ॥४॥

२७९२. न म्हणे साना थोर । दुष्ट पापी अथवा चोर ॥१॥ सकळां द्यावी येक चवी । तान हारुनी निववी ॥२॥ न म्हणे दिवस राती । सर्व काळ सर्वां भूतीं ॥३॥ तुका म्हणे झारी । घेतां तांब्यानें खापरी ॥४॥

२७९३. इच्छा चाड नाहीं । न धरि संकोचही कांहीं ॥१॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥२॥ मोहरी कांदा ऊंस । येक वाफा भिन्न रस ॥३॥ तुका म्हणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥४॥

२७९४. तरले ते मागें आपुलीया सत्ता । कमाई अनंता करुनियां ॥१॥ उसणें फेडीतां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुम्ही त्यांसी ॥२॥ मज ऐसा कोण सांगा वायां गेला । तो तुम्ही तारिला पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे नामासारिखी करणी । न देखे हें मनीं समजावें ॥४॥

२७९५. कवणासीं भांडों कवण माझें साह्य । कोण मज आहे तुजवीण ॥१॥ धरिलें उदास दूरी दूरांतरें । सांडी येकपरें केली माझि ॥२॥ आयकोनी माझे नायकसी बोल । देखोनीयां खोल बुंथी घेसी ॥३॥ तुका म्हणे येका गांवींची वसती । म्हणउनि खंती वाटे देवा ॥४॥

२७९६. आळवीतां कंठ शोकला भीतर । आयुष्य वेंचे धीर नाहीं मना ॥१॥ अझुनि कां नये हें तुझ्या अंतरा । दीनाच्या माहेरा पांडुरंगा ॥२॥ धन दिसे डोळां दगडाचे परी । भोग ते शरीरीं विष झालें ॥३॥ चुकलों काय तें मज क्षमा करी । आलिंगुनी हरि प्रेम द्यावें ॥४॥ अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरीं सर्व काळ ॥५॥ तुका म्हणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥६॥

---

शिवाजी राजे यांनीं स्वामीस अब्दागीर, घोडीं, कारकून ऐसे न्यावयास पाठविले ते समयींचे अभंग

२७९७. दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥१॥ आतां येथें पंढरिराया । मज गोवीसी कासया ॥२॥ मान दंभ चेष्टा । हें तों सूकराची विष्ठा ॥३॥ तुका म्हणे देवा । माझें सोडवणें धांवा ॥४॥

२७९८. नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ॥१॥ कां रे पुरविली

पाठी । माझी केली जीवें साठी ॥२॥ न करावा संग । वाटे दुरत्वें जग ॥३॥ सेवावा येकांत । वाटे न बोलावी मात ॥४॥ जन तन धन । वाटे लेखावें वमन ॥५॥ तुका म्हणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥६॥

२७९९. जाणोनि अंतर । टाळसील करकर ॥१॥ तुज लागलीसे खोडी पांडुरंगा बहू कुडी ॥२॥ उठविसी दारीं । धरणें येखादीया परी ॥३॥ तुका म्हणे पाय । कैसे सोडीन तें पाहें ॥४॥

२८००. नाहीं विचारीत । मेघ हगगदारी सेत ॥१॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवी कारणापें चित्त ॥२॥ वर्जित गंगा । नाहीं उत्तम अधम जगा ॥३॥ तुका म्हणे मळ । नाहीं अग्नीसी विटाळ ॥४॥

२८०१. काय दिल्हा ठेवा । आम्हां विठ्ठलचि व्हावा ॥१॥ तुम्ही कळलेति उदार । साटी परीसाची गार ॥२॥ जीव देतां तरी । वचना नये येका सरी ॥३॥ गोमांसा समान । तुका म्हणे आम्हां धन ॥४॥

२८०२. मुंगि आणि राव । आम्हा सारिखाचि जीव ॥१॥ गेला मोहो आणि आशा । कळीकाळाचा तो फांसा ॥२॥ सोनें आणि माती । आम्हां समान हें चित्तीं ॥३॥ तुका म्हणे आलें । घरा वैकुंठ सांवळें ॥४॥

२८०३. तिहीं त्रिभुवनीं । आम्ही वैभवाचे धणी ॥१॥ हातां आले धाव डाव । आमुचा मायबाप देव ॥२॥ काय त्रिभुवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥३॥ तुका म्हणे सत्ता । अवघि आमुचीच आतां ॥४॥

२८०४. सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥१॥ परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥२॥ अमृतें सागर भरवेल गंगा । म्हणवेल उगा राहे काळा ॥३॥ भूत भविष्य कळों येईल वर्तमान । करवती प्रसन्न रिद्धीसिद्धी ॥४॥ स्थान मान कळों येती योग मुद्रा । नेववेल वारा ब्रह्मांडासी ॥५॥ तुका म्हणे मोक्ष राहे आलीकडे । इतर बापुडे काय तेथें ॥६॥

२८०५. आम्ही तेणें सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥१॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तीके समान ॥२॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा येकादशी ॥३॥ म्हणवा हरिचे दास । तुका म्हणे मज हे आस ॥४॥

---

२८०६. नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥१॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥२॥ पदरीं घाली पीळा । बाप निर्बळ साठी बाळा ॥३॥ तुका म्हणे भावें । भेणें देवें आकारावें ॥४॥

२८०७. भावाचिया बळें । आम्ही निर्भर दुबळें ॥१॥ नाहीं आणिकाची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥२॥ तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥३॥ येक छत्रीं राज्य । तुक्या पांडुरंगीं काज ॥४॥

२८०८. भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥१॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहुनि परता ॥२॥ बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥३॥ तुका म्हणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥४॥

२८०९. सत्ता वर्ते मन । पाळी विठ्ठलाची आण ॥१॥ आज्ञा वाहुनियां शिरीं । सांगितलें तेंचि करीं ॥२॥ सरलीसे धांव । नलगे वाढवावी हाव ॥३॥ आहे नाहीं त्याचें । तुका म्हणे कळे साचें ॥४॥

२८१०. खावें ल्यावें द्यावें । जमाखर्च तुझ्या नांवें ॥१॥ आतां चुकली खटपट । झाड्यापाड्याचा बोभाट ॥२॥ आहे नाहीं त्याचें । आम्हां काम सांगायाचें ॥३॥ तुका म्हणे चिंता । भार वाहे त्यांचे माथां ॥४॥

२८११. आतां बरें झालें । माझें माथांचें निघालें ॥१॥ चुकली हे मरमर । भार माथाचे डोंगर ॥२॥ नसतां कांहीं जोडी । करी ते बहु तडातोडी ॥३॥ झाला झाडापाडा । तुका म्हणे गेली पीडा ॥४॥

२८१२. संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥१॥ आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनीयां घरीं ॥२॥ नाहीं काम हातीं । आराणूक दिवस राती ॥३॥ तुका म्हणे सत्ता । आतां पुरे पराधीनता ॥४॥

२८१३. ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥१॥ तरीच जोडिले ते भोग । कांहीं आघात नलगे ॥२॥ वाढवावी थोरी । मुखें म्हणे तुझे हरी ॥३॥ तुका म्हणे हे गोमटी । दासां न घालावी तुटी ॥४॥

२८१४. माझा तुम्ही देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे ॥१॥ कां हो कांहीं माझा नये अनुभवा । विचारितां देवा आहे तैसा ॥२॥ लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥३॥

तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥४॥

२८१५. तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीव येरयेरें वंचिजे ना ॥१॥ हें तुम्हां सांगणें काय उगवुनी । जावें समजोनी पांडुरंगा ॥२॥ जेवी- त्याची खूण वाढिल्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ॥३॥ तुका म्हणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हार संपादणी ॥४॥

२८१६. न पालटे येक । भोळा भक्तचि भावीक ॥१॥ येरा नाश आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ॥२॥ नेणे गर्भवास । येक विष्णुचाचि दास ॥३॥ तुका म्हणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥४॥

स्वामींनीं पंढरिनाथास पत्र पाठविलें ते अभंग

२८१७. कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात । चाल तुज पंढरिनाथ बोलावितो ॥१॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरीन वाट माहेराची ॥२॥ निलाजीरें चित्त करितें तळमळ केधवां देखति मूळ आलें डोळां ॥३॥ तुका म्हणे काई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥४॥

२८१८. कां माझा विसरु पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥१॥ कैसा कंठूनीयां राहूं हा संसार । काय येक धीर देऊं मना ॥२॥ नाहीं निरोपाची पावली वारता । न करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥३॥ तुका म्हणे येक वेंचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥४॥

२८१९. कांहीं माझे कळों आले गुणदोष । म्हणोनी उदास धरिलें ऐसें ॥१॥ नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥२॥ कळावें तें मना आपुलीया सवें । ठाईंचें हें घ्यावें विचारूनी ॥३॥ तुका म्हणे मज अव्हेरिलें देवें । माझिया कर्तव्यें बुद्धिचिया ॥४॥

२८२०. नव्हे धीर कांहीं पाठऊं निरोप । आला तरी कोप येवो सुखें ॥१॥ कोपोनीयां तरी देईल उत्तर । जैसे तैसे पर फिराऊनी ॥२॥ नाहीं तया तरी काय येक पोर । मज तों माहेर आणिक नाहीं ॥३॥ तुका म्हणे असे तयामध्यें हीत । आपण निवांत असों नये ॥४॥

२८२१. आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥१॥ काय करूं आतां न गमेसें झालें । बहुत सोसिलें बहु दीसें ॥२॥ घर

लागे पाठीं चित्ता उभें वारें । आपुलें तें झुरे पाहावया ॥३॥ तुका म्हणे जीव गेला तरी जावो । धरिला तो देव भावें शुद्ध ॥४॥

२८२२. विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायांसीं केशवा सलगी केली ॥१॥ धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणें थोडी मति माझी ॥२॥ जेथें वेदां तुझा न कळेचि पार । तेथें मी पामर काय वानूं ॥३॥ जैसे तैसे माझे बोल अंगिकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवीतों ॥४॥ तुका म्हणे वीटेवरी जीं पाउलें । तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥५॥

२८२३. देवाच्याहि देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याती त्रिभुवनीं ॥१॥ पातकांच्या राशी नाशीतोसी नामें । जळतील कर्में महादोष ॥२॥ सर्व सुखें तुझ्या वोळंगती पाईं । रिद्धिसिद्धी ठाईं मुक्ति च्यारी ॥३॥ इंद्रासी दुर्लभ पावीजे तें पद । गीतीं गातां छंद वाहतां टाळी ॥४॥ तुका म्हणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥५॥

२८२४. काय झालें नेणों माझिया कपाळा । न देखीजे डोळां मूळ येतां ॥१॥ बहु दीस पाहें वचनाची आस । धरिलें उदास पांडुरंगा ॥२॥ नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तों निष्ठुर न पाहिजे ॥३॥ पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहुनि गोविंदा जरूरसा ॥४॥ तुका म्हणे आलें वेंचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तोही धाक ॥५॥

२८२५. येवढा संकोच तरी कां व्यालासी । आम्ही कोणापासीं तोंड वासूं ॥१॥ कोण मज पुसे शिणलें भागलें । जरी मोकलिलें तुम्हीं देवा ॥२॥ करुणाची आस पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥३॥ कोण जाणे माझें जीवींचें सांकडें । उगविल कोडें संकटाचें ॥४॥ तुका म्हणे तुम्हीं देखिली निश्चिंती । काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥५॥

२८२६. देईं डोळे भेटी न धरीं संकोच । न घाली कांहीं वेंच तुजवरी ॥१॥ तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतों थोडें ॥२॥ फार थोडें कांहीं करोनी पातळ । त्याजमध्यें काळ कडे लाऊं ॥३॥ आहे तेचि माझी सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥४॥ तुका म्हणे आम्हां लेंकरांची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥५॥

२८२७. शिण भाग हारे तेथींच्या निरोपें । देखिलीगां रूपें उरी नुरे ॥१॥ इंद्रियांचो धांव होईल कुंठित । पावेल हें चित्त समाधान ॥२॥ माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥३॥ आस नाहीं परी उरी बरी वाटे । आपुलें तें भेटे आपणासी ॥४॥ तुका म्हणे माझी अविट आवडी । खंडण तातडी होऊं नेदी ॥५॥

२८२८. धरितों वासना परी नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥१॥ तळमळीं चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहिचिया ॥२॥ प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥३॥ जातो तळा येतो मागुता लवकरी । वोळशाचे फेरी सांपडलों ॥४॥ तुका म्हणे बहु करितां विचार । उतरे डोंगर येक चढे ॥५॥

२८२९. कां माझे पंढरी न देखति डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥१॥ पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥२॥ कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पवती ॥३॥ कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्ति ॥४॥ तुका म्हणे कई जाऊनी मोटळें । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥५॥

२८३०. काय पोरें झालीं फार । किंवा न साहे करकर ॥१॥ म्हणऊनी केली सांडी । घांस घेउं न लाहे तोंडीं ॥२॥ करूं कलागती । तुज भांडणें भोंवतीं ॥३॥ तुका म्हणे टांचे । घरीं झालेंसें वरोचें ॥४॥

२८३१. कांहीं चिंतेवीण । नाहीं उपजत शीण ॥१॥ तरी हा पडिला विसर । माझा तुम्हां झाला भार ॥२॥ आली कांहीं तुटी । गेलि सुटोनीयां गांठीं ॥३॥ तुका म्हणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥४॥

२८३२. निरोपासी वेंचे । काय बोलतां फुकाचें ॥१॥ परी हें न घेवेंचि यश । भित्रों नको सुखी आस ॥२॥ सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥३॥ नलगे निरोपासी मोल । तुका म्हणे वेंचे बोल ॥४॥

२८३३. जोडीच्या हव्यासें । लागे धनाचेंच पिसें ॥१॥ मग आणिक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥२॥ पाहे रुक्याकडे । मग अवघें वोस पडे ॥३॥ तुका म्हणे देवा । तुला बहुतांचा हेवा ॥४॥

२८३४. मविलें मविती । नेणों राशी पडिल्या किती ॥१॥ परी तूं घालाचि न घासी । आले उभाउभीं घेसी ॥२॥ अवघ्या अवघा काळ । वाटा वाहती सकळ ॥३॥ तुका म्हणे नाहीं । आराणुक तुज कांहीं ॥४॥

२८३५. न बैससी खालीं । सम उभाची पाउलीं ॥१॥ ऐसे झाले बहुत दीस । झाली युगें अठ्ठावीस ॥२॥ नाहीं भाग शीण । आराणुक येक क्षण ॥३॥ तुका म्हणे किती । मापें केलीं देती घेती ॥४॥

२८३६. जोडी कोणासाठीं । येव्हडी करीतोसी आटी ॥१॥ जरी हें आम्हां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥२॥ करुनी जतन । कोणा देसील हें धन ॥३॥ आमुचे तळमळें । तुझें होईल वाटोळें ॥४॥ घेसील हा शाप । माझा होऊनियां बाप ॥५॥ तुका म्हणे उरी । आतां न ठेवीं यावरी ॥६॥

२८३७. करुनी चहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥१॥ जरी तूं होऊनी उदास । माझी बुडविसी आस ॥२॥ येथें न करी काम । मुखें नेघें तुझें नाम ॥३॥ तुका म्हणे कूळ । तुझें बुडवीन समूळ ॥४॥

२८३८. समर्थाचे पोटीं । आम्ही जन्मलों करंटीं ॥१॥ ऐसी झाली जगीं कीर्ति । तुझ्या नामाची फजिती ॥२॥ येथें नाहीं खाया । नये मूळ कोण्ही न्याया ॥३॥ तुका म्हणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥४॥

२८३९. पुढें तरि चिंता । काय येईल ते आतां ॥१॥ मज सांगोनियां धाडी । वाट पाहातों बराडी ॥२॥ कंठीं धरियेला प्राण । पायांपासीं आलें मन ॥३॥ तुका म्हणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥४॥

२८४०. कैचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थीर ॥१॥ जे या मनासी आवरूं । आतां पोटीं वाव धरूं ॥२॥ कैचि शुद्ध मती । भांडवल असें हातीं ॥३॥ तुका म्हणे आंगा । कोण दशा आली सांगा ॥४॥

२८४१. समर्पक वाणी । नाहीं ऐकीजेसि कानीं ॥१॥ आतां भावें करूं साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥२॥ न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥३॥ तुका म्हणे विनंती । विनविली धरा चित्तीं ॥४॥

२८४२. येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥१॥ घालोनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥२॥ पत्र हातीं दिल्हें । तया तेथें पाठविलें ॥३॥

तुका म्हणे येती । जाईन सामोरा पुढती ॥४॥

२८४३. रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥१॥ तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥२॥ पडे दंडकाठी । देह भलतिसवें लोटी ॥३॥ तुका म्हणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥४॥

२८४४. तुम्ही संतजनीं । माझी करा विनवणी ॥१॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥२॥ भाका बहुतां रिती । माझी कींव काकुळती ॥३॥ न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥४॥

२८४५. होईल कृपा दान । तरी मी येईन धाऊन ॥१॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचूं वाळवंटीं ॥२॥ रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥३॥ तुका म्हणे ताप । हरति देखोनियां बाप ॥४॥

२८४६. परीसोनी उत्तर । जाब देईजे सत्वर ॥१॥ जरी तूं होसी कृपावंत । तरी हा बोलावीं पतीत ॥२॥ नाणीं कांहीं मना । करुनी पापाचा उगाणा ॥३॥ तुका म्हणे नाहीं । काय शक्ती तुझे पायीं ॥४॥

२८४७. ऐकोनियां कीर्ति । ऐसी वाटते विश्रांति ॥१॥ माते सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥२॥ बोलतां या वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥३॥ तुका म्हणे धांवे । वासना ते रस घ्यावे ॥४॥

२८४८. किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥१॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥२॥ पुण्य होतें गांठीं । तरी कां लागती आटी ॥३॥ तुका म्हणे बळ । माजी राहिली तळमळ ॥४॥

२८४९. करील आबाळी । माझ्या दाताची कसाळी ॥१॥ जासी येखादा मरोन । पाठी लागले हे जन ॥२॥ घरीं लागे कलह । नाहीं जात तो शीतळ ॥३॥ तुका म्हणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥४॥

२८५०. आतां आशिर्वाद । माझा असो सुखें नांद ॥१॥ म्हणसी कोणे तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥२॥ दुरी दुरांतर । तरी घेसी समाचार ॥३॥ नेसी कधीं तरी । तुका म्हणे लाजे हरी ॥४॥

२८५१. आतां हें शेवटीं । माझी आईकावी गोष्टी ॥१॥ आतां द्यावा वचनाचा । जाब कळे तैसा त्याचा ॥२॥ आतां करकर । पुढें न करीं उत्तर

॥३॥ तुका म्हणे ठसा । तुझा आहे राखें तैसा ॥४॥

२८५२. बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥१॥ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माये ॥२॥ स्तुति निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥३॥ तुका म्हणे लाड । दिल्हा तैसा पुरवा कोड ॥४॥

---

वारकरी परत येई पर्यंत मनाची स्थिति

२८५३. माहेरींचा काय येईल निरोप । म्हणउनि झोंप नाहीं डोळां ॥१॥ वाट पाहे आस धरूनियां जीवीं । निढळा हें ठेवी वरी बाहे ॥२॥ बोटावरी माप लखीतो दिवस । होतों कासाविस धीर नाहीं ॥३॥ काय नेणों संतां पडिला वीसर । कीं नव्हे सादर मायबाप ॥४॥ तुका म्हणे तेथें होईल दाटणी । माझे कोण आणी मना तेथें ॥५॥

२८५४. परी तो हा आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥१॥ बहु कान दृष्टी अईके देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥२॥ सांगितल्यावीण जाणे अंतरींचे । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥३॥ बहु मुखें कीर्ति आयकिली कानीं । विश्वासही मनीं आहे माझ्या ॥४॥ तुका म्हणे नाहीं जात वायां-वीण । पाळितों वचन बोलिलों तें ॥५॥

२८५५. यावरी न कळे संचित आपुलें । कैसें वोढवलें होईल पुढें ॥१॥ करील विक्षेप धाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तातडी हे ॥२॥ जोंवरी हें डोळां देखे वारकरी । तों हे भरोवरी करीं चित्त ॥३॥ आस वाढविते बुद्धीचे तरंग । चित्ताचे ते वेग वावडती ॥४॥ तुका म्हणे तेव्हां होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥५॥

२८५६. होईल निरोप घेतला यावरी । राउळा भीतरीं जाउनियां ॥१॥ करूनियां दधि मंगल भोजन । प्रयाण शकुन सुमुहूर्तें ॥२॥ होतील दाटले सद्गदित कंठीं । भरतें या पोटीं वियोगाचें ॥३॥ परयेरा भेटी क्षेम आलिं-गनें । केलीं समाधानें होतीं संतीं ॥४॥ तुका म्हणे चाली न साहे मनास । पाहाती कळस परतोनी ॥५॥

२८५७. ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येत वारकरी होते वाटे ॥१॥ देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनीयां ॥२॥ केली

आयकीली होईल जे कथा । राहिलें तें चित्ता होईल प्रेम ॥३॥ गरुडटके टाळ मृदंग पताका । सांगताती येका येक सुख ॥४॥ तुका म्हणे आतां येती लवलाहीं । आलिंगुनी बाहीं देईन क्षेम ॥५॥

२८५८. क्षेम मायबाप पुसेन मी आधीं । न घालीं हें मधीं सुख-दुःख ॥१॥ न करिं तांतडी आपणांपासुनी । आइकेन कानीं सांगती तें ॥२॥ अंतरींचें संत जाणतील गुज । निरोप तो मज सांगतील ॥३॥ पायांवरी डोई ठेवीन आदरें । प्रीतिपडिभरें आलिंगून ॥४॥ तुका म्हणे काया करीन कुरवंडी । वोवाळोनी सांडीं त्यावरूनी ॥५॥

२८५९. होईल माझी संतीं भाकिली करुणा । जे त्या नारायणा मनीं बैसे ॥१॥ शृंगारूनी माझीं बोबडीं उत्तरें । होतील विस्तारें सांगितलीं ॥२॥ क्षेम आहे ऐसें होईल सांगितलें । पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ॥३॥ अवस्था जे माझी ठावी आहे संतां । होईल कृपावंता निरोपिली ॥४॥ तुका म्हणे सर्वे येईल मुऱ्हाळी । किंवा कांहीं उरी राखतील ॥५॥

२८६०. दोहींमध्यें येक घडेल विश्वासें । भातुकें सरिसें मूळ तरी ॥१॥ करिती निराशा निःशेष न घडे । कांहीं तरी वोढे चित्त माये ॥२॥ लौकिकाची तरी धरितील लाज । काय माझ्या काज आचरणें ॥३॥ अथवा कोणाचें घेणें लागे रीण । नाहीं तरी हीन कर्मी कांहीं ॥४॥ व्यालीचिये अंगीं असती वेदना । तुका म्हणे मना मन साक्ष ॥५॥

२८६१. बैसतां कोणापें नाहीं समाधान । विवरे हें मन तेचि सोई ॥१॥ घडी घडी मज आठवे माहेर । न पडे विसर क्षणभरी ॥२॥ न बोलावें ऐसा करितों विचार । पडतो विसर प्रसंगीं तो ॥३॥ इंद्रियांसी वाहो पडली ते चाली । होती विसांवली येचि ठाईं ॥४॥ येकसरें सोस माहेरासी जावें । तुका म्हणे जीवें घेतलासे ॥५॥

२८६२. नाहीं हानी परी न राहावे निष्ठुर । न पडे विसर काय करूं ॥१॥ पुसावींसे वाटे मात कापडिया । पाठविती न्याया मूळ मज ॥२॥ आणिक या मना नावडे सोहळा । करितें टकळा माहेरींचा ॥३॥ बहु कामें केलीं बहु कासावीस । बहु झाले दीस भेटी नाहीं ॥४॥ तुका

म्हणे त्याचे न कळे अंतर । अवस्था ते फार होते मज ॥५॥

२८६३. तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥१॥ कोणाचिये मुखें तंट नाहीं मागें । वचन वाउगें बोलूं नये ॥२॥ दिसे हानी परि निराश न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥३॥ आपुलिया भोगें होईल उशीर । तोंवरी कां धीर केला नाहीं ॥४॥ तुका म्हणे गोड करील शेवट । पाहिली ते वाट ठावी आहे ॥५॥

२८६४. माहेरींचें आलें तें मज माहेर । सुखाचें उत्तर करीन त्यांसी ॥१॥ पायांवरी माथा आलिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥२॥ सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पर्वकाळ आहे त्यास ॥३॥ आपुले जिवींचें सुखदुःख भावें । सांगेन आघवें आहे तैसें ॥४॥ तुका म्हणे वीट नेघे आवडीचा । बोललीच वाचा बोलवीन ॥५॥

२८६५. वियोग न घडे सन्निध वसलें । अखंड राहिलें होय चित्तीं ॥१॥ विसरून पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पंथें ॥२॥ कामाचा विसर नाठवे शरीर । रसना मधूर नेणे फिकें ॥३॥ निरोपासी काज असो अनाभीक । निवडितां येक नये मज ॥४॥ तुका म्हणे हित चित्तें वोढियेलें । जेथें तें उगलें जावें येणें ॥५॥

२८६६. आतां माझे सखे येती वारकरी । जीवा आस थोरी लागलीसे ॥१॥ सांगतील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरीचा ॥२॥ काय लाभ झाला काय होतें केणें । काय काय कोणें सांठविलें ॥३॥ मागणें तें काय धाडिलें भातुकें । पुसेन तें सुखें आहेतसीं ॥४॥ तुका म्हणे काय सांगती ते कानीं । आईकोनि मनीं धरुनि राहें ॥५॥

२८६७. काय करावें म्यां केलें ते विचार । घडेल साचार काय पाहों ॥१॥ काय मन नाहीं धरित आवडी । प्रारब्धें जोडी तेचि खरी ॥२॥ काय म्यां तेथींचें रांधिलें चाखोनी । तें हें करी मनीं विवंचना ॥३॥ आणिकहि त्यासी बहुत कारणें । बहु असे जिणें वोढींचेंहि ॥४॥ तुका म्हणे आम्हां बोळविल्यावरी । परती माघारीं केलीं नाहीं ॥५॥

२८६८. आम्हां अराणूक संवसारा हातीं । पडली नव्हती आजी-

वरी ॥१॥ पुत्रदाराधन होता मनीं धंदा । गोविंयेलों सदा होतों कामें ॥२॥ वोढवलें ऐसें दिसतें कपाळ । राहिलें सकळ आवरोनी ॥३॥ मागें पुढें कांहीं न दिसे पाहातां । तेथुनिया चिंता उपजली ॥४॥ तुका म्हणे वाट पाह्याचें कारण । तेथींचिया हीन झालें भाग्य ॥५॥

२८६९. बहु दिवस नाहीं माहेरींची भेटी । झाली होती तुटी व्यवसायें ॥१॥ आपुलाल्या होतों गुंतलों व्यासंगें । नाहीं त्या प्रसंगें आठवलें ॥२॥ तोडिलें तुटतें जडित जडलें । आहे तें आपुलें आपणावें ॥३॥ बहु निरोपाचें पावलें उत्तर । जवळीच फार येऊ तेंहि ॥४॥ काय जाणों मोहो होईल सांडिला । बहु दीस तुटला तुका म्हणे ॥५॥

२८७०. होतीं नेणों झालीं कठिण कठाण । जवळीच मनें मन ग्वाही ॥१॥ आम्ही होतों सोई सांडिला मारग । घडलें तें मग तिकुनहि ॥२॥ निश्चितीनें होती पुढीलाची सांडी । न चाली ते कोंडी मायबापा ॥३॥ आम्हां नाहीं त्याचा घडला आठव । त्याचा बहु जीव विखुरला ॥४॥ तुका म्हणे झालें धर्माचें माहेर । पडिलें अंतर आम्हा कूनी ॥५॥

२८७१. आतां कां करावा सोस वायांवीण । लटिकाचि शीण मनासी हा ॥१॥ असेल तें कळों येईल लवकरी । आतां वारकरी आल्यापाठीं ॥२॥ बहु विलंबाचें सन्निध पातलें । धीराचें राहिलें फळ पोटीं ॥३॥ चालिलें तें ठाव पावेल शेवटीं । पुरलिया तुटी पाउलाची ॥४॥ तुका म्हणे आशे लागलासे जीव । म्हणउनी कींव भाकितसें ॥५॥

वारकरी परत आल्यानंतरचे अभंग

२८७२. भागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥१॥ तुम्ही क्षेम कीं सकळ । बाळ अवघे गोपाळ ॥२॥ मारगीं चालतां । श्रमलेती येतां जातां ॥३॥ तुका म्हणे कांहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥४॥

२८७३. घालूनियां ज्योती । वाट पाहे दिवसराती ॥१॥ बहु उतावीळ मन । तुमचें व्हावें दरुशन ॥२॥ आलों बोळवीत । तेथें याचि पंथें चित्त ॥३॥ तुका म्हणे पेणी । येतां जातां दिवस गणी ॥४॥

२८७४. आजि दिवस धन्य । तुमचें झालें दरुशन ॥१॥ सांगा माहेरींची

मात । अवघा विस्तार वृत्तांत ॥२॥ आईकतों मनें । करुनि सादर श्रवणें ॥३॥ तुका म्हणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥४॥

२८७५. बोललीं तीं काय । माझा बाप आणि माय ॥१॥ ऐसें सांगा जी झडकरी । तुम्हीं सखे वारकरी ॥२॥ पत्राचें वचन । काय दिल्हें फिरवोन ॥३॥ तुका म्हणे कांहीं । मना आणिलें कीं नाहीं ॥४॥

२८७६. काय पाठवीलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥१॥ आशे लागलासे जीव । काय केली माझी कींव ॥२॥ फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥३॥ तुका म्हणे सांगा । कैसें आर्त पांडुरंगा ॥४॥

२८७७. आजीचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी झालें मन कल्पवेना॥१॥ आर्तभूत माझा जीव जयासाठीं । त्याच्या झाल्या भेटी पायांसवें ॥२॥ वाटुली पाहतां शीणले नयन । बहु होतें मन आर्तभूत ॥३॥ माझ्या निरोपावें आणिलें उत्तर । होईल साचार सांगती तो ॥४॥ तुका म्हणे भेटी निवारीला ताप । फळलें संकल्प संत आले ॥५॥

२८७८. आजि बरवें झालें । माझें माहेर भेटलें ॥१॥ डोळां देखिले सज्जन । निवारला भाग शीण ॥२॥ धन्य झालों आतां । क्षेम देवोनियां संतां ॥३॥ इच्छेचें पावलों । तुका म्हणे धन्य झालों ॥४॥

२८७९. वोरसोनि येती । वत्स धेनुवेच्या चित्तीं ॥१॥ माझा करावा सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥२॥ स्नेह भूक ताहान । विसरती झाले शीण ॥३॥ तुका म्हणे कवतुकें । दिल्हें प्रेमाचें भातुकें ॥४॥

२८८०. आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाईन वोव्या॥१॥ सांगितला आधीं आईकें निरोप । होईल माझा बाप पुसे तो तें ॥२॥ तुका म्हणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरींहुनी आजी ॥३॥

२८८१. अमूप जोडिल्या सुखाचिया राशी । पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥१॥ काय सांगों सुख झालें आलिंगनें । निवाली दर्शनें कांति माझी ॥२॥ तुका म्हणे याच्या उपकारासाठीं । नाहीं माझें गांठीं कांहीं येक ॥३॥

२८८२. पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें॥१॥ जोडूनि हस्तक करीन विनवणी । घेईन पायवणी धुवोनियां ॥२॥ तुका म्हणे

माझें भांडवल सुचें । संतां हें ठाईंचें ठावें आहे ॥३॥

२८८३. मना येक करीं । म्हणे मी जाईन पंढरी । उभा विटेवरी । तो पाहीन सांवळा ॥१॥ करीन सांगसी तें काम । जरी जपसी हें नाम । नित्य वाचे राम । हरि कृष्ण गोविंद ॥२॥ लागे संतांचिया पायां । कथे उल्हास गावया । आलों मागावया । शरण देईं उचित ॥३॥ नाचे रंगीं वाहे टाळी । होय सादर ते काळीं । तुका म्हणे मळी । सांडूनियां अंतरींची ॥४॥

२८८४. न राहे क्षण येक वैकुंठीं । क्षीरसागर त्रिपुटीं । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवुनी ॥१॥ भाविक गे माये । भोळे गुणाचे । आवडे तयाचें । नाम घेतां तयासी ॥२॥ जो नातुडे कवणियेपरी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । राम कृष्ण गोविंद ॥३॥ चौदा भुवनें जया पोटीं । राहे भक्ताचिये कंठीं । धरुनियां साटी । चित्त प्रेम दोहींचीं ॥४॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेउनी आपणा ॥५॥ ऐसा भक्तांचा हा ऋणी । पाहातां आगमीं पुराणी । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥६॥

२८८५. स्वल्प वाटे चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥१॥ तुम्ही आम्ही खेळीमेळीं । गदारोळि आनंदें ॥२॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगारूं निकें करुनी ॥३॥ तुका म्हणे हेचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥४॥

२८८६. आनंदाच्या कोटी । सांठवल्या आम्हां पोटीं ॥१॥ प्रेम चालिला प्रवाहो । नाम ओघ लवलाहो ॥२॥ अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥३॥ थडी आहिक्य परत्र । तुका म्हणे सम तीर ॥४॥

२८८७. चाहाडाची माता । व्यभिचारिणी तत्त्वता ॥१॥ पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुणें ॥२॥ जाणो त्याचे वाचें । कांहीं सोडिलें गांठींचें ॥३॥ तुका म्हणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥४॥

२८८८. सापें ज्यासी खावें । त्यानें प्राणामी मुकावें ॥१॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंके जन ॥२॥ विंचू हाणी नांगी । अग्नि लावी आणिका अंगीं ॥३॥ तुका म्हणे जाती । नरका पाउलीं चालती ॥४॥

२८८९. खडा खाली साखर । झाला नामाचाचि फेर । न दिसे अंतर ।

गोडी ठाईं निवडितां ॥१॥ तुम्ही आम्ही पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा । चाळविलें जगा । मी हें माझें यासाठीं ॥२॥ पाईं हातीं शिरीं । हेम राहे अलंकारीं ॥३॥ मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥४॥ निजेलिया लाभ हानी । तोंचि खरी ते स्वप्नीं । तुका म्हणे दोन्ही । निवारिलीं जागतां ॥५॥

२८९०. आम्ही जाणों तुझा भाव । कैंचा भक्त देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥१॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आम्ही आप । आपणासी देखिलें ॥२॥ येके ठाईं घरिंच्या घरीं । न कळतां झाली चोरी । तेथें तेचि दुरी । जाणें येणें खुंटलें ॥३॥ तुका म्हणे धरूनी हातीं । उरीं ठेविली मागुती । येकांती लोकांतीं । देवभक्तसोहळा ॥४॥

२८९१. कांहीं बोलिलों बोबडें । मायबापा तुम्हां पुढें । सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥१॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा । आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥२॥ घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न भ्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुम्हांसी ॥३॥ तुका म्हणे देवा । प्रेम लोभ न सांडावा । पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥४॥

२८९२. बहु भितों जाणपणा । आड न यो नारायणा । घेईन प्रेम पान्हा । भक्तिसुख निवाडें ॥१॥ यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं । काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥२॥ निमिषार्ध संतसंगति । वास वैकुंठीं कल्पांतीं । मोक्षपदें येती । ते विश्रांति बापुडी ॥३॥ तुका म्हणे हेंची देईं । मीतूंपणा खंड नाहीं । बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥४॥

२८९३. देवा आतां ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पाडीं मज ॥१॥ तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥२॥ ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ॥३॥ आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध याचा माझा ॥४॥ मागणें तें येक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतां संग देईं ॥५॥ तुका म्हणे नको वरपंग देवा । घ्यावी माझी सेवा भावशुद्ध ॥६॥

२८९४. तुज न करितां काय नव्हे येक । हें तों सकळीक संतवाणी

॥१॥ घेई माझा भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥२॥ उचित अनुचित पापपुण्यकाला । हे तों नये मला निवडीतां ॥३॥ कुंठित राहिली बोलतां बोलतां । पार न पवता वाणी पुढें ॥४॥ पुसतांहि कोणा न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा ॥५॥ तुका म्हणे बहु पाहिलें या जीवें । वर्म झालें ठावें नाम तुझें ॥६॥

२८९५. मज त्याची भीड नुल्लंघवे देवा । जो म्हणे केशवा दास तुझा ॥१॥ मज आवडती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥२॥ सांडोनियां लाज नाचेन त्यांपुढें । आयकती कोडें नाम तुझें ॥३॥ नलगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांचे घरीं उष्टावळी ॥४॥ तुका म्हणे जाणों उचित अनुचीत । विचारूनी हीत तेंचि करूं ॥५॥

२८९६. जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥१॥ चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सर्व माझा ॥२॥ बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केला देवा ॥३॥ अवघे जन मज केले लोकपाळ । सोईरे सकल प्राणसखे ॥४॥ तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतरबाहीं ॥५॥

२८९७. तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥१॥ आम्हा अंधा तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥२॥ मन स्थीर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥३॥ पापपुण्य भेद नाशिलें तिमिर । त्रिगुण शरीर सांडियेलें ॥४॥ तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥५॥

२८९८. झालें पीक आम्हां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ॥१॥ झाली आराणूक अवघियांपासून । अवघा गेला शीणभाग आतां ॥२॥ अवघा झाला आम्हां येक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥३॥ अवघेचि आम्ही त्यालों अलंकार । शोभलोंही फार अवघ्यावरी ॥४॥ तुका म्हणे आम्ही सदैवाचे दास । करणे नलगे आस आणिकांची ॥५॥

२८९९. साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण सेवकें स्वामिसत्ता ॥१॥ प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्म रसें अलिप्त त्या ॥२॥

सांगणें तें नाहीं करणें आपण । मोलाहि वचन वाड झालों ॥३॥ तुका म्हणे आम्हां भांडवल हातीं । वेरझारा खाती केवढिये ॥४॥

२९००. शुभ झाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥१॥ हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखीजे कैसी आहे तेही ॥२॥ सुखदुःखाहुनि नाहीं विपरीत । देतील आघात हीत फळें ॥३॥ तुका म्हणे आतां आम्हांसी हे भले । अवघेचि झाले जीव जंत ॥४॥

२९०१. पापपुण्य दोन्ही वाहती मारग । स्वर्ग नर्कभोग यांचीं पेणीं ॥१॥ येक आड येक नलगे पुसावें । जेविल्या देखावें मागें भूक ॥२॥ राहाटीं पडिलें भरोनियां रीतीं । होतील मागुतीं येती जाती ॥३॥ तुका म्हणे आम्ही खेळतों या मधीं । नाहीं केली बुद्धी स्थीर पाहों ॥४॥

२९०२. आमुचीं जिवलगे सज्जन सोयरीं । नांदतील तीरीं भीवरेच्या ॥१॥ तींच माझ्या चित्तीं वसे दिवमराती । भेटावया खंती वाटतसे ॥२॥ संपदा सोहळे सर्व सुख वसे । वैकुंठीं जें नसे सुखरासी ॥३॥ ज्याच्या नामें पापदुःख नासे भय । विठ्ठल बाप माय रखुमाई ॥४॥ माझा जीव जातो अमृत ते कळा । कंठीं वेळोवेळां ध्यात असें ॥५॥ तुका म्हणे वाट पाहातां शीणले । त्या पंथें डोळ्ले पंढरीच्या ॥६॥

२९०३. न्यावयासी मूळ पाठवाल कधीं । मज कृपानिधी पांडुरंगा ॥१॥ प्राण फुटे माझा त्याचिया वियोगें । घडि जाय युगें येकी येकी ॥२॥ त्याचिये गांवींची आवडती जीवा । जीव हा सांडावा वोवाळुनी ॥३॥ दिनोदिन चिंता वाटते बहुत । नावडे संचित करावें हें ॥४॥ तुका म्हणे आतां आहे तेंचि सरो । कोण करी भरोवरी मग ॥५॥

२९०४. पाळिला विध तो आजि फळा आला । ऐसा हा कळला साच भाव ॥१॥ नामाची आवडी लागलीसे चित्ता । पाय आठवितां सुख वाटे ॥२॥ धरिल्या देहाचें साधलें कारण । पुढिल्या खंडण गर्भवासा ॥३॥ तुका म्हणे लाभ झाला येकसरें । आणिक दुसरें नाहीं आतां ॥४॥

२९०५. हीत तें हें येक राम कंठीं राहे । नाठवीती देहभाव देही ॥१॥ हाचि येक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्म केलें महा ॥२॥ चित्त

राहे पाईं रुप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥३॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ॥४॥

२९०६. माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडिची धणी फेडावया ॥१॥ आवडे ज्या हरि अंतरापासुनी । ऐसीयाचे मनीं आर्त माझे ॥२॥ तयालागीं जीव होतो कासावीस । पाहतील वास नयन हे ॥३॥ सुफळ हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवासी ॥४॥ तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा । गाऊंया गोपाळा धणिवरी ॥५॥

२९०७. आमुचें जीवन हें कथा अमृत । आणिकही संतसमागम ॥१॥ सारूं येके ठाईं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥२॥ धालिया ढेंकर येती आनंदाचे । ओसंडलें वाचे प्रेमसुख ॥३॥ पिकलें स्वरूप आलिया घुमरी । राशि ते अंबरीं न समाये ॥४॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका म्हणे ॥५॥

२९०८. जोडलें तें आतां न सरे सारीता । जीव बळी देतां हाता आलें ॥१॥ संचित सारुनी बांधलें धरणें । तुंबिलें जीवन साक्षेपें हे ॥२॥ शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाही येक झालें ॥३॥ बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघे नासे ॥४॥ तुका म्हणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाची परवडी होती जाती ॥५॥

२९०९. भक्ति भाव आम्ही बांधलासे गांठी । सादावितों हटीं घ्या रे कोणी ॥१॥ सुखाचेयि पेठे घातलें दुकान । मांडियेलें वाण रामनाम ॥२॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया भवपार सिंधु ॥३॥ मागें भाग्यवंत झाले थोर थोर । तिहीं केला फार हाचि सांठा ॥४॥ खोटे कुडें तेथें नाहीं घातपात । तुका म्हणे चित्त शुद्ध करीं ॥५॥

२९१०. पर्जन्यें पडावें आपल्या स्वभावें । आपुल्याला दैवें पिके भूमी ॥१॥ बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभ हानि तुटी ज्याची तया ॥२॥ दीपाचिये अंगीं नाहीं दुजा भाव । धणि चोर साव सारिखाची ॥३॥ काउळे ढोपरा कंकर तितीरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥४॥ तुका म्हणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जया तैसा ॥५॥

२९११. धीर तो कारण येकविध भावो । पतिव्रते नाहो सर्वभावें ॥१॥ चातक हे जळ न पाहाती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥२॥ सूर्यविकाशिनी नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥३॥ धेनु येऊं नेदी जवळी आणिका । आपुल्या बाळकावीण वत्सा ॥४॥ तुका म्हणे नेम प्राणा सर्वे साटी । तरीच माझ्या गोष्टी विठोबाच्या ॥५॥

२९१२. नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥१॥ आणिकें दुराविली करितां खटपट । वाउगा बोभाट वर्माविणें ॥२॥ रामनामीं जीहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥३॥ तुका म्हणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥४॥

२९१३. वैष्णवांची कीर्ति गाईली पुराणीं । साहि अठराजणीं चहुं वेदीं ॥१॥ ऐसे कोणी दावा ग्रंथाचे वाचक । कर्मिष्ठ धार्मिक पुण्यशीळ ॥२॥ आदिनाथ शंकर नारद मुनेश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥३॥ तुका म्हणे मुकुटमणि हरिभक्ति । आणिक विश्रांति आरतीया ॥४॥

२९१४. बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुम्हां ठावें जाती कूळ ॥१॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरी ॥२॥ वाचेचा चाळक झाला दावि वर्म । उचित तें धर्म मजपुढें ॥३॥ तुका म्हणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पाईं ॥४॥

२९१५. संतांच्या घरींचा दास मी कामारी । दारीं परवारीं लोळतसे ॥१॥ चरणीचे रज लागती अंगास । तेणें बेताळीस उद्धरती ॥२॥ उच्छिष्ट हें जमा करुनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥३॥ तुका म्हणे मी आणिक विचार । नेणें हेंचि सार मानीतसे ॥४॥

२९१६. येक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥१॥ कां रे तृष्णा वाढविशी । बांधऊनि मोहपाशीं ॥२॥ औट हात तुझा जागा । येर शीणसी वाउगा ॥३॥ तुका म्हणे श्रम । येक विसरतां राम ॥४॥

२९१७. आले भग इचे पेठे । पुढें मागुती न भेटे ॥१॥ होसी फजिति वरपडा । लक्ष चौऱ्यांशींचा वेढा ॥२॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगीतां आघात ॥३॥ येका पाऊलाची वाट । कोणा सांगावा बोभाट ॥४॥

जुंतीजेसी घाणा । नाहीं मारित्या करुणा ॥५॥ तुका म्हणे हित पाहें । जोंवरी हें हातीं आहे ॥६॥

२९१८. लाभ झाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नाशी । मनुष्यदेहा ऐशी । उत्तम जोडी जोडली ॥१॥ घेई हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । झालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥२॥ घेवोनियां माप हातीं । काळ गोवी दिवस राती । चोर लाग घेती । पुढें तैसें पळावे ॥३॥ हीत सावकाशें । म्हणे करीन तें पिसें । हातीं काय ऐसें । तुका म्हणे नेणसी ॥४॥

२९१९. सुखाचें ओतीलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥१॥ मनीं धरिला अभिलाष । मिठी घातली पायांस ॥२॥ हांतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥३॥ तुका म्हणे झाला । लाभें लाभ दुणावला ॥४॥

२९२०. झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कैंचा ॥१॥ जो हें माप तोंडीं धरी । सळे झाली ते अवसरीं ॥२॥ झाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥३॥ तुका म्हणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥४॥

२९२१. आम्ही बोलों तें तुज कळे । येक दोहीं ठाईं खेळे ॥१॥ काय परीहाराचें काम । जाणे अंतरीचें राम ॥२॥ कळोनियां काय चाड । माझी लोकासी बडबड ॥३॥ कारण सर्व येका । अवघें आहे म्हणे तुका ॥४॥

२९२२. उमटतें ठाईं । तुझे निरोपावे पाईं ॥१॥ आम्हीं करावें चिंतन । तुझें नामसंकीर्तन ॥२॥ भोजन भोजनाचे काळीं । मागों करूनीयां आळी ॥३॥ तुका म्हणे माथां । भार तुझ्या पंढरिनाथा ॥४॥

२९२३. केला पण सांडी । ऐसीयासी म्हणती लंडी ॥१॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥२॥ आपला नीवाड । आपणाचि करितां गोड ॥३॥ तुम्ही आम्ही देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥४॥ असे धुरे उगें । मागें सरे तुका म्हणे ॥५॥

२९२४. न व्हावें तें झालें । आम्हां तुम्हांसी लागलें ॥१॥ आतां हालमाफलमें । भांडोनियां काढूं वर्में ॥२॥ पाटोळ्यासर्वेसाटीं । दिल्ही रकट्याची गांठी ॥३॥ तुका म्हणे हरी । आणोनियां करीन सरी ॥४॥

२९२५. पतित मीराशी । ते म्यां धरीलें जीवेसी ॥१॥ आतां बळिया सांग कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥२॥ पावनाचा ठसा । दावी मज तुझा कैसा ॥३॥ तुका म्हणे वाव झालें । रोख पाहिजे दाविलें ॥४॥

२९२६. करितां वेरझारा । उभा न राहासी वेव्हारा ॥१॥ हे तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥२॥ आरोगोनी मुग । बैसलासी जैसा बग ॥३॥ तुका म्हणे किती । बुडविली आळविती ॥४॥

२९२७. नाहीं घेणें देणें । गोवा केला अभिमानें ॥१॥ आतां कांहो निवडूं नेदा । पांडुरंगा येवढा धंदा ॥२॥ पांचांमधीं जावें । थोड्यासाठीं फजित व्हावें ॥३॥ तुज ऐसी नाहीं । पांडुरंगा आम्ही कांहीं ॥४॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥५॥ तुका म्हणे आतां । निवडूं संतां हें देखितां ॥६॥

२९२८. सिंचन करितां मूळ । वृक्ष वोल्हावे सकळ ॥१॥ नको पृथकाचे भरी । पडों येकमूळ धरीं ॥२॥ पानचोऱ्याचें तें द्वार । वरिल दाटावें तें थोर ॥३॥ वैश्य झाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥४॥ येक आतुडे चिंतामणी । फिटे सर्व सुखाधनी ॥५॥ तुका म्हणे धांवा । आहे पंढरि विसावा ॥६॥

२९२९. करूं याची कथा नामाचा गजर । आम्हां संवसार काय करी ॥१॥ म्हणऊं हरीचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तया भेणें कळिकाळ ॥२॥ आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥३॥ तुका म्हणे करूं ऐमीयाचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥४॥

२९३०. काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बकाचें ॥१॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥२॥ काय उंदिर नाहीं धांवी । राख लावी गाढव ॥३॥ तुका म्हणे सुसर जळीं । काउळीं कां न नाहाती ॥४॥

२९३१. मदें मातले ते नागवेची नाचे । अनुचित वाचे बडबडी ॥१॥ आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥२॥ आले अंगासी तें बळीवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्म नीत ॥३॥ तुका म्हणे कळों येईल तो भाव । अंगावरी घाव उमटती ॥४॥

२९३२. भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती कौतुकें धणीवरी ॥१॥ इच्छितील तैसा नाचे त्यांच्या छंदे । वंदिती ते पदें सकुमार ॥२॥ विसरले मुक्ति भक्ति अभिलाषें । वोढत सरिसे सुखा आले ॥३॥ तुका म्हणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यास विसंबना ॥४॥

२९३३. भक्त समागमें सर्व भावें हरी । सर्व काम करी न सांगतां ॥१॥ सांठवला राहे हृदयसंपुटीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभी ॥२॥ मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥३॥ तुका म्हणे जीव भाव देवा पाईं । ठेऊनियां कांहीं न मागती ॥४॥

२९३४. प्रेमामृतें रसना वोल्हावली । मनाची राहिली वृत्ति पाईं ॥१॥ सकळहि तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥२॥ सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप । वोतलें स्वरूप माजीं तया ॥३॥ तुका म्हणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥४॥

२९३५. कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्याचें उणें असे ॥१॥ काय पाप पुण्य पाहों आणिकाचें । मज काय त्याचें उणें असे ॥२॥ नष्टदुष्टपण कवणाचें वानूं । तयाहुनि अनु अधिक माझें ॥३॥ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिया ॥४॥ तुका म्हणे मी भांडवलापुरता । तुज पंढरिनाथा लावियेलें ॥५॥

२९३६. काळ जवळीच उभा नेगा । घाली झांपडी खुंटी काना ॥१॥ कैसा हुशार सावध राही । आपुला तो आपुले ठाईं ॥२॥ काळ जवळी उभा पाही । नेदी कोणासी देऊं कांहीं ॥३॥ काळें पुरविली पाठी । वरुषें झालीं जरी साठी ॥४॥ काळ भोंवताला भोंवे । रामा येऊं नेदी जिव्हे ॥५॥ तुका म्हणे काळा । कर्म भिळतें तें जाळा ॥६॥

२९३७. दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्य लाभ पुण्य त्याचें ॥१॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरकां आणिकां वारी ॥२॥ मळ खावया संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥३॥ तुका म्हणे त्याचा । प्रीति आदर करा साचा ॥४॥

२९३८. साहोनियां टाकी घाय । पाषाण देव झाला पाहें ॥१॥ तया

रीती दृढ मन । करी साधाया कारण ॥२॥ बाण् शस्त्रा साहे गोळी । शूर ठाव उंच स्थळीं ॥३॥ तुका म्हण सती । अग्नि न देखें ज्या रीती ॥४॥

२९३९. तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें मानावया जग आत्मपणें । नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें । भय मोह लज्जा निरसीली शंका । अवघी येकाचि पणें । विठ्ठलाचे पाईं बैसोनि राहिली । भागली नुठीत तेणें ॥१॥ आतां त्यासि काय चाले माझें बळ । झालोंसें दुर्बळ सत्त्वहीन । दग्ध पट दिसे दुरुनि बरवंट । काय त्याचें कारण ॥२॥ आळसें दृष्टी न पाहे आपुलें । येकचि देखिलें सर्व रूप । मानामान तेथें खुंटोनि राहिले । पिशुन तो कोण बाप । ज्योति ना अंधार । अवघा येकंकार । तेथें काय पुण्यपाप । विठ्ठलावांचूनि कांहींच नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥३॥ बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया । सुखदुःखाचि वार्ता नाइकें । अंतरलों दूरी तया । मीतूंपण निष्काम होऊनी । राहिलों आपुल्या ठायां । तुजवीण आतां मज नाहीं कोणी । तुका म्हणे देवराया ॥४॥

२९४०. कथा पुराणें ऐकतां । झोंपे नाथिलें तत्त्वता । खाटेवरी पडतां । व्यापी चिंता तळमळी ॥१॥ ऐसी गहन कर्मगती । काय तयासी रडती । झाले जाणते जे चित्तीं । कांहीं नेवे आपुला ॥२॥ उदक लावितां न धरे । चिंता करी केव्हां सरे । जाऊं नका धीरे । म्हणे करितां टवाळ्या ॥३॥ जवळी गोचीड क्षीरा । जैसी कमळणी दुर्दरा । तुका म्हणे दूरा । देशत्याग तयासी ॥४॥

२९४१. संदेह बाधक आपआपणयातें । रज्जु सर्पवत भासतसे । भेवोनियां काय देखिलें येणें । घायविण कैसें लोळतसे ॥१॥ आपणाचि तारी आपणाचि मारी । आपणाचि उद्धरि आपणया । शुकनळिकेन्यायें गुंतलासि काय । विचारूनि पाहें मोकळ्या ॥२॥ पापपुण्य कैसें भाजिलें अंक । दशकाचा येक उरविला । जाणोनियां काय होतोसि नेणता । शून्याचा ठाव रिता नाहीं नाहीं ॥३॥ दुरा दृष्टी पाहे न्याहाळुनि । मृगजळा पाणी न म्हणे घाडा । धांवतांचि फुटे नव्हे समाधान । तुका म्हणे जाण पावे पीडा ॥४॥

२९४२. कथे उभा आंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा

॥१॥ येथें तो पातकी न येतांचि भला । रणीं कुचराला काय चाले ॥२॥ कथें बैसोनि आणिक चरचा । धिक त्याची वाचा कुंभपाक ॥३॥ तुका म्हणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साचे मध्यभागीं ॥४॥

२९४३. नावडे ज्या कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बऱ्या वोजा ॥१॥ तो असे जवळी गोचिड्याचे न्यायें । देशत्यागे ठाय तया दूरी ॥२॥ नव्हे भला कोणी नावडे दूसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥३॥ तुका म्हणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥४॥

२९४४. जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥१॥ कैसा पाहे चंद्रीदृष्टी । दीप स्नेहाचा शेवटीं ॥२॥ कांतेलेंसे श्वान । दाही दिशा हिंडे मन ॥३॥ त्याचे कानीं हाणे । कोण बोंब तुका म्हणे ॥४॥

२९४५. दुर्बळा वाणीच्या येक दोन सिद्धि । सदैवा समाधी विश्वरूपीं ॥१॥ काय त्याचें वायां गेलें तें येक । सदा प्रेमसुख सर्व काळ ॥२॥ तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥३॥ तुका म्हणे येक वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ॥४॥

२९४६. परिमळ काष्ठ ताजवां तुळविले । आणिक नांवांचीं थोडीं । येक तें कांतिवें उभविलीं डवलारें । येकाचिया कूड मेडी । येक दीनरूप आणिती मोळिया । येक ते बांधोनि माडी । अवघियां बाजार येकचि झाला । मा विकली आपल्या पाडीं ॥१॥ गुण तो सार रूप मध्याकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥२॥ येक गुणें आगळे अमृती अमोल्य नांवाचे खडे । येक समर्थ दुर्बळा घरीं फार मोलाचे थोडे । येक झगझग करीती वाळवंटीं कोणी न पाहाती तयाकडे । सभाग्य संपन्न आपुलाले परी मा । येक दैन्यवाणें बापुडें ॥३॥ येक नामें रूपें सारिखीं असती । अनेक प्रकार याती । ज्याचिया संचितें जैसें आलें पुढें । तयाची तैसीच गति । येक उच्च पदीं बैसउनि सुखें । दास्य करवी येका हातीं । तुका म्हणे कां मानिती सुख । चुकलिया वाया खंती ॥४॥

२९४७. नाहीं आम्हा शत्रु सोयरे पिशून । दाटलें हें घन माहीयेर ॥१॥ पाहे तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिये ॥२॥ लज्जा भय

कांहीं आम्हा चिंता नाहीं । सर्व सुखें पायीं वोळंगती ॥३॥ तुका म्हणे आम्ही सदैवाचीं बाळें । झालों लडिवाळें सकळांचीं ॥४॥

२९४८. गर्भी असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥१॥ कैसा लाघवी सूत्रधारी । कृपाळुवा माझा हरी ॥२॥ सर्प पिलीं वितां खाय । वांचवीयां कोण माय ॥३॥ गगनीं लागलों कोशरा । कोण पुरवी तेथें चारा ॥४॥ पोटीं पाषाणाचे जीव । कवण जीव त्याचा भाव ॥५॥ तुका म्हणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥६॥

२९४९. न म्हणे कवणा सिद्धसाधक गव्हार । अवघा विश्वंभर वांचूनियां ॥१॥ ऐसें माझें बुद्धि कायावाचामनें । लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥२॥ गातां प्रेम गूण शंका माझे मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥३॥ देईं चरणसेवा भुतांचें भजन । वर्णाभिमान मांडऊनि ॥४॥ आशापाश माझी तोडी माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ॥५॥ तुका म्हणे सर्व भावे तुझे पाईं । राहे ऐसें देईं प्रेम देवा ॥६॥

२९५०. अग्नीमाजीं गेलें । अग्नि होऊनी तेच ठेलें ॥१॥ काय उरलें तया पण । मागील तें नामगुण ॥२॥ लोह लागे परीसा अंगीं । तोहि भूषण झाला जगीं ॥३॥ सरीता वोहळ वोघा । मिळोनि गंगे झाल्या गंगा ॥४॥ चंदनाचें वासें । तरुवर चंदन झालें स्पर्शें ॥५॥ तुका जडला संता पाईं । दुजपणा ठाव नाहीं ॥६॥

२९५१. ऐसा भाग्यें जालों । तरी धन्य जन्मा आलों ॥१॥ रुळे तळील पायरी । संत पाय देती वरी ॥२॥ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥३॥ तुका म्हण सुखें । तया हरतील दुःखें ॥४॥

२९५२. करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥१॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥२॥ ऐसा लाभ नाहीं । दुजें विचारीतां कांहीं ॥३॥ तुका म्हणे गोड । तेथें पुरें माझें कोड ॥४॥

२९५३. वेद जया गाती । आम्हा तयांचि संगती ॥१॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांठविला पोटीं ॥२॥ ॐ काराचें बीज । हातीं आमुचें तें निज ॥३॥ तुका म्हणे बहु मोटें । अणुरेणुयां धाकुटें ॥४॥

२९५४. तुम्ही तरी हो श्रीपति । माझी बहु हीन याती ॥१॥ दोघे असों येके ठाईं । माझा माथा तुझे पाईं ॥२॥ माझ्या दीनपणा पार । नाहीं बहू तूं उदार ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । मी ओव्हळ तूं गंगा ॥४॥

२९५५. मी याचक तूं दाता । काय सत्य पाहो आतां ॥१॥ म्यां तो पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥२॥ आम्ही घ्यावें नाम । तुम्हा समाधान काम ॥३॥ तुका म्हणे देवराजा । वाद खंडी तुझा माझा ॥४॥

२९५६. तुझें पोटीं ठाव । व्हावा ऐसा माझा भाव ॥१॥ करीं वासने- सारिखें । प्राण फुटे येणें दुःखें ॥२॥ अहंकार खोटे । वाटे श्वापदाचि थाटे ॥३॥ तुका म्हणे आई । हातीं धरुनी संग देई ॥४॥

२९५७. दारीं परोवरीं । कुडीं कवाडीं मी धरीं ॥१॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघे ठाईं नारायणा ॥२॥ नेदी खाऊं जेऊं । हातीं तोंडींचें हि घेऊं ॥३॥ तुका म्हणे अंगीं । जडलों ठाईंचा सलगी ॥४॥

२९५८. मज कोणी कांहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥१॥ ग्याला वाढविला म्हणून । मज सुख तुज शीण ॥२॥ माझें पोट धालें । तुझें अंगीं उमटलें ॥३॥ तुका म्हणे खेळे । येथें तुमचिया बळें ॥४॥

२९५९. जोडोनियां कर । उभा राहिलों समोर ॥१॥ हेंचि माझें भांडवल । जाणें कारण विठ्ठल ॥२॥ भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ॥३॥ तुका म्हणे डोई । ठेवि वेळोवेळां पायीं ॥४॥

२९६०. आम्ही घ्यावें तुझें नाम । तुम्ही आम्हां द्यावें प्रेम ॥१॥ ऐसें निवाडिलें मूळीं । संतीं बसोनी सकळीं ॥२॥ माझी डोई पायांवरी । तुम्हीं न धरावी दूरी ॥३॥ तुका म्हणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥४॥

२९६१. वारिलें लिगाड । बहु दिसांचें हें जाड ॥१॥ न बोलावें ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥२॥ झाला चौघांचार । गेला खंडोनी वेव्हार ॥३॥ तुका म्हणे देवा । करीन तो घ्यावी सेवा ॥४॥

२९६२. पायरवे अन्न । मग करी खेदक्षीण ॥१॥ ऐसे होती घातपात । लाभाविण संग स्थीत ॥२॥ जन्माची ते जोडी । वाताहात येके घडी ॥३॥ तुका म्हणे शंका । हित आड या लौकिका ॥४॥

२९६३. आम्हां वैष्णवांचा । नेम काया मनें वाचा ॥१॥ धीर धरूं जीवासाठीं । येऊं नेदूं लाभा तुटी ॥२॥ उचित समय । लाज निवारावें भय ॥३॥ तुका म्हणे कळा । जाणों नेम नाहीं बाळा ॥४॥

२९६४. उल्लंघिली लाज । तेणें साधियेलें काज ॥१॥ सुखें नाचे बैलतीरीं । गेलों भवाचे सागरीं ॥२॥ नामाची सांगडी । सुखें बाधली आवडी ॥३॥ तुका म्हणे लोकां । उरली वाचा मारी हाका ॥४॥

२९६५. बैसलोसे दारीं । धरणें कोंडोनी भिकारी ॥१॥ आतां कोठें हालों नेदी । बरी सांपडली संधी ॥२॥ किती वेरझारा । मागें घातलिया घरा ॥३॥ माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥४॥ भांडावें तें किती । बहु सोशिली फजिती ॥५॥ तुका म्हणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥६॥

२९६६. झालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥१॥ नाहीं लागों दिल्हें अंगा । आड ठाकलों मी जगा ॥२॥ करोनियां नीती । दिल्ह्याप्रमाणें चालती ॥३॥ हातीं दंड काठी । उभा जीवाचिये साटीं ॥४॥ बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्ह्या सर्व शक्ती ॥५॥ तुका म्हणे खरा । आतां घेईन मुशारा ॥६॥

२९६७. फळाचि तों पोटीं । घडे वियोगहि भेटी ॥१॥ करावें चिंतन । सार तेंचि आठवण ॥२॥ चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥३॥ तुका म्हणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥४॥

२९६८. दुर्बळाचे कोण । ऐके घालोनियां मन । राहिलें कारण । तयावांचूनी काय तें ॥१॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें । नसतां हें ठावें । पडे चर्या देखोनी ॥२॥ काम क्रोध माझ्या देहीं । भेदाभेद गेले नाहीं । होतों तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥३॥ हें तों नव्हे उचित । नुपेक्षावें शरणागत । तुका म्हणे रीत । तुमची आम्हा नकळे ॥४॥

२९६९. आम्ही भाव जाणों देवा । न कळती तुझीया मावा । गणिकेचा कुडावा । पतना न्यावा दशरथ ॥१॥ तरी म्यां काय गा करावें । कोण्या रीती तुज पावावें । न मागतां ठावें । तुम्हाविण न पडे ॥२॥ दोनी फांकलिया वाटा । गोवी केली घटापटा । नव्हे धीर फांटा । आडरानें भरती ॥३॥

तुका म्हणे माझे डोळे । तुझे देखती हे चाळे । आतां येणें वेळे । चरण जीवें न सोडीं ॥४॥

२९७०. वेरझारीं झाला शीण । बहू केलें खेद क्षीण । भांडणासी दीन । आजि येथें फावला ॥१॥ आतां काय भीडभार । धरूनियां लोकाचार । बुडउनी वेव्हार । सरोवरी करावी ॥२॥ आलें बहुतांच्या मना । कां रे न होसी शाहाणा । मुळींच्या वचना । आम्ही जागों आपुल्या ॥३॥ तुका म्हणे चौघांमधीं । तुज नेलें होतें आधीं । आतां नाहीं मधीं । उरी कांहीं राहिली ॥४॥

२९७१. कल्पतरुखालीं । फळें येती मागीतलीं ॥१॥ तेथें बैसल्याचा भाव । विच्यारूनि बोले ठाव ॥२॥ द्यावें तें उत्तर । येतो प्रीतिचाची फेर ॥३॥ तुका म्हणे मनीं । आपुल्याच लाभ हानी ॥४॥

२९७२. रंगलें या रंगें पालट न धरीं । खेवलें अंतरीं पालटेना ॥१॥ सावळें निखळ कृष्ण नाम ठसे । अंगसंगे कैसे शोभा देती ॥२॥ पवित्र झालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळा आडवरी ॥३॥ तुका म्हणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥४॥

२९७३. जगा काळ खाय । आम्ही माथां दिल्हे पाय ॥१॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंग करि साहे ॥२॥ हरीच्या गुणें धाला । होता खाताचि भुकेला ॥३॥ तुका म्हणे हळू । झाला कढत शीतळू ॥४॥

२९७४. ब्रह्मरस घेई काढा । जेणें पीडा वारेल ॥१॥ पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे न सेवी ॥२॥ भवरोगा ऐसें जाय । आणिक काय क्षुल्लकें ॥३॥ तुका म्हणे नव्हे बाधा । आणिक कदा भूतांची ॥४॥

२९७५. अंगें अनुभव झाला मज । संतरजचरणाचा ॥१॥ सुखी झालों या सेवेनें । दुःख नेणें यावरी ॥२॥ निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥३॥ तुका म्हणे भावसार । करूनी फार मिश्रित ॥४॥

२९७६. वैद्य येक पंढरीराव । अंतर भाव तो जाणे ॥१॥ रोगा ऐशा द्याव्या वल्ली । जाणे झाली बाधा ते ॥२॥ नेदी रूका वेंचूं मोल । पाहे बोल प्रीतींचे ॥३॥ तुका म्हणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥४॥

२९७७. करितां कोणाचेंहि काज । नाहीं लाज देवासी ॥१॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥२॥ करुनि आराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥३॥ बोले तैसी करणी करी । तुका म्हणे येक हरी ॥४॥

२९७८. उभे चंद्रभागे तीरीं । कट धरूनियां करीं । पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥१॥ त्याचा छंद माझ्या जीवा । कायावाचामनें हेवा । संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥२॥ रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे । मस्तक नावडे । उठों पायांवरूनि ॥३॥ तुका म्हणे नाम । ज्याचे नाशी क्रोध काम । हरि भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥४॥

२९७९. आम्हा हेंचि भांडवल । म्हणों विठ्ठल विठ्ठल ॥१॥ सुखें तरों भवनदी । संगे वैष्णवांची मांदी ॥२॥ वाखराचे बाण । सांडुं हें जेऊं जेवण ॥३॥ नलगे वारंवार । तुका म्हणे येरझार ॥४॥

२९८०. आतां माझ्या भावा । अंतराय नको देवा ॥१॥ आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥२॥ दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥३॥ तुका म्हणे वाटे । नको फुटों देऊं फाटे ॥४॥

२९८१. काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुणें ॥१॥ करी अक्षराची आटी । येके कवडीचे साठीं ॥२॥ निंदी कोणा स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥३॥ तुका म्हणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥४॥

२९८२. मागणें तें मागों देवा । करूं भक्ति त्याची सेवा ॥१॥ काय उणें तयापासीं । रिद्धीसिद्धि त्याच्या दासी ॥२॥ काया वाचा मन । करूं देवा हें अर्पण ॥३॥ तुका म्हणे विश्वंभर । ज्याच्यानें हें चराचर ॥४॥

२९८३. चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥१॥ असे भक्तांचिया घरीं । काम न सांगतां करी ॥२॥ अनाथाचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥३॥ तुका म्हणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥४॥

२९८४. कर्कश संगतीं । दुःख उदंड फजिती ॥१॥ नाहीं इह ना परलोक । मजूर दिसे जैसे रंक ॥२॥ वचन शेटावरी । त्याचें ठेऊनि धिकारी ॥३॥ तुका म्हणे पाई बेडी । पडली कपाळीं कुऱ्हाडी ॥४॥

२९८५. बीज पेरी शेतीं । मग गाडेवरी वाहाती ॥१॥ वायां गेलें ऐसें

दिसे । लाभ त्याचे अंगीं वसे ॥२॥ पाल्याची जतन । तरी प्रांति येती कण ॥३॥ तुका म्हणे आळा । उदक देतां लाभे फळा ॥४॥

२९८६. जाणावें तें सार । नाहीं तरी दगा फार ॥१॥ डोळे झांकलिया रवी । नाहीं ऐसा होय जेवीं ॥२॥ बहु थोड्या आड । निवारितां लाभे जाड ॥३॥ तुका म्हणे खरें । नेलें हातींचें अंधारें ॥४॥

२९८७. संवसार सांते आले हो आईका । तुटीचें तें नका केणें भरूं ॥१॥ लाभाचा हा काळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥२॥ शृंगारीलें दिसे न कळे अंतर । गोवीला पदर उगवेना ॥३॥ तुका म्हणे खोटे गुंफतां विसारे । हातींचीया खरें हातीं घ्यावें ॥४॥

२९८८. मूळीं नेणपण । झाला तरी अभिमान ॥१॥ वायां जावें हेंचि खरें । केलें तेणेंचि प्रकारें ॥२॥ अराणूक नाहीं कधीं । झाली तरी भेदबुद्धी ॥३॥ अंतरली नाव । तुका म्हणे नाहीं ठाव ॥४॥

२९८९. साराविलीगाडें धरावा सूपंथ । जावें उसंतीत हळु हळु ॥१॥ पुढें जातीयाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥२॥ वेंचल्याचा पाहें वरावरी झाडा । बळाचा निधडा पुढीलीया ॥३॥ तुका म्हणे जैसी दाखवावी वाणी । ते द्यावी भरोनी शेवट तो ॥४॥

२९९०. बुद्धीमंदा शिरीं । भार फजीती पदरीं ॥१॥ जाय तेथें अपमान । पात्रे हाणी थुंके जन ॥२॥ खरीयाचा पाड । मागें लावावें लिगाड ॥३॥ तुका म्हणे करी । वर्म नेणें भरोंवरि ॥४॥

२९९१. पूर्वजांसी नरका । जाणे तें एके आईका ॥१॥ निंदा करावी चाहाडी । मनीं धरूनि आवडी ॥२॥ मात्रागमना ऐसी । जोडी पातकांची राशी ॥३॥ तुका म्हणे वाट । कुंभपाकाची ते नीट ॥४॥

२९९२. वेडी ते वेडी बहुतचि वेडी । चाखतां गोडी चवी नेणे ॥१॥ देहा लावी वात । पालव घाली झाली रात ॥२॥ कडिये मूल भोंवतें भोयें । मोकलुनी रडे धाये ॥३॥ लेकरें वीत पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥४॥ आपुली शुद्धी जया नाहीं । आणिकाची ते जाणे काई ॥५॥ तुका म्हणे ऐसे जन । नरका जातां राखे कोण ॥६॥

२९९३. आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारून राहीलासे ॥१॥ जें जया रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥२॥ ठाईं पडलीया तोचि लागे खावें । ठाईंचेंची घ्यावें विचारूनी ॥३॥ बीज पेरुनीयां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ कैसें लागे ॥४॥ तुका म्हणे देवा कांहीं बोल नाहीं । तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥५॥

२९९४. अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ॥१॥ काय करावें तें मौन । दाही दिशा हिंडे मन ॥२॥ बाहिर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥३॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥४॥ सारवीलें निकें । वरी माझी अवघें फिकें ॥५॥ तुका म्हणे अंतीं । कांहीं नलगेची हातीं ॥६॥

२९९५. लय लक्षोनियां झालों म्हणती देव । तोहि नव्हे भाव सत्य जाणा ॥१॥ झालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहु तेंहि निश्चितीनें ॥२॥ तपें दानें काय मानीसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥३॥ कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥४॥ तुका म्हणे जरी होईल निष्काम । तरीच होय राम देखे डोळां ॥५॥

२९९६. पुरली धांव कडिये घेईं । पुढें पाई न चलवे ॥१॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगें जीवलगे ॥२॥ अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥३॥ तुका म्हणे बोलवेना । लावी स्तना ईश्वरे ॥४॥

२९९७. जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥१॥ आतां तूंचि बाह्यात्कारीं । अवघ्या परि झालासी ॥२॥ नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥३॥ तुका म्हणे सर्व सांगें । पांडुरंगें दयाळे ॥४॥

२९९८. जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥१॥ असे तया समाधाने । पूजा मनें करीन ॥२॥ अवघाचि अवघे देसी । सुखराशी संपन्न ॥३॥ तुका म्हणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥४॥

२९९९. भला भला पुंडलीका । मानलासी जन लोकां ॥१॥ कोण्या काळें सुखा । ऐसा कोण पावत ॥२॥ नातुडे जो कवणेपरी । उभा केला विटेवरी ॥३॥ अवघा आणिला परिवार । गोपीगोपाळांचा भार ॥४॥ तुका म्हणे धन्य झाले । भूमीं वैकुंठ आणिलें ॥५॥

३०००. अवघे चुकविले सायास । तप राशी जीवा नाश ॥१॥ जीव देऊनियां बळी । अवघीं तारीलीं दूबळीं ॥२॥ केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥३॥ कांहीं न गमे याची गती । लुटवितो जगा हातीं ॥४॥ तुका म्हणे भक्तराजा । कोण पार वर्णी तुझा ॥५॥

३००१. प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्तांचा अंकिला ॥१॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ॥२॥ अवघा त्याचा होय । जीव भावसहित ॥३॥ वदे उपचार वाणी । कांहीं माग म्हणउनी ॥४॥ उदासीनाच्या लागें । तुका म्हणे धांवे मागें ॥५॥

३००२. कांहीं न मागती देवा । त्याची करूं धांवे सेवा ॥१॥ हळु हळु फेडी रीण । होऊनीयां रूपें दीन ॥२॥ होऊं न शके वेगळा । क्षण येक त्या निराळा ॥३॥ तुका म्हणे भक्तीभाव । हाचि देवाचाही देव ॥४॥

३००३. जाणें अंतरींचा भाव । तोचि करीतो ऊपाव ॥१॥ नलगे सांगावें मागावें । जीवेंभावें अनुसरावें ॥२॥ अविनाश घ्यावें । फळ धीर धरूनी ॥३॥ बाळ न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥४॥ तुका म्हणे तरी । येकीं लंघीयेले गिरी ॥५॥

३००४. आम्ही नाचों तेणें सुखें । वाहूं टाळी गातों मुखें ॥१॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥२॥ आम्हां झाला हा निर्धार । मागें तारिले अपार ॥३॥ तुका म्हणे संतीं । वर्म दिल्हें आम्हां हातीं ॥४॥

३००५. झालों निर्भर मानसीं । म्हणऊनी कळलासी ॥१॥ तुझे म्हणविती त्यास । भय चिंता नाहीं आस ॥२॥ चुकविशी पाश । गर्भवास यातना ॥३॥ तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरीयेलें नाम ॥४॥ तुका म्हणे तेणें सुखें । विसरलों जन्म दुःखें ॥५॥

३००६. नको दुष्ट संग । पडे भजनामधीं भंग ॥१॥ काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥२॥ तुज निषेधितां । मज न साहावे समर्था ॥३॥ येका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥४॥ तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्टजन ॥५॥ काय करूं येका । मुखें सांग म्हणे तुका ॥६॥

३००७. विठ्ठल माझी माय । आम्हा सुखा उणें काय ॥१॥ घेतों

अमृताची धणी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥२॥ क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥३॥ तुका म्हणे कृपावंत । ठेवीं आम्हापाशीं चित्त ॥४॥

३००८. भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर झाले ॥१॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जति विठ्ठलाचे ॥२॥ महादोषा आला त्रास । जन्ममरणा केला नाश ॥३॥ सहस्र नामांची आरोळी । येक येकाहुनी बळी ॥४॥ नाहीं आणिकाचा गुमान । ज्याचे अंकित त्यावांचून ॥५॥ तुका म्हणे त्याचे घरीं । मोक्ष सिद्धी या कामारी ॥६॥

३००९. पंधरा दिवसां येक येकादशी । कां रे न करीसी व्रतसार ॥१॥ काय तुझा जीव जातो येका दीसें । फराळाच्या मीसें धणी घेसी ॥२॥ स्वहिताकारणें मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥३॥ थोडे तुज घरीं होते उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥४॥ तुका म्हणे कां रे सकुमार झालासी । काय जाब देसी यमदूतां ॥५॥

३०१०. कथा हें भूषण जगामध्यें सार । तरले अपार बहु येणें ॥१॥ नीचियें कुळीचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥२॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप झाला कुळी वंशाचीया ॥३॥ त्याची निंदा करी त्याची कुष्टवाणी । मुख संवदणि रजकाची ॥४॥ तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठोबाचें सार नाम घ्यावें ॥५॥

३०११. टाळ घोळ सुख नामाचा गजर । घोष जयजयकार ब्रह्मानंदू ॥१॥ गरुडटके दिंडी पताकांचा भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥२॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । येक येकाहुनी भद्रजाती ॥३॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥४॥ तुका म्हणे सोपें वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हेचि वाट ॥५॥

३०१२. देखोदेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारू ॥१॥ वर्म तें न पडे ठाईं । पांडुरंगावीण कांहीं ॥२॥ शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणा हातीं ॥३॥ तुका म्हणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥४॥

३०१३. भाग्यवंत म्हणों तया । शरण गेले पंढरिराया ॥१॥ तरले तरति हा भरवसा । नामधारकाचा ठसा ॥२॥ भुक्तिमुक्तिचें तें स्थळ ।

भोळे भाविक निर्मळ ॥३॥ गाईली पुराणीं । तुका म्हणे वेदवाणी ॥४॥

३०१४. जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दूरी ॥१॥ नलगे द्यावा परिहार । वायां कोरडें उत्तर ॥२॥ असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥३॥ अवघे जाणे सूत्रधारी । कोण नाचे कोणपरी ॥४॥ तुका म्हणे बुद्धी । ज्याचि तया तेच सिद्धि ॥५॥

३०१५. नाहीं पायतन भूपतीसी दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥१॥ मुंगियाच्या मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥२॥ तुका म्हणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥३॥

३०१६. तीन्ही लोक ऋणें बांधिलें जयानें । सर्वसिद्धी केणें तयाघरीं ॥१॥ पंढरी चोहटा घातलें दुकान । मांडियेलें वान आवडीचे ॥२॥ आषाढी कार्तीकी भरियेला हाट । इनाम हे पेंठ देतां घेतां ॥३॥ मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटतील सुखा प्रेमाचीया ॥४॥ तुका म्हणे संतसज्जन भाग्याचे । अनंत जन्माचे सांठेकरी ॥५॥

३०१७. दुःखाचिये साठीं तेथें मिळे सूख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥१॥ उदाराचा राणा पंढरिसी आहे । उभारूनी बाहे पालवीतो ॥२॥ जाणतीयाहुनी नेणत्याची गोडी । आलिंगी आवडी करूनियां ॥३॥ सीण घेऊनियां प्रेम देतो साटि । न विचारि तूटी लाभ कांहीं ॥४॥ तुका म्हणे असो अनाथ दुबळी । आम्हांसी तो पाळी पांडुरंग ॥५॥

३०१८. आणिक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥१॥ मुखा तेंचि गोड श्रवणीं आवडी । चित्त माझें वोढी तुझे पाईं ॥२॥ जयें पदीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आईकतां ॥३॥ आणिकाचें मज म्हणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें ॥४॥ तुका म्हणे मज तूंचि आवडसी । सर्व भावेंसीं पांडुरंगा ॥५॥

३०१९. कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनासवें काज नाहीं माझें ॥१॥ करीन मी स्तुती आपुल्या आवडी । जैसी माझी गोडी वाटे जीवा ॥२॥ होऊनी निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनीयां ॥३॥ काय करूं कळा युक्तिच्या कुसरी । जाणीवेच्या परी सकळीकां ॥४॥ तुका

म्हणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥५॥

३०२०. तयासी नेणती बहु आवडती । होय जया चित्तीं येक भाव ॥१॥ उपमन्यु ध्रुव हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥२॥ कोळि भिल्ल पशु श्वापदें अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥३॥ काय ते गोपाळ चांगले शाहाणे । तयां चक्रपाणी जेवी सवें ॥४॥ तुका म्हणे भोळा भाविक हा देव । आम्ही त्याचे पाय धरुनी ठेलों ॥५॥

३०२१. नलगे पाहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥१॥ नाहीं वेळ काळ पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥२॥ वेदीं जें प्रतिपाद्य न कळे पाहातां । तैसीया अनंता ठेऊं नामें ॥३॥ आपुलिया मना उपजे आनंद । तैसें करूं छंद कथाकाळीं ॥४॥ तुका म्हणे आम्ही आनंदेंचि झालों । आनंदचि ल्यालों अलंकार ॥५॥

३०२२. दैन्य दुःख आम्हा न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥१॥ सर्व सुखें येती मानें लोटांगणीं । कोण यांसी आणी दृष्टिपुढें ॥२॥ आमुची आवडि संतसमागम । आणिक तें नाम विठोबाचें ॥३॥ आमुचें मागणें मागूं त्याची सेवा । मोक्षाची निर्दैवा कोणा वाड ॥४॥ तुका म्हणे पोटीं सांठवला देव । न्यून तोचि भाव कोण आम्हां ॥५॥

३०२३. काळ तोंडा सुणा । भलतें चोरुनि करी जना ॥१॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनि वर्ते मन ॥२॥ मंत्र ऐसे घोकी । वश्य व्हावें जेणें लोकीं ॥३॥ तुका म्हणे थित । नागवला नव्हे हित ॥४॥

३०२४. विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलतां ॥१॥ मज न साहावें कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥२॥ हरिकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तोचि वैरी ॥३॥ सुणा काळतोंडा । जो या देवा म्हणे धोंडा ॥४॥ अहं म्हणे ब्रह्म । नेणे भावें भक्ति वर्म ॥५॥ तुका म्हणे क्षण । नको त्याचें दरुशन ॥६॥

३०२५. यमपुरी त्यांनीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधि केला ॥१॥ अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥२॥ काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥३॥ द्रव्य दारा कोणें स्थापियेलें धन । पिंडाचें पाळण विषय भोग ॥४॥ तुका म्हणे दोहीं

ठाईं हा फजीत । पावे यमदूत जना हातीं ॥५॥

३०२६. न कळतां कोणी मोडियेलें व्रत । तया प्रायःश्चित्त चाले कांहीं ॥१॥ जाणतीया वज्रलेप झाले थोर । तयांस अघोर कुंभीपाक ॥२॥ जातां जरी कोणी नाईके सांगतां । तया शिकवीतां तेंचि पाप ॥३॥ काय करूं मज देवें बोलाविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥४॥ तुका म्हणे जना पाहा विचारूनि । सुख वाटे मनीं तेंची करा ॥५॥

३०२७ वाचे विठ्ठल नाहीं । तोचि प्रेतरूप पाहीं ॥१॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदीनी ॥२॥ न बैसे कीर्तनीं । गुण नायके जो कानीं ॥३॥ जातां कंटाळे राउळा । तोचि सुणा मुख काळा ॥४॥ हरी-भक्तिवीण । जळो त्यांचें शहाणपण ॥५॥ तुका म्हणे तेणें । वंशा आणि येलें उणें ॥६॥

३०२८. तारीलीं बहुतीं चुकऊनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥१॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाठीं ॥२॥ जन्म नाम धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा याच साठीं ॥३॥ असुरी दाटली पाप होतां फार । मग फेडीं भार पृथिवीचा ॥४॥ तुका म्हणे देव भक्तपण सार । कवतुक व्यवहार तयासाठीं ॥५॥

३०२९. याचिया आधारें राहिलों निश्चिंत । ठेवोनियां चित्त पाईं सुखें ॥१॥ माझें सुखदुःख जाणे हीत फार । घातलासे भार पांडुरंगा ॥२॥ कृपेची पोसणी ठाईंची अंकिली । म्हणउनि लागली यास चिंता ॥३॥ मन राखे हातीं घेवोनियां काठी । इंद्रियें थापटी फांको नेदी ॥४॥ तुका म्हणे यासीं अवघड नाहीं । शरणागता कांहीं रक्षावया ॥५॥

३०३०. उभाउभीं फळ । अंगीं मंत्राचें या बळ ॥१॥ म्हणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥२॥ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां कदा ॥३॥ तुका म्हणे रोग । वारे भवा ऐसा भोग ॥४॥

३०३१. निवडावे खडे । तरी दळण वोजें घडे ॥१॥ नाहीं तरी नासोनि जाय । कारण आळसें उरे होय ॥२॥ निवडावें तन । शेतीं करावी राखण ॥३॥ तुका म्हणे नीत । न विचारीतां नव्हे हित ॥४॥

३०३२. दुर्जनाचा मान सुखें करावा खंडण ॥१॥ लाता हाणोनियां वरी । गुंडावाट शुद्ध करी ॥२॥ बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥३॥ तुका म्हणे नखें । काढुनि टाकीजे तीं सुखें ॥४॥

३०३३. नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥१॥ येथें बहुतांचें हित । शुद्ध करुनी राखा चित्त ॥२॥ नाहीं केली निंदा । आम्ही दुषीलेंसे भेदा ॥३॥ तुका म्हणे मज । येणेंवीण काय काज ॥४॥

३०३४. कांहीं जडभारी । पडतां ते अवसरीं ॥१॥ तुझे आठवावे पाय । आम्ही मोकलुनी धाय ॥२॥ ताहान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ॥३॥ तुका म्हणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥४॥

३०३५. होऊनी कृपाळ । भार घेतला सकळ ॥१॥ तूंचि चालवीसी माझें । भार सकळहि वोझें ॥२॥ देह तुझ्या पाईं । ठेउनी झालों उतराई ॥३॥ काया वाचा मनें । तुका म्हणे दुजें नेणे ॥४॥

३०३६. आतां होई माझे बुद्धीचा जनिता । आवरावें चित्ता पांडुरंगा ॥१॥ येथोनीयां कोठें नवजे बाहेरी । ऐसे मज धरीं सत्तावळें ॥२॥ अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावे वाचे ऐसे करी ॥३॥ तुका म्हणे हीत कोणतें जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥४॥

३०३७. सत्य मनासी करितों विचार । तो हें अनावर विषय लोभी ॥१॥ आतां मज राखें आपुलीया बळें । न देखे हें जाळें उगवीतां ॥२॥ सांपडलों नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥३॥ तुका म्हणे मी तों अज्ञानचि आहे । परी तुझी पाहें वास देवा ॥४॥

३०३८. दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥१॥ तैसी परि मज झाली नारायणा । योगक्षेम जाणा तुम्ही आतां ॥२॥ खातां लेतां नये मिरवतां वरी । राजा दंड करी जन राग ॥३॥ तुका म्हणे मग तळमळ ऊरे । देखीलीया झुरे पाहावया ॥४॥

३०३९. मागें जैसा होता माझे अंगीं भाव । तैसा येक ठाव नाहीं आतां ॥१॥ ऐसें ग्वाही माझें मन मजपाशीं । तुटी मुद्दलासी दिसे पुढें ॥२॥ पुढीलाचे मना आणि गुण दोष । पूज्य आपणास करावया ॥३॥

तुका म्हणे झाली कोंबड्याचि परी । पुढेंची उकरी लाभ नेणें ॥४॥

३०४०. पाहोनियां अधिकार । तैसें बोलावें उत्तर ॥१॥ काय वाउगी घसघस । आम्ही विठोबाचे दास ॥२॥ आम्ही जाणों येका देवा । जैसी तैसी करूं सेवा ॥३॥ तुका म्हणे भावें । माझें पुढें पडेल ठावें ॥४॥

३०४१. नवजतां घरा । आम्ही कोणाच्या दातारा ॥१॥ कां हे छळूं येती लोक । दाटबळेंची कंटक ॥२॥ नाहीं आम्ही खात । कांहीं कोणाचें लागत ॥३॥ कळे तैसी सेवा । तुका म्हणे करूं देवा ॥४॥

३०४२. मोहरूनी चित्ता । आणूं हळूचि वरी हिता ॥१॥ तों हे पडती आघात । खोडी काढीती पंडीत ॥२॥ संसार भेणें । कांहीं उसंतीतों पेणें ॥३॥ येखादीया भावें । तुका म्हणे जवळीं यावें ॥४॥

३०४३. काय जाणों वेद । आम्ही आगमाचे भेद ॥१॥ येक रूप तुझें मनीं । धरुनि राहिलों चिंतनीं ॥२॥ कोठें अधिकार । नाहीं रानट विचार ॥३॥ तुका म्हणे दीना । नुपेक्षावें नारायणा ॥४॥

३०४४. धर्माचें पाळण । करणें पाखंड खंडण ॥१॥ हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥२॥ तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ॥३॥ नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर ॥४॥

३०४५. किती तुजपासीं देऊं परिहार । जाणीसी अंतर पांडुरंगा ॥१॥ आतां माझे हातीं देईं माझें हित । करीं माझें चित्त समाधान ॥२॥ राग आला तरी कापूं नये मान । बाळा मातेवीण कोण दुजें ॥३॥ तुका म्हणे ऐसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥४॥

३०४६. लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापासीं ॥१॥ चुकलिया कामा मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥२॥ पाय सांडोनियां फिरतों बासर । स्वामिसेवा चोर होऊनीयां ॥३॥ तुका म्हणे मज पाहिजे दंडीलें । पुढें हें घडलें न पाहिजे ॥४॥

३०४७. पुढिलीया सुखें निंब देतां भलें । बहुत वारलें होय दुःख ॥१॥ हें तों वर्म आसे माउलीचे हातीं । हाणी मारी प्रीती हितासाठीं ॥२॥ खेळतां विसरे भूक तहान घर । धरूनीयां कर आणी बळें ॥३॥ तुका म्हणे

पाळी तोंडींचीया घासे । उदार सर्वस्वें सर्व काळ ।।४।।

३०४८. आतां गुण दोष काय विचारीसी । मीं तों आहें राशी पातकाची ।।१।। पतीतपावनासवें समागम । आपुलाला धर्म चालवीजे ।।२।। घणे घाय भेटि लोखंडा परीसा । तरी अनारिसा न पालटे ।।३।। तुका म्हणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ।।४।।

३०४९. कृपावंता दुजें नाहीं तुम्हां पोटीं । लाडें बोले गोष्टी सुख मातें ।।१।। घेऊनी भातुकें लागसील पाठी । लावीसील वोठीं ब्रह्मरस ।।२।। आपुलीया पांखे घालीसी पाखर । उदार मजवर कृपाळू तूं ।।३।। तुका म्हणे आम्हांकारणें गोविंदा । वागवीसी गदा सुदर्शन ।।४।।

३०५०. पाळिलें पोशीलें जन्मजन्मांतरीं । वागाविलें करीं धरूनियां ।।१।। आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागवीलें ।।२।। नेदी अंगीं वारा लागो आघाताचा । घेतला ठाईंचा भार माथां ।।३।। तुका म्हणे बोल करितो आवडी । अवीटची गोडी अंतरींची ।।४।।

३०५१. पांडुरंगा कांहीं आयीकावी मात । न करावें मुक्त आतां मज ।।१।। जन्मांतरें मज ऐसीं देईं देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ।।२।। वाखाणीन कीर्ति आपुलीया मूखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ।।३।। करुनि कामारी दास दीनाहुनी । आपुलें अंगणीं ठाव मज ।।४।। तुका म्हणे आम्ही मृत्युलोकीं भले । तुझेचि अंकिलें पांडुरंगा ।।५।।

३०५२. माझे अंतरींचें तोचि जाणे येक । वैकुंठनायक पांडुरंग ।।१।। जीव भाव त्याचें ठेवियेला पाईं । मज चिंता नाहीं कवणेंविशीं ।।२।। सुखसमारंभें संतसमागमें । गाऊं वाचे नाम विठोबाचें ।।३।। गातां पुण्य हो आयकतां लाभ । संसार बंध तुटतील ।।४।। तुका म्हणे जीव तयासी विकीला । आणिक विठ्ठलाविण नेणें ।।५।।

३०५३. कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा याची बरी विठोबाची ।।१।। कथा पाप नाशी उद्धरिले दोषी । समाधी कथेसी मूढ जना ।।२।। कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हें पान हरिकथा ।।३।। कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ।।४।। तुका

म्हणे कथा देवाचें हें ध्यान । समाधी लागोन उभा तेथें ॥५॥

३०५४. काय ऐसा सांगा । धर्म मज पांडुरंगा ॥१॥ तुझे पाईं पावे ऐसा । जेणें उगवे हा फांसा ॥२॥ करीं कृपादान । तैसें बोलवी वचन ॥३॥ तुका म्हणे देवा । माझें अंतरीं वसावा ॥४॥

३०५५. भला म्हणे जन । परी नाहीं समाधान ॥१॥ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥२॥ कृपेचा आधार । नाहीं दंभ झाला फार ॥३॥ तुका म्हणे कृपे । अंतराय कोण्या पापें ॥४॥

३०५६. शिकलों ते बोल । बोले तैसे नाहीं बोल ॥१॥ आतां देवा संदेह नाहीं । वायां गेलों यासी कांहीं ॥२॥ येकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नाश ॥३॥ बुद्धि नाहीं स्थीर । तुका म्हणे शब्दा धीर ॥४॥

३०५७. उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता ॥१॥ कां रे न घालीसी धांव । तुझें उच्चारितों नांव ॥२॥ काय बळ युक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥३॥ तुका म्हणे तूं विश्वंभर । वोस माझें कां अंतर ॥४॥

३०५८. वाहावतों पूरीं । आतां उचित तें करीं ॥१॥ माझी शक्ति नारायणा । कींव भाकितों करुणा ॥ २॥ आम्हा वोढी काळ । तुझें क्षीण झालें बळ ॥३॥ तका म्हणे गोडी । जीवा मातेचिया वोढी ॥४॥

३०५९. आतां घेईं माझें । भार सकळही वोझें ॥१॥ काय करिसी होई वाढ । आलों पोटासीं दगड ॥२॥ तूंचि डोळे वाती । होय दीपक सांगातीं ॥३॥ तुका म्हणे कांहीं । विचारा या चाड नाहीं ॥४॥

३०६०. असोत हे बोल । अवघें तूंचि भांडवल ॥१॥ माझा मायबाप देवा । सज्जन सोयरा केशवा ॥२॥ गाळियेला भेद । मारियेले वादावाद ॥३॥ तुका म्हणे मधीं । आतां न पडे उपाधी ॥४॥

३०६१. करीन कोल्हाळ । आतां हाचि सर्व काळ ॥१॥ आतां येवो माझे आई । देईं भातुकें विठाई ॥२॥ उपायासी नाम । दिल्हें याचें पुढें क्षेम ॥३॥ बीज आणि फळ । हेंचि तुका म्हणे मूळ ॥४॥

३०६२. धनासींच धन । करी आपणा जतन ॥१॥ तुज आळवितां गोडी । पांडुरंगा खरी जोडी ॥२॥ जेविल्याचे खरे । वरी उमटे ढेंकरें ॥३॥

तुका म्हणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥४॥

३०६३. अनुभवा आलें । माझे चित्तींचें क्षरलें ॥१॥ असे जवळी अंतरें । फिरे आवडीच्या फेरें ॥२॥ खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटे ॥३॥ तुका म्हणे उभे । आम्हीं राखियेलें लोभें ॥४॥

३०६४. पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥१॥ तैसें मज कां गा केलें पंढरिराया । लौकिक हा वायां वाढविला ॥२॥ ज्वरिलिया पुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥३॥ तुका म्हणे मढें श्रृंगारिलें वरी । तेचि झाली परी मज देवा ॥४॥

३०६५. बेगडाचा रंग राहे कोण काळ । अंग हें पीतळ न देखतां ॥१॥ माझें चित्त मज जवळीच गोही । तुझी मज नाहीं भेटी ऐसें ॥२॥ दासीसुता नाहीं पितीयाचा ठाव । अवघेंचि वाव सोंग त्याचें ॥३॥ तुका म्हणे माझी केली विटंबणा । अनुभवें जना येईल कळों ॥४॥

३०६६. मजपुढें नाहीं आणिक बोलतां । ऐशी कांहीं चिंता वाटतसे ॥१॥ याचा तुम्ही कांहीं देखा परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥२॥ काम क्रोध नाहीं सांडिलें आसन । राहिले वमोन देहामध्यें ॥३॥ तुका म्हणे आतां झालों उतराई । कळों यावें पाईं निरोपिलें ॥४॥

३०६७. सावित्रीची विटंबणा । रांडपणा करितसे ॥१॥ काय जाळावें तें नाम । अवघें वाव असे तें ॥२॥ कुबेर नांव मोळी वाहे । कैंमी पाहे फजिती ॥३॥ तुका म्हणे ठुणगुण देखें । उगींच मुखें फुंदतां ॥४॥

३०६८. न गमेसी झाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी न बोलावें ॥१॥ रुचीवीण काय शब्द वाऱ्यामाप । अनादरें कोप येत असे ॥२॥ आपुलिया रडे आपुलेंचि मन । दाटे समाधान पावतसे ॥३॥ तुका म्हणे तुम्ही असाजी जाणते । काय करूं रीते वादावाद ॥४॥

३०६९. मेल्यावरी मोक्ष संसार संबंध । आरलिया बद्ध ठेवा आम्हां ॥१॥ वागवित संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥२॥ गाणें गीत आम्हां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें आंगा येतें ॥३॥ तुका म्हणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत सानुकूळ ॥४॥

३०७०. येकायेकीं आतां असावेंसें वाटे । तरीच हे खोटे चाळे केले ॥१॥ वाजवूनि तोंड घातलें बाहेरी । कुलूप करुनि दारीं माजी वसा ॥२॥ उजेडाचा केला दाटोनि अंधार । सर्व हुद्दार चेष्टविला ॥३॥ तुका म्हणे भय होतें तोंचिवरी । होती कांहीं उरीं स्वामीसेवा ॥४॥

३०७१. काय नव्हेसी तूं येक । देखों कामया पृथक ॥१॥ मुंग्या कैचे-मुंगळे । नटनाट्य तुझे चाळे ॥२॥ झाली तरी मर्यादा । किंवा त्रासावें ते गोविंदा ॥३॥ तुका म्हणे साचा । कोठें जासी हृदईंचा ॥४॥

३०७२. कां जी वाढविलें । न लगतां हें उगलें ॥१॥ आतां मानितां कांटाळा । भावतीं मिळालिया बाळा ॥२॥ लावोनियां सवे । पळतां दिसाल बरवें ॥३॥ तुका म्हणे बापा । येतां नकळाचि रूपा ॥४॥

३०७३. क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न विचारून ॥१॥ धर्म आहे वर्मा अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥२॥ द्रव्य आणि कन्या । तेथें कुळ कर्म शोधण्या ॥३॥ तुका म्हणे पुण्य गांठी । तरीच उचिताची भेटी ॥४॥

३०७४. वेंचावें तें जीवें । पूजा घडे ऐशा नांवें ॥१॥ बिगारीची ते बिगारी । साक्षी अंतरींचा हरी ॥२॥ फळ बीजा ऐसें । कार्यकारणासरिसें ॥३॥ तुका म्हणे मान । लवणामारिखें लवण ॥४॥

३०७५. मज नाहीं धीर । तुम्ही न करा अंगीकार ॥१॥ ऐसें पडिलें विषम । बळी देवाहूनि कर्म ॥२॥ चालों नेणें वाट । केल्या न पवे बोभाट ॥३॥ वेचों नेणें जीवें । तुका उदास धरिला देवें ॥४॥

३०७६. तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥१॥ वचनींच संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥२॥ वेठी ऐसा करीं भक्तिवेवसाव । न पवेचि जीव समाधान ॥३॥ तुका म्हणे काई देशील विसांवा । पांडुरंगे धांवा घेतें मन ॥४॥

३०७७. हागतांही खोडी । चलन मोडवितें काडी ॥१॥ ऐसे अनावर गुण । आवरावे काय म्हुण ॥२॥ नाहीं जरी संग । तरी बडबडवीती रंग ॥३॥ तुका म्हणे देवा । तुमची न घडेचि सेवा ॥४॥

३०७८. देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥१॥ येर वाचेचे

वाग्जाळ । अलंकारापुरते बोल ॥२॥ कांचे तरी कढे । जाती ऐसें चित्त वोढे ॥३॥ विष्णुदास तुका । पूर्ण धनी जाणे चुका ॥४॥

३०७९. खोट्याचा विकरा । येथें नव्हे कांच हिरा ॥१॥ काय दावायाचें काम । उगाच वाढवावा श्रम ॥२॥ परीक्षणावीण । मिरवों जाणें तें तें हीन ॥३॥ तुका पायां पडे । वाद पुरे हे झगडे ॥४॥

३०८०. पंढरीसी घडे अतित्याई मृत्य । तो जाय पतित अधःपाता ॥१॥ दुराचाऱ्या मोक्षसुखाची वसती । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥२॥ केला न साहावे तीर्थ उपवास । कथेवीण दोषसाधन तें ॥३॥ कालिधापें भेद मानितां निवडे । श्रोतियासी जोडे अंत्यजता ॥४॥ माहेरीं सलज्ज ते जाणा शिंदळी । काळिमा काजळी पाववितें ॥५॥ तुका म्हणे येथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान सम पाय ॥६॥

३०८१. चातुर्याच्या अनंत कळा । सत्या विरळा जाणता ॥१॥ हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ॥२॥ जळो ऐसे वांजट बोल । गुणा मोल भूस मिथ्या ॥३॥ तुका म्हणे आंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुक ॥४॥

३०८२. नयो वाचे अनुचित वाणी । नसो मनीं कुडी बुद्धी ॥१॥ ऐसें मागा अरे जना । नारायणा विनवूनी ॥२॥ कामक्रोधा पडो चिरा । ऐसा बरा सायास ॥३॥ तुका म्हणे नाना छंदें । या विनोदें न पडावें ॥४॥

३०८३. माझिया देहाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥१॥ इच्छितां ते मान मागा देवापासीं । असा संचितासीं गुंफले हो ॥२॥ देह आम्हीं केला भोगाचे सांभाळीं । राहिले निराळीं मानामान ॥३॥ तुका म्हणे कोणें वेंचावें वचन । नसता तो शीण वाढवावा ॥४॥

३०८४. धरितां इच्छा दुरी पळे । पाठी मोहळे उदासा ॥१॥ म्हणऊनि आसक्त मन । न करा खूण सांगतों ॥२॥ आमिषापासीं अवघें वर्म । सोस श्रम पाववी ॥३॥ तुका म्हणे बीज न्यावें । तें तें यावें फळानें ॥४॥

३०८५. वेदशास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नावलोका ॥१॥ तार्किकाचें अंग आपणापारिखें । माजऱ्या सारिखें वाइचाळे ॥२॥ माता निंदी

तया कोण तो आधार । भंगलें खापर यात्रि नांवें ॥३॥ तुका म्हणे आड-
रानें ज्याची चाली । तयाची ते बोली मिठेंविग ॥४॥

३०८६. कस्तुरीचे अंगीं मीनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं ॥१॥ तयापरी भेद नाहीं देवभक्ती । संदेहाच्या युक्ति मरों द्याव्या ॥२॥ इंधनें ते आगी संयोगाच्या गुणें । सागरदर्शनें वोहळ तोचि ॥३॥ तुका म्हणे माझे साक्षीचें वचन । येथें तों कारण शुद्धभाव ॥४॥

३०८७. भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥१॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे॥२॥ उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक । येकावीण येक कामा नये ॥३॥ तुका म्हणे मज कळेते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥४॥

३०८८. श्रीसंतांचिये माथा चरणांवरी । साष्टांग हे करीं दंडवत ॥१॥ विश्रांति पावलों मांभाळउत्तरीं । वाडलें अंतरीं प्रेमसुख ॥२॥ डोरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरिलों ॥३॥ तुका म्हणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्य ठेवा वोडवला ॥४॥

३०८९. नेणों काय नाड । आला उचित काळ आड ॥१॥ नाहीं झाली संतभेटी । येवढी हानी काय मोठी ॥२॥ सहज पायांपाशीं । जवळी पावलीया ऐसी ॥४॥ चुकी झाली आतां काय । तुका म्हणे उरली हाय ॥४॥

३०९०. आणिक कांहीं नेणें । असें पायांच्या चिंतनें ॥१॥ माझा न व्हावा विसर । नाहीं आणिक आधार ॥२॥ भांडवल सेवा । हाचि टेवियेला ठेवा ॥३॥ करीं मान भावा । तुका विनंति करी देवा ॥४॥

३०९१. आरुष माझी वाणी बोबडीं उत्तरें । केली ते लेंकुरें सलगी पाई ॥१॥ करावें कौतुक संतीं मायबापीं । जीवन देऊनि रोपीं विस्तारिजे ॥२॥ आभारें वदली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवनीं तुमचिया ॥३॥ तुका म्हणे हेचि करितों विनंती । मागेन पुढती सेवादान ॥४॥

३०९२. पुरुषाहातीं कंकणचुडा । नवल दोडा वृत्तिया ॥१॥ पाहा कैसी विटंबना । नारायणा देखिली ॥२॥ जळो ऐसी ब्रीदावळी । भाटवोळी-पणाची ॥३॥ तुका म्हणे पाहों डोळां । अवकळा नये हे ॥४॥

३०९३. वितीयेवढेंसें पोट । केवढा बोभाट तयाचा ॥१॥ जळो याची विटंबणा । भूक जना नाचवी ॥२॥ अभिमान शिरीं भार । झाले खर तृष्णेचे ॥३॥ तुका म्हणे नरका जावें । हाचि जीवें व्यापार ॥४॥

३०९४. शेवटासी जरी आलें । तरी झालें आंधळें ॥१॥ स्वहिताचा लेश नाहीं । दगडा कांहीं अंतरीं ॥२॥ काय परिमासवें भेटी । खापरखुंटी झालीया ॥३॥ तुका म्हणे अधम जन । अवगुणचि वाढवी ॥४॥

३०९५. प्रायश्चित्त देत तुका । जातो लोकां सकळां ॥१॥ धरितील ते तरती मनीं । जाती घाणी वायां त्या ॥२॥ निग्रहानुग्रहाचे ठाय । देतो घाय पाहोनी ॥३॥ तुका झाला नरसिंहीं । भय नाहीं कृपेनें ॥४॥

३०९६. दुर्जनाचें अंग अवघेंचि सरळ । नरकाचा कोथळा सांठवला ॥१॥ खाय अमंगळ बोले अमंगळ । उठवी कपाळ संघष्टणें ॥२॥ सर्पा मंत्र चाले धरावया हातीं । खळाची ते जाती निखळचि ॥३॥ तुका म्हणे कांहीं न साहे उपमा । आणिक अधमा वोखट्याची ॥४॥

३०९७. ऐका जी संत जन । सादर मन करूनि ॥१॥ सकळांचें सार येक । कंटक ते त्यजावे ॥२॥ विशेषता कांद्याहूनी । सेवित्या घाणी आगळी ॥३॥ तुका म्हणे ज्याची जोडी । ते परवडी बेचीज ॥४॥

३०९८. आज्ञा पाळोनियां असें येकसरें । तुमचीं उत्तरें संताचींही ॥१॥ भागवूनि देह ठेवियेला पाई । चरणावरी डोई येथूनीचि ॥२॥ येणें जाणें हें तों उपाधीचें मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ॥३॥ तुका म्हणे असें चरणींचा रज । पदींच सहज जेथें तेथें ॥४॥

३०९९. न संडावा ठाव । ऐसा निश्चयाचा भाव ॥१॥ आतां पुरे पुन्हा यात्रा । हेचि सारुनी सर्वत्रा ॥२॥ सन्निधचि सेवा । असों करोनियां देवा ॥३॥ आज्ञेच्या पाळणें । असें तुका संतां म्हणे ॥४॥

३१००. उपाधीचें बीज । जळोनि राहिलें सहज ॥१॥ आम्हा राहिली ते आतां । चाली देवाचिया सत्ता ॥२॥ पराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणें ॥३॥ तुका म्हणे जाणें पाय । खुंटले आणिक उपाय ॥४॥

३१०१. गोविंदावांचोनी वदे ज्याची वाणी । हागवण घाणी पिट-

पिट ते ॥१॥ मस्तक सांडूनि सिसफूल गुडघा । चार तो अवघा बावळ्याचा ॥२॥ अंगभूत म्हूण पूजितो वाहाणा । म्हणतां शाहाणा येईल कैसा ॥३॥ तुका म्हणे वेश्या सांगे सुवासिनी । इतर पूजनीं भाव तैसा ॥४॥

३१०२. कुतऱ्याऐसें ज्याचें जिणें । संग कोणें न करिजे ॥१॥ जाय तिकडे हाडहाडी । गोऱ्हवाडीच सोयरीं ॥२॥ अवगुणाचा त्याग नाहीं । खवळे पाहीं उपदेशें ॥३॥ तुका म्हणे कैंची लवी । ठेंग्या केवीं अंकुर ॥४॥

३१०३. सर्वथाहि खोटा संग । उपजे भंग मनासी ॥१॥ बहु रंगें भरले जन । संपन्नचि अवगुणीं ॥२॥ सेविलिया निष्कामबुद्धी । मर्दे शुद्धि सांडवी ॥३॥ त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥४॥

३१०४. उपचारासी वांझ झालों । नका बोलों यावरी ॥१॥ असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥२॥ दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहु मतें ॥३॥ येकायेकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥४॥

३१०५. मी तें मी तूं तें तूं । कुंकुड हें लाडसी ॥१॥ वचनाची पडो तुटी । पोटींचे पोटीं राखावें ॥२॥ येथील येथें तेथील तेथें । वेगळ्या कुंथे कोण भारें ॥३॥ याचें यास त्याचें त्यास । तुक्यानें कास घातली ॥४॥

३१०६. लाडाच्या उत्तरीं वाढविती कहल । हा तो अमंगळ जातिगुण ॥१॥ तमाचे शरीरीं विटाळाचि वसे । विचाराचा नसे लेश तोहि ॥२॥ कवतुकें घ्यावे लेंकराचे बोल । साहिलीया मोल ऐसें नाहीं ॥३॥ तुका म्हणे काय उपदेश खळा । न्हाऊनि कावळा क्षतें धुंडी ॥४॥

३१०७. आतां मज देवा । इचे हातींचें सोडवा ॥१॥ पाठी लागलीसे लासी । इच्छा जिते जैसी तैसी ॥२॥ फेडा आतां पांग । अंगी लपवूनि अंग ॥३॥ दुजें नेणे तुका । कांहीं तुम्हांसी टाउका ॥४॥

३१०८. बहु वाटे भये । माझे उडी घाला दये ॥१॥ फांसा गुंतलों लिगाडीं । न चले बळ चरफडीं ॥२॥ कुंठितची युक्ति । माझ्या झाल्या सर्व शक्ति ॥३॥ तुका म्हणे देवा । काममोहें केला गोवा ॥४॥

३१०९. विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळासी सखे वोंगळाचि ॥१॥ नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । झणी टाका संत

दुर्जनातें ॥३॥ भेसळीच्या बीजा अमंगळ गुण । उपजवी शीण दरुशनें ॥३॥ तुका म्हणे छी थू जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ॥४॥

३११०. चावळलें काय न करी बडबड । न म्हणे फिकें गोड भुकेलें तें ॥१॥ उमजल्यावीण न धरी सांभाळ । असो खळखळ जनाची हे ॥२॥ गरज्या न कळे आपुलिया चाडा । करावी ते पीडा कोणा काई ॥३॥ तुका म्हणे भोग भोगितील भोगें । संचित तें जोगें नाहीं कोणा ॥४॥

३१११. आपुला तो देह आम्हां उपेक्षित । कोठें जाऊं हित सांगों कोणा ॥१॥ कोण नाहीं दक्ष करितां संसार । आम्हीं हा विचार वमन केला ॥२॥ नाहीं या धरीत जीविताची चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥३॥ तुका म्हणे असों चिंतूनियां देवा । मी माझें हा हेवा सारूनियां ॥४॥

३११२. चाकरीवांचून । खावें अनुचित वेतन ॥१॥ धणी काढूनीयां निजा । करी ये कामीच्चि पूजा ॥२॥ उचितावेगळें । अभिलाषें तोंड काळें ॥३॥ मागे तरी तुका । पाहा लाज नाहीं लोकां ॥४॥

३११३. बरें सावधान । राहावें समय राखोन ॥१॥ नाहीं सारिखीया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥२॥ लाभ अथवा हानी । थोड्यामध्येंचि भोवणी ॥३॥ तुका म्हणे राखा । आपणा नाहीं तोंचि वाखा ॥४॥

३११४. काय करूं जी दातारा । कांहीं न पुरे संसारा ॥१॥ झाली माकडाची परी । येतों तळा जातों वरी ॥२॥ घालीं भलते ठाईं हात । होती शिव्या बैसे लात ॥३॥ आदि अंतीं तुका । सांगे न कळे झाला चुका ॥४॥

३११५. धर्म तो न कळे । काय झांकितील डोळे ॥१॥ जीव भ्रमले या कामें । कैशीं कळों येती वर्मे ॥२॥ विषयाचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥३॥ तुका म्हणे लासी । माया नाचविते कैसी ॥४॥

३११६. दुर्जनाची जोडी । सज्जनाचें खेंटर तोडी ॥१॥ पाहे निमित्त तें उणें । धावे छळावया सुणें ॥२॥ न म्हणे रामराम । मनें वाचे हेंचि काम ॥३॥ तुका म्हणे भागा । आली निंदा करी मागा ॥४॥

३११७. शादीचें तें सोंग । संपादितां राजा व्यंग ॥१॥ पाहा कैसी विटंबना । मुर्खा अभाग्याच्या जना ॥१॥ दिसतें तें लोपी । झिंज्या

वोढोनियां पापी ॥३॥ सिंदळी त्या सती । तुका म्हणे थुंका घेती ॥४॥

३११८. भक्त म्हणवोनी वंचावें ते जीवें । तेणें शेण खावें कशासाठीं ॥१॥ नाशिले अडबंद कौपिन ते माळा । अडचण राऊळामाजी केली ॥२॥ अंगीकारियेले सेवे अंतराय । तया झाला न्याय खापराचा ॥३॥ तुका म्हणे कोठें तगों येत घाणी । आहाचही मनीं अधीरता ॥४॥

३११९. गहिल्याचें काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ॥१॥ चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें । असावें परतें जवळूनि ॥२॥ न करावा संग न बोलावी मात । सावधान चित्त नाहीं त्यासी ॥३॥ तुका म्हणे दुःख देतील माकडें । घालिती सांकडें उफराटें ॥४॥

३१२०. बहु बरें येकायेकीं । संग चुकी करावा ॥१॥ ऐसें बरें झालें ठावें । अनुभवें आपुल्या ॥२॥ सांगावें तें काम मना । सलगी जना नेदावी ॥३॥ तुका म्हणे निंच अंगीं । दुजे संगीं आतळतां ॥४॥

३१२१. बरवें आम्हां कळों आलें देवपण । आतां गुज कोण राखे तुझें ॥१॥ मारिलें कां मज सांग आजिवरी । आतां सरोबरी तुज मज ॥२॥ जें आम्ही बोलों तें आहे तुझ्या अंगीं । देईन प्रसंगीं आजि शिव्या ॥३॥ निलाजिरा तुज नाहीं यातिकुळ । चोरटा शिंदळ ठावा मज ॥४॥ खासी धोंडे माती जीव जंतू झाडें । येकलें उघडें परदेशी ॥५॥ गाढव कुतरा ऐसा मज ठावा । बईल तूं देवा भारवाही ॥६॥ लटिका तूं मागें बहुतांमी ठावा । आलें अनुभवा माझ्या तेंही ॥७॥ तुका म्हणे मज खवळिलें भांडा । आतां धीर तोंडा न धरवे ॥८॥

३१२२. काय साहतोसी फुका । माझा बुडविला रुका ॥१॥ रीण घराचें पांगिलें । तें न सुटे कांहीं केलें ॥२॥ चौघांचिया मतें । आधीं खरें केलें होतें ॥३॥ तुका म्हणे यावरी । आतां भीड कोण धरी ॥४॥

३१२३. आम्ही भांडों तुजसवें । वर्मी धरूं झालें ठावें ॥१॥ होमी सरड बेडूक । वाघ गांड्याही पाईक ॥२॥ बळ करी तया भ्यावें । पळों लागे तया घ्यावें ॥३॥ तुका म्हणे दूर परता । नर नारी ना तूं भूता ॥४॥

३१२४. प्रीतीचा कलह । पदरासी घाली पीळ । सरों नेदी बाळ ।

मागें पुढें पित्यासी ॥१॥ काय लागे त्यासी बळ । हेडावितां कोण काळ । गोविते सबळ । जाळी स्नेहसूत्राची ॥२॥ सलगी दिल्हा लाड । बोलें तें तें वाटे गोड । करी बुझाउनि कोड । हातीं देउनि भातुकें ॥३॥ तुका म्हणे बोल कोणा । हे कां नेणां नारायणा । सलगीच्या वचना । कैसें उपजे विषम ॥४॥

३१२५. भार देखोनि वैष्णवांचे । दूत पळाले यमाचे ॥१॥ आले आले वैष्णव वीर । काळ कांपती असुर ॥२॥ गरुडटक्याच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥३॥ तुका म्हणे काळ । पळे देखोनीयां बळ ॥४॥

३१२६. रंगीं रंगें रे श्रीरंगे । काय भुललासी पतंगें ॥१॥ शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिलाष झणें ॥२॥ नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगुर ॥३॥ अंतकाळींचा सोयरा । तुका म्हणे विठो धरा ॥४॥

३१२७. जन्मा येउनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ॥१॥ कां रे न फिरसी माघारा । अझुनि तरी फाजितखोरा ॥२॥ केली गांठोळीची नासी । पुढे भीकचि मागसी ॥३॥ तुका म्हणे ठाया । जाई आपुल्या आलिया ॥४॥

३१२८. पंढरीस जाते निरोप आईका । वैकुंठनायका क्षेम सांगा ॥१॥ अनाथाचा नाथ हें तुझें वचन । धांवें नको दीन गांजूं देऊं ॥२॥ ग्रासिलें भुजंगें सर्पे महाकाळें । न दिसे हें जाळें उगवितां ॥३॥ कामक्रोधशुनीं श्वापदीं बहुतीं । वेढिलों आवर्ती मायेचिया ॥४॥ मृगजळनदी बुडवी ना तारी । आणोनियां वरी तळा नेते ॥५॥ तुका म्हणे तुवां धरिलें उदास । तरी पाहों आस कवणाची ॥६॥

३१२९. कृपाळु सज्जन तुम्ही संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥१॥ आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुळती ॥२॥ अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायांवेगळा नको करूं ॥३॥ तुका म्हणे तुम्हीं निरविल्यावरी । मग मज हरी उपेक्षीना ॥४॥

३१३०. संतांचिये पाईं माझा हा विश्वास । सर्वभावें दास झालों त्यांचा ॥१॥ तेचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ॥२॥ भागलिया मज वाहतील कडे । त्याचियानें जोडे सर्व सुख ॥३॥

तुका म्हणे शेष घेईन आवडी । वचन न मोडीं बोलिलें तें ॥४॥

३१३१. लाघवी सूत्रधारी । दोरी नाचवी कुमरी । उपजवी पाळुनी संहारी । नाना परीचीं लाघवें ॥१॥ पुरोनि पंढरीये उरलें । भक्तिसुखें सुखावलें । उभेंचि राहिलें । कर कटीं न बैसे ॥२॥ बहु काळें ना सांवळें । बहु कठीण ना कोंवळें । गुणत्रयावेगळें । बहु बळें आथिलें ॥३॥ असोनि नसे सकळांमधीं । मना अगोचर बुद्धी । स्वामी माझा कृपानिधी । तुका म्हणे विठ्ठल ॥४॥

३१३२. कीर्तन ऐकावया भुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ॥१॥ उदित हें भाग्य होईल कोणे काळीं । चित्त तळमळीं म्हणवोनि ॥२॥ उतावीळ बाह्या भेटीलागीं दंड । लोटांगणीं धड जावयासी ॥३॥ तुका म्हणे माथा ठेवीन चरणीं । होतील पारणीं इंद्रियांचीं ॥४॥

३१३३. नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियें व्यापार नाठविती ॥१॥ गोड गोमटें हें अमृतासी वाड । केला कईवाड माझ्या चित्तें ॥२॥ प्रेमरसें झाली पुष्ट अंगकांती । त्रिविध संडीती ताप अंग ॥३॥ तुका म्हणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ॥४॥

३१३४. स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवा पती ॥१॥ हेचि विष्णूची महापूजा । अनुभव नाहीं दुजा ॥२॥ सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥३॥ निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥४॥

३१३५. चित्त घेऊनीयां तूं काय देसी । ऐसें मजपासीं सांग आधीं ॥१॥ तरीच पंढरिराया करीन साटोवाटी । नेघें जया तुटी येईल तें ॥२॥ रिद्धीसिद्धी कांहीं दाविसी अभिलाष । नाहीं मज आस मुक्तीचीही ॥३॥ तुका म्हणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें घेणें ॥४॥

३१३६. तुझा संग पुरे संग पुरे । संगती पुरे विठोबा । आपुल्यासारिखें करिसी दासा । भिकारीसा जग जाणे ॥२॥ रूप नाहीं ठाव नांवा । तैसें आमुचें करिसी देवा ॥३॥ तुका म्हणे तोयें आपुलें भेंडोळें । करिसी वाटोळें माझें तैसें ॥४॥

३१३७. आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥१॥ तुझें नाम दीना-

नाथ । ब्रीदावळी जगविख्यात ॥२॥ कोण लेखी माझे दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥३॥ वायां जातां मज । तुका म्हणे तुम्हां लाज ॥४॥

३१३८. विठ्ठल आमुचा निजांचा । सज्जन सोयरा जीवाचा ॥१॥ मायबाप चुलता बंधु । अवघा तुजशीं संबंधु ॥२॥ उभय कुळीं साक्ष । तूंचि माझा मातुळपक्ष ॥३॥ समर्पिली काया । तुका म्हणे पंढरिराया ॥४॥

३१३९. वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनीं वाहावा भार माथां ॥१॥ खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचें ॥२॥ उत्पत्तिपाळणसंहाराचें निज । जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥३॥ तुका म्हणे आलें आपणाचि फळ । हातोहातीं मूळ सांपडलें ॥४॥

३१४०. आमुचा तूं ऋणी ठाईंचाचि देवा । मागावया ठेवा आलों दारा ॥१॥ वर्म तुझें आम्हां सांपडलें हातीं । धरियेले चित्तीं दृढ पाय ॥२॥ बैसलों धरणें कोंडुनियां द्वारीं । आंतूनि बाहेरी येवों नेदी ॥३॥ तुज मज सरी होइल या विचारें । जळो भांडखोरें निलाजिरीं ॥४॥ भांडवल माझें मिरविसी जनीं । सहस्र वोवणी नाममाळा ॥५॥ तुका म्हणे आम्हीं केली जीवें साटी । तुम्हां आम्हां तुटी घालूं आतां ॥६॥

३१४१. काय धोविलें बाहेरी । मन मळलें अंतरीं । गादलें जन्मवरी । असत्य काटें काटलें ॥१॥ सांडीं व्यापार दंभाचा । शुद्ध करीं रे मन वाचा । तुझिया चित्ताचा । तूंचि ग्वाही आपुला ॥२॥ पापपुण्य विटाळ देहीं । करितां न विचारिसी कांहीं । काय चांचपसी मही । जी अखंड सोंवळी ॥३॥ कामक्रोधावेगळा । ऐसा होईं कां सोंवळा । तुका म्हणे कळा । गुंडुनि ठेवी कुसरी ॥४॥

३१४२. सत्यकर्में आचरें रे बापा । सत्यकर्में आचरें रे । सत्यकर्में आचरें रे । होईल हित वारेल दुःख असत्याचें ॥१॥ ऊंस वाढवितां वाढली हे गोडी । गूळ साकर हे त्याची परवडी ॥२॥ साकरेच्या आळां लाविला कांदा । स्थूळ साना परी वाढे दुर्गंधा ॥३॥ सत्य असत्य हें ऐसिया परी । तुका म्हणे याचा विचार करीं ॥४॥

३१४३. पाषाण देव पाषाण पायरी । पूजा येकावरी पाय ठेवी ॥१॥

सार तो भाव सार तो भाव । अनुभवीं देव तेचि झाले ।।२।। उदका भिन्न पालट काई । गंगा गोड येरां चवी काय नाहीं ।।३।। तुका म्हणे हेंचि भाविकाचें वर्म । येरीं धर्माधर्म विचारावे ।।४।।

३१४४. जन्मा येवोनि कां रे निदसुरा । जाई भेटी वरा रखुमाईच्या ।।१।। पाप ताप दैन्य जाईल सकळ । पावसी अढळ उत्तम तें ।।२।। संत महंत सिद्ध हरिदास दाटणी । फिटती पारणीं इंद्रियांचीं ।।३।। तुका म्हणे तेथें नामाचा गजर । फुकाची अपार लूट घेई ।।४।।

३१४५. काय धोविलें कातडें । काळकूट भितरीं कुडें ।।१।। उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ।।२।। वेसी बुंथी पानवथां । उगाच हालविसी माथा ।।३।। लाउनि बैस टाळी । मन इंद्रियें मोकळीं ।।४।। हालवीत बैसे माळा । विषयजप वेळोवेळां ।।५।। तुका म्हणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ।।६।।

३१४६. येई वो येई वो येई धांवोनियां । विलंब कां वायां लावियेला कृपाळे ।।१।। विठाबाई विश्वंभरे भवछेदके । कोठं गुंतलीस माय विश्वव्यापके ।।२।। न करीं न करीं आतां आळस अव्हेरू । व्हावया प्रगट कैचें दुरी अंतरु ।।३।। नेघे नेघे नेघे माझी वाचा विसावा । तुका म्हणे हांवा हांवा हांवा साधावा ।।४।।

३१४७. तरी कां पवाडे गर्जती पुराणें । असतां नारायण शक्तिहीन ।।१।। कीर्तिवीण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वानीत ना ।।२।। तरीच म्हणतो आहे चिरंजीव । केलीयाचा जीव सुखी गुण ।।३।। चांगले-पण हें निरुपमतां अंगीं । वाणलें श्रीरंगीं म्हणऊनि ।।४।। तरीच हा थोर सांगितलें करी । अभिमान हरीपासीं नाहीं ।।५।। तुका म्हणे तरी करिती याची सेवा । देवापासीं हेवा नाहीं कुडें ।।६।।

३१४८. तेव्हां घालें पोट बैसलों पंगती । आतां आम्हां मुक्तिपांग काई ।।१।। धांवा केला आतां येईल धांवोन । येथें कांहीं करणें न लगे संदेह ।।२।। गायनाचा आतां कोठें उरला काळ । आनंद सकळ भरी आले ।।३।। देवाच्या सख्यत्वें विषमासी ठाव । मध्यें कोठें वाव राहों शके ।।४।। तेव्हां

झाली अवघी बाधा वाताहात । प्रेम हृदयांत प्रवेशलें ॥५॥ तुका म्हणे आम्ही जिंतिलें भरंवसा । देव कोठें दासां मोकलिता ॥६॥

३१४९. हेंचि याच्या ऐसें मागावें दान । वंदूनि चरण नारायणा ॥१॥ धीर उदारींव निर्मळ निर्मत्सर । येणें सर्वेश्वर ऐसें नांव ॥२॥ हाचि होईजेल याचिया विभागें । अनुभवी अंगें अनुभविला ॥३॥ जोडे तयाचे कां न करावे सायास । झाला तरि आळस दीनपणें ॥४॥ पावल्यामागें कां न घालावी धांव । धरिल्या तरी हांव बळ येतें ॥५॥ तुका म्हणे घालूं खंडीमध्यें टांक । देवाचें हें येक करूनि घेऊं ॥६॥

३१५०. सत्तावळें येतो मागतां विभाग । लावावया लाग निमित्य करूं ॥१॥ तुझी ऐसी मुखें करूं उच्चारणा । बोलें नारायणा सांपडऊं ॥२॥ आसंवीण नाहीं उपजत मोहो । तरीच हा गोहो न पडे फंदीं ॥३॥ तुका म्हणे आतां व्हावें याजऐसें । सरिसें सरिसें समागमें ॥४॥

३१५१. करितो होय होय चित्तचि नाहीं । घटपट कांहीं करूं नये ॥१॥ मग हालतचि नाहीं जवळून । करावा तो शीण शिणवितो ॥२॥ साहतचि नाहीं कांहीं पांकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ॥३॥ तुका म्हणे तरी बोलावें झांकून । येथें खुणे खूण पुरतेंचि ॥४॥

३१५२. संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तीमंत ॥१॥ घालोनियां काळ अवघा बाहेरी । त्यामीच अंतरीं वास दिल्हा ॥२॥ आपुलेंसें जिहीं नाहीं उरों दिल्हें । चोजवितां भलें ऐसीं स्थळें ॥३॥ तुका म्हणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदनचि ॥४॥

३१५३. पुष्ट कांती निवती डोळे । हे सोहळे श्रीरंगीं ॥१॥ अंतर्बाहीं विलेपन । हें भूषण मिरवूं ॥२॥ इच्छेऐसी आवड पुरे । विश्वंभरें जवळीं ॥३॥ तुका करी नारायण । त्या या सेवन नामाचें ॥४॥

३१५४. सुकाळ हा दिवसरजनी । नित्य धणी नवीच ॥१॥ करूनि सेऊं नानापरी । राहे उरी गोडीनें ॥२॥ सरे ऐसा नाहीं झरा । पंक्ति करा समवेत ॥३॥ तुका म्हणे बरवा पान्हा । कान्हाबाई माऊलीचा ॥४॥

३१५५. पाहातां तंव येकला दिसे । कैसा असे व्यापक ॥१॥ ज्याचे

त्याचे मिळणीं मिळे । तरी खेळे बहुरूपी ॥२॥ जाणिवेचें नेदी अंग । दिसे रंग निवडेना ॥३॥ तुका म्हणे येचि ठाई । हें तों नाहीं सर्वत्र ॥४॥

३१५६. तुम्हांसाठीं आम्हां आपुला विसर । करितां अव्हेर कैसा दिसे ॥१॥ विचारा जी आतां ठाईंचें हें देवा । आम्हां नये हेवा वाढवितां ॥२॥ आलों टाकोनीयां सुखाची वसती । पुढें माझ्या युक्ति खुंटलिया ॥३॥ तुका म्हणे झाला सकळ वृत्तांत । केला प्रणिपात म्हणवूनी ॥४॥

३१५७. करावा उद्धार हें तुम्हां उचित । आम्हीं केली नीत कळली ते ॥१॥ पाचविली हाक धांवा म्हणऊन । करावें जतन ज्याचें तेणें ॥२॥ दुश्चित्तासी बोल ठेवायासी ठाव । ऐसा आम्ही भाव जाणतसों ॥३॥ तुका म्हणे माझें कायावाचामन । दुसरें तें ध्यान करित नाहीं ॥४॥

३१५८. संतांचा उपदेश आमुचे मस्तकीं । नाहीं मृत्युलोकीं राहाणेसा ॥१॥ म्हणऊनि बहू तळमळी चित्त । येई वो धांवत पांडुरंगे ॥२॥ उपजली चिंता लागला उशीर । होत नाहीं धीर निढळ वाटे ॥३॥ तुका म्हणे पोटीं रिघालेंसें भय । करूं आतां काय ऐसें झालें ॥४॥

३१५९. काळावरी घालूं तरी तो सरिसा । न पुसतां इच्छा दास कैसे ॥१॥ आतां नाहीं कांहीं उशिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥२॥ देणें लागे मग विलंब कां आड । गोड तरी गोड आदि अंत ॥३॥ तुका म्हणे होईल दर्शनें निश्चिंती । गाईन तें गीतीं ध्यान मग ॥४॥

३१६०. परउपकारीं काया वाचा मन । वेंचे सुदर्शन रक्षी तया ॥१॥ याजसाठीं असें योजिलें श्रीपती । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥२॥ परपिडे ज्याची जिव्हा मुडताळे । यमदूत टाळे करिती पूजा ॥३॥ तुका म्हणे अंबऋषि दुर्योधना । काय झालें नेणा दुर्वासया ॥४॥

३१६१. हागिल्याचे सिंके वोणवाचि राहे । अपशकून पाहे वेडगळ ॥१॥ अत्यंत समय नेणतां अवकळा । येऊं नये बळा सिक धरी ॥२॥ भोजनसमयीं वोकाचा आठव । ठकोनियां जीव कष्टी करी ॥३॥ तुका म्हणे किती सांगावें उगऊन । अभाग्याचे गुण अनावर ॥४॥

३१६२. नारडे तरी काय नुजेडे कोंबडें । करूनियां वेडे आग्रह दावी

॥१॥ आइत्याचें साहे फुकाचा विभाग । विक्षेपानें जग छी थू करी ॥२॥ नेमूनि ठेविला करत्यानें काळ । न लाहेसें बळ पुढें करूं ॥३॥ तुका म्हणे देव साह्य झाल्यावरी । असांगचि करी सर्व सांग ॥४॥

३१६३. तरी सदा निर्भर दास । चिंता आस विरहित ॥१॥ अवघाचि येकी ठाव शुद्ध भाव विठ्ठलीं ॥२॥ निरविलें तेव्हां त्यास । झाला वास त्यामाजी ॥३॥ तुका म्हणे रूप घ्यावें । नाहीं ठावे गुणदोष ॥४॥

३१६४. वेडिया उपचार करितां सोहळे । काय सुख कळे तयासी तें ॥१॥ अंधापुढें दीप नाचती नाचणें । भक्तिभावेंवीण भक्ति तैसी ॥२॥ तिमाणें रावण ठेवियेलें शेता । घालूनियां माथां चुना तया ॥३॥ खादलें म्हणानि शेवटीं बोंबली । ठाईंची भुली कां नेणां रया ॥४॥ मुकीयापासाव सांगतां पुराणें । रोगीया मिष्टान्नें काय होय ॥५॥ नपुंसका काय करील पद्मिणी । रुचीवीण वाणी तैसी होय ॥६॥ हात पाय नाहीं करील तो काय । वृक्षीं फळ आहे अमोलिक ॥७॥ हातां नये तैसा वायां तळमळी । भावेंवीण भोळी म्हणे तुका ॥८॥

३१६५. मेघवृष्टीनें करावा उपदेश । परी गुरूनें न करावा शिष्य । वांटा लाभे त्यास । केल्या अर्धकर्माचा ॥१॥ द्रव्य वेंचावें अन्नछत्रीं । भूतीं घ्यावें सर्वत्र । न घ्यावा हा पुत्र । उत्तम याती पोसणा ॥४॥ बीज न पेरावें खडकीं । बोल नाहीं ज्यांचे बुडखीं । थिता ठके सेखीं पाठीं । लागे दिवाण ॥३॥ गुज बोलावें संतांसीं । पत्नी राखावि जैसी दासी । लाड देतां नियेसी । वांटा पावे कर्माचा ॥४॥ शुद्ध कर्मांनि पाहावें । वरील रंगा न भुलावें । तुका म्हणे घ्यावें । जया नये तुटी तें ॥५॥

३१६६. नावडावे जन नावडावा मान । करूनि प्रमाण तूंचि होई ॥१॥ सोडवूनि देहसंबंध व्यसनें । ऐशी नारायणें कृपा कीजे ॥२॥ नावडावें रूप नावडावे रस । अवघी राहो आस पायांपासीं ॥३॥ तुका म्हणे आतां आपुलीया सत्ता । करूनि अनंता ठेवीं ऐसें ॥४॥

३१६७. उपाधीवेगळे तुम्ही निर्विकार । कांहींच संसार तुम्हां नाहीं ॥१॥ ऐसें मज करुनी ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥२॥

निसंग तुम्हांसी राहाणें येकंट । नाहीं कटकट साहों येत ॥३॥ तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा । रंगाशी सकळा स्फटिकाची ॥४॥

३१६८. माहार मातेचे पर्णी भरे । न कळे खरें पुढील ॥१॥ वोंगळ अधमाचे गुण । जातां घडी न लगेचि ॥२॥ श्वान झोळी स्वामीसत्ता । कोप येतां उतरे ॥३॥ तुका म्हणे गुमान कां । मांगों लोकां अधमामी ॥४॥

३१६९. डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तेंहि न समाये ॥१॥ तैसें शुद्ध करीं हित । नको चित्त बाटऊं ॥२॥ आपुल्याचा कळवळा । आणिका बाळावरी नये ॥३॥ तुका म्हणे बीज मुडा । जैसा चाडा पिकाच्या ॥४॥

३१७०. मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ॥१॥ वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा वस्तुची ॥२॥ भस्म दंड नलगे काठी । तीर्थी आटी भ्रमण ॥३॥ तुका म्हणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥४॥

३१७१. आग लागो तया सुखा । जेणें हरी नये मुखा ॥१॥ मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं ॥२॥ जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ॥३॥ तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥४॥

३१७२. आतां न म्हणें मी माझें । नेणें भार कांहीं वोझें ॥१॥ तूंचि तारिता मारिता । कळों आलासी निरुता ॥२॥ अवघा तूंचि जनार्दन । संत बोलती वचन ॥३॥ तुका म्हणे कांहीं । माझें तीळभरी नाहीं ॥४॥

३१७३. समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥१॥ म्हणऊनि कोणी न करावा आळस । म्हणा रात्रंदीस राम राम ॥२॥ सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी न पवे गोविंदनामें येकें ॥३॥ सकळही तीर्थे प्रयागादि काशी । करितां नामासी तुळती ना ॥४॥ कर्वतीं कर्मरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥५॥ तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम येक सार विठोबाचें ॥६॥

३१७४. अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कळीं न घडे साधन । उचित विधी विधान । न कळे न घडे सर्वथा ॥१॥ भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवेया पापा । जाणें येणें खेपा । येणें येकें खुंटती ॥२॥ उभारूनि बाहे । विठो पालवीत आहे । दासा मीची साहे । मुखें बोले आपुल्या ॥३॥

भाविक विश्वासी । पार उतरिलें त्यांसी । तुका म्हणे नाशी । कुतर्क्याचे कपाळीं ॥४॥

३१७५. आम्ही नामाचे धारक । नेणों प्रकार आणिक । सर्वभावें येक । विठ्ठलाचि प्रमाण ॥१॥ नलगे जाणावें नेणावें । गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचे संगती ॥२॥ भावबळें घालूं कास । लज्जा चिंता दवडूं आस । पाई निजध्यास । म्हणऊं दास विष्णूचे ॥३॥ भय नाहीं जन्म घेतां । मोक्षसुखा हाणूं लाता । तुका म्हणे सत्ता । करूं निकट सेवेची ॥४॥

३१७६. आम्ही हरिचे भवगडे । जुने ठाईचे वेडे बागडे । हातीं धरूनि कडे । पाटासवें वागविलों ॥१॥ म्हणोनि भिन्न भेद नाहीं । देवा आम्हा येकदेहीं । नाहीं झालों कांहीं । येका येक वेगळे ॥२॥ निद्रा करितां होतों पाई । सवेंचि लंका घेतला तई । वानरें गोवळ गाई । सवें चारीत फिरतसों ॥३॥ आम्हा नामाचें चिंतन । राम कृष्ण नारायण । तुका म्हणे क्षण । खातां जेवितां न विसंबों ॥४॥

३१७७. मागें बहुतां जन्मीं । हेंचि करीत आलों आम्ही । भवतापश्रमीं । दुःखें पीडिली निववूं त्यां ॥१॥ गर्जों हरिचे पवाडे । मिरवों वैष्णव बागडे । पाझर रोकडे । काढूं पाषाणामध्यें ॥२॥ भाव शुद्ध नामावळी । हर्षें नाचूं पिटूं टाळी । घालूं पायांतळीं । कळिकाळ या बळें ॥३॥ कामक्रोध बंदिखानीं । तुका म्हणे दिल्हे दोन्ही । इंद्रियांचें धणी । आम्ही झालों गोसावी ॥४॥

३१७८. अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ॥१॥ चाल जाऊं संतांपुढें । वाद सांगेन निवाडे ॥२॥ तुज नांव जरी नाहीं । तरी दाव माझें काई ॥३॥ तुज रूप जरी नाहीं । तरी माझें दाव काई ॥४॥ खेळमी तूं लीळा । तेथें मी काय वेगळा ॥५॥ साच तूं लटिका । तैसा मीही म्हणे तुका ॥६॥

३१७९. मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ॥१॥ अशौच तो बाधी आणिका अक्षरा । नाम निरसुग घेतां तरे ॥२॥ रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्व काळ शुभदायक ॥३॥ आणिकां भजना

बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥४॥ तुका म्हणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरुनी नेली नामें ॥५॥

३१८०. नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त नव्हती संत ॥१॥ येथें नाहीं वेपें सरते आडनांव । निवडे घाव डाव व्हावा अंगीं ॥२॥ नव्हती ते संत धरीतां भोपळा । करीतां वाकळा प्रावरण ॥३॥ नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥४॥ नव्हती ते संत करीतां तप तीर्थाटण । सेवीलीया वन नव्हती संत ॥५॥ नव्हती ते संत करीतां कीर्तनें । सांगतां पुराणें नव्हती संत ॥६॥ नव्हती ते संत माळा-मुद्रांच्या भूषणें । भस्म उधळणें नव्हती संत ॥७॥ तुका म्हणे नाहीं निरसला देहे । तंव अवघे हे संवसारिक ॥८॥

३१८१. हेंचि दान देगा देवा । तुझा वीसर न व्हावा ॥१॥ गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥२॥ नलगे मुक्ति आणि संपदा । संत संग देईं सदा ॥३॥ तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हांसी ॥४

३१८२. भाग्यवंता हे परवडी । करिती जोडी जन्माची ॥१॥ आपुलाल्या लाहो भावें । जें ज्या व्हावें तें आहे ॥२॥ इच्छा भोजनाचा दाता । नलगे चिंता करावी ॥३॥ तुका म्हणे आल्या थाऱ्या । वस्तु बऱ्या मोलाच्या ॥४॥

३१८३. वेंचुनियां पिंड । माता दान करी लंड ॥१॥ जैसी याची चाली वरी । तैसा अंतरला दुरी ॥२॥ मेला राखे दिस । ज्यालेपण झालें वोस ॥३॥ तुका म्हणे देवा । लोभें न पुरेचि सेवा ॥४॥

३१८४. अखिरा माझ्या मना ऐका एक मात । तूं कां रे दुश्चीत निरंतर ॥१॥ हेचि चिंता काय खावें म्हणऊनी । भले तुजहूनी पक्षीराज ॥२॥ पाहा ते चातक नेघे भूमीजळा । वरुषे उन्हाळा मेघ तयां ॥३॥ सकळां यातीमध्यें ठक हा सोनार । त्या घरीं व्यापार झारीयाचा ॥४॥ तुका म्हणे जळीं वनीं जीव येक । तयापासीं लेख काय असे ॥५॥

३१८५. कां रे नाठवीसी कृपाळु देवासी । पोसीतो जगासी येकला तो ॥१॥ बाळा दूध कोण करितो उत्पत्ति । वाढवी श्रीपति सवें दोनी ॥२॥

फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥३॥ तेणें तुझी काय केली नाहीं चिंता । राहे त्या अनंता आठऊनी ॥४॥ तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥५॥

३१८६. उदारा कृपाळा पतीतपावना । ब्रीदें नारायणा साच तुझी ॥१॥ वर्णिलासी जैसा जाणता नेणता । तैसा तूं अनंता साच हासी ॥२॥ दैत्यां काळ भक्तां मेघश्याममूर्ति । चतुर्भुज हातीं शंखचक्र ॥३॥ काम इच्छा तयां तैसा होशि राणी । येशोदेच्या स्तनीं पान करी ॥४॥ होऊनी सकळ कांहींच न होसी । तुका म्हणे यासी वेद ग्वाही ॥५॥

३१८७. मरण माझें मरोनी गेलें । मज केलें अमर ॥१॥ ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभाव ॥२॥ आला होता गेला पूर । धरिला धीर जीवनीं ॥३॥ तुका म्हणे बुनादीचें । झालें साचें उजवणें ॥४॥

३१८८. माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥१॥ गोष्टी न करीं नांव नेघे । गेलों दोघे खंडोनी ॥२॥ स्तुतिसमवेत निंदा । केला धंदा उदंड ॥३॥ तुका म्हणे निवांत ठेलों । वेंचित आलों जीवित्व ॥४॥

३१८९. लवविली तयासवें लवे जाती । अभीमाना हातीं सांपडेना ॥१॥ भोळीवेंचे लेणे विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ॥२॥ अर्चन वंदन नवविधा भक्ति । दया क्षमा शांति तये ठाईं ॥३॥ तये गांवीं नाहीं दुःखाची वसती । अवघाचि भूतीं नारायण ॥४॥ अवघेंची झालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ॥५॥ तुका म्हणे गाजे वैकुंठीं सोहळा । याहि भूमंडळामाजी कीर्ति ॥६॥

३१९०. पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणिक न करीं तीर्थव्रत ॥१॥ व्रत येकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशीं मुखीं नाम ॥२॥ नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचें तुका म्हणे ॥३॥

३१९१. संपदा सोहळा नावडे मनाला । करीता कंटाळा पंढरीचा ॥१॥ जावें पंढरीसी आवडी मनासी । कधीं येकादशी आषाढी हे ॥२॥ तुका म्हणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥३॥

३१९२. कथनीं पठणीं करूनीयां काय । वांचूनी रहणी वायां जाय

॥१॥ मुखीं वाणी अमृतगोडी । मिथ्या भूकें चरफडी ॥२॥ पीळणी पाक करितां दगडा । काय जडा होय तें ॥३॥ मधु मेळऊनी माशी । आणिका सांसी पारधिया ॥४॥ मेळऊनी धन मेळवि माती । लोभ्या हातीं तेंचि मुखीं ॥५॥ आपुलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥६॥

३१९३. उमटती वाणी । वाटे नामाचीया ध्वनी ॥१॥ बरें सेवन उपकारा । द्यावें द्यावें या उत्तरा ॥२॥ सरळ आणि मृद । कथा पाववी ते ऊर्ध्व ॥३॥ गात जातो तुका । हाचि उपदेश आइका ॥४॥

३१९४. कथाकाळींची मर्यादा । सांगतों तें भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा । हेंचि येक आवडे ॥१॥ टाळ वाद्य गीत नृत्य । अंतःकरण प्रेमभरित । वाणिता तो कीर्त । तद्भावनें लेखावा ॥२॥ नये आळसें मोडूं अंग । कथे कानवडे ढुंग । हेळणेचा रंग । दावी तो चांडाळ ॥३॥ तोंडीं विडा माने ताठा । थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा । गोष्टी लावी तो चांडाळ ॥४॥ कथे इच्छी मान । दाउनीयां थोरपण । रजा संकोचन । लुगडीं सांवरितो चांडाळ ॥५॥ आपण बैसे गाजेवरी । सामान्य हरिच्या दासां धरी । तरि तो शूळावरी । वाहिजे निश्चयें ॥६॥ येतां न करी नमस्कार । कर जोडोनियां नम्र । न म्हणतां थोर । आणिकां खेटी तो चांडाळ ॥७॥ तुका विनवी जना । कथे नाणावे अवगुणा । करा नारायणा । ऋणी समर्पक भावें ॥८॥

३१९५. कथा देवाचें हें ध्यान । कथा साधन मंडण । कथेऐसें पुण्य । आणिक नाहीं सर्वथा ॥१॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥२॥ मंत्र स्वल्प जना । उच्चारीतां वाचे मना । म्हणतां नारायणा । क्षणे जळति महादोष ॥३॥ भावें करितां कीर्तन । तरे तारी आणिक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं म्हणे तुका ॥४॥

३१९६. कथा त्रिवेणी संगम । भक्त देव आणि नाम । तेथींचे उत्तम । चरणरज वंदितां ॥१॥ जळति दोषांचें डोंगर । शुद्ध होती नारी नर । गाति ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा ॥२॥ तीर्थे तया ठायां । येति पुनीत व्हावया । पर्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥३॥ अनुपम्य हा महिमा ।

नाहीं द्यावया उपमा । तुका म्हणे ब्रह्मा । नेणे वर्णूं या सुखा ॥४॥

३१९७. सांडूनि कीर्तन न करीं आणिक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥१॥ आवडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां याचिलागीं ॥२॥ टाळी वाहोनियां विठ्ठल म्हणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥३॥ तुका म्हणे देवा नुपेक्षावें आम्हां । न्यावें निजधामा आपुलीया ॥४॥

३१९८. जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥१॥ हेचि बळीवंत गाढे । आनंद करूं दिंडीपुढें ॥२॥ कली पापाची हे मूर्ति । नाम खड्ग घेऊं हातीं ॥३॥ तुका म्हणे जाऊं । बळें दमामे हे लाऊं ॥४॥

३१९९. यमधर्म सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता । जेथें होय हरिकथा । सदा घोष नामाचा ॥१॥ नका जाऊं तया गांवा । नामधारकाच्या शीवा । सुदर्शन यावा । घरटि फिरे भोंवतीं ॥२॥ चक्र गदा घेउनी हरी । उभा असे त्याचे द्वारीं । लक्षुमी कामारी । रिद्धि सिद्धि सहित ॥३॥ ते बळीया शिरोमणी । हरिभक्त ये मेदिनी । तुका म्हणे कानीं । यम सांगे ते दूतांचे ॥४॥

३२००. कान्हया रे जगजेठी । देईं भेटी येक वेळे ॥१॥ काय मोकलीलें वनीं । सावजांनीं वेढिलें ॥२॥ येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ॥३॥ तुका म्हणे पाहिलें मागें । येवढ्या वेगें अंतरला ॥४॥

३२०१. आपुल्या आम्हीं पुसिलें नाहीं । तुज कांहीं कारणें ॥१॥ मागें मागें धांवत आलों । कांहीं बोलों यासाठीं ॥२॥ बहुत दिवस होतें मनीं । घ्यावि धणि येकांतीं ॥३॥ तुका म्हणे उभा राहें । कान्हो पाहें मजकडे ॥४॥

३२०२. धन्य बाया ऐशा नारी । घरींदारीं नांदती ॥१॥ चोरूनियां तुजपासीं । येती त्यासी न कळतां ॥२॥ दोहीं ठाईं समाधान । सम काठिण बहुतांची ॥३॥ तुका म्हणे जीवासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥४॥

३२०३. उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलीया ॥१॥ वेंटाळीला भोंवता हरी । मयोर फेरी नाचती ॥२॥ मना आलें करिती चार । त्या फार हा येकला ॥३॥ तुका म्हणे नारायणीं । निरंजनीं मीनलिया ॥४॥

३२०४. विषमाची शंका वाटे । सारिखें भेटे तरी सुख ॥१॥ म्हणऊनी

चोरिलें जना । आल्या रानां येकांती ॥२॥ दुजियास कळों नये । जया सोय नाहीं हें ॥३॥ तुका म्हणे मोकळें मन । नारायण भोगासी ॥४॥

३२०५. आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥१॥ न घडे मागें परतोन । नारायण संभोगी ॥२॥ वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियांत ॥३॥ तुका म्हणे अंतरध्यानीं । जीव जीवनीं विराल्या ॥४॥

३२०६. कोणी सुना कोणी लेंकी । कोणी येकी सतंता ॥१॥ अवघीयांची जगनिंद । झाली धींद सारिखी ॥२॥ अवघ्या अवघ्या चोरा । विना वरा मायबापा ॥३॥ तुका म्हणे करा सेवा । आलें जीवावरती ॥४॥

३२०७. येथील जे येक घडी । तये जोडी पार नाहीं ॥१॥ किती त्याचा सासुरवास । कैंचा रस हा तेथें ॥२॥ अवघे दिवस गेले कामा । नाहीं जन्मा खंडण ॥३॥ तुका म्हणे रतल्या जनीं । सोडा झणीं कान्होबा ॥४॥

३२०८. चिंता नाहीं गांवीं विष्णुदासाचीये । घोष जयजयकार सदा ॥१॥ नारायण घरीं सांठविलें धन । अवघेंचि वान तया पोटीं ॥२॥ सवंग सकळां पुरे धणीवरी । सेवावया नारी नर बाळां ॥३॥ तुका म्हणे येथें आनंदीं आनंदु । गोविंदें गोविंदु पिकाविला ॥४॥

३२०९. करती तया वेवसाव आहे । येथें व्हा रे साह्य येका येक ॥१॥ गातां आइकतां समानचि घडे । लाभें लाभ जोडी विशेषता ॥२॥ प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं । नटे टाळी रंगीं शूरत्वेंसी ॥३॥ तुका म्हणे बहु जन्माचें खंडण । होईल हा शीण निवारूनी ॥४॥

स्वामीचे अभंगांवर साळोमाळो आपलें नांव घालीत होते तेव्हां केले ते अभंग

३२१०. नाहीं घाटावें लागत । येका शितें कळे भात ॥१॥ क्षीर निवडी तें पाणी । चोंची हंसाचीये आणी ॥२॥ आंगडें फाडोनि घोंगडें करी । अंग झाला तयेपरी ॥३॥ तुका म्हणे कण । भुसीं निवडे कैंचा शीण ॥४॥

३२११. साळोमाळो हरिचे दास । म्हणोनी केला अवघा नास ॥१॥ अवघें बचमंगळ केलें । म्हणती येकाचें आपुलें ॥२॥ मोडून संतांचीं वचनें । करिती आपणयां भूषणें ॥३॥ तुका म्हणे कवि । जगामधीं रूढी दावी ॥४॥

३२१२. जायांचे अलंकार। बुडवोनी चोर ॥१॥ त्यांशी ताडणाची पूजा। योग घडे ब-या वोजा ॥२॥ अभिलाषासुखें । अंतीं होती काळीं मुखें ॥३॥ तुका म्हणे चोरा। होय भूषण मातेरा ॥४॥

३२१३. कण भुसाचे आधारें । परी तें निवडितां बरें ॥१॥ काय घोंगाणी पाधाणी। ताकामध्यें घाटी लोणी ॥२॥ सुयणीपुढें चेटा । काय लपवीसी चाटा ॥३॥ तुका म्हणे ज्ञान। दिमाखाची भगभण ॥४॥

३२१४. विकेल तेथें विका । माती नांव टेऊनि बुका ॥१॥ हा तो नीवाड्याचा ठाव। खऱ्या खोट्या निवडी भाव ॥२॥ गरवारे हा विधी। पोट वाढविलें चिंधी ॥३॥ लाऊं जाण विल्हे। तुका साच आणिक कल्हे ॥४॥

३२१५. विषयीं अद्वय। त्यासी आम्हां शिवों नये ॥१॥ देव तेथूनी निगळा। असे निष्काम वेगळा ॥२॥ वासनेचि गुंती। तेथें कैंचि ब्रह्म-स्थिती ॥३॥ तुका म्हणे असतां देहीं। जमति तेथें नाहीं ॥४॥

३२१६. नमितों या देवा। माझी येके ठाईं सेवा ॥१॥ गुण अवगुण निवाडा। म्हैस म्हैस रेडा रेडा ॥२॥ जनीं जनार्दन । साक्षी त्यासी लोटांगण ॥३॥ तुका म्हणे खडे। निवडूं दळणीं घडघडे ॥४॥

३२१७. कालऊनि विष। केला अमृताचा नाश ॥१॥ ऐशा अभा-ग्याच्या बुद्धी। सत्य लोपी नाहीं शुद्धी ॥२॥ नाक कापुनि लावी सोनें। कोण अळंकार लेणें ॥३॥ तुका म्हणे बावी। मोडूनि मदार बांधावी ॥४॥

३२१८. जीव जीती जीवना संगें। मत्स्या मरण त्या वियोगें ॥१॥ जया चित्तीं जैसा भाव। तया जवळी तैसा देव ॥२॥ सकळां पडिये भानु। परि त्या कमळाचें जीवनु ॥३॥ तुका म्हणे माता । वाहे तान्हुल्याची चिंता ॥४॥

३२१९. मुंगियाच्या घरा कोण जाय मूळ। देखोनियां गूळ धांव घाली ॥१॥ याचकाविणे काय खोळंबला दाता। तोचि धांवे हीता आपुलिया ॥२॥ उदक अन्न म्हणे काय मज खाय। भुकेला तो जाय चोजवीत ॥३॥ व्याधी पीडीला तो धांवे वैद्याचीया घरा। दुःखाच्या परिहारा आपुलीया ॥४॥ तुका म्हणे जया आपुलें स्वहीत। करणें तोची प्रीत धरी कथे ॥५॥

३२२०. जन्मांतरींचा पगीट न्हावी । जाती ठावी त्यानें ते ॥१॥ वाखर जैसा चरचरी । तोंड करी भंवदणी ॥२॥ पूर्वजन्मीं शिखासूत्र । मळमूत्र अंतरी ॥३॥ तुका म्हणे करिती निंदा । धुवटधंदा पुढिलाचा ॥४॥

३२२१. नाम दूषी त्याचें नको दरुशन । विष तें वचन वाटे मज ॥१॥ अमंगळ वाणी नायकावी कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥२॥ काय साचा लाभ त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिल्ही ग्वाही ॥३॥ काय आड लाऊं त्याचीया तोंडासी । आतां या जीभेसी काय करूं ॥४॥ तुका म्हणे संत न मानिती त्यास । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥५॥

३२२२. येऊनी नरदेहा झांकतील डोळे । बळेंचि आंधळे होती लोक ॥१॥ उजेडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनीयां ॥२॥ बहु फेरे आले सोसोनि वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥३॥ तुका म्हणे जाऊं सादावीत वाटे । भेटे तरी भेटे कोण्हीतरी ॥४॥

३२२३. नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ॥१॥ बळिया माझा पंढरिराव । जो हा देवांचाही देव ॥२॥ चंडि रंडी शक्ति । मद्यमांस जे भक्षिती ॥३॥ भैरव खंडेराव । रोटिसुटिसाठीं देव ॥४॥ गणोबा विक्राळ । लाडुमोदकांचा काळ ॥५॥ मुंजा म्हैसासुरें । हे तों कोण लेखी पोरें ॥६॥ वेताळें फताळें । जळो त्यांचें तोंड काळें ॥७॥ तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती ॥८॥

३२२४. पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥१॥ मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥२॥ हरिनामाच्या चिंतनें । वारा वाटा पळती विघ्नें ॥३॥ तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥४॥

३२२५. मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलीया बळें न वचे ते ॥१॥ रुसोनीयां पळे सांडोनियां ताट । मागें पाहे वाट यावें ऐसें ॥२॥ भांडवल आम्हां आळी करावी हे । आपणचि माये धांवसील ॥३॥ तुका म्हणे आळी करुनीयां निकी । देसील भातुकीं बुझाऊनी ॥४॥

३२२६. नागर गोंडें बाळरूप । तें स्वरूप काळीचें ॥१॥ गाईगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलीका ॥२॥ तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर

मिरवती ॥३॥ नेणपणें उगेचि उभें । भक्तिलोभें राहिलें ॥४॥ नेणें वरदळाचा मान । विटे चरण सम उभें ॥५॥ सहज कटावरी हात । दहींभात शिदोरी ॥६॥ मोहरी पांवा गंजिवा पाटीं । धरिली काठी ज्या काळें ॥७॥ रम्य स्थळ चंद्रभागा । पाडुरंगा क्रीडेसी ॥८॥ भीमा दक्षिणमुख वाहे । दृष्टि पाहे समोर ॥९॥ तारावेंसें मूढ लोकां । दिधली भाका पुंडलिका ॥१०॥ तुका म्हणे वैकुंठवासी । भक्तांपासीं राहिला ॥११॥

३२२७. विठ्ठलनामाचा ज्या नाहीं विश्वास । तो वसे उदास नर्कामध्यें ॥१॥ तयासी बोलतां होईल विटाळ । न वजाय तो जळें स्नान करितां ॥२॥ विठ्ठलनामाची ज्या नाहीं आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ॥३॥ तुका म्हणे मज विठोबाची आण । जरी प्रतिवचन करीन त्यासी ॥४॥

३२२८. तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ॥१॥ कांहीं नलगे शीणावें । आणिक वेगळीया भावें ॥२॥ वाचे उच्चारावे । रामकृष्ण-गोविंदा ॥३॥ फळ पावाल अवलीळा । भोगा वैकुंठ सोहळा ॥४॥ तुका म्हणे त्याच्या नांवें । तोचि होईजे स्वभावें ॥५॥

३२२९. पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारक महिमा ॥१॥ मागें जाळीं महादोष । पुढें नाहीं गर्भवास ॥२॥ जे निंदिलें शास्त्रें । वंद्य झाले नाममात्रें ॥३॥ तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ॥४॥

३२३०. नाम घेतां नलगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥१॥ दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावे राम राम ॥२॥ नाहीं वर्ण धर्म याती । नामें अवघेचि तरती ॥३॥ तुका म्हणे नाम । चैतन्य हें निजधाम ॥४॥

३२३१. नाम घेता वायां गेला । ऐसा कोणें आयकिला ॥१॥ सांगा विनवितों तुम्हांसी । संत महंत सिद्ध ऋषी ॥२॥ नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ॥३॥ सलगीच्या उत्तरा । तुका म्हणे क्षमा करा ॥४॥

३२३२. फुकाचे तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥१॥ नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ॥२॥ उदंड भावें दंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥३॥ तुका म्हणे घरींच्या घरीं । देशा उरीं न शीणीजे ॥४॥

३२३३. इतुलें करीं देवा ऐकें हें वचन । समूळ अभिमान जाळीं माझा

॥१॥ इतुलें करीं देवा आईकें हे गोष्टी । सर्व समदृष्टी तुज देखें ॥२॥ इतुलें करीं देवा विनवितों तुज । संतचरणरज वंदीं माथां ॥३॥ इतुलें करीं देवा ऐकें हेचि मात । हृदईं पंढरीनाथ दिवसरात्रीं ॥४॥ भलतीया भावें तारीं पंढरीनाथा । तुका म्हणे आतां शरण आलों ॥५॥

३२३४. तुझा दास ऐसें म्हणती लोकपाळ । म्हणऊनी सांभाळ करीं माझा ॥१॥ अनाथांचा नाथ पतीतपावन । हें आतां जतन करीं नाम ॥२॥ माझे गुण दोष पाहतां नलगे अंत । असे माझें चित्त मज ग्वाही ॥३॥ नेणों तुझी कैसी करावी ते सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचें ॥४॥ तुका म्हणे तूं या कृपेचा हा सिंधु । तोडीं भवबंधु माझा देवा ॥५॥

३२३५. जाणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥१॥ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥२॥ बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥३॥ जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवीतां नाम तुझें ॥४॥ तुका म्हणे तुंचि करिसी तें सोपें । पुण्य होती पापें आमुच्या मतें ॥५॥

३२३६. नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥१॥ दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेऊं दे चरणावरी माथा ॥२॥ पाहोनी श्रीमुख देईन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥३॥ पुसतां सांगेन हित गुज मात । बैसोनी येकांत सुखगोष्टी ॥४॥ तुका म्हणे यासी न लावीं उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥५॥

३२३७. मागें शरणागत तारीले बहुत । म्हणती दीनानाथ तुज देवा ॥१॥ पाहिले अपराध नाहीं याती कूळ । तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥२॥ अढळपदीं बाळ बैसवीला धुरु । क्षीराचा सागरु उपमन्यु ॥३॥ गजेंद्रपशु नाडीला जळचरें । भवसिंधू पार उतरीला ॥४॥ प्रल्हाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥५॥ पांडवा संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥६॥ तुका म्हणे तूं या अनाथांचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥७॥

३२३८. तुझा शरणागत झालों मी अंकीत । करीं माझें हित पांडुरंगा

॥१॥ पतित पावन तुझी ब्रीदावळी । तें आतां सांभाळीं मायबापा ॥२॥ अनाथांचा नाथ बोलती ते संत । ऐकोनियां मात विश्वासलों ॥३॥ न करावी निरास न धरावे उदास । देईं याचकास कृपादान ॥४॥ तुका म्हणे मी तों पातकाची राशी । देईं पायांपासीं ठाव देवा ॥५॥

३२३९. सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिंपे विटाळा अग्नी जैसा ॥१॥ सत्यवादी करी संसार सकळ । अलिप्त कमळ जळीं जैसें ॥२॥ घडे ज्या उपकार भूतांची ते दया । आत्मस्थिती तया अंगीं वसे ॥३॥ बोले गुण दोष नाइके जो कानीं । वर्तोनी तो जनीं जनार्दन ॥४॥ तुका म्हणे वर्म जाणितल्यावीण । पावे करितां शीण सांडिमांडि ॥५॥

३२४०. कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्मे निधान हाता चढे ॥१॥ कुळधर्मे गति कुळधर्मे भक्ति । कुळधर्म विश्रांती पाववील ॥२॥ कुळधर्मे दया कुळधर्मे उपकार । कुळधर्म सार साधनाचे ॥३॥ कुळधर्मे महत्त्व कुळधर्मे मान । कुळधर्म पावन परलोकींचे ॥४॥ तुका म्हणे कुळधर्म दावी देव । यथाविध भाव जरी होय ॥५॥

३२४१. पुण्य परोपकार पाप तें परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजयासी ॥१॥ सत्य तोचि धर्म असत्य तें अकर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥२॥ गति तेंचि मुखीं नामांचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥३॥ संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळा ॥४॥ तुका म्हणे उघडें आहे हीत घात । जया जें उचित करा तैसें ॥५॥

३२४२. न वजे वायां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वायां न वजे ॥१॥ न वजे वायां कांहीं देऊळासी जातां । देवासी पूजतां वायां न वजे ॥२॥ न वजे वायां काहीं केलियांसी तीर्थ । अथवा कां व्रत वायां न वजे ॥३॥ न वजे वायां झालें संतांचें दर्शन । शुद्ध आचरण वायां न वजे ॥४॥ तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वायां न वजे ॥५॥

३२४३. चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार । सकळां बिढार संपत्तीचें ॥१॥ कंठीं धरी नाम अमृताची वल्ली । होईल राहीली शीतळा तनु ॥२॥ पाहीन श्रीमुख सुंदर साजीरें । सकळां आगर लावण्याचें ॥३॥ करीन

अंग संग बाळकाचे परी । बैसेन तोंवरी नुतरे कडिये ॥४॥ तुका म्हणे हाची केला तैसा होय । धरिला मनें सोय विठोबाची ॥५॥

३२४४. बाळ मातेपाशीं सांगे तान्हभूक । उपायाचें दुःख काय जाणे ॥१॥ तया परी करी पाळण हें माझें । घेवोनियां वोझें सकळही भार ॥२॥ कासया गुणदोष आणसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥३॥ सेवाहीन दीन पातकाची राशी । आतां विचारीसी काय ऐसें ॥४॥ जेणें काळें पाईं अनुसरलें चित्त । निर्धार हें हीत झालें ऐसें ॥५॥ तुका म्हणे तुम्हीं तारीलें बहुतां । माझी कांहीं चिंता असो देवा ॥६॥

३२४५. जीवनावांचूनी तळमळे मासा । प्रकार हा तैसा होतो जीवा ॥१॥ न सांपडे झालें भूमिगत धन । चरफडी मन तयापरी ॥२॥ मातेचा वियोग झालीया बाळा । हा तो कळवळा जाणा देवा ॥३॥ सांगावे ते कीती तुम्हांसी प्रकार । सकळांचें सार पाय दावीं ॥४॥ येचि चिंते माझें करपलें भीतर । कां नेणों विसर पडिला माझा ॥५॥ तुका म्हणे तूं हें जाणसी सकळ । यावरी कृपाळ होशी देवा ॥६॥

३२४६. शरण आलें त्यासी न दावी हे पाठी । ऐका जगजेठी विज्ञापना ॥१॥ आळवितां तया उत्तर झडकरी । द्यावें परि हरी विज्ञापना ॥२॥ गांजिलीयाचें तुवां करावें धांवणें । विनंती नारायण परिसावी हे ॥३॥ भागलियाचा होई रे विसावा । परिसावी केशवा विज्ञापना ॥४॥ अंकिताचा भार वागवावा माथां । परिसावी अनंता विज्ञापना ॥५॥ तुका म्हणे आम्हां विसरविना देवा । परिसावी केशवा विज्ञापना ॥६॥

३२४७. कोण आम्हां पुसे शिणलें भागलें । तुजवीण उगलें पांडुरंगा ॥१॥ कोणापाशीं आम्हीं सांगावें सुखदुःख । कोण तान्हभूक निवारील ॥२॥ कोण या तापाचा करील परिहार । उतरील पार कोण दूजे ॥३॥ कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥४॥ कोणावरी आम्हीं करावी हे सत्ता । होइल साहाता कोण दूजा ॥५॥ तुका म्हणे अगा स्वामी सर्व जाणा । दंडवत चरणा तुमच्या देवा ॥६॥

३२४८. प्रीती नाहीं राया वर्जीली ते कांता । परी तिची सत्ता जगा-

वरी ॥१॥ तैसे दंभीं झालों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहाती ॥२॥ राजीयाचा पुत्र अपराधी देखा । तो काय आणिकां दंडवेल ॥३॥ बाहातर खोडी परी देवमणी कंठीं । तैसा मी जगजेठी म्हणे तुका ॥४॥

३२४९. करावा उद्धार किंवा घ्यावी हारी । येका बोला स्थीरीं राहें देवा ॥१॥ निराशेनें माझा होईल संदेह । अवघेंचि आहे मूळ पाई ॥२॥ राहिलों डिंकोनी कांहींच न कळे । कोण्या नेणों काळें उदय भाग्य ॥३॥ तुका म्हणे बहु उद्वेगला जीव । भाकीतसें कींव देवराया ॥४॥

३२५०. आलीया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालोनियां ॥१॥ मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥२॥ भयाचीया पोटीं दुःखाचीया राशी । शरण देवासी जातां भले ॥३॥ तुका म्हणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥४॥

३२५१. भोग तो न घडे संचितावांचूनी । करावें तें मनीं समाधान ॥१॥ म्हणऊनी मनीं मानुं नये खेद । म्हणावा गोविंद वेळोवेळीं ॥२॥ आणिक रुमावें नलगे बहुतां । आपुल्या संचितावांचूनीयां ॥३॥ तुका म्हणे भार घातलीया वरी । होईल कैवारी नारायण ॥४॥

३२५२. निरवैर व्हावें सर्व भूतांमवें । साधन बरवें हेंचि येक ॥१॥ तरीच अंगीकार करिल नारायण । बडबड तो शीण येणेंवीण ॥२॥ सोयरे पिशुन समानचि घडे । चित्त पर वोढे उपकारीं ॥३॥ तुका म्हणे चित्त झालियां निर्मळ । तरीच सकळ केलें होय ॥४॥

३२५३. दिल्ही चाले वाचा । क्षय मागील्या तपाचा ॥१॥ रिद्धी सिद्धी येती घरा । त्याचा करिती पसारा ॥२॥ मानदंभासाठीं । पडे देवासवें तुटी ॥३॥ तुका म्हणे मेवा । कैचा वेठींच्या निदेवा ॥४॥

३२५४. तापल्यावांचून नव्हे अलंकार । पीडनीयां सार उरलें तें ॥१॥ मग कदाकाळीं नव्हे शुद्ध जाती । ना शत्रु होती मित्र तेची ॥२॥ कळिवर बरें भोगूं द्यावें भोगा । फासील तैसे रोगा हातीं सुटे ॥३॥ तुका म्हणे मन करावें पाठेळ । साहवेचि जाळ सिजेवरी ॥४॥

३२५५. पाठेळ करितां न साहावे वारा । साहिलीया ढोरा गोणी चाले

॥१॥ आपणा आपण हेचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावें ॥२॥ नव-नीत तोंवरि कडकडीत लोणी । निश्चळ होऊनी राहे मग ॥३॥ तुका म्हणे जरी जग टाकीवाया । त्याच्या पडे पायां जन मग ॥४॥

३२५६. कावळियासी नाहीं दया उपकार । काळीमा अंतर विटाळतें ॥१॥ तैसें कुजनाचें जीणें अमंगळ । घाणेरी बोंगळ वदे वाणी ॥२॥ कडु भोपळ्याचा उपचारें पाक । सेवील्या तिडीक कपाळासी ॥३॥ तुका म्हणे विष सांडूं नेणें साप । आदरें ते पाप त्याचे ठाईं ॥४॥

३२५७. लाभ खरा नये तुटी । नाहीं अडखळा भेटी ॥१॥ जाये अव-घीया देशा । येथें संचलासीं तैसा ॥२॥ मग नलगे पारखी । अवघीं संकटें सारिखीं ॥३॥ तुका म्हणे बोळे । रूपें भुलविले डोळे ॥४॥

३२५८. नको आतां पुसों कांहीं । लवलाही उमंती ॥१॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥२॥ वचनाचा करी गोवा । रिघे देवा शरण ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । बहु चिंता दीनांची ॥४॥

३२५९. बुद्धिहीन जडजीवा । नको देवा उपक्षूं ॥१॥ परिसावी विज्ञा-पना । आम्हां दीन दासांची ॥२॥ चिंतुनीयां आले पाय । त्यासी काय वंचना ॥३॥ तुका म्हणे पुरुषोत्तमा । करीं क्षमा अपराध ॥४॥

३२६०. म्हणऊनि काकुळती । येतों पुढतां पुढती । तुमचिये असे हातीं । कमळापती भांडार ॥१॥ फेडूं आलेती दरिद्र । तरी नलगेचि उशीर । पुरे अभयकर । ठाईं ठाव रंकासी ॥२॥ कोठें न घाली धांव । याजसाठीं त्यजिली हाव । घेऊं नेदी वाव । मना केला निरोध ॥३॥ कारणाच्या गुणें । वेळ काळ तोही नेणें । तुमच्या कीर्तनें । तुका तुम्हां जागवी ॥४॥

३२६१. बहु नांवें ठेविली स्तुतीच्या आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥१॥ बहु सोसें सेवन केलें बहुराम । बहु आला दिवस गोमट्याचा ॥२॥ बहुतां पुरला बहुतां उरला । बहुतांचा केला बहु नट ॥३॥ बहु तुका जाला निकट आवृत्ति । बहु काकुळती येवोनियां ॥४॥

३२६२. इहलोकीं आम्हां वस्तीचें तें पेणें । उदासीन तेणें देहभावीं ॥१॥ कराया पुरतें कारणमारगीं । उल्लंघूनी वेगीं जावें स्थळा ॥२॥ सोंग

संपादणी चालवितो वेव्हार । अत्यंत आदरें नाहीं गोवा ॥३॥ तुका म्हणे वेंच लाविला संचिता । होईल घेतां देतां लाभ कोणा ॥४॥

३२६३. रोजकीर्द जमा धरूनी सकळ । खताविला काळ बराबरी ॥१॥ नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजुराती गोड सेवा रुजू ॥२॥ चोरासाठीं रदबदली अट्टाहास । जळों जिणें दास्य बहुतांचें ॥३॥ सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापासीं गुंफों नेणें ॥४॥

३२६४. त्रिविधकर्माचे वेगळाले भाव । निवडुनि ठाव दाखवीले ॥१॥ आलीयाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख तो गौरव संतां अंगीं ॥२॥ हिशेबें आलें तें सकळां प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥३॥ तुका म्हणे नाहीं पापपुण्या खंती । झाड्याची हुजती हातीं आली ॥४॥

३२६५. साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आम्हां जोडी वैष्णवाची ॥१॥ मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनी । सोस तो भजनीं आवडीचा ॥२॥ भोजनाचि चिंता माय वाहे बाळा । आम्हां तरी खेळावरी चित्त ॥३॥ तुका म्हणे आम्ही देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥४॥

३२६६. सुखें घेऊं जन्मांतरें । येक बरें इहलोकीं ॥१॥ पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडी हे ॥२॥ हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरुनी ॥३॥ तुका म्हणे केला त्याग । सर्वसंग म्हणउनी ॥४॥

३२६७. करूं जातां संनिधान । क्षणें जन पालटे ॥१॥ आतां गोमटे ते पाय । तुझे माय विट्ठले ॥२॥ हरिदासांचा समागम । अंगीं प्रेम विसावा ॥३॥ तुका म्हणे हेंचि मन । इच्छादान मागतसे ॥४॥

३२६८. क्षीर मागे तया रायतें वाढी । पाधाणि गधडी ऐशा नांवें ॥१॥ समयो जाणा समयो जाणा । भलतें नाणा भलतेथें ॥२॥ अमंगळ वाणी वदवी मंगळीं । अशुभ वोंगळी शोभन तें ॥३॥ तुका म्हणे नेणे समयो ठाया ठाव । राहाडि ते वाव नरकाडी ॥४॥

३२६९. विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे अंगीं ॥१॥ केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ॥२॥ मधुरा उत्तरीं । रावा खेळे उरावरी ॥३॥ तुका म्हणे रेडा । सुखें जाती ऐशा पीडा ॥४॥

३२७०. तीर्थांचि अपेक्षा स्थळीं वाढे धर्म । जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥१॥ बहु बरी ऐसी भाविकांची जोडी । काळ नाहीं घडी जात वायां ॥२॥ करुनी चिंतन करावें आणिकां । तो या झाला लोकां नांव जगीं ॥३॥ तुका म्हणे ऐसे परउपकारी । त्याच्या पायांवरी डोई माझी ॥४॥

३२७१. भयाची तो आम्हां चित्तीं । राहो खंती शकेना ॥१॥ समर्पिलों जीवें भावें । कशा भ्यावें कारणा ॥२॥ करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभलें ॥३॥ तुका म्हणे माप भरूं । दिवस सारूं कौतुकें ॥४॥

३२७२. पाचारितां पावे । ऐसी ठाईंची हे सवे ॥१॥ बोले करुणा-वचनीं । करी कृपा लावीं स्तनीं ॥२॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा सोहळा ॥३॥ तुका म्हणे नाम । मागें मागें धांवे प्रेम ॥४॥

३२७३. कां जी माझे जीवीं । आळस ठेवीला गोसावी ॥१॥ येव्हडा घात आणिक काय । चिंतनासी अंतराय ॥२॥ देह आत्मवादी । केला घात हे दुर्बुद्धी ॥३॥ तुका म्हणे मन । कळवळी वाटे शीण ॥४॥

३२७४. दर्शनाचें आर्त जीवा । बहु देवा राहिलें ॥१॥ आतां जाणसी तें करीं । विश्वंभरीं काय उणें ॥२॥ येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहुनी ॥३॥ तुका म्हणे जाणवलें । आम्हां भलें येवढेंच ॥४॥

३२७५. बैसे पाठमोरी । मना वाटे बैसें करी ॥१॥ परि तूं जाणसी आवडी । बाळा बहुतांची परवडी ॥२॥ आपुल्या इच्छा । मागें जया व्हावें जैसा ॥३॥ तुका म्हणे आई । नव्हसी उदास विठाई ॥४॥

३२७६. विश्वंभर वोळे । बहुत हात कान डोळे ॥१॥ जेथें असों तेथें देखों । मागितलें तें आइकें ॥२॥ जें जें वाटे गोड । तें तें पुरवितो कोड ॥३॥ तुका म्हणे भेटी । कांहीं पडों नेदि तुटी ॥४॥

३२७७. दाटे कंठ लागे डोळियां पाझर । गुणाचि अपार वृष्टी वरी ॥१॥ तेणें सुखें छंदें घेइन सोहळा । होऊनी निराळा पापपुण्या ॥२॥ तुझ्या मोहें पडो मागील विसर । आलापें सुस्वर करीन कंठ ॥३॥ तुका म्हणे येथें पाहीजे सौरस । तुम्हांवीण रस गोड नव्हे ॥४॥

३२७८. पसरोनि राहिलों बाहो । सोई अहो तुमचिये ॥१॥ आतां

यावें लागवेगें । पांडुरंगे धांवत ॥२॥ बैसायाचि इच्छा कडिये । चाली खडे रुपताती ॥३॥ तुका म्हणे कृपाळुवा । करणें सेवा लागली ॥४॥

३२७९. आम्ही झालों येकविध । शुद्धाशुद्ध असावें ॥१॥ यावरी तुमचा मेळा । तो गोपाळा अकळ ॥२॥ घेतलें तें उसणें द्यावें । कांहीं भावें विशेष ॥३॥ तुका म्हणे क्रिया नष्ट । तरी कष्ट घेतसां ॥४॥

३२८०. आम्ही आर्तभूत जीवीं । तुम्ही गोसावी उदास ॥१॥ वादा-वाद समर्थासी । कशानसी करावा ॥२॥ आम्ही मरों वेरझारी । स्वामी घरीं बैसले ॥३॥ तुका म्हणे करितां वाद । कांहीं भेद कळेना ॥४॥

३२८१. पुसावें तें ठाई आपुल्या आपण । अहंकार शून्य घालोनियां ॥१॥ येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनासी थार अज्ञान तें ॥२॥ फळ तेंची बीज बीज तेंचि फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥३॥ तुका म्हणे अवघे गव्हाचे प्रकार । सोनें अलंकार मिथ्या नांव ॥४॥

३२८२. माझी आतां सत्ता आहे । तुम्हां पायां हे वरती ॥१॥ येकावीण नेणे दुजा । पंढरीराजा सर्वांगें ॥२॥ पुरवावी केली आळी । जे जे काळीं मागेन तें ॥३॥ तुका म्हणे सुटशी कैसा । धरुनी दिशा राहिलों ॥४॥

३२८३. फावलें तें तुम्हां मागें । नव्हतें लागे पावलों ॥१॥ आलों आतां उभा राहें । जवळी पाहें सन्मुख ॥२॥ घरीं होति गोवी जाली । कामें बोली न घडेचि ॥३॥ तुका म्हणे धडपुडा । झालों झाडा दे देवा ॥४॥

३२८४. आतां नये बोलों अव्हेराची मात । बाळावरी चित्त असों द्यावें ॥१॥ तुज कां सांगणें लागे हा प्रकार । परि हें उत्तर आवडीचें ॥२॥ न वंची हो कांहीं येकहि प्रकार । आपणां अंतर मज नको ॥३॥ तुका म्हणे मोहो राखावा सतत । नये पाहों अंत पांडुरंगा ॥४॥

३२८५. करूनि राहों जरी आत्माचि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥१॥ जेविल्यावांचूनि कशाचें ढेकर । शब्दाचे प्रकार शब्दचि ते ॥२॥ पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आम्हांसी चरण न सोडणें ॥३॥ विरोधें विरोध वाढे पुढता पुढती । वासनेच्या हातीं गर्भवास ॥४॥ सांडी मांडी अंगीं वसे पुण्य पाप । बंधन संकल्प याचि नावें ॥५॥ तुका म्हणे नाहीं

मुक्त मोकळीत ऐसा कोण बळी निरमी देह ॥६॥

३२८६. तुमची स्तुति योग्य कोठें माझी वाणी । मस्तक चरणीं ठेवी-तसे ॥१॥ भक्तिभाव तरी नेदी तुळसीदळ । जोडुनी अंजुळ उभा असें ॥२॥ केचें भाग्य ऐसें पाविजे संनिधी । नेणें पाळूं विधी करुणा भाकी ॥३॥ संताचे शेवटीं उच्छिष्टाची आस । करूनियां वास पाहातसे ॥४॥ करीं इच्छा मज म्हणोत आपुले । येखादिया बोलें निमित्याच्या ॥५॥ तुका म्हणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रंदिवस ॥६॥

३२८७. सर्वविशीं आम्हीं हेचि जोडी केली । स्वामीची साधिली चरणसेवा ॥१॥ पाहिलेंचि नाहीं मागें परतोनी । जिंकिला तो क्षणीं क्षण काळ ॥२॥ नाहीं पडों दिल्हा विचाराचा गोवा । नाहीं पाठी हेवा येवों दिल्हा ॥३॥ केली लागवेगी अवघीच तातडी । भावना ते कुडी दुऱ्हाविली ॥४॥ कोठें मग ऐसें होतें सावकाश । जळो तया आस वेव्हाराची ॥५॥ तुका म्हणे लाभ घेतला पालवी । आतां नाहीं गोवी काशाचीही ॥६॥

३२८८ येणें मुखें तुझे वर्णी गुण नाम । तेंचि मज प्रेम देई देवा ॥१॥ डोळे भरोनियां पाहें तुझें मुख । तेचि मज सुख देई देवा ॥२॥ कान भरोनीयां ऐके तुझी कीर्ति । ते मज विश्रांती देई देवा ॥३॥ वाहे रंगीं टाळी नाचेन उदास । हे देई हातास पाई बळ ॥४॥ तुका म्हणे माझा सकळ देहभाव । आणि नको ठाव चिंतूं यासी ॥५॥

३२८९ तूं माझा मायबाप सकळ गोत वित्त । तूंचि माझें हित करिता देवा ॥१॥ तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंग ॥२॥ तूं माझा आचार तूं माझा विचार । तूंचि सर्व भार चालविसी ॥३॥ सर्वभावें मज तूं होसी प्रमाण । ऐसी तुझी आण वाहातसें ॥४॥ तुका म्हणे तुज विकिला जीवभाव । कळे तो उपाव करीं आतां ॥५॥

३२९०. वारंवार तुज द्यावया आठव । आईकतों भाव माझा कैसा ॥१॥ गेले मग नये फिरोनी दिवस । पुढीलांची आस गणित नाहीं ॥२॥ गुणा अवगुणांचे पडती आघात । तेणेंविण चित्त कासावीस ॥३॥ कांहीं येक तुझा न देखें आधार । म्हणवोनी धीर नाहीं जीवा ॥४॥ तुका म्हणे तूं या

ब्रह्मांडाचा जीव । तरी कां आम्ही कींव भाकीतसों ॥५॥

३२९१. असोत हे तुझे प्रकार सकळ । काय खळखळ करावी हे ॥१॥ आमुचें स्वहित जाणतसों आम्ही । तुझे वर्म नामीं आहे तुझ्या ॥२॥ विचारितां आयुष्य जात वायांवीण । रोज नागवण पडतसे ॥३॥ राहीन मी तुझे पाय आठऊनी । आणिक तें मनीं येवों नेदी ॥४॥ तुका म्हणे येथें येसी अनायासें । थोर तुज पिसें कीर्तनाचें ॥५॥

३२९२. नाहीं हरिच्या दासा भोग । तरी कां आम्हां पीडी रोग ॥१॥ तरी हें दिसे लाजिरवाणें । काय तुम्हांसी सांगणें ॥२॥ आम्हां काळें खावें । बोलिलें तें वायां जावें ॥३॥ तुका म्हणे दास । आम्ही भोगूं गर्भवास ॥४॥

३२९३. भावें गावें गीत । शुद्ध करोनियां चित्त ॥१॥ जरी तुज व्हावा देव । तरि हा सुलभ उपाव ॥२॥ आणिकाचे कानीं । गुण दोष मना नाणीं ॥३॥ करीं मस्तक ठेंगणा । लागे संतांच्या चरणा ॥४॥ वेचितें वचन । जेणें राहे समाधान ॥५॥ तुका म्हणे फार । थोडा तरी उपकार ॥६॥

३२९४. वचन तें नाहीं तोडित शरीरा । भेदतें अंतरा वज्रा ऐसें ॥१॥ कांहीं न साहावें काशाही कारणें । संदेह निधान देह बळी ॥२॥ नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं होत जड पोट तेणें ॥३॥ तुका म्हणे जरी गिळे अहंकार । तरी वसे घर नारायण ॥४॥

३२९५. नव्हो आतां जीवीं कपट वसती । मग काकुळती कोणा यावें ॥१॥ सत्याचिये मापें गांठि नये नाड । आदि अंत गोड नारायण ॥२॥ चोखटिया नाहीं विटाळाचा घात । साचतें सांचत साच पडे ॥३॥ विचारिली वाट उसंत शीतळ । बुद्धीपुढें बळ तृणतुल्य ॥४॥ आहाराचा घांस पचोनियां जिरे । वासनाही उरे ऊर्वरित ॥५॥ तुका म्हणे ताळा घालावा वचनीं । तूं माझी जननी पांडुरंगे ॥६॥

३२९६. नव्हती ही माझीं जायाचीं भूषणें । असें नारायणें उचित केलें ॥१॥ शब्दाच्या वोवणीं रत्नाचिया माळा । मुळींचा जिव्हाळा झरवणी ॥२॥ अर्थांतरीं असे अनुभव सेवन । परिपाकीं मन साक्ष येतें ॥३॥ तुका म्हणे मज सरतें परतें । हें नाहीं अनंतें राहों दिल्हें ॥४॥

३२९७. सहज हे लीला मी साक्षी याचा । नये वंचूं वाचा ऐसें झालें ॥१॥ उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जें कोठें बंधनीं गुंफों नेणें ॥२॥ तम नाशी परी वेव्हारा वेगळा । रविप्रभा कळा वर्ते जन ॥३॥ तुका म्हणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हां नये तोंड दाऊं ॥४॥

३२९८. बोलाल या आतां आपुल्या पुरतें । मज या अनंतें गोविंयेलें ॥१॥ झाडिला न सोडी हातींचा पालव । वेधी वेधें जीव वेधियेला ॥२॥ तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी । मज सर्वे मिठी अंगसंगें ॥३॥ तुका म्हणे तुम्हां होईल हे परी । अनुभव वरी येईल मग ॥४॥

३२९९. जैशा तुम्ही दुरी आहां । तैशा राहों अंतरें ॥१॥ नका येऊं देऊं आळ । अंगी गोपाळ जडलासे ॥२॥ अवघाचि राखा काळ । विकाळचि भोंवता ॥३॥ तुका म्हणे मज ऐसा । होतां पिसा जगनिंद्य ॥४॥

३३००. सतीचें तें घेतां वाण । बहु कठिण परिणामीं ॥१॥ जिवासाठीं गौरव वाढे । आहाच जोडे तें नव्हे ॥२॥ जरी होय उघडी दृष्टी । तरी गोष्टी युद्धाच्या ॥३॥ तुका म्हणे अंगा येतां । तरी सत्ता धैर्याची ॥४॥

३३०१. आडवा तो उभा । असे दाटोनियां प्रभा ॥१॥ देव नाहीं येकविध । येक भाव असे शुद्ध ॥२॥ भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥३॥ तुका म्हणे गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥४॥

३३०२. येका बोटाची निशाणी । परिपाक नाहीं मनीं ॥१॥ तरी तें संपादिलें सोंग । कारणावांचूनियां व्यंग ॥२॥ वैष्णवाचा धर्म । जगीं विष्णु नेणें वर्म ॥३॥ अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥४॥

३३०३. सत्यत्वेसीं घेणें भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छितसें ॥१॥ मग तें अवीट न भंगे साचार । पावलें विस्तारें फिरों नेणें ॥२॥ वाणी वदे त्याचा कोणासी विश्वास । अभयकरें दास सत्य तई ॥३॥ तुका म्हणे आधीं न करीं तांतडी । पाई झाली जोडी तेणें शुद्ध ॥४॥

३३०४. सर्वात्मकपण । माझें हिरोन नेता कोण ॥१॥ मज भक्तीची आवडी । हेवा व्हावी ऐसी जोडी ॥२॥ घेईन जन्मांतरें । हेंचि करावया खरें ॥३॥ तुका म्हणे देवा । ऋणी करुनि ठेऊं सेवा ॥४॥

३३०५. आणितां त्या गती । हंस कावळे न होती ॥१॥ सांडा सांडा रे मठारे । येथें गांठी सवें धुरें ॥२॥ नाकेंवीण मोती । उभ्या बाजारीं फजिती ॥३॥ हुकुमदाज तुका । येथें कोणी फुंदों नका ॥४॥

३३०६. ढेंकणासी बाज गड । उतर चढ केवढी ॥१॥ होतां तैसा कळो भाव । आला वाव अंतरींचा ॥२॥ बोरामध्यें वसे आळी । आठोळीच भोंवतीं ॥३॥ पोटामाठीं वेंची चणे । राजा म्हणे तोंडें मी ॥४॥ बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर ॥५॥ तुका म्हणे ऐसें आहे । काय पाहे त्यांत तें ॥६॥

३३०७. धांव धांव गरुडध्वजा । आम्हां अनाथांच्या काजा ॥१॥ बहु झालों कासावीस । म्हणोनि पाहें तुझी वास ॥२॥ असोनियां ऐमा । तुजसारिखा कोंवसा ॥३॥ पाहे त्या मारगें । कोणी येतो माझ्या मागें ॥४॥ न लावावा उशीर । नेणो कां हे केला धीर ॥५॥ तुका म्हणे चाली । नको चालूं धांव घाली ॥६॥

३३०८. पांडुरंगे पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥१॥ पान्हा घाली प्रेमधारा । पूर क्षीरा लोटों दे ॥२॥ अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडाया ॥३॥ तुका म्हणे घेईन उड्या । सांडीन कुड्या भावना ॥४॥

३३०९. गजेंद्र तो पशु आर्त मोकालिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥१॥ त्यामाठीं गरुड सांडूनि धांवसी । माया झळंबसी दीनानाथा ॥२॥ धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी । तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥३॥ तुका म्हणे ब्रीद बांधलें यासाठीं । भक्तांसीं संकटीं रक्षावया ॥४॥

३३१०. चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥१॥ न करी आणिक साधन । कष्टसी कां वायांवीण ॥२॥ अठरा पुराणांचे पोटीं । नामावीण नाहीं गोष्टी ॥३॥ गीता जेणें उपदेशिली । ते हे विटेवरी माउली ॥४॥ तुका म्हणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारीं ॥५॥

३३११. पाहातां ठायां ठाव । जातो अंतरोनी देव ॥१॥ नये वाटों गुणदोषीं । मन जतन येविशीं ॥२॥ त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ॥३॥ तुका म्हणे धीरे । वीण कैसें होतें बरें ॥४॥

३३१२. नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींचीं ॥१॥ न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥२॥ ठाईंच बैसोनि करा येकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥३॥ रामकृष्ण-हरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥४॥ याविण असतां आणिक साधन । वाहातसें आण विठोबाची ॥५॥ तुका म्हणे सोपें आहे सर्वांहुनी । शाहाणा तो धणी घेतो येथें ॥६॥

३३१३. भाविकांचें काज अंगें देव करी । काढी धर्मा घरीं उच्छिष्ट तें ॥१॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लणीची । आवडी तयांची मोठी देवा ॥२॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥३॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥४॥ तुका म्हणे ऐसीं आवडती लडिवाळें । जाणिवेचे काळें तोंड देवा ॥५॥

३३१४. सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ॥१॥ डोळियांची धणी पाहातां न पुरे । तयालागीं झुरे मन माझें ॥२॥ प्राण रिघों पाहे कुडिये सांडुनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥३॥ चित्त हें मोहिलें नंदाच्या नंदनें । तुका म्हणे येणें गरुडध्वजें ॥४॥

३३१५. ऐका ऐका भाविकजन । कोण कोण व्हाल तें ॥१॥ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥२॥ नका शोधूं मतांतरें । नुमगे खरें बुडाल ॥३॥ कलीमध्यें दास तुका । जाती लोकां सांगत ॥४॥

३३१६. आपुलिया आंगें तोडी माया जाळ । ऐसें नाहीं बळ कोणा अंगीं ॥१॥ रांडा पोरें त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि मन ॥२॥ मुक्त झालों ऐसें बोलों जाय मुख । तुका म्हणे दुःखें बांधला तो ॥३॥

३३१७. आलिया आतीता म्हणतसा पुढें । आपुलें रोकडें सत्त्व जाय ॥१॥ काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं । हीनकर्म लोकीं म्हणावया ॥२॥ दारीं हाक कैसें करवतें भोजन । रुचि तरी अन्न कैसें देतें ॥३॥ तुका म्हणे ध्वज उभारिला कर । ते शक्ति उदार काय झाली ॥४॥

३३१८. जेथें लक्ष्मीचा वास । गंगा आली पाप नाश ॥१॥ तुझीं पाउलें सकुमार । तेथें मन माझें भ्रमर ॥२॥ ठाव धरिला संतजनीं । सुखें

राहिले लपोनी ॥३॥ तुका म्हणे बाकी । भाट झाले तिहीं लोकीं ॥४॥

३३१९. रूपीं जडलें लोचन । चरणीं स्थिरावलें मन ॥१॥ देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला ॥२॥ कळों नेदी सुखदुःख । तान्ह हारपली भूक ॥३॥ तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥४॥

३३२०. जाणतें लेंकरूं । माता लागे दूर धरूं ॥१॥ तैसें न करीं कृपावंते । पांडुरंगे माझे माते ॥२॥ नाहीं मुक्ताफळा । भेटी मागुती त्या जळा ॥३॥ तुका म्हणे लोणी । ताक सांडी निवडूनी ॥४॥

३३२१. तुजविण कोणा । शरण जाऊं नारायणा ॥१॥ ऐसा न देखें मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥२॥ पाहिलीं पुराणें । धांडोळलीं दरुशनें ॥३॥ तुका म्हणे ठाईं । जडोनि ठेलों तुझ्या पाईं ॥४॥

३३२२. ऐसें भाग्य कई लाहता होईन । अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥१॥ मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती ॥२॥ शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिका ॥३॥ विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगीत ज्वाळ अग्नि जैसा ॥४॥ भक्ति नवविधा भाव शुद्ध बरी । अलंकारावरी मुगुटमणी ॥५॥ तुका म्हणे माझी पुरवावी वासना । कोण नारायणा तुजविण ॥६॥

३३२३. कासया करावे तपाचे डोंगर । आणिक अपार दुःखराशी ॥१॥ कासया फिरावे आणिक ते देश । दाविती आस पुढें लाभ ॥२॥ कासया पूजावें आणिक दैवतें । पोट भर तेथें लाभ नाहीं ॥३॥ कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुकासाठीं ॥४॥ तुका म्हणे करीं कीर्तन पसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ॥५॥

३३२४. वैष्णवमुनीविप्रांचा सन्मान । करावा आपण घेऊं नये ॥१॥ प्रभू झाला तरी संसाराचा दास । विहित हें त्यास त्याची सेवा ॥२॥ तुका म्हणे हेचि आशिर्वादें बळी । जाईल तो छळी नरकासीं ॥३॥

३३२५. देव वसे चित्तीं । त्यांची घडावी संगती ॥१॥ ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥२॥ हरिजनाची भेटी । नव्हें अंगसंग तुटी ॥३॥ तुका म्हणे जिणें । भलें संत संघट्टणें ॥४॥

३३२६. भाग शीण गेला । माझा सकळ विठ्ठला ॥१॥ तुझा म्हणवितों दास । केली उच्छिष्टाची आस ॥२॥ राहिली तळमळ । तईंपासुनि सकळ ॥३॥ तुका म्हणे धालें । पोट ऐसें कळों आलें ॥४॥

३३२७. रायाचे सेवक । सेवटील पीडी रंक ॥१॥ हा तो हीणाव कणा । कां हो नेणा नारायणा ॥२॥ परिसेसी भेटी । नव्हे लोहपणा तुटी ॥३॥ तुझें नाम कंठीं । तुक्या काळासवें भेटी ॥४॥

३३२८. सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । माझ्या पांडुरंगासारिखें तें ॥१॥ नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ॥२॥ चंद्रभागे स्नान विधी तो हरिकथा । समाधान चित्ता सर्व काळ ॥३॥ तुका म्हणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष तो लाभ संतसंगें ॥४॥

३३२९. नसतां अधिकार । उपदेशासी बलात्कार । तरी ते केले चार । माकड आणि गारुडी ॥१॥ धनधान्य राज्य बोल । वृथा रंजवणें फोल । नाहीं तेथें वोल । बीज वेंचीं मूर्ख तो ॥२॥ नये बांधों गांठीं । पदरा आणि ऐसी तुटी । असोनि कसोटी । शिष्टाचार अनुभव ॥३॥ उपदेशी तुका । मेघवृष्टीनें आईका । संकल्पासी धोका । सहज ते उत्तम ॥४॥

३३३० घालूनियां मापीं । देवभक्त बैसले जपीं ॥१॥ तैसी होती सांड- उलंडी । निज निजाची मुरकुंडी ॥२॥ अमुपीं उरवतें । आपण वोस आपण यातें ॥३॥ देव आतां झाला । उगवे संकोच गहिला ॥४॥ अखंड नेलें वेठी । भार सत्याविण गांठी ॥५॥ आडकिला झोंपा । रिता कलेवराचा खोपा ॥६॥ गंगेतारीं आड । करिते करविते द्वाड ॥७॥ तुका म्हणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥८॥

३३३१. उंबरांतील कीटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥१॥ ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐसीं झाडें किती नवखंडीं ॥२॥ हेंचि ब्रह्मांड आम्हांसी । ऐसी अगणित अंडें कोशीं ॥३॥ विराटाच्या अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥४॥ ऐशा विराटाच्या कोटी । सांठविल्या ज्याच्या पोटीं ॥५॥ तो हा नंदाचा बाळ मुकुंद । तान्हा म्हणवी परमानंद ॥६॥ तैसी अगम्य ईश्वरी लीला । ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥७॥

३३३२. ब्रह्मज्ञान तरी येके दिवशीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥१॥ अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासें उफराटी दृष्टि केली ॥२॥ जनक भेटीसी पाठविला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥३॥ खोटें करूनीयां लावीला अभ्यासीं । मेरु शिखरासी शुक गेला ॥४॥ जाऊनियां तेथें साधिली समाधी । तुका म्हणे तधीं होतों आम्ही ॥५॥

३३३३. सहज पावतां भगवंतीं । परि हीं विकल्पें परतीं । फुकाची हे चित्तीं । आठवण कां न धरिती ॥१॥ हरि व्यापक सर्वगत । हा तव मुख्यत्वें वेदांत । चिंतनासी चित्त । असों द्यावें सावध ॥२॥ विरज्याहोम याचि नावें । देह नव्हे मी जाणावें । मग कां जी यावें । वरी लागे संकल्पा ॥३॥ कामक्रोध देह मलिन । स्वाहाकरी कैंचें पुण्य । मंत्रीं पूजिला यज्ञ । मन मुंडण नव्हेची ॥४॥ अनन्य भक्तीचे उपाय । ते या विठोबाचे पाय । ध्याईल ते काय । चुकों जाणे मारग ॥५॥ आतां सांगे तुका । येक तुम्हीं चुकों नका । सांडि मांडि धोका । शरण रिघतां गोमटे ॥६॥

३३३४. आम्ही जाणावें तें काई । तुझें वर्म कोणे ठाई । अंतपार नाहीं । ऐसें श्रुती बोलती ॥१॥ होई मज तैसा मज तैसा । साना सकुमार हृषीकेशा । पुरवी माझी आशा । भुजा चारी दाखवी ॥२॥ खालता सप्तही पाताळा । वरता स्वर्गाहुनि ढिसाळा । तो मी मश्यक डोळां । कैसा पाहूं आपुल्या ॥३॥ मज आहे हा भरवसा । पढीये होसी तया तैसा । पंढरिनिवासा । तुका म्हणे गा विठोबा ॥४॥

३३३५. वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीहि सुस्वरें आळवीती ॥१॥ येणें सुखें रुचे येकांताचा वास । नाहीं गुण दोष अंगा येत ॥२॥ आकाश मंडप पृथ्वी आसन । रमे तेथें मन क्रीडा करूं ॥३॥ कंथाकमंडलु देह उपचारा । जाणवितो वारा अवसरु ॥४॥ हरिकथा भोजन परवडी विस्तार । करूनि प्रकार सेऊं रुचि ॥५॥ तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाची वाद आपणांसी ॥६॥

३३३६. अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें धेंडें ॥१॥ तो हा गवळीयांच्या घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥२॥ मारियले दैत्य गाढे । ज्याचे पुराणीं

पवाडे ॥३॥ तुका म्हणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥४॥

३३३७. सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो संसारा सकळही ॥१॥ अंतीं समयाचा करणें विचार । वेंचिती सादर घटिका पळें ॥२॥ मंगळ हे नोव्हे कन्यापुत्रादिक । राहिला लौकीक अंतरपाट ॥३॥ तुका म्हणे देव अंतरला दुरी । डोळियां अंधारी पडिलीसे ॥४॥

३३३८. लवण मेळवितां जळें । काय उरलें तें निराळें ॥१॥ तैसा समरस झालों । तुज माजी हारपलों ॥२॥ अग्निकर्पूराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥३॥ तुका म्हणे होती । तुझी माझी येक जोती ॥४॥

३३३९. सुख नाहीं कोठें आलीया संसारीं । वायां हावभरी होऊं नका ॥१॥ दुःखबांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें ॥२॥ चौदा कल्पेंवरी आयुष्य जयाला । परि तो राहिला ताटीखालीं ॥३॥ तुका म्हणे वेगीं जाय सुटोनियां । धरुनि हृदयामाजी हरी ॥४॥

३३४०. तुजकरितां होय ऐसें कांहीं नाहीं । डोंगराची राई रंक राणा ॥१॥ अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा ॥२॥ सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निरहारी दुर्वासा नवल नव्हे ॥३॥ पंच-भ्रतार द्रौपदी ते सती । करितां पितृशांती पुण्य धर्मा ॥४॥ दशरथा पातकें ब्रह्महत्ये ऐसी । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥५॥ मुनेश्वरा दोष नाहीं अणुमात्र । भांडवितां सूत्र वध होती ॥६॥ तुका म्हणे माझे दोष ते काई । सरता तुझे पाई झालों देवा ॥७॥

३३४१. उभ्या बाजारांत कथा । हे तों नावडे पंढरिनाथा ॥१॥ अवघें पोटासाठीं सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥२॥ लावी अनुसंधान । कांहीं देईल म्हणउनि ॥३॥ काय केलें रांडलेका । तुला राजी नाहीं तुका ॥४॥

३३४२. असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज बरी विठाबाई ॥१॥ आपंगिलें मज आहे ते कृपाळू । बहुत कनवाळू अंतरींची ॥२॥ वेदशास्त्र जिसी वर्णिती पुराणीं । तिचें मी पोसणें लडिवाळ ॥३॥ जिचें नाम कामधेनु कल्पतरु । तिचें मी लेंकरूं तुका म्हणे ॥४॥

३३४३. वाराणसी गया पाहिली द्वारका । परि नये तुका पंढरीच्या ॥१॥

पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पायां पडे जन येकमेकां ॥२॥ तुका म्हणे जाय येक वेळां पंढरी । तयाचिये घरीं यम नये ॥३॥

३३४४. सांडोनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥१॥ पाहोनियां झाडे वरबडोनी पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥२॥ वेंचूनियां चिंध्या भरोनियां धागा । गुंडाळुनी ढुंगा आळवावें ॥३॥ तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥४॥

३३४५. दह्याचिये अंगीं निघे ताक लोणी । येका मोलें दोन्ही मागूं नये ॥१॥ आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहोंसी समान पाहों नये ॥२॥ पृथ्वीच्या पोटीं हिरागारगोटी । दोहोंसी संवसाटी करूं नये ॥३॥ तुका म्हणे तैसे संत आणि जन । दोहींसी समान भजूं नये ॥४॥

३३४६. काय धर्म नीत । तुम्हां शिकवावें हित ॥१॥ अवघे रचियेलें हेळा । लीला ब्रह्मांड सकळां ॥२॥ नाम महादेव । येथें निवडिला भाव ॥३॥ तुका म्हणे वेळे । माझे. तुम्हां कां न कळे ॥४॥

३३४७. भांडावें तें गोंड । पुरे सकळहि कोड ॥१॥ ऐशा घरींचा या मोळा । ठाव निकट जवळा ॥२॥ हांक देतां दारीं । येती जवळी सामोरी ॥३॥ तुका म्हणे शिवें । मागील तें हातीं द्यावें ॥४॥

अभंगाच्या वह्या डोहांत बुडविल्या त्यावेळीं देवाची करुणा भाकिली ते अभंग

३३४८. तेरा दिवस झाले निश्चक्र करितां । न पवसी अनंता मायबापा ॥१॥ बोधाची हे खोळ घेउनि बैसलासी । काय हृषीकेशी झालें तुज ॥२॥ तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥३॥ फार विठाबाई धरली तुझी आस । करीन जिवा नाश पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन तुजवरी ॥५॥

३३४९. लोक फार वाखा अमंगळ झाला । त्याचा त्याग केला पांडुरंगा ॥१॥ विषयीं चेवलों मीपणा मुकलों । शरण तुज आलों पांडुरंगा ॥२॥ घरदार अवघीं त्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे पडिलों पुंडलिकापासी । धांव हृषीकेशी आलिंगी मज ॥४॥

३३५०. करिसी कीं न करीसी माझा अंगीकार । हा मज विचार

पडिला देवा ॥१॥ देशी कीं न देशी पायाचें दर्शन । म्हणऊनि मन स्थीर नाहीं ॥२॥ बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । म्हणऊनि जीवा भय वाटे ॥३॥ होईल कां न होय तुज माझा आठव । पडिला संदेह हाचि मज ॥४॥ तुका म्हणे मी तो कमाईचे हीन । म्हणऊनि शीण करीं देवा ॥५॥

३३५१. ऐसा माझा कोण आहे भीडभार । नांवाचा मी फार वार्यां गेलों ॥१॥ काय सेवा रुजू आहे सत्ताबळ । तें मज राऊळ कृपा करी ॥२॥ काय याती शुद्ध आहे कुळ धर्म । तेणें पडे वर्म तुझे ठाईं ॥३॥ कोण तपोनिधि दानधर्मशीळ । अंगीं येक बळ आहे सत्ता ॥४॥ तुका म्हणे वार्यां झालों भूमीभार । होईल विचार काय नेणों ॥५॥

३३५२. साच मज काय कळों नये देवा । काय तुझी सेवा कां हे नव्हे ॥१॥ करावें तें बरें जन समाधान । सेवावें हें वन न बोलवे ॥२॥ शुद्ध माझा भाव होईल तुझे पाईं । तरिंच हे देईं निवडुनी ॥३॥ उचित अनुचित कळों आली गोष्ट । तुझे कृपादृष्टी पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे मज पायामवें चाड । सांगसी हें गोड आहे मज ॥५॥

३३५३. नाहीं कांटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥१॥ जन वन आम्हां समानचि झालें । काम क्रोध केले पावटणी ॥२॥ षडऊर्मि शत्रु जिंतिले अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥३॥ मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावें तें ॥४॥ म्हणऊनि तुका अवलोकी पाय । वचनाची पाहे वास येका ॥५॥

३३५४. वायांविण वाढविला हो लौकिक । आणिला लटिका वाद दोघां ॥१॥ नाहीं ऐसा झाला देव माझ्या मतें । भुकेले जेवीं तें काय जाणें ॥२॥ शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं विवेचिना ॥३॥ झालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥४॥ तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें । न घेतों हें पिसें लावूनियां ॥५॥

३३५५. न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मति । परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥१॥ आगमाचे भेद ते मी काय जाणे । काळ तों चिंतनें सारितसे ॥२॥ कांहीं नेणें परी म्हणवितों दास । होईल त्याचा त्यास अभिमान ॥३॥

संसाराची सोय सांडिला मारग । दुऱ्हाविलें जग येका घाये ॥४॥ मागिल्या लागाचें केलेंसें खंडण । येकायेकीं मन राखियेलें ॥५॥ तुका म्हणे अगा रखुमा देविवरा । भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥६॥

३३५६. संसारसोहळे भोगिती सकळ । भक्ता याचें बळ विठोबाचें ॥१॥ भय चिंतीं धाक न मनती मनीं । भक्तां चक्रपाणि सांभाळीत ॥२॥ पाप पुण्य त्याचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्व भावें ॥३॥ नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव त्याचा भार सर्व वाहे ॥४॥ तुका म्हणे देव भक्तां वेळाईत । भक्त ते निश्चित त्याचियानें ॥५॥

३३५७. देवासी अवतार भक्तासी संसार । दोहींचा विचार येकपणें ॥१॥ भक्तांसी सोहळे देवाचिये अंगें । देव त्याच्या संगें सुख भोगी ॥२॥ देवें भक्तरूप दिल्हासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥३॥ येका अंगें दोन्ही झालीं हें निर्माण । देवभक्तपण स्वामीसेवा ॥४॥ तुका म्हणे येथें नाहीं भिन्न भाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥५॥

३३५८. हंबरती गाई तयाकडे कान । कैवल्यनिधान देउनि ठाके ॥१॥ गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणें वनमाळी सुखावला ॥२॥ चारूनियां खाय दहीं दूध लोणी । भावें चक्रपाणी गोविला तो ॥३॥ निष्काम तो झाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहतसे ॥४॥ जगदानी इच्छी येक तुळसीदळ । भावाचा सकळ विकिला तो ॥५॥ तुका म्हणे हेंचि चैतन्य सावळें । व्यापुनी निराळें राहिलेंसे ॥६॥

३३५९. वाढविलें कां गा । तुम्ही येवढें पांडुरंगा ॥१॥ काय होती मज चाड । येवढी कराया बडबड ॥२॥ ब्रह्म संतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥३॥ निमित्याचा धणी । तुका म्हणे नेणे कोण्ही ॥४॥

अलकापुरींत ( आळंदी ) ब्राह्मण बेचाळीस दिवस धरणें धरून बसला त्यावेळीं दृष्टांत झाला कीं देहूस तुकोबा जवळ जाणें त्याबद्दल अभंग

३३६०. श्रीपंढरीशा पतितपावना । येक विज्ञापना पायांपाशीं ॥१॥ अनाथाजीवांचा तूं काजकैवारी । ऐसी चराचरीं ब्रीदावळी ॥२॥ न सांगतां

कळे अंतरींचें गूज । आतां तुझी लाज तुज देवा ॥३॥ आळिकर त्याचें करिसी समाधान । अभयाचें दान देऊनियां ॥४॥ तुका म्हणे तूंचि खेळे दोन्हीं ठाईं । नसेल तो देईं धीर मना ॥५॥

३३६१. अगा ये उदारा अगा विश्वंभरा । रखुमाईच्या वरा पांडुरंगा॥१॥ अगा सर्वोत्तमा अगा कृष्ण रामा । अगा मेघश्यामा विश्वजनित्या ॥२॥ अगा कृपावंता जीवदान तूं दाता । अगा सर्व सत्ता धरितिया ॥३॥ अगा सर्व जाणा अगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ॥४॥ तुका म्हणे नाहीं अधिकार तैसी । सरती पायांपासीं केली मागें ॥५॥

३३६२. नव्हे दास खरा । परी झाला हा डांगोरा ॥१॥ यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥२॥ नाहीं पुण्य गांठीं । जें हें वेंचूं कोणासाठीं ॥३॥ तुका म्हणे कां उपाधी । वाढविली कृपानिधी ॥४॥

३३६३. तुजविण सत्ता । नाहीं वाचा वदवीता ॥१॥ ऐसें आम्ही जाणों दास । म्हणोनि झालों उदास ॥२॥ तुम्हीं दिल्हा धीर । तेणें मन झालें स्थिर ॥३॥ तुका म्हणे आड । केलों मी हें तुझें कोड ॥४॥

३३६४. काय मी जाणता । तुम्हांहुनी जी अनंता ॥१॥ जो हा करूं अतिशय । काय तुम्हां दया नये ॥२॥ काय तुज नाहीं कृपा । विश्वाचिया मायबापा ॥३॥ तुका म्हणे वाणी । माझी वदे तुम्हांहुनी ॥४॥

३३६५. काय ज्ञानेश्वरी उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥१॥ ऐकोनियां लिखीत । म्हणे जाणविली हे मात ॥२॥ तरी जाणे धनी । वदे सेवकांची वाणी ॥३॥ तुका म्हणे ठेवा । होता सांभाळावा देवा ॥४॥

३३६६. ठेवोनियां डोई । पाईं झालों उतराई ॥१॥ कारण ते तुम्ही जाणा । मी तराळ नारायणा ॥२॥ प्रसंगीं वचन । दिल्हें तेंचि खावें अन्न ॥३॥ तुका म्हणे भार । तुम्ही जाणा थोडें फार ॥४॥

३३६७. नको कांहीं पडों ग्रंथांचिये भरीं । शीघ्र व्रत करीं हेंचि येक ॥१॥ देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥२॥ साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥३॥ उधाराचा मोक्ष होय नव्हे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥४॥ रोकडी पातली

अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरी ॥५॥ तुका म्हणे घाली नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥६॥

३३६८. नाहीं देवापासीं मोक्षाचें गांठोळें । आणोनी निराळें द्यावें हातीं ॥१॥ इंद्रियांचा जय साधोनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥२॥ उपास पारणीं अक्षरांची आटी । सत्कर्मा शेवटीं असें फळ ॥३॥ आदरें संकल्प वारी अतिशय । सहज तें काय दुःख जाणे ॥४॥ स्वप्नींचींये घाये विवळसी वायां । रडे रडतियासवें मिथ्या ॥५॥ तुका म्हणे फळ आहे मुळापासीं । शरणदेवासी जाय वेगीं ॥६॥

३३६९. त्यजिले भेटवीं आणोनि वासना । दाविल्याचें जना काय काज ॥१॥ आळवावें देवा भाकुनि करुणा । आपुलीया मना साक्ष करीं ॥२॥ नाहीं जावें यावें दुरोनी लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥३॥ तुका म्हणे हा तो आहे कृपासिंधु । तोडी भवबंधु तात्काळीक ॥४॥

३३७०. गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥१॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देव तया ॥२॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥३॥ तुका म्हणे आळी । जेवि नुरेची वेगळी ॥४॥

३३७१. ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥१॥ म्हणवोनि अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥२॥ सम खूण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥३॥ तुका म्हणे नभा । परता अणूचाहि गाभा ॥४॥

३३७२. पाहोनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥१॥ नाहीं तरी वायां केली तोंडपिटी । उरी ते शेवटीं उरली असे ॥२॥ पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावे तेव्हां झाले ॥३॥ तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धी । स्थीर राहे बुद्धी हरिचे नामीं ॥४॥ याग यज्ञादिक काय दानधर्म । तरी फळनाम कंठीं राहे ॥५॥ तुका म्हणे नको काबाडाचे भरी । पडो सार धरी हेंचि येक ॥६॥

३३७३. सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥१॥ त्याचें दिल्हें त्यासी पावे । फळ आपणासी पावे ॥२॥ आहे हा आधार । नाम त्याचें विश्वंभर ॥३॥ नाहीं रिता ठाव । तुका म्हणे पसरी भाव ॥४॥

३३७४. संकोचूनि काय झालासी लहान । घेई आपोषण ब्रह्मांडाचें ॥१॥ करुनी पारणें आंचवे संसारा । उसीरा उसीर लाऊं नको ॥२॥ घरकुलानें होता पाडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥३॥ झुगारूनि दूरि लपविलें काखें । तुका म्हणे वाखे कौतुकाचें ॥४॥

३३७५. माझ्या बापें मज दिधलें भातुकें । म्हणोनि कौतुकें क्रीडा करी ॥१॥ केली आली पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें ॥२॥ घेऊनी विभाग जावें लवलाह्या । आलेती त्या ठाया आपुलीया ॥३॥ तुका म्हणे ज्ञान देविं समुदाय । करावा मी पाय येईन वंदु ॥४॥

३३७६. ज्ञानियाचा राजा गुरुमहाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हा ऐसें ॥१॥ मज पामरा हें काय थोरपण । पाईंची वाहाण पाईं बरी ॥२॥ ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळंगणें । इतर तुळणे काय पुरे ॥३॥ तुका म्हणे नेणे युक्तीची ते खोली । म्हणोनि ठेविली पाईं डोईं ॥४॥

३३७७. बोलीलीं लेंकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥१॥ करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥२॥ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥३॥ तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायापें किंकरा ॥४॥

३३७८. काय तुम्ही जाणा । करूं अव्हेर नारायणा ॥१॥ तरी या लटिक्याचि गोष्टी । निवडिली दुसरे ठाईं ॥२॥ कळों अंतरींचा गुण । नये फुटल्यावांचून ॥३॥ आणिले अनुभवा । जनाच्या हे ज्ञानदेवा ॥४॥ आणिक कोण्ही भीति । त्याच्या चिंतनें विश्रांती ॥५॥ तुका म्हणे बीजा पोटीं । फळ तैसेंचि शेवटीं ॥६॥

३३७९. अविश्वासीयाचें शरीर सुतकी । विटाळ पातकी भेदवाही ॥१॥ काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला पुढें ॥२॥मातेचा संकल्प व्हावा राजबिंडा । कपाळींचा धोंडा उभा ठाके ॥३॥ तुका म्हणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं जाणा खोटा जैसा ॥४॥

३३८०. तामसाचीं तपें पापाची सिदोरी । तमोगुणें भरी घातलेंसे ॥१॥ राज्यपदा आड सुखाची संपत्ती । उल्लंघुनि जाती निरयगांवा ॥२॥ इंद्रीयें दमिलीं इच्छा जीती जीवीं । नागविती ठावी नाहीं पुढें ॥३॥ तुका म्हणे

हरिभजनावांचून । करिती तो शीण पाहों नये ॥४॥

३३८१. हरिकथेवीण इच्छिती स्वहित । हरिजनीं चित्त न घाला तेथें ॥१॥ जाईल भंगोनियां आपुला विश्वास । अवघिया नाश कारणांचा ॥२॥ ज्याचिया बैसावें भोजना पंगती । त्याचिया संगती तैसें खावें ॥३॥ तुका म्हणे काय झालेती जाणते । देवाहि परते थोर तुम्ही ॥४॥

३३८२. सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हुंतूंपण कामा नये ॥१॥ घईल जीव कां सारील परतें । भंगलीया चित्तें सांदिजेना ॥२॥ खद्योतें दावावी रवि केवीं वाट । आपुलेंचि नीट उसंतावें ॥३॥ तुका म्हणे तो ज्ञानाचा सागर । परि नेदि अगर भिजों भेदें ॥४॥

३३८३. जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥१॥ करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥२॥ जेणें हे घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवाची ॥३॥ तुका म्हणे येथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ॥४॥

३३८४. बहुता छंदांचे बहु वसे जन । नये वाटूं मन त्याच्या संगें ॥१॥ करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥२॥ सुखाची समाधि हरिकथा माउली । विश्रांती साउली शिणलीया ॥३॥ तुका म्हणे बुडे बांधोनी दगड । तेथें काय कोड धांवायाचें ॥४॥

३३८५. हरिकथे नाहीं । विश्वास ज्याच्या ठाईं ॥१॥ त्याची वाणी अमंगळ । कान उंदीराचें बीळ ॥२॥ सांडोनि हा रस । करिती आणीक सायास ॥३॥ तुका म्हणे पिसीं । वायां गेलीं किती ऐसीं ॥४॥

३३८६. प्रेमामृताची धार । वाहे देवाही समोर ॥१॥ ऊर्ध्व वाहिनी हरिकथा । मुगुट मणि सर्वां तीर्थां ॥२॥ शिवाचें जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥३॥ तुका म्हणे हरि । इची स्तुति वाणी थोरी ॥४॥

३३८७. आतां माझ्या मना । हेचि घडो उपासना ॥१॥ ऐसें करीं गा पांडुरंगा । प्रेम वोसंडतें अंगा ॥२॥ सर्व काळ नये । वाचे वीट आडभयें ॥३॥ तुका म्हणे वैष्णवांसंगती । हेचि भोजन पंगती ॥४॥

३३८८. उपास कराडी । तिहीं करावीं बापुडी ॥१॥ आम्हा विठोबाचे

दास । चिंता झुगारीली आस ॥२॥ भक्तीच्या उत्कर्षें । नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥३॥ तुका म्हणे बळ । आंगीं आमुच्या सकळ ॥४॥

३३८९. करविली तैसी केली कटकट । वांकडें कीं नीट देव जाणे ॥१॥ कोणाकारणें हें झालेंसे निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥२॥ तुका म्हणे मी तों अभिमाना वेगळा । घालूनी गोपाळां भार असें ॥३॥

३३९०. तुम्हीं येथें पाठविला धरणेकरी । त्याची झाली परी आइका ते ॥१॥ आतां काय पुढें वाढऊनि विस्तार । झाला समाचार आइका तो ॥२॥ देवाचें उचित एकादश अभंग । महाफळ त्याग करूनि गेला ॥३॥ तुका म्हणे सेवा समर्पुनि पाई । झालों उतराई ठावें असो ॥४॥

३३९१. ऐका संतजन उत्तरे माझें बोबडे बोल । करि लाड तुम्हांपुढें हो झणि कोणी कोपाल ॥१॥ उपाय साधन ऐका कोण गती अवगती । दृढ बैसोनि सादर तुम्ही धरावें चित्तीं ॥२॥ धर्म तयासीच घडे रे ज्याची आधीन भाज । कर्म तयासीच जोडे रे भीत नाहीं लाज ॥३॥ पुण्य तें जाणारे भाईनो परउपकाराचें । परपीडा परनिंदा खरें पाप तयाचें ॥४॥ लाभ तयासी झाला मुखीं देव उच्चारी । प्रपंचा पाठीं गुंतला हानी तयासी थोरी ॥५॥ सुख तें जाणारे भाईनो संतसमागम । दुःख तें जाणारे भाईनो शम तेथें विषम ॥६॥ साधन तयासी साधे रे ज्याचे स्वाधीन बुद्धी । पराधीन आहे घात रे थोर जाण संबंधीं ॥७॥ मान पावे तो आगळा मुख्य इंद्रिय राखे । अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥८॥ जाणता तयासी बोलिजे जाणे साररक्षण । नेणता तयासी बोलिजे वाद करि भूषण ॥९॥ भला तोचि येक जाणा रे गयावर्जन करी । बुरा नष्ट धन मेळवी परद्वार जो करी ॥१०॥ आचरी तो अन्न काढी रे गाई अतिती भाग । अनाचारी करी भोजन ग्वाही नसतां संग ॥११॥ स्वहित तेणेंचि केलें रे भूतीं देखिला देव । अनहित तयाचें झालें रे आणि अहंभाव ॥१२॥ धन्य जन्मा तेचि आले रे येक हरिचे दास । धिग ते विषई गुंतले केला आयुष्या नाश ॥१३॥ जो हरि तोचि येक जाणा रे जागे सिद्धलक्षणें । वेडसरु तो भुले रे वरदळभूषणें ॥१४॥ बळियाढा तोचि जाणा रे भक्ति दृढ

शरीरीं । गांढ्या तयासी बोलिजे येक भाव न धरी ॥१५॥ खोल तो वचन गुरूचें जो गिळुनि बैसे । उथळ धीर नाहीं अंगीं रे म्हणे होईल कैसें ॥१६॥ उदार तोची जीवभाव रे ठेवीं देवाचे पाईं । कृपण तयासी बोलिजे पडे उपाधी ठाईं ॥१७॥ चांगलें पण तेंच रे ज्याचें अंतर शुद्ध । वोंगळ मळिन अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥१८॥ गोड तेंचि ऐक आहे रे सार विठ्ठलनाम। कडु तो संसार रे लक्ष चौऱ्यांसी जन्म ॥१९॥ तुका म्हणे मना धरीं रे संतसंगतीसोई । नलगे कांहीं करावें राहे विठ्ठलपाईं ॥२०॥

---

येकाखडीअभंग

३३९२. करावा कैवाड । नाहीं तरी आली नाड ॥१॥ स्मरा पंढरीचा देव । मनीं धरूनियां भाव ॥२॥ खचविलें हें काळें । उगवा लवलाहें जाळें ॥३॥ गजर नामाचा । करा लवलाहें वाचा ॥४॥ घरटी चक्र फेरा । जन्म-मृत्युचा भोंवरा ॥५॥ नाना हव्यासाची जोडी । तृष्णा करी देशधडी ॥६॥ चरणीं ठेवा चित्त । म्हणा देवाचे अंकीत ॥७॥ छंद नानापरी । कळा न पवीजे हरी ॥८॥ जगाचा जनिता । भुक्तिमुक्तीचाही दाता ॥९॥ झणी माझें माझें । भार वागवीसी ओझें ॥१०॥ याची कां रे गेली बुद्धी । नाहीं तरायाची शुद्धी ॥११॥ टणक धाकुली । अवघीं सरतीं विठ्ठलीं ॥१२॥ ठसा त्रिभुवनीं । उदार हा सीरोमणी ॥१३॥ डगमगी तो वायां जाय । धीर नाहीं गोते खाय ॥१४॥ ढळों नये जरी । लाभ घरींचिया घरीं ॥१५॥ नाहीं ऐसें राहे । कांहीं नाशीवंत देहे ॥१६॥ तरणा भाग्यवंत । नटे हरि कीर्तनांत ॥१७॥ थडी टाकी पैलतीर । बाहे ठोके होय वीर ॥१८॥ दया तिचें नांवें । अहंकार जाय जीवें ॥१९॥ धनधान्य हेवा । नाडे कुटुंबाची सेवा ॥२०॥ नाम गोविंदाचें । घ्या रे हेंची भाग्य साचें ॥२१॥ पर-उपकारा । वेंचा शक्ति निंदा वारा ॥२२॥ फळ भोग इच्छा । देव आहे जैसा तैसा ॥२३॥ बरवा ऐसा छंद । वाचे गोविंद गोविंद ॥२४॥ भविष्याचे माथां । भजन नेदावें सर्वथा ॥२५॥ माग लागला न संडीं । आळसें माती घालिती तोंडीं ॥२६॥ यश कीर्ति मान । तरी जोडे नारायण ॥२७॥ रवि लोपे तेजें । जरी हारपें हें दुजें ॥२८॥ लकार लाविला । असतां

नसतांचि उगला ॥२९॥ वामनेची धाडी । बंद खोड्या नाड्या बेडी ॥३०॥ सार तें न कळे । काय झांकियेले डोळे ॥३१॥ खंती ते न धरा । होय गाढव कुतरा ॥३२॥ सायासाचि जोडी । पिकें काढीलीया पेंडी ॥३३॥ हातिं हित आहे । परी न करिसी पाहे ॥३४॥ अलंकार लेणें । ल्या रे तुळशीमुद्रा-भूषणें ॥३५॥ ख्याती केली विष्णुदासीं । तुका म्हणे पाहा कैसी ॥३६॥

अभंगाच्या वह्या उदकांत बुडवून पांच दिवस उगेचि राहिले तेव्हां छळवादी येऊन फिरोन निषेधाच्या गोष्टी बोलों लागले-श्री सन्मुख तेरा दिवस निद्रा केली ते अभंग. १९

३३९३. भूतबाधा आम्हां घरीं । हें तों आश्चर्य गा हरी ॥१॥ झाला भक्तीचा कळस । आले वस्तीशी दोष ॥२॥ जागरणाचें फळ । दिल्ही जोडूनी तळमळ ॥३॥ तुका म्हणे देवा । आहाच कळों आली सेवा ॥४॥

३३९४. नाहीं जों वेंचलों जिवाचीया त्यागें । तोंवरी वाउगें नये बोलों ॥१॥ जाणविलें आतां करी ये उद्देश । जोडी किंवा नाश तुमचा जीवें ॥२॥ ठाईचेंचि आलें होतें ऐसें मना । जावें ऐसें वना दृढ झालें ॥३॥ तुका म्हणे मग वेंचीन उत्तरें । उद्देसिलें खरें झाल्यावरी ॥४॥

३३९५. करूं कवित्व काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥१॥ आतां आला येका निवाड्याचा दिस । सत्यावीण रस विरसला ॥२॥ अनुभवावीण कोण करी पाप । तरीच संकल्प लाजलावे ॥३॥ तुका म्हणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥४॥

३३९६. नाहीं आइकत तुम्ही माझे बोल । कासया हे फोल उफणूं भूस ॥१॥ येसी ते करीन बैसलिया ठायां । तूंचि बुझावया जवळि देवा ॥२॥ करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझुनी वास ॥३॥ तुका म्हणे आला आज्ञेसी सेवट । होउनियां नीट पायां पडे ॥४॥

३३९७. नव्हे तुम्हां सरी । येवढें कारण मुरारी ॥१॥ मग जैसा तैसा काळ । दाट सारावा पातळ ॥२॥ स्वामीचें तें सांडे । पुत्र होतां काळतोंडे ॥३॥ शब्दा नाहीं रुची । मग कोठें तुका वेंची ॥४॥

३३९८. केल्या पुरती आळी । कांहीं होते टाळाटाळी ॥१॥ सत्य-

संकल्पाचें फळ । हें तों न दिसेंचि बळ ॥२॥ दळणाच्या वोव्या । रित्या खऱ्या मापें घ्यावा ॥३॥ जाती उखळें चाटुं । तुका म्हणे राज्य घाटुं॥४॥

३३९९. पावावे संतोष । तुम्हीं यासाठीं सायास ॥१॥ करी आवडी वचन । पालटुनी क्षणक्षण ॥२॥ द्यावें अभयदान । भूमि न पडावें वचन ॥३॥ तुका म्हणे परस्परें । कांहीं वाढवीं उत्तरें ॥४॥

३४००. बोलतां वचन असा पाठमोरे । मज भाव बरे कळों आले ॥१॥ मागीतलें नये अरुचीनें हातां । नाहीं वरी सत्ता आदराची ॥२॥ समाधानासाठीं लाविलासे कान । चोरलेंसें मन दिसतसा ॥३॥ तुका म्हणे आम्हां तुमचेचि फंद । वरद्ळ छंद कळों येती ॥४॥

३४०१. काशासाठीं बैसों करूनियां हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा ॥१॥ काय आले येका जीवाच्या उद्धारें । पावसी उच्चारें काय होतें ॥२॥ नेदी पट्ट परी अन्नें तो न मारी । आपुलिये थोरीसाठीं राजा ॥३॥ तुका म्हणे आतां अव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥४॥

३४०२. माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥१॥ तुमच्या नामाची जतन । नव्हतां थोरि वाटे शीण ॥२॥ न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥३॥ तुका म्हणे लाज । आम्हा स्वामीचें तें काज ॥४॥

३४०३. कांहीं मागणें हें आम्हां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥१॥ देह तुच्छ झाले सकळ उपाधी । सेवेपासीं बुद्धी राहिलीसे ॥२॥ शब्द तो उपाधि अचळ निश्चय ॥३॥ तुका म्हणे देह फाकिला विभागीं । उपकार अंगीं उरविला ॥४॥

३४०४. मागितल्यास पसरीं कर । पळतां भरी वाखती ॥१॥ काय आम्ही नेणों वर्म । केला श्रम नेणतां ॥२॥ बोलतां बरें येतां रागा । कठिण लागा मागें मागें ॥३॥ तुका म्हणे येथें बोली । असे चाली उफराटी ॥४॥

३४०५. असो तुझें तुजपासीं । आम्हां त्यासीं काय काज ॥१॥ विरोधें कां कोंडूं मन । समाधान असोनी ॥२॥ करावा तो उरे आट । खटपट वाहातसे ॥३॥ तुका म्हणे येउनि रागा । कां मी विभागा मुकेन ॥४॥

३४०६. आहे तेंचि पुढें पाहों । बरें आहों येथेंचि ॥१॥ काय

वाढऊनि काम । उगाच श्रम तृष्णेचा ॥२॥ स्थिरावतां वोघीं बरें । चाली पुरें पडेना ॥३॥ तुका म्हणे वळितां मन । आम्हां क्षण नलगे ॥४॥

३४०७. सांगा दास नव्हे तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनी ॥१॥ कोणासाठीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥२॥ नसेल तो द्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥३॥ तुका म्हणे आम्हां ऐहिक परत्र । नाहीं कूळ गोत्र तुजविण ॥४॥

३४०८. अनन्यासीं ठाव येक सर्व काज । येकावीण दुजें नेणे चित्त ॥१॥ न पुरतां आळी देशधडी व्हावें । तें काय बरवें दिसतसे ॥२॥ लेंकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ ते दूरी धरिलिया ॥३॥ तुका म्हणे किती घातली लांबणी । समर्थ होउनि केवळ्यासाठीं ॥४॥

३४०९. स्तुती तरी काय करूं कोणापासीं । कीर्ति तरी कैसी वाखाणावी ॥१॥ खोट्या तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो श्रम वरी बरा ॥२॥ म्हणवावें त्याची खूण नाहीं हातीं । अवकळा फजीती सावकाश ॥३॥ तुका म्हणे हें गे तुमचें माझें तोंड । होऊनियां लंड आळवितों ॥४॥

३४१०. कांहीं नलगे आदि अवसान । बहुत कठिण दिसतसां ॥१॥ अवघ्याचि माझ्या वेंचविल्या शक्ति । न चलेसी युक्ति झाली पुढें ॥२॥ बोलिलें वचन हारपलें नभीं । उरलों तो उभी आहों तैसी ॥३॥ तुका म्हणे कांहीं न करावेसें झालें । थकिताचि ठेलें चित्त उगें ॥४॥

३४११. रूपीं गोवियेलें चित्त । पाईं राहिलें निश्चिंत ॥१॥ तुम्ही देवा अवघेचि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥२॥ झाली इंद्रियां विश्रांती । भ्रमतां पीडित ते होती ॥३॥ तुका म्हणे भेटी । सुटलि भवबंधाची गांठी ॥४॥

### उदकांत वह्या बुडविल्या त्या कोरड्या निघाल्या तेव्हां अन्याय झाला म्हणून केलेले ७ अभंग

३४१२. थोर अन्याय केला । तुझा अंत म्यां पाहिला । जनाचिया बोला । साठीं चित्त क्षोभविलें ॥१॥ भागविलासी केला शीण । अधम मी यातिहीन । झांकुनि लोचन । दिवस तेरा ते राहिले ॥२॥ अवघें घालोनि

कोडें । तहानभूकेचे सांकडें । योगक्षेम पुढें । तुज करणें लागेल ॥३॥ उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद । तुका म्हणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥४॥

३४१३. तूं कृपाळू माउली । आम्हां दिनांची साउली । नश्वरित आली । बाळवेषें जवळी ॥१॥ माझें केलें समाधान । रुप गोजिरें सगुण । निववीलें मन । आलिंगन देउनी ॥२॥ कृपा केली जना हातीं । पाईं ठाव दिल्हा संतीं । कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ॥३॥ तुका म्हणे मी अन्यायी । क्षमा करीं वो माझे आई । आतां पुढती काई । तुज न घालीं सांकडें ॥४॥

३४१४. कापो कोणी माझी मान । सुखे पीडोत दुर्जन । तुज होय शीण । तें मी न करीं सर्वथा ॥१॥ चूकी झाली येक वेळा । मजपासुनी चांडाळा । उभें करुनि जळा । माजि वह्या राखील्या ॥२॥ नाहीं केला हा विचार । माझा कोण अधिकार । समर्थासी भार । नकळे कैसा घालावा ॥३॥ गेले होउनियां मागें । नये बोलों तें वाउगें । पुढीलिया प्रसंगें । तुका म्हणे जाणावें ॥४॥

३४१५. काय जाणे मी पामर । पांडुरंगा तुझा पार । धरलिया धीर । काय येक न करिसी ॥१॥ उताविळ झालों आधीं । मतिमंद हीन बुद्धी । परी तूं कृपानिधी । नाहीं केला अव्हेर ॥२॥ तूं देवाचाहि देव । सकळ ब्रह्मांडाचा जीव । आम्हा दासा कींव । कां भाकणें लागली ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरा । मी तो पतितचि खरा । अन्याय दुसरा । दारीं धरणें बैसला ॥४॥

३४१६. नव्हती आली सीसा सुरी । अथवा घाव पाठीवरी । तो म्यां केला हरि । येव्हढा तुम्हा आकांत ॥१॥ वांटिलासी दोहीं ठाईं । मजपासीं आणि डोहीं । लागों दिल्हा नाहीं । येथें तेथें आघात ॥२॥ जीव घेती मायबापें । थोड्या अन्यायाच्या कोपें । हें तों नव्हे सोपें । साहों त्वांचि जाणितलें ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । तुज ऐसा नाहीं दाता । काय वानूं आतां । वाणी माझी खुंटली ॥४॥

३४१७. तूं माउलीहूनि मायाळ । चंद्राहुनी शीतळ । पाणीयाहुनि पातळ । तूं कल्होळ प्रेमाचा ॥१॥ देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा । वोवाळुनियां नामा । तुझ्या वरूनि टाकिलों ॥२॥ तुवां केलें रे अमृता । गोड त्याहि तूं परता । पांचा तत्त्वांचा जनिता । सकळ सत्तानायका ॥३॥ कांहीं न बोलेनि आतां । उगाच चरणीं ठेवितों माथा । तुका म्हणे पंढरिनाथा । क्षमा करीं अपराध ॥४॥

३४१८. मी अवगुणी अन्यायी । किती म्हणोनि सांगों काई । आतां मज पाईं । ठाव देईं विठ्ठले ॥१॥ पुरे पुरे हा संसार । कर्म बळवंत दुस्तर । राहों नेदी स्थिर । येक ठाईं निश्चळ ॥२॥ अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग । धरूं जातां संग । तंव तो होतो बाधक ॥३॥ तुका म्हणे आतां । अवघी तोडी माझी चिंता । येउनि पंढरीनाथा । वास करीं हृदयीं ॥४॥

स्वामींनीं आपल्या स्त्रीस उपदेश केला ते अभंग

३४१९. पिकल्या शेताचा आम्हां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥१॥ सत्तर टक्के बाकी उरली मागतो हा । मागें झडलें दाहा आजिवरी ॥२॥ हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज । माजघरीं बाजे बैसलासे ॥३॥ मज यासी भांडतां जाव नेदी बळें । म्हणे येक वेळे घ्याल वांटा ॥४॥ तुका म्हणे स्त्रीये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥५॥

३४२०. करितां विचार अवघें येक राज्य । दुजा कोण मज पाठीं घाली ॥१॥ कोण्या रीती जावें आम्ही वो पळोनी । मोकळी आंगणीं मागें पुढें ॥२॥ काय तीं गव्हाणें हिंडावीं तीं किती । दूत ते लागती याचे पाठीं ॥३॥ कोठें याची करूं गेलों कुळवाडी । आतां हा न सोडी जीवें आम्हां ॥४॥ होऊनि वेंचाक तेथेंचि राहावें । येईल तें खावें तुका म्हणे ॥५॥

३४२१. नागऊनि येकें नागवीच केली । फिरोनियां आली नाहीं येथें ॥१॥ भेणें स्तुति कोणी न घेती पालवी । करूनियां गोवी निसंतान ॥२॥ येके ती गोविली घेउनी जमान । हासतील जन लोक तया ॥३॥ सरले तयांसी घालितो वैकुंठीं । न सोडी हे साठी झाली जीवें ॥४॥ तुका म्हणे

झालों जाणोनी नेणता । सांपडलों हातां याचे आम्ही ॥५॥

३४२२. आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभिला नाश माझ्या जीवा ॥१॥ जरूर हें झालें तुज कां नावडे । उपास रोकडे येती आतां ॥२॥ बरें या तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें हें पाहें विचारूनी ॥३॥ तुज मज तुटी नव्हे या विचारा । सहित लेंकरां राहों सुखें ॥४॥ तुका म्हणे तरी तुझा माझा संग । घडेल वियोग कधीं नव्हे ॥५॥

३४२३. काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जिववीता साठीं केली ॥१॥ न म्हणावें कोणीं माझें हें करणें । हुकुम तो येणें देवें केला ॥२॥ करुनी मोकळा सोडिलों भिकारी । पुरविली तरी पाठी माझी ॥३॥ पाणिया भोंपळा जेवावया पानें । लाविलीं हो येणें देवें आम्हां ॥४॥ तुका म्हणे यासी नाहीं हो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥५॥

३४२४. नको धरूं आस व्हावें या बाळास । निर्माण तें त्यास त्याचे आहे ॥१॥ आपुला तो गळा घेईं उगवूनी । चुकवी जाचणी गर्भवास ॥२॥ ऐवज देखोनी बांधतील गळां । म्हणोनी निराळा पळतसें ॥३॥ देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥४॥ तुका म्हणे जरी आहे माझी चाड । तरी करी वाड चित्त आतां ॥५॥

३४२५. भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥१॥ म्हणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें झालीं मज ॥२॥ आस निरसुनी कठिण हें मन । करी वो समान वज्र तैसें ॥३॥ किंचित हें सुख टाकी वो थुंकोनी । पावसील धणी परमानंद ॥४॥ तुका म्हणे थोर चुकती सायास । भवबंध पाश तुटोनियां ॥५॥

३४२६. आईक हें सुख होईल दोघांसी । सोहळे हे ऋषि करिती देव ॥१॥ जडित विमानें बैसविती मानें । गंधर्वांचें गाणें नामघोष ॥२॥ संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्व सुखा पुरे कोड तेथें ॥३॥ आलिंगुनी लोळे त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी मायबाप ॥४॥ तुका म्हणे तया सुखा वर्णूं काय । जेव्हां बापमाय देखों डोळां ॥५॥

३४२७. देव पाहावया करी वो सायास । न धरीं हे आस नाशवंत ॥१॥

दिन शुद्ध सोम सकळीं पावला । द्वादशीं घडला पर्वकाळ ॥२॥ द्विजा पाचारूनी शुद्ध करीं मन । देईं हो तूं दान यथाविधी ॥३॥ नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥४॥ तुका म्हणे दूरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आम्हां ॥५॥

३४२८. सुख हें नावडे आम्हां कोण्या वेळे । नेणसी आंधळे झालीस तूं ॥१॥ भूक ताहान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठाईं ॥२॥ द्रव्य जीवाहूनी आवडे या जना । आम्हांसी पाषाणाहुनी हीन ॥३॥ सोईरे सज्जन जन आणि वन । अवघे समान काय गुणें ॥४॥ तुका म्हणे आम्हां जवळीच आहे । सुखदुःख साहे पांडुरंग ॥५॥

३४२९. गुरुकृपें मज बोलवीलें देवें । होईल हें घ्यावें हित कांहीं ॥१॥ सत्यदेवें माझा केला अंगीकार । आणिक विचार नाहीं दुजा ॥२॥ होईं बळकट घालुनियां कास । हाच उपदेश तुज आतां ॥३॥ सडा संमार्जन तुळसी वृंदावन । अतीत पूजन ब्राह्मणाचें ॥४॥ वैष्णवांची दासी होईल सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विटोबाचें ॥५॥ पूर्णबोध स्त्रीतें भ्रतार संवाद । धन्य जिहीं वाद आईकीला ॥६॥ तुका म्हणे आहे पांडुरंग कथा । तरले जो चित्ता धरिल कोणी ॥७॥

३४३०. आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां निज ध्येय योगियांचें ॥१॥ ते हे समचरण साजिरे विटेवरि । पहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥२॥ पुराणासी वाड श्रुति नेणती पार । तें झालें साकार पुंडलीका ॥३॥ तुका म्हणे ज्यातें सनकादिक ध्यात । आमुचें कुळदैवत पांडुरंग ॥४॥

३४३१. मी तंव बैसलों धरूनीयां आस । न करीं उदास पांडुरंग ॥१॥ नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागात्या भीकारी जालों दास ॥२॥ भुकेलों कृपेच्या वचनाकारणें । आशा नारायणें पुरवावी ॥३॥ तुका म्हणे येवोनियां देईं भेटी । कुर्वाळुनी पोटीं धरीं मज ॥४॥

३४३२. आतां तुझें नाम गात असें गीतीं । म्हणोन मानीती लोक मज ॥१॥ अन्नवस्त्र चिंता नाहीं या पोटाची । वारिली देहाची थोर पीडा ॥२॥ सज्जन संबंधीं तुटली उपाधी । रोकड्या या बंदी सुटलोंसें ॥३॥ द्यावा

घ्यावा कोणें करावा सायास । गेलि आशापाश वारुनीयां ॥४॥ तुका म्हणे तुज कळलें तें आतां । करा जी अनंता मायबापा ॥५॥

३४३३. कामक्रोध सुणे लावीयेलें पाठी । बहुत हिंपुटी झालों देवा ॥१॥ अवरिता तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥२॥ तुझीया विनोदें आम्हां प्राणासाठीं । भयाभीत पोटीं सदा दुःखी ॥३॥ तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण । तुज हांसे कोण समर्थासी ॥४॥

३४३४. स्वमुखें जी तुम्ही सांगा मज सेवा । ऐसें माझें देवा मनोगत ॥१॥ नेघे आम्ही कांहीं आपुलें उदार । चित्तीं वित्त घर जीवावरी ॥२॥ बोले परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥३॥ तुका म्हणे सत्य बोलतों वचन । करूनी चरण साक्ष तुझे ॥४॥

३४३५. मज अनाथाकारणें । करी येणें केशवा ॥१॥ जीव झुरे तुजसाटीं । वाट पोटीं पाहातुसें ॥२॥ चीत रंगलें चरणीं । तुजवांचुनी न राहे ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । माझी चींता असावी ॥४॥

३४३६. कासयावांचुनी जालों भुमीभार । तुझ्या पाइं थार नाहीं तरी ॥१॥ जाता भलें काय डोळीयांचें काम । जवें पुरुषोत्तम न देखती ॥२॥ काय मुख पेंव श्वापदाचें धांव । नीत्य तुझे नांव नुच्यारीतां ॥३॥ तुका म्हणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥४॥

३४३७. नको मज ताठा नको अभीमान । तुजवीण क्षीण होतो जीव ॥१॥ दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवी मज ॥२॥ तुका म्हणे तुझें जालीया दर्शन । मग नीवारण होइल सर्व ॥३॥

३४३८. चाल घरा उभा राहे नारायणा । ठेउं दे चरणावरी माथा ॥१॥ वेळोवेळां देइं क्षेम आलींगन । वरी अवलोकन कृपादृष्टी ॥२॥ प्रक्षाळु दे पाय बैसें माजघरीं । चीत्त स्थीर करीं पांडुरंगा ॥३॥ आहे त्या संचीतें करवीन भोजन । काय न जेउन करीशी आतां ॥४॥ करुणाकरें नाहीं कळों दील्हें वर्म । दूरी होता भ्रम कोण वारी ॥५॥ तुका म्हणे आतां आवडीच्या सत्ता । बोलीलों अनंता करवीन तें ॥६॥

३४३९. देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा

संसारासीं ।।१।। देवाची ते खुण करावें वाटोळें । आपणा वेगळें राहों नेदी ।।२।। देवाची ते खुण झाला ज्यासीं संग । त्याचा झाला भंग मनुष्यपणा ।।३।। देवाची ते खुण गुंतों नेदी आशा । ममतेचा फांसा शिवों नेदी ।।४।। देवाची ते खुण करावें तोंडाळ । आणि हे सकळ जग हरी ।।५।। देवाची ते खुण गुंतों नेदी वाचा । लागो असत्याचा मळ नेदी ।।६।। पाहा देवें तोंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ।।७।।

३४४०. अनंताच्या मुखें होसील गाईला । अमुप विठ्ठला दास तुम्हां ।।१।। माझें कोठें आलें होईल विचार । तरीच अव्हेरा योग्य झालों ।।२।। सर्व काळ तुम्ही असाजी संपन्न । चतुरा नारायण शिरोमणी ।।३।। तुका म्हणे ऐसें कलियुगींचे जीव । तरी नये कींव बहु पापी ।।४।।

३४४१. न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ।।१।। दासा साह्य नारायण । होय रक्षिता आपण ।।२।। नलगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ।।३।। न धरावी शंका । नये बोलों म्हणे तुका ।।४।।

३४४२. भांडवल माझें लटिक्याचे गांठीं । उदमासी तुटी यावी ऐसी ।।१।। कैसी तुझी वाट पाहों कोण्या तोंडें । भोंवताली भांडे गर्भवास ।।२।। चहुं खाणीचिया रंगलोंसे रंगें । सुष्ट दुष्ट अंगें धरुनीयां ।।३।। बहुतांचे बहु पालटलों साळे । बहु आले काळें रंग अंगा ।।४।। उकलूनि तये दावितां अंतर । घडीचा पदर सारोनियां ।।५।। तुका म्हणे आतां करी गोळसाटीं । आपुल्या पालटी संगें देवा ।।६।।

३४४३. संतसंगतीं न करावा वास । येखादे गुणदोष अंगा येती ।।१।। मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृतासी ।।२।। तुका म्हणे ते नमस्कारावें दुरून । अंतरीं धरून राहें रूप ।।३।।

३४४४. जें ज्याचें जेवण । तेंचि याचकासी दान ।।१।। आतां जाऊं चोजवीत । जेथें वसतील संत ।।२।। होतीं धालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ।।३।। तुका म्हणे धांव । पुढें खुंटवील हाव ।।४।।

३४४५. धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ।।१।। निजविल्या जागविती । नीज पुरवोनि देती ।।२।। येक वेवसाव । त्याचा संग त्याचा

जीव ॥३॥ हितें कळे हित । ग्वाही येक येका चित्त ॥४॥ विषमाचें कांहीं । आड तया येक नाहीं ॥५॥ तुका म्हणे बरी । घरा येतील त्यापरी ॥६॥

३४४६. धोंड्या सर्वे आदळितां फुटे डोकें । तों तों त्याच्या दुःखें घामेजेना ॥१॥ इंगळासी सन्निधान आतित्याई । क्षेम देतां कांहीं सुख वाटे ॥२॥ सप्रेमें कुर्वाळी महाफणी व्याळ । आपुली तो ढाळ सांडी केवीं ॥३॥ तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला । तयाचा अबोला आकाशासी ॥४॥

३४४७. आतां तळमळ । केली पाहिजे शीतळ ॥१॥ पाहा करील तें देव । पाईं ठेवोनियां भाव ॥२॥ तोची अन्नदाता । नाहीं आणिकाची सत्ता ॥३॥ तुका म्हणे दासा । नुपेक्षी हा भरवसा ॥४॥

३४४८. लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥१॥ आतां कैसें होय याचें । सिजतां काचें राहिलें ॥२॥ खाय वोकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥३॥ तुका म्हणे भावहीन । त्याचा शीण पाचावा ॥४॥

३४४९. माझ्या इंद्रियांसी लागलें भांडण । म्हणतील कान रसना धाली ॥१॥ करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥२॥ गुण गाय मुख आयकती कान । आमुचें कारण तैसें नव्हे ॥३॥ दरुशनें फिटे नेत्रांचा तो पांग । जेथें ज्याचा भाग घेतील ते ॥४॥ तुका म्हणे ऐसें करीं नारायणा । माझीही वासना ऐशी आहे ॥५॥

३४५०. सिद्धीचा दास नव्हे श्रुतीचा अंकिला । होईन विठ्ठला दास तूझा ॥१॥ सर्वसुख आहे माझिये मानसीं । राहिलें तयासी नाश नाहीं ॥२॥ तेणें पुण्य पाप न देखें लोचनीं । आणिकावांचूनि पांडुरंगा ॥३॥ न धरीं मी आस साधीन सायास । भक्तिप्रेमरसावांचूनिया ॥४॥ गर्भवासीं दुःख नाहीं येतां जातां । हृदईं असतां नाम तुझें ॥५॥ तुका म्हणे तुझा होईन अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥६॥

३४५१. जन्मा येऊनियां तया लाभ झाला । बिडवई भेटला पांडुरंग ॥१॥ संवसार दुःखें नाशियेलीं तेणें । उत्तम हें केणें नाम घोष ॥२॥ धन्य तोचि संत सिद्ध महानुभाव । पंढरीचा ठाव टाकियेला ॥३॥ प्रेमदाते तेचि पतितपावन । धन्य दरुशन होय त्याला ॥४॥ पावठणिया पंथें

जाहालीया सिद्धी । वोळंगे समाधि सायुज्यता ॥५॥ प्रेम आराणुक नाहीं भय धाक । मज तेणें सुख काय चिंता ॥६॥ ते दुर्लभ संसारासी । जडजीव उद्धार लोकांसी । तुका म्हणे त्यासी । धन्य भाग्य दरुपणें ॥७॥

३४५२. काय दिवस गेले अवघेचि वराडें । तें आलें सांकडें कथेमाजी ॥१॥ क्षण येक ठाईं मन स्थीर नाहीं । आराणूक कईं होईल पुढें ॥२॥ कथेचा विसर दोपामुळें होय । तरण उपाय कैंचा मग ॥३॥ काय सांचऊनि उरलें तें मागें । घटिका येक संगें काय गेली ॥४॥ तेचि वाणी येथें करा उजळणी । काढावीं मथुनि शब्दरत्नें ॥५॥ तुका म्हणे हेंचि बोलावया चाड । नाम घेतां गोड हीत असे ॥६॥

३४५३. शुद्धशुद्धा निवडे कैसे । चर्म मांस भिन्न नाहीं ॥१॥ कांहीं अधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥२॥ उदक भिन्न असे काईं । वोहळ बावी सरता नईं ॥३॥ सूर्य तेजें निवडे काय । रश्मी रसाळ सकळ खाय ॥४॥ वर्णा भिन्न दुधा नाहीं । सकळा गाई सारिखें ॥५॥ करितां भिन्न नाहीं माती । मडक्या गती भिन्न नांवें ॥६॥ वर्ते येकविध अग्नि । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥७॥ तुका म्हणे पात्र चाड । किंवा विष अमृत गोड ॥८॥

३४५४. न धरी प्रतिष्ठा कोणाचीही यम । म्हणतां कां रे राम लाजा झणी ॥१॥ सांपडे हातींचें सोडवील काळा । तो कां वेळोवेळां नये वाचे ॥२॥ कोण लोक जो हा सुटला तो येक । गेले कुंभीपाक रौरवांत ॥३॥ तुका म्हणे हित तो म्हणावा विठ्ठल । न म्हणे तो भोगील कळेल तें ॥४॥

३४५५. म्हणवितां हरि न म्हणे तयाला । दरवडा पडिला देहामाजी ॥१॥ आयुष्य धन त्याचें नेलें यमदुतीं । भुलविला निश्चिंती कामारंगें ॥२॥ नावडती कथा देउळासी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ॥३॥ कोण नेतो तया घटिका दिवस येका । कां रे म्हणे तुका नागवीसी ॥४॥

३४५६. कथे बैसोनी सादरें । सुख चर्चा परस्परें । नवल काय तो उद्धरे । आणिक तरे सुगंधें ॥१॥ पुण्य घ्यावें रे फुकाचें । पाप दुष्ट वासनेचें । पेरिल्या बीजाचें । फळ घेई शेवटीं ॥२॥ कथा विसर पाडि आळस । छळण करुनि मोडी रस । बुडवी आपणासरिसें । विटाळसी नावेसी ॥३॥ सज्जन चन्दनाचिये

परी । दुर्जन देशत्यागें दुरी । राहो म्हणे हरी । विनंती करी तुका हे ॥४॥

३४५७. कळों आलें तुझें जिणें । देवा तूं माझें पोषणें ॥१॥ वाट पाहासी आमुची । सत्ता सतत कैंची ॥२॥ बोलावितां यावें रूपा । सदा निर्गुणींच लपा ॥३॥ तुका म्हणे तूं परदेशी । येथें आम्हां अंगें जिसी ॥४॥

३४५८. आतां येथें लाज नाहीं तुझें काम । जाय मज राम आरुऊं दे ॥१॥ तुझे भीडे माझे बहु झाले घात । केलों या अंकित दुर्जनांचा ॥२॥ माझें केलें मज पारखें माहेर । नष्ट तूं साचार चालविले ॥३॥ सुखासाठीं येक वाहियले खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥४॥ केला चौघा चार नेलों पांचांमधीं । नाहीं दिल्ही शुद्धी धरूं आशा ॥५॥ तुका म्हणे आतां घेईन काठीवरी । धणी म्यां कैवारी केला देव ॥६॥

३४५९. आजवरी होतों तुझे सत्तेखालीं । तोंवरी त्वां केली विटंबना ॥१॥ आतां तुज राहों नेदी या देशांत । तैसा म्यां समर्थ केला धणी ॥२॥ सापें रीग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापीणी काय जाणों ॥३॥ तुका म्हणे हा म्यां बुडविला वेव्हार । तुझेंचि ढोंपर सोलावया ॥४॥

३४६०. देवाच्या निरोपें पिटीतों डांगोरा । लाजे नका थारा देऊं कोण्ही ॥१॥ मोडिले रांडेनें सुपंथ मारग । चालविलें जग यमपंथें ॥२॥ परिचारीं केली आपुलीच रूढी । पोटींची ते कूडी ठावी नाहीं ॥३॥ तुका म्हणे आणा राउळा धरूनी । फजीत करूनी सोडूं मग ॥४॥

३४६१. कां रे तुम्ही निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरूपें वैकुंठासी जाना ॥१॥ काय गणिकेचा याती अधिकार मोठा । दोषी अजामिळ ऐसीं नेलीं वैकुंठा ॥२॥ ऐसी मागें नेणों किती अनंत अपार । पंच महादोषी त्यांच्या पातका नाहीं पार ॥३॥ पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण तें कर्तव्य तुका म्हणे त्यांचें पुण्य ॥४॥

३४६२. बैसोनियां खाऊं जोडी । वोढावोढी चुकऊनी ॥१॥ ऐसें केलें नारायणें । बरवें जाणें सुखाचें ॥२॥ घरींच्या घरीं भांडवल । नलगे बोल वेंचावे ॥३॥ तुका म्हणे आटाआटी । चुकली दाटी सकळ ॥४॥

३४६३. नाहीं भ्यालों तरी पावलों या ठायां । तुम्हा काळ वायां

जवळीक ॥१॥ सत्ताबळें आतां मागेन भोजन । केलें तें चिंतन आजिवरी ॥२॥ नवनीतासाठीं खादला हा जीव । थोड्यासाठीं कींव कोण करी ॥३॥ तुका म्हणे ताक नलगे हें घाटे । पांडुरंग खोटे चाळवणें ॥४॥

३४६४. सारीन ते आतां येकाची भोजनें । वारीन मागणें वेळोवेळां ॥१॥ शेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पांडुरंगे ॥२॥ वंचूं नये आतां कांहींच प्रकार । धाकल्याचे थोर झाल्यावरी ॥३॥ तुका म्हणे आतां बहु चाळवावें । कांहीं नेदी ठावें उरों मागें ॥४॥

३४६५. पोट धालें मग नलगे पंगती । झालीया निश्चिंती खेळ गोड ॥१॥ आपुलीया हातें देई वो कवळ । विठ्ठला शीतळ जीवनवरी ॥२॥ घराचा विसर होईल आनंदें । नाचेन मी छंदें प्रेमाचीया ॥३॥ तुका म्हणे तोचि करी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥४॥

३४६६. बोलसील तरी । तुझ्या येईन उत्तरीं ॥१॥ कांहीं कोड कौतुकें । हातीं द्यावया भातुकें ॥२॥ बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ॥३॥ तुका म्हणे देवा । माझें चळण तुज सवा ॥४॥

३४६७. दिल्हा जीव भाव । तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥१॥ आतां वर्ते तुझी सत्ता । येथें सकळ अनंता ॥२॥ माझीया मरणें । तुम्हीं बसविलें ठाणें ॥३॥ तुका म्हणे कांहीं । मी हें माझें येथें नाहीं ॥४॥

३४६८. येकाचिये वेठी । सांपडलों फुकासाठीं ॥१॥ घेतों काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ॥२॥ धांवे मागें मागें । जाय तिकडे चालत लागे ॥३॥ तुका म्हणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ॥४॥

३४६९. आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥१॥ उभारोनि बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥२॥ नाभी नाभी या उत्तरें । करुणाकरें शांतविजे ॥३॥ तुका म्हणे केली आस । तो हा दिवस फळाचा ॥४॥

३४७०. बराडियाची आवडी पुरे । जया झुरे साठीं ते ॥१॥ तैसें झालें माझ्या मना । तुठी चरणावरूनि ॥२॥ भागलिया पेणें पावे । विसावें तें टाकणीं ॥३॥ तुका म्हणे छाया भेटे । बरें वाटे तापे त्या ॥४॥

३४७१. बहु जन्में सोस केला । त्याचा झाला परिणाम ॥१॥ विठ्ठलसें

नाम कंठीं । आवडी पोटीं संचितें ॥२॥ येथुनि तेथवरी आतां । नलगे चिंता करावी ॥३॥ तुका म्हणे धालें मन । हेंचि दान शकुनाचें ॥४॥

३४७२. उसंतिल्या कर्मवाटा । बहु मोठा आघात ॥१॥ शीघ्र यावें शीघ्र यावें । हातीं न्यावें धरूनी ॥२॥ भागलों या खटपटे । घटपटे करितां ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । माझी चिंता न संडावी ॥४॥

३४७३. तुम्हांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥१॥ कां गा तुम्ही ऐसे नेणा । निष्ठुरपणें टाळितसा ॥२॥ आळवितों मायबापा । नये कृपा अझुनि ॥३॥ तुका म्हणे जगदीशा । काय असां निजले ॥४॥

३४७४. नेलें सळेंबळें । चित्ताविताचें गांठोळें ॥१॥ साह्य झाली घरींच्या घरीं । होतां ठाईंच कुठोरी ॥२॥ पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥३॥ तुका म्हणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥४॥

३४७५. जाहला डांगोरा । मुखीं लहानही थोरा ॥१॥ नागविलों जनाचारीं । कोण्ही बैसों नेदी द्वारीं ॥२॥ संचिताचा ठेवा । आतां आला तैसा घ्यावा ॥३॥ तुका म्हणे देवें । केलें आतां हें बरवें ॥४॥

३४७६. किती चौघाचारें । येथें गोवीलें वेव्हारें ॥१॥ ऐसें बांधवीले गळे । होऊं न शकती निराळे ॥२॥ आपुलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥३॥ तुका म्हणे खंडदंडें । येरझारी लपती लंडे ॥४॥

३४७७. पांडुरंगासारिखा सांडूनी वेव्हारा । आणिकांचि करा आस वायां ॥१॥ बहूतां दिधला उद्धार उदारें । निवडिना खरें खोटें कांहीं ॥२॥ याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणिक वेव्हार चालती ना ॥३॥ तुका म्हणे माझें हातींचें वजन । यासी बोल कोण ठेऊं शके ॥४॥

३४७८. ठेवूनी इमान राहिलों चरणीं । म्हणऊनी धनी कृपा करी ॥१॥ आम्हांसी भांडार करणें जतन । आला गेला कोण ऊंचनिंच ॥२॥ करुनी सांभाळी राहिलों निराळा । येक येक वेळां आज्ञा केली ॥३॥ तुका म्हणे योग्यायोग्य हे विनीत । देवा नाहीं चित्त येथें देणें ॥४॥

३४७९. आतां नव्हे गोड करितां संसार । आणिक संचार झाला माजी ॥१॥ ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥२॥ रसने-

चिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निववीलें ॥३॥ तुका म्हणे आतां बैसलों ठाकणी । इच्छेची ते धणी पुरईल ॥४॥

३४८०. आतां काशासाठीं दूरी । अंतर उरी राखीली ॥ १ ॥ करीं लवकरी मूळा । राहाणें तळा मुळींचिया ॥२॥ दोहीं ठाईं उद्वेगवाणें । दरुशनें निश्चिती ॥३॥ तुका म्हणे वेग व्हावा । ऐसा जीवा उत्कंठा ॥४॥

३४८१. पडली हे रूढी जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥१॥ मरणाची कांहीं नाहीं आठवण । संचितांचें धन लाभ हेवा ॥२॥ देहाचें भय तें काळीचें भातुकें । ग्रासूनि तें येकें ठेविलेंसें ॥३॥ तुका म्हणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि आंधळे होऊं नका ॥४॥

३४८२. हित नाहीं ठावें जननी जनका । दाविला लौकिकाचार तिहीं ॥ १॥ न धरावी चाली करावा विचार । वरील आहार गळीं लावीं ॥२॥ आंधळ्याचे काठी लागले आंधळे । घात येक वेळे पुढें मागें ॥३॥ तुका म्हणे केला निवाड रोकडा । राऊत हा घोडा हातोहातीं ॥४॥

३४८३. जेथें पाहे तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखुनी पहाती रस ॥१॥ काय सांगों देवा भुलले जीव । बहु यांची येतसे कींव ॥२॥ वैकुंठींचें मोटळें लटिकेंचि फुगें । पेणिया जाऊनी भिक्षा मागे ॥३॥ तुका म्हणे कां उगेंचि खोल ॥ जवळी दाखवी आपणां बोल ॥४॥

३४८४. जाणिवेच्या भारें चेपलासे उर । सदा बुरबुर सरेचि ना ॥१॥ किती याचे बोल आइकावें कानीं । मारिलें घाणीं नाळे करी ॥२॥ मिठेवीण काय आळणी हे बोल । कोरडीच फोल घसघस ॥३॥ तुका म्हणे डेंगा न कळेचि हित । किती हे फजित करूं तरी ॥४॥

३४८५. अनुतापयुक्त गेलीया अभिमान । विसरूं वचन मागिलाचा॥१॥ त्याचे पाय माझे लागोत कपाळीं । भोगें उष्टावळी धन्यकाळ ॥२॥ षड ऊर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संतां आल्या वेगीं ॥३॥ तुका म्हणे जाती वोळे लवकरी । ठाइंचि अंतरीं शुद्ध होती ॥४॥

३४८६. खोल वोलीं पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वायां जाय ॥१॥ लटिक्याचे आम्ही नव्हो सांटेकरी । थीतें घाली भरी पदरींचें ॥२॥ कोण्या

इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ॥३॥ तुका म्हणे कसीं आगी जें उतरे । तेंचि येथें सरे जाति शुद्ध ॥४॥

३४८७. गोमट्या बीजाचीं फळेंहि गोमटीं । बाहे तेंचि पोटीं समतुक ॥१॥ जातीच्या संतोषें चित्ताशी विश्रांती । परतोनि मागुती फिरों नेणें ॥२॥ खऱ्याचे पारखी येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळें दूरी ॥३॥ तुका म्हणे मज सत्याची आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥४॥

३४८८. मन झालें भाट । कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । येचि चाली स्वभावें ॥१॥ बोले देवाचे पवाडे । नित्य नवेचि रोकडे । ज्यापरी आवडे । तैसा तैसा करूनी ॥२॥ रोखीं रहावें समोर । पुढें मागें चाले भार । करावें उत्तर । सेवा रुजू करूनी ॥३॥ पूर वर्षला देकारें । संतोषाच्या अभय करें । अंगींच्या उत्तरें । तुकया स्वामी शृंगारी ॥४॥

३४८९. दूरी तोंचि होतों आपुल्या आशंकें । नव्हतें ठाऊकें मूळ भेद ॥१॥ आतां जेथें तेथें होईन सांगातें । लपाया पुरतें राहों नेदीं ॥२॥ मिथ्या मोहो मज लाविला उशीर । तरी हें अंतर झालें होतें ॥३॥ तुका म्हणे कां रे दाखविसी भिन्न । लटिकाची शीण लपंडाई ॥४॥

३४९०. कळों नये तोंचि चुकवितां बरें । मग पाठमोरें काय काज ॥१॥ धरिलेति आतां द्या जी माझा डाव । सांपडला भाव ऐसा आहे ॥२॥ होतासी अंतरें झांकिलिया डोळीं । तोंचि मी न्याहाळीं धरुनी दृष्टी ॥३॥ तुका म्हणे तुज रडीचीच खोडी । अहाच बराडी तो मी नव्हे ॥४॥

३४९१. विश्वास तो देव । म्हणूनी धरियेला भाव ॥१॥ माझी वदवितो वाणी । ज्यानें धरिली धरणी ॥२॥ जोडिलीं अक्षरें । नव्हती बुद्धीच्या विचारें ॥३॥ नाहीं केली आटी । कांहीं मान दंभासाठीं ॥४॥ कोणी भाग्यवंत । तया कळे हें उचित ॥५॥ तुका म्हणे झरा । आहे मुळींचाचि खरा ॥६॥

३४९२. सुराणीचीं झालों लाडकीं केलीं । वडील धाकुलीं आम्हीं देवा ॥१॥ म्हणऊनी कांहीं न घडे अव्हेर । गोमटें उत्तर भातुकेंही ॥२॥ कांहीं एक नाहीं वंचिलें वेगळें । मुळींचिया मुळें स्थिरावलें ॥३॥ लेवविलीं अंगीं आपलीं भूषणें । अलंकार लेणें सकळही ॥४॥ सारितां न सरे अमुप भांडार ।

धना अंतपार नाहीं लेखा ॥५॥ तुका म्हणे आम्ही आळऊं आवडी । म्हणऊनी जोडी दाखविली ॥६॥

३४९३. येक वेळे केलें रितें कलेवर । आतां दिल्ही थार पांडुरंगा ॥१॥ पाळणपोषणा लागले ते सोई । देहाचे ते काई सर्व भाव ॥२॥ माझीया मरणें झाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाश ॥३॥ झाला ऐसा येका घायें येथें नाहीं । तुका म्हणे कांहीं बोलों नये ॥४॥

३४९४. पावतों ताडण । जरी हे मोकलितें जन ॥१॥ मग मी आठवितों दुःखें । देवा सावकाश सुखें ॥२॥ होती अप्रतिष्ठा । होतों वरपडा कष्टा ॥३॥ तुका म्हणे मान । होता उत्तम खंडण ॥४॥

३४९५. धरावें तें भय । अंतरोनि जाती पाय ॥१॥ झाल्या तुटी देवासवें । काय वांचोनि करावें ॥२॥ कोणासी पारिखें । लेखूं आपणासारिखें ॥३॥ तुका म्हणे असो । अथवा हे आतां नसो ॥४॥

३४९६. आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥१॥ ऐसी प्रभुची ज्या कळा । त्याच्या कोण पाहे बळा ॥२॥ अंकीता ऐसिया । होईल पावविले ठायां ॥३॥ तुका म्हणे ऐसें । दिल्हें आभंड प्रकाशें ॥४॥

३४९७. आम्हासी सांगाती । होती आराले ते होती ॥१॥ येती आईकतां हांक । दोन मिळोन म्हणती येक ॥२॥ आणिका उत्तरीं । नसे गोविली वैखरी ॥३॥ तुका म्हणे बोला । खुण पाहाती विठ्ठला ॥४॥

३४९८. काहे लकडा घांस कटावे । खोदहि जमीन मठ बनाये ॥१॥ देवलवासी तरवरछाया । घरघर माई खपरिबसमाया ॥२॥ कां छांडीये भार फेर सिर भागें । मायाको दुःख मीटलीये अंगें ॥३॥ कहे तुका तुम सुनो हो सिद्धा । रामबीना और झुटा कछु धंदा ॥४॥

३४९९. आणिक पाखांडें असती उदंडें । तळमळिती पीडें आपुलिया ॥१॥ त्याचीया बोलाचा नाहीं हा विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥२॥ दृढ येक चित्तें झालों या जिवासी । लाज सर्वविसीं तुम्हांसी हे ॥३॥ पीडों नेदी पशु आपुलें अंकित । आहे जें उचित तैसें करा ॥४॥ तुका म्हणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येईल तुम्हां ॥५॥

३५००. व्हावया भिकारी हेंचि आम्हां कारण । अंतरुनी जन जावें दुरीं ॥१॥ समंधु तुटावा शब्दाचाहि स्पर्श । म्हणऊनी आस मोकलिली॥२॥ तुका म्हणे दुःखें उबगला जीव । म्हणऊनि कींव भाकी देवा ॥३॥

३५०१. कोरडिया ऐशा काय सांगूं गोष्टी । करीं उठाउठीं हित आधीं ॥१॥ खोळंबला राहे आपुला मारग । पाहावी ती मग तुटी कोठें ॥२॥ लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥३॥ तुका म्हणे डांख लागे अळंकारें । मग नव्हे खरें पुटेवीण ॥४॥

३५०२. ऐसें ठावें नाहीं मूढा । सोस काकुलती पुढा ॥१॥ माझी नका जाळूं भांडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥२॥ पातलीया काळ । तेव्हां काय चाले बळ ॥३॥ संचित तें करी । नरका जाय मेल्यावरी ॥४॥ परउपकार । न घडावा हा विचार ॥५॥ तुका म्हणे लांसी । आतां भेटों नये ऐसी ॥६॥

३५०३. काळाचे सारिखीं वाहाती नक्षत्रें । करितां दुसरें फळ नाहीं ॥१॥ ऐसें करत्यानें ठेविलें करून । भरिलें भरून माप नेमें ॥२॥ शीतउष्णकाळीं मेघ वरुषाव । वरुषतां वाव होय शीण ॥३॥ तुका म्हणे विष अमृताचे किडे । पालट न घडे जिणें तया ॥४॥

३५०४. बोलणें तें आम्ही बोलों उपयोगीं । पडिलें प्रसंगीं कळे ऐसें ॥१॥ जयामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खचेची ॥२॥ करणें तें आम्ही करूं येक वेळे । पुढिलीया बळें वाढी खुंटे ॥३॥ तुका म्हणे असे आज्ञेचीं धारकें । म्हणऊनि येक बोलें सारूं ॥४॥

३५०५. तुझिया विनोदें आम्हांसी मरण । सोसीयेला शीण बहु फेरे ॥१॥ आतां आपणाचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥२॥ वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥३॥ तुका म्हणे वर्म सांपडलें सोपें । गोवियलों पापें पुण्यें होतों ॥४॥

३५०६. पाठिलागा काळ येतसे या लागें । मी माझें वाउगें मध्यें ऐसें ॥१॥ आतां आगी लागो ऐसीया वेव्हारा । तूं माझा सोयरा पांडुरंगा ॥२॥ वागविला माथां नसतांचि भार । नव्हतें साचार देखिलें तों ॥३॥ तुका म्हणे केलें जवळील दूरी । मृगजळ वरी आड आलें ॥४॥

३५०७. आपुलीये टाकीं । करी कांहीं तरी येकी ॥१॥ करीन पायांसीं वोळखी । करीसी तें करी सुखी ॥२॥ काय क्लेश गंगाजळ । समर्पून तुळसी-दळ ॥३॥ तुका म्हणे देवा । कर जोडीन ते सेवा ॥४॥

३५०८. माझे तों स्वभाव मज अनावर । तुजही देतां भार कांहीं नव्हे ॥१॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृति स्वपना ताळ नाहीं ॥२॥ संपादितों तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥३॥ तुका म्हणे सत्या नाहीं पाठी पोट । आहे तें निघोट येक जाती ॥४॥

३५०९. न व्हावा तो बरा मुळींच संबंध । विश्वासि तो बद्ध बोलिलासे ॥१॥ आतां माझें हित काय तें विचारा । सत्यत्वें दातारा पांडुरंगा ॥२॥ नाहीं भाव परी म्हणवितों दास । नको देऊं यास उणें येऊं ॥३॥ तुका म्हणे कां हो उद्धरितां दीन । मानितसा शीण मायबापा ॥४॥

३५१०. काय तुमची यास वेंचते गांठोळी । मा हे टाळाटाळी करीतसां ॥१॥ चतुराच्या राया अहो पांडुरंगा । ऐसें तरी सांगा निवडूनी ॥२॥ कोण तुम्हां सुख असे या कौतुकें । भोगितों अनेकें दुःखें आम्ही ॥३॥ तुका म्हणे काय झालासी निर्गुण । आम्हां येथें कोण सोडवील ॥४॥

३५११. निष्ठुर यासाठीं करीतों भापण । आहेसी सर्वज्ञ जाणता तूं ॥१॥ ऐसें कोण दुःख आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥२॥ बैसलासी कोण करूनीयां धीर । नाहीं येथें ऊर दुमऱ्याची ॥३॥ तुका म्हणे आलें औघेंचि पायांपें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥४॥

३५१२. पायांपासीं चित्त । तेणें भेटी अखंडीत ॥१॥ असे खेळे भलते ठाईं । प्रेमसूत्रदोरी पाईं ॥२॥ केलेंसें जतन । मुळीं काय तें वचन ॥३॥ तुका म्हणे सर्व जाणा । ठाईं विचारावें मना ॥४॥

३५१३. तुझें मजपासीं मन । माझी तुज भूक तान ॥१॥ जिव्हा रते येके ठाईं । दुजें बोलायाचें कांहीं ॥२॥ माझिया कौतुकें उभा पाहासी भातुकें ॥३॥ तुका म्हणे साचें । तेथें मागील कैचें ॥४॥

३५१४. तुम्हां आम्हां सरी । आतां कईच्या या परी ॥१॥ स्वामिसेवा अळंकार । नाहीं अवडिये थार ॥२॥ खुंटलिया वाचा । मग हा आनंद

कईंचा ॥३॥ तुका म्हणे कोडें । आम्ही नाचों तुजपुढें ॥४॥

३५१५. कैचें भांडवल खरा हातीं भाव । कळवळ्यानें माव दावीतसे ॥१॥ आतां माझा अंत नको सर्वजाणा । पाहों नारायणा निवडुनी ॥२॥ संतांचें उच्छिष्ट मागले पंगती । करावें संगती लागे ऐसें ॥३॥ तुका म्हणे आलों दाउनी विश्वास । संचित तें नाश पावें ऐसें ॥४॥

३५१६. थांडे तुम्हीं मागें होती उद्धरिलें । मज ऐसे गेले वायां जीव ॥१॥ आतां याचा कांहीं न मानावा भार । कृपेचा सागर आहेसी तूं ॥२॥ तुज आळवितां पापांची वसती । राहे अंगीं कांति बळ त्याचें ॥३॥ तुका म्हणे जैसे तारिले दगड । तैसा मीहि जड येक देवा ॥४॥

३५१७. आम्ही म्हणों कोण्ही नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥१॥ हा गे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरा सत्ता नाहीं ऐसी ॥२॥ आम्हां तुज असों देऊनी आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥३॥ तुका म्हणे मज धरियेलें काळें । पंचभूतीं खळें करूनियां ॥४॥

३५१८. आहे तें सकळ प्रारब्धाच्या हातीं । यावें काकुळती यासी आतां ॥१॥ ऐसा माझ्या मनें सांगितला भाव । तोंवरीच देव दुजा नाहीं ॥२॥ अवधीयाची जेव्हां सारावी करकर । भाव बळें थार धरूं यासी ॥३॥ तुका म्हणे तुज ठेवावें पुजून । आणिक तो गुण नाहीं येथें ॥४॥

३५१९. शेवट तो होतो तुझीयानें गोड । म्हणउनी चाड धरितसों ॥१॥ देउनी भोगा भोग कलिवरा भार । साहो तुज थार त्याजमधीं ॥२॥ तुझ्या बळें कांहीं खटपट काम । वाढवावा श्रम नलगे तो ॥३॥ तुका म्हणे आम्ही चेपलों या भारें । तुमचें तें खरें देवपण ॥४॥

३५२०. ऐसाची तो गोवा । न पाहिजे केला देवा ॥१॥ बहु आली दुरवरी । वोढत हे भरोवरी ॥२॥ आम्हांसी न कळे । तुम्ही झाकूं नये डोळे ॥३॥ तुका म्हणे संगें । असों येक येका अंगें ॥४॥

३५२१. मायलेंकरांत भिन्न । नाहीं उत्तराचा शीण ॥१॥ धाडी धाडी वो भातुकें । रंजविल्यावें कौतुकें ॥२॥ करूनि नवल । याचे बोलिलों ते बोल ॥३॥ तुका म्हणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥४॥

३५२२. आवडी कां ठेऊं । बैसोनियां संगें जेऊं ॥१॥ मागें नको ठेऊं उरी । माझी आण तुजवरी ॥२॥ देखिले प्रकार । याचे पाहेन साचार ॥३॥ तुका म्हणे बाळीं । केली चाहाडी सकळीं ॥४॥

३५२३. नव्हेसी तूं लांसी । माय आणिकां त्यां ऐसी ॥१॥ जे हे वायां जाती बोल । होती निर्फळचि फोल ॥२॥ नव्हेसी दुबळी । कांहीं नाहीं वें जवळी ॥३॥ तुका म्हणे खोटी । कांहीं नव्हेसी करंटी ॥४॥

३५२४. आम्हां बोल लावा । तुम्हां अनुचित देवा ॥१॥ ऐसें सांगा कां व्यालेती । काय नाहीं तुम्हां हातीं ॥२॥ आतां धरा दुरी । वायां दवडाया थोरी ॥३॥ तुका म्हणे ठाईं । ऐसें विचारावें कांहीं ॥४॥

३५२५. मरोनियां गेली माय । मग तया कोण पुसे ॥१॥ पोरटियांची दाद कोणा । ऐसा जन प्रवाहो ॥२॥ निढळास निढळ जोडा । होय कोडा कौतुका ॥३॥ तुका म्हणे देवा ऐसीं । अहों सरसीं आपण ॥४॥

३५२६. संसाराची कोण गोडी । दिल्ही जोडी करुनी ॥१॥ निष्ठुर तूं बहु देवा । पुरे हेवा न म्हणवी ॥२॥ पाहोनियां कर्म डोळां । निराळा तो वर्जीना ॥३॥ तुका म्हणे तुज माझें । म्हणतां वोझें फुकट ॥४॥

३५२७. नव्हतें तें कळों आलें । तरी बोले अबोला ॥१॥ तुज मज घातली तुटी । येका भेटीपासुनी ॥२॥ आतां याची न धरीं चाड । कांहीं कोड कौतुकें ॥३॥ तुका म्हणे यावें जावें । येका भावें खंडलें ॥४॥

३५२८. आतां दोघांमध्यें काय । उरलें होय वाणी जेसे ॥१॥ निष्ठुर हें कळे मन । समाधान करुनी ॥२॥ झुरावें तें तेथींच्या परी । घरींच्या घरीं अवघिया ॥३॥ तुका म्हणे देवपण । गुंडाळोन असों दे ॥४॥

३५२९. मागितल्यास आस करा । उरी धरा कांहीं बाहीं ॥१॥ म्हणऊनी सारिली आस । होतीं वास मूळ तें ॥२॥ माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना वोरसे ॥३॥ तुका म्हणे आळवणें । माझ्या देणें उत्तरा ॥४॥

३५३०. आतां बरें घरींच्या घरीं । आपली उरी आपणापें ॥१॥ वाईट बरें न पडे दृष्टी । मग कष्टी होईजेना ॥२॥ बोलों जातां वाढे बोल । वांयां फोल खटपट ॥३॥ काकुलती यावें देवा । तों तों सेवा इच्छितो ॥४॥

हिशोबाचे खटपटे । चढे तुटे घडेना ॥५॥ तुका म्हणे कळों आलें । दुसरे भलें तों नव्हे ॥६॥

३५३१. आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां ते मग गोवी नाहीं॥१॥ ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवींचा वेव्हांर पापपुण्य ॥२॥ पळणें ते पळो सांडोनि कांबळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥३॥ तुका म्हणे येथें शूर तो निवडे । पडिलें बापुड काळचक्रीं ॥४॥

३५३२. उद्धत त्या जाती । द्रव्य रंगल्या उद्धती ॥१॥ म्हणउनि बहु फार । त्यासी असावें अंतर ॥२॥ कैचें पाठी पोट । गोड विषासी शेवट ॥३॥ तुका म्हणे सापा । न कळे कुर्वाळिलें बापा ॥४॥

३५३३. आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥१॥ जैसी तैसी माय बरी । मानिल्या त्या माना येरी ॥२॥ व्यालीचा कळवळा । जीव बहुत कोंवळा ॥३॥ कवतुकें वावरे । तुका म्हणे या आधारें ॥४॥

३५३४. पाळितों वचन । परि बहु भीतें मन ॥१॥ करितों पायापाशीं सलगी । नये बैसो अंगसंगीं ॥२॥ जोडोनियां कर । उभे असावें समोर ॥३॥ तुका म्हणे संत । तुम्ही मी बहु पतित ॥४॥

३५३५. जैसा तैसा आतां । मज प्रमाण अनंता ॥१॥ पायां पडणें न सोडीं । पोटीं तेंचि वर तोंडीं ॥२॥ येका भावें चाड । आदि तैसें अंतीं गोड ॥३॥ तुका म्हणे आम्हां । टळणेंचि नाहीं नेमा ॥४॥

३५३६. चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मा सांपडलों ॥१॥ पाठी लागे करी नाश । गर्भवास भोगवी ॥२॥ माझें तुझें भिन्नभावें । गळां दावें मोहाचें ॥३॥ तुका म्हणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ॥४॥

३५३७. देह प्रारब्धा शिरीं । असोनि न करी उद्वेग ॥१॥ धांव घालीं नारायणा। माझ्या मना जागवी ॥२॥ ऐसीं चुकोनियां वर्मे । पीडा भ्रमें पावलों ॥३॥ तुका म्हणे कैंचा भोग । नव्हे रोग अंगींचा ॥४॥

३५३८. अनंताच्या ऐकों कीर्ती । ज्यांच्या चित्तीं हरिनाम ॥१॥ उल्लंघुनि गेले सिंधु । हा भवबंधु तोडोनियां ॥२॥ हळूहळू तेचि वाही । चालों कांहीं अधिकारें ॥३॥ खुंटोनियां गेले नावा । नाहीं यावा खोळंबला

॥४॥ नलगे मोल द्यावा रुका । भावें येका कारण ॥५॥ भीमातीरीं थडवा केला । उठा चला लवलाहें ॥६॥ तुका म्हणे पाहतों वाट । उभा नीट पाउलीं ॥७॥

३५३९. तरीच म्यां देवा । साटी करूनियां जीवा ॥१॥ येथें बैसलों धरणें । दृढ कायावाचामनें ॥२॥ आवरिल्या वृत्ति । मन घेऊनियां हातीं ॥३॥ तुका म्हणे जरा । बाहेर येऊं नेदी घरा ॥४॥

३५४०. हें तों येक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ॥१॥ म्हणवितां त्याचे दास । पुढें आस उरेना ॥२॥ कृपादान केलें संतीं । कल्पांतींही सरेना ॥३॥ तुका म्हणे संतसेवा । हेंचि देवा उत्तम ॥४॥

३५४१. नारायणा ऐसा । सेवूं नेणतील रसा ॥१॥ जेणें भव्य व्याधि तुटे । दुःख मागुतें न भेटे ॥२॥ नलगे कांहीं आटी । बाधा राहों न शके पोटीं ॥३॥ कैवल्यें तें जोडे । कृपा लवकरी घडे ॥४॥ जन्ममरण दुःख आटे । जाळें अवघेंचि तुटे ॥५॥ तुका म्हणे झाला । याचा गुण बहुतांला ॥६॥

३५४२. अनेक दोषांचे काट । जे जे गादले निचोट । होती हरिनामें चोखट । क्षण येक न लगतां ॥१॥ तुम्ही हरि म्हणा हरि म्हणा । महादोषाची छेदना ॥२॥ अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळी रतला । क्षण न लगतां नेला । वैकुंठासीं हरि म्हणतां ॥३॥ अमित दोषांचे हे मूळ । झाले वाल्मिकासीं सबळ । झाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा ॥४॥ हरि म्हणतां तरले । महादोषी उद्धरिले । गणिकेसी नेलें । वैकुंठासी हरि म्हणतां ॥५॥ हरिवीण नको जन्म वायां । जैसी दर्पणींचि छाया । म्हणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ॥६॥

३५४३. भजन हें नासीलें हेंडी । दंभा लंडी आवडी ॥१॥ जेवितांना आयता पाक । नाशी ताक घुसळूनी ॥२॥ येकायेकीं इच्छी पाट । नेणे चाट कां जेऊं ॥३॥ तुका म्हणे मुलाम्याचें । बंधन साचें शेवटीं ॥४॥

३५४४. जैसा निर्मळ गंगा ओघ । तैसा भाग वोगरीं ॥१॥ प्रेम वाढे ग्रासोग्रासीं । ब्रह्मरसीं भोजन ॥२॥ तृप्तिवरी आवडी उरे । ऐसे बरे प्रकार ॥३॥ तुका म्हणे पाख मन । नारायण तें भोगी ॥४॥

३५४५. सुख सुखा विरजण झालें । तें मथिलें नवनीत ॥१॥ हाले डोले हरुषें काया । निवती बाह्या नयन ॥२॥ प्रबळ तो नारायंण । गुणें गुण वाढला ॥३॥ तुका म्हणे भरली सीग । वरी मग वोसंडे ॥४॥

३५४६. कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी । होईल यमपुरी । यमदंड यातना थोरी ॥१॥ कोण झाली लगबग । काय करीसी तेथें मग ॥२॥ कां रे भरला ताठा । करी आंझें नेत्रां वाटा ॥३॥ तोंडा पडली खिळणी । जिव्हा पिटिती वोढोनी ॥४॥ कां रे पडली जनलाज । कोण सोडवील तुज ॥५॥ लाज धरीं म्हणे तुका । नको वायां जाऊं फुका ॥६॥

३५४७. क्षरला सागर गंगा वोघीं मिळे । आपणचि खेळे आपणासी ॥१॥ मधील ते वाव अवघी उपाधी । तुम्हां आम्हां मधीं तेचि परी ॥२॥ घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि ते ॥३॥ तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । पत्र पुष्प आलें गेलें वायां ॥४॥

३५४८. काय विनवावें कोण तो निवाड । केलें माझें कोड वचनाचें ॥१॥ अहो कृपानिधि । गुणांच्या निधाना । माझ्या अनुमाना नयेचि हें ॥२॥ बहुत करुणा केलेंसें भापण । येकहि वचन नाहीं आलें ॥३॥ माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिंती मानिली होती ऐसी ॥४॥ तुका म्हणे माझी उरली ते आटी । अभय कर कटीं न देखेची ॥५॥

३५४९. लाजोनियां काळें राहिलों लिखित । नेदितांहि चित्त समाधान ॥१॥ कैसें सुख वाटे वचनाची तुटी । प्रीतीविण भेटी रुचि नेदी ॥२॥ येकाचिये भेटी येकाचा कोंपर । मावेचा पदर कळों येतो ॥३॥ होत्या आपुल्या त्या वेचुनियां शक्ति । पुढें झाली युक्ति कळाहीन ॥४॥ तुका म्हण तुम्ही समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावे ॥५॥

३५५०. आशाबद्ध बहु असें निलाजरें । होय म्हणं धीरें फळ टोकें ॥१॥ कारणापें चित्त न पाहे अपमान । चित्त समाधान लाभासाठीं ॥२॥ तुका म्हणे हातें लोटिलें न कळे । झांकितसों डोळे पांडुरंगा ॥३ ।

३५५१. सातापांचा तरी वचना शेवटीं । निरोप कां भेटी येक तरी ॥१॥ कां नेणों निष्ठुर केला नारायणा । न देखें हें मना येते कांहीं ॥२॥

तुका म्हणे ऐसा न दिसे निवाड । कडु किंवा गोड फळ पोटीं ॥३॥

३५५२. वायां ऐसा जन्म गेला । हें विठ्ठला दुःख वाटे ॥१॥ नाहीं सरता झालों पाईं । तुम्ही जईं न पुसा ॥२॥ कांहीं जीतों संवसारीं । अद्यापि-वरी भूमिभार ॥३॥ तुका म्हणे पंढरीनाथा । सबळ व्यथा भवरोग ॥४॥

३५५३. ऐसें कोण पाप बळी । जें जें जवळी येऊं नेदी ॥१॥ तुम्हां तंव होईल ठावें । नेदावें कां कळों हें ॥२॥ कोण झाला अंतराय । कां तें पाय अंतरले ॥३॥ तुका म्हणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥४॥

३५५४. ब्रह्मज्ञान भरोवरी । सांगे आपण न करी ॥१॥ थू थू त्याच्या तोंडावरी । व्यर्थ शिणविली वैखरी ॥२॥ कथा करी वरीवरी । प्रेम नसेचि अंतरीं ॥३॥ तुका म्हणे कवित्व करी । मान लोभ हे अंतरीं ॥४॥

३५५५. दगडाच्या देवा बगाडी नवस । बाईल कथेस जाऊं नेदी ॥१॥ वेंची धनराशी बांधिलें स्मशान । द्वारीं वृंदावन द्वाड मानी ॥२॥ चोरें नागविला न करी त्याची खंती । परि द्विजा हातीं नेदी रुका ॥३॥ करी पाहुणेर व्याह्या जांवयांसी । आल्या आतिथासी पाठीमोरा ॥४॥ तुका म्हणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाहे शिणें धरा तळीं ॥५॥

३५५६. कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड का एक केला नाहीं ॥१॥ मग तळमळ न करितें मन । झालें तें कारण कळों येतें ॥२॥ तुका म्हणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥३॥

३५५७. करूनि विनवणी । माथा ठेवितों चरणीं ॥१॥ होतें तेंचि असों द्यावें । रूप सौम्यचि बरवें ॥२। भया भेणें तुमचा ठाव । तुमच्या कोपें कोठें जावें ॥३॥ तुका पायां लागे । दान समुदाय मागे ॥४॥

३५५८. प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥१॥ कांसवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंगें ॥२॥ पोटामध्यें काणें सांगितलें सर्पा । उपजत लपा म्हणऊनी ॥३॥ बोलों नेणें परि जाणें गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥४॥ तुका म्हणे बरें विचारावें मनीं । आणिक भल्यांनीं पुसों नये ॥५॥

३५५९. आतां मी पतित ऐसा साच भावें । कळों अनुभवें आलें देवा

॥१॥ काय करावें तें रोकडेंचि करी । राहिली हे उरी नाहीं दोघा ॥२॥ येरयेरा दृष्टी द्यावें या उत्तरा । यांसी कांहीं करा गोही आतां ॥३॥ तुका म्हणे मेलों सांगतां सांगतां । तेंचि आलें आतां कळों तुम्हां ॥४॥

३५६०. काय तुज मागें नाहीं जाणवलें । माझें नाहीं केलें हित कांहीं ॥१॥ डोळे झांकोनियां होसी अबोलणा । तेव्हां नारायणा आतां कैसा ॥२॥ न कळे उचित न सांगतां स्पष्ट । ऐसा क्रियानष्ट काय जाणों ॥३॥ तुका म्हणे माझा घात तुम्हां ठावा । तरी कां आधीं देवा वारूं नये ॥४॥

३५६१. नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केली पुढें ॥१॥ अपराध कीजे घडला तो क्षमा । शिकवा उत्तमा आमुचिया ॥२॥ धरूं धांवे आगी पोळेल तें नेणें । वोढिलिया होणें माते बाळा ॥३॥ तुका म्हणे भार ज्याचा जार त्यामी । प्रवीण येविसीं असा तुम्ही ॥४॥

३५६२. लडिवाळ म्हणोनि निष्ठुर न बोला । परि सांभाळीला लागे घात ॥१॥ बहु वागवी आणिलें दुरूनी । दिसाची पोमणी बहु आहे ॥२॥ नाहीं लागों दिल्हा आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजतो ॥३॥ तुका म्हणे तुम्ही कृपावंत हरि । शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥४॥

३५६३. आत्मस्थिति मज नको हा विचार । देई निरंतर चरणसेवा ॥१॥ जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेंचि गोडी आम्हां देई देवा ॥२॥ काय सायुज्यता मुक्तीची हे चाड । देवभक्त कोड तेथें नाहीं ॥३॥ काय तें निर्गुण पाहों कैशा परी । वर्णू तुझी हरि कीर्ति कैसी ॥४॥ गोड चरणसेवा देवभक्तपणें । मज देवा झणें दुराविसी ॥५॥ जाणिवेपासुनि सोडवीं सत्वर । देई निरंतर चरणसेवा ॥६॥ तुका म्हणे गोडा गोड नलगे प्रीति । सेवेवीण चित्तीं सार नाहीं ॥७॥

३५६४. चाले दंडवत घालीं नारायणा । आपल्या कल्याणा लागोनियां ॥१॥ बैसविला पदीं पुत्र राज्य करी । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची॥२॥ तुका म्हणे आहे ठाईंचाची मान । आतां अनुमान कायसा तो ॥३॥

३५६५. समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हांसती सकळ लोक कोणा ॥१॥ समर्थाची लाज आपुल्या नांवाची । शरण आलीयाची लागे चिंता ॥२॥ जरी

तुज कांहीं होईल उचीत । तरी हा पतित तारी तुका ॥७॥

३५६६. न करीं रे मना कांहींच कल्पना । चिंता या चरणा विठोबाच्या ॥१॥ येथें सुखाचीया अमूपचि राशी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥२॥ सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख । शोक मोहो दुःख पाहातां नासे ॥३॥ तुका म्हणे येथें होईल विसावा । तुटतील धांवा पुढलीया ॥४॥

३५६७. काय करूं मना नागविलें आळसें । बहुत या सोसें पिडा केली ॥१॥ हिरोनियां नेला मुखींचा उच्चार । पडिलें अंतर जवळीच ॥२॥ द्वैताचिये कैसा सांपडलों हातीं । बहुत करीती वोढावोढी ॥३॥ तुका म्हणे आतां आपुलिया सर्वें । न्यावें मज देवें सोडउनी ॥४॥

३५६८. नाहीं देवाचा विश्वास । करी संतांचा उपहास ॥१॥ त्याचे तोंडीं पडे माती । हीन सूकराचि जाती ॥२॥ घोकूनि अक्षरें । वाद छळणा करीत फिरे ॥३॥ म्हणे देवासी पाषाण । तुका म्हणे भावहीन ॥४॥

३५६९. हेंचि सर्व सुख जपावा विठ्ठल । न दवडा पळ क्षण वायां॥१॥ हेंचि येक सर्व साधनाचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥२॥ न लगती कांहीं तपाचिया राशी । करणें वाराणसी नाना तीर्थें ॥३॥ कल्पना हे तिळ देहीं अभिमान । न ये नारायण जवळी त्या ॥४॥ तुका म्हणे नामें देव नेदी भेटी । म्हणे त्याचे ओंठीं कुष्ठ होय ॥५॥

३५७०. माझेविशीं तुज पडतो विसर । नको धरूं दूर पांडुरंगा ॥१॥ तुझा म्हणवितों हेचि लाज तुला । आतां झणीं मला विसरसी ॥२॥ तुका म्हणे तुझी माझी नाहीं उरी । आतां केली खरी देवराया ॥३॥

३५७१. अभक्ताचे गांवीं साधु म्हणजे काय । व्याघ्रवाडा गाय सांपडली ॥१॥ कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण । बसवणाची आण तया काई ॥२॥ मोतियाची गोणी माळे वोळी नेली । पुसती केवढ्या केली पासरी हे ॥३॥ केळी आणि बोरी वसती शेजारीं । संवाद कोणे परी घडे तेथें॥४॥ तुका म्हणे क्षीर केली कान्हेळाची । शुद्ध गोडी कैंची वसे तेथें ॥५॥

३५७२. भागल्याचा तूं विसावा । करिन नांवा लिंबलोण ॥१॥ परमानंदा पुरुषोत्तमा । हरी या श्रमापासूनी ॥२॥ अनाथाचा अंगीकार ।

करितां भार न मानिसी ॥३॥ तुका म्हणे इच्छा पुरे । ऐसी धुरे हे विठ्ठले ॥४॥

३५७३. घालूनियां कास । बळें आलों मागायास ॥१॥ प्रेम देई पाठवूनी । पांडुरंगा सेवाऋणी ॥२॥ होई रे शाहाणा । कळों नेदावें या जना ॥३॥ तुका म्हणे पाई । जडलों मग उरलें कांई ॥४॥

३५७४. लागे तुझी सोय ऐसें करीं कांहीं । माझे विठाबाई माउलिये ॥१॥ पतितपावन म्हणविसी जरी । अव्हेर न करीं तरी माझा ॥२॥ नाहीं तरी ब्रीद टाकीं सोडूनियां । न धरिसी माया जरी माझी ॥३॥ बोलियेला बोल करावा साचार । तरी लोक बरें म्हणतील ॥४॥ करावा संसार लोक-लाजे भेणें । वचनासि उणें येऊं नेदी ॥५॥ तुम्हां आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका । होशील सखा तूं जीवलग ॥६॥

३५७५. भेटी लागीं पंढरीनाथा । जीवा लागली तळमळ व्यथा ॥१॥ कई कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥२॥ शिणलें माझें मन । वाट पाहातां लोचन ॥३॥ तुका म्हणे लागली भूक । तुझें पहावया मुख ॥४॥

३५७६. सांडियेली काया । वरी वोवाळुनी पायां ॥१॥ शरण शरण नारायणा । मज अंगिकारीं दीना ॥२॥ आलों लोटांगणीं । रुळे तुमचे चरणीं ॥३॥ तुका म्हणे शिर । ठेवियेलें पायांवर ॥४॥

३५७७. तुझें दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥१॥ धरणें घेतलें दारांत । नको उठऊं धरूनि हात ॥२॥ घेतली मुरकुंड । झालों शिरोमणी लंड ॥३॥ तुका म्हणे जगजीवना । ब्रीद पाहें नारायणा ॥४॥

३५७८. पाहातां हें बरवें झालें । कळों आलें यावरी ॥१॥ मागिलांचा झाला झाडा । त्या निवाड्यास्तव हे ॥२॥ विसावलें आंग दिसे । सरिसे सरिसे अनुभव ॥३॥ तुका म्हणे बरें झालें । देवें नेलें गवसूनी ॥४॥

३५७९. चक्रफेरीं गळीं गळा । होतां गोवियेल्या माळा ॥१॥ फुटोनियां गेला कुंभ । झालों निष्काम स्वयंभ ॥२॥ धरीतचि नाहीं थारा । वेठी भ्रमण खोंकरा ॥३॥ तुका म्हणे कोडें । आगी काय जाणें मढें ॥४॥

३५८०. श्रमपरिहारा । मूळ जाहले दातारा ॥१॥ देह निवेदुनी पाई । झालों निष्काम उतराई ॥२॥ आपुलि तों सत्ता । येथें असो नेदी आतां ॥३॥ राहिला निगळा । तुका खटपटे वेगळा ॥४॥

३५८१. पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कांहीं देहाकडे नावलोकीं ॥१॥ म्हणऊनि मागें कंठींचा सौरस । पावतील नाश विघ्नें पुढें ॥२॥ कृपेच्या कटाक्षें न भिये कळिकाळा । येतां येत बळा शक्तीपुढें ॥३॥ तुका म्हणे गुढी आणिन पायांपें । होईल तें सोपें नाम तुझें ॥४॥

३५८२. उपजल्या काळें शुभ कां शकुन । आतां आवरोन राहिलेती ॥१॥ नाहीं मागितली वचनाची जोडी । निष्काम रोकडी वरीवरी ॥२॥ सत्याविण काय उगीच लांबणी । कारयाची जोडी येर भूस ॥३॥ तुका म्हणे ऐसी कोणा चाळवणी । न विचारा मनीं पांडुरंगा ॥४॥

३५८३. नव्हे मी आहाच आशेचे बांधले । जें हें टोंकविलें नारायणें ॥१॥ अंतर तें तुम्हां बरें कळों येतें । वेव्हार उचितें चाळवीजे ॥२॥ मनानें कल्पिलें आवरितां पाप । संकल्प विकल्प याची नांवें ॥३॥ तुका म्हणे आम्हां न सोसे जळजळ । सिजल्यावरी जाळ कड खोटा ॥४॥

३५८४. तार्के कृपण तो जेऊं काय घाली । आहाच ते चालीवरी न कळे ॥१॥ काय तुम्हां वेंचे घातलें सांकडें । माझें आलें कोडें आजिवरी ॥२॥ सेवेविण आम्ही न लिंपों त्या कार्या । झाला देवराया निर्धार हा ॥३॥ तुका म्हणे तुझीं राखावया ब्रीदें । येणें अनुवादें गर्जतसे ॥४॥

३५८५. वृत्तिवरी आम्हीं येणें कशासाठीं । येव्हढी ही आटी सोसावया ॥१॥ जाणतसां परी नणते जी देवा । श्रमचि बरवा राखावा तो ॥२॥ मांडोनि क्षरलों अभेदाची मूस । तुम्हां कां आळस वोढवला ॥३॥ तुका म्हणे होई लवकरी उदार । लांबणीचें फार काम नाहीं ॥४॥

३५८६. सुलभ कीर्तन हें दिलें ठसाऊनी । करितां धरणी उरी कोण ॥१॥ आतां न टळावें केलीया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥२॥ येका नामें कोठें दुसरा पालट । पादीर तो धीट म्हणती त्यासी ॥३॥ तुका म्हणे किती बोलशील उणें । येकाच वचनें खंड करीं ॥४॥

३५८७. जेथें माझी दृष्टी राहिली बैसोन । तेथेंचि हें मन गुंडाळतें ॥१॥ टाळावी ते पीडा आपणापासूनी । दिठावलें अन्न वोकवितें ॥२॥ तुम्हांसी कां कोडें कोणें विषयींचें । नवलाव याचें वाटतसे ॥३॥ तुका म्हणे वेगीं उभारा जी कर । कीर्ति मुखें थोर गर्जईन ॥४॥

३५८८. इच्छेपासीं आलों फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीची ॥१॥ द्यावें लवकरी मागितलें ज्ञान । मुळींचें जतन करूनि असे ॥२॥ उपाय हे करीं येकाचि वचना । दाऊनियां खुणा ठाया येतो ॥३॥ तुका म्हणे गांठी किती तुजपासी । जगाच्या तोडिसा चिंतनानें ॥४॥

३५८९. कोठें आम्हीं आतां वेचावी हे वाणी । कोण मना आणी जाणोनियां ॥१॥ न करावी सांडी आतां टाळाटाळी । देईन ये काळीं होईल माझी ॥२॥ घरोघरीं झाल्या ज्ञानाचिया गोष्टी । सत्यासवें गांठी न पडावी ॥३॥ तुका म्हणे आम्हीं भाकावी करुणा । भलताचि शाहाणा शोध काढी ॥४॥

३५९०. डगमगी मन निराशेचे गुणें । हें तों नारायणें शांतवीजे ॥१॥ धीर तूं गंभीर जीवन जगाचें । जळो विभागाचे आहाच तें ॥२॥ भेईल जीव हें देखोनी कठीण । केला जातो शीण तो तो वायां ॥३॥ तुका म्हणे आवश्यक हें वचन । पाळावेंचि दान समयो आहे ॥४॥

३५९१. आम्ही पाहा कैसीं येकतत्त्व झालों । राखणें लागलों वासनेसी ॥१॥ तुम्हांविण कांहीं नावडावें जीवा । केला तोचि देवा दृढपण ॥२॥ वर्म नेणों परी वृत्ति भंगूं नेदूं । वंदिलेंचि वंदूं आवडीनें ॥३॥ तुका म्हणे केले नामाचें जीवन । वार्ताही भिन्न नेणों आतां ॥४॥

३५९२. आपण तों असा । समर्थ जी हृषीकेशा ॥१॥ करा करा बुझावणी । काय विलंब वचनीं ॥२॥ हें घे ऐसें म्हणा । उठूनि लागेन चरणा ॥३॥ घेउनियां सुखें । नाचे तुका कवतुकें ॥४॥

३५९३. द्याल ऐसें दिसे । तुमचें साचपण इच्छे ॥१॥ म्हणुनि न भंगे निर्धार । केले लोचन सादर ॥२॥ मुखाचीच वास । पुरला पाहे अवकाश ॥३॥ तुका म्हणे कळे । काय लाभ कोणे वेळे ॥४॥

३५९४. तुम्ही तों सदैव । अधीरपणें माझी हाव ॥१॥ जळो आशेचें तें जिणें । टोंकतसों दीनपणें ॥२॥ येथूनि सोडवा । आतां अनुभव देवा ॥३॥ तुका म्हणे झाले । येक मग हें निमालें ॥४॥

३५९५. कैसें भलें देवा अनुभवा कां नये । उशीर तो काय तुम्हांपासीं ॥१॥ आहे तें मागतों दिसतें जवळी । केल्या मधीं कळी कोण साध्य ॥२॥ नाहीं सांडीत मी सेवेची मर्यादा । लाविला तो धंदा नित्य करीं ॥३॥ तुका म्हणे हात आवरिला गुंती । माझे तंव चित्तीं नाहीं दुजें ॥४॥

३५९६. हुंदकी पिशवी हालवितो दाढी । माळे मणी ओढी निंदेचे ते ॥१॥ त्याचें फळ पाकीं यमाचे ते दंड । घर केलें कुंड कुंभीपाक ॥२॥ क्रोध पोटीं मांग आणिला अंतरा । भुंकोनी कुतरा जप करी ॥३॥ तुका म्हणे स्नान केलें मळमूत्रें । जेविलें पित्रें अमंगळ ॥४॥

३५९७. अंगीं भरला ताठा । नये वळणी जैसा खुंटा ॥१॥ कैसे न कळे त्या डेंगा । हित आदळलें अंगा ॥२॥ जीव जाते वेळे । भल्याकडे ताठी डोळे ॥३॥ मुसळाचें धनु । तुका म्हणे नव्हे आनु ॥४॥

३५९८. करुनि कडबिड । जमा घडली लगड ॥१॥ होतें तेंचि झालें । नाम ठाईंचें पडिलें ॥२॥ उतरलें डाई । उत्तम सुलाख ते ठाईं ॥३॥ हिंडवितां देशोदेश । तुका म्हणे नाहीं नाश ॥४॥

३५९९. पढियंते मागा पांडुरंगापासीं । मज दुर्बळासीं काय पीडा ॥१॥ याजसाठीं दुरावला संसार । वाढे हे अपार मायातृष्णा ॥२॥ कांहीं करितां कोठें नव्हे समाधान । विचारितां पुण्य तेंचि पाप ॥३॥ तुका म्हणे आतां निश्चळचि भलें । तुज आठविलें पांडुरंगा ॥४॥

३६००. नव्हें मी शाहाणा । तरी म्हणा नारायणा ॥१॥ तुम्हा बोलावया कांहीं । येच भरलोंसे वाहीं ॥२॥ आणावें तें रूपा । कोपलेति तरी कोपा ॥३॥ कळोनि आवडी । तुका म्हणे जाते घडी ॥४॥

३६०१. आम्ही भाविकें हे काय जाणों खोडी । आयकोनि प्रौढी विनविलें ॥१॥ नाहीं येथें ऐसें झालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोसें ॥२॥ न कळेचि आधीं करितां विचार । न धरितां धीर आहाचता ॥३॥

तुका म्हणे आतां वचनें वचन । वाढेल तिक्षण बुद्धि झाली ॥४॥

३६०२. कोठें देवा बोलों । तुम्ही भीड घालूं गेलों ॥१॥ करावया सत्त्वहानी । भांडवलाची टांचणी ॥२॥ दुबळा मागतां । त्याच्या प्रवर्तल्या घाता ॥३॥ तुका म्हणे नाहीं । मज कळलें ऐसें कांहीं ॥४॥

३६०३. पाहिजे तें आतां प्रमाण प्रत्यक्ष । जालियानें साक्ष खरें खोटें ॥१॥ काय ते दिवस उचिताचा आला । मागील जो केला श्रम होता ॥२॥ ठेवियेली खूण करूनि संकेत । तयापासीं चित्त लागलेसें ॥३॥ जाणसी गे माते लेकराचा लाड । नये पडों आड निष्ठुरता ॥४॥ तुका म्हणे आम्हीं करावें वचन । तुम्हांसी जतन करणें देवा ॥५॥

३६०४. पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प ते मनें जिरविले ॥१॥ चेष्टविले तरी सांगावें कारण । भक्ति तें जीवन करावया ॥२॥ लावूनियां दृष्टि घातली समोरी । बैसलों जिव्हारीं डसुन तें ॥३॥ तुका म्हणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥४॥

३६०५. मागील विसरू होईल सकळ । केली तळमळ दुःखाची ते ॥१॥ दोहींचे आईक्य घाली गडसंधीं । स्थिरावली बुद्धि पायांपाशीं ॥२॥ आहाच त्या केलों देह परिचारें । तुमचें तें खरें वाटों नये ॥३॥ तुका म्हणे व्हावें लवकरी उदार । मी आहें सादर प्रतिग्रहा ॥४॥

३६०६. वाढवावे पुढें आणिक प्रकार । येकाचि तें फार रुची नेदी ॥१॥ नीच नवें लेणें देह हा पवाडा । पालट रोकडा बराबरी ॥२॥ दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ती ॥३॥ तुका म्हणे आजी पावावा संतोष । करूनि कीर्तिघोष नाचईन ॥४॥

३६०७. क्षोभ आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करुनि ठेवी ॥१॥ क्षणभंगुर ते उपजली चिंता । खरी अखंडिता आवडीची ॥२॥ सिकउं जाणे ते गोमटियासाठीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥३॥ अवघेचि मिथ्या समया आरतें । देतां तो उचितें काळ जाणें ॥४॥ न कळे व्यवहार गांजूं नेदि कोणा । भेडसावी तान्हा बाऊ आला ॥५॥ तुका म्हणे करी जीवाची जतन । दचकूनि मन जवळी आणी ॥६॥

३६०८. संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥१॥ हगों जातां दगड सांची । अंतरीही संकल्प ॥२॥ लाज तेवढी नारायणीं । वांकडी वाणी पोरांपें ॥३॥ तुका म्हणे बेश्रमा । वरी श्रमा पडिभरु ॥४॥

३६०९. मी त्यांसी अनन्य तीं कोणा असती । ऐसे तंव चित्तीं विचारावें ॥१॥ आहे तो विचार आपणियापासीं । कळा बिंबाऐसी प्रतिबिंबें ॥२॥ शुभ शकुन तो शुभ लाभे फळ । पुढील तें कळे अनुभवें ॥३॥ तुका म्हणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पाईं ॥४॥

३६१०. बहु कृपावंते माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों ॥१॥ संचितानें नाहीं चुकों दिल्ही वाट । लाविलें अदट मजसवें ॥२॥ आतां मी रुसतों न कळतां वर्म । परी ठावे धर्म सर्व देवा ॥३॥ तुका म्हणे उभा राहिला न बैसे । आमाचिया ऐसे उद्वेग त्या ॥४॥

३६११. कैसें दिसों बरी । आम्ही आळवितां हरी ॥१॥ नाहीं सोंग अळंकार । दास झाला संवसार ॥२॥ दुःख आम्हां नाहीं चिंता । हरिचे दास म्हणवितां ॥३॥ तुका म्हणे देवा । ऐसी झालों करितां सेवा ॥४॥

३६१२. आतां सांडुं तरी हातीं ना पदरीं । सखीं सहोदरीं मोकलिलों ॥१॥ जनाचारामध्यें उडाला पातेरा । झालों मी निलाजरा म्हणऊनि ॥२॥ कोणाचिया दारा जावेंनसें झालें । म्यांच विटंबिलें आपणांसी ॥३॥ कोण झाला माझा बुद्धीसी संचार । नाहीं कोठें थार ऐसें झालें ॥४॥ तुका म्हणे तुज भक्त झाले फार । म्हणउनी थार नाहीं येथें ॥५॥

३६१३. जेथें जातों तेथें पडतो मतोळा । न देखेंच डोळां लाभ कांहीं ॥१॥ कपाळीची रेखा असती उत्तम । तरी कांहीं श्रम पावतों मी ॥२॥ नव्हेचि तुम्हांसी माझा अंगिकार । थीता संवसार अंतरला ॥३॥ भोग तंव झाला खरा भोगावा तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥४॥ कोठें तुम्ही कीर्ति आयकिली देवा । मुकतों कां जीवा तुका म्हणे ॥५॥

३६१४. कां जी आम्हां होतें दोपांचें दरुशन । तुज समर्पून देहभावे ॥१॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरिसील सत्ता सकळही ॥२॥ कां जी आम्हांवरी आणिकाची सत्ता तुम्हांसी असतां जवळिके ॥३॥ तुका म्हणे

पाईं केलें निवेदन । उचित तें दान करी सत्ता ॥४॥

३६१५. निंदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥१॥ होतें तैसें आलें फळ । गेलें निवडूनी सकळ ॥२॥ दुसऱ्याच्या मता । मिळेनासें झालें चित्ता ॥३॥ तुका झाला सांडा । विटंबिती पोरें रांडा ॥४॥

३६१६. माझे माथां तुझा हात । तुझे पाईं माझें चित्त ॥१॥ ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥२॥ येरयेरांपासीं । सांपडोन गेलों ऐसी ॥३॥ तुका म्हणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥४॥

३६१७. सत्य त्यागाचि समान । नलगे वेचावें वचन ॥१॥ नारायणां ऐसा दास । येरयेराचीच आस ॥२॥ मळ नाहीं चित्ता । तेथें देवाचीच सत्ता । ॥३॥ तुका म्हणे जाण । तेंचि भल्याचें वचन ॥४॥

३६१८. माझिया बुद्धीचा खुंटला उपाय । करसील काय पाहेन तें ॥१॥ सूत्रधारी तूं हें सकळ चालविता । कासया अनंता भार वाहों ॥२॥ वाहिले संकल्प न पवेति सिद्धि । येऊं देहबुद्धीवरी नये ॥३॥ तुका म्हणे दुःखी करिती तरंग । चिंतूं पांडुरंग आवरूनी ॥४॥

३६१९. देखिलें तें धरीन मनें । समाधानें राहेन ॥१॥ भाव माझी सांठवण । जगजीवन कळावया ॥२॥ आळवीन येकसरें । उत्तरें या करुणेच्या ॥३॥ तुका म्हणे नयो न रूपा । काय बापा करीसी ॥४॥

३६२०. वायां जाय ऐसा । आतां उगवावा फांसा ॥१॥ माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदुःखाचीं वचनें ॥२॥ हाचि आम्हां ठाव । पाईं निरोपाया भाव ॥३॥ तुका म्हणे जार । तुझा तुज देवा भार ॥४॥

३६२१. खादलेंचि खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥१॥ वीट नाहीं पांडुरंगा । वाढे अंगा आर्त तें ॥२॥ हृदयाची हाव पुरे । परी हें उरे चिंतन ॥३॥ तुका म्हणे पोट भरे । परी तें उरे भूक पुढें ॥४॥

३६२२. सत्य आठवितां देव । जातो भेव पळोनी ॥१॥ नलगे कांहीं करणें चिंता । धरी सत्ता सर्व तो ॥२॥ भावें भाव राहे पाईं । देव तईं सन्निध ॥३॥ तुका म्हणे कृष्णनामें । शीतळ प्रेमें सर्वांसीं ॥४॥

३६२३. ब्रीद ज्याचें जगदानी । तेंचि मनीं स्मरावा ॥१॥ सम पाय

कर कटीं । उभा तटीं भीवरेच्या ॥२॥ पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनी ॥३॥ तुका म्हणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ॥४॥

३६२४. माझिया मनाची बैसली आवडी । अवसान घडी येकी नेघे ॥१॥ पाय चित्तीं रूप डोळांची बैसलें । चिंतनें गोविलें मुख सदा ॥२॥ अवघियांचा झाला विसर हा मागें । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥३॥ तुका म्हणे कानीं आइकिली मात । तोचि झाला घात जीवपणा ॥४॥

३६२५. याची कोठें लागली चट । बहु तट झालेंसे ॥१॥ देवपिसीं देवपिसीं । मज ऐसीं जग म्हणे ॥२॥ येकांताचें बाहेर आलें । लपविलें लिकेना ॥३॥ तुका म्हणे याची भेटी । झाली तुटी आपल्यासी ॥४॥

३६२६. दीन आणि दुर्बळासी । सुखरासी हरिकथा ॥१॥ तारूं भवसागरींचें । उंचनिंचे अधिकारी ॥२॥ चरित्र जें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥३॥ तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनी ॥४॥

३६२७. संतोषें माऊली आरुषा वचनीं । वोरसोनी स्तनीं लावी बाळा ॥१॥ तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥२॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचे वाहे बरें तेंचि मनीं ॥३॥ तुका म्हणे इच्छावसें खेळ खेळे । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥४॥

३६२८. विनविजे ऐसें कांहीं । उरलें नाहीं यावरी ॥१॥ आतां असो पंढरिनाथा । पाईं माथा तुमचिये ॥२॥ मागें सारियेली युक्ति । कांहीं होती जवळी ते ॥३॥ निराशेची न करीं आस । तुका दास माघारी ॥४॥

३६२९. आतां येथें झाली जीवा संवसाटीं । होतें तैसें पोटीं फळ आलें ॥१॥ आतां धरिले ते न सोडीं चरण । सांपडलें धन निज ठेवा ॥२॥ आतां हा आळस असो परता दूरी । नेदावी ते उरी उरों कांहीं ॥३॥ आतां याचा मज न व्हावा विसर । भरोनि अंतर राहो रूप ॥४॥ आतां लोकलाज नयो येथें आड । बहु झालों गोड ब्रह्मरसा ॥५॥ तुका म्हणे आतां जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥६॥

३६३०. अनंता जीवांचीं तोडिलीं बंधनें । मज काळें येणें कृपा केली ॥१॥ अनंत पवाडे तुझे विश्वंभरा । भक्त करुणाकरा नारायणा ॥२॥

अंतरींचें कळों देईं गुह्य गुज । अंतरींचें बीज राखेन मी ॥३॥ समदृष्टि तुझी पाहेन पाउलें । धरीन संचलें हृदयांत ॥४॥ तेणें या चित्ताची राहिली तळमळ । होतील शीतळ सकळ गात्रें ॥५॥ तुका म्हणे शांति करील प्रवेश । मग नव्हे नाश अखंड तो ॥६॥

३६३१. पराधीन माझें करूनियां जीणें । सांडी काय गुणें केली देवा ॥१॥ उदार हे कीर्ति असे जगामाजी । कां तें ऐसें आजी पालटलें ॥२॥ आळवितों परी न पुरेचि रीघ । उचित तो त्याग नाहीं तुम्हां ॥३॥ तुका म्हणे कां बा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥४॥

३६३२. नेणपणें नाहीं केला हा बोभाट । आतां आली वाट कळों खरी ॥१॥ आतां बहु शीघ्र लवकरी यावें । वाट हरि पाहें भेटी देईं ॥२॥ समर्थाच्या बाळा करुणेचें भाषण । तरी त्याची कोण नांदणूक ॥३॥ तुका म्हणे बहु बोलिले बडिवार । पडिलें अंतर लौकिकीं तें ॥४॥

३६३३. जें जें केलें तें तें साहे । कैसें पाहे भाविक ॥१॥ वोवाळूनि माझी काया । सांडिली यावरूनी ॥२॥ काय होय नव्हे करूं । नेणें धरूं सत्ता ते ॥३॥ तुका म्हणे कटीं कर । उभे धीर धरूनी ॥४॥

३४३४. नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संतांचिये संगें पोट भरी ॥१॥ चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ॥२॥ तुका म्हणे नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ॥३॥

३६३५. तुम्ही माझा देवा करा अंगिकार । हा नाहीं विचार मजपासीं ॥१॥ आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देवभक्तपण लाजविलें ॥२॥ येकांतीं येकलें न राहे निश्चळ । न बैसेच पळ मन ठाईं ॥३॥ पाईं महत्त्वाची पडली शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥४॥ शरीर सोकलें देखिलिया सूखा । कदान्न हें मुखा रुचेचिना ॥५॥ तुका म्हणे झाला अवगुणाचा थारा । वाढली हे निद्रा आळस बहु ॥६॥

३६३६. बोलिलिया गुणें नाहीं पाविजेत । देवा नाहीं होत हित तेथें ॥१॥ कवतुक तुझें न कळे यापरी । घेशील तों शिरीं काय नव्हे ॥२॥ नाहीं मिळों येत संताचिया मता । पुराणीं पाहतां अघटित ॥३॥ तुका

म्हणे पाईं निरोपिला भाव । न्याल तैसा जावो सिद्धी देवा ॥४॥

३६३७. हा तों नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ॥१॥ कां जी नेणों राखा हात । कैसें देखावें रडत ॥२॥ दाऊनियां आस । दूर पळवितां काशास ॥३॥ तुका म्हणे धांव । घेतां न पुरेचि हाव ॥४॥

३६३८. लावूनियां गोठी । चुकऊं आदरिली दिठी । देऊनियां मिठी । पळे महिया माथूळें ॥१॥ पुढें तेंचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । पुरवी चरफड । हात गोऊनि पळावें ॥२॥ आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडे माती । फिरतां मागें कैंचा तो ॥३॥ तुका म्हणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हे सेवा । सुखें तुम्हां नार्पिती ॥४॥

३६३९. आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ॥१॥ होणार तें सुखें घडो । लाभ जोडो महाबुद्धि ॥२॥ सत्य संकल्पाचे साठीं । उजळा पोटीं रविबिंब ॥३॥ तुका म्हणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥४॥

३६४०. कवतुकवाणी बोलतसे लाडें । आरुप वाकडें करूनि मुख ॥१॥ दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननी बाळकामध्यें भेद ॥२॥ सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवूनियां करूं अंगसंग ॥३॥ धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥४॥ तुका म्हणे तुज आम्हुचीच गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥५॥

३६४१. ऐकें पांडुरंगा वचन माझें येक । झालों मी सेवक दास तुझा ॥१॥ कळेल तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥२॥ दंभ मान माझा करूं पाहे घात । झाली याहि थीत कारणाचा ॥३॥ हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं बसों पाहे ॥४॥ तुका म्हणे मज बिघडतां क्षण । नलगे जतन करीं देवा ॥५॥

३६४२. जेणें माझें चित्त राहे तुझे पाईं । अखंड तें देईं प्रेमसुख ॥१॥ देहभाव राखा दीन करोनियां । जनाचारी वायां जाय ऐसा ॥२॥ द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥३॥ तुझें नाम माझें धरूनियां चित्त । येकांत लोकांत सदा राहे ॥४॥ तुका म्हणे तुझे जडोनियां पाईं । झालों उतराई पांडुरंगा ॥५॥

३६४३. काय सांगों आतां संतांचें उपकार । मज निरंतर जागविती ॥१॥ काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई । ठेवतां हा पाईं जीव थोडा ॥२॥ सहज बोलणें हितउपदेश । करुनि सायास शिकविती ॥३॥ तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळित ॥४॥

३६४४. आपण चाळक बुद्धीच्या संचारा । आम्हांसी वेव्हारा पात्र केलें ॥१॥ काय झालें तरी नेघा तुम्ही भार । आणिक कोणा थोर म्हणों सांगा ॥२॥ पंचभूतें तंव चर्मांचिया मोटा । येथें खराखोटा कोण भाव ॥३॥ तुका म्हणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥४॥

३६४५. येका येक वर्म लाऊनियां अंगीं । ठेवितों प्रसंगीं सांभाळीन ॥१॥ न घ्यावा जी तुम्हीं वाव बहु फार । धरूनि अंतर ठायांठाव ॥२॥ वेव्हारें आलें तें समानाचि होतें । वेळ नाहीं तेथें चालों येतें ॥३॥ तुका म्हणे आतां निवाड्याचसाटीं । संसार तुटी करुनि ठेलों ॥४॥

३६४६. आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥१॥ होय तैसी हो आबाळी । देह निमित्य या बळी ॥२॥ तुम्हासवें गांठीं । देवा जिवाचिये साटीं ॥३॥ तुका म्हणे लंड । करूं चौघामध्यें खंड ॥४॥

३६४७. कां हो वाढवितां देवा । मज घरीं समजावा । केवढा हा गोवा । फार केलें थोड्याचें ॥१॥ ठेवीन पायांवरी डोई । त्यासीं तुमचें वेचें कांहीं । झालों उतराई । जाणा येक येकाचें ॥२॥ निवाड आपणिया पासी । असोनि कां व्हावें अपेशी । होती गांठी तैसी । सोडोनियां ठेविली ॥३॥ तुका म्हणे गोड । होते झालिया निवाड । दर्शनेंहि चाड । आवडीच वाढेल ॥४॥

३६४८. नव्हों सभाधीट । समोर बोलायाचि नीट । येकली येकट । दुजें नाहीं देखिलें ॥१॥ आतां अवघें तुम्ही जाणा । तुमचें माझें नारायणा । येईल करुणा । तेचि पाहा तुम्हांसी ॥२॥ ताळ नाहीं माझे बुद्धि । धरिली न धरवे शुद्धि । आतां बळ कधीं । कोणे जन्में निवाडा ॥३॥ आतां शेवटींचें । उत्तर तें हेंचि साचें । शरण आलें त्यांचें । तुका म्हणे सांभाळा ॥४॥

३६४९. ऐसा तंत्र मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥१॥ मग त्याची

टाळाटाळी । झिंज्या वोढोनि कपाळीं ।।२।। नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ।।३।। तुका म्हणे झाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ।।४।।

३६५०. माझ्या कृपाळाच्या गुणें । किंवा सरलें ऐसें नेणें ।।१।। नये वचन बाहेरी । उभे तिष्ठतसे द्वारीं ।।२।। काय सांगायास वेंचे । रितें आरंभीं ठाईंचें ।।३।। तुका म्हणे किती । भीड धरावी पुढती ।।४।।

३६५१. कांहीं एक तरी असावा आधार । कासयानें धीर उपजावा ।।१।। म्हणविल्यासाठीं । कैसें पडे रुजू । धनी नाहीं उजू सन्मुख तो ।।२।। वेंचल्या दिसांचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखें आम्हीं ।।३।। नाहीं मनोगत तोंवरी हें देवा । तुका म्हणे सेवा न घीजे तो ।।४।।

३६५२. मनाचिये साक्षी झाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपुला तो ।।१।। तुम्हां परामर्ष घेतां सत्ताबळें । धरितां निराळें केसें वांचों ।।२।। मी माझें सांडोनि यावया पसारा । आणिक दातारा काय काज ।।३।। तुका म्हणे आम्ही तुजविण येका । निढळ लौकिकामाजी असों ।।४।।

३६५३. उरलें तें भक्तिसुख । डोळां मुख पाहावें ।।१।। अंतरींचें कां हो नेणा । नारायणा माझिया ।।२।। पुरवा तैसी केली आळी । बळी जगदानिया ।।३।। हातीं घेउनि चोरा भातें । दावी रितें बाळका ।।४।। साजत हें थोरपण । नाहीं दीनवत्सला ।।५।। शाहाणें तरी लाड दावी । बाळ जेवीं मातेसी ।।६।। तुका म्हणे पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ।।७।।

३६५४. तरी भले वायां गेलों । जन्मा आलों मागुता ।।१।। म्हणऊनि ठेलों दास । सावकाश निर्भय ।।२।। उणें पुरें काय माझें । त्याचें वोझें तुम्हांसी ।।३।। सांभाळावें तें म्यां काई । अवो आई विठ्ठले ।।४।। भाग्यें जया जाईन स्थळा । तुज गोपाळा विसरेना ।।५।। आपल्या म्यां येकसरे । करूनि बरें घेतलें ।।६।। तुका म्हणे नारायणा । आतां जाणा आपुले ।।७।।

३६५५. घालूनि लोळणीं पडिलों आंगणीं । सिंचा सिंचवणीं तीर्थवरी ।।१।। वोल्हावेल तनु होईल शीतळ । झाली हळहळ बहुतापें ।।२।। पावेन या ठाया कैं झालें होतें । आलों अवचितें उष्ट्यावरी ।।३।। तुका म्हणे कोणीं

जाणवा राउळीं । येईल जवळी पांडुरंग ॥४॥

३६५६. धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोसी ॥१॥ संकल्प तो नाहीं दुजा । महाराजात्रीण तो ॥२॥ पायांवरी ठेवीन भाळ । तेणें सकळ पावेन ॥३॥ तुका म्हणे डोळेभरी । पाहेन हरि श्रीमुख ॥४॥

३६५७. तुम्हां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ॥१॥ आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ॥२॥ बरें न दिसेल बोळी । येका अन्न येका गाळी ॥३॥ लावितो आभार । तुका विसरलेती फार ॥४॥

३६५८. न कळे जी भक्ति काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसे ॥१॥ जोडोनियां कर राहिलों निवांत । पायापासीं चित्त ठेवोनियां ॥२॥ दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षिणा । श्रमें नारायणा कष्टवील ॥३॥ तुका म्हणे झालों आज्ञेचा पाळक । जीवनासी येक ठाव केला ॥४॥

३६५९. येकविध वृत्ति न राहे अंतरीं । स्मरणींच हरी विस्मृती हे ॥१॥ कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें । मज माझ्या जीवें साक्षित्वेसी ॥२॥ न राहे निश्चळ जागवितां मन । किती क्षणेंक्षण सांवरावें ॥३॥ तुका म्हणे केले बहु व्यवसाव । तेणें रंगें जीव रंगलासे ॥४॥

३६६०. आतां सोडवणें न या नारायणा । तरी मी वांचेना काळा हातीं ॥१॥ ऐसें सांगोनियां झालों उतराई । आणीक ते काई माझे हातीं ॥२॥ केलियाचें पाप नये शेवटासी । करितील नाशी अंतराय ॥३॥ तुका म्हणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ॥४॥

३६६१. सत्य माप वाढे । गाबाळाची चाली खोडे ॥१॥ उतरे तें कळे कसीं । विखरोन सर्व देसीं ॥ २ ॥ घरामध्यें राजा । नव्हे व्हावी पट्टपूजा ॥३॥ तुका म्हणे साचें । रूप तेंच दर्पणाचें ॥४॥

३६६२. नाहीं खंड झाला । माझा तुमचा विठ्ठला ॥१॥ कैसें कैसें हो दुश्चित । आहे चौघांपासी नीत ॥२॥ मुळींचें लिहीलें । मज आतां सांपडलें ॥३॥ तुका म्हणे मज । नलगे बोलणें सहज ॥४॥

३६६३. केव्हढा तो अहंकार । माझा तुम्हां नव्हे दुर ॥१॥ आतां

कोण पडे पायां । तुमच्या हो पंढरिराया ॥२॥ कां जी कृपेनें कृपण । वेंचतसें ऐसें धन ॥३॥ तुका म्हणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ॥४॥

३६६४. हेचि वादकाची कळा । नाहीं येऊं देत बळा ॥१॥ धीर करावा करावा । तरी तो आहे आम्हां देवा ॥२॥ रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ॥३॥ तुका म्हणे वरी । गोड आणावा उत्तरीं ॥४॥

३६६५. येक परि बहिरें बरें । परि तीं ढोरें ग्यानगंडे ॥१॥ कपाळास लागली आगी । अभागी कां जींतसे ॥२॥ येके परी बरें वेडें । तार्किक कुडें जळो तें ॥३॥ तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥४॥

३६६६. खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कवतुक विनोदें निरांजनी ॥१॥ पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीस ॥२॥ येकांतींचें सुख जाडिलें जिव्हारीं । वीट परिचारीं बरा आला ॥३॥ जगा ऐसी बुद्धि नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा झालों पाईं ॥४॥ आणिक ते चिंता नलगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥५॥ तुका म्हणे धडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विश्वासलें ॥६॥

३६६७. झाली झडपणी खडतर देवता । संचरली आतां निघा नये ॥१॥ मज उपचार झणें आतां करा । न साहे दुसरा भार कांहीं ॥२॥ नेऊनियां घाला चंद्रभागे तीरीं । जीवा नाहीं उरी कांहीं आतां ॥३॥ तुका म्हणे कळों आलें वर्तमान । माझें तें वचन आच्छादलें ॥४॥

३६६८. अंगीं देवी खेळे । कां रे तुम्हांसी न कळे । कोणाचे हे चाळे । सुख दुःख न मानितां ॥१॥ मी तों आतां येथें नाहीं । वोळखी वचनाच्या ठाईं । पालटाचा घेईं । भाव खरें लोपेना ॥२॥ आपुलाले तुम्ही पुसा । सेवा पेवाच सरिसा । स्थिरावल्या कैसा । काय जाणों विचार ॥३॥ तुका म्हणे लाभकाळ । तेथें न सावे सितळ । मग तैसी वेळ । कोठें जातां सांपडों ॥४॥

३६६९. उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपुलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ॥१॥ नेम नाहीं लाभ हानी । अवचित घडती दोन्ही । विचारूनि मनीं । पाहिजे तें प्रयोजावें ॥२॥ जाळ जाळा काळें । करपों

नेदावें आगळें । जेवितां वेगळें । ज्याचें त्याचें तेथें शोभे ॥३॥ पाळी नांगर पाभारी । तन निवडुनि सों करी । तुका म्हणे धरी । सेज जमा शेवटीं ॥४॥

३६७०. पडालिया ताळा । मग अवघाचि निर्वाळा । तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥१॥ जोडिलें तें लागे हातीं । आपआपली निश्चिंती । हर्ष आणि खंती । तेथें दोन्ही नासलीं ॥२॥ सहज सरलिया कारण । मग येकला आपण । दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥३॥ करूनि झाडापाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी म्हणूं लागतां ॥४॥

३६७१. जो वितो तो माझा पिता । उखता तो उखत्याचा ॥१॥ जनार्दनीं सरती कर्मे । बाधा भ्रमें अन्यत्र ॥२॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरितां ॥३॥ तुका म्हणे खांद्या पानें । सिंचितां भिन्न कोरडीं ॥४॥

३६७२. माउलीची चाली लेंकराचे वोढी । तयालागीं काढी प्राण प्रीती ॥१॥ ऐसीं बळिवंत आवडीचीं देवा । संत महानुभावा विनवीतों ॥२॥ मोहें मांहियेलें सर्वकाळ चित्त । विसर तो घेत नाहीं क्षणे ॥३॥ तुका म्हणे दिल्हा प्रेमाचा वोरस । सांभाळिले दास आपुले ते ॥४॥

३६७३. अपराधी म्हणोनी येतों काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥१॥ येईल तारूं तरी तारी जो जी देवा । नाहीं तरी सेवा घ्यावी भार ॥२॥ कासया मी आतां वेंचूं हें शरीर । आहे बारगीर जाई जेणें ॥३॥ तुका म्हणे मन करूनी मोकळें । आहे साळेंढाळें उदार तें ॥४॥

३६७४. माझे तों फुकाचे कायेचेचि कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुम्हां ऐसा ॥१॥ कांहींच न वंची आजिच्या प्रसंगीं । सकळाहि अंगीं करीन पूजा ॥२॥ द्यावें तुम्ही कांहीं हें तों नाहीं आस । असों या उदास देहभावें ॥३॥ तुका म्हणे माझी मावळली खंती । समाधान चित्तीं सर्वकाळ ॥४॥

३६७५. स्वामीचिया सत्ता । आधीं वर्म येती हातां । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥१॥ करी कौतुकाचे बोल । परी जिव्हाळ्याची वोल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचे ॥२॥ मन मेळविलें मना । नाहीं अभावी शाहाणा । अंतरींच्या खुणा । वरी दिल्हे उमटोनी ॥३॥ पराश्रमें

काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥४॥

३६७६. येके ठाईं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ॥१॥ वेळोवेळां जागवितों । दुर्जे येईल म्हणोनि भीतों ॥२॥ नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ॥३॥ तुका झालासे शाहाणा । आड लपे नारायणा ॥४॥

३६७७. वैरागरापासीं रत्नाचिया खाणी । हेचि घ्यावी धणी फावेल तों ॥१॥ येथें नाहीं तर्कवितर्काची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्या ॥२॥ उगाच सारावा वाढिला तो ठाव । वाढितिया भाव कळतसे ॥३॥ तुका म्हणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैसें तैसें ॥४॥

३६७८. समर्थ या नांवें दीनाचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामी अंगीं ॥१॥ मज काय लागे करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ॥२॥ दयासिंधु तुम्हां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपामृतें ॥३॥ तुका म्हणे अहो पंढरीनिवासे । बहु जीव आसे लागलासे ॥४॥

३६७९. लेखिलें कवित्व माझे सहज बोल । न लगेचि बोल जिव्हाळ्याची ॥१॥ नयेचि उत्तर कांहीं परतोनी । झालों नारायणीं न सरतें ॥२॥ लाजिरवाणी कां वदविली हे वाचा । नव्हेचि ठायींचा मननशीळ ॥३॥ तुका म्हणे फळ नव्हेचि सायासा । पंढरीनिवासा काय झालें ॥४॥

३६८०. येणें झाला तुझ्या पोतडीचा झाडा । केलासी उघडा पांडुरंगा ॥१॥ भरुनियां घरींच राहिलों वाखतीं । आपुली निश्चिंती आपुल्यापें ॥२॥ आतां काय उरी उरली ते सांगा । आणिलेति जगाचिये साक्षी ॥३॥ तुका म्हणे कोठें पाहों जासी आतां । माझी झाली सत्ता तुम्हांवरी ॥४॥

३६८१. तुमच्या पाळणा वोढतसे मन । गेलों विसरोन आपणांसी ॥१॥ लागलें पालटें फेडावें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥२॥ तुमचे आवडी संबंध्यांचा त्याग घेतलाये लाग जगनिंदेचा ॥३॥ तुका म्हणे जैसा माझा जीव वोढे । तैसेंची तिकडे पाहिजेल ॥४॥

३६८२. नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥१॥ कासया जिकिर करणें येविशीं । भयाची मानसीं चिंता खंती ॥२॥ विश्वं-

भराचिये लागलों सांभाळीं । सत्तेनें ते चाली आपुलीये ॥३॥ तुका म्हणे माझें पाळण पोषण । करितां आपण पांडुरंगा ॥४॥

३६८३. मज कांहीं शीण न व्हावयासाठीं । कृपा तुम्हां पोटीं उपजली ॥१॥ होतें तैसें केलें आपुलें उचित । शिकविलें हित बहु बरें ॥२॥ आम्ही न मानावी कोणाची आशंका । तुम्हां भय लोकां आहे मनीं ॥३॥ तुका म्हणे आतां संचिताचा ठेवा । वोढवला घ्यावा जैसा तैसा ॥४॥

३६८४. कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें । पायाचिया बळें कंठितसें ॥१॥ पाहातसे वाट येईं गा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥२॥ बहुतांचे सत्ते झालों कासावीस । जाय रात्रंदिवस वैरीयांचा ॥३॥ तुका म्हणे बैसे मनाचिये मूळीं । तरीच हे जाळी उगवती ॥४॥

३६८५. कां जी तुम्ही देवा न व्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठाईंच्या ठायीं ॥१॥ कांहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ॥२॥ दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्व दातारें दाखवीं तीं ॥३॥ तुका म्हणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण म्हणऊनी ॥४॥

३६८६. मागत्याची कोठें घडते निरास । लेंकरा उदास नाहीं होत ॥१॥ कासया मी होऊं उतावेळ जीवीं । जाणेता गोसावी सर्व आहे ॥२॥ झाला तरी वेळ कवतुकासाठीं । निर्दया तों पोटीं उपजेना ॥३॥ तुका म्हणे त्यासी ठाउकें उचीत । होईल संकेत नेमियेला ॥४॥

३६८७. आरुषा वचनीं मातेची आवडी । म्हणउनि तातडी घेत नाहीं ॥१॥ काय होयील माझें मांडिलें कौतुक । आदराची भूक रडारोवी ॥२॥ लपोनियां करी चुकुर माऊली । नाहीं होती केली निष्ठा सांडी ॥३॥ तुका म्हणे करी पारखीं वचनें । भेवूनि तान्हें आळवावें ॥४॥

३६८८. प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचेच भाव निष्ठुरता ॥१॥ जीर्णें तरी येका जीवें उभयतां । पुत्राचिया पिता दुखवे दुःखें ॥२॥ काय जाणे तुटों मायेचें लिगाड । विषम तें आड उरों नेणें ॥३॥ तुका म्हणे मज करुणा उत्तरें । करितां विश्वंभर पाविजेल ॥४॥

३६८९. नको घालूं झांसा । मना उपाधी वोळसा ॥१॥ जे जे साहावे

संकल्प । पुण्य तरी तेंचि पाप ।।२।। उपजतो भेव । होतो कासावीस जीव ।।३।। तुका म्हणे पाहों । होईल तें निवांत साहों ।।४।।

३६९०. बीजीं फळाचा भरंवसा । जतन सिंचनसरिसा । चालविलिया आशा । काकुळती ते नाड ।।१।। हा तों गडसंदीचा ठाव । पिके पिकवीला भाव । संकोचोनि जीवदशा केली जतन ।।२।। माती घाली धनावरी । रांडा रोटा वरीवरी । सुखाचे शेजारीं । दुःख संभ्रमें भोगीतसे ।।३।। तुका म्हणे दिशा भुली । झाल्या उफराट्या चाली । निवाड्याची बोली । अनुभवें साक्षीसी ।।४।।

३६९१. काय उरली ते करूं विनवणी । वंचलों वनीं पांडुरंगा ।।१।। अव्हेरलों आतां कैचें नामरूप । आदर निरोप तरी तो नाहीं ।।२।। माझा मायबाप गेलों सलगी । तों हे तुम्ही ये जगीं सोयरिका ।।३।। तुका म्हणे आतां जोडोनियां हात । करीं दंडवत ठाईंच्या ठाईं ।।४।।

३६९२. आवडी धरोनि करूं गेलों लाड । भक्ति प्रेमकोड न पुरेची ।।१।। म्हणउनि जीव ठेला असावोनी । खेद होतो मनीं बहुसाल ।।२।। वेठिऐसें वाटे निर्फल कारण । सीतळ होऊनि खोडावलों ।।३।। तुका म्हणे सरतें नव्हेंचि पायांपें । बळ केलें पापें नव्हे भेटी ।।४।।

३६९३. प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ।।१।। बहु नेदी रडों माता । दुश्चित होतां धीर नव्हे ।।२।। वरी वरी तोंडापुरतें । मोहरितें कळतसे ।।३।। जाणोनियां नेणता तुका । नव्हे लोकांसारिखा ।।४।।

३६९४. हा गे हाचि आतां लाहो । माझा अहो विठ्ठला ।।१।। दंडवत दंडवत । वेगळी मात न बोले ।।२।। वेगळाल्या कोठें भागें । लाग लागें लावावा ।।३।। तुका म्हणे केल्या जमा । वृत्तिक्षमा भाजूनी ।।४।।

३६९५. तुम्हांसी न कळे सांगा काय येक । कामया संकल्प वागऊं मी ।।१।। आहे तेथें सत्ता ठेविलों स्थापुनी । प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा ।।२।। कृपा झाली मज नलगे अंगसंग । निजध्यासें रंग चढताहे ।।३।। तुका म्हणे मागें बोलिलों तें वाव । आतां हाचि भाव दृढ झाला ।।४।।

३६९६. आवडी न पुरे मायबापापाशीं । घडों का येविशीं सकईल

॥१॥ होईल नेमिलें आपुलिया काळें । आलियाचे बळें आग्रो उरे ॥२॥ जाणविलें तेथें थोडे येक वेळा । सकळही कळा सर्वोत्तमीं ॥३॥ तुका म्हणे निवेदिलें गुह्य गुज । आतां तुझी तूज सर्व चिंता ॥४॥

३६९७. वोखटा तरी मी विटलों देहाशी । पुरे आतां ऐशी जोडी पुन्हां ॥१॥ किती मरमर सोसावी पुरती । राहिलों संगतीं विठोबाचे ॥२॥ आतां कोण याचा करील आदर । जावो कलिवर विटंबोनी ॥३॥ तुका म्हणे आतां सांडि तेची मांडी । कोण फिरे लंडी यासी मागें ॥४॥

३६९८. हेंहि ऐसें तेंहि तैसें । उभय पिसें अविचार ॥१॥ अभिमानाचे ठेलाठेलीं । मधीं झाली हिंपुटी ॥२॥ धीरा शांती ठाव नुरे । हाचि उरे आवाळ्या ॥३॥ कवतुक हें पाहें तुका । कढतां लोकां अधर्णी ॥४॥

३६९९. हित जाणें चित्त । कळों येतसे उचित ॥१॥ परिहार ते संपादणी । सत्या कारण कारणी ॥२॥ वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें तेथें रसीं ॥३॥ तुका म्हणे करूनि खरें । ठेवितां तें पुढें बरें ॥४॥

३७००. देवें दिल्हा देह भजना गोमटा । तो या झाला भाटा बाधिकेच्या ॥१॥ ताठोनियां मान राहिली वरती । अहंकारा हातीं लऊं नेदी ॥२॥ दास म्हणावया न चले रसना । सइरवचना बासकळ ॥३॥ तुका म्हणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानेंचि निर्मळ व्हावयासी ॥४॥

३७०१. कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥१॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोष ॥२॥ पाहिजे तो कळवळा । मम बळा काय उणें ॥३॥ तुका म्हणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥४॥

३७०२. नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥१॥ अनुभव तो वरिवरि । नाहीं उरीं वेगळा ॥२॥ पाहिजे तें आलें रुचि । काचाकुची कशाची ॥३॥ तुका म्हणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ॥४॥

३७०३. काय करूं पोरा लागली चट । धरी देउळाची वाट ॥१॥ सांगितलें नेघे कानीं । दुजे मनीं विठ्ठल ॥२॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥३॥ आमुचें कुळीं नव्हतें ऐसें । हेंचि पिसें निवडलें ॥४॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखे ॥५॥ तुका म्हणे नरका जाणें ।

या वचनें दुष्टांचीं ॥६॥

३७०४. जो जो घ्यावा सोस । माझे वारी गर्भवास । लटिक्याचा दोष । अधिक जडे अंगासी ॥१॥ आतां आहे तैसें असो । अनुताप अंगीं वसो । येवढेंचि नसो । माझें आणि परावें ॥२॥ जागा जालेपणें । काय असावें स्वप्नें । शब्दाचिया सिणें । कष्ट मिथ्या मानावा ॥३॥ छाया माकड विटे । धांवे कूपीं काय भेटे । तुका म्हणे फुटे । डोई गुडघे कोंपर ॥४॥

३७०५. गुणाचाचि सांठा । करूं न वजूं आणिका वाटा ॥१॥ करिती छंद नानापरी । भरुनी सिणती आडभरी ॥२॥ नेमिली पंगती । आम्हां संतांची संगती ॥३॥ तुका म्हणे लीळा । येर कवतुक पाहों डोळां ॥४॥

३७०६. शिकल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान । दर्पणींचें धन उपर वायां ॥१॥ अनुभव कई होईन भोगितां । सांकडें तें आतां हेंचि आलें ॥२॥ गायनाचे करी शरीराचे धर्म । बीज वर्म नाम तुझें दान ॥३॥ तुका म्हणे केला उशीर न साहे । द्याल तरी आहे सर्व सिद्ध ॥४॥

३७०७. शिकविला तैसा पढों जाणें पुसा । कैंची साच दशा तैसी अंगीं ॥१॥ स्वप्नींचिया सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ॥२॥ कासया हा केला जिव्हे अळंकार । पायासी अंतर दिसतसे ॥३॥ दर्पणीचें धन हातीं ना पदरीं । डोळां दिसे परी सत्याचीये ॥४॥ आस केली तरी लाळचि घोटावी । ठकाठकी तेवीं दिसतसे ॥५॥ कवित्व रसाळ वद-विली वाणी । साक्षही पुराणी घडली ऐसी ॥६॥ तुका म्हणे गुरें राखोनि गोवारी । माझी म्हणे परी लोभ नाहीं ॥७॥

३७०८. अनुभव तो नाहीं तुमच्या दर्शनीं । ऐकिलें कानीं वदे वाणी ॥१॥ जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतो मांडे पुरी काय होतें ॥२॥ नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरिहरा चाळविलें ॥३॥ पत्रीं कुशळता भेटीं अनादर । काय तें उत्तर येईल मानूं ॥४॥ अंतरीं सबाह्य कां नाहीं सारिखें । धरूनि पारिखें वर्ततसा ॥५॥ आलों आलों ऐसी दाउनियां आस । बुडों बुडत्यास काय द्यावें ॥६॥ तुका म्हणे अहो चतुरा शिरोमणी । किती माझी वाणी तुम्ही कोठें ॥७॥

३७०९. केलें तरी आतां साचाचि करावें । विचारिलें द्यावें कृपादान ॥१॥ संकल्पासीं नाहीं बोलिला विकल्प । तुम्हां पुण्य पाप कळे देवा ॥२॥ उदार विख्यात तुम्ही भूमंडळीं । ऐसी ब्रीदावळी गर्जतसे ॥३॥ तुका म्हणे अहो रखुमाईच्या वरा । उपरोध कां धरा माझा आतां ॥४॥

३७१०. अहो पुरुषोत्तमा । तुम्हां काशाची उपमा ॥१॥ सतत तो नाहीं बुद्धी । नाळवितां नाहीं शुद्धी ॥२॥ जागविलें तरी । तुम्हां व्यक्ति येणें हरि ॥३॥ तुका म्हणे देवा । तुम्हां नित्य दीस नवा ॥४॥

३७११. मथनें भोगे सार । ताकें घडे उपकार ॥१॥ बरवी सायासाची जोडी । अनुभविया ठावी गोडी ॥२॥ पाक आणि रुचि । जेथें तेथें ते कैंची ॥३॥ वाढितो पंगती । तुका आवडी संगती ॥४॥

३७१२. चिंतनाची जोडि । हाचि लाभ घडोघडी ॥१॥ तुम्ही वसोनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥२॥ जेथें जेथें जाय मन । आड घालीं सुदर्शन ॥३॥ तुका म्हणे भोजें । मग मी नाचेन निर्लज्ज ॥४॥

३७१३. आवडीची न पुरे धणी । प्रीति मनीं बैसली ॥१॥ नित्य नवा कळवळा । मायबाळामध्यें तो ॥२॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटींचें ॥३॥ तुका म्हणे ब्रह्मानंदें । संतवृंदें चरणापें ॥४॥

३७१४. जडलों तों आतां पाई । होऊं काइ वेगळा ॥१॥ तुम्हीं संतीं कृपा केली । गंगे चाली बोधाची ॥२॥ सांभाळिलें मायबापा । केलों तापावेगळा ॥३॥ वोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्यचि ॥४॥

३७१५. काळावरी सत्ता । ऐशा करितो वारता ॥१॥ मी तो हीनाहुनी सांडे । देव दुन्हें काळतोंडें ॥२॥ मानुनी भरंवसा । होतों दास म्हणत ऐसा ॥३॥ तुका म्हणे मान । गेलों वाढऊं थोरपण ॥४॥

३७१६. समर्थाचे सेवे कोठें नाहीं घात । पाहों नये अंत पांडुरंगा ॥१॥ आहे तैसी नीत विचारावी बरी । येउनि भीतरीं वास करा ॥२॥ निढळ राखिलें तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ॥३॥ तुका म्हणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभ कीर्ती ॥४॥

३७१७. बहु धीर केला । जाण नव्हेसी विठ्ठला ॥१॥ आतां धरीन

पदरीं । तुज मज करीन सरी ॥२॥ झालों जिवासी उदार । उभा राहिलों समोर ॥३॥ तुका म्हणे संता । ऐसें सांगा पंढरीनाथा ॥४॥

३७१८. न द्यावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळां ॥१॥ सर्प शांतिरूप न म्हणावा भला । झोंबे खवळिला तात्काळ तो ॥२॥ तुका म्हणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥३॥

३७१९. अभयदान मज देईं गा उदारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥१॥ देहभाव तुझ्या ठेवियेला पाईं । आणिक मी कांहीं दुजें नेणें ॥२॥ सेवाभक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पाईं ॥३॥ तुका म्हणे तुझें नाम दीनानाथ । तें मज उचित करीं आतां ॥४॥

३७२०. करावा वर्षाव । तृषाक्रांत झाला जीव ॥१॥ पाहें आकाशाची वास । जाणता तूं जगदीश ॥२॥ संयोगें विस्तार । वाढी लागे तो अंकुर ॥३॥ तुका म्हणे फळें । चरणांबुजें तीं सकळें ॥४॥

३७२१. करीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावी चरणापें ॥१॥ मग तो माझा मायबाप । घेईल ताप हिरोनी ॥२॥ बहुतांच्या मतें गोवा । होऊं जीवा नेदावा ॥३॥ तुका म्हणे करुणा बोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥४॥

३७२२. येकविध नारायण । तेथें विषमाचा शीण । पालटोंचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥१॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवोनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । येकायेकीं येकांत ॥२॥ कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणें पाडें लवलाहो ॥३॥ तुका म्हणे आळस निद्रा । येथें देउनियां चिरा । देउनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥४॥

३७२३. हरपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखें ॥१॥ नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥२॥ अवघा रुंधविला ठाव । नेला वाव मी माझें ॥३॥ तुका म्हणे येके ठाईं । असों नाहीं क्षण भिन्न ॥४॥

३७२४. देवें केलें कैसें कैसें । उद्धरिलें अनायासें ॥१॥ ऐका नवलायाची ठेव । नेणताहि भक्तिभाव ॥२॥ कैलासासी नेला । भिल्ल पानेडी बैसला ॥३॥ पांखांच्या फडत्कारीं । उद्धरोनि नेली घारी ॥४॥ चोरें पिंडीं दिल्हा पाव । त्या पूजेनें धाला देव ॥५॥ तुका म्हणे भोळा । स्वामी

माझा हो कोंवळा ॥६॥

३७२५. अनुभव ऐसा । मज लागला सरिसा ॥१॥ पाठी बैसली शेजारीं । नव्हे शांति कोणे परी ॥२॥ कोठें नलगे जावें । कांहीं घालावया ठावें ॥३॥ तुका म्हणे कोटी । दुःखाच्याच तये पोटीं ॥४॥

३७२६. पाठीवरी भार । जातो वाहोनियां ॥१॥ संत नेतील त्या ठायां । माझी आधीन त्या काया ॥२॥ मोठें चौफळ । अंगीं उच्छिष्टाचें बळ ॥३॥ न संडी मारग । येथें चोरुनियां अंग ॥४॥ आपुलिया सत्ता । चालविलें नाहीं चिंता ॥५॥ कळवळिला तुका । जनाचार येथें नका ॥६॥

३७२७. मागें पुढें जालों लाठा । अवघा मोठा सरळ ॥१॥ नाहीं कोठें रितें अंग । नित्य रंग नवाची ॥२॥ पोसिंद्याचे पडिलों हातीं । वोझीं माती चुकली ॥३॥ जोगावलों पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ॥४॥ अवघ्या मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ॥५॥ संताचिये लोळे द्वारीं । पळती दुरी गोमाशा ॥६॥ पाहातों गे महाद्वारीं । वरी झुले वाकळ ॥७॥ कांहीं न साहेसा झाला । तुका नेला समर्थे ॥८॥

३७२८. करणें न करणें वारियेलें जेथें । जातों तेणें पंथें सादावीत ॥१॥ संतीं हें पहिलें लाविलें निशाण । ते खुण पाहोन गर्जे नामें ॥२॥ तुका म्हणे तुम्ही चला याचि वाटे । भरवशानें भेटे पांडुरंग ॥३॥

३७२९. सुनियाचा हाचि भाव । आपुला ठाव राखावा ॥१॥ दुजियाचा वारा येऊं । नेदुं घरावरी देऊं ॥२॥ केली याची फाडाफाडी । तडातोडी क्षेत्राची ॥३॥ पातेजत नाहीं लोकां । तुका देवावांचूनि ॥४॥

३७३०. धन्य तोचि ग्राम जेथें हरिदास । धन्य तोचि वंश भक्ति-भाग्य ॥१॥ ब्रह्मज्ञान जेथें असे घरोघरीं । धन्य नरनारी चतुर्भुज ॥२॥ नाहीं पापा रिघ काळाचें खंडण । हरिनाम कीर्तन घरोघरीं ॥३॥ तुका म्हणे तिहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळांसहित वंशा ॥४॥

३७३१. भय होतें आम्हीपणें । पाठी येणें घातलें ॥१॥ अवघा आपुलाचि देश । काळा लेश उरेना ॥२॥ समर्थाचें नाम घेतां । मग चिंता कशाची ॥३॥ तुका म्हणे नारायणें । झालें जिणें सुखाचें ॥४॥

३७३२. मारूं नये सर्प संताचिये दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥१॥ येक सूत्र जीवीं शिवीं ही ऐक्यता । रोम उपडितां अंग कांपे ॥२॥ नाहीं साहों येत दुःखाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य झालें ॥३॥ तुका म्हणे दिल्हा नीतीचा संकेत । पूजा नांवें चित्त सुख तेणें ॥४॥

३७३३. विषम वाटे दूरवरी । चालोनियां परती घरीं । मागील ते उरी । उरली नाहीं भयाची ॥१॥ मुख्य न व्हावा तो नाड । शेवटाचे हातीं गोड । सरलिया चाड । मग कैंचे उद्वेग ॥२॥ होता पहिला अभ्यास । समयीं घालावया कास । तेव्हां लटिके ते दोष । योगें अनुतापाच्या ॥३॥ तुका म्हणे आहे । बुद्धी केलियानें साहे । जवळीच पाहें । देव वाट स्मरणाची ॥४॥

३७३४. आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलीया ॥१॥ भाग गेला सीण गेला । अवघा झाला आनंदु ॥२॥ प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाटी मुखासी ॥३॥ तुका म्हणे आम्हां जोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥४॥

३७३५. विश्वीं विश्वंभर । बोले वेदांताचें सार ॥१॥ जगीं जगदीश । शास्त्र वदती सावकाश ॥२॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥३॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥४॥ सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥५॥

३७३६. निरोधितों परी न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥१॥ राहातेति तुम्ही भरुनि अंतरीं । होतो तदाकारीं निर्विषय ॥२॥ कृपेचिये साक्षी असतां जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥३॥ तुका म्हणे ताळा मेळवणीपासीं । विनंति पायासी हेचि करी ॥४॥

३७३७. अद्वयचि द्वय झालेंचि कारण । धरिलें नारायणें भक्तिसुख ॥१॥ अपरोक्ष आकार झाला चतुर्भुज । येकतत्त्व बीज भिन्न नाहीं ॥२॥ शून्य निरशून्य राहिलें निर्मळ । तें दिसे केवळ विटेवरी ॥३॥ सुखें घ्यावें नाम वदना ही चाड । सरिता वापी आड येक पाणी ॥४॥ तुका म्हणे मीच आहे तेणें सुखें । भेद नाहीं मुखें नाम गातां ॥५॥

३७३८. उदार चक्रवर्ती । वैकुंठींचा भूपती । पुंडलिकाचिये प्रीति । विटे उभा राहिला ॥१॥ सर्वसिद्धींचा दातार । सवें आणिला परिवार । भक्तां

अभयकर । घ्या घ्या ऐसें म्हणतसे ॥२॥ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षि देवातें स्थापिलें । येकविस स्वर्गातें धरिलें । सत्ता मात्रें आपुलिया ॥३॥ तुका म्हणे कृपावंत । इच्छिले पुरवी मनोरथ । रिद्धिसिद्धि मुक्ती देत । शेखी संग आपुला ॥४॥

३७३९. सकळगुणें संपन्न । येक देवाचें लक्षण ॥१॥ वरकड कोठें कांहीं कोठें कांहीं । येक आहे तों येक नाहीं ॥२॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । येक भगवंतीं जाण ॥३॥ तुका म्हणे जें जें बोला । तें तें साजे या विठ्ठला ॥४॥

३७४०. सुख पंढरिये आलें । पुंडलिकें सांठविलें ॥१॥ घ्या रे घ्या रे माझे बाप । जिव्हे घेउनि खरें माप । करा एक खेप । मग न लगे हिंडणें ॥२॥ विषय गुंडोनि पसारा । धांव घाला पंढरपुरा ॥३॥ आहे आयुष्याचा लेश । करी पंढरीचा वास ॥४॥ आळस न करीं या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥५॥

३७४१. देवाचें चरित्र नावडे सर्वथा । विनोदाची कथा गोड वाटे ॥१॥ हातावरी हात हासोनी आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥२॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥३॥

३७४२. अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ॥१॥ करूनि उचित देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥२॥ देव-भक्तपण सुखाचा सोहळा । ठेवुनी निराळा दावीं मज ॥३॥ तुका म्हणे आहे तुझें हें सकळ । कोण्ही येका काळें देईं मज ॥४॥

३७४३. हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥१॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥२॥ हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥३॥ हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जपध्यान नाम तुझें ॥४॥ हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥५॥ हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ॥६॥ तुका म्हणे दुजें सांगावया नाहीं । नामेंविण कांहीं धन वित्त ॥७॥

३७४४. कोणे साक्षीविण । केलें उद्धारा भजन ॥१॥ ऐसें सांगा जी

दातारा । माझी भक्ति परंपरा ॥२॥ कोणें नाहीं केली आळी । ब्रह्मज्ञानाहुनि वेगळी ॥३॥ कोणाचें तें कोड । नाहीं पुरविला लाड ॥४॥ कोणाच्या उद्धारा । केला विलंब माघारा ॥५॥ तुका म्हणे भिन्न । कांहो बोला साक्षीवीण ॥६॥

३७४५. सुखरूप चाली । हळुहळू उसंतिली ॥१॥ बाळगोपाळांची वाट । सेवें सेवकतां नीट ॥२॥ जरी झाला श्रम । तरी पडों नये भ्रम ॥३॥ तुका म्हणे दासां । देव सरिसासरिसा ॥४॥

३७४६. चुकली ते वाट । पुढें सांपडली नीट ॥१॥ म्हणऊनि गर्भवास । नेणती हे हरिचे दास ॥२॥ संचिताचा संग । काय जाणों पावे भंग ॥३॥ तुका म्हणे दृष्टी । उघडी तो न्व्हे कष्टी ॥४॥

३७४७. कइं तो दिवस देखेन मी डोळां । कल्याण मंगळामंगळाचें ॥१॥ आयुष्या शेवटीं पायांसवें भेटी । काळवेळ तूटी झाल्या तरे ॥२॥ सरो हें संचित पदरींचा गोवा । उतावीळ देवा मन झालें ॥३॥ पाउलापाउलीं करितां विचार । अनंत विकार चित्ता अंगीं ॥४॥ म्हणउनि भयाभीत होतो जीव । भाकितसे कींव अट्टाहास्यें ॥५॥ दुःखाचे उत्तरीं आळविले पाय । पाहाणे तें काय अझुनी आतां ॥६॥ तुका म्हणे होइल आइकिलें कानीं । तरी चक्रपाणी धांव घालीं ॥७॥

३७४८. कळों येतें वर्म । तरी न पावतों श्रम ॥१॥ तुम्हां शिरीं होता भार । आम्हा कैंचा संवसार ॥२॥ होतें अभयदान । तरी स्थीर होतें मन ॥३॥ तुका म्हणे पाहे । ऐसी वाट उभा आहें ॥४॥

३७४९. वारंवार हाचि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥१॥ इच्छेचा तूं दाता तूं येक समर्था । अगा कृपावंता मायबापा ॥२॥ लाभाचिये वोढी उतावीळ मन । त्यापरी चिंतन चरणाचें ॥३॥ तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगा द्यावा शीघ्र आतां ॥४॥

३७५०. आइकावीं माझीं कवतुक उत्तरें । देऊनि सादरें चित्त देवा ॥१॥ वोरसें आवडी आलों पायापाशीं । होईल तें मनेंसीं सुख कीजे ॥२॥ तुमचें न भंगे सर्वोत्तमपण । करितां समाधान लेंकराचें ॥३॥ तुका म्हणे जरी

बोलतों बोबडें । तरी लाडें कोडें कवतुक ॥४॥

३७५१. नाहीं गुणदोष लिंपो देत अंगीं । झाडितां प्रसंगीं बराबरी॥१॥ निकटवासिया आळवितां धांवा । येथुनियां देवा सोडउनी ॥२॥ उमटे अंतरीं तें करूं प्रगट । कळोनि बोभाट धांव घालीं ॥३॥ तुका म्हणे तरी वाचलों या काळें । समर्थाचे बळें सुखी असों ॥४॥

३७५२. आतां येणें पडिपाडें । रस सेऊं हा निवाडें । मुंगी नेली गोडें । ठेविलिये अडचणी ॥१॥ तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडीं केशवा । विषयबुद्धि हेवा । वोस पडो सकळ ॥२॥ भुकेलिया श्वाना । गांठ पडे सवें अन्ना । मुको पाहें प्राणा । परि तोंडिची न सोडी ॥३॥ काय जिंकियेलें मन । जीवित्व कामातुरा तृण । मागें व्यभिचारिण । भक्ति तुका ये जाती ॥४॥

३७५३. न पवीजे तया ठाया । आलों कायाक्लेशेंसी ॥१॥ आतां माझें आणी मना । नारायणा वोजेचें ॥२॥ बहु ऋणें पीडिलों फार । परिहार करावा ॥३॥ तुका म्हणे निर्बळ शक्ति । काकुलती म्हूण येतों ॥४॥

३७५४. बहु फिरलों ठायाठाव । कोठें भाव पुरेना ॥१॥ समाधान तों पावलों । उरलों बोलों यावरी ॥२॥ घेईं देवा आशीर्वाद । आमुच्या नांद भाग्यानें ॥३॥ तुका म्हणे जेऊं आधीं । खबखब मधीं सारावी ॥४॥

३७५५. कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठायां ॥१॥ तांतडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ॥२॥ नांवासाठीं नेघे भार । नलगे फार वित्पत्ति ॥३॥ तुका म्हणे नलगे जावें । कोठें देवें सुचेना ॥४॥

३७५६. इंद्रियांचे पुरे कोड । तेंचि गोड पुढतीहि ॥१॥ जावें म्हणतों पंढरपुरा । हाचि बरा संसार ॥२॥ बैसलें तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें ॥३॥ तुका म्हणे देती कान । वाणावाण निवडूनी ॥४॥

३७५७. आतां देवा मोकलिलें । तुम्हां भलें दिसेना ॥१॥ आतां नाहीं जीवभाव । उरला ठाव वेगळा ॥२॥ सांभाळूनि घ्यावें देवा । आपणासवा यावरी ॥३॥ तुका म्हणे नग्न भाज । तरी ते लाज स्वामीसी ॥४॥

३७५८. आशाबद्ध आम्ही भाकितसों कींव । तत्पर हा जीव कार्या-

पासीं ॥१॥ प्रतिउत्तराची पाहातसें वाट । करूनि बोभाट महाद्वारीं ॥२॥ आपुल्या उचितें करूनियां ठेवी । समंध गोसावी तोडोनियां ॥३॥ तुका म्हणे एक झालिया निवाड । कोण बडबड करी मग ॥४॥

३७५९. खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग । साक्षी तव जग उभयतां ॥१॥ आपल्या आपण नाहीं शोभों येत । चार करी स्फीत दाखऊनी ॥२॥ खाणार ताकाचें असे तें माजिरें । आपणेंचि अधीरें कळों येतें ॥३॥ तुका म्हणे जळों मैंदाची मवाळी । दाउनियां नळी कापी सुखें ॥४॥

३७६०. नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं । जिव्हाळ्याचीचि बरी बोली ठाईं ॥१॥ आपुलिया हिता मानसी कारण । सत्या नारायण साह्य असे ॥२॥ निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥३॥ तुका म्हणे नेम न टळतां बरें । खऱ्यासिच खरें असें नाम ॥४॥

३७६१. आलों उल्लंघोनि दुःखाचे पर्वत । पायापासीं हित तुमच्या तरी ॥१॥ न देखेचि लासा दुःखी होतें मन । कठिण कठिण वाटतसे ॥२॥ नव्हे सांडी परि वाटते निरास । नये माझा दीस संकल्पाचा ॥३॥ तुका म्हणे तुम्ही सदैव जी देवा । माझ्या हाचि जीवा येकु ठाव ॥४॥

३७६२. किती सोसिती करंटीं । नेणों संसाराची आटी । सर्व काळ पोटीं । चिंतेचिच हळहळ ॥१॥ रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम । उफराटा भ्रम गोवी विषया माजिरा ॥२॥ कळतां न कळे उघडें । काय झांकियेले डोळे । भरले त्याचे चाळे । अंगीं वारें मायेचें ॥३॥ तुका म्हणे जन । ऐसें नांव बुद्धिहीन । बहुरंगें भिन्न । येकीं येक निर्मिले ॥४॥

३७६३. मंगळाचा मंगळ सांटा । वीट तोटा नेणें तो ॥१॥ हेंचि भरा सातें आलें । भलें भलें म्हणवावें ॥२॥ जनीं जनार्दन वसे । तेथें दिसे तें शुद्ध ॥३॥ तुका म्हणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥४॥

३७६४. नामाचा महिमा बोलतों उत्कर्ष । अंगा कांहीं रस नयेचि तो ॥१॥ कैसें समाधान राहे पांडुरंगा । नलगेचि अंगा आणी कांहीं ॥२॥ लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचें तें फिके वेवसाव ॥३॥ तुका म्हणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरी माझ्या ॥४॥

३७६५. हेंचि वारंवार । पडताळुनी उत्तर ॥१॥ करितों पायांसी विनंती । नुपेक्षावें कमळापती ॥२॥ गंगोदकें गंगे । अर्घ्य द्यावें पांडुरंगे ॥३॥ जोडोनियां हात । तुका करी प्रणिपात ॥४॥

३७६६. अवचित या तुमच्या पायां । देवराया पावलों ॥१॥ बरवें झालें देशाउर । आल्या दूर सारिखें ॥२॥ राहोनियां जातों ठाया । आलियाची निशाणी ॥३॥ तुका म्हणे चरणसेवा । जोडी हेवा लाधली ॥४॥

३७६७. आतां पात्रिजेल घरा । या दातारा संगती ॥१॥ पायांवरी ठेउनि माथा । सर्वथा हा नुपेक्षी ॥२॥ येथुनियां तेथवरी आतां । नाहीं सत्ता आणिकांची ॥३॥ तुका म्हणे चक्रपाणी । शिरोमणी बळियाचा ॥४॥

३७६८. बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ॥१॥ अभयाचे जावें ठाया । देवराया प्रतापें ॥२॥ साधनाचा नलगे पांग । अवघें सांग कीर्तनें ॥३॥ तुका म्हणे सत्ताधारी । कोण करी खोळंबा ॥४॥

३७६९. मागें पुढें नाहीं । दुजें या वेगळें कांहीं ॥१॥ नाहीं उरलें आणिक । केला झाडा सकळिक ॥२॥ विश्वासावांचून । नांवें दुजियाचें शून्य ॥३॥ तुका म्हणे कांहीं । बोलायाची उरी नाहीं ॥४॥

३७७०. वैराग्याचा अंगीं झालासे संचार । इच्छी वनांतर सेवावया ॥१॥ कां जी माझें करूं नये समाधान । वियोगानें मन शिणतसे ॥२॥ नयेचि न्यावया पंढरीचें मूळ । न देवेचि माळ कंठींची ही ॥३॥ तुका म्हणे झालें अप्रीतीचें जीणें । लाजिर हें वाणें सेवा करी ॥४॥

३७७१. आळीकरा कोठें साहातें कठीण । आपुला तो प्राण देऊं पाहे ॥१॥ सांभाळावें मायबापें कृपादृष्टी । पीडितां ते दृष्टी देखों नये ॥२॥ अंतरलों मागें संसारा हातीं । पायांपें सरती झालों नाहीं ॥३॥ तुका म्हणे तुम्ही विचारा जी देवा । ठेवाल ते ठेवा कोणे परी ॥४॥

३७७२. स्वप्नींचें तें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरी होऊं नये ॥१॥ अझुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाश द्यावी सत्य भेटी ॥२॥ बोलोनियां फेडा जीवींचि काजळी । पाहेन कोवळीं चरणांबुजें ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनीयां ठेवा पडदा आतां ॥४॥

३७७३. येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥१॥ आतां माझा जीव घेउनीयां बळी । बैसवावें वोळी संतांचिये ॥२॥ विस्तारली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वोझें ॥३॥ तुका म्हणे आलों निर्वाणाच वरी । राहों नेदी उरी नारायणा ॥४॥

३७७४ म्हणवुनि काय जीऊं भक्तपणें । जायाचीं भूषणें अलंकार ॥१॥ आपुल्या कष्टाची करूनियां जोडी । मिरवीन उघडीं इच्छावर्से ॥२॥ तुके तरी तुकी खऱ्याचें उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोठवरी ॥३॥ तुका म्हणे पुढें आणि मागें फांस । पावे ऐसा नाश न करीं देवा ॥४॥

३७७५. आपणचि व्हाल साह्य । कार्य आहे निर्वाणीचें ॥१॥ भाकिली ते उरली कींव । आहे जीव जीवपणें ॥२॥ आहाच कैंचा बीजा मोड । प्रीति कोड वांचूनी ॥३॥ तुका म्हणे दंडीन काया । याल तया धांवणिया ॥४॥

३७७६. निश्चितीनें होतो करूनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥१॥ अनंत उठती चित्ताचे तरंग । करावया त्याग वाटतसे ॥२॥ कोण तुम्हांवीण मनाचा चाळक । दुजें सांगा येक नारायणा ॥३॥ तुका म्हणे माझा मांडिला विनोद । करूं नेणें छंद कराल काई ॥४॥

३७७७. आश्वासावे दास । तरी घडे तो विश्वास ॥१॥ नाहीं चुकत चाकरी । फुट लाडेशाची थोरी ॥२॥ स्वामिच्या उत्तरें । सुख वाटे अभय करें ॥३॥ न मगे परि भातें । तुका म्हणे निढळ वाटे ॥४॥

३७७८. जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ॥१॥ मज लाऊं नको तैसें । वायां जाय ऐसें पिसें ॥२॥ धरितोसि सत्ता । होसी सकळ जाणता ॥३॥ चतुराच्या राया । अंगींकारावें तुकया ॥४॥

३७७९. राहे उभा वादावादीं । तरी फंदी सांपडे ॥१॥ लव्हाळ्यासी कोठें बळ । करिल जळ आपुलें ॥२॥ कठिणासी बळजोडा । नम्र पीडा देखेना ॥३॥ तुका म्हणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ॥४॥

३७८०. म्हणउनि झाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥१॥ दाखविलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला ॥२॥ हातें मुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ॥३॥ तुका म्हणे येकांत सुखें । अवघें गोतें गुंतलें ॥४॥

३७८१. न पडो आतां हाडीं घाव । मध्यें कींव नासक ॥१॥ करविली आत्महत्या । जीवा कां त्या द्वंद्वाच्या ॥२॥ आशापाशीं गुंतला गळा । तेणें कळाहीन झालों ॥३॥ तुका म्हणे लावूं मुळीं । जीव कुळी थोरेसी ॥४॥

३७८२. सामात्रे कारण । नाहीं सोसत धरणें ॥१॥ लादी थिकें लाजिरवाणी । हीनकमाईची घाणी ॥२॥ पुष्प जवळी नाका । दुर्गंधीच्या नांवें थुंका ॥३॥ तुका म्हणे किती । उपदेशहीन जाती ॥४॥

३७८३. असाल ते तुम्ही असा । आम्ही सहसा निवडों ना ॥१॥ अनुसरलों येका चित्तें । होतों हातें गिंवसीत ॥२॥ गुणदोष कशासाठीं तुमचे पोटीं वागऊं ॥३॥ तुका म्हणे दुजें आतां । कोठें चित्ता आतळों ॥४॥

३७८४. सोवळा होऊं तों वोवळें जडलें । सांडीमांडी बोलतोंडीं बीजीं ॥१॥ येकसरी केली कळिवरेंसाटीं । आतां नका तुटी पायांसवें ॥२॥ संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जूसर्प मूळ मरणाचें ॥३॥ तुका म्हणे हें तूं ब्रह्मांड चाळिता । मी काय करूं चिंता पांडुरंगा ॥४॥

३७८५. आहे तैसा आतां आहे ठाईं बरा । ठेविले दातारा उचितें त्या ॥१॥ वचनाचा भार पडिलियां शिरीं । झाले मग भारी उतरेना ॥२॥ अबोल्याची सवे लावुनियां मना । फांको नेदी गुणा ऐसें करूं ॥३॥ तुका म्हणे आम्हां गोवळ्यांचा संग । राखावें तें अंग जाणतसों ॥४॥

३७८६. दर्पणासी बुजे । नकटें तोंड लपवी लाजे ॥१॥ गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासी पीडा करी ॥२॥ चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥३॥ तुका म्हणे जन । देवा असे भाग्यहीन ॥४॥

३७८७. म्हणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥१॥ तो हा उतरील पार । भवदुस्तर नदीचा ॥२॥ बहु आहे करुणावंत । अनंत हें नाम ज्या ॥३॥ तुका म्हणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥४॥

३७८८. ऐसीं वर्में आम्हां असोनियां हातीं । कां होऊं नेणती दिशाभुली ॥१॥ पोटाळुनि पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदी ॥२॥ आपुले इच्छेचे घालिन संपुष्टीं । श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन ॥३॥ तुका

म्हणे बहु सांडियेली मतें । आपुल्या पुरतें धरूनि ठेलों ॥४॥

३७८९. रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । अव्हेरुनि दूरी अधिकारें ॥१॥ जातीचा स्वभाव आला डोळ्यां आड । तया घडे नाड न कळतां॥२॥ कामधेनु देखे जैशा गाईम्हैसी । आणिकांतें ऐसी करूनियां ॥३॥ तुका म्हणे काय बोलोनियां फार । जयाचा वेव्हार तया साजे ॥४॥

३७९०. तरीच हे केली । दानें वाईट चांगली । येकेंयेका शोभवावें ॥१॥ केलें कवतुक देवें ॥२॥ काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळविता ॥३॥ तुका म्हणे धुरें । डोळे भरी परि खरें ॥४॥

३७९१. करी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण । तया देतां दान । नर्का जाती उभयतां ॥१॥ तैसें झालें दोघांजणा । मागतिया यजमाना । जाळियेलें वना । आपणासहित कांचणी ॥२॥ घडितां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव । तरता नाहीं ठाव । बुडवी तारूं तरतिया ॥३॥ चोरा दिल्हा सांटा । तेणें मारियेल्या वाटा । तुका म्हणे ताठा । हें तंव दोघे नाडती ॥४॥

३७९२. जळो ते जाणीव जळो ते शहाणीव । राहो माझा भाव विठ्ठल-पाईं ॥१॥ जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थिर विठ्ठलपाईं ॥२॥ जळो हा लौकिक जळो दंभ मान । लागो मना ध्यान विठ्ठलाचें ॥३॥ जळो हें शरीर जळो हा संमंध । राहो परमानंद माझे कंठीं ॥४॥ तुका म्हणे येथें अवघेंचि होय । धरीं मनीं सोय विठोबाची ॥५॥

३७९३. विश्वास धरोनी राहिलों निवांत । ठेउनियां चित्त तुझे पाईं ॥१॥ तरावें बुडावें तुझीया वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ॥२॥ न कळे हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेइन देवा ॥३॥ मागणें तें सरे ऐसे करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥४॥ करावें तें कांहीं कीं पाहा उगलें । तुका म्हणे बोले पांडुरंगा ॥५॥

३७९४. कोणी येकाचीया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥१॥ बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥२॥ तैसें करूं नको मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥३॥ तुका म्हणे

मायबापाचें उचित । करावें स्वहित बाळकाचें ॥४॥

३७९५. देवाचिये पाईं देई मना बुडी । नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥१॥ सर्व सुखें तेथें होतीं येक वेळे । न सरती काळें कल्पांतीं ही ॥२॥ जाणें येणें खुंटे धांव येरझार। नलगे डोंगर उसंतावे ॥३॥ सांगणें तुज इतुलेंचि आतां । मानी धन कांता विषतुल्य ॥४॥ तुका म्हणे तुझे हातीं उपकार । उतरों हा पार भवसिंधु ॥५॥

३७९६. आम्ही विठ्ठलाचे दास झालों आतां । न चलेचि सत्ता आणिकांची ॥१॥ नावरे तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ॥२॥ कोठें तुज ठाव घ्यावयासि धांवा । मना तूं विसावा घेईं आतां ॥३॥ इंद्रियांची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार चाळी तुज ॥४॥ तुका म्हणे आम्ही जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ॥५॥

३७९७. सांगतों तुम्हांसी भजा रे विठ्ठला । नाहीं तरी गेला काळ वायां ॥१॥ करितां भरोवरी दुराविसि दुरी । भवाचिया पुरीं वाहवसी ॥२॥ कांहीं न लगे येक भावचि कारण । तुका म्हणे आण विठ्ठलाची ॥३॥

३७९८. शब्द झणी येऊं नेदी दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥१॥ जळो ते जाणीव जळो त्यांचे बंड । जळो तया तोंड दुर्जनाचें ॥२॥ तुका म्हणे येती दाटुनि छळावया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥३॥

३७९९. अन्यायासी राजा न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना ॥१॥ न करी निगा कुणबी न काढितां तन । कैचें येती कण हातासी ते ॥२॥ तुका म्हणे सत्ता करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां ॥३॥

३८००. भले लोक नाहीं सांडित वोळखी । हे तों झाली देखी दुसऱ्याची ॥१॥ असो आतां यासी काय चाले बळ । आपुलें कपाळ वोडवलें ॥२॥ समर्थासी काय कोणें हें म्हणावें । आपुलिया जावें भोगावरी ॥३॥ तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥४॥

३८०१. मुकें होतां काय पदरींचें जातें । मूर्ख तें भोगितें मीमीपण ॥१॥ आपुलियां घरीं मैंद होउनी बैसे । कोणासीही ऐसें बोलों नये ॥२॥ तुका म्हणे तुम्हां सांगतों मी खुण । देवासी तें ध्यान लाउनि बैसा ॥३॥

३८०२. आषाढी निकट । आला कार्तिकीचा हाट ॥१॥ पुरे दोन्ही बाजार । न लगे आणिक व्यापार ॥२॥ तेंचि घ्यावें द्यावें । कैवल्याच्या राशी भावें ॥३॥ कांहीं कोणा नेणें । विठोबावांचून तुका म्हणे ॥४॥

३८०३. देउनियां प्रेम मागितलें चित्त । जालि फीटाफीट तुम्हां आम्हां ॥१॥ काशानें उदार तुम्हांसी म्हणावें । येक नेशी भावें येक देसी ॥२॥ देउनियां थोडें नेसील वो फार । कुठिसी विचार अवघियांचा ॥३॥ तुका म्हणे आम्हां भांडवल चित्त । नेउनी दुश्चित पाडियेलें ॥४॥

३८०४. तातडिची धांव अंगा आणि भाग । खोळंबा तो मग निश्चिंतीचा ॥१॥ म्हणउनी बरी विचारावी चाली । उरली ते बोली कामा येते ॥२॥ कोरडें वैराग्य माजिरा बडिवार । उतरे तो शूर अंगींचें तें ॥३॥ तुका म्हणे बरी झऱ्याची ते चाली । सांचवण्या चाली कासयाची ॥४॥

३८०५. मी तों बहु सुखी आनंदभरित । आहे साधुसंत मेळेकारी ॥१॥ कांहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा । आणीक केशवा तुजवीण ॥२॥ नलगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसे ॥३॥ मृत्युलोकीं कोण धरील वासना । पावावया जनासवें दुःख ॥४॥ तुका म्हणे तुझा दास ऐसें लोकां । कांहीं सकळिकां कळों यावें ॥५॥

३८०६. घ्या रे लुटी प्रेमसुख । फेडा आजि धणी । चुकला तो मुकला । जाली वेरझार हाणी ॥१॥ घाला घातला वैकुंठीं । करुनियां जीवें साटीं । पुरविली पाठी । वैष्णवीं काळाची ॥२॥ अवघें आणिलें अंबर । विठोसहित तेथें धुर । भेदुनि जिव्हार । नामबाणीं धरियेला ॥३॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघीं झालीं गहन । केलीं पापपुण्यें । देशधडीं बापुडीं ॥४॥ आनंद गर्जती निर्भर । घोष करिती निरंतर । कांपती असुर । वीर कवणा नागवती ॥५॥ जें दुर्लभ ब्रह्मादिकां । आजि सांपडलें फुका । घ्या रे म्हणे तुका । सावचित्त होउनी ॥६॥

३८०७. तुझिया दासांचा हीन झालों दास । न धरीं उदास मायबापा ॥१॥ तुजविण प्राण कैसा राहों पाहे । वियोग न साहे क्षणभरी ॥२॥ आणिक माझ्या जीवें मोकलिली आस । पाहे तुझी वास पांडुरंगा ॥३॥

सर्वभावें तुज आणिला उचित । राहिलों निश्चिंत तुझें पाई ॥४॥ तुका म्हणे तुज असे माझा भार । बोलतों मी फार काय जाणें ॥५॥

३८०८. तेचि करीं मात । जेणें होईल तुझें हित ॥१॥ काय बडबड निमित्य । सुखें जिव्हारीं सिणविसी ॥२॥ जो मूळव्याधीं पीडिला । त्यासी देखोनि हांसे खरजुला ॥३॥ आराथकरी सोसी । त्यासी हासे तो आळसी ॥४॥ क्षयरोगी म्हणे परता । सर रोगिया कुष्ठता ॥५॥ वडस दोन्ही डोळां वाढले । आणिकातें कोचे बोले ॥६॥ तुका लागे पायां । शुद्ध करा आपणिया ॥७॥

३८०९. कळों आला भाव माझा मज देवा । वायांवीण जीवा आटी केली ॥१॥ जोडोनि अक्षरें केली तोंडपिटी । नलगे शेवटीं हातीं कांहीं ॥२॥ देव जोडे म्हणुन सांगितसे लोकां । माझा मीच देखा दुःख पावें ॥३॥ तुका म्हणे माझे गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥४॥

३८१०. आतां तरी मज सांगा साच भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ॥१॥ चुकलिया वर्म नव्हे तें कारण । केला होय शीण अवघाची ॥२॥ कळे म्हणोनियां करितों विवाद । दिसे भेदाभेद अंतरींचा ॥३॥ तुका म्हणे नको पाहों तूं निर्वाण । देईं कृपादान याचकासी ॥४॥

३८११. बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आम्ही अविश्वासी सर्वभावें ॥१॥ दंभें करूं भक्ति सोंग दाऊं जना । अंतरीं भावना वेगळाल्या ॥२॥ चित्ताचा तूं साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आतां पुढें ॥३॥ तुका म्हणे देवा तूं काय करिसी । कर्म दुस्तरासी आमुचिया ॥४॥

३८१२. नाम धारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥१॥ शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळ हेम ॥२॥ पर्जन्य वर्षतां जीवना वाहावट । तें समसकट गंगे मिळे ॥३॥ सर्व तें हें जाय गंगाचि होऊन । तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥४॥ महापुरीं जैसें जातसें उदक । मध्यें तें तारक नांव जैसी ॥५॥ तये नावेसंगें ब्राह्मण तरती । केवी ते बुडती अनामिक ॥६॥ नाना काष्ठजात पडतां हुताशनीं । ते जात होउनी एकरूप ॥७॥ तेथें निवडेना घुरे कीं चंदन । तैसा वर्णावर्ण

नामीं नाहीं ॥८॥ पूर्वानुवोळख तेंचि पैं मरण । जरि पावे जीवन नामामृत ॥९॥ नामामृतें झालें मुळीचें स्मरण । सहज साधन तुका म्हणे ॥१०॥

३८१३. कां हो पांडुरंगा न करा धांवणें । तरी मज कोणें सोडवावें ॥१॥ तुझा म्हणवूनि आणिकापें उभा । राहों हें तों शोभा नेदी आतां ॥२॥ काळें पुरविली पाठ दुर्धर । पुढें पाय स्थीर राहों नेदी ॥३॥ नको आणूं माझें संचित मानसीं । पावन आहेसी पतितां तूं ॥४॥ तुका म्हणे चाले आणिकांची सत्ता । तुज आठवितां नवल हें ॥५॥

३८१४. कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥१॥ गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणे ॥२॥ बकापुढें सांगे भावार्थें वचन । वाउगाचि शीण होय त्यासी ॥३॥ तुका म्हणे तैसे अभाविक जन । त्यांसी वायां शीण करूं नये ॥४॥

३८१५. न कळसी ध्याना न कळसी ज्ञाना । न कळसी दर्शना धुंडाळितां ॥१॥ न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा ब्रह्मादिकां ॥२॥ तुका म्हणे तुझा नाहीं अंतपार । म्हणोनि विचार पडिला मज ॥३॥

३८१६. मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥१॥ तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥२॥ मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥३॥ तुका म्हणे सांगों किती । बाप लेंकासी मारिती ॥४॥

३८१७. धन मेळउनी कोटी । सवें नये रे लंगोटी ॥१॥ पानें खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंड ॥२॥ पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगातीं ॥३॥ तुका म्हणे राम । येक विसरतां श्रम ॥४॥

३८१८. विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसी दातारा पांडुरंगा ॥१॥ तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें । आतां नव्हे भलें मोकलितां ॥२॥ माझे गुण दोष कोण जाणे मात । पावन पतित नाम तुझें ॥३॥ लोभ मोह माया आम्हा बाधवितां । तरी हा अनंता बोल कोणा ॥४॥ तुका म्हणे मी तों पतितचि खरा । परी आलों दातारा शरण तुज ॥५॥

३८१९. त्राहे त्राहे त्राहे आतां सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे

पाई ॥१॥ येकचि मागणें देईं तुझी गोडी । न लावी आवडी आणिकांची ॥२॥ तुझे गुण नाम वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगी ॥३॥ बापा विठ्ठलराया हेंचि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ॥४॥ आवडी-सारिखें मागितलें जरी । तुका म्हणे करीं समाधान ॥५॥

३८२०. सुरगणीबाई थिता नाश केला । गुळ तो घातला भाजीमध्यें ॥१॥ क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ । तिर्थेंचि वोंगळ नाश केला ॥२॥ हिरियाचे पेठे आणियेल्या गारा । खांदीं शिरीं भारा व्यर्थ वाहे ॥३॥ दळण दळुनी भरियेली पाळी । भरडोनि वोंगळी नाश केला ॥४॥ कापुराचे सांते आणिला लसूण । वागवितां शीण दुःख होय ॥५॥ रत्नाचा जोहरी रत्नचि पारखी । येर देखोवेखीं हातीं घेती ॥६॥ तुका म्हणे जरी योग घडे निका । न घडतां थुंका तोंडावरी ॥७॥

३८२१. बाप माझा दिनानाथ । वाट भक्तांची पाहात ॥१॥ कर ठेवू-नियां कटीं । उभा भिवरेच्या तटीं ॥२॥ गळां वैजयंती माळा । रूप सुंदर सांवळा ॥३॥ तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥४॥

३८२२. माझें जीवन तुझे पाय । कृपाळू तूं माझी माय ॥१॥ नेदीं दिसों केविलवाणें । पांडुरंगा तुझें तान्हें ॥२॥ जन्ममरण तुजसाठीं । आणिक नेणें दुजी गोष्टी ॥३॥ तुका म्हणे तुजविण । कोण हरील माझा शीण ॥४॥

३८२३. कां रे प्रेमें मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥१॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ॥२॥ युगें झालीं अठ्ठावीस । आझुनि न म्हणसी बैस ॥३॥ भाव देखोनि निकट । देवें सांडियलें वैकुंठ ॥४॥ तुका म्हणे पुंडलिका । तूंचि भक्त बळिया निका ॥५॥

३८२४. तुज पाहातां सामोरी । दृष्टि न फिरे माघारी ॥१॥ माझें चित्त तुझे पायां । मिठी पडली पंढरिराया ॥२॥ नव्हे सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ॥३॥ तुका म्हणे बळी । जीव दिल्हा पायांतळीं ॥४॥

३८२५. उपदेश किती करावा खळासी । नावडे तयासी बरवें कांहीं ॥१॥ शुद्ध कां वासना नव्हे चांडाळाची । होळी संचिताची केली तेणें ॥२॥ नाहीं भाव मनीं नायके वचन । आपल्या आपण नाडियेलें ॥३॥ तुका

म्हणे त्यासी काय व्याली रांड । करितो बडबड रात्रंदिवस ॥४॥

३८२६. समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आलियाची लागे चिंता ॥१॥ न पाहे त्याचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचें ॥२॥ मान भलेपण नाहीं फुकासाठीं । जयावरी गांठी झीज साहे ॥३॥ तुका म्हणे हें तूं सर्वहि जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥४॥

३८२७. आनंदें कीर्तन कथा करीं घोष । आवडीचा रस प्रेमसुख ॥१॥ मज या आवडे वैष्णवांचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळाचा ॥२॥ स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका । रामकृष्ण सखा नारायण ॥३॥ विचारितां दुजें मना वाटे लाज । उपदेश काज आन नाहीं ॥४॥ तुका म्हणे मन रंगलेंसे ठाईं । माझें तुझ्या पाईं पांडुरंगा ॥५॥

३८२८. आतां पाहासील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥१॥ करीं अंगिकार राखें पायांपासीं । झणीं दिसों देसी केविलवाणें ॥२॥ नाहीं आईकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥३॥ तुका म्हणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥४॥

३८२९. होईल तो भोग भोगीन आपुला । न घालीं विठ्ठला भार तुज ॥१॥ तुम्हांपासाव हें इच्छितसे दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम ॥२॥ न ये काकुळती गर्भवासासाठीं । न धरीं हे पोटीं भय कांहीं ॥३॥ तुका म्हणे मज उदंड येवढें । नाचेन मी पुढें मायबापा ॥४॥

३८३०. माझा तों स्वभाव आहे अनावर । तुज देतां भार काय नव्हे ॥१॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृती स्वपना ताळ नाहीं ॥२॥ संपादिला तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥३॥ तुका म्हणे सत्या नाहीं पाठी पोट । आहे ते निघोट येक जाती ॥४॥

३८३१. करावा संकोच चित्ताचि भोवता । होय तें बहुतां सुख कीजे ॥१॥ देवाची पूजा हें भूतांचें पाळण । मत्सर तो शीण बहुतांचा ॥२॥ रुसावें फुगावें आपुलियावरी । उरला तो हरी सकळही ॥३॥ तुका म्हणे संतपण याचें नांव । जरी होय जीव सकळांचा ॥४॥

३८३२. नाहीं जप तप जीवासी आटणी । मनासी दाटणी नाहीं केली

॥१॥ निजलिया ठाईं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा तुज माझें ॥२॥ नाहीं आणूनियां समर्पीलें जळ । मेवा ते केवळ चिंतनाची ॥३॥ तुका म्हणे आम्ही वेंचलीं उत्तरें । घेतलीं उदारें मायबापें ॥४॥

३८३३. देह तंव आहे प्रारब्धा आधीन । याचा मी कां शीण वाहों भार ॥१॥ सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥२॥ लाभ तो न दिसे याहुनी दुसरा । आणिक दातारा येणें जन्में ॥३॥ तुका म्हणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा ॥४॥

३८३४. सकळ तुझे पाईं मानिला विश्वास । न करीं उदास मज आतां ॥१॥ वाचे गातां गोड ऐकतां तो कानीं । पाहतां लोचनीं मूर्ती तुझी ॥२॥ मन स्थीर माझें झालेसें निश्चळ । वारील सकळ आशापाश ॥३॥ जन्म जरा व्याधी निवारलें दुःख । वोसंडलें सुख प्रेम धरी ॥४॥ तुका म्हणे मज झाला हा निरधार । आतां वायां फार काय बोलों ॥५॥

३८३५. नये माझा तुम्हां होऊं शब्दस्पर्श । विप्र तुम्ही विद्वांस ब्राह्मणांसी ॥१॥ म्हणउनि तुम्हां करितों विनंती । द्यावें शेष हातीं उरलें तें ॥२॥ वेदीं कर्म जैसें बोलिलें विहीत । करावें तें नित्य विचारूनी ॥३॥ तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ॥४॥

३८३६. बहुत असती मागें सुखीं केलीं । अनाथा माउली जिवाची तूं ॥१॥ माझिया संकटा न धरीं आळस । लाउनियां कास पार पावीं ॥२॥ कृपावंता करा ज्याचा अंगीकार । तया संवसार नाहीं पुन्हां ॥३॥ विचारितां नाहीं दुजा बळीवंत । ऐसा सवगत व्यापी कोणी ॥४॥ म्हणवुनी दिला मुळीं जीवभाव । देह केला वाव समाधिस्थ ॥५॥ तुका म्हणे नाहीं जाणत आणीक । तुजविण येक पांडुरंगा ॥६॥

३८३७. आम्हां देणें घेणें सांगणें तें कानीं । चिंता पाय मनीं विठोबाचे ॥१॥ तेणें माझ्या चित्ता होय समाधान । विलास मिष्टान्न न लगे सोनें ॥२॥ व्रत येकादशी दारीं वृंदावन । कंठीं कटिल्या रे लेणें तुळशीमाळा ॥३॥ तुका म्हणे त्याची चवी जीवीं उराफीं । मज ते दिवाळी दसरा सण ॥४॥

३८३८. आवडी धरूनी आलेतों आकारा । केला हा पसारा जयासाठीं

॥१॥ तें मी तुझें नाम गाईन आवडी । क्षण येक घडी विसंबेना ॥२॥ वर्म जाणावें हें मुख्य धर्मसार । अवघे प्रकार तया पोटीं ॥३॥ वेगळ्या विच्यारें वेगळाले भाव । धरायासी ठाव बहु नाहीं ॥४॥ तुका म्हणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवळुनी धाकुटी मूर्ती जीवें ॥५॥

३८३९. भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करूनि देवें आश्वासिजे ॥१॥ देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें हीं दातारें निववावीं ॥२॥ अमृताची वृष्टी घालूनियां वरी । शीतळ हा करीं जीव माझा ॥३॥ घेईं उचलोनि पुसे तान भूक । पुसे माझें मुख पीतांबरें ॥४॥ बैसोनियां माझी धरी हनुवटी । वोवाळुनी दिठी करूनि सांडी ॥५॥ तुका म्हणे बापा अहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥६॥

३८४०. न सरे लुटितां मागें बहुता जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥१॥ ऋषी मुनी सिद्ध साधक संपन्न । तिंहीं हें जतन केलें होतें ॥२॥ पायाळाच्या गुणें पडिलें ठाउकें । जगा पुंडलिकें दाखविलें ॥३॥ तुका म्हणे तेथें होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहु ॥४॥

३८४१. भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥१॥ वाढऊनि जटा फिरे दाही दिशा । तरी जंबुवेशा सहज स्थिती ॥२॥ कोरुनियां भूमि मध्यें करी वास । तरी उंदिरास काय वाणी ॥३॥ तुका म्हणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंची ॥४॥

३८४२. धन्य दिवस आजि डोळीयां लाधला । आनंद देखिला धणी-वरी ॥१॥ धन्य झालें मुख रंगली रसना । नाम नारायणा घोष करी ॥२॥ धन्य हें मस्तक सर्वांग शोभलें । संतांचीं पाउलें लागताती ॥३॥ धन्य आजि पंथ चालतीं पाउलें । टाळिया शोभले कर दोन्ही ॥४॥ धन्य तुका म्हणे आम्हांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥५॥

३८४३. बरवी हे वेळ सांपडली संधी । साह्य झाली बुद्धी संचिताची ॥१॥ येणें पंथें माझीं चाललीं पाउलें । दरुशन झालें संतां पाईं ॥२॥ त्रासिलें दरिद्रें दोषा झाला खंड । त्याचि काळें पिंड पुनित झाला ॥३॥ तुका म्हणे झाला अवघा व्यापार । आली येरझार फळासी हे ॥४॥

३८४४. आपणा लागे काम वाण्याघरीं गूळ । त्याचें याति कूळ काय कीजे ॥१॥ उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठाया गुणें ॥२॥ गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तिचें दुध काय सेऊं नये ॥३॥ तुका म्हणे काय सालपटासी काज । फणसांतील बीज काढुन घ्यावें ॥४॥

३८४५. जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरींचा ॥१॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ॥२॥ मंजुळ वदनीं बचनागाची कांडी । शेवटींची घडी जीवप्राणा ॥३॥ तुका म्हणे त्याचा पिता नाहीं शुद्ध । तयामधीं गोविंद अंतरला ॥४॥

३८४६. वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥१॥ तेचि शब्द झणी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥२॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेउनियां तृप्त कोण झाला ॥३॥ कागदीं लिहितां नांवाची साखर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥४॥ तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं निसुगाला ॥५॥

३८४७. झुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां देहें दुःख थोर आहे ॥१॥ तैसी हरिभक्ति शूळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥२॥ पिंड पोशिलीयां विषयाचा पाइक । वैकुंठनायक कैंचा तेथें ॥३॥ तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रखुमादेवीवर जोडावया ॥४॥

३८४८. अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळाचे ॥१॥ अंत्यजाची खिचडी घेताती मागून । गाळिया प्रदान मायबहिणी ॥२॥ उत्तम कुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडाविलें कुळ उभयतां ॥३॥ तुका म्हणे ऐसी कलियुगाची चाली । स्वार्थें बुडविलीं आचरणें ॥४॥

३८४९. पाषाण प्रतिमा सोन्याच्या पादुका । हें तों हातीं एका समर्थाचें ॥१॥ अनामिका हातीं समर्थाचा शिक्का । न मानितां लोकां येइल कळों ॥२॥ तुका म्हणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥३॥

३८५०. बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । टाकोनियां मनीं आला शीण ॥१॥ आतां पायांपासीं लपवावें देवा । नको पाहूं सेवा भक्ती माझी ॥२॥ बहु भय वाटे येकाच्या बोभाटें । आलिया घायवटे फिरोनियां ॥३॥

तुका म्हणे सिगें भरों आलें माप । वियोग संताप झाला तुझा ॥४॥

३८५१. धरोनियां मनीं बोलिलों संकल्प । होसील तरी बाप सिद्धी नेईं ॥१॥ उत्कंठा हे आजी जाली माझ्या पोटीं । मागील या गोष्टी टाळाटाळी ॥२॥ माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधी उत्तर न साहे पैं ॥३॥ तुका म्हणे तुज दिल्ही आठवण । तरी अभिमान धरीं माझा ॥४॥

३८५२. आजिवरी होतों संसाराचे हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥१॥ तुझा शरणागत व्हावें नारायणा । अंगीकारीं दीना आपुलीया ॥२॥ विसरलों काम याजसाठीं धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥३॥ तुका म्हणे विज्ञापना परिसावी । आवडे हे जीवीं झाली तैसी ॥४॥

३८५३. धन्यधन्य ज्यास पंढरीचा वास । धन्य ते जन्मास प्राणी आले ॥१॥ चहूं खाणीमध्यें होतां कोणी येक । क्रिमिर कीटक पक्षिराज ॥२॥ उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघे सकळ चतुर्भुज ॥३॥ अवघा विठ्ठल तेथें दुजे नाहीं । भरला अंतरबाहीं सदोदित ॥४॥ तुका म्हणे तेथें होउनि राहीन । सांडोवा पाषाण पंढरीचा ॥५॥

३८५४. असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनासी निष्ठुर अतिवादी ॥१॥ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखि यापरी आपेआप ॥२॥ संत ते समय वोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदा ॥३॥ तुका म्हणे हीत उचित अनुचित । मग लागे नित्य विचारावें ॥४॥

३८५५. विठ्ठला वांचून ब्रह्म जे बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥१॥ विठ्ठलावांचून जे जे उपासना । अवघाचि जाणा श्रमाचि तो ॥२॥ विठ्ठला-वांचूनि सांगतील गोष्टी । वायां ते हिंपुटी होती जाणा ॥३॥ विठ्ठलावांचूनि कांहीं जे जाणती । तितक्या वित्पत्ती वावुगीया ॥४॥ तुका म्हणे येक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाची ॥५॥

३८५६. सर्व काळ डोळां बैसो नारायण । नयो अभिमान आड पुढें ॥१॥ धाड पडो माझ्या थोरपणावरी । वाचे हरि हरि उच्चारीन ॥२॥ जळों अंतरींचें सर्व जाणपण । वेवादवचन अहंतेचें ॥३॥ सकळां चरणीं गळित माझा जीव । तुका म्हणे भाव येकविध ॥४॥

३८५७. मधुर उत्तरसवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड प्रेम असो ॥१॥ प्राणावेगळा न करीं नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥२॥ जननिंदा होय तो न करावा व्यापार । थोरविचा भार कामा नये ॥३॥ तुका म्हणे भाव निष्ठावंत चित्तीं । दया क्षमा शांती सर्व भूतीं ॥४॥

३८५८. झाडें वोरपोनि खावोनियां पाला । आठवीं विठ्ठला वेळोवेळां ॥१॥ वल्कलें नेसूनि चिंधिया वेढुनी । सांडी जवळुनी देहभान ॥२॥ लोकमान वमनासमान मानणें । येकांतीं राहणें विठोबासाठीं ॥३॥ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य येकांतवास ॥४॥ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥५॥

३८५९. भक्तिभावें करी बैसोनि निश्चिंत । नको गोऊं चित्त प्रपंचासी ॥१॥ येक दृढ करीं पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढिल सुचे ॥२॥ नको करूं कांहीं देवता पूजन । जप तप ध्यान तेंहि नको ॥३॥ मानसील झणी आपुलिया कांहीं । वेरझार पाईं न चुके कदा ॥४॥ ऐसे जन्म किती पावलासी देहीं । अझुनी कां नाहीं कळली सोय ॥५॥ सोय धरीं आतां होय तूं सावधान । अनुभव आनंद आहे कैसा ॥६॥ सहज कैसें आहे तेथींचें हें गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ॥७॥ तुका म्हणे आतां होईं तूं सावध । तोडीं भवबंध येका जन्में ॥८॥

३८६०. दोराचे आधारें पर्वत चढला । पाउलासी केला अपघात ॥१॥ अष्टोत्तरशें व्याधि वैद्य दवडुनी । तो वैद्य मारूनि उत्तीर्णता ॥२॥ नऊ मास माये वाहिलें उदरीं । ते माता चौबारी नग्न केली ॥३॥ गाइत्रीचें क्षीर पिळोनि घेवोनी । उपवासी बांधोनी ताडितसें ॥४॥ तुका म्हणे गुरु निंदकाचें तोंड । पाहातां नर्ककुंड पूर्वजांसी ॥५॥

३८६१. न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करीतसे ॥१॥ विश्वामित्रीं पोटीं तयाचा अवतार । नाम महा खर चांडाळाचें ॥२॥ द्रव्य इच्छेसाठीं करितसे कथा । काय त्या पापिष्टा न मिळे खाया ॥३॥ पोट पोसावया तोंडें बडबडी । नाहीं धडफुडी येकी गोष्टी ॥४॥ तुका म्हणे तया काय व्याली रांड । घेउनियां भांड जनामध्यें ॥५॥

३८६२. नित्य उठोनियां खावयाची चिंता । आपुल्या तूं हिता नाठविसी ॥१॥ जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥२॥ चातकांलागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥३॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरी । तयांलागीं हरि उपेक्षीना ॥४॥ तुका म्हणे भाव धरुनि राहें चित्तीं । तरी तो श्रीपति उपेक्षीना ॥५॥

३८६३. पूर्वीहुनि बहु भक्त सांभाळिले । नाहीं अव्हेरिले दास कोणी ॥१॥ जे जे शरण आले ते ते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ॥२॥ मिरवे चरणीं ब्रीद ऐसिया गोष्टीचें । भक्तसांभाळाचें प्रेम ऐसें ॥३॥ तुका म्हणे आम्हांसाठीं येणें रूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥४॥

३८६४. करुणा बहुत तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें ॥१॥ पक्षियासी तुझें नाम जें ठेविलें । तयें उद्धरिलें गणिकेसी ॥२॥ कुंटणी ते बहुदोष आचरली । नाम घेतां आली करुणा तुज ॥३॥ हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसें बहुत जनां तारियेलें ॥४॥ तुका म्हणे सीमा नाहीं तुझे दये । कोमळ हृदय पांडुरंगा ॥५॥

३८६५. अजामीळ अंत मरणासी आला । तोंवरी स्मरला नाहीं तुज ॥१॥ प्राण जाते वेळे म्हणे नारायणा । त्यासाठीं विमान पाठवीलें ॥२॥ बहुत कृपाळ होसी जगन्नाथा । त्रैलोक्यसमर्था सोयरीया ॥३॥ तुका म्हणे भक्तकाज तूं कैवारी । तुज साही चारी वर्णिताती ॥४॥

३८६६. धर्म रक्षावया अवतार घेसी । आपुल्या पाळिसी भक्तजना ॥१॥ अंबऋषीसाठीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळिले किती येक ॥२॥ धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तो बोल साच करी ॥३॥ तुका म्हणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधु ॥४॥

३८६७. येउनी जाउनी पाहे तुजकडे । पडिल्या सांकडें नारायणा ॥१॥ आणीक कोणाचा मज नाहीं आधार । तुजवरी भार जीवें भावें ॥२॥ निष्ठुर अथवा होई तूं कृपाळ । तुज सर्व काळ विसरेना ॥३॥ आपुलें वचन राहावें सांभाळून । तुम्हां आम्हां जाण पडीपाडूं ॥४॥ ज्याच्या वचनासी अंतर पडेल । बोल तो येईल तयाकडे ॥५॥ तुम्हां

आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥६॥

३८६८. ऐका नारायणा वचन माझें खरें । सांगतों निर्धारें तुजपासीं ॥१॥ नाहीं भाव मज पडिली लोकलाज । राहिलेंसे काज तुझे पाई ॥२॥ वरदळ भक्ति करितों मी नित्य । परी नाहीं चित्त तुझे पाई ॥३॥ जरी तुज कांहीं करणें उचित । तरी तूं पतित तुका म्हणे ॥४॥

३८६९. अनाथ परदेसी हीन दीन भोळें । उगलेचि लोळे तुझे रंगीं ॥१॥ आपुलें म्हणावें मज नुपेक्षावें । प्रेमसुख द्यावें मायबापा ॥२॥ कासवीचे परी पाहें दृष्टी मज । विज्ञानी उमज दाऊनियां ॥३॥ तुका म्हणे तुझे झाले शरणागत । काया वाचा चित्त दुजें नाहीं ॥४॥

३८७०. पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजी दिन सोनियाचा ॥१॥ पावलों पंढरी आनंदगजरें । वाजतील तुरे शंख भेरी ॥२॥ पावलों पंढरी क्षेम आलिंगनें । संत या सज्जनें निवविलों ॥३॥ पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥४॥ पावलों पंढरी वेरझार खुंटली । माउली वोळली प्रेमपान्हा ॥५॥ पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संवसार तुका म्हणे ॥६॥

३८७१. खिस्तीचा उदीम उदिमांत हीन । करिती ब्राम्हण कलीयुगीं ॥ ॥१॥ वेवसाव करितां पवेत मांगासी । ते पैं विटाळासी न मानिती ॥२॥ मांगणीसी नित्य करितसे लेखा । तोंडावरि थुंका पडतसे ॥३॥ आशा माया रांडा नाम हें कागदीं । आठवीना कधीं नारायणा ॥४॥ तुका म्हणे देह झाले पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥५॥

३८७२. तूं आम्हां सोयरा सज्जन सांगाती । तुज मज प्रीति चालो सदा ॥१॥ तूं माझा जिव्हाळा जीवींचा जिवलग । होशी अंतरंग अंतरींचा ॥२॥ गण गोत मित्र तूं माझें जीवन । अनन्य शरण तुझ्या पाई ॥३॥ तुका म्हणे सर्वगुणें तुझा दास । आवडे अभ्यास सदा तुझा ॥४॥

३८७३. आवडेल तैसें तुज आळवीन । वाटे समाधान जीवा तैसें ॥१॥ नाहीं येथें कांहीं लौकिकाची चाड । तुजविण गोड देवराया ॥२॥ पुरवीं मनोरथ अंतरींचे अर्थ । धायवरी गीत गाय तुझें ॥३॥ तुका म्हणे लोकीं

आळवी माहेरा । गाउं या संसारा तुज तैसें ॥४॥

३८७४. माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ रामकृष्ण ॥१॥ अबद्ध वाकुडें गाऊं भलतैसें । बाळ वदे जैसें मायबापा ॥२॥ तुका म्हणे मज न लवी वांकडे । मी तुझें बोवडे बाळ तान्हें ॥३॥

३८७५. यालागीं आवडी म्हणा रामकृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥१॥ सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरी ॥२॥ न लगती नष्ट न लगे सायाम । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥३॥ न लगे तप तीर्थ करणें महादान । केल्या येक मन जोडे हरी ॥४॥ तुका म्हणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ॥५॥

३८७६. पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयी आवडे गाणें त्याला ॥१॥ ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटी धन ॥२॥ वीतभर लंगोटी नेदी अतिताला । भोरपयांसी शाला वांटीतसे ॥३॥ तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥४॥

३८७७. क्षुधार्थी दुष्काळें अन्नें पिडियलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥१॥ तैसें तुझे पाईं लाचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥२॥ मांजरें देखिला लोणियाचा गोळा । लावूनियां डोळा बैसलेसें ॥३॥ तुका म्हणे आतां झड घालूं पाहे । पांडुरंग माये तुझे पायीं ॥४॥

३८७८. स्वामीस संकट पडे ज्या गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥१॥ दुखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागे ना तुजपासीं ॥२॥ रिद्धिसिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेले आस यांची जीवें ॥३॥ तुका म्हणे येके वेळे देईं भेटी । वोरसोनि पोटीं आलिंगावें ॥४॥

३८७९. देव तिंहीं बळें धरिला सायासें । करूनियां नाश उपाधीचा ॥१॥ पूर्वपक्षी धातु धिक्कारिले जन । स्वयं जनार्दन तेचि झाले ॥२॥ तुका म्हणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येईल कळों ॥३॥

३८८०. भेटी वांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुलती याजसाठीं ॥१॥ भेटोनियां बोले आवडीचें गुज । आनंदाच्या भोजें जेऊं संगें ॥२॥ मायलेकरांसी नाहीं दुजी परी । जेऊं बरोबरी बैसोनियां ॥३॥ तुका

म्हणे ऐसें अंतरींचे आर्त । यावें जी त्वरित नारायणा ॥४॥

३८८१. जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावेचिना ॥१॥ तुम्ही संत सारे कृपेचे सागर । निरोप हा फार सांगा देवा ॥२॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायांपें विठ्ठला ठेवीं मज ॥३॥ तुका म्हणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करी माझें ॥४॥

३८८२. त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥१॥ ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरी मिठी ॥२॥ कई तें सुंदर देखेन रुपडें । आवडीच्या कोडें आलिंगीन ॥३॥ नाहीं पूर्व पुण्य मज पामरासी । म्हणोनि पायांसीं अंतरलों ॥४॥ अलभ्य लाभ कैसा संचिता वेगळा । विनवी गोपाळा दास तुका ॥५॥

३८८३. मोलाचें आयुष्य वेंचोनियां जाय । पूर्वपुण्य होय लाभ त्याला ॥१॥ अनंतां जन्मींचा शेवटीं पाहातां । नरदेह हातां आला तुझ्या ॥२॥ कराल ते जोडी येईल कार्यासीं । घ्यावें विठ्ठलासी सुखालागीं ॥३॥ सांच-लिया धन होईल ठेवणें । तैसी नारायणा जोडी करा ॥४॥ करा हरिभक्ति परलोकीं कामा । सोडवील यमा पासुनीयां ॥५॥ तुका म्हणे करा आयुष्याचें मोल । नका वेंचूं बोल नामेंवीण ॥६॥

३८८४. काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरिनाथा कष्ट नाहीं ॥१॥ रामकृष्ण रसीं रसना रंगली । अमृत उकळी नाम तुझें ॥२॥ सर्वकाळ वाचे उच्चारितां हरी । तया सुखासरी पार नाहीं ॥३॥ तुका म्हणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥४॥

३८८५. कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं असे ॥१॥ भक्त जाय सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडतसे ॥२॥ त्रैलोकीं भ्रमण करीत नारद । त्यासंगें गोविंद फिरतसे ॥३॥ नारद मंजुळ सुस्वरें गीत गाय । मार्गीं चालताहे सवें हरी ॥४॥ तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐशी ॥५॥

३८८६. बाळ मायेविण क्षणभरी न राहे । न देखतां होय कासा-वीस ॥१॥ आणिक उदंड बुझाविती जरी । छंद त्या अंतरीं माउलीचा ॥२॥

नावडती तया बोल आणिकांचे । देखोनियां नाचे माय दृष्टी ॥३॥ तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । आणिकांचे बोलीं चाड नाहीं ॥४॥

३८८७. हरिचिया भक्ता नाहीं भय चिंता । दुःख निवारीता नारायण ॥१॥ न लगे वाहाणें संसार उद्वेग । जडों नेदी पांग देवराव ॥२॥ असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥३॥ तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें येक ॥४॥

३८८८. दसरा दिवाळी तोचि माझा सण । सखे हरिजन भेटतील ॥१॥ अमुप जोडिल्या पुण्याचिया राशी । पार त्या भाग्यासी नाहीं लेखा ॥२॥ धन्य दिवस आजी झाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ॥३॥ तुका म्हणे काय होऊं उतराई । जीव ठेऊं पाई संतांचिये ॥४॥

३८८९. हाचि माझा नेम धरियेला धंदा । यावरि गोविंदा भेटी द्यावी ॥१॥ हाचि माझा ध्यास सदा सर्वकाळ । न्यावयासी मूळ येसी कधीं ॥२॥ डोळियांची भूक पाहातां श्रीमुख । आलिंगनें सुख निवती भुजा ॥३॥ बहु चित्त वोढे तयाचिये सोई । पुरला हा काई नवस नेणें ॥४॥ बहुबहु काळ झालों कासावीस । वाहिलें बहुवस कलेवर ॥५॥ तुका म्हणे आतां पडावें हें ओझें । पांडुरंगा माझें इयावरी ॥६॥

३८९०. जेणें माझें हित होइल तो उपाव । करिसील भाव जाणोनियां ॥१॥ मज नाहीं सुख दुःख तया खंती । भावना हे चित्तीं नानाछंदें ॥२॥ तोडीं हे संबंध तोडीं आशापाश । मज हो सायास न करितां ॥३॥ तुका म्हणे मी तों राहिलों निश्चिंत । कवळोनि येकांत सुख तुझें ॥४॥

३८९१. शिखा सूत्र तुझा गुंतला जमान । तंवरी तूं जाण श्रुतिदास ॥१॥ त्याची तुज कांहीं चुकतांचि नीत । होसील पतित नर्कवासी ॥२॥ बहु तूं झालासी चतुर ब्राह्मण । शुद्र आचरणा चुकों नको ॥३॥ शिखा सूत्र याचा तोडीं तूं संबंध । मग तुज बाध नाहीं नाहीं ॥४॥ तुका म्हणे तरी वर्तूनि निराळा । उमटती कळा ब्रह्मींचिया ॥५॥

३८९२. पतिव्रता ऐसी जगामध्यें मात । भोगी पांच सात अंधारीं ते ॥१॥ भ्रताराशि लेखी श्वानाचे समान । परपुरुषीं जाण संभ्रम तो ॥२॥

तुका म्हणे तिच्या दोषा नाहीं पार । भोगील अघोर कुंभीपाक ॥३॥

३८९३. सिंदळीस नाहीं पोगाची पैं आस । राहे बीज त्यास काय करी ॥१॥ अथवा शेतीं बीज पेरिलें भाजून । सारा देईल कोण काका त्याचा ॥२॥ तुका म्हणे नाहीं राखायाची चाड । तरी कां लिगाड करुनी घेतो ॥३॥

३८९४. संसारा आलीया येक सुख आहे । आठवावे पाय विठोबाचे ॥१॥ येणें होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश कांहीं ॥२॥ घेतील तयांसि सोपें आहे सुखें । बोलियेलें मुखें नारायण ॥३॥ सांगितली सोय करुणासागरें । तुम्हां कां हो बरें न वाटे तें ॥४॥ तुका म्हणे तेणें उपकार केला । भोळ्या भाविकांला तरावया ॥५॥

३८९५. चाले हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवीते हरीवीण ॥१॥ देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नका ॥२॥ मानसाची देव चालवी अहंता । मीच येक कर्ता म्हणों नये ॥३॥ वृक्षाचीं हीं पानें हालें त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥४॥ तुका म्हणे विठो भरला सबाह्य । उणें काय आहे चराचरीं ॥५॥

३८९६. मायरूपें ऐसें मोहियेले जन । भोगिती पतन नाना कर्में ॥१॥ काय याची प्रीति करितां आदर । दुरावितां दूर तेचि भले ॥२॥ नाना छंदें अंगीं बैसतीं विकार । छळियेले फार तपोनिधी ॥३॥ तुका म्हणे ऐसें शिकवितों तुज । आतां धरीं लाज मनापुढें ॥४॥

३८९७. जे जे कांहीं मज होईल वासना । ते ते नारायणा व्हावें तुम्हीं ॥१॥ काय भाव येक चिवडूं निराळा । जाणसि तूं कळा अंतरींची ॥२॥ तुजविण मज कोण आहे सखा । जो सांगों आणिकां जीवभाव ॥३॥ अवघें पिशून झालें असे जन । आपपर कोण नाठवे हें ॥४॥ तुका म्हणे तूंचि जीवाचें जीवन । माझें समाधान तुझे हातीं ॥५॥

३८९८. कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शब्दज्ञानें देवा नास केला ॥१॥ आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न सांगतां बुडों पाहे ॥२॥ संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासी म्हणति येक

॥३॥ बुडविली भक्ति म्हणति पाषाण । पिंडाचें पाळण स्थापूनियां ॥४॥ न करावी कथा म्हणती येकादशी । भजनाची नाशी मांडियेली ॥५॥ न जावें देऊळा म्हणती देव घरीं । बुडविलें यापरी तुका म्हणे ॥६॥

३८९९. नमो नमो तुज माझें हें करणें । काय झालें उणें करितां स्थान ॥१॥ संतांचा मारग चालतो झाडूनी । हो का लाभ हानी कांहीं तरी ॥२॥ न करशील तरी हेंचि कोडें मज । भक्ति गोड काज आणीक नाहीं ॥३॥ करीं सेवा कथा नाचेन रंगणीं । प्रेमसुखधणी पुरेल तों ॥४॥ महाद्वारीं सुख वैष्णवांच्या मेळीं । वैकुंठ जवळी वसे तेथें ॥५॥ तुका म्हणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि मज गोड जन्म घेतां ॥६॥

३९००. होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयाची ॥१॥ निंदिती कदान्न इच्छीती देव्यान्न । पाहताती मान आदराचा ॥२॥ तुका म्हणे ऐसे दांभिक भजन । तयां जनार्दन भेटे केवीं ॥३॥

३९०१. लांबऊनि जटा नेसोनि कांसोटा । अभिमान मोठा करिताती ॥१॥ सर्वांगा करिती विभूति लेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥२॥ तुका म्हणे त्याचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥३॥

३९०२. कान फाडोनियां मुद्रा ते घालिती । नाथ म्हणविती जगामाजी ॥१॥ घालुनियां फेरा मागती द्रव्यासी । परी शंकरासी नोळखती ॥२॥ पोट भगवया शिकती उपाय । तुका म्हणे जाय नरकलोका ॥३॥

३९०३. कौडीकौडीसाठीं फोडिताती शीर । काढूनि रुधिर मलंग ते ॥१॥ पांघुरती चर्में लोहाची सांकळी । मागती आरोळी धैर्यबळें ॥२॥ तुका म्हणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळे तें वर्म गोविंदाचें ॥३॥

३९०४. दाढी डोई मुंडी मुंडुनियां सर्व । पांघुरती बरवीं वस्त्रें काळीं ॥१॥ उफराटी काठी घेउनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रांसी ॥२॥ चाळउनी रांडा देउनियां भेप । तुका म्हणे त्यास यम दंडी ॥३॥

३९०५. होउनी जंगम विभूति लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥१॥ शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ॥२॥ तुका म्हणे त्यासी नाहीं शिवभक्ती । व्यापार करिती संसाराचा ॥३॥

३९०६. लावोनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥१॥ नेसोनियां कौपीन शुभ्र वस्त्र जाण । पाहाती पक्कान्न क्षेत्रींचें तें ॥२॥ तुका म्हणे ऐसे मात्रेचे मईद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥३॥

३९०७. ऐसे नाना भेष घेउनि हिंडती । पोटासाठीं घेती प्रतिग्रह ॥१॥ परमार्थासी कोण त्यजी संवसार । सांगवां साचार नाम त्याचें ॥२॥ जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कलंक तुका म्हणे ॥३॥

३९०८. स्त्रिया पुत्र कलत्र हे तों मायावंत । शेवटीचा अंत नाहीं कोणी ॥१॥ यमाचिये हातीं बांधोनियां देती । भूषणेंही घेती काढोनियां ॥२॥ ऐसीया चोराचा कैसा हा विश्वास । धरिली तुझी कांस तुका म्हणे ॥३॥

३९०९. नलगे तें मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचोनियां ॥१॥ म्हणउनी तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणीकांचें ॥२॥ काय तें महत्त्व करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे तूज भेटल्यावांचून । न राहें याहुन होईन वेडा ॥४॥

३९१०. तुका म्हणवोनी दिसतों गा दीन । हाचि अभिमान सरे तुझां ॥१॥ अज्ञान बालका कोपली जननी । तयासी निर्वाणीं कोण पावे ॥२॥ तैसा विठा तुजवीण परदेशी । नको या दुःखासीं गोऊं मज ॥३॥ तुका म्हणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥४॥

३९११. जन्म मृत्यु फार झाले माझ्या जीवा । ऐक माझा धांवा पांडुरंगा ॥१॥ शिणलों बहुत करितां येरझार । रखुमाईच्या वरा पावें वेगीं ॥२॥ तुका म्हणे तूं गा पतितपावन । घेईं माझा शीण जन्मांतर ॥३॥

३९१२. आतां माझ्या दुःखा कोण हो सांगाती । रखुमाईचा पती पावेचि ना ॥१॥ काय विधात्यानें घातलीसे रेखा । सुटका या दुःखा न होयेचि ॥२॥ तुका म्हणे माझी विसरू नका चिंता । अगा पंढरिनाथा पाव वेगीं ॥३॥

३९१३. पंढरिसी जावें ऐसें माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ॥१॥ न लगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्नीचिया ॥२॥ तुका म्हणे त्याचे पाहिलिया पाय । मग दुःख जाय सर्व माझें ॥३॥

३९१४. तन मन धन दिल्हें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥१॥ आर्त चाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥२॥ तुका म्हणे येक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ॥३॥

३९१५. आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥१॥ देह हें काळाचें धन कुबेराचें । येथें मनुष्याचें काय आहे ॥२॥ देता देवविता नेता नेवविता । येथें याची म्हणोनि सत्ता काय आहे ॥३॥ निमित्याचा धणी केला आहे असे प्राणी । तुका म्हणे म्हणोनि व्यर्थ गेला ॥४॥

३९१६. माहेवणी घाल्या धाय । गर्भ आंवतणें न पाहे ॥१॥ तैसे पूजितां वैष्णव । सुख संतोषतो देव ॥२॥ पुत्राच्या विजयें । पिता सुखावत जाय ॥३॥ तुका म्हणे अमृतसिद्धी । हरे तृषा आणि व्याधी ॥४॥

३९१७. तुझें अंगभूत । आम्ही जाणतों समस्त ॥१॥ येरा वाटतसे जना । गुढारसें नारायणा ॥२॥ ठावा थारा मारा । घरचिया संव चोरा ॥३॥ तुका म्हणे भेदाभेद । करुनि करीतसे वाद ॥४॥

३९१८. तुज दिल्हा देह । अझुनी वागवितों भय ॥१॥ ऐसा विश्वास घातकी । गडली कळतां हे चुकी ॥२॥ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभविलें लंडें ॥३॥ दंड लाहे केला । तुका म्हणे जी विठ्ठला ॥४॥

३९१९. सर्वस्वाची साटी । तरिच देवासवें गांठीं ॥१॥ नाहीं तरी जया तैसा । भोग भोगवील इच्छा ॥२॥ द्यावें तेंचि घ्यावें । म्हणउनि जीवें जावें ॥३॥ तुका म्हणे उरी । मागें नुरवितां बरी ॥४॥

३९२०. गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥१॥ त्याचें भुंकणें न राहे । स्वभावासी करील काय ॥२॥ श्वान शिबिके बैसविलें । भुंकतां न राहे तें उगलें ॥३॥ तुका म्हणे स्वभावकर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ॥४॥

३९२१. आवडे सकळां मिष्टान्न । रोग्या विषा तें समान ॥१॥ काय तया येका साठीं । कामें केलीं अवघीं खोटीं ॥२॥ दर्पण नावडे येका । ठाव नाहीं ज्याचा नाका ॥३॥ तुका म्हणे खळा । उपदेशाचा तो कंटाळा ॥४॥

३९२२. अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धी ॥१॥ काय म्हणावें

तयासी । तो केवळ पापरासी ॥२॥ जो स्मरे रामनामा । त्यासी म्हणतो रिकामा ॥३॥ तीर्थे व्रतें करी । त्यासी म्हणती भिकारी ॥४॥ तुका म्हणे विंचाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ॥५॥

३९२३. या रे नाचों अवघेजण । भावें आनंदें करून ॥१॥ गाऊं पंढरीचा राणा । क्षेम देऊं संतजना ॥२॥ सुखं फुकासाठीं । साधे हरिनाम बोभाटीं ॥३॥ प्रेम वाटितो उदार । देतां नाहीं साना थोर ॥४॥ पापें पळालीं बापुडीं । काळ झाला देशोधडी ॥५॥ तुका म्हणे धन्य काळ । आजि प्रेमाचा सुकाळ ॥६॥

३९२४. उपजलें मनीं । हे तों स्वामीची करणी ॥१॥ होईल प्रसादाचें दान । तरि हें कवतुक पाहेन ॥२॥ येईल अभय जरी । तरी हे आज्ञा वंदिन शिरीं ॥३॥ भक्ति प्रयोजना । प्रयोजावें बंदीजना ॥४॥ यश स्वामीचिया शिरीं । दास्य करावें किंकरीं ॥५॥ तुका म्हणे आळीकरा । त्यासी योजावें उत्तरा ॥६॥

३९२५. माझें मन पाहे कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥१॥ कापून देईन शीर । पाहा कृपण कीं उदार ॥२॥ मजवरि घालीं घण । परि मी न सोडीं चरण ॥३॥ तुका म्हणे अंतीं । तुजवांचुन नाहीं गती ॥४॥

३९२६. भूमीवरी कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥१॥ सुखें नाचों हो कीर्तनीं । जयजयकारें गर्जो वाणी ॥२॥ काळा सुटे पळ । जाति दुरितें सकळ ॥३॥ तुका म्हणे चित्तीं । साच माना हें निश्चिती ॥४॥

३९२७. झाला जीवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥१॥ करीन आडक्या घोंगडें । उभें बाजारीं रोकडें ॥२॥ जों जों धरिली भीड । तों तों बहु केली चीड ॥३॥ तुका म्हणे मूळ । तुझें उच्चारीन कूळ ॥४॥

३९२८. मिळे हरिदासांची दाटी । रीग न होय शेवटीं ॥१॥ तेथें काय म्यां करावें । माझें कोणीं आईकावें ॥२॥ कैसें तुज लाजवावें । भक्त म्हणोनियां भावें ॥३॥ नाचतां नये टाळीं । वाजवितां नये टाळी ॥४॥ अति मंडित भूषणें । शरीर माझें दैन्यवाणें ॥५॥ तुका म्हणे कमळापति । मज द्यावें त्यांचे हातीं ॥६॥

३९२९. जाणों नेणों काय । चित्तीं धरूं तुझे पाय ॥१॥ आतां हेंचि वर्म । गाऊं धरूनियां प्रेम ॥२॥ काय सांडूं मांडूं । भावें हृदईंच कोंडूं ॥३॥ तुका म्हणे देवा । जन्मोजन्मीं मागें सेवा ॥४॥

३९३०. जाळें घातलें सागरीं । बिंदु न राहे भीतरीं ॥१॥ तैसें पापियाचें मन । तया नावडे कीर्तन ॥२॥ गाढव गंगेसी नाहाणिलें । जाउनि उकरड्यावरि लोळे ॥३॥ प्रीति पोसिले काउळे । जाउनि विष्ठेवरि लोळे ॥४॥ तुका म्हणे तैसें हरी । किरव्या नावडे कस्तुरी ॥५॥

३९३१. तरलों म्हणउनि धरिला ताठा । त्यासी चळ झाला फांटा ॥१॥ वायांविण तुटे दोड । मान सुख इच्छी भांड ॥२॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली सतत ॥३॥ तुका म्हणे ऐसीं किती । नर्का गेलीं अधोगती ॥४॥

३९३२. कठिण नारळाचें अंग । बाहेर भीतरी तें चांग ॥१॥ तैसा करीं कां विचार । शुद्ध कारण अंतर ॥२॥ वरि कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥३॥ मिठें रुचविलें अन्न । नये संतत कारण ॥४॥ ऊंस बाहेर दिसे काळा । आंत रसाचा आगळा ॥५॥ तुका म्हणे मोल गोडी । काय चाड वरिल्या खोडी ॥६॥

३९३३. ज्याची जया आस । त्या जवळी त्याचा वास ॥१॥ येर जवळी ते दूरी । धेनु वत्स सांडी घरीं ॥२॥ गोडी प्रियापासीं । सुख उपजे येरासी ॥३॥ तुका म्हणे बोल । घडे तया ठाईं मोल ॥४॥

३९३४. बाळ माते निष्ठुर होय । परि ते स्नेह करीत आहे ॥१॥ तैसा तूं या पुरुषोत्तमा । घडी न विसंबसि आम्हां ॥२॥ नेणती भागली । कडे घेतां अंग घाली ॥३॥ भूक साहे ताहान । त्याचें राखे समाधान ॥४॥ त्याच्या दुःखें धाय । आपुला जीव देऊं पाहे ॥५॥ नांवें घाली उडी । तुका म्हणे प्राण काढी ॥६॥

३९३५. दाता लक्षुमीचा पती । माझें मागणें तें किती ॥१॥ जाणे तान्हेल्याची ताहान । पीतां गंगा नव्हे न्यून ॥२॥ कल्पतरु झाला देता । तेथें पोटाचा मागता ॥३॥ तुका म्हणे संतां ध्यातां । परब्रह्मचि आलें हातां ॥४॥

३९३६. कुरवंडी करीन काया । वरी पायां गोजरिया ॥१॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥२॥ परतें न सरवे दुरी । आवडी पुरी बैसली ॥३॥ तुका म्हणे विसावलों । येथें धालों धणीवरी ॥४॥

३९३७. साधनाचे कष्ट मोठे । भय वाटे थोर हें ॥१॥ सुखें गावें भावें गीत । सर्वहित बैसलिया ॥२॥ दासां नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥३॥ तुका म्हणे आत्मनिष्ठा । भोगें चेष्टा मनाची ॥४॥

३९३८. घेतां आणिकांचा जीव । तेव्हां कींव कराना ॥१॥ आपलें तें वरदळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥२॥ सेवा तरी इच्छा सांग । चोरिलें अंग साहेना ॥३॥ तुका म्हणे अरे धन्या । निसंतान्या विठोबा ॥४॥

३९३९. आम्हां केलें गुणवंत । तें उचित राखावें ॥१॥ तुम्हांसी तों चाड नाहीं । आणिका कांहीं सुखदुःखा ॥२॥ दासांचें तों देखों नये । उणें काय होईल तें ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरा । दृष्टी करा सामोरी ॥४॥

३९४०. अगत्य ज्या नरका जाणें । विट मानणें कीर्तनीं ॥१॥ नावडेसा झाला बाप । आलें पाप वस्तीसी ॥२॥ नारायण नाहीं वाचे । तें यमाचें आंदणें ॥३॥ तुका म्हणे अभक्तासी । माता दासी जग झोंडी ॥४॥

३९४१. पाहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥१॥ प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥२॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर झाले तरी ॥४॥

३९४२. जन्ममरणाची कायसी चिंता । तुझ्या शरणागता पंढरी-राया ॥१॥ वदनीं तुझें नाम अमृत संजीवनी । असतां चक्रपाणी भय काय ॥२॥ हृदईं तुझें रूप बिंबलें साकार । येथें कोण पाड संसाराचा ॥३॥ तुका म्हणे तुझ्या नामाची पाखर । असतां कळिकाळ पायांतळीं ॥४॥

३९४३. क्षमाशस्त्र जया नराचिये हातीं । दुष्ट तया प्रति काय करी ॥१॥ तृण नाहीं तेथें पडला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया ॥२॥ तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥३॥

३९४४. पानें जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या

ते ॥१॥ तमाखू वोढोनि काढील जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ॥२॥ कीर्तनीं बडबड करील जो कोणी । बेडुक होउनी येईल जन्मा ॥३॥ जयाचिये मनीं कथेचा कंटाळा । होती त्या चांडाळा बहु जाच ॥४॥ जाच होती पाठी उडती यमदंड । त्याचें काळें तोंड तुका म्हणे ॥५॥

३९४५. कामामध्यें काम । कांहीं म्हणा रामराम । जाइल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥१॥ कळों येईल अंतकाळीं । प्राण प्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडा पोरें सकळ ॥२॥ जीतां जीसी जैसा तैसा । पुढें आहे रे वोळसा । उगउनि फांसा । काय करणें तें करीं ॥३॥ केलें होय याचि जन्में । अवघें विठोबाचे नामें । तुका म्हणे कर्मे जाणोनियां तरती ॥४॥

३९४६. माउलीसी सांगे कोण । प्रेम वाढवी तान्हें ॥१॥ अंतरींचा कळवळा । करितसे प्रतिपाळा ॥२॥ मायबापाची उपमा । तुज देऊं मेघश्यामा ॥३॥ तेहि साजेना पाहातां । जिवलगा पंढरीनाथा ॥४॥ माय पाळी संसारीं । परलोकीं राहे दुरी ॥५॥ तैसा नव्हेसि अनंता । काळावरी तुझी सत्ता ॥६॥ तुका म्हणे नारायणा । तुज बहुत करुणा ॥७॥

३९४७. कोड आवडीचें । पुरवीना बाळकाचें ॥१॥ तेव्हां कैसी ते माउली । जाण कशासाठीं व्याली ॥२॥ वत्साचिये आशे । धेनु धांवेना वोरसे ॥३॥ तुका म्हणे घरीं । बाळ टाकिलें वानरीं ॥४॥

३९४८. अवघ्या पातकांची मी तों येक राशी । अवघा तूंचि होसी सर्वोत्तम ॥१॥ जैसा तैसा लागे करणें अंगिकार माझा । सर्व भार चालवणें ॥२॥ अवघेंचि मज गिळीयेलें काळें । अवघेंचि बळ तुझें अंगीं ॥३॥ तुका म्हणे आतां खुंटला उपाय । अवघेचि पाय तुझे मज ॥४॥

३९४९. सांवळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदईं माझ्या ॥१॥ आणिक कांहीं इच्छा आम्हां नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगे ॥२॥ जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आम्हांसी सहज द्यावें आतां ॥३॥ तुका म्हणे तुम्ही ऐसाजी दयाळ । धुंडाळितां सकळ नाहीं आम्हां ॥४॥

३९५०. भक्तावीण देवा आवडतें काई । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥१॥

नावडे वैकुंठ क्षीरींचा सागर । धरोनी अंतर राहे दासा ॥२॥ सर्वभावें त्याचें सर्वस्वहि गोड । तुळसीदळ कोड करुनी घ्यावें ॥३॥ सर्वस्वें तयाचा म्हणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ॥४॥ तुका म्हणे भक्ति-सुखाचा बांधला । आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥५॥

३९५१. हरि तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ॥१॥ आतां तरी विश्वास अखंड नामाचा । काया मनें वाचा देई हेंचि ॥२॥ तुका म्हणे आतां देई संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥३॥

३९५२. करणें तें हेंचि करा । नरका घोरा कां जातां ॥१॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें येक ॥२॥ शरणागतां देव राखे । येरा वाखे विघ्नाचे ॥३॥ तुका म्हणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥४॥

३९५३. आणीक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा वरपडे ॥१॥ सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ॥२॥ अनाथाचा नाथ देव । अनुभव सत्य हा ॥३॥ तुका म्हणे बहुतां रीती । धरा चित्तीं सकळ ॥४॥

३९५४. सेट्या ना चौधरी । पांडेपण वाहे शिरीं ॥१॥ जकातीचा धंदा । तेथें पाप वसे सदा ॥२॥ गाई म्हैसी हेड । तूप विक्री महा द्वाड ॥३॥ तुका म्हणे पाहीं । तेथें पुण्या रिघे नाहीं ॥४॥

३९५५. मागें बहुत झाले खेळ । आतां बळ वोसरलें ॥१॥ हालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ॥२॥ भाजल्याची दिसे घडी । पट वोढी न साहे ॥३॥ तुका म्हणे पाहतां घडी । जगा जोडी अंगारा ॥४॥

३९५६. आळस आला अंगा । धांव घालीं पांडुरंगा ॥१॥ सोसं शरीराचे भाव । पडती अवगुणाचे घाव ॥२॥ करावी ते वेसनें । दुरी येउनि नारायणें ॥३॥ जवळील दुरी । झालों देवा धरीं करीं ॥४॥ म्हणउनि देवा । वेळोवेळां करीं धांवा ॥५॥ तुका म्हणे पांडुरंगा । दुरी धरूं नको अंगा ॥६॥

३९५७. झाविली महारें । त्याची व्याली असे पोरें ॥१॥ करी संतांचा मत्सर । कोपें उभारुनी कर ॥२॥ बीज तैसीं फळें । वरी आली अमंगळें ॥३॥ तुका म्हणे ठावें । ऐसें झालें अनुभवें ॥४॥

३९५८. जे जे वाहावें संकल्प । तेचि पुण्य होय पाप ॥१॥ कारण तें मनापासीं । मेळविल्या मिळे रसीं ॥२॥ सांडी मांडी हाली चाली । राहे बरी भली बोली ॥३॥ तुका म्हणे सार । नांव जीवनाचे सागर ॥४॥

३९५९. भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग । इंद्रियाचा लाग । आम्हांवरूनि चुकला ॥१॥ करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥२॥ तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंचीं चारा धरी । आणुनियां घरीं । मुखीं घाली बाळका ॥३॥ तुका म्हणे ये आवडी । आम्ही पाई दिली बुडी । आहे तेथें जोडी । जन्मांतरींचें ठेवणें ॥४॥

३९६०. कुंकवाची ठेवाठेवी । बोडक्या देवी कशाला ॥१॥ दिवस गमा भरा पोट । कां गे नट नटावा ॥२॥ दिमाख हा कोणा दावा । लटकी जीवा चरफड ॥३॥ तुका म्हणे झोंडगा हो । फुंदा कां हो कोरडी ॥४॥

३९६१. आम्ही आयते जेवणार । न लगे सोसावे डोंगर । सुखाचा वेव्हार । तेणेंचि वाढलें ॥१॥ ठेवा जोडला मिरासी । ठाव झाला पायापासीं । नव्हे आणिकांसी । रीघ तेथें यावया ॥२॥ बळी दिल्हा जीवभाव । नेणें आणिकांचें नांव । धरिला येकभाव । तो विश्वास फळला ॥३॥ तुका म्हणे जालों बळी । आम्ही निकट जवळी । बोलिलों तें पाळी । वचन स्वामी आमुचें ॥४॥

३९६२. कोण आमुचीं योग तपें । करूं बापें जाणवी ॥१॥ गीत संतसंगें गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ॥२॥ आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ॥३॥ तुका म्हणे इंद्रियांसी । येचि रसीं रंगऊं ॥४॥

३९६३. आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा एका भावें ॥१॥ तरिच हरिदास म्हणवितां श्लाघिजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥२॥ गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मागों तुज ॥३॥ सगुण निर्गुण एकाचि आवडी । चित्तें दिली बुडी चिदानंदीं ॥४॥ वृत्तिसहित मन रिघे प्रेम डोहीं । नाठविती देहीं देहभाव ॥५॥ तुका म्हणे देवा ऐसियांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥६॥

३९६४. उदंड पाहिले उदंड ऐकिले । उदंड वर्णिले क्षेत्रमहिमे ॥१॥ ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें ॥२॥ ऐसे संतजन ऐसे हरिदास । ऐसा नामघोष सांगा कोठें ॥३॥ तुका म्हणे आम्हां अनाथाकारणें । पंढरी निर्माण केली देवें ॥४॥

३९६५. पावलों हा देह कागताली न्याय । न घडे उपाय घडों आले ॥१॥ आतां माझीं खंडीं देह देहांतरें । अभय दातारें देऊनियां ॥२॥ आंधळ्याच्या पाईं धनाची चरवी । अघटीत तेंवी घडों आलें ॥३॥ तुका म्हणे योग घडला बरवा । आतां कास देवा न सोडीं मी ॥४॥

३९६६. सांडावी हे भीड अधमाचे चाळे । मद्यपी बरळे भलत्या छंदें ॥१॥ ऐसे तंव तुम्ही नाहीं जी दिसत । कां हे अनुचित वदलेती ॥२॥ फाटा जाला त्यासी नाहीं वोढा वारा । बेरसाचि खरा हा तो गुण ॥३॥ तुका म्हणे नाहीं ज्याच्या बापा ताळा । तो देखे विटाळा संतां अंगीं ॥४॥

३९६७. आवडें हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ॥१॥ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहे । तो मी तुज पाहे वेळोवेळां ॥२॥ लाचावलें मन लागलीसे गोडी । ते जीवें न सोडी ऐसें झालें ॥३॥ तुका म्हणे आम्ही मागावें लडिवाळीं । पुरवावी आळी मायबापा ॥४॥

३९६८. तीळ येक अर्ध राई । शीतबिंदु पावे काई । तया सुखा नाहीं । अंत पार पाहतां ॥१॥ म्हणऊनि करा लाहो । नका मागें पुढें पाहों । अवघ्यामध्यें आहों । अवघे सावचित्त तो ॥२॥ तीर्थें न येती तुळणी । आजि या सुखाची धणी । जे कासी गयेहुनी । जे आगळीं हे असती ॥३॥ येथें धरी लाज । वर्ण अभिमान काज । नाडला सहज । तुका म्हणे तो येथें ॥४॥

३९६९. विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती ॥१॥ विठ्ठल विठ्ठल भावें म्हणे वाचे । तरी तो काळाचे दांत ठेंची ॥२॥ बहुतां तारिलें सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥३॥ तुका म्हणे म्यां ही ऐकोनियां कीर्ती । धरिला येकांतीं हृदयामाजी ॥४॥

३९७०. आड पडे काडी । तरि ते बहु पाणी खोडी ॥१॥ ऐशी दुर्जन संगती । बहुतांचे घात होती ॥२॥ एक पडे माशी । तरि ते बहु अन्न

नाशी ॥३॥ तुका म्हणे रांड । ऐसी कां ते व्याली भांड ॥४॥

३९७१. त्या हरिदासांचि भेटी घेतां । नरका उभयतांसी जाणें ॥१॥ माते परीस थोर कथा । भाड घेतां न लाजे ॥२॥ देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ॥३॥ तुका म्हणे नरकगांवा । जाती हावा धरुनी ॥४॥

३९७२. पंढरीचें भूत मोठें । आल्या गेल्या झडपी वाटे ॥१॥ बहु खेचरीचें रान । जातां वेडें होय मन ॥२॥ तेथें जाऊं नका कोणी । नाहीं आले परतोनी ॥३॥ तुका पंढरीसी गेला । पुन्हा जन्मा नाहीं आला ॥४॥

३९७३. काय करूं आतां या मना । न संडी विषयवासना । प्रार्थितांही राहेना । आदरें पतना नेऊं पाहे ॥१॥ आतां धांवें धांवें गा श्रीहरी । गेलों वायां नाहीं तरी । न दिसे कोणी आवरी । आणीक दुजा तयासी ॥२॥ न राहे येक ठाईं येक घडी । चित्त तडतडा तोडी । भरलें विषय भोवंडी । घालूं पाहे उडी भवडोहीं ॥३॥ आशा तृष्णा कल्पना पापिणी । घात मांडिला माझा यांणीं । तुका म्हणे चक्रपाणी । काय अझुनी पाहातोसी ॥४॥

३९७४. पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशाचा संबंध धातयाच्या ॥१॥ सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥२॥ ऐशीं सहस्र त्या सुंदरा कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥३॥ पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरि इंद्रा आणी ॥४॥ चौदा चवकड्या आयुष्य गणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥५॥ तुका म्हणे ज्याचे देव बांदवडी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥६॥

३९७५. लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥१॥ ऐशी भक्तांची माउली । करी कृपेची साउली ॥२॥ माय बाळकासी । जीव भाव वेंची तैसी ॥३॥ तुका म्हणे नाड । नाहीं शरणागता आड ॥४॥

३९७६. तुजविण कांहीं । स्थीर राहे ऐसें नाहीं ॥१॥ कळों आलें बहुतां रीती । पांडुरंगा माझे चित्तीं ॥२॥ मोकलिली आस । सर्वभावें झालों दास ॥३॥ तुका म्हणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥४॥

३९७७. खोंकरी आधण होय पाकसिद्धि । हें तों घडे कधीं शकेचि

ना ॥१॥ खापराचे अंगीं घासितां परीस । न पालटे खीस काढिलिया ॥२॥ पालथे घागरीं रिचवितां जळ । तुका म्हणे खळ तैसे कथे ॥३॥

३९७८. नागले देखोनि चांगलें बोले । आपलें वेंचूनि त्यापुढें खुले ॥१॥ अधमाचे वोंगळ गुण । उचित नेणें तो धर्म कोण ॥२॥ आर्तभूता न घाली पाण्याचा चूळ । न मागे त्यास देई साकरगूळ ॥३॥ येकासी धड न बोले वाचा । येकासी म्हणे मी तुझे बांधीचा ॥४॥ येका देखोनि लपवी भाकरी । येका आवड पडोनि होकारी ॥५॥ तुका म्हणे गाढव पशु । लाभेंविण केला आयुष्यासी नाशु ॥६॥

३९७९. पिंडपोषकांच्या जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टिभेटी न हो त्यांची ॥१॥ नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशालागीं पात्र झाला ॥२॥ पोहों नेणें कासे लावितो आणिका । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ॥३॥ शिणलें तें गेलें शिणलियापासीं । झाली त्या दोघांसी येक गती ॥४॥ तुका म्हणे देवा अहो दीनानाथा । दरुशन आतां नको त्यांचें ॥५॥

३९८०. संतचिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥१॥ पाडिले दुःखाचे सागरीं । वाहावले भवपूरीं ॥२॥ कामक्रोध लोभ चित्तीं । वरी दाविती विरक्ती ॥३॥ आशापाशीं बांधोनि चित्त । म्हणती झालों आम्हीं मुक्त ॥४॥ त्याची लागली संगती । झाली त्याची तेचि गती ॥५॥ तुका म्हणे शब्दज्ञानें । जग नाडियेलें तेणें ॥६॥

३९८१. रामकृष्ण ऐसीं उच्चारिन नामें । नाचेन मी प्रेमें संतांपुढें ॥१॥ काय घडेल तें घडो या शेवटीं । लाभ आणि तुटी देव जाणें ॥२॥ चिंता मोहो आशा ठेउनी निराळी । देईन हा बळी जीव पाई ॥३॥ तुका म्हणे कांहीं उरों नेदी उरी । सांडीन हे थोरी वोवाळूनी ॥४॥

३९८२. आइत्या भागा धणी व्हावें । कोणें द्यावें मस्तकीं ॥१॥ केणें आहे पंढरपुरा । उधाराचें लाभीक ॥२॥ बाखराची करूनी रितीं । भरा पोतीं लवलाहीं ॥३॥ तुका म्हणे संतां पाडें । करूं पुढें वाखती ॥४॥

३९८३. कां गा कोणी न म्हणे पंढरीची आई । बोलाविते पाहीं चाल नेटें ॥१॥ तेव्हां माझ्या मना होय समाधान । जाय सर्व शीण जन्मांतरींचा

॥२॥ तुका म्हणे माझी होईल माउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥३॥

३९८४. वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधिला ॥१॥ विठोबासी शरण जावें । निजनिष्ठे नाम गावें ॥२॥ सकळ शास्त्राचा विचार । अंतीं इतुकाचि निर्धार ॥३॥ अठरा पुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हेचि मात ॥४॥

३९८५. मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखें तरी लव धडधडी ॥१॥ न लाभे हा काळ न सुटे हातींचा । न बोलवे वाचा वेडावली ॥२॥ न पवे धांवणें न पवेचि लाग । न लगेचि माग धरावया ॥३॥ भेणें तरी अंगा लावियेल्या राखा । तरी यासी वाखा करितसे ॥४॥ तुका म्हणे नेदी हांका मारूं देवा । लोकांपाठी हेवा लागलासे ॥५॥

३९८६. नाहीं पाक होत उफराट्या चाली । बोलिली ती केली व्हावी नीत ॥१॥ नाहीं मानूं येत वाजटाचे बोल । कोरडेंचि फोल चवी नाहीं ॥२॥ तरुवरा अधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ म्हणा त्यासी ॥३॥ तुका म्हणे किती ठकलीं तातडी । गऱ्हा नाहीं गोडी मांडे पुऱ्या ॥४॥

३९८७. झाला हरिकथा रंग वोरसला । उचितासी आला पांडुरंग ॥१॥ वांटिता हें प्रेम उचिताचा दाता । घेई रे तूं आतां धर्णावरी ॥२॥ प्रेम देउनियां अवघीं सुखीं केलीं । जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ॥३॥ तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं । म्हणउनि पुढती आणियेलें ॥४॥

३९८८. भय नाहीं भेव । अनुतापी नव्हता जीव ॥१॥ जेथें देवाची तळमळ । तेथें कशाचा विटाळ ॥२॥ उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ॥३॥ तुका म्हणे चित्ता । होय आवडी मिश्रिता ॥४॥

३९८९. ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनें सहित पालटे काया ॥१॥ तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण झाला हरी ॥२॥ चित्त चैतन्या पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टी ॥३॥ तुका म्हणे सांगों काय । येकायेकिं हरिवृत्तिमय ॥४॥

३९९०. देव तिळीं आला । गोड गोड जीव धाला ॥१॥ साधला हा पर्वकाळ । गेला अंतरींचा मळ ॥२॥ पाप पुण्य गेलें । येका स्नानेंचि खंडिलें ॥३॥ तुका म्हणे वाणी । शुद्ध जनार्दन जनीं ॥४॥

३९९१. काय उणें मज पांडुरंगा पाईं । रिद्धिसिद्धि ठाईं वोळंगती ॥१॥ कोण पाहे सुखा नाशिवंताकडे । तृष्णेचे बापुडे न हो आम्ही ॥२॥ सर्व सुखें आम्हीं केली पावठणी । पाप पुण्य दोन्हीं उडविलीं ॥३॥ तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवांची ॥४॥

३९९२. अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरली पाटी ॥१॥ तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥२॥ बाळकाचे चाली । माता जाणोनि पाउल घाली ॥३॥ तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥४॥

३९९३. सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥१॥ तयाचें चिंतनें निरसलें संकट । तराल दुरघट भवसिंधु ॥२॥ जन्मोनियां कुळीं वाचे स्मरा राम । धरीं हाचि नेम अहर्निसीं ॥३॥ तुका म्हणे कोटी कुळें तीं पुनित । भावें गातां गीत विठोबाचें ॥४॥

३९९४. द्रव्य घेउनियां कथा जरी करी । तरी भंगो हरी देह माझा ॥१॥ माझी कथा करा ऐसें म्हणे कोणा । तरी नारायणा जिव्हा झडो ॥२॥ साह्य तूं झालासी काय उणें तुपें । आणिक भूतापें काय मागों ॥३॥ तुका म्हणे सर्व सिद्धी तुझे पाईं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥४॥

३९९५. जरी हा हो कृपा करी नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥१॥ कोठोनियां कांहीं न लगे आणावें । न लगे कोठें जावें तरावया ॥२॥ जरी देव काय धरिल पैं चित्तीं । तरी हेचि होती दिव्य चक्षु ॥३॥ तुका म्हणे देव दावील आपणा । तरी जीवपणा ठाव नाहीं ॥४॥

३९९६. रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥१॥ जीवाहि अगोज पडती आघात । येउनियां नित्य नित्य वारू ॥२॥ तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें । अवघियांचें केलें काळें तोंड ॥३॥

३९९७. होईन खडे गोटे । चरणरज साने मोठे । पंढरीचे वाटे । संतचरणीं लागेन ॥१॥ आणिक काय दुजें । मी मागेन तुजपासीं । आठ-वितों सुख । भय नाश नाहीं ज्यासी ॥२॥ होईन मोचे वाहणा । पाईं सकळ संतजनां । मांजर सुकर सुणा । जवळी शेष घ्यावया ॥३॥ सांडोवा पायरी । वोहळ बावी गंगातिरीं । होईन तयावरी । संतसज्जन चालती ॥४॥

लागे संतां पाईं । ऐसा ठेवीं भलतें ठाईं । तुका म्हणे देईं । धाक नाहीं जन्माचा ॥५॥

३९९८. कासयासी व्हावें आम्ही जीवन्मुख । सांडोनियां थित प्रेमसुख ॥१॥ वैष्णवांचा दास झाला नारायण । काय त्या मिळोन असों सुखी ॥२॥ काय त्या गांठीचें पडिलें सुटोन । उगेचि बैसोन धीर धरूं ॥३॥ सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण हाणे लाता ॥४॥ तुका म्हणे मज न लगे सायोज्यता । राहेन या संतां समागमें ॥५॥

३९९९. आवडे पंढरी भीमा पांडुरंग । चंद्रभागा लिंग पुंडलिक ॥१॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरवीती ॥२॥ तुका म्हणे जीवा थोर झालें सुख । नाठवे हे भूक तान कांहीं ॥३॥

४०००. प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । येकहि निदानीं नव्हे त्यासी ॥१॥ दोहीं पेंवावरी ठेऊं जातां हात । होय अपघात शरीराचा ॥२॥ तुका म्हणे तया दोहींकडे धक्का । शेवटीं तो नरकामाजी पडे ॥३॥

४००१. आम्हां भय धाक कोणाचा रे पाहें । काळ मश्यक काय मानव हे ॥१॥ आम्हांसी ते काय चिंता या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥२॥ काय करावी हे कोणाची मान्यता । करितां अनंता कोण वारी ॥३॥ नाहीं शीण आम्हां झालें कवतुक । पुनित हा लोक करावया ॥४॥ तुका म्हणे खातो आनंदाचे लाडू । नका चरफडूं घ्या रे तुम्ही ॥५॥

४००२. तांम्रियाचें नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं ॥१॥ करणींचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ॥२॥ हिरीयासारिखा दिसे शिरगोळा । पारखी ते डोळां न पाहाती ॥३॥ देउनियां भिंग कमाविलें मोतीं । पारखिया हातीं देतां नये ॥४॥ तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥५॥

४००३. चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर । क्षोभविते दूर तेचि भले ॥१॥ ऐसी परंपरा आलीसे चालत । भलत्याची नीत त्यागावरी ॥२॥ हो कां पिता पुत्र बंधु कोणी तरी । विजाति ग्रहीं धरूं नये ॥३॥ तुका म्हणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥४॥

४००४. आपुलिया कसोटी शुद्ध राखी कारण । आगीनें भूषण अधिक पुटा ॥१॥ नाहीं कोणासवें बोलणें लागत । निश्चितीनें चित्त समाधान ॥२॥ लपविलें तेंहि ढेंकरें उमटे । खोटियाचें खोटें उर फोडी ॥ ३ ॥ तुका म्हणे निंदा स्तुति दोन्ही वाव । आपुलाला भाव कळों येतो ॥४॥

४००५. आणिकांच्या घातें मानितां संतोष । सुखदुःख दोष अंगीं लागे ॥१॥ ऐसे मनीं वाहों नयेति संकल्प । करूं नये पाप भांडवल ॥२॥ किल्बीपाची चित्तीं राहातां कांचणी । अंगीं तें जडूनि ठाव जाळी ॥३॥ तुका म्हणे कोपें घडे पुण्यक्षय । होणार तें होय प्रारब्धींचें ॥४॥

४००६. अज्ञानाचि भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं बोध कैंचा ॥१॥ अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥२॥ अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचे ॥३॥ अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ॥४॥ तुका म्हणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥५॥

४००७. गूळ माखुनियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारीं ॥१॥ अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥२॥ ऐसिया दांभिका कैसी हरिसेवा । नेणोंचि सद्भावा कोणें काळीं ॥३॥ तुका म्हणे येणें कैंचा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥४॥

४००८. संतांचा पढीयावो कैशापरि लाहो । नामाचा आठवो कैसा राहे ॥१॥ हेचि थोर चिंता लागली मनासी । निजतां निद्रेसी न लगे डोळा ॥२॥ जेवितां जेवणीं न लगे गोड धड । वाटतें काबाड विषयसुख ॥३॥ ऐसिया संकटीं पाव कृपानिधि । लावीं संतपदीं प्रेमभावें ॥४॥ तुका म्हणे आम्ही नेणों कांहीं हित । तुजविण अनाथ पांडुरंगा ॥५॥

४००९. पंढरीचा वास धन्य तोचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देहो ॥१॥ मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरी दयारूप ॥२॥ शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥३॥ तुका म्हणे नाहीं वर्ण अभिमान । अवघेचि जीवन्मुक्तलोक ॥४॥

४०१०. देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासी ॥१॥

इंद्रियाचे गोडी ठकलीं बहुतें । सोडितां मागुतें आवरेना ॥२॥ युक्ताचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥३॥ नाव नावलितां घाला घाली वर । तैसा तो पसर अहंतेचा ॥४॥ तुका म्हणे बुद्धि आपुले आधीन । करूं नारायण आतुडे तो ॥५॥

४०११. नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥१॥ नको काम क्रोध द्वेष निंदा द्वंद्व । अवघा गोविंद निःसंदेह ॥२॥ असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पाईं ॥३॥ करूनियां साहे पुरवीं मनोरथा । व्हावें कृपावंत तुका म्हणे ॥४॥

४०१२. जगीं कीर्ति व्हावी । म्हणोनि झालासी गोसावी ॥१॥ बहु केलें पाठांतर । वर्म राहिलें तें दूर ॥२॥ चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥३॥ तुका म्हणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥४॥

४०१३. प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ॥१॥ उभी कामधेनु मांगाचे अंगणीं । तिसी काय ब्राम्हणीं वंदूं नये ॥२॥ कोडियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र म्हणोन घेऊं नये ॥३॥ यातिहीन झाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ॥४॥ भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनी तयांचीं तोंडें काळीं ॥५॥

४०१४. बोलिलों उत्कर्षे । प्रेमरसें दास्यत्वें ॥१॥ साच करितां नारायण । जया शरण गेला तो ॥२॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवीतो ॥३॥ तुका म्हणे लडिवाळाचें । यावें साचें करूनियां ॥४॥

४०१५. विचा केला ठोंबा । म्हणोनि नाम तो विठोबा ॥१॥ कां गे नेणा त्याचें नांव । काय वेदासी नाहीं ठावें ॥२॥ शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग झाला ॥३॥ तुका म्हणे सत्ता । ज्याचि काळाचिये माथा ॥४॥

४०१६. चोरासी चांदणें वेष्येसी सेजार । परिसे खापर काय होय ॥१॥ दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥२॥ तुका म्हणे जरी पूर्वपुण्य सिद्धी । तरिच राहे बुद्धी संतसंगीं ॥३॥

४०१७. मथनासाठीं धर्माधर्म । त्यांचें वर्म नवनीत ॥१॥ तोंचि ते

धाटूं नये । आलें जाय नासुनी ।।२।। सांभाळावें बराबर । वर्म दूर न वजावें ।।३।। तुका म्हणे धालें पोट । मग बोट चाटणीं ।।४।।

४०१८. न घडे मायबापा बाळकाचा घात । आपणा देखत होऊं नेदी ।।१।। कामीं मनीं चिंता वाहूं भय धाक । काय न्व्हे येक करितां तुज ।।२।। वर्म जाणे त्याच्या हिताचा उपाय । तान भूक वाहे कडिये खांदीं ।।३।। तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ।।४।।

४०१९. करावें कीर्तन । मुखीं गावे हरिचे गुण ।।१।। मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाची क्रोधा ।।२।। शांति खर्ग हातीं । काळासी ते नागविती ।।३।। तुका म्हणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ।।४।।

४०२०. साधनाच्या कोटी । केल्या आटी होत्या त्या ।।१।। देव कृपा करी जरी । होय उजरी । स्वरूपीं ।।२।। केले होती व्यर्थ श्रम । चित्ता उपरम न होतां ।।३।। तुका म्हणे कळों आलें । सर्व झालें आपरूप ।।४।।

४०२१. तुज काय करूं मज येक सार । अमृतनागर नाम तुझें ।।१।। काय उणें आहां तयाचिये पोटीं । गोवितां हे कंठीं कामधेनु ।।२।। नोळखे तान्हुलें माय ऐसी कोण । वोरसे देखोन शोक त्याचा ।।३।। जो नाहीं देखिला याचक नयनीं । तो पावे घेउनि लज्जा दान ।।४।। नामासाठीं प्राण सांडियेला रणीं । शूर ते भांडणीं न फिरती ।।५।। तुका म्हणे आम्ही गातां गीतीं भला । भेटुनि विठ्ठला काय चाड ।।६।।

४०२२. कृपेचे सागर हेचि साधुजन । तिहीं कृपादान केलें मज ।।१।। बोबडे वाणीचा केला अंगिकार । तेणें माझा स्थिर केला जीव ।।२।। तेणें सुखें मन स्थिर झालें ठाईं । संतीं दिल्हा पाईं ठाव मज ।।३।। नाभी नाभी ऐसें बोलिले वचन । तें माझें कल्याण सर्वस्वेंही ।।४।। तुका म्हणे झालों आनंदें निर्भर । नाम निरंतर घोष करूं ।।५।।

४०२३. भक्तीनें तें वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांती दया क्षमा ।।१।। अष्ट महासिद्धी वोळंगती द्वारीं । नवजाती दूरी दवडितां ।।२।। तेथें दुष्ट गुण न मिळे निःशेप । चैतन्याचा वास झाला माझी ।।३।। संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ । तुटली हळहळ त्रिगुणांची ।।४।। तुका म्हणे त्याचा

देव सर्व भार । चालवी कामार होऊनियां ॥५॥

४०२४. साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जें वचनें बोलियेले ॥१॥ साच तें स्वहित साच तें प्रचीत । साच वेदें नीत सांगितली ॥२॥ तुका म्हणे घेती साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ॥३॥

४०२५. संगें वाढे शीण संगें वाढे भजन । त्रिविध हें जन बहु देवा ॥१॥ याचिमुळें आला संगाचा कंटाळा । दिसताती डोळां नाना छंद ॥२॥ येकविध भाव राहावया ठाव । नेदी हा संदेह राहो चित्तीं ॥३॥ शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणिक देखिलें नावडे त्यां ॥४॥ तुका म्हणे आतां येकलेंचि भलें । बैसोनि उगलें राहावें तें ॥५॥

४०२६. पुण्य पाप ठाव नाहीं सुखदुःख । हानी लाभ शंका नामलिया ॥१॥ जितां मरण आलें आपपर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ॥२॥ अंधःकार ज्योति कुळ धर्म यात । ठाव नाहीं सत्य असत्यासी ॥३॥ जन वन भिन्न अचेत चळण । नाहीं दुजेपण ठाव यासी ॥४॥ तुका म्हणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांचि घडली सर्व पूजा ॥५॥

४०२७. संकोचित जीव महत्त्वाच्या भारें । दास्यत्वचि बरें बहु वाटे ॥१॥ कळावी जी माझी आवडी हे संतां । देणें तरी आतां हेंचि द्यावें ॥२॥ तुमचे चरणीं पावविलों सेवा । म्हणउनि हेवा हाचि करीं ॥३॥ विनउनि तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणींचा ॥४॥

४०२८. देव कैंचा तया दुरी । भाका वरी करुणा ॥१॥ आळविल्या नलगे धीर । माय जाणे रे भातुकें ॥२॥ नावेवरी ज्याचा भार । पैल पार जवळी त्या ॥३॥ आतां परदेशी तुका । झाला लोकां वेगळा ॥४॥

४०२९. भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयाची गोडी ॥१॥ तो नरचि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ॥२॥ भजन पूजनहि नेणें । काय स्वरूपासी जाणे ॥३॥ तुका म्हणे त्याला । भोवंडुनि बाहेर घाला ॥४॥

४०३०. संतांनि सरता केलों तैसेपरी । चंदन ते बोरी व्यापियेली ॥१॥ गुण दोष याति न विचारी कांहीं । ठाव दिल्हा पाईं आपुलिया ॥२॥ तुका म्हणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ॥३॥

४०३१. चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान । अखंड मुखीं नाम तुमचे वर्णावे गुण ॥१॥ हेंचि येक तुम्हां देवा मागणें दातारा । उचित तें करा माझा भाव जाणोनि ॥२॥ खुंटली जाणीव माझें बोलणें आतां । करूं यावी तैसी करा बाळकाची चिंता ॥३॥ तुका म्हणे आतां देऊं नको अंतर । न कळे पुढें काय बोलों विचार ॥४॥

४०३२. संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥१॥ भजनविधि नेणें साधन उपाय । सकळ सिद्धी पाय हरिदासांचे ॥२॥ ध्यान गति मति आसन समाधी । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥३॥ नेणता निर्लज्ज नेणों नादभेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥४॥ सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका म्हणे संत महंत पाय ॥५॥

४०३३. हरिजना प्राण विकिली हे काया । अंकिला मी तया घरीं झालों ॥१॥ म्हणिये सत्वर करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ॥२॥ आस करूनियां राहीन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी ॥३॥ चालतां ते मार्गी चरणींचे रज । उडती सहज घेईन आतां ॥४॥ दुरी त्यांपासुनि न वजे दवडितां । तुका म्हणे लाता घेइन अंगीं ॥५॥

४०३४. पुण्य फळलें बहुतां दिसां । भाग्य उदयाचा ठसा । झालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥१॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥२॥ आलिंगनें संतांचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तक हा पायां । वरी त्याच्या ठेवितों ॥३॥ तुका म्हणे धन्य झालों । सुखें संतांचिया धालों ॥ लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥४॥

४०३५. आतां आम्हां भय नाहीं बा कोणाचें । बळ विठोबाचें जालें असे ॥१॥ धीर दिल्हा आम्हां येणें पांडुरंगें । न पांगों या पांगे संसाराच्या ॥२॥ तुका म्हणे माझा कैवारी हा देव । नाहीं भय भेव त्याच्या संगें ॥३॥

४०३६. नलगे देवा तुझें आम्हांसी वैकुंठ । सायुज्यता पट नलगे मज ॥१॥ देईं तुझें नाम सदा सर्वकाळीं । मागणें वनमाळी हेंचि तुज ॥२॥ नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ॥३॥ सिद्ध मुनि-

गण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामीं ॥४॥ तुका म्हणे हरि देई तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ॥५॥

४०३७. पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । झालें या चित्तासी समाधान ॥१॥ मायबापा माझा उभा कृपादानी । विटे सम जोडोनि पादांबुजें ॥२॥ सांभाळासी येऊं नेदी हा उणीव । अधिकार गौरव राखे तैसे ॥३॥ तुका म्हणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळुनी ॥४॥

४०३८. भक्ति आम्हीं केली सांडूनि उद्वेग । पावलों हें संगें सुख याचें ॥१॥ सुख आम्हां झालें धरितां याचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ॥२॥ तुका म्हणे सुख बहु झालें जीवा । घडली या सेवा विठोबाची ॥३॥

४०३९. इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम म्हणूनि काई ॥१॥ जेवीं माशीसवें अन्न । सुख नेदि तें भोजन ॥२॥ कीर्तन करावें । तैसें करूनि दावावें ॥३॥ हें तों अंगीं नाहीं चिन्ह । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥४॥ तुका म्हणे रागा । संत शिवों नेदी अंगा ॥५॥

४०४०. मुखीं विठ्ठलाचें नाम । मग कैंचा भवभ्रम ॥१॥ चालतां बोलतां खातां । जेवितां निद्रा करितां ॥२॥ सुखें असावें संवसारीं । मग जवळीच हरी ॥३॥ मुक्ति वरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥४॥ मग देवभक्त झाला । तुका तुकीं उतरला ॥५॥

४०४१. क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नाठवे । पाहावया धांवे कोल्हाटासी ॥१॥ कथेसि साक्षेपें पाचारिलें जरी । म्हणे माझ्या घरीं कोणी नाहीं ॥२॥ बळात्कारें जरी आणिलें कथेसी । निद्रा घे लोडासी टेंकोनियां ॥३॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥४॥

४०४२. आतां वाटों नेदी आपुलें हें मन । न सोडीं चरण विठोबाचे ॥१॥ दुजयाचा संग लागों नेदी वारा । आपुल्या शरीरावरूनियां ॥२॥ यावें जावें आम्ही देवाचि सांगातें । मागुनि करीन हेंचि आलों ॥३॥ काय वायां गेलों करूं तो उद्वेग । उभा पांडुरंग मागें पुढें ॥४॥ तुका म्हणे प्रेम मागतों आगळें । येथें भोगूं फळें वैकुंठाचीं ॥५॥

४०४३. आतां जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ॥१॥ चंद्रभागा-

तीरीं । आम्ही नाचों पंढरपुरीं ॥२॥ जेथें संतांची दाटणी । त्याचें घेऊं पायवणी ॥३॥ तुका म्हणे आम्ही बळी । जीव दिल्हा पायांतळीं ॥४॥

४०४४. आम्हां नरका जातां । काय येईल तुझ्या हातां । ऐसें तूं अनंता विचारीं पां ॥१॥ तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळा कृपानिधी ॥२॥ तुझें पावनपण न चले आम्हांसी । ऐसें हृषीकेशी कळों आलें ॥३॥ आम्ही दुःख पावों जन्ममरणव्यथा । काय तुझ्या हातां येत असे ॥४॥ तुका म्हणे तुम्ही खादली हो रडी । आम्ही धरली शेंडी नाम तुझें ॥५॥

४०४५. पांडुरंगे पाहा खादलीसे रडी । परि नामशेंडी धरिली आम्ही ॥१॥ आतां संतांनीं करावी पंचाइत । कोण हा फजितखोर येथें ॥२॥ कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आम्ही पातकीही ॥३॥ याचें पावनपण सोडवा जी तुम्ही । पतितपावन आम्ही आहों खरे ॥४॥ आम्ही तंव आहों अन्याई सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥५॥ तुका म्हणे आम्ही मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥६॥

४०४६. घालुनियां मध्यवर्ती । दाटूनिया उपदेश देती ॥१॥ ऐसे पोटभरू संत । तयां कइंचा भगवंत ॥२॥ रांडापोरांतें गोविती । वर्पासनें ते लाविती ॥३॥ जैसे बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ॥४॥ तुका म्हणे तयां । तमोगुणी यांची क्रिया ॥५॥

४०४७. धांवोनियां आलों पहावया मुख । गेलें माझें दुःख जन्मांतरिंचें ॥१॥ ऐकिलेंहि होतें तैसेंचि पाहिलें । मन स्थिरावलें तुझ्या पायीं ॥२॥ तुका म्हणे माझी इच्छा पूर्ण झाली । कांहीं न राहिली वासना हे ॥३॥

४०४८. जीवें जीव नेणें पापी सारिखाची । नळी दुजियाची कापूं बैसे ॥१॥ आत्मा नारायण सर्वां घटीं आहे । पशुमध्यें काय कळों नये ॥२॥ देखत हा जीव हुंबरे वरडत । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥३॥ तुका म्हणे तया चांडाळासी नर्क । भोगिती अनेक महादुःखें ॥४॥

४०४९. भागल्याचें तारूं शिणल्या साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥१॥ ऐसी हे कृपाळा अनाथाचे विशीं । सुखाचीच राशी पांडुरंग

॥२॥ सकळा सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहेन बहु भेटी उतावीळ ॥३॥ तुका म्हणे येथें आतां उरे कैंचा । अनंतां जन्मींचा शीण भाग ॥४॥

४०५०. काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुम्हा पें ॥१॥ आमुची तों न पुरे इच्छा । पिता ऐसा मस्तकीं ॥२॥ कैसी तुम्हां होय सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ॥३॥ आश्चर्यचि करी तुका । ये नायका वैकुंठींच्या ॥४॥

४०५१. परी आतां माझी परिसावी विनंति । रखुमाईच्या पती पांडुरंगा ॥१॥ चुकलिया बाळा न मारवे जीवें । हित तें करावें मायबापीं ॥२॥ तुका म्हणे तुझा म्हणताती मज । आतां आहे लाज हेचि तुम्हां ॥३॥

४०५२. पापाचिया मुळें । झालें सत्याचें वाटोळें ॥१॥ दोष झाले बळिवंत । नाहीं ऐसी झाली नीत ॥२॥ मेघ पडों भीती । पिकें सांडियेली क्षिती ॥३॥ तुका म्हणे कांहीं । वेदां वीर्य शक्ति नाहीं ॥४॥

४०५३. ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ॥१॥ कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर ॥२॥ वासनेच्या लहरी येती । उद्योग हेलकावे बैसती ॥३॥ माया ममतेचे भोंवरे । घेती भयानक फेरे ॥४॥ तरावया येक युक्ति असे । तुका नामनावेमधीं बैसे ॥५॥

४०५४. हरिदासांचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥१॥ म्हणासि कांहीं मागा । हेंचि द्या गा पांडुरंगा ॥२॥ संतां लोटांगणीं । जातां लाजों नका मनीं ॥३॥ तुका म्हणे अंगीं । शक्ति देईं नाचे रंगीं ॥४॥

४०५५. लटिकयाचे आवतणें जेविलीयां साच । काय त्या विश्वास तोचि खरा ॥१॥ कोल्हाटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥२॥ जळमंडपाचे घोडे राऊत नाचती । ते काय तडवती युद्धालागीं ॥३॥ तुका म्हणे तैसें मतवादियाचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांचि ॥४॥

४०५६. येक म्हणत आम्ही देवचि पैं झालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥१॥ येक म्हणाति आम्ही देवाचीं पैं रूपें । तरी तुमाचिया बापें न चुके जन्म ॥२॥ देवें उचलिली सशिळा मेदिनी । तुमचेनि गोणी नुचलवे ॥३॥ देवें मारियेले दैत्य दानव मोठे । तुमचेनी तुटे तृणमात्र ॥४॥ राया

विठोबाचें पद जो अभिलाषी । पातकाची राशी तुका म्हणे ॥५॥

४०५७. काय आम्हीं केलें ऐसें । नुद्धरिजेसें सांगावें ॥१॥ हरण कोल्हे वैकुंठवासी । कोण त्यासी अधिकार ॥२॥ गजा नाड्या सरोवरीं । नाहीं उरी विचारिलें ॥३॥ तुका म्हणे गणिका नष्ट । माझे कष्ट त्याहुनी ॥४॥

४०५८. गुणा आला विटेवरी । पीतांबरधारी सुंदर जो ॥१॥ डोळे कान त्याचे ठाईं । मन पाईं राहो हें ॥२॥ निवारोनि जाय माया । ऐसी छाया जयाची ॥३॥ तुका म्हणे समध्यान । ते हे चरण सकुमार ॥४॥

४०५९. रंगी रंगे नारायणा । उभा करितों कीर्तना ॥१॥ हातीं घेउनियां विणा । कंठीं राहें नारायणा ॥२॥ देखिली जे मूर्ति । माझ्या हृदईची विश्रांति ॥३॥ तुका म्हणे देवा । देईं कीर्तनाचा हेवा ॥४॥

४०६०. तुझा भरंवसा आम्हां । फार होता पुरुषोत्तमा ॥१॥ भवसागर-संकटीं । तारिसील जगजेठी ॥२॥ नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजेड ॥३॥ सिलंगणीचें सोनें । त्यासि गहाण ठेवी कोण ॥४॥ नामा-सारखी करणी । कोठें न दिसे त्रिभुवनीं ॥५॥ तुका म्हणे देवा । ब्रीद सोडुनियां ठेवा ॥६॥

४०६१. सांग त्वां कोणासीं तारिलें । संता वेगळें उद्धरिलें ॥१॥ संत शब्द उपदेशी । मग तूं हो म्हणशी ॥२॥ तुका म्हणे तुझा उपकार । करूं संतांचा उच्चार ॥३॥

४०६२. विद्या अल्प परी गर्वशिरोमणी । मजहूनि ज्ञानी कोण आहे ॥१॥ अंगीं भरला ताठा कोणातें मानीना । साधूची छळणा स्वयें करी ॥२॥ साधूच्या देहाचा मानी जो विटाळ । त्रैलोकीं चांडाळ तोचि येक ॥३॥ संतांची जो निंदा करितो या मुखें । खतेला सकळापापें तोचि येक ॥४॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मईंद । त्यांपासीं गोविंद नाहीं नाहीं ॥५॥

४०६३. बैसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धी । देखतांचि चिंधी मन धांवे ॥१॥ व्यभिचाऱ्यापाशीं बैसतां क्षणभरी । देखतांचि नारी मन धांवे ॥२॥ प्रपंचाचा छंद टाकोनियां गोंवा । धरावें केशवा हृदयांत ॥३॥ सांडोनियां देईं संसाराची बेडी । कीर्तनाची गोडी धरावी गा ॥४॥ तुका

म्हणे तुज सांगतों मी येक । रुक्मिणीनायक मनीं गावा ॥५॥

४०६४. परिसें गे सुनेबाई । नको वेंचूं दूध दहीं ॥१॥ आवा चालिली पंढरपुरा । वेसीपासूनि आली घरा ॥२॥ ऐकें गोष्टी सादर बाळे । करि जतन फुटकें पाळें ॥३॥ माझें हातींचा कलवडू । मजवांचून नको फोडूं ॥४॥ वळवट क्षीरीचें लिंपण । नको फोडूं मजवांचून ॥५॥ उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥६॥ भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥७॥ भक्षीं परिमीत आहारू । नको फारसी वरो सारूं ॥८॥ सुन म्हणे बहुत निकें । तुम्ही यात्रेस जावें सुखें ॥९॥ सासुबाई स्वहित जोडा । सर्व मागील आस सोडा ॥१०॥ सुनमुखींचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥११॥ सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥१२॥ आतां कांसया यात्रे जाऊं । काय जाऊनि तेथें पाहूं ॥१३॥ मुलें लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपूर ॥१४॥ तुका म्हणे ऐसे जन । गोविलेये मायें करून ॥१५॥

४०६५ पतिव्रतेची कीर्ति वाखाणितां । सिंदळीचे माथां तिडीक उठे ॥१॥ आमुचें तें आहे सहज बोलणें । नाहीं विचारून केलें कोणी ॥२॥ अंगीं उणें त्याच्या बैसे टाळक्यांत तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥३॥ तुका म्हणे आम्ही काय करणें त्यासी । ढका खवंदार्सा लागतसे ॥४॥

४०६६. आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥१॥ आवडी आवडी कळिवरा काळिवरी । वरील अंतरीं टाळी पडे ॥२॥ अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडूं मागे तुटी हरुपयोगें ॥३॥ तुका म्हणे येकें कळतें दुसरें । बरीयानें बरें आहाचें आहाच ॥४॥

४०६७. हेंचि माझें चित्तीं । राहो भाव प्रीती । विठ्ठल सुषुप्तीं । जागृतीं स्वप्नीं ॥१॥ आणिक नाहीं दुजें मागणें । राज्यचाड संपत्ति धन । जिव्हे सुख तेणें । घेतां देहीं नाम तुझें ॥२॥ तुझें रूप सर्वां ठायीं । देखे ऐसें प्रेम देईं । ठेवावा हा पाईं । अनुभव चित्ताचा ॥३॥ जन्ममरणाचा बाध । समूळनि तुटे कंद । लागो हाचि छंद । हरी गोविंद वाचेसी ॥४॥ काया पालटे दरुशनें । अवघें कोंदाटे चैतन्य । जीवशीव खंडण । होय तें रे

चिंतितां ॥५॥ तुका म्हणे याचि भावें । आम्ही घालों तुझ्या नांवें । सुखें होत जन्में । भलते याती भलतैसें ॥६॥

४०६८. मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देईं माझ्या ॥१॥ तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य । तूं माझे प्राचीन पांडुरंगा ॥२॥ तूं माझें सत्कर्म तूं माझे स्वधर्म । तूंचि नित्य नेम नारायणा ॥३॥ कृपावचनाची वाट पाहातसे । करुणा वोरसे बोल कांहीं ॥४॥ तुका म्हणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोल सर्वोत्तमा मजसवें ॥५॥

४०६९. काय करूं आतां धरुनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥१॥ नव्हे कोणी जगीं मुकियाचा जाण । सार्थक लाजोन नव्हे हित ॥२॥ आलें तें उत्तर बोलों स्वामीसवें । धीट नीट जीवें होउनीयां ॥३॥ तुका म्हणे मना समर्थासी गांठी । घालावी हे मांडी थापटोनी ॥४॥

४०७०. भ्रतारासी भार्या बोले गुज गोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥१॥ अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥२॥ जोडितसां तुम्ही खाति येर चोरें । माझीं तंव पोरें हळहळतीं ॥३॥ तुमची व्याली माझे डाई हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥४॥ दुष्टवृत्ति नणदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्या सुखें ॥५॥ भावा दीर कांहीं धड ही न बोले । नांदों कोणां खालें कैसी आतां ॥६॥ माझ्या अंगसंगें तुम्हांसी विश्रांती । मग धडगती नाहीं तुमची ॥७॥ ठाकतें ठुमकतें जीव मुठी धरुनी । परि तुम्ही अझुनी न धरा लाज ॥८॥ वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥९॥ तुका म्हणे झाला कामाचा अंकित । सांग मनोगत तैसा वर्ते ॥१०॥

४०७१ कामाचा अंकित कांतेतें प्रार्थीत । तूं कां वो दुश्चित निरंतर ॥१॥ माझे मायबाप बंधु हो बहिण । तुज करिति शीण त्यागीन मी ॥२॥ त्यांचे जरी तोंड पाहेन मागुता । तरी मज हत्या घडो तुझी ॥३॥ सकाळीं उठोन वेगळा निघेन । वाहातों तुझी आण निश्चयेसी ॥४॥ वेगळा निघतां घडिन दोरे चूडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥५॥ तायीत सांखळी गळ्याची दुल्लडी । बाजुबंदजोडी हातसर ॥६॥ वेणीचेंहि नग

सर्वही करीन । नको धरूं शीण मनीं कांहीं ॥७॥ नेमावया साडी सेलारी चुनडी । अंगीची कांचोळी जाळिया फुलें ॥८॥ तुका म्हणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥९॥

४०७२. उजळीतां उजळे दीपकाची वाती । स्वयंभ ते ज्योती हिऱ्या-अंगीं ॥१॥ येकीं महाकष्टें मेळविलें धन । येकासी जतन दैवयोगें ॥२॥ परिमळें केलें चंदनाचें चिन्ह । निवडी तें भिन्न गाढव तो ॥३॥ तुका म्हणे जया अंगीं नाम ठसा । तो तरे सहसा वंद्य होय ॥४॥

४०७३. सोवळा तो झाला । अंगिकार देवें केला ॥१॥ येर करिती भोजन । पोट पोसाया दुर्जन ॥२॥ चुकला हा भार । तयाची वेरझार ॥३॥ तुका म्हणे दास । झाला तया नाहीं नाश ॥४॥

४०७४. आजी शिवला मांग । माझें विटाळलें अंग ॥१॥ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठल विठ्ठल हृदयांत ॥२॥ झाली क्रोधासवें भेटी । तोंडा वाटे नर्क लोटी ॥३॥ अनुतापीं न्हाऊं । तुका म्हणे रवी पाहूं ॥४॥

४०७५. ठाव तुम्हापाशीं । झाला आतां हृषीकेशी ॥१॥ नलगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ॥२॥ चोरट्याशी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥३॥ तुका म्हणे मन । आतां झालें समाधान ॥४॥

४०७६. पाळीयेले लळे । माझे विठ्ठले कृपाळे ॥१॥ बहु जन्मांचें पोमणें । सरतें पायांपाशीं तेणें ॥२॥ सर्वे दिल्ही लागो । भातें आवडीचें मागों ॥३॥ तुका म्हणे भिन्न । नाहीं दिसों दिल्हें क्षण ॥४॥

४०७७. जो या गेला पंढरपुरा । आणिक यात्रा न मानी तो ॥१॥ सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥२॥ जन्मांतरींच्या पुण्य-रासी । वारी त्यासी पंढरिची ॥३॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडें दाटे गहिंवरे ॥४॥ दधीमंगळभोजन सारा । म्हणती करा मुरडीव ॥५॥ मागुता हा पावो ठाव । पंढरिराव दर्शनें ॥६॥ तुका म्हणे भूवैकुंठ । वाळ-वंट भीवरा ॥७॥

४०७८. न मिळती येका येक । जये नगरीचे लोक ॥१॥ भलीं तेथें राहों नये । क्षणें होईल न कळे काय ॥२॥ न करितां अन्याय । बळें

करिती अपाय ॥३॥ नाहीं पुराणाची प्रीती । ठाईं ठाईं पंचाइती ॥४॥ भल्या बुऱ्या मागीं । होता कोणी न निवारी ॥५॥ अविचारा हातीं । देउनी प्रजा नागवीती ॥६॥ तुका म्हणे दरी । सुखें सेवावी ते बरी ॥७॥

४०७९. शिकवणें नाक झाडी । पुढील जोडी कळेना ॥१॥ निरयगांवीं भाग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥२॥ अवगुणाचा सांठा करी । तोचि धरी जीवासी ॥३॥ तुका म्हणे जडबुद्धि । कर्मशुद्धी सांडवी ॥४॥

४०८०. गोपिचंदन मुद्रा धारणें । आम्हा लेणें वैष्णवां ॥१॥ मिरऊं अळंकार लेणें । हे भूषणें स्वामींचीं ॥२॥ विकला तो सेवे जीवें । येका भावें येकविध ॥३॥ तुका म्हणे शूर झालों । बाहेर आलों संसारा ॥४॥

४०८१. विषयाचे लोलिंगत । ते फजित होतील ॥१॥ न सरे येथें याति कुळ । शुद्ध मूळ बीज व्हावें ॥२॥ शिखासूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥३॥ तुका म्हणे अभिमान । नारायणा न सोसे ॥४॥

४०८२. वडिलीं दिल्हें भूमिदान । तें जो मागे अभिलाषुन ॥१॥ अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दंड यमा घरीं ॥२॥ उभयकुळ समवेत । नरकीं प्रवेशे अद्भुत ॥३॥ तप्तलोहा भेटी । तुका म्हणे कल्पकोटी ॥४॥

४०८३. लटिकि ग्वाही सभेआंत । देता पतित आगळा ॥१॥ कुंभिपाकीं वस्ती करूं । होय धुरु कुळेंसी ॥२॥ रजस्वला रुधिर स्रवे । तेंचि घ्यावें तृषेसी ॥३॥ तुका म्हणे जन्मा आला । काळ झाला कुळासी ॥४॥

४०८४. आचरे दोष न धरी धाक । परीपाक दुःखाचा ॥१॥ चांडाळ तो दुराचारी । अंगिकारी कोण त्या ॥२॥ नव्हे संतान वोस घर । अंधकार कुळासी ॥३॥ तुका म्हणे त्याचें दान । घेतां पतन दुःखासी ॥४॥

४०८५. किंविलवाणा झाला आतां । दोष करितां न विचारी ॥१॥ अभिलाषी नारी धन । झकवि जन लटिकेंची ॥२॥ विश्वासिया करितां घात । न धरी चित्त कांटाळा ॥३॥ तुका म्हणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥४॥

४०८६. घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिलाषी ॥१॥ तो येथें कामा नये । नरका जाय म्हणोनी ॥२॥ विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलाचें ॥३॥ तुका म्हणे दांभिक तो । नरका जातो स्वइच्छा ॥४॥

४०८७. सदा नामघोष करी हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥१॥ सर्वसुख ल्यालों सर्व अळंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ॥२॥ असो आतां कोठें आठवही नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥३॥ तुका म्हणे आम्ही झालों अग्नीरूप । लागूं नेदी पाप पुण्य अंगा ॥४॥

४०८८. वरीवरी बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्य भेटी नाहीं झाली ॥१॥ पारख्याचे मार पाहातांनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरा ॥२॥ मनाचा उदार रायाचा झुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥३॥ धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥४॥ तुका म्हणे साधु बोले खर्गधार । खोचतें अंतर दुर्जनाचें ॥५॥

४०८९. गंधर्व नगरीं क्षण येक राहावें । तेंचि पैं करावें मुळक्षेत्र ॥१॥ खपुष्पाची पूजा बांधोन निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥२॥ वंध्येपुत्राचा लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पहा वेगीं ॥३॥ मृगजळा पोही घालोनि सज्ञाना । तापलीया जना तोषवावें ॥४॥ तुका म्हणे मिथ्या देहइंद्रियकर्म । ब्रम्हार्पण ब्रह्म होय बापा ॥५॥

४०९०. दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कद्वारीं ॥१॥ ऐसें सांगों जातां जना । नये कोणाचिये मना ॥२॥ बरें विचारूनि पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥३॥ तुका म्हणे रांडलेका । अंतीं जासी यमलोका ॥४॥

४०९१. भाग्यवंत आम्ही विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥१॥ नाहीं ते पुरवित आणोनि जवळी । गाउनि माउली गीत सुखें ॥२॥ प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । बोळलीं सकळ सुखें ठाईं ॥३॥ आपुल्या स्वभावें जेथें जैसें असो । तेथें तैसें दिसो साजिरेंचि ॥४॥ वासनेचा कंद उपाडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥५॥ तुका म्हणे भक्तजनाची माउली । करील साउली विठ्ठल आम्हां ॥६॥

४०९२. भोंदावया मिस घेउनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥१॥ मनुष्याचे परी बोले रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥२॥ तिमयाचा बैल करी शिकविलें । चित्रिंचें बाहुलें गोष्टी सांगे ॥३॥ तुका म्हणे देवा जळो हें महंती । लाज नाहीं चित्तीं निसुंगाचे ॥४॥

४०९३. अंगीं घेउनियां वारें दया देती । तया भक्ता हातीं चोट आहे ॥१॥ देव्हारा बैसोनि हालविती सूपें । ऐसीं पापी पापें लिंपताती ॥२॥ येकीबेकी न्यायें होतसे प्रचीत । तेणें लोक समस्त भुलताती ॥३॥ तयाचे स्वाधीन दैवतें असती । तरी कां मरती त्यांचीं पोरें ॥४॥ तुका म्हणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तोहि नव्हे ॥५॥

४०९४. अधमाचें चित्त अहंकारी मन । उपदेशें शीण तया केला ॥१॥ पापियाचें मन न करी आचार । विधवेसी श्रृंगार व्यर्थ केला ॥२॥ अधमाचें चित्त दुश्चित ऐकेना । वायां शीण मना करूं काय ॥३॥ गर्दभासी दिल्ही चंदनाची उटी । केशर लल्लाटीं सूकराच्या ॥४॥ पतिव्रचकेसी सांगतां उदंड । परी ते पापांड तिचे मनीं ॥५॥ तुका म्हणे तैसे अभाविका सांगतां । वाउगा तो चित्ता शीण होय ॥६॥

४०९५. संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥१॥ वीट ये कर्णासी संतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥२॥ कथेमाजी नीज वाढे नित्यक्षगीं । स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ॥३॥ तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥४॥

४०९६. भोळे भाविक हें जुनाट चांगलें । होय तैसें केलें भक्तिभावें ॥१॥ म्हणवोनि चिंता नाहीं आम्हां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥२॥ आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्वसुख ॥३॥ तुका म्हणे आम्हां देवाची सांगात । नाहीं विसंबत येर येरां ॥४॥

४०९७. नाहीं बळ योग अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥१॥ तुझीये भेटीचें प्रेम अंतरंगीं । नाहीं बळ अंगीं भजनाचें ॥२॥ काय पांडुरंगा करूं बा विचार । झुरतें अंतर भेटावया ॥३॥ तुका म्हणे सांगा वडिलपणें बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणा ॥४॥

४०९८. हेंचि सुख पुढती मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥१॥ जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनी विठ्ठला दास ठेवीं ॥२॥ दुजा भाव आड येऊं नेदी चित्ता । करावा अनंता नाश त्याचा ॥३॥ अभय देऊनी करावे सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥४॥ तुका म्हणे

आम्ही जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरवीसी ॥५॥

४०९९. बहु जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोयरा करीं आतां ॥१॥ करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा आर्त सोडीं आतां ॥२॥ सोडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥३॥ पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरी ॥४॥ विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका म्हणे छंद नामघोषें ॥५॥

४१००. पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरीचे दास घेती जन्म ॥१॥ कर्म धर्म त्याचा झाला नारायण । त्याचेनी पावन तिन्ही लोक ॥२॥ वर्णाभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगोन मजपासीं ॥३॥ अंत्यजादि योनी तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाट झालीं ॥४॥ वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहीदास ॥५॥ कबीर मोमीन लतिब मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥६॥ कान्होपात्रा खेदु पिंजारीतो दादू । भजनीं अभेदु हरिचे पायीं ॥७॥ चोखामेळा वंका जातीचा माहार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥८॥ नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरिराव तिये सवें ॥९॥ मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगों ॥१०॥ यातायाति धर्म नाहीं विष्णुदासां । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥११॥ तुका म्हणे तुम्ही विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥१२॥

४१०१. ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करुनी म्हणती साधु ॥१॥ अंगा लाउनियां राख । डोळे झांकुनि करिती पाप ॥२॥ दाउनि वैराग्याची कळा । भोगी विषयांचा सोहळा ॥३॥ तुका म्हणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥४॥

४१०२. मानूं कांहीं आम्ही आपुलिया इच्छा । नाहीं तरी सरिसा रंकरावो ॥१॥ आपुल्या उदास आहों देहभावीं । मग लज्जा जीवीं चाड नाहीं ॥२॥ तुका म्हणे खेळों आम्ही सहजलीळे । म्हणोनि निराळे सुखदुःखा ॥३॥

४१०३. फिरविलें देउळ जगामाजि ख्याती । नामदेवा हातीं दुध प्याला

॥१॥ भरियेली हुंडी नरसि मेहत्याची। धनाजीजाठाचीं शेतें पेरी ॥२॥ मिराबाईसाठीं प्याला तो विषाचा। लाख्या कोलाट्याचा ढोल पिटी ॥३॥ कबीराचे मागें विणूं लागे सेले। उठविलें मूल कुंभाराचें ॥४॥ आतां तुम्ही दया करा पंढरिराया। तुका विनवी पायां वेळोवेळां ॥५॥

४१०४. निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर। निराकारी निरंतर राहिलोंसे ॥१॥ निराभासी पूर्ण झालों समरस। अखंड ऐक्यास पावलों आम्ही ॥२॥ तुका म्हणे आतां नाहीं अहंकार। झालों तदाकार नित्य शुद्ध ॥३॥

४१०५. पांडुरंगें सत्य केला अनुग्रह। निरसुनि संदेहो बुद्धिभेद ॥१॥ जीवशिवा सेज रचिली आनंदें। औटावे पदीं आरोहण ॥२॥ निजीं नीजरूपीं निजविला तुका। अनुहातें बाळका हाल्लरु गाती ॥३॥

४१०६. नाना मतांतरें शब्दाची वित्पत्ती। पाठांतरें होती वाचाळ ते ॥१॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दूरी। कैंची तेथें उरी देहभावा ॥२॥ यज्ञ याग जप तप अनुष्ठान। राहे ध्येय ध्यान ऐलीकडे ॥३॥ तुका म्हणे होय उपरति चित्ता। अंगीं सप्रेमता येणें लागे ॥४॥

४१०७. स्वप्नीं तोहि कैसा न पडसी डोळां। सुंदर सांवळा घवघवीत ॥१॥ चतुर्भुज माळा रुळे येकावळी। कस्तुरी निढळीं रेखिलीसे ॥२॥ शंख चक्र गळा रुळे वैजयंती। कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥३॥ तुका म्हणे स्वप्नीं दावी आतां पाय। पांडुरंग माय कृपावंत ॥४॥

४१०८. नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी। नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥१॥ हर्षामर्ष अंगीं आदळती लाटा। कामक्रोध तटा सांडीयेलें ॥२॥ न सरे हे भक्ती विठोबाच्या पाईं। उपरती नाहीं जेथें चित्ता ॥३॥ तुका म्हणे सुखें देहनिरसनें। चिंतनीं चिंतनें तद्रूपता ॥४॥

४१०९. शोधुनी अन्वयें वंश वंशावळी। परस्परा कुळीं उच्चारण ॥१॥ म्हणविलें मागें पुढें चालें कैसें। केला समरसें अभिषेक ॥२॥ यकछत्र झळके उन्मनी निशाणी। अनुहातध्वनी गगन गर्जे ॥३॥ तुक्या स्वामी स्थापी निजपदीं दासा। करूनी उल्हासा सप्रेमता ॥४॥

४११०. पुराणीक म्हणाविती। जाणुनी कांदे भक्षिती ॥१॥ अगस्तीचें

मूत्र मळ । लाउनी म्हणती कृष्णावळ ॥२॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥३॥ बधराहिच्या पाडी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥४॥

४१११. प्रवृत्तिनिवृत्तीचे आटुनीयां भाग । उतरिलें चांग रसायण ॥१॥ ज्ञानाग्नीहुतांशीं कडसिले वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ॥२॥ ब्रह्मीं ब्रह्मरस सिद्ध झाला पाक । घेतला रुचीक प्रतिती मुखें ॥३॥ स्वानुभव अंगीं झाला समरस । साधनीं निजध्यास ग्रासोग्रासीं ॥४॥ आरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरवला रंगीं निजात्मरंगें ॥५॥

४११२. सातां दिवसांचा जरी झाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ॥१॥ फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सोडूं नये ॥२॥ शरीराचे होत दोनी तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सोडूं नये ॥३॥ तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥४॥

४११३. पहिली माझी वोवी वोविन जगत्र । गाइन पवित्र पांडुरंगा ॥१॥ दुसरी माझी वोवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥२॥ तिसरी माझी वोवी वैरीलें दळण । गाइन विधान पांडुरंग ॥३॥ चौथी माझी वोवी तिला नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥४॥ पांचवी माझी वोवी माझिया माहेरा । जाइन निरंतरा पांडुरंगा ॥५॥ साहावी माझी वोवी साहाहि आटले । गुरुमूर्ति भेटले पांडुरंग ॥६॥ सातवी माझी वोवी आठवे वेळोवेळां । बैसलास डोळां पांडुरंग ॥७॥ आठवी माझी वोवी अठ्ठाविस युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥८॥ नववी माझी वोवी सरलें दळण । चुकलें मरण संसारींचें ॥९॥ दाहावी माझी वोवी दाहाहि अवतारा । न यावें संसारा तुका म्हणे ॥१०॥

४११४. किती सांगों तरी नायकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥१॥ नका नका करूं या रांडेची संगती । नेईल अधोगती घाली यम ॥२॥ तुका म्हणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनी थोबाड फोडी काळ ॥३॥

४११५. पिकलीया शेंद कडूपण गेलें । तैसें आम्हां केलें पांडुरंगें ॥१॥ काम क्रोध लोभ निमाले ठाईंची । सर्व आनंदाची सृष्टी झाली ॥२॥ आठव नाठव गेले भावाभाव । जाला स्वयमेव पांडुरंग ॥३॥ तुका म्हणे

भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ॥४॥

४११६. ढालतलवारे गुंतले हे कर । म्हणे मी झुंजार कैसा झुंजों ॥१॥ पोटीं पडदाळे शिले टोप वांझें । हें तों झालें दुजें मरण मूळ ॥२॥ बैसविलें मला येणें अश्वावरी । धांऊं पळों तरी कैसा आतां ॥३॥ असोनि उपाय म्हणे हा अपाय । म्हणे हाय हाय काय करूं ॥४॥ तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणें वर्म संतचरण ॥५॥

४११७. काय करूं न करीं धंदा । चित्त गोविंदा तुझे पाईं ॥१॥ ऐशा संकल्पाची संधि । माझी बुद्धि धीर द्यावा ॥२॥ कुटुंबाचा तुम्हा भार । मज वेव्हार निमित्य ॥३॥ तुका म्हणे करितां काम । हृदईं नाम धरीन ॥४॥

४११८. आजि नव्हे कालिच्या ऐसें । अनारिसें पालटे ॥१॥ आतां लागवेग करा । ज्याचे धरा ठाके ते ॥२॥ नका सांगूं वाउगे गोष्टी । चाहुल खोटी ये ठाईं ॥३॥ तुका म्हणे मोडा माग । आपुल्या लागे करूनी ॥४॥

४११९. खाणोरियांची पुसों घरें । जिहीं बरें पाळिती ॥१॥ सांगती त्या जावें वाटा । धरुनि पोटामध्यें गोष्टी ॥२॥ आली गेली होती ठाया । सत्य छाया कळली ॥३॥ तुका म्हणे आपुलें बळ । युक्ति काळ कारण ॥४॥

४१२०. येउनी नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजनमार्गीं ॥१॥ चंचळ चित्तासी ठेवोनियां ठाईं । संतांचिये पाईं लीन व्हावें ॥२॥ भावाचा पैं हात धरावा निश्चयें । तेणें भवभय देशधडी ॥३॥ नामा परतें जगीं साधन पैं नाहीं । आवडीनें गाईं सर्व काळ ॥४॥ तुका म्हणे धन्य वंश त्या नराचा । ऐसा निश्चयाचा मेरू जाला ॥५॥

४१२१. बीज जाळुन केली लाही । आम्हां जन्म मरण नाहीं ॥१॥ आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष झाला देव ॥२॥ साकरेचा नव्हे ऊंस । आम्हां कैंचा गर्भवास ॥३॥ तुका म्हणे अवघा जोग । सर्वां घटीं पांडुरंग ॥४॥

४१२२. वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥१॥ धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा येकनिष्ठ ॥२॥ पितृसेवा पुण्य लाधलें निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥३॥ अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥४॥ धन्य त्याची शक्ति

भक्तीची हे ख्याति । तुका म्हणे मुक्ति पाई लोळे ॥५॥

४१२३. मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असें ज्याचा त्यास नसे ठावा ॥१॥ भाग्यवंत घेती वेंचोनियां मोल । भारवाही मेले वाहातां वोझें ॥२॥ चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥३॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परिक्षवंता दृष्टि रत्न जैसें ॥४॥ तुका म्हणे काय आंधळिया हातीं । दिल्हें जैसें मोतीं वायां जाय ॥५॥

४१२४. रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥१॥ तेणें अंजनगुणें दिव्य दृष्टी झाली । कल्पना निवाली द्वैताद्वैतीं ॥२॥ देशकाळवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥३॥ न झाला प्रपंच झाला परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ॥४॥ तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेचि झाला अंगें तुका आतां ॥५॥

४१२५. येक ब्रह्मचारी गाढवा झोंबता । पळालें तें लाता हाणोनियां ॥१॥ गाढवहि गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजी ॥२॥ हे ना तैसें झालें हे ना तैसें जालें । तुका म्हणे गेलें वायांविण ॥३॥

४१२६. तूं माझा कोंवसा । परि न कळे या धसा ॥१॥ कुट खाति मागें पुढें । जाति निरयगांवा पुढें ॥२॥ मज म्हणताती कवी । निपेधुनियां पापी जीवी ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । आतां कोण लेखी जगा ॥४॥

४१२७. संतचरण रज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥१॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥२॥ कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे नामरूप ॥३॥ तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥४॥

४१२८. अनाथा जीवन । आम्हां तुमचे चरण । करुनि सांठवण । ते धरिले हृदईं ॥१॥ पुष्ट झाली अंगकांती । आनंद न समाये चित्तीं । कव-तुकें प्रीति । गाऊं नाचूं उल्हासें ॥२॥ करुणाउत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदी दुरी । प्रेमप्रीतिपडिभरें ॥३॥ मोह ममते करी गोवा । ऐसें आहे जी केशवा । तुका म्हणे सेवा । आणिक नाहीं जाणत ॥४॥

४१२९. यत्न आतां तुम्ही करा । मज दातारा सत्तेनें ॥१॥ विश्वास

तो पायावरी । ठेउनि हरि राहिलों ॥२॥ जाणताचि दुजें नाहीं । आणिक कांहीं प्रकार ॥३॥ तुका म्हणे शरण आलों । नेणें बोलों विनवितां ॥४॥

४१३०. स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां ॥१॥ नारायण नामें होऊं जीवन्मुक्त । कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ॥२॥ वैकुंठींचे जन सदा इच्छिताती । कइं येथें येती हरिचे दास ॥३॥ यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥४॥ तुका म्हणे पावावया पैल पार । नाममंत्र सार भाविकांसी ॥५॥

४१३१. व्यापक हा विश्वंभर । चराचर ज्याचेनी ॥१॥ पंढरीराव विटेवरी । त्याचीं धरीं पाउलें ॥२॥ अवघियांचा हाची ठाव । देवीं देव सकळ ॥३॥ तुका म्हणे न करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥४॥

४१३२. आमुची मिरास पंढरी । आमुचें घर भीमातीरीं ॥१॥ पांडुरंग आमुचा पिता । रखुमाबाई आमुची माता ॥२॥ भाऊ पुंडलिक मुनी । चंद्रभागा आमुची बहिणी ॥३॥ तुका जुनाट मिरासी । ठाव दिल्हा पायांपासीं ॥४॥

४१३३. गंगा गेली सिंधुपाशीं । जरी तो ठाव नेदी तिसी ॥१॥ तिनें जावें कवणा ठायां । मज सांगा पंढरिराया ॥२॥ जळ क्षोभे जळचरां । माता बाळा नेदी थारा ॥३॥ तुका म्हणे आलों शरण । देवा त्वां कां धरिलें मौन ॥४॥

४१३४. बाप माझा दिनानाथ । वाट भक्तांची पाहात ॥१॥ कर ठेवूनियां कटीं । उभा चंद्रभागे तटीं ॥२॥ गळां वैजयंती माळा । रूपें डोळस सांवळा ॥३॥ तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥४॥

४१३५. बैसों आतां मनीं । आलें तैसेंचि वदनीं ॥१॥ मग अवघेंचि गोड । पुरे सकळहि कोड ॥२॥ बाहेरलि भाव । तैसा अंतरींहि वाव ॥३॥ तुका म्हणे मणी । शोभा दाखवी कोंदणीं ॥४॥

४१३६. कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥१॥ ऐसें आम्हां मांडीयेलें । विठो त्वां कां सांडीयेलें ॥२॥ बैसोनि कल्पद्रुमातळीं । पोटासाठीं तळमळीं ॥३॥ तुका म्हणे नारायणा । बरें लोकीं हें दिसेना ॥४॥

४१३७. वेठी ऐसा भाव। न करीं आहाच उपाव ॥१॥ रूप डसवीन जीवा। अवघा येचि ठाईं हेवा ॥२॥ कृपणाचे परी। लेखा पळ निमिष्यवरी ॥३॥ तुका म्हणे असा। संनिधची जगदीशा ॥४॥

४१३८. कोडियाचें गोरेपण। तैसे अहंकारी ज्ञान ॥१॥ त्यासि आतां रिझे कोण। जवळि जातां चिळसवाणें ॥२॥ प्रेत देह गौरविले। तैसे विटंबवाणे झाले ॥३॥ तुका म्हणे खाणें विष्टा। तैशा देहबुद्धी चेष्टा ॥४॥

४१३९. सर्वसुखा अधिकारी। मुखीं उच्चारी हरिनाम ॥१॥ सर्वांगें तो सर्वोत्तम। मुखीं नाम हरीचें ॥२॥ एमी उभारिली बाहे। वेदीं पाहे पुराणीं ॥३॥ तुका म्हणे येथें कांहीं। संदेह नाहीं भरवसा ॥४॥

४१४०. हरिः ॐ तत्सदिति सूत्राचें जें सार। कृपेचा सागर पांडुरंग ॥१॥ हरिः ॐ दत्त उदात्त अनुदात्त। प्रचुररहित पांडुरंग ॥२॥ सर्वस्व व्यापीलें सर्वाही निराळें। वेदाचें जें मूळ तुका म्हणे ॥३॥

४१४१. काळ सार्थक केला त्यांनीं। धरिला मनीं विठ्ठल ॥१॥ नाम नाचे श्रवणीं कीर्ति। पाउलें चित्तीं समान ॥२॥ कीर्तनाचा समारंभ। निर्दंभ सर्वदा ॥३॥ निळा म्हणे स्वरूप सिद्धी। नित्य समाधि हरिनामीं ॥४॥

श्लोकरूपी अभंग

४१४२. तुजवांचोनि मागणें काय कोणा। महीमंडळीं व्यापक विश्व-जाणा। जीवभावना पुरवूं कोण जाणे। तूजवांचुनि होत कां रावराणे ॥१॥ नसे मोक्षदाता तिहींमाजि लोकां। भवतारकु तुजवांचूनि एका। मनीं मानसीं चिंतितां रूपनाम। पळे पाप ताप भयें नासे काम ॥२॥ हरीनाम हें साच तूझें पुराणीं। हरी हातिचें काळगर्भादियोनी। करूं सुखवाणी कसी देशधाडी। तुजवांचोनि वर्णितां व्यर्थ गोडी ॥३॥ भवभंजना व्यापका लोक तिन्ही। तुज वर्णितां शीणला शेषफणी। असो जीव भाव तुझ्या सर्व पायीं। दुजें मागणें आणिक व्यर्थ काई ॥४॥ दिनानाथ हे साक्ष तूझी जनासी। दिनें तारिलीं पातकी थोर दोषी। तुका राहिला पायिं तो राख देवा। असें मागतों तूमची पादसेवा ॥५॥

४१४३. उभा भीवरेच्या तिरीं राहिलाहे। असे सन्मुख दक्षिणे मूख

वाहे । पळे पाप महा सुटे कांप थोर । कसे गर्जती घोष हे नामवीर ॥१॥ गुणगंभीर धीर हा हास्यमूख । वदे वदनीं अमृत सर्व सूख । मुनिलागिं लागे बहु गोड चित्तीं । देहभावना तुटलियाचि खंती ॥२॥ ठमा घातला ये भूमिमाजि थोर । इच्छादान तें द्यावयासी उदार । सिद्धि वोळंगती जया सर्व ठायीं । तुझें नाम हें चांगलें गे विठाई ॥३॥ असे उघडा हा विटेवरि उभा । धरुनि कटीसूत्र हें भक्ति लोभा । पुढें वाट दावी भवसागराची । विठो माउली सिद्ध हे साधकाची ॥४॥ करा वेग हा धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तेंच साधी । म्हणे तुका पंढरीये सर्व आलें । असे विश्व हें जीवनें त्याचि जालें ॥५॥

४१४४. धना गुंतलें चित्त माझे मुरारी । मन घेउनी हिंडवी दारोदारीं । मन हिंडतां न पुरे यासि कांहीं । मही ठेंगणी परि ते तृप्ति नाहीं ॥१॥ पाहातां न दिसे निज शुद्धमती । पुढें पडिलों इंद्रिया थोर घातीं । जिव्हा ना सत्या संगती दंड बेडी । हरी शीघ्र या दुष्टसंगासि तोडी ॥२॥ असी आणिके काय सांगों अनंता । मोह पापिणी दुष्ट माया ममता । काम क्रोधही यातना थोर करी । तुजवांचुनि सोडवी कोण हरी ॥३॥ निजे देखतां निज हे दूरि जाय । निज आळस दंभ या भीत आहे । तया वस्ति देहीं नको देउं देवा । तुजवांचुनी आणिक नास्ति हेवा ॥४॥ करी घात-पात भय लाज थोरी । असे सत्य भाव बहू भक्ति दूरी । नको मोकलूं दीनबंधु अनाथा । तुका वीनवी ठेवुनी पायिं माथा ॥५॥

४१४५. पैल सांवळे तेजपुंजाळ कैसे । सिरीं तुर्बिलीं साजिरीं मोरपीसें । हरे त्यासि देखतां ताप माया । भजा रे भजा यादवा योगिराया ॥१॥ जया कामिनी लुब्धल्या सहस्र सोळा । सुकुमार त्या गोपिका दिव्य बाळा । शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी । रुपा मीनली साजिरी माळकंठीं ॥२॥ तया यादवा श्रेष्ठ हा चक्रपाणी । जया वंदिती कोटि तेहतीस तिन्ही । महा-काळ हे कांपती दैत्य ज्यासी । पाहा सावळें रूप हे पाप नासी ॥३॥ कसीं पाउलें साजिरीं कुंकुमाची । कशी वीट हे लागली दैवाची । जया चिंतिता अग्नि हा शांति नीवे । धरावा मानसीं आपल्या दृढ भावें ॥४॥ मुनी देखतां

मूख हे चित्त ध्याये । देह मांडला भाव हा बाप माये । तुक्या लागले मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥५॥

४१४६. असे नांदतु हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्निकाष्ठांत तेवीं । घटीं बिंबलें हें बिंब ठायिं ठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥१॥ तृणा वाटितां क्षीर हें होत नाहीं । पशू भक्षितां पालटे तेंचि देहीं । तया वर्म तों जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे ॥२॥ फळ कर्दळी शेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजि काये । धीर नाहीं तें वाउगें धीग झालें । फळ पुष्प ना यत्न ते व्यर्थ गेले ॥३॥ असे नाम हें दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या गळा आड ठेलें । कसें शुद्ध नाहीं दिसे माजि रूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥४॥ करा वर्म ठावे नका सोंग वायां । तुका वीनवीतो पडों काय पायां । त्यजी पुत्रदारा धनवासना हे । मग उरलें शेवटीं काय पाहें ॥५॥

४२४७. मना वासना सांडि हे दुष्ट खोडी । मनीं मानसीं एक हे व्यर्थ गोडी । असे हीत माझे तुज कांहीं एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें पायिं सूख ॥१॥ असा सर्व भावें तुज शरण आलों । देह दुःख हे भोगितां फार भ्यालों । भव तारि तें दूसरें नाहिं कोणी । गुरु होत का देव तेहतीस तीन्ही ॥२॥ जना वासना हे धना थोरी आहे । तुज लागली संगती तेचि सोय । करी सर्व संगीं परित्यागु ठायीं । तुका वीनवी ठेवुनी शीर पायीं ॥३॥

रामेश्वराचे अभंग

४१४८. पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची ॥१॥ शास्त्र पुराणेंहि गीता नित्यनेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥२॥ कर्म अभिमान वर्ण अभिमान । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥३॥ तैसा नव्हे तुका वाणी वेवसायी । भाव त्याचा पाईं विठोबाचे ॥४॥ अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करित्या अशुद्ध ऐसा कोण ॥५॥ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥६॥ उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळें । करूनि निराळें ठेविलें तें ॥७॥ भक्ति ज्ञान आणि वैराग्य वेगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥८॥ जप तप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम

कीर्तनें करूनियां ॥९॥ मागें कवेश्वर झाले थोरथोर । नेलें कलिवर कोणें सांगा ॥१०॥ म्हणे रामेश्वर सकळां पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनियां॥११॥

४१४९. माझी मज आली रोकडी प्रचित । होऊनि फजित दुःख पावे ॥१॥ काहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत झाली ॥२॥ ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥३॥ तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जो अवतार नामयाचा ॥४॥ त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । म्हणोनि हे बाधा जडली तुज ॥५॥ आतां एक करी सांगेन ते तुला । शरण जाईं त्याला निश्चयेसी ॥६॥ दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥७॥ तोचि हा विश्वास धरोनि मानसीं । जाय कीर्तनासी नित्य काळ ॥८॥ म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें । झालें हे आराम देह माझें ॥९॥

४१५०. वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥१॥ ऐशी वेदश्रुती बोलती पुराणें । नाहीं तीं दूषणें हरिभक्ता ॥२॥ उंच नीच वर्ण न म्हणावा कोणीं । जे कां नारायणीं प्रिय झाले ॥३॥ चहूं वर्णांसीही असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥४॥ जैसा शालिग्राम न म्हणावा पाषाण । होय पूज्यमान सर्वत्रांसी ॥५॥ गुरु परब्रह्म देवाचाही देव । त्यासी तो मानव म्हणूं नये ॥६॥ म्हणे रामेश्वर नामीं जे रंगले । स्वयें तेचि झाले देवरूप ॥७॥

४१५१. भक्त भागवत जीवनन्मुक्त संत । महिमा अत्यद्भूत चराचरीं ॥१॥ ऐसिया अनंतामाजी तूं अनंत । लीलावेश होत जगत्राता ॥२॥ ब्रह्मानंद तुके तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥३॥ शास्त्र शिष्टाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली ॥४॥ देऊनि तिळांजुळी काम्यनिषिद्धासी । विधीविनीयोगेशीं ब्रह्मार्पण ॥५॥ संतग्रहमेळीं जगदांध्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका ॥६॥ संतवृंदें तीर्थें गौतमी हरिकथा । तुकया नरसिंहस्था भेटों आली ॥७॥ शांतिपतिव्रतें झालें परिणयन । कामसंतर्पण निष्कामता ॥८॥ क्षमा क्षमेपणें प्रसिद्ध प्रथा जगीं । ते तों तुम्हां अंगीं मूर्तिमंत ॥९॥ दया दीनानाथा तुवां जीवविली । विश्वीं

विस्तारली क्रिर्ती तुझी ॥१०॥ वेदवाक्य बाहो उभारिला ध्वज । पूजिले देव द्विज सर्वभावें ॥११॥ अधर्मे क्षय व्याधी धर्माशीं स्पर्शला । तो त्वां उपचारिला अनन्य भक्ति ॥१२॥ ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सफळ केलीं वेदविहितें ॥१३॥ देहबुद्धि जात्याभिमानें वंचलों । तो मी उपेक्षिलों न पाहिजे ॥१४॥ न घडो याचे पायीं बुद्धी व्यभिचार । मागें रामेश्वर रामचंद्रा ॥१५॥

**टीप**—एकूण अभंग ४१५२. एक अभंग राहिला होता तो ६८० अ या क्रमांकास दिला आहे.

---

१. आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥१॥ प्रेम वाढविले देवा । बरवी घेवोनियां सेवा ॥२॥ केली विनवणी । तैशी पुरविली धणी ॥३॥ तुका म्हणे काया । रस कुरोंडि वरोनियां ॥४॥

२. हेंचि जतन करा दान । धरुनी चरण राहिलों ते ॥१॥ कांहीं न घाली भार । बहु फार सांकडें ॥२॥ द्यावि माझ्या हातें सेवा । हेंचि देवा विनवणी ॥३॥ तुका तुमचा म्हणवी दास । त्याचि आस पुरवावी ॥४॥

३. हेंचि सुख पुढती मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥१॥ जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥२॥ दुजा भाव आड येऊं नेदी चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥३॥ अभय देऊनि करावे सादर । क्षण तो विसर पडों नेदी ॥४॥ तुका म्हणे आम्ही जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरविसी ॥५॥

४. शेवटींची विनवणी । संत जनीं परिसावी ॥१॥ विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हांसी ॥२॥ पुढें फार बोलों काई । अवघें पाई विदित ॥३॥ तुका म्हणे पडिलों पाया । करा छाया कृपेची ॥४॥

*

## श्रीतुकाराम महाराजांच्या आरत्या.

( रामेश्वरकृत )

आरती तुकारामा । स्वामी सद्गुरुधामा । सच्चिदानंदमूर्ति । पाय दाखवी आम्हां ॥१॥ आरती० ॥ राघवें सागरांत । पाषाण तारियेले । तैसे या तुकोबानें । अभंग रचियेले ॥२॥ आरती० ॥ तुकीता तुळनेसी । ब्रह्म तुकासी आलें । म्हणोनि रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ॥३॥ आरती० ॥

( निळोबाकृत )

प्रपंचरचना सर्वही भोगुनि त्यागिली । अनुतापाचे ज्वाळीं देहबुद्धि हविली । वैराग्याची निष्ठा प्रगटुनि दाखविली । अहंता ममता दवडुनि निजशांती वरिली ॥१॥ जयजयजी सद्गुरु स्वामी तुकया दातारा । तारक तूं सकळांचा जिवलग सोयरा ॥ध्रु०॥ हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला । विरक्ती ज्ञानाचा ठेवा उघडिला । जगदोद्धारालागीं उपाय सुचविला । निंदक दुर्जनांचा संदेह निरसिला ॥२॥ तेरा दिवस वह्या रक्षुनियां उदकीं । कोरड्याचि काढूनि दाखविल्या शेखीं । अपार कविता शक्ति मिरवुनि विधि अंकीं । कीर्तन श्रवणें तुमच्या तरिजे जन लोकीं ॥३॥ बाळवेष घेउनि श्रीहरी भेटला । विधिचा जनिता तूंची आठव हा दिधला । तेणें ब्रह्मानंदें प्रेमा रूढविला । न तुके म्हणूनि तुका नामें गौरविला ॥४॥ प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें । कलिच्या काळामाजी अद्भुत वर्तलें । मानव देह घेउनि निजधामा गेले । निळा म्हणे सकळ संतां तोषविलें ॥५॥

---

# श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगांतील कठिण शब्दांचा कोश.

### अ.

अकळ, आकळ—कळण्यास कठीण.
अखम—अक्षम, पंगू.
अखय—अक्षय, नाश न होणारे.
अगुणा—निर्गुण, द्वाड, खोडकर.
अंगुळें—अंगठी.
अंगवणें—अंगीकारणें, स्वीकारणें.
अघोरजप—पिशाचमंत्रजप.
अठरा—अठरा पुराणें.
अठोनीवेठोनी—आडवातिडवा, वेडावाकडा.
अडबंद—कटदोरा, करगोटा.
अडांखा, आडाखा—धोरण, युक्ति, ताळा.
अत्यत—प्रत्यक्ष, अनुभव.
अर्धालपणा—श्रेष्ठपणा, मुख्यपणा.
अनर्गळ—निष्प्रतिबंध, स्वच्छंदी.
अनामिक—अंत्यज, महार, हरिजन इ०
अनारिसें, आनारिसें—वेगळें, अन्य.
अनु, आनु—अन्य, अणीक, दुसरा.
अनुहत, अनुहात—योगधारणेच्या वेळीं ऐकूं येणारा ध्वनि.
अबाळ—हाल, विपत्ति, क्लेश.
अबोलणा—न बोलण्यासारखा.
अभंड—विपुल, पुष्कळ.
अभिन्नव—नवल, अभिनव, अपूर्व
अभिळास—अभिलाष, इच्छा.
अभुक—भूक नाहीं अशी स्थिति, तृप्ति.
अरोथा—अपूर्व इच्छा.
अवकळा—स्वरूपनाश, तेजोहानि, तेजोभंग, फजिती.
अवगणी—सोंग.
अवगणें, आवगणें—ओळखणें.
अवश्वरा—अवसरा.
अशुद्ध—रक्त.
अशोर्भी—अशुर्भी.
असट—पाणचट, पातळसर.
असमाई—असह्य.
असुक—असुख.
असेरया—आश्रया.
असोशी—हांव, उत्कंठा.
अहिक्य, आहिक्य—ऐक्य, एकजूट.

### आ.

आइत, आइती—सामग्री, तयारी, साहित्य.
आउठावें, औठावें—ठेवावें.
आकळ—सत्यज्ञान, परब्रह्म.
आगळा—अधिक, फार मोठा.
आगा—मोठा, श्रेष्ठ.
आगोज—अगाध, भयंकर, मोठें.
आचावाचे—बडबड.
आत्रीतत्या—अतिताई, आततायी
आट—आड, हरकत.
आटी—प्रयत्न, खटपट, पराकाष्ठा.
आणी—टोक, अग्र.
आतळणें—जवळ येणें, शिवणें, स्पर्श करणें.
आतुडणें—सांपडणें, प्राप्त होणें.
आथिलें—असलेलें.
आदा—जमा, उत्पन्न.
आन—अन्य, दुसरा.
आपसया—आपोआप.
आपैतें—आपोआप, ऐतें.

आयणी—तत्त्वनिर्णयाची इच्छा.
आरणें—उत्सुक होणें, अधीर होणें, ओरडणें.
आरत, आराथ, आर्त—पीडिलेला, दुःखी.
आरंधे—दुःखाचा कोलाहल.
आराइणें—अनुकूल असणें.
आराणूक—शांति, सौख्य, उसंत.
आराला—उत्सुक झालेला.
आरालिया—आराधिल्या.
आरुष—आर्ष, अडाणी, छांदिष्ट.
आरोगणें—भक्षण करणें, खाणें.
आर्त—उत्कट इच्छा.
आर्थ—मागणें, याचना करणें.
आलगट—अल्लड, हूड, अडाणी.
आवारा—खटाटोप.
आवर्त—भोंवरा.
आविस—आमिष, लालूच.
आसडा—एकाएकीं अंगाला हिसका बसणें व त्यामुळें दुःख होणें.
आहाकटा—गडबड, ओरड, आक्रोश.
आहाच—वरवर.
आहाचपण—वरवरची कृति.
आहाचवाहाच—सामान्य, वरवर.
आळ, आळी—छंद, नाद, हट्ट.
आळवण—विनवणें.
आळीकर—छांदिष्ट, नादी.

## उ.

उखता—अवघा.
उखर—खडबडीत.
उखतां, उखितों—अवघे, उदासीन.
उगटिलें—वाईट.
उगलें—उगें, व्यर्थ, दुसरें, शांत.
उगवणें—उकलणें, सोडवणें.
उगळणें—ओकणें, माघारा येणें.
उगाणा—सर्व दोष व पापें आपणावर घेऊन केलेली सोडवणूक, गणना.
उगिया—रिकामा, फुकटचा.
उजगरा—जागरण, उशीर, विलंब.
उजरी—उदय, उत्कर्ष.
उदेशीं—उद्देशीं.
उदैजणें—उगवणें.
उद्वेग—उद्विग्नपणा, उदासीनता, अस्वस्थता.
उधातु—तीन,
उन्मन—लीन.
उन्मनी—मनाची लीनता जींत होते अशी पांचवी अवस्था.
उन्मळित—उघडलेला.
उन्हवणी—ऊन पाणी.
उपणणें—झडपणें, पाखडणें, धान्यांतील भूस कोंडा वगैरे निराळे होण्यासाठीं तें वाऱ्याच्या झोतावर उंचावरून सोडणें.
उपेग—उपयोग.
उबग—कंटाळा, त्रास.
उभारा—स्थिरता, स्तिमितपणा.
उमस—अवकाश, उसंत, विस्तार, उद्भव.
उमानें—उमजणें.
उरी—बाकी, ठाव, स्थिति.
उलंघ—उलंघणें, उलंघणारा.
उसंतणें—शेवटास नेणें, आटोपणें.
उसाळणें—हर्षविणें.
उसाळी—हर्षवितें.

## ऊ.

ऊर्मी—मनाचे तरंग.

## ऋ.

ऋणिया—ऋणकरी, कर्ज घेणारा.

## ए.

एकावळी—एकपदरी हार.
एकीसवा—एके ठिकाणीं.

**एक्याच**—उगाच, न बोलतां.

## औ.

**औट**—साडेतीन.

**औटपीठ, औठडें**—योगशास्त्रांतील ४ थें स्थान ( त्रिकूट, श्रियांट, गोलाट, औटपीठ हीं चार महाकारणस्थानें.)

**औठावे**—ठेवावे.

## क.

**कंकर**—खडा, निखारा.

**कडविड**—खिडूकमिडूक, रजगीविजगी-सोन्याची रुप्याची इत्यादि.

**कडसणी**—विचार.

**कणव**—करुणा.

**कंदु**—कांदा.

**कप**—कापूस किंवा त्यासारखा जलद पेटणारा पदार्थ.

**कपाट देणें**—दार लावणें, बंद करणें.

**करबाडें**—कडबा.

**करमर**—शस्त्रविशेष.

**करमुर**—कळा.

**करवडी, करवंडी**—पोटाची खांच, फार भूक लागली असतां 'करवड वाळली' असें म्हणतात.

**कर्णधार**—नावाडी.

**कर्दळी**—केळ.

**कलवड, कलवडु**—गोवऱ्यांचा ढीग रचून त्यावर लिंपण घालून ठेवितात तो; डेरे वगैरे मडक्यांचें लिंपण.

**कल्पणें**—वाटणें.

**कव**—मिठी, वेंघ.

**कवळ**—काविळीनें डोळ्यांवर पिवळेपणा येतो तो; घास.

**कवळणें**—घास घालणें, कृपा करणें.

**कळस**—शेवट, कलश ( तांब्या, घागर ).

**कळह**—कलह, भांडण.

**कळांतर**—व्याज.

**कळी**—खडा.

**काचणी**—जाचणी.

**कांचवटी**—काच.

**काचाकुची**—काचकूच.

**काचें**—कच्चें.

**काट**—मळ.

**कांटवण**—कांटेवन, कांटेरीरान.

**काटी**—वीस.

**कानकोंडें**—चोरटें.

**कानवडें**—एका अंगावरले, वांकडें.

**कापडी**—यात्रेकरू, निशाण घेऊन नेहमीं वाऱ्या करणारा.

**कामारी**—सेवक, चाकर.

**कामावणें**—कमावणें, मिळविणें.

**कारियाची**—कार्याची.

**कालाबूल, कालाबुली**—कासावीस.

**काव्हविणें**—त्रासविणें, चिडविणें.

**काहाळा**—वाद्यविशेष.

**काहो**—घोष,

**काळोसा**—काळोख.

**कीर**—खचीत, निश्चयात्मक.

**कीरवा**—डुकर.

**कुकारा**—मोठी हांक, हरळी.

**कुंकुड, कुंकड**—कोणीकडे.

**कुंचा**—मोरचल, मोरपिसांचा कुंचा.

**कुची**—फुकट, गल्लीकुचीचें.

**कुच्या**—खांचा, भोंवऱ्यानें भोंवऱ्यास आदळतात त्या, गुचे.

**कुटीमेटी**—घरदार.

**कुठावा, कुडावा, कुढावा**—रक्षण, भिंत.

**कुठोरा**—दुसरा.

**कुठोरी**—कोठवर.

कुडी—कपटी, वांकडी.
कुडें—वांकडें, हेवेखोर, वाईट.
कुढणें—मनांतल्या मनांत जळणें.
कुलाकुड—वाईट लाकूड.
कुश्मळ, कुश्चिळ – कुत्सित, घाणेरें, मलिन.
कुसरी—कुशळता, कौशल्य.
कुळवणी—कोळवणी, जमीन सपाट किंवा भुसभुशीत करणें.
कुळीक—अजीर्ण, मोडशी.
कूट—निंदा, कूट खाणें-निंदा करणें.
केजें—धान्य, नारळ.
केत्रा—पाड, थोरी.
केळवणें—केळवण, लग्नाच्या पूर्वींची मेजवानी, मिरवणें.
कैवाड, कैवाडें—कारस्थान, युक्ति, तजवीज, धीर, अवसान.
कोड—कौतुक, आवड.
कोडिसवाणें—मौजेचें, गोजिरवाणे.
कोप, कोंपट—झोंपडी, घर, खोपटी.
कोवसा—आश्रय, आधार.
क्याला, क्याल्या—कां, कशाकरितां.
क्रमणें—मरणें, जाणें.

## ख

खंद—मक्ता, ठराव.
खत—व्रण, खवंद, क्षत.
खेतला—खचलेला, भरलेला.
खद्योत—काजवा.
खलेती—जींत अर्ज अथवा पत्र घालतात ती थैली, खलिता.
खक—छंद, नाद.
खाई—छाया.
खाण, खाणें—ठिकाण, स्थान, वस्ती, मुक्काम, खाण्याचे पदार्थ.
खाणोरा—खादाड, खाणचोर.
खातड—उकिरड्यांत राहणारा.
खान—खानचोर, खणती लावून चोरी करणारा.
खालें—खालीं.
खुडा – अवयव.
खेदी—दुःख देई.
खेंवलें—जडलेलें.
खोंकर—मोडकळीस आलेलें, फुटकें.
खोडणें—वाईट चाल, खोडी लागणें.
खोडावणें—खोडाविडी होऊन पडणें, लुळा होऊन पडणें.
खोळ—गुह्य.
ख्रौसा—खिजमतगार.

## ग.

गडसंद—अडचण, कचाटी, पेंच.
गदारोळ—मोठी गर्जना, पांडित्य, निरूपण.
गभस्ति—सूर्य.
गरुडटका—गरुडाचें चिन्ह असलेली पताका.
गवांदी—अन्नसत्र.
गव्हान—गव्हाण, पांगळ्याच्या हातांतील टेंकण, गावानें.
गहिला—वेडा.
गांजिवा—पिशवीसारखें जाळें.
गांठ्याळ—आंतल्या गांठीचा, कपटी.
गांडमर्णा—गुह्य.
गांढा—दुर्बळ, नपुंसक, गांडू.
गादणें—मळणें, पीडा देणें, पीडा पावणें.
गांवढळ, गांवढाळ – अडाणी.
गिव्हे—गरीब.
गुज—गुह्य, गुप्त गोष्ट.
गुढार—लमाण डोंबारी वैदू कोल्हाटी यांच्या चटयांच्या झोंपड्या, अंधारी, गूढ.

गुढी—ध्वज, पताका.
गुंत, गुंती—गुंता, घोटाळा.
गुफणें, गुंफणें—जुळणी करणें, चरणें, गुंतणें.
गुमान—अभिमान, अहंकार, गर्व, ताठा, पर्वा.
गेठा—गळयांतला एक दागिना.
गोठी—गोष्टी.
गोमटा—सुंदर, चांगला.
गोरांजन—नर किंवा नारी ईश्वरप्रीत्यर्थ आपणास जाळून घेतात त्या साधनाचें नांव.
गोऱ्हवाडी—गुराडी.
गोवळा—गवळी, भूत.
गोवा—गोंधळ, घोंटाळा.
गोवार—शेणखळा.
गोही, ग्वाही—साक्षी, साक्षीची जबानी.
गौरवें—गौरवानें.
ग्यानगड—ज्ञानाचे गड.

## घ.

घमंडी—पुष्कळपणा, विपुलता, गर्व, पोकळ डौल.
घराचारी गृहस्थाश्रमी, घरंदाज.
घायवटा—जखम.
घालन—धोका, संकट, घाळणीचें-धोक्याचें रान, चोराचें रान.
घुमरी—पुष्कळ.
घुसमांडणें—श्वास कोंडणें, कोंडमारा करणें.
घुळी—पोळ, सांड.
घोगें—मोठें, घबाड.
घोंघाणिया—घामट बायको.

## च.

चपे—सांदीस.
चपेट—झपाटा, सपाटा.
चपेटा—थप्पड देणें.
चर्मक—चांभार.
चर्या—तऱ्हा, प्रकार.
चाकाटणें—चकित होणें.
चांग—चांगला.
चाच—चलाख, चपल, चंचल.
चाट—बडबड्या, बहुभाष.
चाटू—सैंपाकाची पळी.
चाम—चामडें, चर्म.
चार—उपचार.
चार—चारी वेद.
चावटी—वाचाळपणा.
चिकरणें—विखरणें.
चिंतवनीं—चिंतावनांत.
चितांक, चितांग—गायकांच्या गळयांतील एक दागिना.
चिंतावणें—चिंतेंत पडणें.
चिरा—धोंडा, दगड. ( ' घालूं जीवपणा चिरा ' जीवित्वावर धोंडा घाल म्हणजे नाहींसें करूं. )
चिनचिनी, चिणचिणी—रात्रीं चिनचिन असें ओरडणारा प्राणी, रात्र.
चुंभळ—चोंबडें, आशाळभूत.
चेइणें—चेतणें, जागृत होणें, चेष्टा करणें.
चेडा—चेटक.
चेत—चित्त.
चेवणें—चालू होणें, चालू करणें.
चोखटा—चांगला.
चोखडा—चोख, चांगला.
चोजवणें—चकित करणें, मोठ्या उल्हासानें करणें.
चोपडू—लोणी तूप वगैरे चोपडलेला पदार्थ.
चोहटा—चवाठा.
चौघाचार—चौघांत न्याय, पंचाईत.
चौबार—चवाठा.

## ज.

जति—यति, अवसान, बौद्धपंथी यति, संन्यासी.
जती—शक्ति, अधिकार, जत्रा.
जनाचार—पंचाईत.
जमान—जामीन.
जयेजत—जये-जेव्हां. जत-अद्वैत
जरजर—जीर्ण वस्त्र, फाटकें वस्त्र.
जवळिके—जवळ, समीप.
जाडा—झाडा.
जार—गर्भवेष्टन, प्रसूतीनंतर निघणारी वार.
जाहाती—जुलूम, जास्ती.
जिव्हार—अंतःकरण, बीज, मर्म.
जीणें—वांचणें.
जुग—युग.
जुंझार, झुंजार—योद्धा, पराक्रमी.
जुंतणें—जुंपणें.
जुंती—जुपणी
जेंगट—एक प्रकारचें वाद्य.
जेठी—पहिलवान, मल्ल.
जेवा—जेवण.
जोड, जोडी—संपादणी.
जोतिला—जोडला.
जोहर—अग्नि, आग.
जोहारणें—नमणें, वांकणें.
ज्यालेपण—जिवंतपण, जन्म.

## झ

झकणें—चकित होणें, फसणें.
झड—झडप.
झणी—झटकन्, लवकर, कदाचित्, नाहीतर.
झळई—मृगजळ, उष्णता.
झळंवा—वेढा देणारा, गुंडाळणारा.
झांसा—दहशत, धास्ती.
झोंटी—डोक्याचे लांब केस.

## ट.

टकणें—शकणें, करूं शकणें.
टकळा—घोष.
टका—अग्रभाग.
टणक—मोठें.
टाकणें—मिळणें, पावणें, पडणें.
टाकी—कृति, आवड.
टांचणी—टंचाई, उणीव.
टांचर—जोड्याची टांच.
टांचें—टंचाई, तोटा, उणें.
टाहो—घोष, टकळा.
टेवा—ढब, डौल.
टोका—माप, कांटा, ताजवा.
टोकें—टोकून राही.
टोप—युद्धाचे वेळीं घालण्याचें शिरस्त्राण

## ठ.

ठकणें—ठकवणें, फसवणें.
ठाकण, ठाकणी—ठिकाण, जागा.
ठाडा—उभा.
ठाणमान—शरीराची रचना, बांधा, सुरेखपणा.
ठावें—जागा, ठिकाण.
ठेंगा, ठेंग्या—सोडगा, काठी.
ठेणें—राहणें.
ठोंबरा—वाईट साईट धान्य.
ठोंचा—टोळू, टिकोरें.

## ड.

डसवणें—चिकटावणें, तादात्म्य करणें
डाई—द्वेपी, शहांत, गोल्यांत.
डांक—एक वाद्य. खुनी आरोप्याचा पत्ता लावण्याकरितां कुंभार डांक वाजवितो, मग खुनाचें वारें अंगांत येऊन खुनाची माहिती सांगतो· अशी समजूत आहे.

डांब—काठी.
डाय—द्वेष, डाव.
डाव—डाग, ( लोखंड तापवून अंगाला देतात तो. )
डिंगर—मूल, लेंकरूं.
डिवणें—उपद्रव देणें, मारणें.
डिवी—मारकट.
डेंगा—ढ, जड.
डोबड—म्हसरूं, खंदक, दिवा.
डोहणा—टोमणा, ठोसरा, विघ्न, आडकाठी.
डौरणें—सजणें, शोभणें.

ढ.

ढवळार—हवेली, मोठी इमारत.
ढवा—गाणारणीची साथ करणारा, हिजडा; नपुंसक.
ढाळ—रीति, चाल.
ढाळणें—झाडणें, हालवणें.
ढिसाळ—उंच.
ढुंग—ढुंगण.

त.

तजणें—त्यागणें.
तट—तफावत, प्रतारणा, भांडण.
तंट—बोभाटा, हाकाटा, प्रख्याति.
तडताथवड—तातडतोब, तात्काळ.
तन—तृण, रानझाड, गवत.
ताकट—घामट, ओखट.
ताकपिरें—ताक पिणारीं, ताकट, घामट.
ताटस्थ—तटस्थ.
तानें—बच्चा, तान्हें बाळ.
तापटणें—थापटणें.
तारातीर—ताडातोड, त्रिस्थळी.
ताळी—देहसत्यत्व.
तिमाणें—शेतांत माणसाच्या आकृतीनें बुजगावणें.
तिळतांदळा—सर्वांशीं मिळून चालणारा मनमिळाऊ.
तुक—तोल, वजन, महत्त्व.
तुटी—तूट, तुटणूक.
तुरतुरा—झपाट्याचा.
तूर—वाजंत्रें.
तेजी—पाणीदार घोडा.
तोंडक—भांडण, भांडखोर.
तोडर—तोडा, वाळा.
तोरड—सांखळी, तोरडी घालणें म्हणजे जिंकणें.
त्राहाविलीं—त्रासविलेलीं.
त्रिपुटी—ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान; हीं तीन अथवा ध्येय, ध्याता, ध्यान.
त्रिमिर—तिमिर, अंधार.

थ.

थकित—थक्क झालेला.
थडवा—अल्प जलाशय.
थाटी—जमाव, मंडळी, समुदाय.
थार—आश्रय.
थिकणें—खेद करणें, दुःख करणें.
थिता, थीता—वांयां.
थिल्लर—डबकें.
थेटें—शैत्य, सर्दी, पडसें.
थोकडा—लहान, लघु.
थोटें—दांडगा, हरामी, गुलाम.

द.

दंडणें—सजणें.
दंदी—वादी, द्वेषी.
दमामा—मोरचा.
दरकूट—दरेखोरे.
दर्दुर—बेडूक.
दसडी, दसोडी—दशी.
दादुला—नवरा.

**दारवंटा**—उंबरठा.

**दिठी**—दृष्टि.

**दिंडी**—एक तंतुवाद्य.

**दिवसें**—कणकीचा एक प्रकारचा पदार्थ.

**दी**—दिवस–"सात दी–सात दिवस" इ.

**दुचाळा**—कातरी, चिमटा, दोन टोकांचें हत्यार, अडकित्ता.

**दुडी**—घागर.

**दुणवणी**—दुप्पट करणें.

**दुधाणी**—दूध तापविण्याचें मांडें भांडें.

**दुम करणें**—धूम ठोकणें.

**दुमाला**—पिछाडी, मागली बाजू, पाठ.

**दुलड**—गळ्यांतला दागिना.

**दुश्चित्त**—दुःखी, खिन्न.

**दुऱ्हें**—दुप्पट.

**देखणा**—पाहणारा.

**देखी**—देखणें, दृष्टि, अवलोकन.

**देखीचा**—ज्ञानाचा, विचाराचा.

**देखोवेखी**—पाहून.

**देवलसी**—देवपिसा.

**देवाईल**—देऊळ, देवालय.

**देहाडा**—देह.

**दो**—दोन, दो पाहारा=दोन प्रहरां.

**दोमदोम**—फकीरांचा भिक्षा वगैरे मागतांनाचा शब्द.

**दोरा**—एक दागिना, सुताच्या वाकी कंगण्या इत्यादि.

**दोहींसवा**—दोहींकडे.

**ध.**

**धगी**—धग, आग, उष्णता.

**धडपुडी**—खरोखरी.

**धडाफाडी**—धडफाडणारी.

**धण धणी**—समाधान, तृप्ति, भर, पुर्ती.

**धंदधंद**—सोंगें, ढब, ढंग.

**धसा**—कुटाळ, मूर्ख.

**धाटे**—दाट.

**धाणें**—तृप्त होणें, संतुष्ट होणें.

**धाय**—हंबरडा.

**धारण**—घुसळखांबा, जमिनीपासून आढ्यापर्यंत पोंचणारा मुख्य खांब.

**धाव**—बीळ, गुहा.

**धिंग**—ओतप्रोत, गजर, धूम.

**धिंद**—धिंदवडा.

**धिंदधिंदे**—ढांगोरा, प्रसिद्धि.

**धीर**—अवकाश, विलंब.

**धुडका**—धडकी.

**धुडवणी**—पोकळ डौलाचा, वायचळ.

**धुनी**—गोवऱ्याची आगटी, नदी.

**धेंडें**—पोकळ अवडंबर.

**न.**

**नंदुली**—नणंद

**नल्हाचि**—( नलाहाची ) न पावणें.

**नळी**—नरडी, मान.

**नागर**—रम्य, सुंदर.

**नागवणें**—नाटोपणें, अनावर होणें.

**नागीवा**—नागवा, उघडा.

**नाटक**—नाटकी, खेळ करणारा.

**नाड**—विघ्न, अडचण, नड.

**नाडियें**—नक्कें, सुसरीनें.

**नाड्या**—नक्रास.

**नाथणें**—पीडा देणें, खोड मोडणें.

**नांद्या**—नंदीबैल, मूर्ख.

**नाहो**—नाथ, नवरा.

**निकी**—नेटकी, चांगली, खरी.

**निकुर**—निश्चय.

**निगुती**—निभ्रांत, खास, निःसंशय.

**निगुरा**—ज्यानें गुरु केला नाहीं तो.

**निघोट**—दाट, परिपूर्ण.

निढळ, निढळ—केवळ, कपाळ.
निढारणें—भरून येणें.
नित—नित्य.
निदसुरा—झोंपेच्या धुंदींत असलेला.
निधाई—धन्य, कृतकृत्य.
निपट—अगदीं, सर्वस्वीं.
निपराध—दुष्ट, नीच.
निपराधी—निरुपयोगी, अप्रयोजक.
निंब देणें—तुच्छ करणें, दोष देणें.
निरंजन—प्रकाशरूप.
निरय—नरक.
निरवणें—सोंपवणें, हवालणें.
निरसणें—नाहींसें करणें, निस्तारणें
निरांजणें—त्रासणें, वैतागणें.
निरुतें—खरें, निश्चित.
निरे—निखालस, शुद्ध, निर्मळ.
निर्वाण—अंत.
निर्वाळा—निवाडा.
निष्टंक—खचित, निःसंशय.
निसुग—निर्लज्ज, निलाजरा.
निसुर—निखालस, निश्चित.
निक्षेपणें—ठेव ठेवणें, द्रव्य पुरून ठेवणें.
नीस—निवड, पृथक्करण.
नुधवणें—न उचलणें, वर न करणें.
नेपुर—नूपुर, पैंजण, तोरड्या.
नेवरा—खुर, नखी.
नैश्वर्य—नाशवंत.
न्याहाल्या—गाद्या गिरद्या वगैरे

प.

पग—पाऊल, पाय, पावलाची खूण.
पच—पचन, संचय.
पटंगा—आसरा.
पटे—पट, वस्त्र.
पडदळ—तरवार अडकविण्याचा पट्टा, सामान.
पडिपाडें—सारखेपणें.
पडिभर—मोठेपणा, डौल, आसक्ति.
पढियंता—आवडता, प्रिय, लाडका.
पढिये—आवडीचा, आवडेलसा.
पतंग—तांबूस रंगाचें एक लांकूड, पांखरूं
परताप—प्रताप, दक्षिणा.
परमाई—वीरमाता, वीरसू.
परवडी—चातुर्य, प्रकार.
परावा—परका.
परावी, पराविया—परक्या, परकी
परावें—परकें.
पराश्रम—दुसऱ्याचा आश्रम.
परियेळ—परळ, ताटली, तबक.
पहुडणें—पडणें, निजणें.
पऱ्हे—पाणपोई.
पाइकी—सेवकपणा.
पाईक—सेवक, चाकर.
पांकुळणें—विसकळणें, सैल होणें.
पाख—शुद्ध, स्वच्छ.
पाखर—कृपा, छाया.
पांग—पराधीनता, पंगूपणा.
पांगणें—पराधीन होणें, विस्कळीत होणें, पसरणें.
पागोरा—झाडाचीं बारीक मुळें.
पाठोवाटी—पाठोपाठ.
पाड्येळ—ओझें वाहण्याचें जनावर.
पाडेवार—महार.
पाणचोरा—फुटकें भांडें, मडकें, गारोड्या जवळचें एक पात्र.
पाणोवाणी—पाठोपाठ.
पातेजणें—विश्वासणें.
पातेरा—वाळलेलीं पानें, पाचोळा.
पाधाणी—अडाणी बायको.

पानसरा—आडवा.
पानेडी—पानाआड, खांदी.
पान्हेरी—पोवई.
पापरी—लात.
पाबळीं—तीरीं.
पायरिका—पायरीच्या.
पायवणी—पायांचें पाणी ( तीर्थ )
पारुषणें—कुंठित होणें, सुटणें.
पान्हेरा—संगत.
पास—पसंत, स्वच्छ.
पाहुणेर—पाहुणचार.
पिटणें—पिडणे, त्रास देणे.
पिटपिट—चिरचिर.
पिलंगणें—पुढें पुढें धांवणें, पकडूं पाहणें.
पिशवी—गोमुखी.
पिशुन—चहाडखोर, दुष्ट.
पुंजाळणें—तेजःपुज दिसणें.
पुट—प्रकार, रूपांतर; लेप, पातळ थर.
पुंड्र—कपाळींचा टिळा.
पुनस्कार—पुरस्कार.
पुरलासाठीं—चैनीसाठीं.
पुस—पुच्छ, शेंपुट.
पेंठवणी—बिदागी, पाठवणी.
पेंडखान—जनावराचा रतीब.
पेंढा—जोंधळे किंवा भातेणांची टाळ.
पेणा, पेणें—मुक्काम, वस्ती.
पेणावळें—उठावणीस येणें.
पेसपाड—डावपेंच, ताळतंत्र.
पेल—पलीकडे.
पोभाळणें—चोळणें, घासणें.
पोरवडा—अव्यवस्था.
प्रताप—दक्षिणा.

फ.

फक्का—तोंड भरून खाणें.
फटकाळ—वाईट बोलणारा.
फटमर—भित्रा, पळपुटा.
फटमरें—गांवढेपणाचें.
फडी—निकाल, उलगडा.
फळकट—फोलकट.
फांजी—आडफाटा, अडचण.
फांदा—संकट, घोंटाळा.
फावणें—साधणें, हातीं लागणें.
फांसावणें—समजणें, उमजणें.
फिका—निस्तेज.
फिरंगी—तरवार, तिखें.
फुंज—अभिमान, गर्व.
फुंदणें—डौल, गर्व करणें.
फुदी—स्त्रीचें जननेंद्रिय.
फुलवरा—माळ, गजरा.
फोडी—खांड, तुकडा.

ब.

बंदखाणा—बंदीखाना.
बरग—ज्वारी बाजरी नाचणी इ. जातींचें बीज.
बरवंट—चांगला, सुंदर.
बरवया—सुंदर, सुरूप.
बराडी—आशाळभूत.
बहिरवार—बाहेर राहणें.
बहुडविणें—जिकडच्या तिकडे धाडणें, मागें लावून देणें.
बहुडा—मोठा.
बळरया—बळाची योग्यता.
बळियाढा—दृढनिश्चयी.
बाखर—मोदकांचें किंवा करंज्यांचें पुराण.
बाजागिरी—गारुडविद्या, हातचलाखी.
बांडा—काळया पांढऱ्या रंगाचा.
बांदवडी, बांदोडी—बंदीखाना.
बाधिका—भ्रांति, बाधणारी.

बापुला--बाप.
बार--पाळी, घोष, हव्यास.
बालिस्ट--लोड, तक्या.
बासणें--चालणें.
बासर--शिळें अन्न.
बिडवई--श्रेष्ठ, हितकर्ता.
बिढारू--बिऱ्हाड, घर.
बिदी--गल्ली, रस्ता.
बुच्या--निर्लज्ज, मूर्ख.
बुझावणें--समजावणें.
बुर्धी--बुरख्याचें वस्त्र.
बुनादीचें--अनादिकाळाचें.
बुर--भुस्सा.
बेंबळ--ढिला.
बरसो--विचारशून्य, दांडगा.
बोटवरी--बोटावर.
बोनें--नैवेद्य, बळी.
बोभा--हाका, बोंबा.
बोहरी--राखरांगोळी, नाश.
बोळावा--सोबती.

भ.

भकांद्या--कुचेष्टा.
भंडभंड--रिकामी बडबड.
भरोवरी--सामग्री.
भवतारिया--भवतारक.
भाकणें--मागणें, विनवणें.
भाज--भार्या, बायको.
भांजलीखांजणी--क्षयवृद्धी.
भाटवोळीपणा--बडबड.
भांड--बहुभाषी, भिकारी.
भांडाई--भांडखोरपणा.
भाणें--ताट, पात्र.
भातुकें--खाऊ, खाद्य.
भातें--मजुरी.
भार--समुदाय, जमाव.
भावणें--भावना करणें.
भास, भासी--भाताचा कोंडा.
भिंगुळवाणें--भयानक, उदासवाणें.
भेव--भय.
भोज--आवड.
भोत--चामडें काढून राहिलेली आकृति, वाईट भाग.
भोरडी--क्रौंच पक्षी, करकोचा.
भोवरी--बुगडी.

म.

मठारे--ढोंगी साधु.
मंडण--भूषण.
मतोळा--घोंटाळा, घाला.
मंदला--भाव उतरला, स्वस्त झाला.
मदार--मुसलमानाचें थडगें.
मनणें--मानणें.
मरो--मरण.
मवणें--मोजणें.
मविता--मोजणारा.
मवेश--मायेश.
महजर--हुकूम, सनद.
माखणें--मळ लागणें.
माजिरा--माजोरी, मस्त.
माजिरें--माज, धुंदी.
माठ--मंद,
माति--देह ( अलंकारिक ).
मात्रा--वासनांचे विषय.
माथुलिया--मडकी.
मादळा--मृदंग.
मांदें--समुदाय, मेळा.
मापणें--मोजणें.
मारगेली--व्यर्थ गेली.
माव--माया.

**माविकपणें**—मोल पावणें.
**मिनणें**—मिळणें, ऐक्य पावणें.
**मीनती**—वियोग.
**मुडतर**—दैन्य, दुःख.
**मुडताळणें**—वळणें, लवलवणें.
**मुडा**—पंगु, कुब्ज.
**मुऱ्हाळी, मुळहारी**—बोलावणें.
**मुसाफा**—मुसलमानाचे धर्मग्रंथ.
**मुसावणें**—पूर्णपणें भरणें.
**मूळ**—बोलावणें.
**मूळडाळ**—मूळपाळ.
**मूळबंद**—आरंभीचा बंद.
**मोकट**—मोकळा.
**मोकळ**—रिकामा, निरुद्योगी.
**मोट**—चौफळ, सारख्या चवाळयाची मोट, ओझें.
**मोड, मोडी**—आकार, पद्धत, गुंता.
**मोहरी**—वाद्य.
**मोहोरणें**—प्राप्त होणें, शिरणें.
**मोळा**—ओझें, रीतरिवाज, चाल.
**म्हणियारा**—सेवक.
**म्हणियें**—काम, कार्य.
**म्हनेरा, मनेरी**—मन, तगादा.
**म्हूण**—म्हणून.
**म्हैसा**—रेडा.

**य.**

**याति**—जाति, ज्ञात.
**यारी**—निकट, मित्रता.
**यावा**—उदय, प्राप्ती.
**येसणार**—अगत्य.
**येह**—इह, ह्या.

**र.**

**रंग**—वर्ण.
**रजा**—कामवासना, आक्रोश.
**रडारोवी**—रडारड, आक्रोश.
**रबडवणें**—भरणें, चरचटणें, जखडून घेणें.
**रया**—किंमत, योग्यता.
**रस**—भक्तिरस इत्यादि.
**रहणी**—रीत, चाल.
**रळपळ**—घोटाळा, अव्यवस्था.
**रळी**—विनोद, थट्टा.
**राऊळ**—देऊळ.
**रांडवडा**—शिव्यागाळी.
**रातणें**—रमणें, रिझणें.
**राहाडी**—राड, चिखलाची थिरचिटी.
**रीस**—रोष, क्रोध.
**रूपडें**—सुंदर रूप.
**रेमट**—लांबट गोष्ट.

**ल.**

**लचाळ**—गचाळ, इंद्रा.
**लवलाहो**—त्वरा.
**लवी**—लवन.
**लहणें**—रोकड, प्रीति, प्रेम.
**लाई**—लय, पुष्कळ.
**लाखणिक**—लाक्षणिक.
**लागपाठ**—पाटलाग.
**लागभाग**—लागाबांधा.
**लागवरी**—गर्भधारणस्थिति.
**लागवेग**—अति त्वरा.
**लागें**—लागलेंच.
**लाठें**—मोठें.
**लाडणें**—लाडावणें.
**लाणी**—लावणी, मालमत्ता.
**लादी**—घटीव चीप.
**लांस**—डाग.
**लासें**—डागानें, चिन्हानें.
**लाहा**—मोठा, लठ्ठ.
**लाहाणें**—पावणें.

लाहातें—चिरकाळाचा लाभ.
लाहो—छंद, धोसा.
लुगडें—वस्त्र.
लुडा—लुला.
लोकभांड—लोकांशीं भांडणारा, भिकारी.
लोलिंगत—आसक्त, लंपट.
लोवाळ—पुष्कळ लोंकरीचा.

व.

वंचणें—वगळणें.
वजणें—जाणें.
वर, वार—प्रसूतीनंतर पडते ती.
वरदळ—बाह्य रंग, दिखाऊ डौल.
वरदळा—बाह्यात्कारें.
वरप—स्वाधीन झालेला.
वरपडा—गुंतलेला.
वरला—फोलमिश्रित धान्य.
वरावरी—वारावारी.
वरी—वरव, पुष्कळ, वरी.
वहिली—चांगली.
वहिलें—लवकर.
वा—उवा, वाजविणे.
वाइला—वाजविला.
वाहलें—वाहिलें.
वाखणें—वाकणें, भिणें.
वाखती—खोळ, ओटी, पोटाची बखळ.
वाखर—एक लोखंडाचा पदार्थ.
वाखा—वार्ता, दुःखें.
वागवरणें—बोलणें.
वागुरा—पशु धरण्याचा सापळा.
वाज—वृथा, व्यर्थ.
वाटुली—वाट.
वाड—वाट, थोर.
वाडा—गुरांचा गोठा.
वाडेंकोडें—कौतुकानें.
वाण—वर्ण, माल, जिनसा.
वाणी—तोटा, वाण.
वाधा—पोट, गर्भाशय.
वान—वाण, वस्तु.
वाय—वांया, व्यर्थ.
वार—आवर.
वारणें—संपणें, आटोपणें.
वारिकें—वर बसणारें, स्वार.
वार्ता—खबर, वर्तमान.
वाला, वाल्हा—प्रिय, आवडता.
वाव—व्यर्थ, वायां.
वावडणें—फडकणें.
वावरणें—फिरणें, भटकणें.
वावसें—व्यर्थसें.
वास—वाट, मार्गप्रतीक्षा.
वासपणें—मरळणें, बडबडणें.
वासलाती—निकाल, फडशा.
वाह—प्रवाह, प्रचार.
वाहाळ—ओढा.
वाही—मार्ग, कृति.
वाळणें—वाळींत टाकणें.
विखळ—दुष्ट, वावगा.
विटवणें—कंटाळवणें.
विताळ—वेताळ.
विंदान—कौशल्य, शिताफी.
विध—विद्ध, फोडलेलें, विधि.
विनटणें—निमग्न होणें.
विन्हडणें—विवळणें, विन्हळ होणें.
विल्हाळ—दुःखाच्या गोष्टी सांगणारा.
विल्हाळक—व्यर्थ, निष्कारण.
विवसी—विघ्नकारिणी देवता.
विश्वामित्री—म्हैस.
विषम—विरुद्ध, विलक्षण.
विसंभणें—टाकून जाणें, सोडणें.

